

ब्रह्मविद्याग्रन्थरत्नमाला, रत्न बारावें.

# बृहदारण्यकोपनिषद्भाष्यार्थ.

[ मूळ, अर्थ व भाष्य यांसह ]

भाग ३ रा. ( अध्याय ४ था, ५ वा व ६ वा. )

संपादक व प्रकाशक

आचार्यभक्त–विष्णु वामन बापट.

२४१ सदाशिव पेठ पुणें,

शके १८३९ अधिक भाद्रपद शु. १५.

किंमत तीन रुपये.

प्रकाशक—विष्णु वामन बापट पुणें पेठ सदाशिव नंबर २४१ यांनीं पुणें पेठ सदाशिव नं २४१ येथें प्रसिद्ध केलें.

---

मुद्रक—त्र्यंबक हरी आवटे, पुणें पेठ सदाशिव नं १८१ यांनीं पुणें पेठ सदाशिव नंबर १८१ येथील आपल्या "इंदिरा" छापखान्यांत छापिलें.

---



# प्रस्तावना.



सर्वान्तर्यामी परमात्म्याच्या प्रसादानें आज आम्ही हा बृहदारण्यकोपनिषद्भाष्यार्थाचा तिसरा भाग ( अध्याय ४, ५ व ६ ) प्रसिद्ध करीत आहों. गेल्या वैशाखांत प्रसिद्ध केलेल्या भागाच्या प्रस्तावनेंत म्हटल्याप्रमाणें हा भाग अनेक आगंतुक कारणांमुळें आषाढ शु. ११ पर्यंत प्रसिद्ध करतां आला नाहीं. म्हणूनच आचार्यही आषाढ शु. १५ पासून सुरू झाला नाहीं. बृहदारण्यकोपनिषद् सर्व उपनिषदांत फार मोठें व महत्त्वाचेंही आहे. आजपर्यंत उपनिषद्भाष्यांच्या भाषांतराचा यत्न पुष्कळांनीं केला, पण पहिल्या २–३ लहान लहान उपनिषदांचीं भाषांतरें करण्यापलीकडे कोणाची फारशी मजल गेली नाहीं. प्रो. भानूंनीं ५–७ लहान उपनिषदांचीं भाषांतरें शेट दा. सा. यंदे यांच्या जोरावर प्रसिद्ध केलीं, पण तेही छान्दोग्यापर्यंत येऊन थांबलें. बृहदारण्यकाला तर कोणी हातही लावला नव्हता. पण तें आमच्या हातून पार पडलें ही खरोखर समाधानाची गोष्ट आहे. आतां मांडूक्योपनिषद्–श्रीगौडपादाचार्यांच्या कारिकांसह आचार्यांतूनच प्रसिद्ध करण्याचा विचार आहे. कारण त्याचा कागद सुमारें २ वर्षांपूर्वींच घेऊन ठेवलेला आहे. त्यानंतर फक्त छांदोग्य राहिलें. त्याची कागदापासून तयारी करावयाची आहे, हें निराळें सांगावयास नकोच. तथापि दशोपनिषद्भाष्य मराठी वाचकांस उपलब्ध व्हावें, या इच्छेतूनें बृहदारण्यकाच्या अखेरपर्यंत या व्यवहारांत तीन हजार रुपये जरी आमच्या अंगावर आले आहेत तरी आणखीं हजार–दीड हजाराचा अधिक भार अंगावर घेऊन आम्ही छांदोग्यही याच वर्षीं आचार्यांतूनच मांडूक्य संपताच सुरू करणार आहों. त्याविषयींची सविस्तर योजना या भागाच्या शेवटीं दिली आहे.

बृहदारण्यकाचे ४, ५ व ६ असे तीन अध्याय या भागांत आहेत, हें वर सांगितलेंच आहे. यांतील ४ था अध्याय फार मोठा व फार महत्त्वाचा आहे. तिन्ही अध्यायांतील ब्राह्मणांची कंडिकावर सविस्तर

विषयानुक्रमणिका पुढें दिली आहे.यास्तव प्रत्येक अध्यायाचा केवळ सारांश येथें थोडक्यांत देतों—

चवथ्या अध्यायाचीं सहा ब्राह्मणें आहेत. त्यांतील पहिल्या ब्राह्मणास षड्-आचार्य ब्राह्मण असें म्हणतात. कारण त्यांत याज्ञवल्क्यांनीं जनकाला ' तुझ्या आचार्यांतील ज्या कोणीं जें कांहीं सांगितलें असेल तें ऐकूं' असें म्हटलें असतां राजानें सहा निरनिराळ्या आचार्यांनीं सांगितलेल्या ' वाक् ब्रह्म ' ' प्राणो ब्रह्म ' ' चक्षुर्वै ब्रह्म,' ' श्रोत्रं ब्रह्म ' ' मनो ब्रह्म ' व ' हृदयं वै ब्रह्म ' या सहा ब्रह्मांचा उल्लेख केला. पण' त्यांतील प्रत्येकाची प्रतिष्ठा व आयतन सांगितलें का ?' असा उलट प्रश्न करून व ' त्यांतील प्रत्येक हा ब्रह्माचा एकदेश आहे,' असें म्हणून प्रत्येकाचें आयतन व प्रतिष्ठा सांगून वागादिकच ब्रह्म आहे अशी उपासना करावयास सांगितलें. प्रत्येक उपदेशानंतर जनक सहस्र दान करावयास तयार झाला पण शिष्याला उपदेश करून कृतार्थ केल्यावाचून त्याच्यापासून कांहीं घेऊं नये, असें म्हणून मुनीनें त्याचा निषेध केला.

दुसऱ्या ब्राह्मणाला कूर्च ब्राह्मण म्हणतात. वरील उपदेश व मुनीचें निःस्पृहत्व पाहून जनकाचा ज्ञानाभिमान शिथिल झाला. तो आपल्या विशिष्ट आसनावरून उठून याज्ञवल्क्यास शरण गेला. तेव्हां त्या मुनीनें राजास दक्षिण नेत्रांतील इंधसंज्ञक पुरुषाच्या ' इंद्र ' या परोक्ष नांवाचा उल्लेख करून डाव्या नेत्रांतील पुरुष ही त्याची भोग्य पत्नी आहे, अशी कल्पना केली. त्यांचें हृदयस्थ आकाश हें समागमस्थान, लोहित पिंड हें अन्न, हृदयांतील नाडीच्छिद्रांचें जाळें हें त्यांचें प्रावरण, हृदयापासून वर जाणारी नाडी हा त्यांचा स्वप्नांतून जागरितांत जाण्याचा मार्ग, हिता नांवाच्या नाड्या हा शरीरभर अन्न जाण्याचा मार्ग इत्यादि वर्णन करून त्या अवस्थेचा अभिमानी तैजस हा वैश्वनराहून अति सूक्ष्माहार आहे असें सांगितलें,





तिसऱ्या ब्राह्मणाला ज्योतिर्ब्राह्मण म्हणतात. त्यांत याज्ञवल्क्यानें 'मी राजाला सांगणार नाहीं ' असा जरी निश्चय केला होता तरी मागें दिलेल्या काम-प्रश्नरूप वराच्या बळावर राजानेंच त्याला ' हा देह कोणत्या ज्योतीच्या बळावर व्यवहार करतो ? ' असा प्रश्न केला. तेव्हां मुनीनें त्याला आदित्य, चंद्र, अग्नि इत्यादि बाह्य ज्योति क्रमानें सांगून व त्याची जिज्ञासा वाढवून शेवटीं स्वयंज्योतिस्वरूप आन्तर आत्मज्योतीचा उपदेश युक्तिपूर्वक केला. विज्ञानमय आत्मा स्वत: अकर्ता असला तरी बुद्धिरूप होऊन तिन्ही अवस्था व इहलोक-परलोक यांतून अनुसंचार करतो. जीवदवस्थेंत तो शरीरेंद्रियांनीं युक्त होतो व मरणावस्थेंत तो तद्रहित होतो. स्वप्नांत तो वासनामय शरीर व रथादि पदार्थ निर्मितो, तो स्वयंज्योति आत्मा येथें पुण्यफल व पापफल नुस्तें पाहतो, त्यांनीं लिप्त होत नाहीं. अनेक अवस्थांतून संचार करीत असतांनाहीं तो त्यांत आसक्त होत नाहीं, याविषयीं दृष्टान्त देऊन आत्म्याचें स्वरूप सविस्तर सांगितलें आहे. शेवटीं वैराग्यासाठीं मरणदशेचेंही वर्णन केलें आहे.

चवथ्या ब्राह्मणांत मुमूर्षूच्या इंद्रियादिकांचा लय झाल्यावर त्याच्या हृदयाचें प्रद्योतन कसें होतें, त्याच अन्त्य मतीप्रमाणें त्याचें शरीरांतून चक्षुरादिद्वारा उत्क्रमण कसें होतें, त्याच्या बरोबर काय काय जातें, इत्यादि सांगून या शरीरांत असतांनाच जीव दुसऱ्या शरीराचें भावनेनें ग्रहण कसें करतो, त्याविषयीं तृणजळूचा दृष्टान्त, व दुसरें नवें चांगलें रूप करतो याविषयीं सोनाराचा दृष्टान्त, सांगितला आहे. पुण्यवान् पुण्यशरीरी होतो व पापी हीनजन्म घेतो असें सांगून पुरुष काममय आहे, तो जसा काम करतो तसा निश्चय होतो, निश्चयानुसार कर्म करतो व कर्मानुरूप फळ भोगतो, असें सुंदर व सोपपत्तिक वर्णन केलें आहे. कामी पुरुषच या कर्मफलाच्या चक्रांत पडतो. जो अकाम आप्तकाम आप्तकाम असतो तो ब्रह्मच होतो, असें सांगून त्याविषयीं अनेक प्रमाणभूत श्लोकांचा उल्लेख केला आहे.जनकानें वारंवार प्रश्न केल्यामुळें

मुनीनें आत्मज्ञानाचीं अनेक साधनें सांगितलीं आहेत.सर्व वेदाचा व कर्मा-चा आत्मविविदिषेकडे विनियोग केला आहे व शेवटीं आत्मस्वरूपाचा उपसंहार केला आहे.

पांचव्या ब्राह्मणांत संन्यासासह आत्मज्ञान हें मोक्षाचें साधन आहे, असें तर्कानेंही दाखविण्यासाठीं याज्ञवल्क्य व मैत्रेयी यांचा संवाद पुनः वर्णिला आहे; व सहाव्या ब्राह्मणांत याज्ञवल्कीय कांडाचा वंश सांगितला आहे. आदि आचार्य ब्रह्म, त्याच्यापासून परमेष्ठी, परमेष्ठीपासून सनग इत्यादिक्रमानें पौतिमाष्यापर्यंत गुरुशिष्यांचा क्रम अव्याहत चालत आला आहे, असें त्यावरून सिद्ध होतें. त्यानंतर हाच संप्रदाय अनेक प्रकारें चालू होऊन तो अद्यापि या जगांत चालू आहे.

पांचव्या व सहाव्या अध्यायांत कर्मांशीं अविरुद्ध अशीं उपासनें सांगितलीं आहेत. तीं उपासनें अतिशय अभ्युदयाचीं साधनें असून तीं क्रममुक्तीला कारण होतात. सर्व उपासनांच्या शेषत्वानें—अंगत्वानें ओं-कार, दम, दान व दया हीं साधनें पांचव्या अध्यायाच्या पहिल्या व दुसऱ्या ब्राह्मणांत सांगितलीं आहेत. तिसऱ्या ब्राह्मणापासून पुढें सोपा-धिक ब्रह्माचीं अभ्युदय हें फळ देणारीं उपासनें सांगावयास आरंभ केला आहे. 'हृदयं ब्रह्म' 'सत्यं ब्रह्म,' 'आदित्यमंडलस्थ पुरुष व अध्यात्मचाक्षुष' 'मनोमय ब्रह्म' 'विद्युत्–ब्रह्म' 'वैश्वानर अग्नि' इत्यादि उपासनें नवव्या ब्राह्मणापर्यंत सांगून दहाव्या ब्राह्मणांत उपास-काची गति सांगितली आहे. अकराव्या ब्राह्मणांत व्याधि, प्रेताला अर-ण्यांत नेणें व दहन करणें, यांच्या ठिकाणीं परम तपाची दृष्टि करावयास सांगितलें आहे. बाराव्यांत अन्न व प्राण यांची एकत्वानें उपासना सां-गितल्यावर तेराव्यांत उक्थादिदृष्टया प्राणोपासना विहित आहे. चवदाव्या ब्राह्मणांत गायत्रीची उपासना असून पंधराव्यांत आदित्याची मार्गावि-षयीं प्रार्थना केली आहे.

सहाव्या अध्यायाच्या पहिल्या ब्राह्मणांत ज्येष्ठत्व-श्रेष्ठत्वादि गुणवि-





शिष्ट प्राणाची उपासना, व प्राणच ज्येष्ठ-श्रेष्ठादिगुणविशिष्ट आहे, याविषयीं प्राणसंवादात्मक आख्यायिका सांगितली आहे. दुसऱ्या ब्राह्मणांत प्रवाहणनामक जैवली पंचाल राजानें गौतमाला पंचाग्निविद्येचा उपदेश केल्याची समग्र हकीगत असून देवयान व पितृयाण मार्गही सांगितले आहेत. तिसऱ्या ब्राह्मणांत श्रीमन्थ या नांवाचें आभ्युदयिक कर्म सर्व इतिकर्तव्यतेसह वर्णिलें आहे. चवथ्या ब्राह्मणांत पुत्रमन्थ या नांवाचें कर्म सर्व इतिकर्तव्यतेसह विहित आहे. त्याच्या योगानें इष्ट पुत्र संपादन करतां येतो; पांचव्या ब्राह्मणांत या सर्व प्रवचनाचा वंश सांगितला आहे.

असो; शेवटीं ज्या अन्तर्यामीच्या कृपालेशानें हें महत्कार्य आमच्या हातून पार पडलें त्याचें अनुसंधान करून ही अल्प सेवा आम्ही आचार्यचरणीं समर्पण करतों.

पुणें अधिक भाद्रपद
शुद्ध ४ शके १८३९ } वि. वा. बापट.

---

१ मांडूक्य उपनिषदाच्या अगोदर हें बृहदारण्यक हातीं घेण्यास हुबळीची श्रीशंकराचार्योत्सवसंस्था निमित्त कारण झाली असून तिच्याकडून आम्हांला या साठीं शंभर रुपयांचें बक्षीस मिळालें आहे, या गोष्टीचा मुद्दाम उल्लेख करून त्या संस्थेचे आभार मानणें अवश्य आहे. कै. **कृष्णराव जीवणराव देसाई** कार्यदर्शी, यांनीं आम्हांस आग्रहपूर्वक हेंच उपनिषद् अगोदर हातीं घ्यावयास लावलें नसतें तर कदाचित् हें आज प्रसिद्धही झालें नसतें. त्याचप्रमाणें इंदिरा छापखान्याचे मालक रा. रा. **त्रिंबक हरी आवटे** यांचेंही आम्हांला या कामीं वेळोवेळीं सर्व प्रकारचें अतिशय साह्य झालें आहे, याविषयीं त्यांचे आभार मानावे तितके थोडेच होणार आहेत.

संपादक.

# ब्रह्मविद्याग्रंथरत्नमालेंतील पुस्तकें.

| पुस्तकाचें नांव. | किंमत. | | |
|---|---|---|---|
| १ ईशोपनिषद्भाष्यार्थ पृष्ठें ६० . ... .... | ० | ४ | ० |
| २ केनोपनिषद्भाष्यार्थ पृ. १२८ .... .... | ० | ८ | ० |
| ३ ऐतरेयोपनिषद्भाष्यर्थ पृ. २४० .... .... | १ | ० | ० |
| ५ तैत्तिरीयोपनिषद्भाष्यार्थ पृ. २१० .... .... | १ | ० | ० |
| ६ सार्थ तैत्तिरीयोपनिषद् पृ. १२८ .... .... | ० | ८ | ० |
| ७ सार्थ नारायणोपनिषद् पृ. १२८ .... .... | ० | ८ | ० |
| ८ बृहदारण्यकोपनिषद्भाष्यार्थ भाग १, २, ३ संपूर्ण पृ. १६५० किं. ... | ७ | ८ | ० |
| १ अनुभूतिप्रकाश अ. १ पृ. ३४० .... | १ | ८ | ० |
| २ चनुभूनिप्रकाश अ. २ पृ. १२८ .... | ० | ८ | ० |
| १ आत्मपुराण अ. १ पृ. ४९० .... .... | २ | ० | ० |
| २ आत्मपुराण अ. १० पृ. २५२ .... .... | १ | ० | ० |

## दर्शनमाला.

| | | | |
|---|---|---|---|
| १ चार्वाकदर्शनसार, ( सखंडन ) .... .... | ० | ४ | ० |
| २ बौद्धदर्शनसार ( सखंडन ) .... .... | ० | ६ | ० |
| ३ जैनदर्शनसार ( सखंडन ) .... .... | ० | ४ | ० |
| ४ श्रीरामानुजदर्शनसार .... .... .... | ० | ७ | ० |
| ५ श्रीपूर्णप्रज्ञदर्शनसार .... .... .... | ० | ४ | ६ |
| ६ श्रीतर्कसंग्रहसार .... .... .... | ० | ५ | ० |
| ७ श्रीवल्लभदर्शनसार .... .... .... | ० | ४ | ६ |
| ८ श्रीमाहेश्वरदर्शनसार .... .... .... | ० | ४ | ० |
| ९ जैमिनि-पाणिनिदर्शनसार .... .... .... | ० | ४ | ६ |

शांकरभाष्यानुसार गीतारहस्य पृ. ५२ किं. ४ आणे

सार्थ प्रश्नोत्तररत्नमालिका. पृ. ६० किं ४. आणे.

---

१ हीं सर्व उपनिषदें मूळ श्रुति, तिचा सरळ अर्थ, श्रीशंकराचार्यांचें भाष्य, भाष्याचा सरळ व सुबोध अर्थ व ठिकठिकाणीं आनंदगिरींच्या टीकेंतील आशय यांसह आहेत.

**विष्णुशास्त्री बापट.**

संपादक—आचार्य व ब्रह्मविद्याग्रन्थरत्नमाला

२४१ सदाशिव पेठ पुणें सिटि.



# विषयानुक्रमणिका

## ब्राह्मण ४ थें ( २४३–२६९ )

---

## ब्राह्मण ५ वें ३६९–४०८

## अध्याय ५ वा ( १–८८ )

### ब्राह्मण १ लें ( १–२३ )



### ब्राह्मण २ रें ( २३–३१ )

---

## अध्याय ६ वा ( १–११६ )

### ब्राह्मण १ लें. ( १–२४ )



### ब्राह्मण २ रें ( २५–७५ )



# बृहदारण्यकोपनिषद्भाष्यार्थ.

[ मूळ, अर्थ व भाष्य यांसह. ]

## अध्याय ४ था.

ॐ तत्सद्ब्रह्मणे नमः ।

जनको ह वैदेह आसांचक्रे । अस्य संबन्धः ! शारीराद्यानष्टौ पुरुषान्निरुह्य प्रत्युह्य पुनर्हृदये दिग्भेदेन च पुनः पञ्चधा व्युह्य हृदये प्रत्युह्य हृदयं शरीरं च पुनरन्योन्यप्रतिष्ठं प्राणादिपञ्चवृत्त्यात्मके समानाख्ये जगदात्मनि सूत्र उपसंहृत्य जगदात्मानं शरीरहृदयसूत्रावस्थमतिक्रान्तवान्य औपनिषदः पुरुषो नेति नेतीति व्यपदिष्टः स साक्षाच्चोपादानकारणस्वरूपेण च निर्दिष्टो विज्ञानमानन्दमिति । तस्यैव वागादिदेवताद्वारेण पुनराधिगमः कर्तव्य इत्यधिगमनोपायान्तरार्थोऽयमारम्भो ब्राह्मणद्वयस्य । आख्यायिका त्वाचारप्रदर्शनार्था ॥

भाष्यार्थ—( पूर्व अध्यायांत जल्पन्यायानें सच्चिदानन्द ब्रह्माचा निर्धार केला. आतां वादन्यायानें त्याचाच निर्धार करण्यासाठीं पुढचा अध्याय सुरू करितात—) ' जनको ह वैदेह आसांचक्रे ' याचा संबंध—शारीरादि आठ पुरुषांचा विस्तारपूर्वक व्यवहार करून, पुनः हृदयांत त्यांचा उपसंहार करून, पुनरपि प्राच्यादि दिशांच्या भेदानें पांच प्रकारें विस्तारपूर्वक व्यवहार करून त्यांचाही हृदयांत उपसंहार करून, पुनः ज्यांना परस्परांचें प्रतिष्ठात्व आहे असें हृदय व शरीर यांचा प्राणादि पंचवृत्त्या-

त्मक समानाख्य जगदात्मभूत-अव्याकृत सूत्रांमध्यें[1] उपसंहार करून ज्यानें शरीर, हृदय व सूत्र यांच्या अवस्थेस प्राप्त झालेल्या जगदात्म्याचें म्ह० अव्याकृताचें अतिक्रमण[2] केलें आहे, ज्याचा ' नेति नेति ' असा निर्देश केला आहे, व जो औपनिषद पुरुष त्याचा साक्षात् व उपादानकारणस्वरूपानें ' विज्ञानमानन्दं ' याप्रमाणें निर्देश केला. ( आतां पुढील दोन ब्राह्मणांचें तात्पर्य सांगतात-) त्याचाच वागादिकांच्या[3] देवताद्वारा पुनः अवबोध करावा म्हणून अवबोधाच्या दुसऱ्या[4] उपायांसाठीं हा पुढील ब्राह्मणद्वयाचा आरंभ आहे. येथील आख्यायिक आचार[5] प्रदर्शित करण्यासाठीं आहे.

ॐ जनको ह वैदेह आसांचक्रेऽथ ह याज्ञवल्क्य आवव्राज । तꣳहोवाच याज्ञवल्क्य किमर्थमचारीः पशूनिच्छन्नण्वन्तानिति । उभयमेव सम्राडिति होवाच ॥ १ ॥

अर्थ---जनक वैदेह आसन करिता झाला. ( आपली भेट घेण्यासाठीं आलेल्यांस अवकाश देता झाला; त्यासाठीं त्यानें एक स्थान व काळ नियत केला, असा भावार्थ. ) तेंव्हां याज्ञवल्क्य आला. त्याला जनक म्हणाला-" याज्ञवल्क्या, कशासाठीं आलास ? पशूंसाठीं कीं सूक्ष्मवस्तूचा निर्णय होईपर्यंत माझे प्रश्न ऐकण्यासाठीं ? " त्यावर याज्ञवल्क्य म्हणाला, " राजा मी दोन्हीकरितां आलों आहें " १

जनको ह वैदेह आसांचक्र आसनं कृतवानास्थायिकां दत्तवानित्यर्थः । दर्शनकामेभ्यो राज्ञः । अथ ह तस्मिन्नवसरे याज्ञवल्क्य आवव्राजाऽऽगतवानात्मनो योगक्षेमार्थं राज्ञो वा विविदिषां दृष्ट्वानुग्रहार्थम् ॥

---

१ या सूत्रशब्दानें त्याचें कारण घ्यावें. २ अतिक्रमण म्हणजे गुण व दोष यांशीं संसर्ग न पावणें. ३ वागादिकांच्या अग्न्यादिक अधिष्ठातृदेवतांमध्यें ब्रह्मदृष्टि करणें याच्या द्वारा ४ पूर्वोक्त अन्वय-व्यतिरेकादि साधनांच्या अपेक्षेनें दुसऱ्या ५ आचार्यवान् श्रद्धादिसंपन्न पुरुषानें विद्या संपादन करावी, हा आचार.

भाष्यार्थ—' जनको ह वैदेहः-' विदेह देशांचा राजा जनक 'आसांचक्रे-' आसन करता झाला. राजाचें दर्शन व्हावें या इच्छेनें आलेल्या लोकांस आस्थायिका-श्रोतृसमूह देता झाला, असा भावार्थ. ( त्यांच्या दर्शनासाठीं एक स्थान करून त्यांना दर्शनाचा अवकाश देता झाला. ) ' अथ ह-' त्यावेळीं ' याज्ञवल्क्यः आवव्राज-' याज्ञवल्क्य आपल्या योगक्षेमासाठीं [ म्ह० अप्राप्त वस्तूच्या प्राप्तीसाठीं व प्राप्त वस्तूच्या रक्षणासाठीं ] किंवा राजाची विविदिषा-आत्म्याला जाणण्याची इच्छा-पाहून त्याच्यावर अनुग्रह करण्यासाठीं आला.

तमागतं याज्ञवल्क्यं यथावत्पूजां कृत्वोवाच होक्तवाञ्जनको हे याज्ञवल्क्य किमर्थमचारीरागतोऽसि किं पशूनिच्छन्पुनरप्याहोस्विदण्वन्तान्सूक्ष्मान्तान्सूक्ष्मवस्तुनिर्णयान्तान्प्रश्नान्मत्तः श्रोतुमिच्छन्निति ॥

भाष्यार्थ-' तं-' आलेल्या त्या याज्ञवल्क्याची यथाविधि पूजा करून ' ह उवाच-' जनक म्हणाला-'किमर्थमचारीः-' हे याज्ञवल्क्या, कशासाठीं आला आहेस ? ' पशून् इच्छन् अण्वन्तान् इति-' काय पशूंच्या इच्छेनें आला आहेस किंवा सूक्ष्मान्त-सूक्ष्म वस्तूच्या निर्णयापर्यन्त मजपासून प्रश्न ऐकण्याच्या इच्छेनें आला आहेस ?

उभयमेव पशून्प्रश्नांश्च हे सम्राट् । सम्राडिति वाजपेययाजिनो लिङ्गं यश्चाऽऽज्ञया राज्यं प्रशास्ति स सम्राट् तस्याऽऽमन्त्रणं हे सम्राडिति समस्तस्य वा भारतस्य वर्षस्य राजा ॥ १ ॥

भाष्यार्थ—' उभयमेव सम्राडिति होवाच-' हे सम्राट्, पशु व प्रश्न या दोघांच्याही इच्छेनें आलों आहें. ' सम्राट् ' हें वाजपेय यज्ञ करणाराचें लिंग-चिह्न आहे, व जो आज्ञेनें राज्याचें प्रशासन करतो तो सम्राट्. ' हे सम्राट् ' हें त्याचें संबोधन आहे. किंवा समस्त-हिमालयापासून सेतूपर्यंत -भारत वर्षदेशाचा राजा. १.

यत्ते कश्चिदब्रवीत्तच्छृणवामेत्यब्रवीन्मे जित्वा शैलिनिर्वाग्वै ब्रह्मेति । यथा मातृमान्पितृमा-

नाचार्यवान्ब्रूयात्तथा तच्छैलिनिरब्रवीद्वाग्वै ब्रह्मेत्यवदतो हि किᳬस्यादिति । अब्रवीत्तु ते तस्याऽऽयतनं प्रतिष्ठां न मेऽब्रवीदित्येकपाद्वा एतत्सम्राडिति स वै नो ब्रूहि याज्ञवल्क्य ॥

अर्थ—'कोणी आचार्य तुला जें सांगता झाला आहे (तुझ्या आचार्यानें तुला जें सांगितलें आहे) तें आम्हीं ऐकावें,' असें याज्ञवल्क्य म्हणाला. तेव्हां जनक म्हणाला, " जित्वा या नांवाचा शिलिनाचा पुत्र-शैलिनि मला " वाक् हेंच ब्रह्म आहे "असें सांगता झाला." त्यावर याज्ञवल्क्य म्हणाला "ज्याप्रमाणें मातृमान्, (ज्या पुत्राला अनुशासन करणारी माता आहे तो मातृमान् इत्यादि) पितृमान् व आचार्यवान् पुरुषानें सांगावें त्याप्रमाणें जित्वा शैलिनीनें ' वाक् हेंच ब्रह्म आहे ' असें सांगितलें आहे. कारण जो बोलत नाहीं त्याला काय लाभ होणार ? परंतु त्यानें तुला त्या ब्रह्माचें आयतन व प्रतिष्ठा सांगितली काय ?" जनक म्हणतो—"मला त्यानें तें सांगितलें नाहीं." याज्ञवल्क्य म्हणतो—" हे राजा, हें एकपाद् ब्रह्म आहे." जनक—" तर मग याज्ञवल्क्या, तूं आम्हाला सांग."

वागेवाऽऽयतनमाकाशः प्रतिष्ठा प्रज्ञेत्येनदुपासीत । का प्रज्ञता याज्ञवल्क्य । वागेव सम्राडिति होवाच । वाचा वै सम्राड्बन्धुः प्रज्ञायत ऋग्वेदो यजुर्वेदः सामवेदोऽथर्वाङ्गिरस इतिहासपुराणं विद्या उपनिषदः श्लोकाः सूत्राण्यनुव्याख्यानानि व्याख्या-

नानीष्टꣳ हुतमाशितं पायितमयं च लोकः परश्च लोकः सर्वाणि च भूतानि वाचैव सम्राट् प्रज्ञायन्ते ॥

अर्थ—याज्ञ०–" वाक् हेंच त्याचें आयतन, आकाश प्रतिष्ठा, ' प्रज्ञा ' असें जाणून याची उपासना करावी. " जनक –" हे याज्ञवल्क्या, प्रज्ञता ती कोणती ? " 'वाक् हीच प्रज्ञता आहे-' असें याज्ञवल्क्य म्हणाला. " हे सम्राट्, वाक्-नेंच बंधु जाणला जातो. ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्वाङ्गिरस, इतिहास, पुराण, विद्या, उपनिषदें, श्लोक, सूत्रें, अनुव्याख्यानें, व्याख्यानें, इष्ट, हुत, अशित, पायित, हा लोक, पर लोक, व सर्व भूतें हे राजा, वाक्-नेंच जाणलीं जातात."

वाग्वै सम्राट् परमं ब्रह्म नैनं वाग्जहाति सर्वाण्येनं भूतान्यभिक्षरन्ति देवो भूत्वा देवानप्येति य एवं विद्वानेतदुपास्ते। हस्त्यृषभꣳ सहस्रं ददामीति होवाच जनको वैदेहः । स होवाच याज्ञवल्क्यः पिता मेऽमन्यत नाननुशिष्य हरेतेति ॥ २ ॥

अर्थ—"हे सम्राट्, वाक् हेंच परं ब्रह्म आहे. याप्रमाणें उपासना करणाऱ्याला वाक् सोडीत नाहीं. सर्व भूतें याच्यावर बलिदानादिकांच्या योगानें उपकार करितात. जो असें जाणणारा उपासना करतो तो येथेंच देव होऊन मरणोत्तर देवांमध्यें लय पावतो." वैदेह जनक म्हणाला, " ( या विद्येच्या निष्क्रयार्थ ) मी तुला ज्या सहस्र गायींत एक हत्तीसारखा बैल आहे, अशीं एक सहस्र हस्त्यृषभ देतों. " पण त्यावर

याज्ञवल्क्य म्हणतो--" माझा पिता असें समजत असे कीं, शिष्याला कृतार्थ केल्यावाचून त्याच्या पासून धन घेऊं नये." २

किंतु यत्ते तुभ्यं कश्चिदब्रवीदाचार्योऽनेकाचार्यसेवी हि भवांस्तच्छृणवामेति। इतर आह। अब्रवीदुक्तवान्मे ममाऽऽचार्यो जित्वा नामतः शिलिनस्यापत्यं शैलिनिर्वाग्वै ब्रह्मेति वाग्देवता ब्रह्मेति। आहेतरो यथा मातृमान्माता यस्य विद्यते पुत्रस्य सम्यगनुशास्त्र्यनुशासनकर्त्री स मातृमान्। अत ऊर्ध्वं पिता यस्यानुशास्ता स पितृमान्। उपनयनादूर्ध्वमा समावर्तनादाचार्यो यस्यानुशास्ता स आचार्यवान्। एवं शुद्धित्रयहेतुसंयुक्तः स साक्षादाचार्यः स्वयं न कदाचिदपि प्रामाण्याद्व्यभिचरति स यथा ब्रूयाच्छिष्याय तथाऽसौ जित्वा शैलिनिरुक्तवान्वाग्वै ब्रह्मेति। अवदतो हि किं स्यादिति। न हि मूकस्येहार्थममुत्रार्थं वा किंचन स्यात्॥

भाष्यार्थ--( राजाप्रत प्रश्न उत्थापित करितात-) परंतु 'यत्तेतुभ्यं०-' जें तुला कोणी आचार्य सांगता झाला, ( 'कोणी' असें म्हणण्याचें तात्पर्य सांगतात-)तूं अनेक आचार्यांची सेवा करणारा आहेस, हें प्रसिद्ध आहे. यास्तव त्यांतील एकाद्या आचार्यानें जें तुला सांगितलें असेल तें आम्हीं ऐकावें. त्यावर राजा म्हणतो-'अब्रवीन्मे जित्वा०-'जित्वा या नांवाचा शिलिनाचें अपत्य शैलिनि हा माझा आचार्य 'वाग्वै ब्रह्म-'वाग्देवता ब्रह्म आहे, असें मला म्हणाला. त्यावर याज्ञवल्क्य म्हणतो-- 'यथा मातृमान्०-' ज्या पुत्राला यथार्थ अनुशासन--उपदेश करणारी माता असते तो मातृमान्; 'पितृमान्-' त्यानंतर पिता ज्याचा अनुशास्ता आहे तो पितृमान्, 'आचार्यवान्-' उपनयनानंतर समावर्तनापर्यंत आचार्य ज्याचा अनुशास्ता आहे तो आचार्यवान्. याप्रमाणें शुद्धित्रयाच्या हेतूंनीं संयुक्त असा एकादा साक्षात् आचार्य स्वतः प्रामाण्यापासून--[ आप्तत्वापासून--यथार्थ भाषणापासून ] केव्हांही व्यभिचार

१ हें याज्ञवल्क्याचें म्हणणें आहे. २ हें जनकाचें उत्तर आहे.

पावत नाहीं. त्यानें जसें शिष्याला सांगावें त्याप्रमाणें या जित्वा शैलिनीनें 'वाग्वै ब्रह्म-' असें सांगितलें आहे. 'अवदतो हि किं स्यात्-' कारण न बोलणाऱ्या पुरुषाला काय लाभ होणार ? ( म्हणून त्यानें तसें सांगितलें. ) कारण मुक्याला ऐहिक किंवा पारलौकिक कांहींच अर्थ मिळत नाहीं.

किंत्वब्रवीदुक्तवांस्ते तुभ्यं तस्य ब्रह्मण आयतनं प्रतिष्ठां च । आयतनं नाम शरीरम् । प्रतिष्ठा त्रिष्वपि कालेषु य आश्रयः । आहेतरो न मेऽब्रवीदिति । इतर आह । यद्येवमेकपाद्वा एतदेकः पादो यस्य ब्रह्मणस्तदिदमेकपाद्ब्रह्म त्रिभिः पादैः शून्यमुपास्यमानमपि न फलाय भवतीत्यर्थः । यद्येवं स त्वं विद्वान्सन्नोऽस्मभ्यं ब्रूहि हे याज्ञवल्क्येति ॥

भाष्यार्थ—(पण जित्वानें सांगितलेल्या ब्रह्मविद्येनें आपल्याला कृतकृत्य मानणाऱ्या राजाला याज्ञवल्क्य म्हणाला–) 'अब्रवीत्तु ते०-' परंतु त्यानें तुला त्या ब्रह्माचें आयतन व प्रतिष्ठा सांगितली का ? (आयतन व प्रतिष्ठा एकच नाहीं, असें सांगतात–) आयतन म्हणजे शरीर व प्रतिष्ठा म्हणजे तिन्ही काळांतील जो आश्रय. त्यावर जनक म्हणाला– 'न मेऽब्रवीत् इति-' 'मला त्यानें सांगितलें नाहीं.' तेव्हां याज्ञवल्क्य म्हणाले–' एकपाद्वा एतत्सम्राडिति-' हे राजा, असें जर असेल तर हें एकपाद्-च आहे. ज्याचा एकच पाद आहे असें हें एकपाद् ब्रह्म आहे. तीन पादांनीं शून्य, अशा एकपाद्ब्रह्माची उपासना जरी केली तरी तें फल देण्यास समर्थ होत नाहीं. 'स वै नो ब्रूहि०-' जर असें असेल तर तूं तें चतुष्पाद् ब्रह्म जाणत असल्यामुळें, हे याज्ञवल्क्या, आम्हांला सांग.

स चाऽऽह वागेवाऽऽयतनं वाग्देवस्य ब्रह्मणो वागेव करणमायतनं शरीरमाकाशोऽव्याकृताख्यः प्रतिष्ठोत्पत्तिस्थितिलयकालेषु प्रज्ञेत्येतदुपासीत प्रज्ञेतीयमुपनिषद्ब्रह्मणश्चतुर्थः पादः प्रज्ञेति कृत्वैनद्ब्रह्मोपासीत ॥ का प्रज्ञता याज्ञवल्क्य किं स्वयमेव प्रज्ञेत प्रज्ञानिमित्तं ।

यथाऽऽयतनप्रतिष्ठे ब्रह्मणो व्यतिरिक्ते तद्वत्किम् । न । कथं तर्हि वागेव सम्राडिति होवाच वागेव प्रज्ञेति होवाचोक्तवान्न व्यतिरिक्ता प्रज्ञेति ॥

भाष्यार्थ—तो याज्ञवल्क्य म्हणतो—'वागेवायतनं-' वाक्च—वाक्-ची देवता, एतद्रूप ब्रह्माचें वाक् हें करणच—इंद्रियच आयतन—शरीर असून ' आकाशः प्रतिष्ठा-' अव्याकृतसंज्ञक आकाश हीच उत्पत्ति, स्थिति व लय या तिन्ही काळीं प्रतिष्ठा आहे. ' प्रज्ञेत्येनदुपासीत-' प्रज्ञा असें जाणून याची उपासना करावी. ' प्रज्ञा ' अशी ही 'उपनिषद् ' ब्रह्माचा चवथा पाद आहे. ' प्रज्ञा ' असें म्हणून या ब्रह्माची उपासना करावी.

' का प्रज्ञता याज्ञवल्क्य-' हे याज्ञवल्क्या, प्रज्ञता कोणती ? स्वतः प्रज्ञा हीच प्रज्ञता कीं प्रज्ञा जिचें निमित्त आहे ती वाक् हीच प्रज्ञता ? ज्याप्रमाणें आयतन व प्रतिष्ठा वाक्-हून व्यतिरिक्त आहेत त्याप्रमाणें प्रज्ञता व्यतिरिक्त आहे कीं काय ? व्यतिरिक्त नाहीं, तर काय 'वागेव सम्राड्०-' हे राजन्, वाक्-च प्रज्ञा आहे, व्यतिरिक्त नाहीं, असें याज्ञवल्क्य म्हणाला.

कथं पुनर्वागेव प्रज्ञेत्युच्यते । वाचा वै सम्राड्बन्धुः प्रज्ञायतेऽस्माकं बन्धुरित्युक्ते प्रज्ञायते बन्धुस्तथर्ग्वेदादि । इष्टं यागनिमित्तं धर्मजातं हुतं होमनिमित्तं च । आशितमन्नदाननिमित्तं पायितं पानदाननिमित्तमयं च लोक इदं च जन्म परश्च लोकः प्रतिपत्तव्यं च जन्म सर्वाणि च भूतानि वाचैव सम्राट् प्रज्ञायन्ते ॥

भाष्यार्थ—अहो पण वाक्च प्रज्ञा असें कसें सांगितलें जातें ? 'वाचा वैं सम्राड्०-' हे राजन्, ' हा आमचा किंवा तुमचा बंधु ' असें सांगितलें असतां वाक्-च्या योगानें तो बंधु जाणला जातो. त्याचप्रमाणें ऋग्वेदादिक वाक्च आहे. ' इष्टं-' यागनिमित्तक सर्व धर्म, ' हुतं-'

होमनिमित्तक सर्व धर्म, ' आशितं-' अन्नदाननिमित्तक सर्व धर्म, 'पायितं-' पानदाननिमित्तक सर्व धर्म, ' अयं च लोकः ' हें जन्म, ' परश्च लोकः-' पुढें घ्यावयाचा जन्म व सर्व भूतें, हे राजा, वाक्-नेंच जाणलीं जातात.

अतो वाग्वै सम्राट् परमं ब्रह्म नैनं यथोक्तब्रह्मविदं वाग्जहाति । सर्वाण्येनं भूतान्याभिक्षरन्ति बलिदानादिभिरिह । देवो भूत्वा पुनः शरीरपातोत्तरकालं देवानप्येत्यपिगच्छति य एवं विद्वानेतदुपास्ते ॥

भाष्यार्थ—यास्तव ' वाग्वै सम्राट्०-' वाक् हेंच 'परमं ब्रह्म' आहे. ' नैनं वाग्जहाति-' या पूर्वोक्त ब्रह्मवेत्त्याला वाक् सोडीत नाहीं. ' सर्वाण्येनं०-' सर्व भूतें याला या लोकीं उपहार [फुलांच्या माळा, चंदन, वस्त्रें, अलंकार इत्यादि ] समर्पण करणें यांच्या योगानें अभितः रक्षितात. ' देवो भूत्वा०-' जो ' वाक् वै ब्रह्म ' असें जाणणारा त्याची उपासना करतो तो येथें देव होऊन शरीरपात झाल्यानंतर देवांस प्राप्त होतो. [ देवांमध्यें लीन होतो. ]

विद्यानिष्क्रयार्थं हस्तितुल्य ऋषभो हस्त्यृषभो यस्मिन्गोसहस्रे तद्धस्त्यृषभं सहस्रं ददामीति होवाच जनको वैदेहः ॥ स होवाच याज्ञवल्क्यः । अननुशिष्य शिष्यं कृतार्थमकृत्वा शिष्याद्धनं न हरेतेति मे मम पिताऽमन्यत ममाप्ययमेवाभिप्रायः ॥ २ ॥

भाष्यार्थ—' हस्त्यृषभं०-' हस्तितुल्य–हस्तीसारखा ऋषभ-ज्या सहस्र गायींत आहे तें एक ' हस्त्यृषभ ' होय. असें एक सहस्र हस्त्यृषभ[1] मी तुला देतों, असें वैदेह जनक विद्येच्या निष्क्रयार्थ म्हणाला.

' स होवाच०-' पण त्यावर याज्ञवल्क्य म्हणाला–' अननुशिष्य न हरेत०-' शिष्याला उपदेश करून कृतार्थ न करितां शिष्यापासून धन घेऊं नये, असें माझा पिता समजत होता. माझाही हाच अभिप्राय आहे.२.

---

१ एक सहस्र हत्तीसारखे खोंड व दहा लक्ष गायी, असा इत्यर्थ.

यदेव ते कश्चिदब्रवीत्तच्छृणवामेत्यब्रवीन्म उदङ्कः शौल्बायनः प्राणो वै ब्रह्मेति यथा मातृमान्पितृमानाचार्यवान्ब्रूयात्तथा तच्छौल्बायनोऽब्रवीत्प्राणो वै ब्रह्मेत्यप्राणतो हि किꣳस्यादित्यब्रवीत्तु ते तस्याऽऽयतनं प्रतिष्ठां न मेऽब्रवीदिति ॥

अर्थ—'जें तुला कोणीं सांगितलें असेल, तें आम्ही ऐकूं.' 'शुल्बाचें अपत्य उदंक 'प्राणच ब्रह्म आहे' असें मला सांगता झाला.' 'ज्याप्रमाणें एकाद्या मातृमान्, पितृमान्, आचार्यवान् आचार्यानें सांगावें तसेंच तो शौल्बायन 'प्राणो वै ब्रह्म०' असें सांगता झाला. कारण प्राणक्रिया न करणाराला काय लाभ होणार? पण त्यानें तुला त्याचें आयतन व प्रतिष्ठा सांगितली का?' 'नाहीं, मला सांगितली नाहीं.'

एकपाद्वा एतत्सम्राडिति स वै नो ब्रूहि याज्ञवल्क्य प्राण एवाऽऽयतनमाकाशः प्रतिष्ठा प्रियमित्येनदुपासीत का प्रियता याज्ञवल्क्य प्राण एव सम्राडिति होवाच प्राणस्य वै सम्राट्कामायायाज्यं याजयत्यप्रतिगृह्यस्य प्रतिगृह्णात्यपि तत्र वधाशङ्कं भवति यां दिशमेति प्राणस्यैव सम्राट् कामाय ॥

अर्थ—'हे राजा; हें एकपाद् ब्रह्म आहे.' 'तर मग हे याज्ञवल्क्या, आम्हांला तें तूंच सांग.' 'प्राणच आयतन–शरीर असून अव्याकृताख्य आकाश प्रतिष्ठा आहे. 'प्रिय' असें समजून त्याची उपासना करावी.' 'हे

याज्ञवल्क्या, प्रियता काय आहे.' 'हे राजा, प्राणच प्रियता आहे. हे सम्राट्, प्राणाच्याच करितां अयाज्याकडूनही यजन करवितो. जो अप्रतिगृह्य–प्रतिग्रह घेण्यास अयोग्य असतो त्याच्यापासून प्रतिग्रह घेतो. ज्या दिशेस जातो त्या दिशेंत आपल्याला कोणी मारील, असा वधाविषयीं साशंक होतो. हे राजा, हें सर्व प्राणाच्याच कामासाठीं होतें.'

प्राणो वै सम्राट् परमं ब्रह्म नैनं प्राणो जहाति सर्वाण्येनं भूतान्यभिक्षरन्ति देवो भूत्वा देवानप्येति य एवं विद्वानेतदुपास्ते हस्त्यृषभꣳसहस्रं ददामीति होवाच जनको वैदेहः स होवाच याज्ञवल्क्यः पिता मेऽमन्यत नाननुशिष्य हरेतेति ॥ ३ ॥

अर्थ—'हे राजन्, प्राणच परम ब्रह्म आहे. त्याला प्राण सोडीत नाहीं. सर्व भूतें याला उपहारादिकांच्या द्वारा अभितः उपकार करितात. जो याप्रमाणें जाणणारा या ब्रह्माची उपासना करतो तो देव होऊन देवास प्राप्त होतो.' त्यावर वैदेह जनक म्हणाला "मी तुला एक सहस्र हस्त्यृषभ देतों." पण तें ऐकून याज्ञवल्क्य म्हणतो-"शिष्याला कृतार्थ केल्यावाचून त्याचें धन घेऊं नये, असें माझा पिता समजत असे" ३.

यदेव ते कश्चिदब्रवीदुदङ्को नामतः शुल्बस्यापत्यं शौल्बायनोऽब्रवीत्प्राणो वै ब्रह्मेति प्राणा वायुर्देवता पूर्ववत्। प्राण एवाऽऽयतनमाकाशः प्रतिष्ठोपनिषत्प्रियमित्येनदुपासीत। कथं पुनः प्रियत्वं प्राणस्य वै हे सम्राट् कामाय प्राणस्यार्थायायाज्यं याजयति पतितादिकमप्यप्रतिगृह्यस्याप्युग्रादेः प्रतिगृह्णात्यपि तत्र तस्यां दिशि वधनिमित्तमाशङ्कं वधाशङ्केत्यर्थो यां दिशमेति तस्कराद्याकीर्णां च तस्यां दिशि वधाशङ्का तदेतत्सर्वं प्राणस्य प्रियत्वे भवति प्राणस्यैव सम्राट्

कामाय । तस्मात्प्राणो वै सम्राट् परमं ब्रह्म नैनं प्राणो जहाति । समानमन्यत् ॥ ३ ॥

भाष्यार्थ—' यदेव ते कश्चिदब्रवीत्०-' ' उदङ्क ' या नांवाचा शुल्बाचें अपत्य शौल्बायन ' अब्रवीत् ' म्हणाला ' प्राणो वै ब्रह्मेति-' प्राण म्ह० पूर्वींप्रमाणेंच वायु, देवता ( पूर्वींच्या पर्यायांत वाक् म्ह० अग्निदेवता, हें जसें म्हटलें होतें त्याप्रमाणेंच येथें प्राण म्हणजे वायु देवता असें समजावें. ) प्राणच आयतन ( येथील प्राण हा शब्द इंद्रियें या अर्थी आहे. इंद्रियें हें त्याचें शरीर आहे.) अव्याकृत आकाश ही प्रतिष्ठा आहे. ' उपनिषद् ' ' प्रिय' अशी याची उपासना करावी. प्राणाचें प्रियत्व कसें ? हे राजन्, प्राणाच्याच कामासाठीं—प्राणाच्या प्रयोजनासाठीं पतित ( अकुलीन ) इत्यादिक अयाज्यांचेंही यजन करवितो. उग्रादि अप्रतिगृह्यांपासूनही प्रतिग्रह घेतो. तस्करादिकांनीं भरलेल्या ज्या दिशेस जातो त्या दिशेंत त्याला वधनिमित्तक आशंका होते. ( तेथें तो वधाशंक होतो. ) हें सर्व प्राणाच्या प्रियत्वामुळें होतें. हे सम्राट्, प्राणाच्याच कामासाठीं होतें. यास्तव हे राजन्, प्राणच पर ब्रह्म आहे. त्याला प्राण सोडीत नाहीं. बाकी सर्व व्याख्यान पूर्वीप्रमाणेंच जाणावें. ३.

यदेव ते कश्चिदब्रवीत्तच्छृणवामेत्यब्रवीन्मे बर्कुर्वार्ष्णश्चक्षुर्वै ब्रह्मेति यथा मातृमान्पितृमानाचार्यवान्ब्रूयात्तथा तद्वार्ष्णोऽब्रवीच्चक्षुर्वै ब्रह्मेत्यपश्यतो हि किꣳस्यादित्यब्रवीत्तु ते तस्याऽऽयतनं प्रतिष्ठां न मेऽब्रवीदिति ॥

अर्थ—'कोणी आचार्य तुला जें कांहीं बोलला असेल तेंच आम्ही ऐकूं.' 'वृष्णाचें अपत्य बर्कु 'चक्षुर्वै ब्रह्म ' असें म्हणाला.' 'जसें मातृ-

मान् पितृमान्, आचार्यवान् सांगतो तसेंच ' चक्षुर्वै ब्रह्म ' हें वार्ष्ण बोलला. कारण न पाहणाऱ्याला काय होणार ? पण त्यानें तुला त्याचें आयतन व प्रतिष्ठा सांगितली का ?' 'मला सांगितली नाहीं.'

एकपाद्वा एतत्सम्राडिति स वै नो ब्रूहि याज्ञवल्क्य चक्षुरेवाऽऽयतनमाकाशः प्रतिष्ठा सत्यमित्येनदुपासीत का सत्यता याज्ञवल्क्य चक्षुरेव सम्राडिति होवाच चक्षुषा वै सम्राट् पश्यन्तमाहुरद्राक्षीरिति स आहाद्राक्षमिति तत्सत्यं भवति ॥

अर्थ—' हे राजा, हें एकपाद् ब्रह्म आहे. ' ' हे याज्ञवल्क्या, तूंच आह्मांस सांग. ' 'चक्षु हेंच आयतन-शरीर व अव्याकृत आकाश ही त्रिकालीं प्रतिष्ठा आहे. ' सत्यं ' अशी त्याची उपासना करावी.' ' हे याज्ञवल्क्या, सत्यता कोणती ?' 'हे सम्राट्, चक्षु हीच सत्यता, ' असें याज्ञवल्क्य म्हणाला. ' हे राजा, चक्षूनें पाहणाराला म्हणतात कीं तूं पाहिलेंस का ? व तो म्हणतो–होय मीं पाहिलें. तेंच सत्य होतें.'

चक्षुर्वै सम्राट् परमं ब्रह्म नैनं चक्षुर्जहाति सर्वाण्येनं भूतान्यभिक्षरन्ति देवो भूत्वा देवानप्येति य एवं विद्वानेतदुपास्ते हस्त्यृषभꣳसहस्रं ददामीति होवाच जनको वैदेहः स होवाच याज्ञवल्क्यः पिता मेऽमन्यत नाननुशिष्य हरेतेति ॥ ४ ॥

अर्थ—'हे सम्राट्, चक्षु हेंच परम ब्रह्म आहे. त्याला चक्षु सोडीत नाहीं. सर्व भूतें याच्यावर सर्वतः उपकार करितात. जो असें जाण-

णारा याची उपासना करितो तो देव होऊन देवांस प्राप्त होतो.' 'मी एक सहस्र हस्त्यृषभ तुला देतों,' असें वैदेह जनक म्हणाला. पण 'शिष्याला कृतार्थ केल्यावाचून त्याच्यापासून धन घेऊं नये असें माझा पिता समजत होता' असें याज्ञवल्क्य बोलला. ४.

यदेव ते कश्चिद्वर्कुरिति नामतो वृष्णस्यापत्यं वार्ष्णश्चक्षुर्वै ब्रह्मेत्यादित्यो देवता चक्षुष्युपनिषत्सत्यम्। यस्माच्छ्रोत्रेण श्रुतमनृतमपि स्यान्न तु चक्षुषा दृष्टम्। तस्माद्वै सम्राट् पश्यन्तमाहुरद्राक्षीस्त्वं हस्तिनमिति स चेदद्राक्षमित्याह। तत्सत्यमेव भवति। यस्त्वन्यो ब्रूयादहमश्रौषमिति। तद्व्यभिचरति। यत्तु चक्षुषा दृष्टं तदव्यभिचारित्वात्सत्यमेव भवति॥ ४॥

भाष्यार्थ—'यदेव ते कश्चित्०' 'बर्कु' या नांवाचा वृष्णाचें अपत्य वार्ष्ण. 'चक्षुर्वै ब्रह्म' आदित्य देवता. चक्षूंत सत्य हें उपनिषद् आहे. (चक्षुर्ब्रह्माचें सत्यत्व सिद्ध करितात-) ज्याअर्थीं कानानें ऐकलेलें खोटेंही असूं शकतें. पण नेत्रानें पाहिलेलें खोटें होणें शक्य नाहीं. म्हणूनच हे राजा, पाहणाऱ्यास 'तूं हत्तीला पाहिलेंस का,' असें विचारतात. त्यानें जर 'होय पाहिलें' असें म्हटलें तर तें सत्यच होतें. पण जो दुसरा 'मीं ऐकलें' असें ह्मणतो त्याचें ह्मणणें कदाचित् खोटेंही ठरतें. पण जें चक्षूनें पाहिलेलें तें अव्यभिचारी असल्यामुळें सत्यच होतें. ४.

यदेव ते कश्चिदब्रवीत्तच्छृणवामेत्यब्रवीन्मे गर्दभीविपीतो भारद्वाजः श्रोत्रं वै ब्रह्मेति यथा मातृमान्पितृमानाचार्यवान्ब्रूयात्तथा तद्भारद्वाजोऽब्रवीच्छ्रोत्रं वै ब्रह्मेत्यशृण्वतो हि किꣳ स्यादित्यब्रवीत्तु ते तस्याऽऽयतनं प्रतिष्ठां न मेऽब्रवीदिति॥

अर्थ—' कोणीं आचार्यानें तुला जें सांगितलें असेल तेंच ऐकूं. ' ' भारद्वाज गोत्राचा गर्दभीविपीत मला ' श्रोत्रं वै ब्रह्म ' असें सांगता झाला. ' ' ज्याप्रमाणें एकाद्या मातृमान्, पितृमान्, आचार्यवान् आचार्यानें सांगावें तसेंच ' श्रोत्रं वै ब्रह्म ' हें भारद्वाज बोलला. कारण जो न ऐकणारा त्याला काय होणार ? पण त्यानें तुला त्याचें आयतन व प्रतिष्ठा सांगितली का ?' ' त्यानें सांगितली नाहीं. '

एकपाद्वा एतत्सम्राडिति स वै नो ब्रूहि याज्ञवल्क्य श्रोत्रमेवाऽऽयतनमाकाशः प्रतिष्ठाऽनन्त इत्येनदुपासीत काऽनन्तता याज्ञवल्क्य दिश एव सम्राडिति होवाच तस्माद्वै सम्राडपि यां कां च दिशं गच्छति नैवास्या अन्तं गच्छत्यनन्ता हि दिशो दिशो वै सम्राट् श्रोत्रम् ॥

अर्थ— हे राजन्, हें एकपाद् ब्रह्म आहे.' 'तर मग हे याज्ञवल्क्या, तूंच तें मला सांग.' ' श्रोत्रच त्याचें आयतन व आकाश प्रतिष्ठा आहे. ' अनन्त ' अशी याची उपासना करावी. ' 'हे याज्ञवल्क्या, अनन्तता कोणती ?' ' हे सम्राट्, दिशा हीच अनन्तता आहे,' असें तो म्हणाला. 'त्यामुळेंच हे राजन्, मनुष्य कोणत्याही दिशेला जावो, तिच्या अन्तास पोंचत नाहीं. कारण दिशा अनन्त आहेत. हे राजा, दिशा हेंच श्रोत्र आहे.'

श्रोत्रं वै सम्राट् परमं ब्रह्म नैनꣳ श्रोत्रं जहाति सर्वाण्येनं भूतान्यभिक्षरन्ति देवो भूत्वा देवानप्येति य एवं विद्वानेतदुपास्ते हस्त्यृ-

षभꣳ सहस्रं ददामीति होवाच जनको वैदेहः
स होवाच याज्ञवल्क्यः पिता मेऽमन्यत
नाननुशिष्य हरेतेति ॥ ५ ॥

अर्थ—'हे सम्राट्, श्रोत्रच परम ब्रह्म आहे. जो असें जाणणारा याची उपासना करितो त्याला श्रोत्र सोडीत नाहीं. सर्व भूतें त्यावर सर्वतः उपकार करितात. तो येथेंच देव होऊन देवांस प्राप्त होतो.' तेव्हां वैदेह जनक म्हणाला "मी एकसहस्र हस्त्यृषभ देतों." पण याज्ञवल्क्य म्हणतो—" माझा पिता—' शिष्याला कृतार्थ केल्यावाचून त्याच्यापासून धन घेऊं नये,' असें समजत होता." ५.

यदेव ते गर्दभीविपीत इति नामतो भारद्वाजो गोत्रतः श्रोत्रं वै ब्रह्मेति । श्रोत्रे दिग्देवताऽनन्त इत्येनदुपासीत । काऽनन्तता श्रोतस्य । दिश एव श्रोत्रस्याऽऽनन्त्यं यस्मात्तस्माद्वै सम्राट् प्राचीमुदीचीं वा यां कांचिदपि दिशं गच्छति नैवास्या अन्तं गच्छति कश्चिदपि । अतोऽनन्ता हि दिशः । दिशो वै सम्राट् श्रोत्रम् । तस्माद्दिगानन्त्यमेव श्रोत्रस्याऽऽनन्त्यम् ॥ ५ ॥

भाष्यार्थ—' यदेव ते-' गर्दभीविपीत या नांवाचा गोत्रानें भारद्वाज. ' श्रोत्रं वै ब्रह्मेति-' श्रोत्र म्ह० दिक्—देवता. ' अनन्त ' अशी त्याची उपासना करावी. ' का अनन्तता श्रोत्रस्य-' श्रोत्राची अनन्तता कोणती? ज्याअर्थीं दिशा हेंच श्रोत्राचें आनन्त्य आहे त्याअर्थींच हे राजा, कोणीही पूर्व, उत्तर इत्यादि कोणत्याही दिशेला जरी गेला तरी तिच्या अन्तास जात नाहीं. यास्तव दिशा अनन्त—अन्तरहित आहेत आणि हे राजन्, दिशा हेंच श्रोत्र आहे. तस्मात् दिशांचें आनन्त्य हेंच श्रोत्राचें आनन्त्य आहे. ५.

यदेव ते कश्चिदब्रवीत्तच्छृणवामेत्यब्रवीन्मे
सत्यकामो जाबालो मनो वै ब्रह्मेति यथा

मातृमान्पितृमानाचार्यवान्ब्रूयात्तथा तज्जा- बालोऽब्रवीन्मनो वै ब्रह्मेत्यमनसो हि किꣳ स्यादित्यब्रवीत्तु ते तस्याऽऽयतनं प्रतिष्ठां न मेऽब्रवीदिति ॥

अर्थ—'जें तुला कोणी आचार्य सांगता झाला तेंच आम्हीं ऐकूं.' 'जं- बालेचें अपत्य–जाबाल सत्यकाम ' मनो वै ब्रह्म-' असें सांगता झाला.' 'मातृमान्, पितृमान् व आचार्यवान् अशा आचार्यांनें जसें सांगावें त्याचप्र- माणें 'मनो वै ब्रह्म ' हें जाबाल बोलला.कारण मनानें शून्य असणाराला काय लाभ होणार ? पण त्यानें तुला त्याचें आयतन व प्रतिष्ठा सांगितली का?' 'त्यानें मला सांगितली नाहीं.'

एकपाद्वा एतत्सम्राडिति स वै नो ब्रूहि याज्ञवल्क्य मन एवाऽऽयतनमाकाशः प्र- तिष्ठाऽऽनन्द इत्येनदुपासीत काऽऽनन्दता याज्ञवल्क्य मन एव सम्राडिति होवाच मनसा वै सम्राट् स्त्रियमभिहार्यते तस्यां प्र- तिरूपः पुत्रो जायते स आनन्दः ॥

अर्थ—'हे राजन्, हें एकपाद् ब्रह्म आहे.' 'तर मग हे याज्ञवल्क्या, तूंच तें मला सांग.' 'मन हेंच त्याचें आयतन. अव्याकृताकाश प्रतिष्ठा आहे. ' आनन्द ' अशी त्याची उपासना करावी.' 'हे याज्ञवल्क्या,आ- नन्दता कोणती ?' ' हे सम्राट्, मन हीच आनन्दता आहे. हे राजन्, मनानेंच स्त्रीची इच्छा करतो. तिच्यामध्यें प्रतिरूप–अनुरूप पुत्र उत्पन्न होतो. तो आनंदाचा हेतु आहे.'

मनो वै सम्राट् परमं ब्रह्म नैनं मनो ज-
हाति सर्वाण्येनं भूतान्यभिक्षरन्ति देवो भूत्वा
देवानप्येति य एवं विद्वानेतदुपास्ते हस्त्यृ-
षभꣳसहस्रं ददामीति होवाच जनको वै-
देहः स होवाच याज्ञवल्क्यः पिता मेऽम-
न्यत नाननुशिष्य हरेतेति ॥ ६ ॥

अर्थ—'हे राजन्, मनच परम ब्रह्म आहे. जो असें जाणणारा त्याची उपासना करतो त्याला मन सोडीत नाहीं. सर्व भूतें याच्यावर सर्वप्रकारें उपकार करितात व तो येथेंच देव होऊन मेल्यावर देवास प्राप्त होतो.' वैदेह जनक म्हणाला "मी तुला एक सहस्र हस्त्यृषभ देतों." पण त्यावर याज्ञवल्क्य म्हणतो—'शिष्याला उपदेशानें कृतार्थ केल्यावांचून त्याचें धन घेऊं नये, असें माझा पिता समजत होता.' ६.

सत्यकाम इति नामतो जबालाया अपत्यं जाबालः । चन्द्रमा मनसि देवता । आनन्द इत्युपनिषत् । यस्मान्मन एवाऽऽनन्दस्तस्मान्मनसा वै सम्राट् स्त्रियमभिकामयमानोऽभिहार्यते प्रार्थयत इत्यर्थः । तस्माद्यां स्त्रियमभिकामयमानोऽभिहार्यते तस्यां प्रतिरूपोऽनुरूपः पुत्रो जायते स आनन्दहेतुः पुत्रः स येन मनसा निर्वर्त्यते तन्मन आनन्दः॥६॥

भाष्यार्थ—सत्यकाम या नांवाचा जबालेचें अपत्य जाबाल. चंद्रमा ही मनांतील देवता. आनन्द हें उपनिषद्. ज्याअर्थी मनच आनन्द आहे त्याअर्थी हे राजा, मनानेंच स्त्रीची अभिकामना करणारा 'स्त्रियं अभिहार्यते-' स्त्रीला आपल्याकडे आणवितो—तिची प्रार्थना—इच्छा करतो, असा भावार्थ. तस्मात् ज्या स्त्रीची अभिकामना करणारा तिला आणवितो 'तस्यां प्रतिरूपः-' तिच्या ठिकाणीं अनुरूप पुत्र उत्पन्न होतो. 'स आनन्दः-' तो पुत्र आनंद म्ह० आनन्दाचा हेतु आहे.

( तथापि मनाला आनन्दत्व कसें ? तें सांगतात–) तो आनन्दहेतु पुत्र ज्या मनाकडून केला जातो तें मन आनन्द होय ६.

यदेव ते कश्चिदब्रवीत्तच्छृणवामेत्यब्रवीन्मे विदग्धः शाकल्यो हृदयं वै ब्रह्मेति यथा मातृमान्पितृमानाचार्यवान्ब्रूयात्तथा तच्छाकल्योऽब्रवीद्धृदयं वै ब्रह्मेत्यहृदयस्य हि किꣳस्यादित्यब्रवीत्तु ते तस्याऽऽयतनं प्रतिष्ठां न मेऽब्रवीदिति ॥

अर्थ—'कोणीं आचार्यानें तुला जें सांगितलें असेल तेंच आम्हीं ऐकतों.' 'विदग्ध शाकल्य मला 'हृदयच ब्रह्म आहे' असें सांगता झाला.' 'ज्याप्रमाणें मातृमान्, पितृमान् व आचार्यवान् गुरूनें सांगावें तसेंच 'हृदयं वै ब्रह्म ' हें शाकल्य बोलला. कारण ज्याला हृदयच नाहीं त्याला काय होणार ? पण त्यानें तुला त्याचें आयतन व प्रतिष्ठा सांगितली का ?' 'त्यानें मला तें सांगितलें नाहीं.'

एकपाद्वा एतत्सम्राडिति स वै नो ब्रूहि याज्ञवल्क्य हृदयमेवाऽऽयतनमाकाशः प्रतिष्ठा स्थितिरित्येनदुपासीत का स्थितता याज्ञवल्क्य हृदयमेव सम्राडिति होवाच हृदयं वै सम्राट् सर्वेषां भूतानामायतनꣳ हृदयं वै सम्राट् सर्वेषां भूतानां प्रतिष्ठा हृदये ह्येव सम्राट् सर्वाणि भूतानि प्रतिष्ठितानि भवन्ति ॥

अर्थ—'हे राजा, हें एकपाद् ब्रह्म आहे' 'तर मग हे याज्ञवल्क्या, तूंच आम्हांला सांग.' 'हृदय हेंच त्याचें आयतन व अव्याकृताख्य आकाश ही प्रतिष्ठा आहे. 'स्थिति' अशी याची उपासना करावी.' 'हे याज्ञवल्क्या, स्थितता काय आहे?' 'हे राजा, हृदय हीच स्थितता आहे,' असें मुनि म्हणाला. 'हे राजा, हृदय हेंच सर्व भूतांचें आयतन आहे. हे सम्राट्, हृदयच सर्व भूतांची प्रतिष्ठा आहे. कारण हे राजन्, हृदयांतच सर्व भूतें प्रतिष्ठित आहेत.'

हृदयं वै सम्राट् परमं ब्रह्म ननꣳ हृदयं जहाति सर्वाण्येनं भूतान्यभिक्षरन्ति देवो भूत्वा देवानप्येति य एवं विद्वानेतदुपास्ते हस्त्यृषभꣳ सहस्रं ददामीति होवाच जनको वदेहः स होवाच याज्ञवल्क्यः पिता मेऽमन्यत नाननुशिष्य हरेतेति ॥ ७ ॥ इति बृहदारण्यकोपनिषदि चतुर्थाध्यायस्य प्रथमं ब्राह्मणम् ॥ १ ॥

अर्थ—'हे राजन्, हृदयच परम ब्रह्म आहे. जो असें जाणणारा याची उपासना करतो त्याला हृदय सोडीत नाहीं. सर्व भूतें याच्यावर सर्वतः उपकार करितात. तो येथेंच देव होऊन शरीरपातानंतरही देवांस प्राप्त होतो.' वैदेह जनक 'सहस्र हस्त्यृषभ देतों' असें म्हणाला. पण याज्ञवल्क्य म्हणाला "शिष्याला शिकवून कृतार्थ केल्यांवाचून त्याचें धन घेऊं नये" असें माझा पिता समजत असे. ७ (१)

विदग्धः शाकल्यो हृदयं वै ब्रह्मेति । हृदयं वै सम्राट् सर्वेषां भूतानामायतनम् । नामरूपकर्मात्मकानि हि भूतानि हृदयाश्रयाणीत्यवोचाम शाकल्यब्राह्मणे हृदयप्रतिष्ठानि चेति । तस्माद्धृदये ह्येव सम्राट् सर्वाणि भूतानि प्रतिष्ठितानि भवन्ति । तस्माद्धृदयं स्थितिरि-

त्युपासीत हृदये च प्रजापतिर्देवता ॥ ७ ॥ इति श्रीबृहदारण्यकोपनिषद्भाष्ये चतुर्थाध्यायस्य प्रथमं ब्राह्मणम् ॥ १ ॥

भाष्यार्थ—विदग्ध शाकल्य ' हृदयच ब्रह्म आहे ' ( असें सांगता झाला. ) हे राजन्, हृदयच सर्व भूतांचें आयतन आहे. ( हृदयाला सर्वभूतायतनत्व व तत्प्रतिष्ठात्व कसें तें सांगतात—) नाम रूप-कर्मात्मकच असलेलीं भूतें हृदयाचा आश्रय करून राहणारीं आहेत, असें आम्हीं तिसऱ्या अध्यायांतील शाकल्यब्राह्मणांत सांगितलें आहे. तसेंच, तीं हृदयप्रतिष्ठित आहेत, हेंही सांगितलें आहे. शाकल्य ब्राह्मणांतील न्यायच येथें लागू असल्यामुळें हे सम्राट्, सर्व भूतें हृदयांतच प्रतिष्ठित होतात. ( याप्रमाणें सर्व भूतांचें हृदयप्रतिष्ठितत्व सिद्ध झालें असतां फलित सांगतात—) तस्मात् हृदय हीच स्थिति आहे, असें मानून त्याची उपासना करावी. हृदयांत प्रजापति देवता आहे ७. (१)

इति श्रीबृहदारण्यकभाष्यार्थाच्या चवथ्या अध्यायाचें पहिलें ब्राह्मण समाप्त झालें.

---

जनको ह वैदेहः कूर्चादुपावसर्पन्नुवाच नमस्तेऽस्तु याज्ञवल्क्यानु मा शाधीति स होवाच यथा वै सम्राण्महान्तमध्वानमेष्यन्रथं वा नावं वा समाददीतैवमेवैताभिरुपनिषद्भिः समाहितात्माऽस्यैवं वृन्दारक आढ्यः सन्नधीतवेद उक्तोपनिषत्क इतो विमुच्यमानः क्व गमिष्यसीति नाहं तद्भगवन्वेद यत्र गमिष्यामीत्यथ वै तेऽहं तद्वक्ष्यामि यत्र गमिष्यसीति ब्रवीतु भगवानिति १

अर्थ—वैदेह जनक विशेषप्रकारच्या आसनावरून उठून याज्ञवल्क्यासमीप शिष्यभावानें जाऊन म्हणाला—" हे याज्ञवल्क्या, तुला

नमस्कार असो. मला अनुशासन -उपदेश कर." तेव्हां तो याज्ञवल्क्य म्हणाला–" हे सम्राट्, दूर मार्गास-दूर प्रदेशास जाणारा ज्याप्रमाणें रथ किंवा नाव घेतो त्याप्रमाणें तूं या उपनिषदांनीं–उपासनांनीं समाहितचित्त आहेस. तसाच पूज्य, श्रीमान्, वेदाध्ययन केलेला, व ज्याला आचार्यांनीं उपनिषदें–उपासना--सांगितलीं आहेत असा आहेस. पण या देहांतून निघून जाणारा तूं कोठें जाशील ?" 'भगवन्, मी कोठें जाईन तें जाणत नाहीं.' 'तूं कोठें जाशील तें मी तुला सांगतों.' 'भगवान् मला सांगोत.' १

जनको ह वैदेहः। यस्मात्सविशेषणानि सर्वाणि ब्रह्माणि जानाति याज्ञवल्क्यस्तस्मादाचार्यकत्वं हित्वा जनकः कूर्चादासनविशेषादुत्थायोप समीपमवसर्पन्पादयोर्निपतन्नित्यर्थः । उवाचोक्तवान्नमस्ते तुभ्यमस्तु हे याज्ञवल्क्यानु मा शाध्यनुशाधि मामित्यर्थः । इतिशब्दो वाक्यपरिसमाप्त्यर्थः ॥

भाष्यार्थ—( पूर्व ब्राह्मणांत ज्ञानाचीं साधनें, अशीं कांहीं उपासनें सांगितलीं. आतां त्या उपासनांनीं जाणण्यास योग्य असलेल्या ब्रह्माचें ज्ञान जागरादि अवस्थांच्या द्वारा करून देण्यासाठीं पुढील ब्राह्मणाचें अवतरण घेतात–) ' जनको ह वैदेहः ' (शिष्यत्वाच्या विरोधी असलेला जनकाचा ज्ञानित्वाभिमान गेला असतां तो याज्ञवल्क्यास शिष्यभावानें शरण गेला असें श्रुति दाखविते.–) ज्याअर्थीं याज्ञवल्क्य सर्व विशेषणयुक्त ब्रह्मांना जाणत होता त्याअर्थीं जनक आपलें आचार्यकत्व--ज्ञानित्वाभिमान -सोडून ' कूर्चादुपावसर्पन्नुवाच–' कूर्च म्हणजे विशेषप्रकारचें आसन, त्यावरून उठून ' उप-' म्हणजे समीप ' अवसर्पन्–' जाणारा म्ह० पायांवर पडणारा असा भावार्थ. 'उवाच-' म्हणाला. ' नमस्ते०-' हे याज्ञवल्क्या, तुला नमस्कार असो. ( या नमस्कारोक्तीचा उद्देश काय तें सांगतात–) ' अनु मा शाधि इति–' मला अनुशासन कर, असा इत्यर्थ. या वाक्यांतील शेवटचा ' इति ' शब्द वाक्यसमाप्त्यर्थ आहे.

स होवाच याज्ञवल्क्यो यथा वै लोके हे सम्राड् महान्तं दीर्घमध्वानमेष्यन्गमिष्यन्रथं वा स्थलेन गमिष्यन्नावं वा जलेन गमिष्य-

१ ' मी ज्ञानी आहें ' असा अभिमान.

न्समाददीत । एवमेवैतानि ब्रह्माण्येताभिरुपनिषद्भिर्युक्तान्युपासीनः समाहितात्माऽस्यत्यन्तमेताभिरुपनिषद्भिः संयुक्तात्माऽसि । न केवलमुपनिषत्समाहित एवं वृन्दारकः पूज्यश्चाऽऽढ्यश्चेश्वरो न दरिद्र इत्यर्थः । अधीतवेदोऽधीतो वेदो येन स त्वमधीतवेद उक्ताश्चोपनिषद आचार्यैस्तुभ्यं स त्वमुक्तोपनिषत्कः ॥

भाष्यार्थ--(याज्ञवल्क्य अभीष्ट असलेलें अनुशासन करण्यासाठीं पूर्वीचें ज्ञान मुख्य फल देणारें नाहीं, असें सांगून-आत्मज्ञानच परम फलाचें साधन आहे, असें जाणवून त्याविषयींच राजाची जिज्ञासा उत्पन्न करितात--) 'स होवाच याज्ञवल्क्यः--' तो याज्ञवल्क्य म्हणाला--' यथा वै--' ज्याप्रमाणें लोकांत हे ' सम्राट्, ' ' महान्तं-' म्ह० दीर्घ ' अध्वानं ' मार्गास ' एष्यन् ' जाणारा ' रथं वा नावं वा समाददीत-' स्थलानें जाणारा रथास किंवा जलानें जाणारा नावेस घेतो, ' एवमेताभिरुपनिषद्भिः०-' त्याप्रमाणेंच हीं ब्रह्में आहेत. तीं या वर सांगितलेल्या उपनिषदांनीं युक्त आहेत. त्या उपनिषदांनीं युक्त असलेल्या या ब्रह्मांचें उपासन करणारा तूं ' समाहितात्मासि-' समाहितचित्त आहेस, या उपनिषदांनीं संयुक्तात्मा आहेस. केवळ उपनिषत्समाहितच नव्हेस तर ' एवं-' त्याचप्रमाणें ' वृन्दारकः-' पूज्य व ' आढ्यः-' ईश्वर आहेस, दरिद्र नव्हे, असा भावार्थ. ' अधीतवेदः ' ज्यानें वेदाचें अध्ययन केलें आहे तो तूं अधीतवेद आहेस. ' उक्तोपनिषत्कः-' आचार्यांनीं ज्या तुला उपनिषदें सांगितलीं आहेत तो तूं उक्तोपनिषत्क आहेस.

एवं सर्वविभूतिसंपन्नोऽपि सन्भयमध्यस्थ एव परमात्मज्ञानेन विनाऽकृतार्थ एव तावदित्यर्थः । यावत्परं ब्रह्म न वेत्सि । इतोऽस्माद्देहाद्विमुच्यमान एताभिर्नौरथस्थानीयाभिः समाहितः क कस्मिन्गमिष्यासि किं वस्तु प्राप्स्यसीति ॥ नाहं तद्वस्तु भगवन्पूजावन्वेद जाने यत्र गमिष्यामीति । अथ यद्येवं न जानीषे यत्र गतः कृतार्थः स्या अहं वै ते तुभ्यं तद्वक्ष्यामि यत्र गमिष्यसीति । ब्रवीतु भगवानिति । यदि प्रसन्नो मां प्रति । शृणु ॥ १ ॥

भाष्यार्थ—( मी जर या सर्व गुणांनीं संपन्न असेन तर कृतार्थच्च आहें, मग मला कांहीं कर्तव्य राहिलेलें नाहीं, अशी आशंका घेऊन सांगतात-) याप्रमाणें तूं सर्व विभूतींनीं संपन्न जरी असलास तरी भयाच्या मध्येंच आहेस. परमात्मज्ञानावाचून तूं अकृतार्थच आहेस, जोंवर परब्रह्माला जाणत नाहींस तोंवर अकृतार्थच आहेस, असा भावार्थ. ( याप्रमाणें याज्ञवल्क्य राजाची जिज्ञासा उत्पन्न करून त्याला विचारतात--) 'इतो विमुच्यमानः-' या देहापासून विमुक्त होणारा तूं नौका, रथ, इत्यादिकांच्या स्थानीं असलेल्या या साधनांनीं समाहित होत्साता 'क्व गमिष्यसि-' कोठें जाशील ? (पण परमात्म्याकडे जाण्यास गतीची अपेक्षा नसल्यामुळें प्रश्नाचा विवक्षित अर्थ थोडक्यांत सांगतात-) कोणत्या वस्तूला प्राप्त होशील ?

'नाहं तद्भगवन्०-' हे पूज्य गुरो जेथें मी जाईन तें जाणत नाहीं. ( राजानें स्वतःचें अज्ञत्व व्यक्त करून शिष्यत्व स्वीकारलें असतां याज्ञवल्क्य प्रत्युक्ति व्यक्त करितात--) 'अथ वै ते०' जर याप्रमाणें जेथें गेलेला असा तूं कृतार्थ होशील हें जाणत नाहींस तर मीच तुला तूं जेथें जाशील तें सांगेन, 'ब्रवीतु भगवानिति-' जर मजवर प्रसन्न असाल तर आपण पूज्यच मला सांगा. ऐक तर १.

इन्धो ह वै नामैष योऽयं दक्षिणेऽक्षन्पुरुषस्तं वा एतमिन्धꣳसन्तमिन्द्र इत्याचक्षते परोक्षेणैव परोक्षप्रिया इव हि देवाः प्रत्यक्षद्विषः २

अर्थ—'इन्ध' या नांवाचा हा पुरुष आहे कीं जो दक्षिण नेत्रांत विशेषतः स्थित आहे. पण तो हा याप्रमाणें इन्ध असतांना परोक्षवृत्तीनेंच त्याला इंद्र असें म्हणतात. कारण देवांना परोक्ष नांवच प्रिय असतें व प्रत्यक्ष नांवाचा ते द्वेष करणारे असतात. २

इन्धो ह वै नाम । इन्ध इत्येवंनामा । यश्चक्षुर्वै ब्रह्मेति पुरोक्त आदित्यान्तर्गतः पुरुषः स एष योऽयं दक्षिणेऽक्षन्नक्षाणि विशेषेण

व्यवस्थितः । स च सत्यनामा । तं वा एतं पुरुषं दीप्तिगुणत्वात्प्रत्यक्षं नामास्येन्ध इति तमिन्धं सन्तमिन्द्र इत्याचक्षते परोक्षेण । यस्मात्परोक्षप्रिया इव हि देवाः प्रत्यक्षाद्विषः प्रत्यक्षनामग्रहणं द्विषन्ति । एष त्वं वैश्वानरमात्मानं संपन्नोऽसि ॥ २ ॥

भाष्यार्थ––(विश्व-तैजस-प्राज्ञांचा अनुवाद करून तुरीय ब्रह्म दाखविण्यासाठीं प्रथम विश्वाचा अनुवाद करितात--) 'इन्धो ह वै नाम-' 'इन्ध' अशा नांवाचा. (कोण तो ?) जो 'चक्षुर्वै ब्रह्म' असें म्हणून गेल्या अध्यायांत सांगितलेला आदित्यांतील पुरुष तो हा कीं 'योऽयं दक्षिणेऽक्षन्पुरुषः-' जो हा पुरुष उजव्या नेत्रांत विशेषेंकरून व्यवस्थित आहे. (तोच पूर्वींच्या ब्राह्मणांतही प्रस्तुत आहे, असें सांगतात--) व तो 'सत्य'-या नांवाचा आहे. (या प्रकृत पुरुषाविषयीं विद्वानांची संमति सांगतात--) 'तं वै एतं०-' त्याच या पुरुषाला, (त्याचें इंधत्व साधतात--) दीप्ति या गुणामुळें त्याचें प्रत्यक्ष नांव 'इन्ध' असें आहे; याप्रमाणें 'इंध' असलेल्या त्याच पुरुषाला 'इन्द्र' असें परोक्षवृत्तीनेंच म्हणतात. कारण 'परोक्षप्रिया इव०-' देव जणु काय परोक्षप्रिय असतात. 'प्रत्यक्षद्विषः-' प्रत्यक्षनामग्रहणाचा द्वेष करितात. हा तूं वैश्वानर आत्म्यास संपन्न--प्राप्त झाला आहेस. २.

अथैतद्वामेऽक्षणि पुरुषरूपमेषाऽस्य पत्नी विराट् तयोरेष संस्तावो य एषोऽन्तर्हृदय आकाशोऽथैनयोरेतदन्नं य एषोऽन्तर्हृदये लोहितपिण्डोऽथैनयोरेतत्प्रावरणं यदेतदन्तर्हृदये जालकमिवाथैनयोरेषा सृतिः संचरणी यैषा हृदयादूर्ध्वा नाड्युच्चरति यथा केशः सहस्रधा भिन्न एवमस्यैता हिता नाम

४

नाड्योऽन्तर्हृदये प्रतिष्ठिता भवन्त्येताभिर्वा एतदास्रवदास्रवति तस्मादेष प्रविविक्ताहार-तर इवैव भवत्यस्माच्छारीरादात्मनः ॥३॥

अर्थ---आतां डाव्या नेत्रांत हें जें पुरुषरूप ती याची पत्नी, विराट् अन्न, हा जो अन्तर्हृदयांत आकाश हेंच त्या दोघांचें संस्ताव--संगति-स्थान. हा जो हृदयांतील रक्तपिंड तेंच त्या दोघांचें अन्न. हें जें हृदयांत नाड्यांच्या छिद्रांचें जाळेसें आहे तें यांचें प्रावरण. ही जी हृदयापासून वर नाडी निघते ती यांची सृति--मार्ग-स्वप्नांतून जागरितांत संचार करण्याचा मार्ग. ज्याप्रमाणें सहस्रावधि तुकडे केलेला केंस[केशाग्र]त्याप्रमाणें या देहाच्या हितानांवाच्या नाड्या हृदयांत प्रतिष्ठित होतात. त्यांच्या द्वारा शरीरांत जाणारें हें अन्न जातें. हा लिंगात्मा त्या सूक्ष्माहार पिंडाहूनही अतिशय सूक्ष्माहार आहे. वैश्वानराहून तैजस अधिक सूक्ष्म अन्नानें उपचित होतो. ३.

अथैतद्वामेऽक्षणि पुरुषरूपमेषाऽस्य पत्नी यं त्वं वैश्वानरमात्मानं संपन्नोऽसि तस्यास्येन्द्रस्य भोक्तुर्भोग्यैषा पत्नी विराडन्नं भोग्यत्वादेव । तदेतदन्नं चात्ता चैकं मिथुनं स्वप्ने । कथम् । तयोरेष इन्द्राण्या इन्द्रस्य चैष संस्तावः संभूय यत्र संस्तवं कुर्वाते अन्योन्यं स एष संस्तावः । कोऽसौ । य एषोऽन्तर्हृदय आकाशोऽन्तर्हृदये हृदयस्य मांसपिण्डस्य मध्ये । अथैनयोरेतद्वक्ष्यमाणमन्नं भोज्यं स्थितिहेतुः । किं तत् । य एषोऽन्तर्हृदये लोहितपिण्डो लोहित एव पिण्डाकारापन्नो लोहितपिण्डः ॥

भाष्यार्थ—( एकाच वैश्वानराच्या उपासनार्थ इंद्र व इंद्राणी अशा जोडप्याची कल्पना करितात--) ' अथ-' आतां ( प्रासंगिक ध्याना-च्या आरंभाकरितां हा ' अथ ' शब्द आहे. ) ' एतद्वामेऽक्षणि पुरुषरू-पं-' हें जें डाव्या नेत्रांत पुरुषरूप आहे ' एषाऽस्य पत्नी-' ती याची

पत्नी. ज्या वैश्वानर आत्म्यास तूं संपन्न झाला आहेस त्या या भोक्त्या इंद्राची ही भोग्य पत्नी आहे. भोग्यत्वामुळेंच विराट् अन्न आहे. ( हें जें जोडपें जागरितांत विश्वसंज्ञक होतें तेंच एक स्वप्नांत तैजससंज्ञक होतें, असें सांगतात--) तें हें अन्न व अत्ता मिळून स्वप्नांत एक मिथुन. ( ' तदेतत् ' यांतील तत्-शब्दित तैजसाला उद्देशून विचारतात -) तें कसें ? ( त्याचें स्थान विचारता कीं अन्न, कीं प्रावरण कीं मार्ग, असा विकल्प करून स्थानाविषयीं सांगतात--) ' तयोः एष संस्तावः-' ती इंद्राणी व इंद्र यांचा हा संस्ताव आहे. ज्यांत तीं दोघें एकत्र मिळून परस्परांचा संस्तव--संगति करितात तो हा संस्ताव होय. तो कोणता? ' य एषोऽन्तर्हृदय आकाशः-' हा जो हृदयांत -मांसपिंडाच्या मध्यें आकाश--अवकाश आहे तो यांचा संस्ताव होय. ( आतां त्यांचें अन्न सांगतात-)'अथ '(पण अन्नावाचून त्यांच्या स्थितीचा असंभव असल्यामुळें अन्न कोणतें तें सांगणें अवश्य आहे, म्हणून) आतां ' एनयोरेतदन्नम्-' त्या दोघांचें हें पुढें सांगितलें जाणारें अन्न-- भोज्य स्थितिहेतु आहे. तें कोणतें ? ' य एषोऽन्तर्हृदये-' हा जो हृदयांत ' लोहितपिंडः-' लाल असाच गोळा बनलेला अन्नरस--लोहितपिंड ( तें त्या दोघांचें अन्न असा संबंध. )

अन्नं जग्धं द्वेधा परिणमते यत्स्थूलं तदधो गच्छति । यदन्यत्तत्पुनरग्निना पच्यमानं द्वेधा परिणमते । यो मध्यमो रसः स लोहितादिक्रमेण पाञ्चभौतिकं पिण्डं शरीरमुपचिनोति । योऽणिष्ठो रसः स एष लोहितपिण्ड इन्द्रस्य लिङ्गात्मनो हृदये मिथुनीभूतस्य । यं तैजसमाचक्षते स तयोरिन्द्रेन्द्राण्योर्हृदये मिथुनीभूतयोः सूक्ष्मासु नाडीष्वनुप्रविष्टः स्थितिहेतुर्भवति । तदेतदुच्यतेऽथैनयोरेतदन्नमित्यादि ॥

भाष्यार्थ—( लाल पिंडाकार बनलेल्या सूक्ष्म अन्नरसाचें व्याख्यान करण्यासाठीं अगोदर भक्षित अन्नाचा विभाग सांगतात-). खाल्लेलें अन्न दोन प्रकारें परिणाम पावतें. जें स्थूल अन्न तें खालीं जातें. जें सूक्ष्म तें पुनरपि अग्नीकडून पक्व होऊं लागलें असतां दोनप्रकारें परिणाम

पावतें. जो अन्नाचा मध्यम रस तो रक्तादिक्रमानें पांचभौत्तिक पिंडाचा—शरीराचा उपचय करतो. त्याचा जो अतिशय सूक्ष्म रस तो हा हृदयांत मिथुनरूप झालेल्या लिंगात्म्या इंद्राचा लोहितपिंड होय. (उपाधीनें उपहित अशा त्या दोघांच्या एकत्वाचा आश्रय करून सांगतात-) ज्या मिथुनाला तैजस असें म्हणतात. तो सूक्ष्म नाड्यांत अनुप्रविष्ट होत्साता त्या—हृदयांत मिथुनीभूत झालेल्या इंद्र-इंद्राणींच्या स्थितीचा हेतु होतो. हेंच 'अथैनयोरेतदन्नं-' इत्यादि शब्दांनीं सांगितलें जातें.

किंचान्यत् । अथैनयोरेतत्प्रावरणम् । भुक्तवतोः स्वपतोश्च प्रावरणं भवति लोके तत्सामान्यं हि कल्पयति श्रुतिः । किं तदिह प्रावरणम् । यदेतदन्तर्हृदये जालकमिवानेकनाडीछिद्रबहुलत्वाज्जालकामिव ॥

भाष्यार्थ—शिवाय दुसरें असें—'अथ-' भोग व स्वप्न यांनंतर 'एनयोरेतत्प्रावरणं-' त्या दोघांचें हें प्रावरण. व्यवहारांत अन्नादिकांचा भोग घेणाऱ्या व झोंपणाऱ्या जोडप्याला प्रावरण असतें. श्रुति त्याचेंच सादृश्य कल्पिते. पण इंद्र व इंद्राणी यांचें प्रावरण काय? 'यदेतदन्तर्हृदये जालकमिव-' हें जें अन्तर्हृदयांत जाळेसें—अनेक नाड्यांच्या छिद्रांचें बाहुल्य असल्यामुळें जाळेसें (आहे तें या दोघांचें प्रावरण.)

अथैनयोरेषा सृतिर्मार्गः संचरतोऽनयेति संचरणी स्वप्नाज्जागरितदेशागमनमार्गः । का सा सृतिः यैषा हृदयाद्धृदयदेशादूर्ध्वाऽभिमुखी सत्युच्चरति नाडी । तस्याः परिमाणमिदमुच्यते । यथा लोके केशः सहस्रधा भिन्नोऽत्यन्तसूक्ष्मो भवत्येवं सूक्ष्मा अस्य देहस्य संबन्धिन्यो हिता नाम हिता इत्येवं ख्याता नाड्यस्ताश्चान्तर्हृदये मांसपिण्डे प्रतिष्ठिता भवन्ति हृदयाद्विप्ररूढास्ताः सर्वत्र कदम्बकेसरवदेताभिर्नाडीभिरत्यन्तसूक्ष्माभिरेतदन्नमास्रवद्गच्छदास्रवति गच्छति । तदेतद्देवताशरीरमनेनान्नेन दामभूतेनोपचीयमानं तिष्ठति ॥

भाष्यार्थ—(मार्गाविषयीं सांगतात—) 'अथैनयोरेषा सृतिः-' त्यानंतर या दोघांची ही सृति-मार्ग आहे. जिच्यायोगानें तीं दोघें

संचार करितात ती 'संचरणी' स्वप्नांतून जागरितदेशांत येण्याचा मार्ग. ती सृति कोणती? 'या एषा-' ही जी नाडी 'हृदयात्-' हृदयप्रदेशांतून 'ऊर्ध्वा-' अभिमुख होऊन 'उच्चरति-' वर जाते ती संचरणी सृति--मार्ग होय. तिचें हें परिमाण सांगितलें जातें. 'यथा केशः०-' ज्याप्रमाणें व्यवहारांत केंस सहस्रधा तोडला असतां (त्याचे सहस्र तुकडे केले असतां) अत्यन्त सूक्ष्म होतो तशा प्रकारच्या सूक्ष्म, या देहसंबंधी हिता नाम--हिता या नांवाच्या-हिता म्हणून प्रसिद्ध असलेल्या नाड्या, त्या अन्तर्हृदयांतील मांसपिंडांत प्रतिष्ठित होतात. कदंब पुष्पाच्या केसराप्रमाणें त्या हृदयापासून सर्वत्र विप्ररूढ--पसरलेल्या आहेत. 'एताभिर्वा एतदा०-' या अतिशय सूक्ष्म नाड्यांनीं जाणारें हें अन्न जातें. (नाड्यांच्या द्वारा शरीराला व्यापणाऱ्या अन्नाचें प्रयोजन सांगतात-) तें हें देवताशरीर या दामभूत अन्नानें उपचय--वृद्धि पावत राहतें. (त्याची त्यानें वाढ होते.)

तस्माद्यस्मात्स्थूलेनान्नेनोपचितः पिण्ड इदं तु देवताशरीरं लिङ्गं सूक्ष्मेणान्नेनोपचितं तिष्ठति । पिण्डोपचयकरमप्यन्नं प्रविविक्तमेव मूत्रपुरीषादिस्थूलमपेक्ष्य लिङ्गस्थितिकरं त्वन्नं ततोऽपि सूक्ष्मतरम् । अतः प्रविविक्ताहारः पिण्डः । तस्मात्प्रविविक्ताहारादपि प्रविविक्ताहारतर एष लिङ्गात्मैवैव भवत्यस्माच्छरीराच्छरीरमेव शारीरं तस्माच्छारीरात् । आत्मनो वैश्वानरात्तैजसः सूक्ष्मान्नोपचितो भवति ॥ ३ ॥

भाष्यार्थ—(आतां श्रुतींतील 'तस्मात्०' इत्यादि वाक्याचें व्याख्यान करितात--) 'तस्मात्' ज्याअर्थीं स्थूल अन्नानें पिंड वाढतो, पण हें सूक्ष्म देवताशरीर सूक्ष्म अन्नानें उपचित होऊन राहतें. (तथापि 'प्रविविक्ताहारः' असेंच म्हणणें उचित असतांना श्रुतींत 'एष प्रविविक्ताहारतरः' असें कां म्हटलें? तें सांगतात-) पिंडाचा उपचय करणारेंही अन्न मूत्र-पुरीषादि स्थूल अन्नभागाच्या अपेक्षेनें सूक्ष्मच आहे. लिंगशरीराची स्थिति करणारें अन्न तर त्याहूनही अधिक सूक्ष्म आहे. ह्मणून पिंड प्रविविक्ताहार--सूक्ष्महार आहे. 'तस्मात्-' त्या

प्रविविक्त—सूक्ष्म—आहाराहूनही 'एषः-' हा लिंगात्मा 'प्रविविक्ताहारतरः-' ज्याचा आहार अतिशय सूक्ष्म आहे असाच होतो; 'अस्मात् शारीरात् आत्मनः-' या शरीराहून ( अहो पण मुळांत 'शारीर' असें असतांना 'शरीर' असें कसें म्हणतां ? याचें उत्तर-) शरीरच येथें शारीर होय. त्या शारीराहून हा लिंगात्मा अतिशय सूक्ष्माहारच आहे. (वरील उक्तार्थाचाच संक्षेप करून उपसंहार करितात) 'आत्मनः-' वैश्वनराहून तैजस अधिक सूक्ष्म अन्नानें उपचित होतो. ३.

तस्य प्राची दिक्प्राञ्चः प्राणा दक्षिणा दिग्दक्षिणे प्राणाः प्रतीची दिक्प्रत्यञ्चः प्राणा उदीची दिगुदञ्चः प्राणा ऊर्ध्वा दिगूर्ध्वाः प्राणा अवाची दिगवाञ्चः प्राणाः सर्वा दिशः सर्वे प्राणाः ॥

अर्थ—त्या विद्वानाची पूर्व दिशा हे पूर्वेंतील प्राण आहेत; दक्षिण दिशा हे दक्षिणेंतील प्राण; प्रतीची--पश्चिम दिशा हे पश्चिमेंतील प्राण; उत्तर दिशा हे उत्तरेंतील प्राण; ऊर्ध्व दिशा हे ऊर्ध्वदिशेंतील प्राण, अधरा दिशा हे अधर प्राण व सर्व दिशा हे सर्व प्राण होत.

स एष नेति नेत्यात्माऽगृह्यो न हि गृह्यतेऽशीर्यो न हि शीर्यतेऽसङ्गो न हि सज्यतेऽसितो न व्यथते न रिष्यत्यभयं वै जनक प्राप्तोऽसीति होवाच याज्ञवल्क्यः ॥

अर्थ--तो हा 'नेति नेति' म्हणून वर सांगितलेला आत्मा अगृह्य आहे, त्याचें ग्रहण केलें जात नाहीं; अशीर्य आहे, त्याचा नाश होत नाहीं; असंग आहे, तो आसक्त होत नाहीं; तो अबद्ध आहे, व्यथा

१ ज्याचा आहार सूक्ष्म आहे तो सूक्ष्माहार-पिंड त्याहूनही.

पावत नाहीं, हिंसा पावत नाहीं, हे जनका, तूं अभयास प्राप्त झाला आहेस.

स होवाच जनको वैदेहोऽभयं त्वा गच्छ-
ताद्याज्ञवल्क्य यो नो भगवन्नभयं वेदयसे
नमस्तेऽस्त्विमे विदेहा अयमहमस्मि ॥४॥
इति बृहदारण्यकोपनिषदि चतुर्थाध्यायस्य
द्वितीयं ब्राह्मणम् ॥ २ ॥

अर्थ—तो जनक म्हणाला-"हे भगवन् याज्ञवल्क्य, जो तूं आम्हाला अभय ब्रह्माला पोचवीत आहेस त्या तुलाही अभयच प्राप्त होवो. तुला नमस्कार असो. हा मी व हे विदेह देश तुझ्या अधीन आहेत." ४(२)

स एष हृदयभूतस्तैजसः सूक्ष्मभूतेन प्राणेन विध्रियमाणः प्राण एव भवति । तस्यास्य विदुषः क्रमेण वैश्वानरात्तैजसं प्राप्तस्य हृदयात्मानमापन्नस्य हृदयात्मनश्च प्राणात्मानमापन्नस्य प्राची दिक्प्राञ्चः प्राग्गताः प्राणाः । तथा दक्षिणा दिग्दक्षिणे प्राणाः । तथा प्रतीची दिक्प्रत्यञ्चः प्राणाः । उदीची दिगुदञ्चः प्राणाः । ऊर्ध्वा दिगूर्ध्वाः प्राणाः । अवाची दिगवाञ्चः प्राणाः । सर्वा दिशः सर्वे प्राणाः । एवं विद्वान्क्रमेण सर्वात्मकं प्राणमात्मत्वेनोपगतो भवति ॥

भाष्यार्थ—('तस्य प्राची दिग्' इत्यादि खंडाचें व्याख्यान करण्यासाठीं भूमिका करितात -) तो हा हृदयभूत तैजस सूक्ष्मभूत प्राणाकडून धारण केला जाणारा असा होत्साता प्राणच होतो. ( येथें प्राणशब्दानें अज्ञात प्रत्यगात्मा--प्राज्ञ ग्रहण केला जातो. याप्रमाणें भूमिका करून व वाक्य घेऊन त्याचें व्याख्यान करितात--) 'तस्य प्राची दिक्प्राञ्चः प्राणाः-' त्या या क्रमानें वैश्वानरापासून तैजसास प्राप्त झालेल्या म्ह.हृदयात्म्यास प्राप्त झालेल्या व हृदयात्म्यापासून प्राणात्म्यास प्राप्त झालेल्या विद्वानाची प्राची दिक् हे 'प्राञ्चः' म्हणजे पूर्व दिशेंतील प्राण होत. तशीच

दक्षिणा दिक् हे दक्षिणेंतील प्राण होत. त्याचप्रमाणें प्रतीची दिक् ( पश्चिम दिशा ) हे पश्चिमेंतील प्राण होत. उत्तर दिशा हे उत्तरेंतील प्राण होत. ऊर्ध्व दिशा हे ऊर्ध्व प्राण; अवाची दिक् हे अधर प्राण; व सर्व दिशा हे सर्व प्राण होत. ( हा उक्तार्थच संक्षेपानें सांगतात--) याप्रमाणें विद्वान् क्रमानें सर्वात्मक प्राणास आत्मत्वानें उपगत--प्राप्त होतो. ( जागरिताभिमानी विश्वाचा तैजसांत, स्वप्नाभिमानी तैजसाचा सुषुप्त्यभिमानी प्राज्ञांत क्रमानें अन्तर्भाव करावयास जाणणारा विद्वान् असा याचा भावार्थ. )

तं सर्वात्मानं प्रत्यगात्मन्युपसंहृत्य द्रष्टुर्हि द्रष्टृभावं नेति नेतीत्यात्मानं तुरीयं प्रतिपद्यते । यमेष विद्वाननेन क्रमेण प्रतिपद्यते स एष नेति नेत्यात्मेत्यादि न रिष्यतीत्यन्तं व्याख्यातमेतत् ॥ अभयं वै जन्ममरणादिनिमित्तभयशून्यं हे जनक प्राप्तोऽसीति हैवं किलोवाचोक्तवान्याज्ञवल्क्यः । तदेतदुक्तमथ वै तेऽहं तद्वक्ष्यामि यत्र गमिष्यसीति ॥

भाष्यार्थ—( 'स एष नेति नेत्यात्मा०-' इत्यादि वाक्याच्या व्याख्यानाची भूमिका करितात-) त्या सर्वात्म्याला प्रत्यगात्म्यामध्यें उपसंहृत करून द्रष्ट्याच्या द्रष्टृभावास—'नेति नेति' याप्रमाणें निर्देश केलेल्या तुरीय आत्म्यास—प्राप्त होतो. (श्रुतींतील वाक्य घेऊन पूर्वोक्त व्याख्यानाचें स्मरण देतात- ) हा विद्वान् ज्याला या क्रमानें प्राप्त होतो 'स एष नेति नेत्यात्मा०-' तो हा 'नेति नेति' म्हणून निर्देश केलेला आत्मा आहे. येथून 'न रिष्यति' येथवर जो श्रुतिभाग आहे त्याचें व्याख्यान वर (अ. ३ पृ. २६० ) केलें आहे.

( तुरीयाहूनही अभय हें आणखी निराळें प्राप्तव्य आहे, अशी आशंका घेऊन सांगतात--) 'अभयं वै-' जन्म-मरणादिनिमित्तानें होणाऱ्या भयानें शून्य, अशा अभयास 'जनक०-' हे जनका, तूं प्राप्त झाला आहेस. 'इति होवाच-' असें खरोखर याज्ञवल्क्य म्हणाला. (' अहोपण ' मी गंतव्य स्थान कोणतें तें सांगतों,' असा उपक्रम करून

अवस्थात्रयाहून अतीत असें जें तुरीय त्याचा उपदेश करणाऱ्या तुम्हांवर आंब्याचीं झाडें कोणतीं असें विचारलें असतां कांचनाचीं झाडें दाखविण्याचा दोष येतो. ' अशी आशंका घेऊन सांगतात–) आतां 'तूं शरीरपातानंतर कोठें जाशील तें मी सांगतों,' असें जें म्हटलें होतें तेंच हें सांगितलें.

स होवाच जनको वैदेहोऽभयमेव त्वा त्वामपि गच्छताद्गच्छतु यस्त्वं नोऽस्मान्हे याज्ञवल्क्य भगवन्पूजावन्नभयं ब्रह्म वेदयसे ज्ञापयसि प्रापितवानुपाधिकृताज्ञानव्यवधानापनयनेनेत्यर्थः ॥ किमन्यदहं विद्यानिष्क्रयार्थं प्रयच्छामि साक्षादात्मानमेव दत्तवते । अतो नमस्तेऽस्त्विमे विदेहास्तव यथेष्टं भुज्यन्तामयं चाहमस्मि दासभावे स्थितो यथेष्टं मां राज्यं च प्रतिपद्यस्वेत्यर्थः ॥ ४ ॥

इति श्रीबृहदारण्यकोपनिषद्भाष्ये चतुर्थाध्यायस्य द्वितीयं ब्राह्मणम् ॥२॥

भाष्यार्थ—' स होवाच०–' ( या विद्येला योग्य दक्षिणाच नाहीं, अशा अभिप्रायानें–) तो वैदेह जनक म्हणाला–' अभयं त्वा गच्छतात्' तुलाही अभयच प्राप्त होवो. ' यस्त्वं०–' हे याज्ञवल्क्य–भगवन्–पूजावन्, जो तूं आम्हांस अभय ब्रह्माचें ज्ञान करून देत आहेस, अभय ब्रह्मास प्राप्त केलें आहेस; ( पण विद्यमान अथवा नष्ट झालेल्या दुसऱ्या वस्तूची प्राप्ति दुसऱ्या ज्ञानानें दुसऱ्याला कशी होईल, अशी आशंका घेऊन सांगतात–) उपाधिकृत अज्ञान या व्यवधानाचा अपनय करून अभय ब्रह्मास प्राप्त केलें आहेस, असा भावार्थ.

( पश्वादि इतर दक्षिणा संभवतात, पण त्या या विद्येला अनुरूप नाहींत, असें समजून जनक म्हणतो–) विद्येच्या निष्क्रयार्थ मी साक्षात् आत्माच देणाऱ्या तुला दुसरें आणखीं काय देऊं ? यास्तव ' नमस्तेऽस्तु–' तुला नमस्कार असो; ' इमे विदेहाः ' हे सर्व विदेह देश तुझे आहेत. यांचा यथेष्ट उपभोग घे. तसाच ' अयमहमस्मि–'

५

हा मी आहें. तुझ्या दास्यांत स्थित आहें. ( याप्रमाणें अक्षरार्थ सांगून वाक्यार्थ सांगतात--) मला व राज्याला यथेष्ट प्राप्त करून घे, असा भावार्थ. ४ ( २ ).

इति श्रीबृहदारण्यकभाष्यार्थांच्या चवथ्या अध्यायाचें दुसरें ब्राह्मण समाप्त.

---

जनकं ह वैदेहं याज्ञवल्क्यो जगामेत्यस्याभिसंबन्धः । विज्ञानमय आत्मा साक्षादपरोक्षाद्ब्रह्म सर्वान्तरः पर एव । नान्योऽतोऽस्ति द्रष्टा नान्यदतोऽस्ति द्रष्टृत्यादिश्रुतिभ्यः । स एष इह प्रविष्टः । वदनादिलिङ्गोऽस्ति व्यतिरिक्त इति मधुकाण्डेऽजातशत्रुसंवादे प्राणादिकर्तृत्वभोक्तृत्वप्रत्याख्यानेनाधिगतोऽपि सन्पुनः प्राणनादिलिङ्गमुपन्यस्यौषस्तप्रश्ने प्राणनादिलिङ्गो यः सामान्येनाधिगतः प्राणेन प्राणितीत्यादिना दृष्टेर्द्रष्टेत्यादिनाऽलुप्तशक्तिस्वभावोधिगतः ॥

भाष्यार्थ----( पूर्व ब्राह्मणांत जागरादिकांच्या द्वारा तत्त्वाचा निश्चय केला. आतां पुढील ब्राह्मणाचें अवतरण घेऊन त्याचा पूर्व ब्राह्मणाशीं संबंध दाखवितात--) ' जनकं ह वैदेहं याज्ञवल्क्यो जगाम ' या ब्राह्मणाचा मागच्या ब्राह्मणाशीं संबंध असा--( तो संबंधच सांगण्यासाठीं तिसऱ्या अध्यायांतील वृत्तान्त सांगतात-- ) विज्ञानमय आत्मा--जें ब्रह्म साक्षात् अपरोक्ष सर्वान्तर आत्मा, तो परच विज्ञानमय आत्मा होय; कारण त्याविषयीं ' नान्योऽतोऽस्ति द्रष्टा नान्यदतोऽस्ति द्रष्टृ--' याहून अन्य द्रष्टा नाहीं व याहून दुसरें द्रष्टृ नाहीं, अशा श्रुति आहेत. ( विज्ञानमय परच आहे याविषयीं दुसरें वाक्य पढतात--) ' तोच हा यांत प्रविष्ट झाला आहे ( ' वदनं वाक्० ' इत्यादि श्रुतींत सांगितलेल्या अर्थाचा अनुवाद करितात--, मधुकांडांत अजातशत्रुसंवादांत--गार्ग्य व काश्य यांच्या संवादांत--प्राणादिकांच्या कर्तृत्वाचें व भोक्तृत्वाचें निराकरण करून भाषण करणें, पाहणें, ऐकणें इत्यादि ज्याचें लिंग आहे तो

१ अध्याय ३ ब्राह्म. खं. पृ. पहा.

विज्ञानात्मा प्राणादिकांहून व्यतिरिक्त आहे, असा जरी त्याचा बोध झाला असला तरी पुनः उषस्तचाक्रायणानें केलेल्या प्रश्नांत 'यः प्राणेन प्राणिति--' जो प्राणानें प्राणनक्रिया करतो इत्यादि वाक्यांनीं प्राणनादि लिंगांचा उपन्यास करून जो सामान्यतः ज्ञात झाला त्याचाच 'दृष्टेर्द्रष्टा-' इत्यादि ग्रंथानें अलुप्तशक्तिस्वभाव--कूटस्थदृष्टि-स्वभाव -नित्य ज्ञानस्वभाव- विशेषतः निश्चित केला. ( अर्थात् चवथ्या अध्यायांत विज्ञानमयाचें अस्तित्व जरी सिद्ध केलें होतें तरी त्याचाच पुनः तेथेंच जसा सामान्यतः व विशेषतः निश्चय केला आहे त्याच-प्रमाणें पांचव्या अध्यायांतही त्याचें व्युत्पादन करणें उचित आहे, असा भावार्थ. )

तस्य च परोपाधिनिमित्तः संसारो यथा रज्जूषरशुक्तिकागगना-दिषु सर्पोदकरजतमलिनत्वादि पराध्यारोपणनिमित्तमेव न स्वत-स्तथा निरुपाधिको निरुपाख्यो नेति नेतीति व्यपदेश्यः साक्षाद-परोक्षात्सर्वान्तर आत्मा ब्रह्माक्षरमन्वर्यामी प्रशास्तौपनिषदः पुरुषो विज्ञानमानन्दं ब्रह्मेत्यधिगतम् ॥ तदेव पुनः । इन्धसंज्ञः प्रविविक्ता-हारस्ततोऽन्तर्हृदये लिङ्गात्मा प्रविविक्ताहारतरस्ततः परेण जगदात्मा प्राणोपाधिस्ततोऽपि प्रविलाप्य जगदात्मानमुपाधिभूतं रज्ज्वादाविव सर्पादिकं विद्यया स एष नेति नेतीति साक्षात्सर्वान्तरं ब्रह्माधिग-तम् । एवमभयं परिप्रापितो जनको याज्ञवल्क्येनाऽऽगमतः संक्षेपतः ॥

भाष्यार्थ —( आत्मा जर नित्यज्ञानस्वभाव आहे तर त्याला सुखित्व-दुःखित्वादि संसार कसा ? तें सांगतात -) अज्ञान व त्याचें कार्य अन्तः-करणादिक या परोपाधीच्या निमित्तानें त्याचा संसार आहे, ( संसार आत्म्याच्या ठिकाणीं औपाधिक आहे, स्वाभाविक नव्हे, याविषयीं दृष्टान्त देतात–) ज्याप्रमाणें रज्जु, ऊषर, शुक्तिका, गगन इत्यादि-कांमध्यें भासणारा--सर्प, मृगजळ, रजत व मलिनत्व इत्यादिक औपा-धिक आरोपामुळेंच आहेत स्वतः--स्वाभाविक- नव्हेत त्याप्रमाणें

( यथोक्त दृष्टान्ताच्या अनुसार आत्म्यामध्येंही संसार परौपाधिक आहे, असा भावार्थ. सोपाधिक आत्म्याचें संसारित्व सांगून निरुपाधिक आत्म्याचें नित्यमुक्तत्व सांगतात--) निरुपाधिक, निरुपाख्य--वाणी व मन यांना अगोचर, ( आगमप्रामाण्य सांगतात--) 'नेति नेति' असा निर्देश केला गेलेला, ( कहोलप्रश्नांत सांगितलेल्याचा अनुवाद करितात--) साक्षात्, अपरोक्ष, सर्वान्तर, आत्मा, ब्रह्म, अक्षर[1], अन्तर्यामी[2], प्रशास्ता, औपनिषद[3] पुरुष, 'विज्ञानं आनन्दं ब्रह्म' आहे, असें ज्ञात झालें.

( याप्रमाणें पांचव्या म्ह० या उपनिषदाच्या तिसऱ्या अध्यायाचा अनुवाद करून चालू सहाव्या अध्यायाच्या वर होऊन गेलेल्या दोन ब्राह्मणांत झालेल्या अर्थाचा अनुवाद करितात--जें साक्षात् अपरोक्ष, सर्वान्तर ब्रह्म ) तेंच ( ज्ञानाचे विशेष उपाय प्रदर्शित करून ) पुनः ज्ञात केलें ( याप्रमाणें प्रस्तुत अध्यायाच्या पहिल्या षडाचार्यब्राह्मणाचा अर्थ संक्षेपतः सांगून दुसऱ्या कूर्चब्राह्मणाचाही संक्षिप्त अर्थ सांगतात- ) सूक्ष्माहार इंधसंज्ञक वैश्वानर; हृदयांत असलेला जो लिंगात्मा तो त्या इन्धसंज्ञक वैश्वानराहून अधिक सूक्ष्माहार; ( याप्रमाणें विश्व व तैजस हे दोघे सांगून प्राज्ञ व तुरीय दाखवितात--) त्या विश्व-तैजसांहून पलीकडे व्यवस्थित असलेला जो जगदात्मा प्राणोपाधि-अव्याकृतसंज्ञक प्राज्ञ त्याहूनही ( पलीकडे असलेलें जें ब्रह्म तें ज्ञात झालें. असा संबंध. ) त्या उपाधिभूत जगदात्म्यालाही, विद्येनें प्रत्यगात्म्यामध्यें प्रलीन करून 'स एष नेति नेति' या वाक्यानें जें तुरीय साक्षात् सर्वान्तर ब्रह्म तें ज्ञात झालें. ( विद्येनें उपाधीच्या प्रलयाविषयीं दृष्टान्त--) रज्ज्वादिकांच्या ठिकाणीं भासणारे सर्पादिक रज्ज्वादिकांच्या ज्ञानानें जसे बाधित होतात त्याप्रमाणें विद्येनें प्राज्ञादि उपाधींचा बाध झाला असतां केवल ब्रह्म अधिगत झालें. ( 'अभयं वै०' इत्यादिकांत सांगितलेल्याचा

---

१ हा अक्षर ब्राह्मणोक्ताचा, २ हा अन्तर्यामिब्राह्मणोक्ताचा व ३ हा शाकल्य ब्राह्मणोक्त अर्थाचा संक्षिप्त अनुवाद आहे.

अनुवाद करितात–) याप्रमाणें याज्ञवल्क्यानें जनक आगमत: थोडक्यांत अभयास सर्वप्रकारें प्राप्त करविला.

अत्र च जाग्रत्स्वप्नसुषुप्ततुरीयाण्युपन्यस्तान्यन्यप्रसङ्गेनेन्धः प्रविविक्ताहारतरः सर्वे प्राणाः स एष नेति नेतीति । इदानीं जाग्रत्स्वप्नादिद्वारेणैव महता तर्केण विस्तरतोऽधिगमः कर्तव्यः । अभयं प्रापयितव्यम् । सद्भावश्चाऽऽत्मनो विप्रतिपत्त्याशङ्कानिराकरणद्वारेण । व्यतिरिक्तत्वं शुद्धत्वं स्वयंज्योतिष्ट्वमलुप्तशक्तिस्वरूपत्वं निरतिशयानन्दस्वाभाव्यमद्वैतत्वं चाधिगन्तव्यमितीदमारभ्यते ॥ आख्यायिका तु विद्यासंप्रदानग्रहणविधिप्रकाशनार्था । विद्यास्तुतये च विशेषतः । वरदानादिसूचनात् ॥

भाष्यार्थ—( वर सांगितलेल्याच कूर्चब्राह्मणाच्या अर्थांचा संक्षेप करून सांगतात–) या ब्राह्मणांत जाग्रत्, स्वप्न, सुषुप्त व तुरीय यांचा अन्यप्रसंगानें [ म्ह० उपासनांचें क्रममुक्ति हें फळ आहे, हें सांगण्याच्या प्रसंगानें ] उपन्यास केला. ( त्या उपन्यासाचाच अभिनय करितात–) 'इन्धः,' 'प्रविविक्ताहारतरः,' 'सर्वे प्राणाः,' व 'स एष नेति नेतीति' अशा प्रकारें त्यांचा उपन्यास केला. ( येणेंप्रमाणें गतार्थ सांगून पुढील ब्राह्मणाचें तात्पर्य सांगतात–) आतां जाग्रत्, स्वप्न, सुषुप्ति व तुरीय यांच्या द्वाराच [1]महत् [2]तर्कानें विस्तारपूर्वक त्याच प्रस्तुत ब्रह्माचा अवबोध करावा, ( म्हणून हें ब्राह्मण आरंभिलें जात आहे, असा संबंध. पण अवबोध करावयाचा तो काय ? तें सांगतात–) अभय प्राप्त करवावें, आत्म्याचा सद्भाव–अस्तित्व सिद्ध करावें, ('पण तें पूर्वीही केलें आहे,' म्हणून म्हणाल तर सांगतात–) वेदबाह्य लोकांच्या विप्रतिपत्तीनें–विरुद्ध कल्पनेनें आत्मा नाहीं, अशी आशंका आली असतां तिचें निरसन करून आत्म्याचा सद्भाव जाणावा, (आत्म्याचें अस्तित्व जरी कबूल केलें तरी कित्येक त्याचा देहादिकांतच अन्तर्भाव करितात यास्तव त्यांचें प्रत्याख्यान करितात–) त्याचें देहादिकांहून व्यतिरिक्तत्व

१ आगमप्रमाणानें. २ चतुर्विध दोषराहित्यामुळें अबाधित अशा तर्कानें.

जाणावें, शुद्धत्व, [म्ह०तो देहादिकांहून व्यतिरिक्त जरी असला तरी कित्येक त्याला कर्ता व भोक्ता मानतात, कित्येक केवल भोक्ताच मानतात, पण तसा तो कर्ता किंवा भोक्ता नाहीं, असें ] जाणावें, त्याचें स्वयंज्योतिष्ट्व [म्ह०तो जड नाहीं, स्वप्रकाश आहे असें]जाणावें, त्याला अलुप्तशक्ति-स्वरूपत्व आहे, असें जाणावें ( यावरून विज्ञान हा गुण आहे, ह्या पक्षाचें निराकरण होतें; त्याचप्रमाणें 'निर्विकार ज्ञानस्वरूप असल्यामुळें तें स्वयंज्योति आहे,' असें हें विशेषण स्वयंज्योतिष्ट्वाचा हेतु आहे. ) निरतिशय आनन्द हाच ज्याचा स्वभाव आहे, (यानें आनन्द आत्म्याचा हा गुण आहे, या म्हणण्याचें निरसन होतें ) व त्याला अद्वैतत्व आहे, [ म्हणजे आत्मा प्रपंचशून्य आहे, ] हें जाणावें म्हणून हें ब्राह्मण आरंभिलें जातें.

(याप्रमाणें ब्राह्मणाचें तात्पर्य सांगून आख्यायिकेचें तात्पर्य सांगतात--) आख्यायिका तर विद्येचें संप्रदान-शिष्य व त्याचा ग्रहणविधि—श्रद्धादि प्रकार यांच्या प्रकाशनार्थ आहे. ( तिचेंच दुसरें प्रयोजन सांगतात—) आणि विशेषतः ती विद्येच्या स्तुतीकरितां आहे. (येथें कर्मांहून विशेषतः विद्येची स्तुति आहे, हें कशावरून कळतें, म्हणून म्हणाल तर सांगतात—) वरदानादिकांवरून तसें सूचित होतें. ( याज्ञवल्क्यानें राजाला कामप्रश्नाचा वर दिला आहे व राजानेंही योग्य अवसर पाहून ब्रह्मज्ञानाविषयींच प्रश्न केला आहे. त्यावरून विद्येची स्तुति सूचित होते, अर्थात् तीच विवक्षित आहे, असा भावार्थ. )

जनक९ंह वैदेहं याज्ञवल्क्यो जगाम स मेने न वदिष्य इत्यथ ह यज्जनकश्च वैदेहो याज्ञवल्क्यश्चाग्निहोत्रे समूदाते तस्मै ह याज्ञवल्क्यो वरं ददौ स ह कामप्रश्नमेव

वव्रे तꣳ हास्मै ददौ तꣳ ह सम्राडेव पूर्वं पप्रच्छ ॥ १ ॥

अर्थ—याज्ञवल्क्य वैदेह जनकाकडे गेला, जातांना त्यानें असा विचार केला कीं, मी राजाला कांहीं सांगणार नाहीं. पण पूर्वी एकदा जनक व याज्ञवल्क्य यांचा अग्निहोत्राच्या निमित्तानें संवाद झाला. तेव्हां जनकाच्या तद्विषयक ज्ञानानें संतुष्ट होऊन याज्ञवल्क्यानें त्याला वर दिला. पण जनकानें कामप्रश्न हाच वर मागितला. याज्ञवल्क्यानें तो त्याला दिला. त्या वराच्या सामर्थ्यानें पूर्वी राजाच याज्ञवल्क्याला विचारता झाला. १.

जनकं ह वैदेहं याज्ञवल्क्यो जगाम । स च गच्छन्नेवं मेने चिन्तितवान्न वदिष्ये किंचिदपि राज्ञे । गमनप्रयोजनं तु योगक्षेमार्थम् । न वदिष्य इत्येवंसंकल्पोऽपि याज्ञवल्क्यो यद्यज्जनकः पृष्टवांस्तत्तत्प्रतिपेदे तत्र को हेतुः संकल्पितस्यान्यथाकरण इति ॥

भाष्यार्थ—( याप्रमाणें तात्पर्य सांगून अक्षरांच्या व्याख्यानासच आरंभ करितात--) ' जनकं ह वैदेहं याज्ञवल्क्यो जगाम-' याज्ञवल्क्य वैदेह जनकाकडे गेला. ' स मेने-' तो जात असतां असें चिंतन करता झाला--' न वदिष्ये इति-' मी या राजाला कांहीं सांगणार नाहीं, (असें त्यानें चिंतन केलें. मग तो गेलाच कशाला ?--) योगक्षेमार्थ—हें त्याच्या गमनाचें प्रयोजन होतें. ' मी बोलणार नाहीं, ' असा जरी याज्ञवल्क्यानें संकल्प केला होता तरी जनकानें जें जें विचारलें तें तें त्यानें प्रतिपादिलें, तेव्हां केलेला संकल्प बदलण्यांत हेतु कोणता ?

अत्राऽऽख्यायिकामाचष्टे । पूर्वत्र किल जनकयाज्ञवल्क्ययोः संवाद आसीदग्निहोत्रे निमित्ते तत्र जनकस्याग्निहोत्रविषयं विज्ञानमुपलभ्य परितुष्टो याज्ञवल्क्यस्तस्मै जनकाय ह किल वरं ददौ । स च जनको ह कामप्रश्नमेव वरं वव्रे वृतवांस्तं च वरं हास्मै ददौ याज्ञवल्क्यः ।

तेन वरप्रदानसामर्थ्येनाव्याचिख्यासुमपि याज्ञवल्क्यं तूष्णीं स्थितमपि सम्राडेव जनकः पूर्वं पप्रच्छ । तत्रैवानुक्तिर्ब्रह्मविद्यायाः कर्मणा विरुद्धत्वात् । विद्यायाश्च स्वातन्त्र्यात् । स्वतन्त्रा हि ब्रह्मविद्या सहकारिसाधनान्तरनिरपेक्षा पुरुषार्थसाधनेति च ॥ १ ॥

भाष्यार्थ—( याप्रमाणें अवतरण देऊन--) याविषयीं उत्तर यारूपानें श्रुति आख्यायिका सांगते -' अथ ह यज्जनकश्च०-' कर्मकांडांत जनक व याज्ञवल्क्य यांचा अग्निहोत्राच्या निमित्तानें संवाद झाला. त्यांत जनकाचें अग्निहोत्रविषयविज्ञान पाहून अत्यंत संतुष्ट झालेला याज्ञवल्क्य त्या जनकाला वर देता झाला. ' स कामप्रश्नमेव०-' तो जनक कामप्रश्नच वर मागता झाला. ' तं हास्मै ददौ-' याज्ञवल्क्य त्याला हा वर देता झाला. ' तं ह सम्राडेव०-'त्या वरप्रदानाच्या सामर्थ्यानें व्याख्यानाची इच्छा न करणाऱ्याही याज्ञवल्क्याला—मुकाट्यानें बसलेल्यालाही त्याला—राजा जनकच पूर्वीं प्रश्न करता झाला. ( पण कामप्रश्नाविषयीं वर मिळाला असूनही अग्निहोत्रप्रकरणांतच आत्मयाथात्म्याविषयीं प्रश्न कां केला नाहीं तें सांगतात—) कर्मकाडांतच ब्रह्मविद्या सांगितलेली नाहीं. कारण ब्रह्मविद्येला कर्माशीं विरुद्धत्व आहे. ( ब्रह्मविद्या कर्माशीं विरुद्ध असल्यामुळें कर्मप्रकरणांत ती सांगितली नाहीं. शिवाय विद्येला स्वातंत्र्य आहे. [ म्ह० ती कर्मनिरपेक्ष मोक्षहेतु आहे, ] त्यामुळें कर्मकाडांत ती सांगितलेली नाहीं. ('अहो पण ब्रह्मविद्येला यज्ञादि सर्व साधनांची अपेक्षा आहे, असें सांगणारें ब्रह्ममीमांसेंत सर्वापेक्षाधिकरण असल्यामुळें ती स्वतंत्र नाहीं,' म्हणून म्हणाल तर तें बरोबर नाहीं. ) कारण स्वतंत्र ब्रह्मविद्याच—दुसऱ्या सहकारी साधनांची अपेक्षा न ठेवतांच परम पुरुषार्थाचें साधन होते. ( ब्रह्मविद्या स्वतःच्या उत्पत्तीसाठीं कर्मांची अपेक्षा करते, असा वेदान्ताचा सिद्धान्त नाहीं व ती आपलें मोक्षाख्य फल देण्यासाठीं कर्मांची अपेक्षा करते म्हणून म्हणावें तर ' अत एव चाग्नीन्धनाद्यन-

१ इच्छेस येईल तेव्हां वाटेल तो प्रश्न विचारणें हाच वर.

पेक्षा' (ब्र. सू. अ. ३ पा. ४ सूत्र २५) या न्यायाशीं निरोध येत असल्या-मुळें तिला सहकारी साधनांचीही अपेक्षा नाहीं, त्यामुळें ती कर्मप्रकरणांत सांगितली नाहीं, असा संबंध.) १.

याज्ञवल्क्य किंज्योतिरयं पुरुष इति । आ-
दित्यज्योतिः सम्राडिति होवाचऽऽदित्येनै-
वायं ज्योतिषाऽऽस्ते पल्ययते कर्म कुरुते
विपल्येतीत्येवमेवैतद्याज्ञवल्क्य ॥ २ ॥

अर्थ—'हे याज्ञवल्क्या, हा देहाख्य पुरुष किंज्योति आहे, कोणत्या ज्योतीनें हा व्यवहार करतो.' 'हे सम्राड्, तो आदित्यज्योति असतो,' असें याज्ञवल्क्य म्हणाला. 'हा आदित्य या ज्योतीनेंच बसतो, सर्वत्र गमन करतो, कर्म करतो, व परत येतो,' जनक म्हणतो, 'हे याज्ञवल्क्या, खरें आहे.' २.

हे याज्ञवल्क्येत्येवं संबोध्याभिमुखीकरणाय किंज्योतिरयं पुरुष इति किमस्य पुरुषस्य ज्योतिर्येन ज्योतिषा व्यवहरति सोऽयं किंज्योतिरयं प्राकृतः कार्यकरणसंघातरूपः शिरःपाण्यादिमान्पुरुषः पृच्छयते । किमयं स्वावयवसंघातबाह्येन ज्योतिरन्तरेण व्यवहरत्याहोस्वित्स्वावयवसंघातमध्यपातिना ज्योतिषा ज्योतिष्कार्यमयं पुरुषो निर्वर्तयतीत्येतदभिप्रेत्य पृच्छति ॥

भाष्यार्थ--( याज्ञवल्क्याच्या व्रतभंगाचें कारण सांगून जनकाचा प्रश्न उत्थापित करितात-) 'याज्ञवल्क्य-' हे याज्ञवल्क्या, असें त्याला प्रश्नाभिमुख करण्यासाठीं संबोधून 'किंज्योतिरयं पुरुष इति-' या पुरुषाची ज्योति काय ? कीं ज्या ज्योतीनें हा व्यवहार करतो ? 'किंज्योतिः अयं-' हा प्राकृत कार्यकरणसंघातरूप—शरीरेंद्रियसमुदायरूप—शिर, हात इत्यादि अवयवांनीं युक्त असलेला 'पुरुष' येथें विचारला जात आहे. ( याप्रमाणें अक्षरार्थ सांगून प्रश्नवाक्यांतील विवक्षित अर्थ सांगतात—)

६

हा काय आपल्या अवयवसंघाताच्या बाह्य असलेल्या दुसऱ्या ज्योतीनें व्यवहार करतो कीं आपल्या अवयवसंघाताच्या मध्येंच अन्तर्भूत होणाऱ्या ज्योतीनें हा पुरुष ज्योतिष्कार्य म्ह० आसनादि व्यवहार करतो, असे दोन कल्प मनांत आणून जनक प्रश्न करीत आहे.

किंचातो यदि व्यतिरिक्तेन यदि वाऽव्यतिरिक्तेन ज्योतिषा ज्योतिष्कार्यं निर्वर्तयति । शृणु तत्र कारणम् । यदि व्यतिरिक्तेनैव ज्योतिषा ज्योतिष्कार्यनिर्वर्तकत्वमस्य स्वभावो निर्धारितो भवति ततोऽदृष्टज्योतिःकार्यविषयेऽप्यनुमास्यामहे व्यतिरिक्तज्योतिर्निमित्तमेवेदं कार्यमिति ॥

भाष्यार्थ—( या दोन्ही पक्षीं फल काय तें विचारतात—) तो व्यतिरिक्त ज्योतीनें आसनादि ज्योतिष्कार्य करीत असला किंवा देहेंद्रियसमूहाहून अव्यतिरिक्त ज्योतीनें तें करीत असला तर त्यांत विशेष फल काय आहे ? त्यांतील विशिष्ट फळ ऐक. जर त्या देहादिरूप पुरुषाचा—स्वव्यतिरिक्त ज्योतीनेंच ज्योतिष्कार्याचें कर्तृत्व—हा स्वभाव आहे, असें निश्चित होईल तर अदृष्ट अशा ज्योतिष्कार्याविषयींही 'हें कार्य शरीरादिकांहून व्यतिरिक्त अशा ज्योतीच्या निमित्तानेंच होतें,' असें आम्ही अनुमान करूं. ( हें कार्य शरीरादिकांहून व्यतिरिक्त असलेल्या ज्योतीच्या अधीन आहे. कारण त्याला व्यवहारत्व आहे. दोघांनाही संमत असलेल्या इतर व्यवहाराप्रमाणें, असा भावार्थ. )

अथाव्यतिरिक्तेनैव स्वात्मना ज्योतिषा व्यवहरति ततोऽप्रत्यक्षेऽपि ज्योतिषि ज्योतिष्कार्यदर्शनेऽव्यतिरिक्तमेव ज्योतिरनुमेयम् । अथानियम एव व्यतिरिक्तमव्यतिरिक्तं वा ज्योतिः पुरुषस्य व्यवहारहेतुस्ततोऽनध्यवसाय एव ज्योतिर्विषय इत्येवं मन्वानः पृच्छति जनको याज्ञवल्क्यं किंज्योतिरयं पुरुष इति ॥

भाष्यार्थ—( दुसऱ्या कल्पाचा अनुवाद करून त्यानें देहात्मवाद्यांच्या पक्षाची सिद्धि होते, असें सांगतात—) आतां देहादिसंघाताहून

भिन्न नसलेल्या देहादिरूपच ज्योतीनें जर तो व्यवहार करीत असेल तर अप्रत्यक्ष अशाही ज्योतीविषयीं–ज्योतिष्कार्य दिसलें असतां--अव्यतिरिक्त ज्योतीचेंच अनुमान करावें लागतें. ( आणखीं एका पक्षाचा अनुवाद करीतात–) आतां त्याविषयीं कांहीं नियमच नाहीं, तर देहादिकांहून भिन्न असलेली अथवा अभिन्न असलेली ज्योति पुरुषाच्या व्यवहाराचें निमित्त आहे, म्हणून म्हणावें तर पुरुषाच्या ज्योतीविषयीं कांहीं निश्चयच होत नाहीं, असें समजणारा जनक याज्ञवल्क्याला 'किंज्योतिरयं पुरुषः' असें विचारीत आहे.

नन्वेवमनुमानकौशले जनकस्य किं प्रश्नेन स्वयमेव कस्मान्न प्रतिपद्यत इति । सत्यमेतत् । तथाऽपि लिङ्गलिङ्गिसंबन्धविशेषाणामत्यन्तसौक्ष्म्याद्दुरवबोध्यतां मन्यते बहूनामपि पण्डितानां किमुतैकस्य । अत एव हि धर्मसूक्ष्मनिर्णये परिषद्व्यापार इष्यते । पुरुषविशेषश्चापेक्ष्यते । दशावरा परिषत्त्रयो वैको वेति । तस्माद्यद्यप्यनुमानकौशलं राज्ञस्तथाऽपि तु युक्तो याज्ञवल्क्यः प्रष्टुम् । विज्ञानकौशलतारतम्योपपत्तेः पुरुषाणाम् ॥

भाष्यार्थ---( या प्रश्नावर आक्षेप घेतात–) अहो पण जनकाला जर असें अनुमान कौशल होतें–तो जर अनुमान करण्यांत असा कुशल होता–तर तो प्रश्न कां करीत आहे ? ( व्यतिरिक्त ज्योतीला जाणण्याच्या इच्छेनें प्रश्न केला आहे म्हणून म्हणाल तर तो ) स्वतःच अनुमानानें कां जाणत नाहीं ? ( राजाचें अनुमानकौशल स्वीकारतात–) राजा अनुमानकुशल आहे, ही गोष्ट खरी. ( मग तो प्रश्न कां करीत आहे ? तें सांगतात--) तथापि लिंग व लिंगी म्ह० व्यापक व व्याप्य आणि त्यांचे संबंधविशेष अत्यन्त सूक्ष्मत्वामुळें कळणें फार कठिण आहे, असें जनक समजतो ( व त्यामुळें त्यानें ज्ञानामध्यें याज्ञवल्क्याची अपेक्षा केली आहे, असा भावार्थ, त्यांना अतिसूक्ष्मत्व कसें आहे तें सांगतात--) लिंगादिकांचें यथार्थ ज्ञान अनेक विवेक्यांनाही होणें

कठिण आहे, मग एकाला तें दुर्बोध झाल्यास त्यांत नवल तें काय ? ( त्यांच्या अत्यन्त सूक्ष्मतेविषयीं मनुस्मृतींचें प्रमाण देतात—) म्हणूनच म्हणजे कुशल पुरुषालाही सूक्ष्मार्थाच्या निर्णयासाठीं दुसऱ्या पुरुषांची अपेक्षा असल्यामुळेंच धर्मासारख्या सूक्ष्म विषयाच्या निर्णयासाठीं परिषद् करावी अस सांगितलें आहे. तसेंच, वेदविद्, अध्यात्मविद् इत्यादि विशेष पुरुषांची अपेक्षा केलेली आहे. ( 'धर्मेणाधिगतो यैस्तु०' इत्यादि स्मृतिवचनांचा अर्थ थोडक्यांत सांगतात--) कमीत कमी दहा पुरुषांची परिषद् असावी. निदान आपल्या सदाचारांत तत्पर असलेले तीन पुरुष परिषदेंत असावेत. निदान एक अध्यात्मवेत्ता, ही परिषद् होय, ( याप्रमाणें कुशल राजानेंही याज्ञवल्क्याला प्रश्न करणें योग्यच आहे, असें जें सांगितलें त्याचा उपसंहार करितात--) तस्मात् म्ह० सूक्ष्मार्थाच्या निर्णयाविषयीं दुसऱ्या पुरुषांची अपेक्षा करणें हें वृद्धसंमत असल्यामुळें यद्यपि राजाला अनुमानकौशल असलें तरी त्यानें याज्ञवल्क्याला प्रश्न करणें उचितच आहे. ( त्याविषयींच दुसरा हेतु सांगतात--) शिवाय पुरुषांच्या ठिकाणीं विज्ञान व कौशल यांचें तारतम्य असणेंही युक्त आहे. ( जनक जरी ज्ञानी किंवा कुशल असला तरी दुसरा त्यांहून अधिक ज्ञानी किंवा अधिक कुशल कोणी नसेलच असें नाहीं. त्यामुळेंही त्याचा प्रश्न योग्य आहे. )

अथ वा श्रुतिः स्वयमेवाऽऽख्यायिकाव्याजेनानुमानमार्गमुपन्यस्यास्मान्बोधयति पुरुषमतिमनुसरन्ती ॥

भाष्यार्थ—( राजाला याज्ञवल्क्याची अपेक्षा असणें युक्तच आहे, असें सांगून आतां दुसरा पक्ष सांगतात--) अथवा स्वतः श्रुतिच आख्यायिकेच्या मिषानें अनुमानमार्गाचा उपन्यास करून, पुरुषाच्या मतीचें अनुसरण करून, आम्हांस बोध करीत आहे. ( अर्थात् यांत राजा किंवा मुनि यांपैकीं कोणालाच कांहीं विवक्षित नसल्यामुळें राजा मुनीचें

अनुसरण का करीत आहे ? हा प्रश्नच निरवकाश होतो, असा वरील वाक्यास शेष लावावा. )

याज्ञवल्क्योऽपि जनकाभिप्रायाभिज्ञतया व्यतिरिक्तमात्मज्योतिर्बोधयिष्यञ्जनकं व्यतिरिक्तप्रतिपादकमेव लिङ्गं प्रतिपेदे यथाप्रसिद्धमादित्यज्योतिः सम्राडिति होवाच। कथमादित्येनैव स्वावयवसंघातव्यतिरिक्तेन चक्षुषोऽनुग्राहकेण ज्योतिषाऽयं प्राकृतः पुरुष आस्त उपविशति पल्ययते पर्येति क्षेत्रमरण्यं वा तत्र गत्वा कर्म कुरुते विपल्येति विपर्येति च यथागतम् । अत्यन्तव्यतिरिक्तज्योतिष्ट्वप्रसिद्धताप्रदर्शनार्थमनेकविशेषणम् । बाह्यानेकज्योतिःप्रदर्शनं च लिङ्गस्याव्यभिचारित्वप्रदर्शनार्थमेवमेवैतद्याज्ञवल्क्य ॥ २ ॥

भाष्यार्थ—( याप्रमाणें प्रश्न उपपन्न झाला असतां प्रतिवचनही उपपन्न होतेंच, असें समजून तें उत्थापित करितात--) ' आदित्यज्योतिः सम्राड् इति.' याज्ञवल्क्यही जनकाच्या अभिप्रायाचा अभिज्ञ--जाणता--असल्यामुळें जनकाला देहादिकांहून व्यतिरिक्त असलेल्या आत्मज्योतीचाच बोध करून देणारा असा होत्साता पुढें सांगितलें जाणारें व्यतिरिक्त प्रतिपादक लिंगच जसें गृहीतव्याप्तिक प्रसिद्ध होईल तशारीतीनें ( त्याच्या व्याप्तीचें ग्रहण स्थल ) 'आदित्यज्योतिः०-' इत्यादि वाक्यानें जाणता झाला. तो म्हणाला " हे राजा, हा पुरुष आदित्यज्योति आहे. " ( आदित्य हीच त्याची ज्योति आहे. व्याप्तीला जाणण्याची इच्छा करणारा राजा विचारतो--) तो कसा ? ( जो व्यवहार तो अतिरिक्त ज्योतीच्या आधीन आहे. जसा--जाग्रद्व्यवहार सूर्याच्या आधीन असतो, अशी व्याप्ति व्यक्त करतात-)' आदित्येनैव[1] ज्योतिषा.' देहाच्या अवयवांच्या संघाताहून व्यतिरिक्त, चक्षूचा अनुग्राहक[2] अशा आदित्य याच ज्योतीनें ' अयं ' हा प्राकृत पुरुष ' आस्ते-' बसतो, ' पल्ययते.'

१ ' आदित्येन एव ' येथील एवकारावरून हा अर्थ निष्पन्न होतो. २ आदित्याची अपेक्षा न ठेवतांच नुसत्या चक्षूनेंच व्यवहार होईल, अशी आशंका घेऊन हें म्हटलें आहे.

पर्यटन करतो--क्षेत्राला किंवा अरण्यांत जातो. ' कर्म कुरुते-' तेथें जाऊन कर्म करतो, ' विपल्येति ' जसा गेला तसा परत येतो. ("अहो पण आसन--बसणें, जाणें, कर्म करणें, येणें यांतील कोणत्या तरी एका व्यापारांत व्याप्ति सिद्ध झाली असतां अनेक विशेषणें देण्याचें काय प्रयोजन आहे ? अशी आशंका घेऊन सांगतात--) अत्यन्त व्यतिरिक्त ज्योतिष्ठाची प्रसिद्धता प्रदर्शित करण्यासाठीं अनेक विशेषणें योजिलीं आहेत. ( आसनादि एकेका व्यवहारांत देहाचा अन्यथाभाव जरी होत असला तरी अनुग्राहक ज्योतीमध्यें कांहीं बदल होत नाहीं. यास्तव अनुग्राहक ज्योति अनुग्राह्याहून अत्यंत विलक्षण आहे, अशा आशयानें चार व्यापारांचा येथें उल्लेख केला आहे, असा भावार्थ. असें जरी असलें तरी एकाच पर्यायावरून व्याप्तीचें ग्रहण संभवत असतांना येथें अनेक पर्याय कां केले आहेत, तें सांगतात--) बाह्य अनेक ज्योतींचें जें प्रदर्शन केलें आहे तें लिंगाचें अव्यभिचारित्व प्रदर्शित करण्यासाठींच आहे. ( देह इंद्रियें व मन यांचे व्यापार—कर्म हेंच लिंग आहे. तें लिंग व्यतिरिक्त-ज्योतीशीं व्यभिचरित होणारें नाहीं, हें सिद्ध करण्यासाठीं अनेक पर्यायांचा उपन्यास केला आहे. कारण बहुत दृष्टान्त व्याप्तीला दृढ करितात—) जनक म्हणतो--खरें आहे. २.

**अस्तमित आदित्ये याज्ञवल्क्य किंज्योतिरेवायं पुरुष इति चन्द्रमा एवास्य ज्योतिर्भवतीति चन्द्रमसैवायं ज्योतिषाऽऽस्ते पल्ययते कर्म कुरुते विपल्येतीत्येवमेवैतद्याज्ञवल्क्य ॥ ३ ॥**

अर्थ—प्रश्न-हे याज्ञवल्क्या, आदित्य अस्त पावला असतां हा पुरुष ' किंज्योति ' आहे ? उत्तर--चंद्रमा हीच याची ज्योति असते. हा

चन्द्रमा याच ज्योतीनें बसतो. पर्यटन करतो, कर्म करतो, व परत येतो. जनक-'खरें आहे.' ३.

तथाऽस्तमित आदित्ये याज्ञवल्क्य किंज्योतिरेवायं पुरुष इति चन्द्रमा एवास्य ज्योतिः ॥ ३ ॥

भाष्यार्थ—त्याचप्रमाणें 'याज्ञवल्क्या, आदित्य अस्त पावला असतां या पुरुषाची ज्योति काय असते?' 'चन्द्रमा हीच याची ज्योति असते.' ३.

**अस्तमित आदित्ये याज्ञवल्क्य चन्द्रमस्यस्तमिते किंज्योतिरेवायं पुरुष इत्यग्निरेवास्य ज्योतिर्भवतीत्यग्निनैवायं ज्योतिषाऽऽस्ते पल्ययते कर्म कुरुते विपल्येतीत्येवमेवैतद्याज्ञवल्क्य ॥ ४ ॥**

अर्थ —प्रश्न—हे याज्ञवल्क्या, आदित्य अस्त पावला असतां व चंद्रही अस्त पावला असतां हा पुरुष 'किंज्योतिच' असतो. उत्तर—अग्नि हीच याची ज्योति असते. हा अग्नि याच ज्योतीनें बसतो, जातो, कर्म करतो व येतो. जनक-" याज्ञवल्क्या खरें आहे." ४.

अस्तमित आदित्ये चन्द्रमस्यस्तमितेऽग्निर्ज्योतिः ॥ ४ ॥

भाष्यार्थ—आदित्य अस्त पावला असतां, व चंद्रमाही अस्त पावला असतां अग्नि ही पुरुषाच्या व्यवहाराची ज्योति असते. ४.

**अस्तमित आदित्ये याज्ञवल्क्य चन्द्रमस्यस्तमिते शान्तेऽग्नौ किंज्योतिरेवायं पुरुष इति वागेवास्य ज्योतिर्भवतीति वाचैवायं ज्योतिषाऽऽस्ते पल्ययते कर्म कुरुते विपल्येतीति**

**तस्माद्वै सम्राडपि यत्र स्वः पाणिर्न विनिर्ज्ञायतेऽथ यत्र वागुच्चरत्युपैव तत्र न्येतीत्येवमेवैतद्याज्ञवल्क्य ॥ ५ ॥**

अर्थ--प्रश्न-हे याज्ञवल्क्या, आदित्य अस्त पावला असतां, चंद्रमा अस्त पावला असतां व अग्निही शांत झाला असतां हा पुरुष ' किंज्योतिच ' असतो ? उत्तर--वाक् हीच याची ज्योति असते. हा वाक् याच ज्योतीनें बसतो, जातो, कर्म करतो व येतो. म्हणून हे सम्राट्, ज्यावेळीं आपला हातही चांगल्याप्रकारें जाणला जात नाहीं त्यावेळीं जेथून शब्द निघत-येत असतो तेथें जातो. जनक-" याज्ञवल्क्या, खरें आहे." ५.

शान्तेऽग्नौ वाग्ज्योतिः । वागिति शब्दः परिगृह्यते । शब्देन विषयेण श्रोत्रमिन्द्रियं दीप्यते । श्रोत्रेन्द्रिये संप्रदीप्ते मनसि विवेक उपजायते । तेन मनसा बाह्यां चेष्टां प्रतिपद्यते । मनसा ह्येव पश्यति मनसा शृणोतीति ब्राह्मणम् । कथं पुनर्वाग्ज्योतिरिति वाचो ज्योतिष्ट्वमप्रसिद्धमित्यत आह । तस्माद्वै सम्राडस्मा'द्वाचा ज्योतिषाऽनुगृहीतोऽयं पुरुषो व्यवहरति तस्मात्प्रसिद्धमेतद्वाचो ज्योतिष्ट्वम् । कथमपि यत्र यस्मिन्काले प्रावृषि प्रायेण मेघान्धकारे सर्वज्योतिःप्रत्यस्तमये स्वोऽपि पाणिर्हस्तो न विस्पष्टं निर्ज्ञायते । अथ तस्मिन्काले सर्वचेष्टानिरोध प्राप्ते बाह्यज्योतिषोऽभावाद्यत्र वागुच्चरति श्वा वा भषति गर्दभो वा रौत्युपैव तत्र न्येति तेन शब्देन ज्योतिषा श्रोत्रमनसोर्नैरन्तर्यं भवति तेन ज्योतिष्कार्यत्वं वाक्प्रतिपद्यते तेन वाचा ज्योतिषोपन्येत्येवोपगच्छत्येव तत्र संनिहितो भवतीत्यर्थः । तत्र च कर्म कुरुते विपल्येति । तत्र वाग्ज्योतिषो ग्रहणं गन्धादीनामुपलक्षणार्थम् ।गन्धादिभिरपि हि घ्राणादिष्वनुगृहीतेषु प्रवृत्तिनिवृत्त्यादयो भवन्ति । तेन तैरप्यनुग्रहो भवति कार्यकरणसंघातस्य । एवमेवैतद्याज्ञवल्क्य ॥ ५॥

भाष्यार्थ--अग्नि शांत झाला असतां पुरुष ' वाग्ज्योतिः ' होतो. ( ' वाक्' हा शब्द येथें इंद्रिय या अर्थी नाहीं. म्हणून ) ' वाक् ' या

शब्दानें येथें शब्दाचें ग्रहण केलें जातें. ( शब्दाचें ज्योतिष्ट्व स्पष्ट करण्यासाठीं भूमिका करितात—) शब्द या विषयाकडून श्रोत्र-इंद्रिय प्रदीप्त केलें जातें. ( श्रोत्राच्या दीप्तीचें कार्य सांगतात—) श्रोत्रेंद्रिय चांगलें प्रदीप्त झालें असतां मनांत विवेक उत्पन्न होतो. ( मनामध्यें विषयाकार परिणाम झाला असतां काय होतें तें सांगतात—) त्या मनानें पुरुष बाह्य चेष्टेला प्राप्त होतो. ( त्याविषयीं प्रमाण-) 'मनानेंच पाहतो, मनानें ऐकतो !' इत्यादि अर्थाचें ब्राह्मण आहे. ( याप्रमाणें पातनिका करून वाक्-चें-शब्दाचें ज्योतिष्ट्व साधण्यासाठीं राजा विचारतो -) अहो पण 'वाग्ज्योतिः' अशा रीतीनें वाक्-चें अप्रसिद्ध ज्योतिष्ट्व कसें सांगितलें जात आहे !, असें जनक विचारील म्हणून याज्ञवल्क्य सांगतात—( अथवा श्रुति सांगते—) 'तस्माद्वै सम्राट्-' ज्याअर्थीं वाक् या ज्योतीनें अनुगृहीत झालेला हा पुरुष व्यवहार करतो तस्मात् हें वाक्-चें ज्योतिष्ट्व प्रसिद्ध आहे. ( ती प्रसिद्धिच आकांक्षापूर्वक स्पष्ट करितात—) तें कसें ? 'अपि यत्र-' ज्यावेळीं वर्षाकाळीं प्रायः मेघांच्या अंधकारांत सर्व ज्योतींचा अस्त झाला असतां 'स्वः पाणिः' आपलाही हात 'न विनिर्ज्ञायते-' अगदीं स्पष्टपणें जाणला जात नाहीं 'अथ-' त्यावेळीं बाह्य ज्योतीच्या अभावामुळें सर्व हालचाल बंद पडण्याचा प्रसंग आला असतां 'यत्र वागुच्चरति-' जेथें शब्द होतो—कुत्रा तरी भोंकतो अथवा गाढव ओरडतो 'उप एव तत्र न्येति-' त्या शब्दानें—ज्योतीनें श्रोत्र व मन यांचें नैरंतर्य-निरंतरता होते. त्यामुळें वाक् ज्योतिष्कार्यत्वास म्ह० वाक्पासून होणाऱ्या व्यवहाररूप कार्यवत्त्वास प्राप्त होते. म्हणून वाक् या ज्योतीनें जवळ जातोच. जेथें शब्द होतो तेथें त्याच्या समीप होतो, असा भावार्थ. तेथें कर्म करतो व परत येतो. या चवथ्या पर्यायांत वाक्-ज्योतीचें ग्रहण गंधादिकांच्या उपलक्षणार्थ केलें आहे. ( शब्दानें गंधादिक उपलक्षित होतात, असें म्हणण्याचें कारण काय ? तर सांगतात—) गंधादिकांनींही घ्राणादिकांवर अनुग्रह केला असतां प्रवृत्ति, निवृत्ति

इत्यादिक होतात. त्यामुळें त्या गंधादिकांच्या योगानेंही कार्य-करणसंघातावर अनुग्रह होतो. (दुसरा प्रश्न उत्थापित करितात--) हे याज्ञवल्क्या, हें असेंच आहे. ( तथापि स्वप्नादिकांत त्याची प्रवृत्ति होत असल्याचा अनुभव येत असल्यामुळें त्याची कारणभूत ज्योति सांगावी, असा या वाक्यास शेष लावावा. ) ५.

अस्तमित आदित्ये याज्ञवल्क्य चन्द्रमस्यस्तमिते शान्तेऽग्नौ शान्तायां वाचि किंज्योतिरेवायं पुरुष इत्यात्मैवास्य ज्योतिर्भवतीत्यात्मनैवायं ज्योतिषाऽऽस्ते पल्ययते कर्म कुरुते विपल्येतीति ॥ ६ ॥

अर्थ—'हे याज्ञवल्क्या, आदित्य अस्त पावला असतां, चंद्रमाही अस्त पावला असतां, अग्नि विझला असतां व शब्दही शांत झाला असतां हा पुरुष ' किं ज्योतिच ' असतो ?' ' हे राजा, आत्माच याची ज्योति असते. तो आत्मा याच ज्योतीनें बसतो, जातो, कर्म करतो व परत येतो.' ६.

शान्तायां पुनर्वाचि गन्धादिष्वपि च शान्तेषु बाह्येष्वनुग्राहकेषु सर्वप्रवृत्तिनिरोधः प्राप्तोऽस्य पुरुषस्य ।.एतदुक्तं भवति । जाग्रद्विषये बहिर्मुखानि करणानि चक्षुरादीन्यादित्यादिज्योतिर्भिरनुगृह्यमाणानि यदा तदा स्फुटतरः संव्यवहारोऽस्य पुरुषस्य भवतीति । एवं तावज्जागरिते स्वावयवसंघातव्यतिरिक्तेनैव ज्योतिषा ज्योतिष्कार्यसिद्धिरस्य पुरुषस्य दृष्टा । तस्मात्ते वयं मन्यामहे सर्वबाह्यज्योतिःप्रत्यस्तमयेऽपि स्वप्नसुषुप्तकाले जागरिते च तादृगवस्थायां स्वावयवसंघातव्यातिरिक्तेनैव ज्योतिषा ज्योतिष्कार्यसिद्धिरस्येति ॥

भाष्यार्थ—वाक् म्ह० शब्द शांत झाला व बाह्य अनुग्राहक गंधादिकही शांत झाले असतां या पुरुषाच्या सर्व प्रवृत्तीचा निरोध प्राप्त

झाला. ('अहो पण येथें दुसऱ्या ज्योतीविषयींच प्रश्न विचारला जातो म्हणून कशावरून?' अशी आशंका घेऊन प्रश्नकर्त्याचा अभिप्राय सांगतात--) त्याचा तात्पर्यार्थ असा--जाग्रदवस्थेंत चक्षुरादिक बहिर्मुख इंद्रियें जेव्हां आदित्यादि ज्योतींनीं अनुग्रह केलीं जातात तेव्हां या पुरुषाचा अगदीं अतिशय स्पष्ट व्यवहार होतो, (हें यावरून सांगितलें असें होतें. जो जो व्यवहार तो तो देहादिकांहून भिन्न अशा ज्योतीच्या निमित्तानें होतो. जसा आदित्यादिकांच्या निमित्तानें जाग्रद्व्यवहार होतो. आतां सांगितलेल्या या व्याप्तीचें निगमन करितात--) याप्रमाणें तर जागरितांत आपल्या शरीरावयवसंघाताहून व्यतिरिक्त अशाच ज्योतीनें या पुरुषाच्या ज्योतिष्कार्याची सिद्धि होत असल्याचा अनुभव येतो. (आतां या व्याप्तिज्ञानाचें कार्य-अनुमान सांगतात--) तस्मात् ते आम्ही ज्यांत सर्व बाह्य ज्योतींचा अस्त झाला आहे अशा स्वप्नकालीं व सुषुप्तिकाळीं त्याचप्रमाणें सर्व बाह्य ज्योतिःशून्य जागरितकाळीं शरीरावयवसंघातव्यतिरिक्त अशा ज्योतीनें याच्या ज्योतिष्कार्याची सिद्धि होते असें मानतों. (हा स्वप्नांतील व सुषुप्तींतील व्यवहार अतिरिक्त ज्ञानज्योतीच्या अधीन आहे. कारण तोही व्यवहारच आहे. जाग्रत्कालीन व्यवहाराप्रमाणें, असें अनुमान वर सुचविलेंच आहे.)

दृश्यते च स्वप्ने ज्योतिष्कार्यसिद्धिर्बन्धुसङ्गमवियोगदर्शनं देशान्तरगमनादि च । सुषुप्ताच्चोत्थानं सुखमहमस्वाप्सं न किंचिदवेदिषमिति । तस्मादस्ति व्यतिरिक्तं किमपि ज्योतिः । किं पुनस्तच्छान्तायां वाचि ज्योतिर्भवतीति ॥

भाष्यार्थ--(वरील अनुमानांतील 'कारण तो व्यवहारच आहे' या हेतूचा आश्रय असिद्ध आहे, अशी आशंका घेऊन तिचा परिहार करितात--) स्वप्नांत बंधूचा समागम, वियोग, दुसऱ्या देशीं जाणें, तेथ कर्म करणें, परत येणें इत्यादि ज्योतिष्कार्याची सिद्धि अनुभवास येते. (आश्रयाच्या एकदेशाची असिद्धि मानून सांगतात--) तसेंच सुषुप्ता-

पासून उठतो. मी सुखानें निजलों होतों, कांहीं जाणलें नाहीं. असें स्मरणही होतें. ( ध्यानदशेंत इष्ट देवतेचें दर्शन होतें, इत्यादि ' सुषुप्तांच ' येथील ' च-'कारावरून घ्यावें. आतां या अनुमानाच्या फलाचें निगमन करितात--) तस्मात् कांहींतरी व्यतिरिक्त ज्योति आहे. ('अहो पण या पूर्वोक्त अनुमानावरून ज्योति जर सिद्ध होत आहे तर प्रश्न करण्यांत काय अर्थ आहे ?' अशी आशंका घेऊन सांगतात--) ' अस्तमित आदित्ये........शान्तायां वाचि किंज्योतिरेवायं०.' वाक् म्ह० शब्द शांत झाल्यावर पुरुषाच्या व्यवहाराला कोणती ज्योति असते? ( आदित्यादि सर्व ज्योतींचा उपशम झाला असतां दिसणाऱ्या या व्यवहाराचें कारण, अशा रूपानें अनुमानानें सामान्यतः ज्योतीची सिद्धि झाली असतां ती कोणती ? असा विशेष जाणण्याच्या इच्छेनें प्रश्न उपपन्न होतो, असा भावार्थ. )

उच्यते। आत्मैवास्य ज्योतिर्भवतीति। आत्मेति कार्यकरणस्वावयवसंघातव्यतिरिक्तं कार्यकरणावभासकमादित्यादिबाह्यज्योतिर्वत्स्वयमन्येनानवभास्यमानमभिधीयते ज्योतिरन्तःस्थं च तत्पारिशेष्यात्। कार्यकरणव्यतिरिक्तं तदिति तावत्सिद्धम्। यच्च कार्यकरणव्यतिरिक्तं कार्यकरणसंघातानुग्राहकं च ज्योतिस्तद्बाह्यैश्चक्षुरादिकरणैरुपलभ्यमानं दृष्टं न तु तथा तच्चक्षुरादिभिरुपलभ्यत आदित्यादिज्योतिःषूपरतेषु। कार्यं तु ज्योतिषो दृश्यते यस्मादात्मनैवायं ज्योतिषाऽऽस्ते पल्ययते कर्म कुरुते विपल्येतीति। तस्मान्नूनमन्तःस्थं ज्योतिरित्यवगम्यते ॥

भाष्यार्थ—( प्रतिवचन घेऊन त्याचें व्याख्यान करितात--) वरील प्रश्नाचें ' आत्मैवास्य ज्योतिर्भवतीति.' आत्माच याची ज्योति होते असें उत्तर सांगितलें जात आहे. ' आत्मा ' या शब्दानें शरीरेंद्रियांच्या स्वावयवांच्या संघाताहून व्यतिरिक्त, शरीरेंद्रियांचें आदित्यादि बाह्य ज्योतीप्रमाणें अवभासक, पण स्वतः दुसऱ्या ज्योतीकडून प्रकाशित न होणारी ज्योति सांगितली जाते; व ती बाह्य ज्योतींतील एकही नस-

ज्यामुळें पारिशेष्य न्यायानें अन्तस्थ आहे. ( तिचें देहादिव्यतिरिक्तत्व सूचित करितात–) ती ज्योति देहादि व्यतिरिक्त आहे, हें तर सिद्धच आहे. ( कारण आदित्यादिकांप्रमाणें तीही अनुग्राहक आहे, असा या वाक्याला शेष लावावा. ती अन्तःस्थ आहे, असें जें वर म्हटलें आहे त्याचें उपपादन करितात–) जी कार्यकरणव्यतिरिक्त व कार्यकरणसंघातानुग्राहक ज्योति ती बाह्य चक्षुरादि इंद्रियांनीं उपलब्ध होत असल्याचा अनुभव येतो. पण आदित्यादि ज्योति उपरत झाल्या असतां ती आत्मज्योति तशी चक्षुरादि इंद्रियांनीं उपलब्ध होत नाहीं, आणि असें असूनही ज्याअर्थीं ज्योतीचें कार्य दिसतें त्याअर्थीं हा पुरुष आत्मा याच ज्योतीनें बसतो, इष्ट स्थळीं जातो, तेथें कर्म करतो व परत येतो. तस्मात् अवश्य ती अन्तःस्थ ज्योति आहे, असें ज्ञान होतें. ( स्वप्नादिकांतील व्यवहाराला कारण होणारी ज्योति अन्तःस्थ आहे, कारण ती अतींद्रिय आहे, आदित्यादिकांप्रमाणें इंद्रियांचा विषय होणारी नाहीं, असा भावार्थ.येथील हा आदित्यादिकांचा दृष्टान्त व्यतिरेकी आहे.)

किंचाऽऽदित्यादिज्योतिर्विलक्षणं तदभौतिकं च स एव हेतुर्यच्चक्षुराद्यग्राह्यत्वमादित्यादिवत् ॥

भाष्यार्थ—(दुसरा व्यतिरेक सांगतात-) शिवाय ती ज्योति आदित्यादि ज्योतींहून विलक्षण आहे, व अभौतिक आहे. आदित्यादिकांप्रमाणें. ती आत्मज्योति चक्षुरादि इंद्रियांनीं ग्राह्य न होण्याचें तेंच [म्ह० आदित्यादिज्योतिर्विलक्षणत्व व अभौतिकत्व हेंच ] कारण आहे.

न। समानजातीयेनैवोपकारदर्शनात्। यदादित्यादिविलक्षणं ज्योतिरान्तरं सिद्धमित्येतदसत्। कस्मात्। उपक्रियमाणसमानजातीयेनैवाऽऽदित्यादिज्योतिषा कार्यकरणसंघातस्य भौतिकस्य भौतिकेनैवोपकारः क्रियमाणो दृश्यते। यथादृष्टं चेदमनुमेयम्। यदि नाम कार्यकरणादर्थान्तरं तदुपकारकमादित्यादिवज्ज्योतिस्तथाऽपि कार्यकरणसंघा-

तत्समानजातीयमेवानुमेयं कार्यकरणसंघातोपकारकत्वादादित्यादिज्योतिर्वत् ॥

भाष्यार्थ—( त्यावर लोकायत–देहात्मवादी आक्षेप घेतो– ) असें नाहीं. कारण पदार्थावर समानजातीय पदार्थांकडूनच उपकार होत असल्याचें दिसतें. ( आतां ' न-' असें नाहीं, या नञर्थाचेंच व्याख्यान करितात– ) 'आदित्यादिकांहून विलक्षण अशी आन्तर ज्योति सिद्ध झाली' असें जें वर म्हटलें आहे तें असत् आहे. कशावरून ? ज्याच्यावर उपकार करावयाचा त्याच्याच जातीच्या आदित्यादि ज्योतीकडून म्हणजे भौतिक कार्य करणसंघाताचा भौतिक अशा आदित्याकडूनच उपकार केला जातो असें दिसतें; ( तथापि आत्मज्योतीला हा न्याय लागू होत नाहीं, म्हणून म्हणाल तर सांगतात; ) आणि जसा अनुभव येत असेल त्याप्रमाणें याचेंही अनुमान केलें पाहिजे. ( याचेंच स्पष्टीकरण– ) कार्यकरणांवर उपकार करणारी ज्योति आदित्यादिकांप्रमाणें त्याहून निराळी असली पाहिजे, हें जरी खरें आहे तरी ती कार्यकरणसंघाताच्या समानजातीचीच असावी, असें अनुमान करावें लागतें. कारण तिला कार्यकरणोपकारकत्व आहे; ( ती ज्योति ) आदित्यादिकांप्रमाणें कार्यकरणसंघातावर उपकार करणारी आहे.

यत्पुनरन्तःस्थत्वादप्रत्यक्षत्वाच्च वैलक्षण्यमुच्यते तच्चक्षुरादिज्योतिभिरनैकान्तिकम् । यतोऽप्रत्यक्षाण्यन्तःस्थानि च चक्षुरादिज्योतींषि भौतिकान्येव । तस्मात्तव मनोरथमात्रं विलक्षणमात्मज्योतिः सिद्धमिति ॥

भाष्यार्थ—( आत्मज्योति अन्तःस्थ आहे व अतिरिक्त आहे. कारण ती अतींद्रिय आहे. आदित्याप्रमाणें, या अतिरिक्त आत्मवाद्याच्या पूर्वोक्त व्यतिरेकी अनुमानाचा अनुवाद करून देहात्मवादी त्यावर दूषण देतात– ) आतां ती आत्मज्योति अन्तःस्थ असल्यामुळें व अप्रत्यक्ष

असल्यामुळें आदित्यादि ज्योतींहून विलक्षण आहे, असें जें तुम्ही म्हणत आहों तें चक्षुरादि इतर ज्योतींशीं अनैकान्तिक–व्यभिचारी आहे. ( त्याचें व्यभिचारित्वच व्यक्त करितात–) कारण अप्रत्यक्ष व अन्तःस्थ अशा चक्षुरादि ज्योती भौतिकच असतात. [ अन्तःस्थ-च पण संघाताहून व्यतिरिक्त नाहींत, असेंही येथें विवक्षित आहे. आतां या व्यभिचाराचें फळ सांगतात--] तस्मात् 'आत्मज्योति आदित्यादि ज्योतींहून विलक्षण व अन्तःस्थ आहे, हें सिद्ध झालें,' असें जें तुझें म्हणणें तें केवल मनोरथमात्र आहे.

कार्यकरणसंघातभावभावित्वाच्च संघातधर्मत्वमनुमीयते ज्योतिषः । सामान्यतो दृष्टस्य चानुमानस्य व्यभिचारित्वादप्रामाण्यम् । सामान्यतो दृष्टबलेन हि भवानादित्यादिवद्व्यतिरिक्तं ज्योतिः साधयति कार्यकरणेभ्यः । न च प्रत्यक्षमनुमानेन बाधितुं शक्यते । अयमेव तु कार्यकरणसंघातः प्रत्यक्षं पश्यति शृणोति मनुते विजानाति च । यदि नाम ज्योतिरन्तरमस्योपकारकं स्यादादित्यादिवन्न तदाऽऽत्मा स्याज्ज्योतिरन्तरमादित्यादिवदेव । य एव तु प्रत्यक्षं दर्शनादिक्रियां करोति स एवाऽऽत्मा स्यात्कार्यकरणसंघातो नान्यः । प्रत्यक्षविरोधेऽनुमानस्याप्रामाण्यात् ॥

भाष्यार्थ—(शिवाय चैतन्य हा शरीराचा धर्म आहे; कारण शरीर असेल तरच चैतन्य असतें. त्याच्या अभावीं नसतें, रूपादिकांप्रमाणें, अशा अनुमानाच्या आश्रयानें म्हणतात-) कार्यकरणसंघाताचा भाव—विद्यमानता--असला तर चैतन्य-ज्योतीचा भाव असतो,(त्याच्या अभावीं चैतन्याचाही अभाव होतो, ) त्यामुळें चैतन्यज्योतीला संघातधर्मत्व आहे, म्ह० चैतन्य ज्योति हा शरीरेंद्रिय-संघाताचा धर्म आहे असें अनुमान होतें. ('आत्मज्योति संघाताहून भिन्न आहे. कारण ती त्याला प्रकाशित करते; आदित्याप्रमाणें, या अनुमानावरून चैतन्य हा संघाताचा धर्म आहे, असें ठरत नाहीं,' म्हणून म्हणाल तर सांगतों–) सामान्यतो

दृष्ट अनुमानाला व्यभिचारित्व असल्यामुळें तें अप्रमाण आहे–त्या अनुमानाला प्रामाण्य नाहीं. ( लोकायताच्या मतीं देहाला प्रकाशित करणारेंही चक्षुरिंद्रिय ह्या देहाहून भिन्न नाहीं. म्हणून सिद्धान्त्याच्या अनुमानाला तो अप्रमाण म्हणत आहे. मी मनुष्य आहें, मी जाणतों, इत्यादि प्रत्यक्षाशींही विरोध येत असल्यामुळें तुझें अनुमान अप्रमाण आहे, असें पुनः लोकायत ह्मणतो– ) आपण वेदान्ती सामान्यतो दृष्ट अनुमानाच्या बळानेंच आत्मज्योति आदित्यादिकांप्रमाणें शरीरेंद्रियांहून व्यतिरिक्त आहे, असें सिद्ध करीत आहां. पण कोणतेंही प्रत्यक्ष अनुमानानें बाधित होणें शक्य नाहीं. हाच कार्यकरणसंघात प्रत्यक्ष पाहतो, ऐकतो, मनन करतो व जाणतो. ( अर्थात् चैतन्य हा देहाचाच धर्म आहे. आतां आत्मज्योति देहाहून व्यतिरिक्त आहे, असा अंगीकार करूनही त्यावर दूषण देतात–) जर या शरीरेंद्रियसंघातावर उपकार करणारी ज्योति आदित्यादिकांप्रमाणें त्याहून निराळी असेल तर ती आत्मा असणार नाहीं. तर आदित्यादिकांप्रमाणेंच दुसरी ज्योति असेल. ( वरील ज्योति अनात्मा आहे, देहोपकारक असल्यामुळें; आदित्याप्रमाणें, असा भावार्थ. तर मग आत्मत्व कोणाला ? अशी आशंका घेऊन लोकायत सांगतात–) जो दर्शनादि क्रिया प्रत्यक्ष करतो तोच शरीरेंद्रियसंघात आत्मा आहे. त्याहून निराळा आत्मा नाहीं. ( वर तुम्ही अनुमानानें आत्मा देहादिव्यतिरिक्त आहे, असें ठरविलें आहे, हें खरें;) पण प्रत्यक्षाशीं विरोध आला असतां अनुमानाला अप्रामाण्य येतें. ( यास्तव आत्मा देहाहून अन्य नाहीं, असा वरील ' नान्यः ' या भाष्याशीं संबंध).

नन्वयमेव चेद्दर्शनादिक्रियाकर्ताऽऽत्मा संघातः कथमविकलस्यैवास्य दर्शनादिक्रियाकर्तृत्वं कदाचिद्भवति कदाचिन्नेति । नैष दोषो दृष्टत्वात् । न हि दृष्टेऽनुपपन्नं नाम । न हि खद्योते प्रकाशाप्रकाशकत्वेन दृश्यमाने कारणान्तरमनुमेयम् । अनुमेयत्वे च केनचित्सामा-

न्यात्सर्वं सर्वत्रानुमेयं स्यात्। तच्चानिष्टम्। न च पदार्थस्वभावो नास्ति न ह्यग्नेरुष्णस्वाभाव्यमन्यनिमित्तमुदकस्य वा शैत्यम्॥ प्राणिधर्माधर्माद्यपेक्षमिति चेत्। धर्माधर्मादेर्निमित्तान्तरापेक्षस्वभावप्रसङ्गः। अस्त्विति चेन्न। तदनवस्थाप्रसङ्गः। स चानिष्टः॥

भाष्यार्थ—( देहच जर आत्मा असेल तर त्याचें द्रष्टृत्व, श्रोतृत्व केव्हां केव्हां प्रतीत न होतां नेहमीं प्रतीत व्हावयास पाहिजे; अशी शंका घेतात--) अहोपण हाच संघात जर दर्शनादि क्रिया करणारा आत्मा असेल तर अविकल असलेल्याच याचें दर्शनादिक्रियाकर्तृत्व कदाचित् होतें व कदाचित् नाहीं, हें कसें ? ( स्वभाववादी या शंकेचा परिहार करतो--) हा कांहीं दोष येत नाहीं. कारण तसा अनुभवच येतो आणि साक्षात् अनुभवच आल्यावर अनुपपन्न ह्मणतांच येत नाहीं. ( केव्हां केव्हां दर्शन व केव्हां केव्हां अदर्शन हीं दोन्हीं देहस्वभावामुळें संभवतात, याविषयीं दृष्टान्त सांगतात- ) काजवा जर प्रकाश करणारा व अप्रकाश करणारा अशा रीतीनें अनुभवास येत आहे तर त्यासाठीं दुसऱ्या कारणाचें अनुमान करावें लागत नाहीं आणि सामान्यतःच जर तें कोणाला अनुमेय वाटत असेल तर सर्वच सर्वत्र अनुमेय होईल. [ म्ह. काजव्याचें चमकणें दुसऱ्या कारणामुळें आहे. कारण तें कदाचित् होतें. घटाप्रमाणें, असें 'कादाचित्क' या सामान्य हेतूवरून जर त्याला कोणी कारणपूर्वक ठरवूं लागलें तर अग्नि उष्ण आहे, त्याप्रमाणेंच उदक उष्ण आहे, कारण तें द्रव्य आहे; असेंही अनुमानानें ठरूं लागेल ! व त्यामुळें अतिप्रसंग होईल. म्ह० अनुमानानें पाहिजे तें सिद्ध होऊं लागेल.] पण तें अनिष्ट आहे. ('जें जें कांहीं होतें तें तें सर्व निमित्तामुळेंच होतें. निमित्तावाचून केवळ स्वाभाविकपणेंच कांहीं होत नाहीं,' म्हणून म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण ) पदार्थाचा विशिष्ट स्वभाव नसतो असें म्हणतां येत नाहीं. अग्नीचा उष्णत्व हा स्वभाव, किंवा उदकाचा शैत्य हा स्वभाव दुसऱ्या निमित्तामुळें आहे, असें ह्मणतां येत नाहीं.

('अहोपण अग्नीचें औष्ण्य, उदकाचें शैत्य इत्यादिकही निर्निमित्त नाहीं तर त्यांनाही प्राण्यांच्या अदृष्टाची अपेक्षा असते,' अशी आशंका घेऊन सांगतात-) अग्न्यादिकांचे औष्ण्यादिक स्वभावही प्राण्यांचा धर्म व अधर्म यांच्या अपेक्षेनें असतात, म्हणून ह्मणाल तर धर्माधर्मादिकांचाही दुसऱ्या निमित्ताची अपेक्षा करणें हा स्वभाव आहे, असें मानण्याचा प्रसंग येतो. 'धर्मादिकांना दुसऱ्या निमित्ताची अपेक्षा असूं दे.' ह्मणून ह्मणाल तर तें बरोबर नाहीं. कारणें धर्मादिकांचें अन्य निमित्त मानलें कीं पुनः त्याचें निमित्त, पुनः त्याचें निमित्त याप्रमाणें अनवस्था प्रसंग येतो; व तो तर अनिष्ट आहे.

न । स्वप्नस्मृत्योर्दृष्टस्यैव दर्शनात् । यदुक्तं स्वभाववादिना देहस्यैव दर्शनादिक्रिया न व्यतिरिक्तस्येति तन्न । यदि हि देहस्यैव दर्शनादिक्रिया स्वप्ने दृष्टस्यैव दर्शनं न स्यात् । अन्धः स्वप्नं पश्यन्दृष्टपूर्वमेव पश्यति न शाकद्वीपादिगतमदृष्टरूपम् । ततश्चैतत्सिद्धं भवति यः स्वप्ने पश्यति दृष्टपूर्वं वस्तु स एव पूर्वं विद्यमाने चक्षुष्यद्राक्षीन्न देह इति । देहश्चेद्द्रष्टा स येनाद्राक्षीत्तस्मिन्नुद्धृते चक्षुषि स्वप्ने तदेव दृष्टपूर्वं न पश्येत् । अस्ति च लोके प्रसिद्धिः पूर्वं दृष्टं मया हिमवतः शृंगमद्याहं स्वप्नेऽद्राक्षमित्युद्धृतचक्षुषामन्धानामपि । तस्मादनुद्धृतेऽपि चक्षुषि यः स्वप्नदृक्स एव द्रष्टा न देह इत्यवगम्यते ॥

भाष्यार्थ—( आत्मा देहादिकांहून भिन्न आहे, असें मानल्यावाचून स्वप्नादिकांची सिद्धि होत नाहीं, अशा आशयानें सिद्धान्ती उत्तर देतात--) हें तुमचें म्हणणें बरोबर नाहीं. कारण स्वप्न व स्मृति या काळीं पूर्वी जें पाहिलें असेल--अनुभविलें असेल त्याचेंच दर्शन होतें. ( वरील नञर्थच व्यक्त करितात--) स्वभाववाद्यानें दर्शनादि क्रिया देहाचीच आहे त्याहून व्यतिरिक्त असलेल्या दुसऱ्या कोणाची नाहीं, असें

१ स्वभाववादी हें वाक्य गूढ अभिप्रायानें उच्चारीत आहे. २ वरील गूढ अभिप्रायच व्यक्त करितात.

जें म्हटलें आहे तें बरोबर नाहीं. ( स्वप्नांत अनुभविलेल्याचाच अनुभव येतो, या वरील हेतुभागाचें व्यतिरेकद्वारा विवरण करितात--) कारण देहाचीच जर दर्शनादि क्रिया असती तर स्वप्नांत पूर्वी पाहिलेल्याचेंच दर्शन झालें नसतें. ( जागरितावस्थेंतील अनुभव घेणाऱ्या जाग्रद्देहाचा स्वप्नांत बाध झालेला असतो. संस्कार अतींद्रिय असतात, असें मानतां येत नाहीं, एकानें पाहिलेल्याचें दुसऱ्याला स्वप्न पडणें शक्य नाहीं, त्यामुळें देहात्मवादांत पाहिलेल्याचेंच पाहणें संभवत नाहीं, असा भावार्थ. 'अहोपण आंधळाही स्वप्न पाहतो. तेव्हां पूर्वी पाहिलेल्याचेंच स्वप्न पडतें, असें म्हणतां येत नाहीं,' अशी आशंका घेऊन सांगतात--) आंधळाही स्वप्न पहात असतांना दृष्टपूर्वच स्वप्न पाहतो; शाकद्वीपादि दूर प्रदेशांतील व अदृष्टरूप असें तो कांहीं पहात नाहीं. ( स्वप्नांत पूर्वी पाहिलेलेंच जरी तो पहात असला तरी त्यावरून द्रष्टा देहाहून निराळा आहे, हें कसें सिद्ध होतें ? तें सांगतात--) त्यावरून ही गोष्ट सिद्ध होते कीं, जो पूर्वी पाहिलेलीच वस्तु स्वप्नांत पाहतो त्यानेंच पूर्वी चक्षु विद्यमान असतां ती पाहिली; देहानें नव्हे. ('अहो पण पूर्वी व आतां स्वप्नांत अशा दोन्ही अवस्थेंत देहच द्रष्टा आहे, असें मानल्यास कोणती हानि आहे ?' तें सांगतात--) देहच जर द्रष्टा असेल तर त्यानें ज्या चक्षूनें पाहिलें तो चक्षू उपटून काढला असतां स्वप्नांत तीच पूर्वी पाहिलेली वस्तु पाहणार नाहीं. ( कारण स्वप्नांत सहकारी चक्षूचा अभाव असतो; तेथें नवीनच दुसरा चक्षु उत्पन्न होतो असें म्हटल्यास त्याच न्यायानें दुसरा देहही उत्पन्न होण्याचा संभव असतो. त्यामुळें एकानें पाहिलेल्या गोष्टीचें स्वप्न दुसऱ्याला पडणें शक्य नाहीं, असा भावार्थ. 'पूर्वी पाहिलेल्या वस्तूचेंच स्वप्न पडतें, असें मानूं नये, म्हणजे झालें,' म्हणून म्हणाल तर--) लोकांमध्यें तर अशी प्रसिद्धि आहे—ज्यांचे नेत्र उपटून काढले आहेत अशा अंधांनाही ' मी पूर्वी पाहिलेलें हिमालयाचें शृंग आज स्वप्नांत पाहिलें ' असें वाटतें. ('तर मग जन्मांधांना अशाच प्रकारचें स्वप्नदर्शन कसें होतें,' म्हणून विचा-

राल तर पूर्व जन्मांतील अनुभवामुळें, असें आम्ही सांगूं. असो;) तस्मात् चक्षु काढलेला नसतांनाही जो स्वप्न पाहणारा तोच द्रष्टा होय देह नव्हे, असें ज्ञात होतें.

तथा स्मृतौ द्रष्टृस्मर्त्रोरेकत्वे सति य एव द्रष्टा स एव स्मर्ता। यदा चैवं तदा निमीलिताक्षोऽपि स्मरन्दृष्टपूर्वं यद्रूपं तद्दृष्टवदेव पश्यतीति। तस्माद्यन्निमीलितं तन्न द्रष्टृ यन्निमीलिते चक्षुषि स्मरद्रूपं पश्यति तदेवानिमीलितेऽपि चक्षुषि द्रष्ट्रासीदित्यवगम्यते ॥

भाष्यार्थ—( आतां स्मृतींतही पूर्वीं पाहिलेल्याचेंच स्मरण होतें, हा वरील हेतूंतील भाग वर्णितात--) त्याचप्रमाणें स्मरणांत. द्रष्टा व स्मर्ता यांचें एकत्व सिद्ध झालें असतां जो द्रष्टा तोच स्मरण करणारा, असेंही ठरतें. ( पण द्रष्टा व स्मरणकर्ता यांचें एकत्व जरी असलें तरी द्रष्टा देहातिरिक्त आहे, हें कसें ठरतें? अशी आशंका घेऊन सांगतात-) आणि असें जेव्हां आहे तेव्हां ज्यानें नेत्र मिटले आहेत असाही एकादा स्मरण करणारा पूर्वीं पाहिलेलें जें रूप तें पाहिलेल्याप्रमाणेंच पाहतो. तस्मात् जें मिटलेलें [नेत्र] तो द्रष्टा नव्हे. जें चैतन्य नेत्र मिटले असतांही स्मृतरूप पाहतें तेंच ते मिटलेले नसतांही द्रष्टा होतें, असें अवगत होतें. ( याप्रमाणें द्रष्टा व स्मर्ता यांचें एकत्व सांगितलें असल्यामुळें स्मर्ता जर देहातिरिक्त असेल तर द्रष्टाही तसाच असला पाहिजे हें सिद्ध होतें, असा भाव. )

मृते च देहेऽविकलस्यैव च रूपादिदर्शनाभावात्। देहस्यैव द्रष्टृत्वे मृतेऽपि दर्शनादिक्रिया स्यात्। तस्माद्यदपाये देहे दर्शनं न भवति यद्भावे च भवति तद्दर्शनादिक्रियाकर्तृ न देह इत्यवगम्यते ॥

भाष्यार्थ—( देह द्रष्टा नव्हे, याविषयीं आणखी एक हेतु सांगतात--) देह मृत झाल्यावर तो जशाचा तसाच--अविकल--असतांनाही रूपादि पाहूं शकत नाहीं. ( त्यामुळें त्याला द्रष्टृत्व नाहीं. ) देहालाच जर द्रष्टृत्व असतें तर तो मेल्यावरही दर्शनादि क्रिया करता. ( याप्र-

माणें देहातिरिक्त आत्म्याचें उपपादन करून उपसंहार करितात--) तस्मात् ज्या चैतन्याला अपाय झाला असतां देहांत दर्शन ही क्रिया होत नाहीं व जें (चैतन्य) विद्यमान असतां दर्शन होतें तें दर्शनादिक्रियांचें कर्तृ आहे; देह नव्हे, असें अवगत होतें.

चक्षुरादीन्येव दर्शनादिक्रियाकर्तॄणीति चेत् । न । यदहमद्राक्षं तत्स्पृशामीति भिन्नकर्तृकत्वे प्रतिसंधानानुपपत्तेः ॥ मनस्तर्हीति चेत् । न । मनसोऽपि विषयत्वाद्रूपादिवद्द्रष्टृत्वाद्यनुपपत्तिः । तस्मादन्तःस्थं व्यतिरिक्तमादित्यादिवदिति सिद्धम् ॥

भाष्यार्थ—('देहाला जरी वरील कारणास्तव आत्मत्व नसलें तरी इंद्रियांना आत्मत्व असेल,' अशी आशंका घेतात--) चक्षुरादिक इंद्रियेंच दर्शनादि क्रिया करणारीं आहेत, असें म्हणाल तर (परिहार करितात-) तेंही बरोबर नाहीं. कारण ज्याला मीं पाहिलें त्यालाच स्पर्श करतों, असें जें प्रतिसंधान होतें तें दर्शन व स्पर्श यांचे कर्ते भिन्न असते तर झालें नसतें (कारण एकानें पाहिलेल्या वस्तूचें दुसऱ्याला स्मरण--किंवा प्रतिसंधान-- ओळखणें शक्य नसतें.)

'तर मग मन हा आत्मा आहे,' असें म्हणाल तर तेंही बरोबर नाहीं. कारण मनालाही विषयत्व असल्यामुळें रूपादिकांप्रमाणें त्याच्या द्रष्टृत्वाची अनुपपत्ति आहे. (कारण ज्ञात्याला ज्ञानाच्या साधनाची अपेक्षा असते. असो; याप्रमाणें देह, इंद्रियें व मन यांचें अनात्मत्व सिद्ध झालें असतां फलित सांगतात—) तस्मात् अन्तःस्थ आत्मज्योति आदित्यादिकांप्रमाणें देहादिकांहून व्यतिरिक्त आहे, हें सिद्ध झालें.

यदुक्तं कार्यकरणसंघातसमानजातीयमेव ज्योतिरन्तरमनुमेयम् । आदित्यादिभिस्तत्समानजातीयैरेवोपक्रियमाणत्वादिति । तदसत् । उपकार्योपकारकभावस्यानियमदर्शनात् । कथं पार्थिवैरिन्धनैः पार्थिवत्वसमानजातीयैस्तृणोलपादिभिरग्नेः प्रज्वलनोपकारः क्रियमाणो दृश्य-

ते । न च तावता तत्समानजातीयैरेवाग्नेः प्रज्वलनोपकारः सर्वत्रानुमेयः स्यात् । येनोदकेनापि प्रज्वलनोपकारो भिन्नजातीयेन वैद्युतस्याग्नेर्जाठरस्य च क्रियमाणो दृश्यते । तस्मादुपकार्योपकारकभावे समानजातीयासमानजातीयनियमो नास्ति ॥

भाष्यार्थ—आतां आंतील ज्योति कार्यकरणसंघाताच्या समान जातीचीच आहे, असें अनुमान करावें; कारण आदित्यादि संघातसमानजातीय ज्योतींकडूनच संघातावर उपकार केले जातात, असें जें वर वाद्यानें म्हटलें होतें तें बरोबर नाहीं. कारण उपकार्य-उपकारकभावाचा असा नियम आढळत नाहीं. तो कसा? (तर पहा—) पार्थिवत्व या समान जातीच्या जून गवत, कोंवळें गवत इत्यादि पार्थिव इंधनांकडून अग्नीचा प्रज्वलनोपकार केला जातो असें दिसतें;पण तेवढ्यावरून त्याच्या समान जातीच्या पदार्थांकडूनच अग्नीचा प्रज्वलनोपकार सर्वत्र अनुमेय होत नाहीं; [ म्ह० तेवढ्यावरून अग्नीचें प्रत्येक प्रज्वलन पार्थिव पदार्थांकडूनच होतें, असें अनुमान करितां येत नाहीं.] कारण वैद्युत अग्नि व जाठर अग्नि यांच्यावर भिन्न जातीय उदकाकडूनही प्रज्वलनोपकार होत असल्याचें दिसतें. तस्मात् उपकार्य-उपकारकभावामध्यें समान जातीय व असमान जातीय हा नियम नाहीं. ( त्याचप्रमाणें अपकार्य-अपकारकभावालाही वैजात्यनियम नाहीं. म्ह० विजातीय पदार्थच परस्पर अपकार करूं शकतात, असेंही म्हणतां येत नाहीं. )

कदाचित्समानजातीया मनुष्या मनुष्यैरेवोपक्रियन्ते कदाचित्स्थावरपश्वादिभिश्च भिन्नजातीयैः । तस्मादहेतुः कार्यकरणसंघातसमानजातीयैरेवाऽऽदित्यादिज्योतिर्भिरुपक्रियमाणत्वादिति ॥

भाष्यार्थ—( दुसऱ्या उदाहरणानें ही गोष्ट सिद्ध करितात—) केव्हां केव्हां समान जातीचे मनुष्य मनुष्यांकडूनच उपकार केले जातात, केव्हां केव्हां स्थावर, पश्वादिक या भिन्न जातीयांकडूनही उपकृत होतात. (त्या-

चप्रमाणें अग्नीचा उपशम अग्नीनेंही होतो व उदक, धूळ इत्यादिकांक-डूनही होतो, असाही अनुभव येत असल्यामुळें अपकार्य अपकारक-भावालाही वैजात्यनियम लागू करतां येत नाहीं, अशा आशयानें उप-संहार करितात–) तस्मात् कार्यकरणसंघाताच्या समान जातीय अशा आदित्यादि ज्योतींकडून उपकार केला जात असल्यामुळें 'आत्मज्योति संघाताच्या समान जातीची आहे,'याविषयीं हा हेतुच होऊं शकत नाहीं. ( अर्थात् अनुग्राहक अनुग्राह्याच्या समान जातीचें असतें, अनुग्राहक-त्वामुळें, आदित्याप्रमाणें, ह्या अनुमानाचें निरसन झालें. )

यत्पुनरात्थ चक्षुरादिभिरादित्यादिज्योतिर्वद्दृश्यत्वादित्ययं हेतु-र्ज्योतिरन्तरस्यान्तःस्थत्वं वैलक्षण्यं च न साधयति । चक्षुरादिभिरनै-कान्तिकत्वादिति । तदसत् । चक्षुरादिकरणेभ्योऽन्यत्वे सतीति हेतो-र्विशेषणत्वोपपत्तेः ॥

भाष्यार्थ—( आतां आत्म्याच्या अन्तःस्थत्वाविषयीं सिद्धान्त्यांनीं ' अतींद्रियत्व ' हा जो हेतु दिला होता, तो व्यभिचारी आहे असें वा-द्यानें वर म्हटलें आहे. त्या वाद्याच्या म्हणण्याचा अनुवाद करून त्या-वर दोष देतात–) आतां आदित्यादिकांप्रमाणें आत्मज्योति चक्षुरादिकां-नीं दिसत नाहीं, म्हणून ती आत्मज्योति अन्तःस्थ आहे व देहादिकां-हून विलक्षण आहे,असा जो हेतु तुम्ही दिला होता तो हेतु आत्मज्योतीचें अन्तःस्थत्व व वैलक्षण्य सिद्ध करीत नाहीं, कारण चक्षुरादिकांशीं त्याचा व्यभिचार होतो ( असें जें तुम्ही–वादी–म्हणतां) तें खोटें आहे. कारण 'चक्षुरादि इंद्रियांहून अन्य असून' असें ती ज्योति चक्षुरादिकांनीं दिसत नाहीं, या हेतूला विशेषण लावतां येतें; व तें लावलें असतां वरील व्यभिचाराची शंका रहात नाहीं.

कार्यकरणसंघातधर्मत्वं ज्योतिष इति यदुक्तं तन्न । अनुमानविरो-धात् । आदित्यादिज्योतिर्वत्कार्यकरणसंघातादर्थान्तरं ज्योतिरिति ह्यनु-

मानमुक्तं तेन विरुध्यत इयं प्रतिज्ञा कार्यकरणसंघातधर्मत्वं ज्योतिष इति । तद्भावभावित्वं त्वसिद्धं मृते देहे ज्योतिषोऽदर्शनात् ॥

भाष्यार्थ—('आत्मज्योति हा संघाताचा धर्म आहे, कारण संघात जेव्हां विद्यमान असतो तेव्हांच त्या ज्योतीची उपलब्धि होते. देहाच्या रूपादि धर्मांप्रमाणें, असें जें वाद्यानें अनुमान रचलें होतें त्याचा अनुवाद करून निराकरण करितात--) त्या ज्योतीला कार्यकरणसंघात-धर्मत्व आहे, असें जें वर म्हटलें आहे तें बरोबर नाहीं. कारण त्याच्यावर अनुमानविरोध हा दोष येतो. ( अनुमानविरोधच दाखवितात--) आदित्यादि ज्योतीप्रमाणें कार्यकरणसंघाताहून आत्मज्योति हा निराळा पदार्थ आहे, असें अनुमान वर सांगितलें आहे, त्याच्याशीं 'या ज्योतीला कार्यकरणसंघातधर्मत्व आहे' ही प्रतिज्ञा विरुद्ध आहे. तद्भावभावित्व [म्ह० तो देह असेपर्यंतच चैतन्य असतें,] हा तुमच्या अनुमानांतील हेतु असिद्ध आहे. कारण देह मेल्यावर तो अविकल असतांनाच चैतन्यज्योतीचें अदर्शन होतें.

सामान्यतो दृष्टस्यानुमानस्याप्रामाण्ये सति पानभोजनादिसर्वव्यवहारलोपप्रसङ्गः । स चानिष्टः । पानभोजनादिषु हि क्षुत्पिपासादिनिवृत्तिमुपलब्धवतस्तत्सामान्यात्पानभोजनाद्युपादानं दृश्यमानं लोके न प्राप्नोति । दृश्यन्ते ह्युपलब्धपानभोजनाः सामान्यतः पुनः पानभोजनान्तरैः क्षुत्पिपासादिनिवृत्तिमनुमिन्वन्तस्तादर्थ्येन प्रवर्तमानाः ॥

भाष्यार्थ—('सामान्यतो दृष्ट अनुमान अप्रमाण असतें,' म्हणून जें वर वाद्यानें म्हटलें आहे त्यावर दूषण देतात -) सामान्यतो दृष्ट अनुमानाला जर अप्रामाण्य मानलें तर पान-भोजन इत्यादि सर्व व्यवहाराचा लोप होण्याचा प्रसंग येतो. पण तो तर अनिष्ट आहे. कारण पान भोजनादिकांमध्यें क्षुधा इत्यादिकांचीं निवृत्ति अनुभविणारा पानत्व-भोजनत्वादि सादृश्यावरूनच पान, भोजन इत्यादिकांचें उपादान—ग्रहण करीत असल्याचा जो प्रत्यय येतो तो असिद्ध ठरतो. ( पाणी प्यालें असतां

तहान शांत होते व अन्न खाल्लें असतां क्षुधा शांत होते असा ज्याला अनुभव आला आहे तो पूर्वीसारखेंच हेंही पेय द्रव्य आहे व हेंही भोज्य अन्न आहे, असें समजून तृषा व क्षुधा यांच्या निवृत्त्यर्थ यांचें पुनः ग्रहण करतो, असें आपण पाहतों. पण सामान्यतो दृष्ट अनुमान जर अप्रमाणच मानलें तर त्याचें तें अन्न-पानांचें ग्रहण उपपन्न होत नाहीं. ) पण ज्यांनीं पान व भोजन यांचा अनुभव घेतलेला आहे ते पुनः त्यांच्या सादृश्यावरून दुसऱ्या पान-भोजनांनीं तृषेची व क्षुधेची निवृत्ति होते असें अनुमान करितात व क्षुत्पिपासेच्या निवृत्तीचा उपाय असें जें भोजन व जलादिकांचें पान त्यासाठीं प्रवृत्त होतात असें दिसतें.

यदुक्तमयमेव तु देहो दर्शनादिक्रियाकर्तेति तत्प्रथममेव परिहृतं स्वप्नस्मृत्योर्देहादर्थान्तरभूतो द्रष्टेति । अनेनैव ज्योतिरन्तरस्यानात्मत्वमपि प्रत्युक्तम् ॥

भाष्यार्थ—( देहच द्रष्टा आहे, असें जें वाद्याचें म्हणणें होतें त्याचा अनुवाद करून त्याच्या पूर्वोक्त परिहाराचेंच स्मरण देतात–) हाच देह दर्शनादि क्रिया करणारा आहे, असें जें म्हटलें होतें त्याचा परिहार–'स्वप्न व स्मृति या काळीं देहाहून निराळा द्रष्टा असतो,' असें सांगून–पूर्वींच केला आहे. संघाताच्या द्रष्टृत्वाचें निराकरण करून त्याच्या योगानेंच ' देहांतील ज्योति आदित्यादिकांप्रमाणें अनात्मा आहे ' असें जें वाद्याचें म्हणणें होतें त्याचेंही निराकरण केलें आहे.

यत्पुनः खद्योतादेः कादाचित्कं प्रकाशाप्रकाशकत्वं तदसत् । पक्षाद्यवयवसंकोचविकासनिमित्तत्वात्प्रकाशाप्रकाशकत्वस्य ॥ यत्पुनरुक्तं धर्माधर्मयोरवश्यं फलदातृत्वं स्वभावोऽभ्युपगन्तव्य इति । तदभ्युपगमे भवतः सिद्धान्तहानात् । एतेनानवस्थादोषः प्रत्युक्तः । तस्मादस्ति व्यतिरिक्तं चान्तःस्थं ज्योतिरात्मेति ॥ ६ ॥

५

भाष्यार्थ—( देहाचें केव्हां केव्हां दर्शनादिमत्त्व स्वाभाविक आहे, याविषयीं बाधानें दिलेल्या दृष्टान्ताचा अनुवाद करून त्याचें निराकरण करितात-) आतां काजव्याला केव्हां केव्हां प्रकाशकत्व असतें व केव्हां अप्रकाशकत्व असतें, असें जें म्हटलें आहे तें असत् आहे. कारण पंखादि अवयवांचा संकोच व विकास करणें या निमित्तामुळें त्याचें प्रकाशकत्व व अप्रकाशकत्व आहे.

( आतां सिद्धान्त्यांनाही क्वचित् स्वभाववादाचा अंगीकार करावा लागतो, असें जें बाधानें म्हटलें होतें त्याचा अनुवाद करून त्यावर दूषण देतात-) आतां धर्म व अधर्म यांचा ' अवश्य फलदातृत्व ' हा स्वभाव मानावा लागतो, असें जें म्हटलें आहे तें बरोबर नाहीं. कारण त्याचा स्वीकार केल्यास तुमच्या सिद्धान्ताची हानि होते. ( धर्मादिकांचें फलदातृत्व जर दुसऱ्या हेतूच्या अधीन असेल तर त्या दुसऱ्या हेतूचें फलदातृत्वही तिसऱ्या हेतूच्या अधीन, अशी अनवस्था येते, म्हणून जें म्हटलें होतें ) त्या अनवस्था दोषाचेंही या-सिद्धान्तविरोध येतो असें-दाखविण्यानें निराकरण केलें आहे.—(याप्रमाणें लोकायतमताचा असंभव ठरला असतां आपल्या पक्षाचा उपसंहार करितात-) तस्मात् व्यतिरिक्त व अन्तःस्थ ज्योति आत्मा आहे. ६

**कतम आत्मेति योऽयं विज्ञानमयः प्राणेषु हृद्यन्तर्ज्योतिः पुरुषः । स समानः सन्नुभौ लोकावनुसंचरति ध्यायतीव लेलायतीव स हि स्वप्नो भूत्वेमं लोकमतिक्रामति मृत्यो रूपाणि ॥ ७ ॥**

अर्थ—आत्मा कोणता ? तर जो तूं विचारलास तो हा प्राणांतील, विज्ञानमय बुद्धिवृत्तीच्याही आंत असणारा, ज्योतिःस्वरूप पूर्ण आत्मा

आहे. तो सदृश होऊन--बुद्ध्यादिकांच्या आकाराचा होऊन-हा लोक व परलोक यांतून संचार करतो. तो बुद्धि चिंतन करूं लागली असतां जणुं काय चिंतन करतो. प्राण चलन करूं लागला असतां तो चलनसें करतो. कारण तोच स्वप्न होऊन या शरीरेंद्रियसंघाताचें अतिक्रमण करतो--शरीर व इंद्रियें या मृत्यूच्या रूपांचें अतिक्रमण करतो ७.

यद्यपि व्यतिरिक्तत्वादि सिद्धं तथाऽपि समानजातीयानुग्राहकत्व-दर्शननिमित्तभ्रान्त्या करणानामेवान्यतमो व्यतिरिक्तो वेत्यविवेकतः पृच्छति कतम इति । न्यायसूक्ष्मताया दुर्विज्ञेयत्वादुपपद्यते भ्रान्तिः॥

भाष्यार्थ—( आत्मज्योति संघाताहून व्यतिरिक्त आहे व अन्तःस्थ आहे, हें सिद्ध केलें. आतां पुनः 'तो आत्मा कोणता ?' असें कसें विचारलें जात आहे ? तें सांगतात—) आत्मा देहाहून व्यतिरिक्त आहे, इत्यादि जरी सिद्ध झालें तरी देहादि अनुग्राह्यांवर त्याच्याच जातीच्या आदित्यादिकांचा अनुग्रह होतो असें दिसतें, त्या निमित्तानें आत्मज्योतिही आदित्यादिकांसारखीच अनुग्राहक असल्यामुळें देहादिकांच्या जातीचीच आहे अशी भ्रांति होते. त्या भ्रांतीनें आत्मा अनेक इंद्रियांतीलच एक आहे कीं त्यांहून व्यतिरिक्त आहे, या गोष्टीचा विवेक होत नाहीं. त्या अविवेकामुळें 'आत्मा कोणता ?' असें जनक विचारीत आहे. ( कारण अविवेक्याला निर्दोष दृष्टि नसते. 'अहोपण आत्मा इंद्रियांहूनहीं भिन्न आहे, अशा विषयीं न्याय दाखविला असल्यामुळें भ्रांतीचा संभवच कोठें आहे ?' अशी आशंका घेऊन सांगतात—) न्यायाची सूक्ष्मता दुर्विज्ञेय असल्यामुळें भ्रांति होणें शक्य आहे.

अथवा शरीरव्यतिरिक्ते सिद्धेऽपि करणानि सर्वाणि विज्ञानवन्तीव । विवेकत आत्मनोऽनुपलब्धत्वात् । अतोऽहं पृच्छामि कतम आत्मेति ॥

भाष्यार्थ—( 'कतम आत्मा' हा प्रश्न भ्रांतीमुळें झालेल्या अविवेकानें केला आहे, असें सांगून दुसऱ्या प्रकारानें प्रश्नाला उत्थापित

करितात--) अथवा आत्मा शरीराहून व्यतिरिक्त आहे, असें जरी सिद्ध झालें तरी सर्व इंद्रियें जणुं काय विज्ञानानें युक्त असल्यासारखीं आहेत. कारण आत्मा त्यांहून पृथक् असल्याचा अनुभव येत नाहीं. म्हणून मी विचारतों कीं ' आत्मा कोणता ? '

कतमोऽसौ देहेन्द्रियप्राणमनःसु यस्त्वयोक्त आत्मा । येन ज्योतिषाऽऽस्त इत्युक्तम् । अथवा योऽयमात्मा त्वयाऽभिप्रेतो विज्ञानमयः । सर्वे इमे प्राणा विज्ञानमया इवैषु प्राणेषु कतमः । यथा समुदितेषु ब्राह्मणेषु सर्वे इमे तेजस्विनः कतम एषु षडङ्गविदिति ॥

भाष्यार्थ---( प्रश्नांतील अक्षरांचें व्याख्यान करितात--) ' कतमः आत्मा ' जो तूं सांगितलेला आत्मा तो देह, इंद्रियें, प्राण व मन यांतील कोणता ? कीं 'ज्या ज्योतीनें पुरुष बसतो ' इत्यादि वर सांगितलें आहे. ( दुसऱ्या प्रकारें प्रश्नाचें व्याख्यान करितात--) अथवा जो हा आत्मा तुला विज्ञानमय म्हणून अभिप्रेत आहे तो या प्राणांतील कोणता ? कारण हे सर्व वागादि प्राणही विज्ञानमय असल्यासारखे भासतात. ( हाच अर्थ दृष्टान्तानें बुद्धीवर आरूढ करितात--) जसें--येथें जमलेल्या ब्राह्मणांतील हे सर्वच तेजस्वी दिसतात. यांतील षडङ्गवेत्ता कोणता ?

पूर्वस्मिन्व्याख्याने कतम आत्मेत्येतावदेव प्रश्नवाक्यं योऽयं विज्ञानमय इति प्रतिवचनम् । द्वितीये तु व्याख्याने प्राणेष्वित्येवमन्तं प्रश्नवाक्यम् ॥

भाष्यार्थ---( या दोन व्याख्यानांतील अन्तर सांगतात--) पहिल्या व्याख्यानांत ' कतमः आत्मा ' एवढेंच प्रश्नवाक्य असून ' योऽयं विज्ञा-

---

मीं 'ज्योतीच्या निमित्तानें व्यवहार होतो, असें सांगितलें; आत्मा कांहीं सांगितला नाहीं,' अशी आशंका घेऊन ' आत्मना एव अयं ज्योतिषा आस्ते ' असें म्हटलेलें असल्यामुळें आसनादि व्यवहाराचें निमित्त असणारी जी ज्योति तो आत्माच, असें येथें म्हटलें आहे.

नमयः ' हें प्रतिवचन आहे; आणि दुसऱ्या व्याख्यानांत ' कतम आत्मा योऽयं विज्ञानमयः प्राणेषु ' येथपर्यंत सर्व प्रश्नवाक्यच आहे.

अथवा सर्वमेव प्रश्नवाक्यं विज्ञानमयो हृद्यन्तर्ज्योतिः पुरुषः कतम इत्येतदन्तम् ॥

भाष्यार्थ---( याचाच आणखीं एक पक्ष सांगतात- ) किंवा 'विज्ञानमयो हृद्यन्तर्ज्योतिः पुरुषः कतमः ' येथपर्यंत सर्वच प्रश्नवाक्य आहे. ( व ' स समानः सन्नुभौ लोकावनुसंचरति ' हें प्रतिवचन आहे. )

योऽयं विज्ञानमय इत्येतस्य शब्दस्य निर्धारितार्थविशेषविषयत्वं कतम आत्मेतीतिशब्दस्य प्रश्नवाक्यपरिसमाप्त्यर्थत्वं व्यवहितसंबन्धमन्तरेण युक्तमिति कृत्वा कतम आत्मेत्येवमन्तमेव प्रश्नवाक्यं योऽयमित्यादि परं सर्वमेव प्रतिवचनमिति निश्चीयते ॥

भाष्यार्थ---(या तीन पक्षांतील दुसऱ्या व तिसऱ्या पक्षाविषयीं अरुचि दाखवून पहिल्या पक्षाचा अंगीकार करितात-) निश्चित केलेला विशेष अर्थ हा ' योऽयं विज्ञानमयः ' या शब्दाचा विषय आहे. ( ' जो तूं विचारलास तो हा' असा निर्देश आत्मा चिद्रूप असल्यामुळें संभवतो. असा निर्देश हाच ' योऽयं ' या पदांचा अर्थ आहे. )' कतम आत्मा इति ' येथील इतिशब्द प्रश्नरूप वाक्याच्या परिसमाप्तीकरितां आहे, असें व्यवहितसंबंधावाचूनच[. म्हणजे तो शब्द ' विज्ञानमय-' शब्दाच्या पुढें अथवा 'पुरुषः' या शब्दाच्या पुढें जोडल्यावाचूनच] मानणें युक्त आहे. यास्तव ' कतम आत्मा इति ' येथवरच प्रश्नवचन आहे व ' योऽयं०' इत्यादि पुढील सर्वच प्रतिवचन आहे, असा निश्चय केला जातो.

योऽयमित्यात्मनः प्रत्यक्षत्वान्निर्देशः । विज्ञानमयो विज्ञानप्रायो बुद्धिविज्ञानोपाधिसंपर्काविवेकाद्विज्ञानमय इत्युच्यते । बुद्धिविज्ञानसंपृक्त एव हि यस्मादुपलभ्यते राहुरिव चन्द्रादित्यसंपृक्तः ॥

भाष्यार्थ---आत्मा प्रत्यक्ष असल्यामुळें ' यः अयं ' ' जो तूं विचारलास तो हा ' असा निर्देश केला आहे. ( पण ' तो हा ' असें

म्हटल्यास देहालाच कोणी आत्मा समजेल यास्तव त्याला विशेषण लावतात–) 'विज्ञानमयः' विज्ञानप्राय. (विज्ञान शब्दाचा अर्थ सांगणारे आचार्य विज्ञानप्रायत्व प्रकट करितात–) बुद्धि हेंच विज्ञान. (ज्याच्या योगानें विशेषतः जाणलें जातें तें विज्ञान–बुद्धि.) त्या विज्ञानरूप उपाधीशीं संपर्क होणें हाच अविवेक; त्या अविवेकामुळें विज्ञानमय म्हणजे बुद्धिमय असें म्हटलें जातें. (विज्ञानसंपर्काविषयीं प्रमाण सांगतात–) चंद्र व आदित्य यांच्याशीं संपृक्त–संबद्ध झालेलाच राहु जसा उपलब्ध होतो, त्यावाचून राहूची उपलब्धि होत नाहीं त्याप्रमाणें आत्मा बुद्धिविज्ञानाशीं संबद्ध होऊनच ज्याअर्थीं उपलब्ध होतो (त्याअर्थीं तो विज्ञानमय आहे, असा शेष लावावा.)

बुद्धिर्हि सर्वार्थकरणं तमसीव प्रदीपः पुरोवस्थितः । मनसा ह्येव पश्यति मनसा शृणोतीति ुक्तम् । बुद्धिविज्ञानालोकविशिष्टमेव हि सर्वं विषयजातमुपलभ्यते पुरोवस्थितप्रदीपालोकविशिष्टमिव तमसि । द्वारमात्राणि त्वन्यानि करणानि बुद्धेः । तस्मात्तेनैव विशेष्यते विज्ञानमय इति ॥

भाष्यार्थ—('अहोपण चक्षुर्मय, श्रोत्रमय, इत्यादि सोडून विज्ञानमय असेंच कां म्हटलें?' तें सांगतात–) बुद्धि हें सर्व विषयांचें करण आहे. अंधकारांत पुढें असलेल्या प्रदीपाप्रमाणें. (बुद्धि सर्वसाधारण करण आहे याविषयीं प्रमाण सांगतात–) 'मनानेंच पहातो, मनानें ऐकतो' असें श्रुतींत सांगितलेंच आहे. बुद्धिस्थ विज्ञानरूप प्रकाशानें विशिष्ट असेंच सर्व विषयजात उपलब्ध होतें. अंधकारांत पुढें असलेल्या प्रदीपाच्या प्रकाशानें विशिष्ट असेच सर्व पदार्थ जसे दिसतात त्याप्रमाणें सर्व विषयजात बुद्धिविज्ञानप्रकाशाविशिष्ट असेंच उपलब्ध होतें. (तर मग चक्षुरादि इतर इंद्रियें कशासाठीं आहेत?) इतर करणें हीं बुद्धीचीं केवळ द्वारें आहेत. (याप्रमाणें बुद्धीचें प्राधान्य सिद्ध झालें असतां फलित सांगतात–) तस्मात् बुद्धीच्या प्राधान्यामुळेंच विज्ञानमय असें त्याला विशेषण दिलें आहे.

येषां परमात्मविज्ञप्तिविकार इति व्याख्यानं तेषां विज्ञानमयो मनोमय इत्यादौ विज्ञानमयशब्दस्यान्यार्थदर्शनादश्रौतार्थताऽवसीयते ॥ संदिग्धश्च पदार्थोऽन्यत्र निश्चितप्रयोगदर्शनान्निर्धारयितुं शक्यो वाक्यशेषात् । निश्चितन्यायबलाद्वा । सधीरिति चोत्तरत्र पाठात् । हृद्यन्तरिति वचनाद्युक्तं विज्ञानप्रायत्वमेव ॥

भाष्यार्थ—( विज्ञान म्ह० परब्रह्म. तेंच ज्याचीं प्रकृति आहे, असा जीव असल्यामुळें विज्ञानमय हा जीवच आहे, असें भर्तृप्रपंचांनीं सांगितलें आहे, त्याचा अनुवाद करितात—) परमात्म्याच्या विज्ञप्तीचा विकार असें ज्यांचें विज्ञानमयशब्दाचें व्याख्यान आहे ( त्यांनींच विज्ञानमयादि ग्रंथांत मयट् (मय) प्रत्ययाला विकारार्थता नाहीं म्हणजे 'विज्ञानमय' या शब्दांतील 'मय' या प्रत्ययाचा विकार असा अर्थ नाहीं, असें म्हटलेलें आहे, आणि तेथें मनःशब्दाचा उच्चार विज्ञानशब्दाबरोबर केलेला असल्यामुळें विज्ञान म्हणजे बुद्धि, आत्मा नव्हे; त्या बुद्धीचा जो विकार तो विज्ञानमय, असा अर्थ करणें उचितही आहे. अर्थात् येथील प्रयोगांत मयट्-प्रत्ययाला विकारार्थत्व आहे, असें म्हणणाऱ्या त्यांच्यावर स्वोक्तिविरोध हा दोष येतो, असें म्हणून दोष देतात—) त्यांनींच 'विज्ञानमय, मनोमय,' इत्यादि—तैत्तिरीय श्रुतींतील विज्ञानमयशब्दाचा निराळाच अर्थ केलेला दिसत असल्यामुळें या अर्थाला श्रौतार्थता नाहीं, असा निश्चय होतो.

( 'अहोपण 'विज्ञानमय' या पदाच्या अर्थाच्या निर्णयासाठीं दुसऱ्या ठिकाणच्या त्याच शब्दाच्या प्रयोगाचा आश्रय कां करतां,' अशी आशंका घेऊन सांगतात—) पदाचा संदिग्ध अर्थ दुसऱ्या ठिकाणच्या निश्चित अर्थीं केलेल्या प्रयोगावरून निश्चित करतां येतो. त्याचप्रमाणें पुढील वाक्यांशावरूनही संदिग्ध पदार्थाचा निश्चय होतो. ( जसें 'पुरोडाशं चतुर्धा कृत्वा बर्हिषदं करोति' येथील चतुर्धा करा-

वयाचा ' पुरोडाश ' कोणता असा संशय येतो. पण त्याच अर्थाशीं संबंध ठेवणाऱ्या दुसऱ्या शाखेंतील ' आग्नेयं चतुर्धा करोति ' या वाक्यावरून ' अग्निदेवताक पुरोडाशच चतुर्धा करावा ' असा निर्णय होतो. किंवा ' अक्ताः शर्करा उपदधाति-' भिजलेले क्षुद्र पाषाण जवळ ठेवतो, यांत कशानें भिजलेले असा संदेह येतो. पण पुढील ' तेजो वै घृतं ' या शेषवाक्यावरून घृतानें भिजलेले असा निर्णय होतो. त्याचप्रमाणें येथेंही वाक्यशेषावरून निर्णय करावा. ) अथवा विज्ञानमय जर आत्म्याचा विकार असेल तर त्याला मोक्ष मिळणें शक्य नाहीं, या निश्चित-अबाधित न्यायाच्या बळानें विज्ञानमयशब्दाच्या अर्थाचा निर्णय करावा. ( वाक्यशेषावरून काय निर्णय होतो तें दाखवितात-) ' सधीः ' असा पुढें पाठ आहे आणि ' हृदि अन्तर् ' असें वचन आहे. त्यामुळें विज्ञानमयाचें विज्ञानप्रायत्वच युक्त आहे.

प्राणेष्विति व्यतिरेकप्रदर्शनार्था सप्तमी । यथा वृक्षेषु पाषाण इति सामीप्यलक्षणा । प्राणेषु हि व्यतिरेकाव्यतिरेकता संदिह्यत आत्मनः। प्राणेषु प्राणेभ्यो व्यतिरिक्त इत्यर्थः । यो हि येषु भवति स तद्व्यतिरिक्तो भवत्येव । यथा पाषाणेषु वृक्षः ॥

भाष्यार्थ--' प्राणेषु ' ही सप्तमी व्यतिरेकप्रदर्शनार्थ आहे. ( ती व्यतिरेकप्रदर्शनार्थ कशी तें दाखवितात-) ज्याप्रमाणें ' वृक्षांमध्यें पाषाण ' ही सामीप्यलक्षण सप्तमी आहे, कारण प्राणांमध्यें आत्म्याचा व्यतिरेक आहे कीं अव्यतिरेक असा संदेह येतो. यास्तव ' प्राणेषु ' म्हणजे प्राणांहून व्यतिरिक्त असा भावार्थ. ( प्राणांमध्यें तो जरी समीपस्थ असला तरी त्याहून व्यतिरिक्त कसा तें सांगतात-) कारण जो ज्यामध्यें असतो तो त्याहून व्यतिरिक्त असतोच. जसा-पाषाणांतील वृक्ष.

हृदि तत्रैतत्स्यात्प्राणेषु प्राणजातीयैव बुद्धिः स्यादित्यत आह । हृद्यन्तरिति । हृच्छब्देन पुण्डरीकाकारो मांसपिण्डस्तात्स्थ्याद्बुद्धिर्हृत्तस्यां हृदि

बुद्धौ । अन्तरिति बुद्धिवृत्तिव्यतिरेकप्रदर्शनार्थम् । ज्योतिरवभासात्मकत्वादात्मोच्यते । तेन ह्यवभासकेनाऽऽत्मना ज्योतिषाऽऽस्ते पल्ययते कर्म कुरुते ॥

भाष्यार्थ—( हृदि हें विशेषण कोणती शंका घालविण्याकरितां आहे तें सांगून व्याख्यान करितात–) 'हृदि-' हृदयांत-पण प्राणांमध्यें प्राणाच्या जातीचीच बुद्धि असेल, अशी येथें शंका येते. म्हणून 'हृदि अन्तर्' असें श्रुति म्हणते. 'हृद्' या शब्दानें मुख्यतः शुभ्र कमळाच्या आकाराचा मांसाचा गोळा सांगितला जातो. त्या हृद् मध्यें राहत असल्यामुळें बुद्धीलाही 'हृद्' म्हणतात. त्या हृदयांत-बुद्धींत. 'अन्तर्' हें बुद्धींत राहणाऱ्या बुद्धिवृत्तींहून विज्ञानमयाचा व्यतिरेक दाखविण्यासाठीं आहे. 'ज्योतिः' आत्म्याला अवभासरूपत्व असल्यामुळें आत्माच 'ज्योति' असें म्हटला जातो. ( त्याचें ज्योतिष्ट्व स्पष्ट करितात–) त्याच अवभासक आत्म-ज्योतीनें पुरुष बसतो, इष्टस्थानीं पर्यटन करतो व तेथें कर्म करतो.

चेतनावानिव ह्ययं कार्यकरणपिण्डो यथाऽऽदित्यप्रकाशस्थो घटो यथा वा मरकतादिर्मणिः क्षीरादिद्रव्ये प्रक्षिप्तः परीक्षणायाऽऽत्मच्छायमेव तत्क्षीरादि द्रव्यं करोति तादृगेतदात्मज्योतिर्बुद्धेरपि हृदयात्सूक्ष्मत्वाद्धृद्यन्तःस्थमपि हृदयादिकं कार्यकरणसंघातं चैकीकृत्याऽऽत्मज्योतिश्छायं करोति । पारंपर्येण सूक्ष्मस्थूलतारतम्यात्सर्वान्तरतमत्वात् ॥

भाष्यार्थ—हा कार्यकरणसंघात जणुं काय चेतनावान्‌साच आहे. ( आत्मज्योतीनें व्याप्त अशा कार्यकरणसंघाताला व्यवहार करण्याचें सामर्थ्य कसें येतें तें स्पष्ट करण्यासाठीं दृष्टान्त–) जसा आदित्याच्या प्रकाशांत असलेला घट. ( 'चेतनावानिव-' चेतनावान् सा असें जें म्हटलें आहे त्याचेंच दृष्टान्तानें उपपादन करितात–) किंवा जसा मरकतादि मणि क्षीरादिद्रव्यामध्यें[1] मण्याच्या परीक्षणासाठीं टाकला असतां तें

[1] क्षीर म्ह. दूध.

क्षीरादि द्रव्य आपल्या छायेनें युक्त असेंच करतो त्याप्रमाणें ही आत्मज्योति हृदयाहून--बुद्धीहूनही सूक्ष्म असल्यामुळें त्या बुद्धीच्या आंत असली तरी हृदयादि सर्व कार्यकरणसंघाताला एकरूप करून आत्मज्योतीच्या छायेनें युक्त करते. (ही आत्मज्योति सर्वाला आत्मच्छाय कशी करते? तें सांगतात--) कारण परंपरेनें सूक्ष्म स्थूलतारतम्य आहे व आत्म्याला अतिशय सर्वान्तरत्व आहे. (विषयांपासून प्रत्यगात्म्यापर्यंत उत्तरोत्तर सूक्ष्मतेचें तारतम्य आहे व त्याच्या उलट प्रत्यगात्म्यापासून विषयांपर्यंत उत्तरोत्तर स्थूलतेचें तारतम्य आहे. प्रत्यगात्मा सर्वांच्या अगदीं आंत आहे. त्यामुळें तो बुद्ध्यादि प्रत्येकामध्यें आपला आकार व्यक्त होण्यास कारण होतो. )

बुद्धिस्तावत्स्वच्छत्वादानन्तर्याच्चाऽऽत्मचैतन्यज्योतिःप्रतिच्छाया भवति। तेन हि विवेकिनामपि तत्राऽऽत्माभिमानबुद्धिः प्रथमा। ततोऽप्यानन्तर्यान्मनसि चैतन्यावभासता। बुद्धिसंपर्कात्। तत इन्द्रियेषु। मनःसंयोगात्। ततोऽनन्तरं शरीरे। इन्द्रियसंपर्कात्। एवं पारंपर्येण कृत्स्नं कार्यकरणसंघातमात्मा चैतन्यस्वरूपज्योतिषाऽवभासयति। तेन हि सर्वस्य लोकस्य कार्यकरणसंघाते तद्वृत्तिषु चानियतात्माभिमानबुद्धिर्यथाविवेकं जायते ॥

भाष्यार्थ--(बुद्धीच्या आत्मच्छायत्वाचें समर्थन करितात-) बुद्धि तर स्वच्छ असल्यामुळें व तिला आनन्तर्य-असल्यामुळें [ म्ह० आत्म्याच्या अनंतर-अगदीं समीप-असल्यामुळें] ती आत्मचैतन्य ज्योतीच्या प्रतिच्छायेनें युक्त होते. (याविषयीं लौकिक परीक्षकांची 'बुद्धिच आत्मा आहे,' अशा प्रकारची जी भ्रांति, तेंच प्रमाण देतात--) त्यामुळेंच तर विवेकी लोकांचीही त्या बुद्धीमध्यें आत्माभिमानबुद्धि होते. बुद्धिच आत्मा आहे, ही पहिली आत्माभिमानबुद्धि होय. नंतर मन बुद्धीच्या अनंतर--अगदीं समीप असल्यामुळें मनांत चैतन्यावभासता येते. कारण मनाचा बुद्धीशीं संपर्क झालेला असतो. ( त्यामुळें बुद्धीच्या मागोमाग मनांत चिच्छाया

व्यक्त होते. ) त्यानंतर इंद्रियांमध्यें. कारण इंद्रियांशीं मनाचा संयोग होतो. त्यानंतर शरीरांत. कारण शरीराशीं इंद्रियांचा संपर्क होतो. ( येणेंप्रमाणें सांगितलेल्या आत्म्याच्या सर्वावभासकत्वाचा उपसंहार करितात–) याप्रमाणें परंपरासंबंधानें आत्मा संपूर्ण कार्यकरणसंघातास चैतन्यस्वरूपज्योतीनें प्रकाशित करतो. ( ' अहोपण आत्म्याला जर सर्वावभासकत्व आहे तर निरानिराळे वादी संघातांतील निरानिराळ्या अवयवाला आत्मा कां समजतात ?' उत्तर- ) बुद्ध्यादिकांना वर सांगितलेल्या क्रमानें आत्मच्छायत्व असल्यामुळेंच सर्व लोकांची ज्यांच्या त्यांच्या विवेकाप्रमाणें कार्यकरणसंघात व त्याच्या वृत्ति यांमध्यें अनियत आत्माभिमानबुद्धि होते.

तथा च भगवतोक्तं गीतासु–" यथा प्रकाशयत्येकः कृत्स्नं लोकमिमं रविः । क्षेत्रं क्षेत्री तथा कृत्स्नं प्रकाशयति भारत " ॥ " यदादित्यगतं तेजः " इत्यादि च । " नित्योऽनित्यानां चेतनश्चेतनानाम् " इति च काठके " तमेव भान्तमनुभाति सर्वं तस्य भासा सर्वमिदं विभाति " इति च । " येन सूर्यस्तपति तेजसेद्धः " इति च मन्त्रवर्णः ॥ तेनायं ह्यन्तर्ज्योतिः ॥

भाष्यार्थ—( आत्मज्योति सर्वावभासक आहे, याविषयीं केवल लोकप्रसिद्धिच प्रमाण नाहीं; तर भागवद्वाक्यही प्रमाण आहे, असें सांगतात–) तसेंच गीतेमध्यें भगवानांनीं ह्मटलें आहे-" ज्याप्रमाणें एक सूर्य या सर्व लोकाला प्रकाशित करतो त्याप्रमाणें हे अर्जुना, क्षेत्री सर्व क्षेत्राला--शरीराला प्रकाशित करतो. " " जें आदित्यांतील तेज अखिल जगाला प्रकाशित करतें " असेंही म्हटलें आहे. ' विनाश पावणाऱ्या पदार्थांतील हा अविनाशी, ब्रह्मादिक चेतनांतील चेतन ' असें काठकांत ह्मटलें आहे. ( जसें उदकांतील दाहकत्व अग्निनिमित्त असतें त्याप्रमाणें ब्रह्मादिकांचें चेतनत्व आत्मनिमित्त आहे. अग्नीच्या संसर्गामुळें उदकालाही जसें दाहक ह्मणतात त्याप्रमाणें आत्मसंसर्गा-

मुळें ब्रह्मादि अनात्म्यांनाही चेतन ह्मणतात. ) 'भासमान होणाऱ्या त्याच्या मागोमाग इतर सर्व भासमान होतें.' (' अहोपण हें अनुभान अनुगमनाप्रमाणें[1] स्वतःच्या भानानेंच असेल,' असें कोणाला वाटूं नये ह्मणून श्रुति ह्मणते-) 'त्याच्या प्रकाशानें हें सर्व विशेषतः प्रकाशमान होतें.' असेंही काठकांतच ह्मटलें आहे. 'ज्या तेजानें दीप्त झालेला सूर्य तापतो--ताप देतो,' असा मंत्रवर्ण आहे. (ज्योतिःशब्दाच्या व्याख्यानाचा उपसंहार करितात--)तात्पर्य हृदयांत--बुद्धींत--बुद्धिवृत्तींच्याही आंत स्थित असलेला हा आत्मा सर्वावभासकत्वामुळें ज्योति आहे.

पुरुष आकाशवत्सर्वगतत्वात्पूर्ण इति पुरुषः। निरतिशयं चास्य स्वयंज्योतिष्ट्वं सर्वावभासकत्वात्स्वयमन्यानवभास्यत्वाच्च। स एष पुरुषः स्वयमेव ज्योतिःस्वभावो यं त्वं पृच्छसि कतम आत्मेति॥

भाष्यार्थ--(श्रुतींतील 'पुरुषः' हें पद घेऊन त्याचें व्याख्यान करितात--) 'पुरुष.' आकाशाप्रमाणें सर्वगत असल्यामुळें तो पूर्ण आहे म्हणून पुरुष. ( आदित्यादि ज्योतींहून आत्मज्योतींत विशेष कोणता आहे, तें सांगतात--) या आत्म्याचें स्वयंप्रकाशत्व निरातिशय आहे. कारण तो सूर्यादि सर्वांचा अवभासक आहे व स्वतः दुसऱ्या कोणाही कडून प्रकाशित न होणारा आहे. ( 'योऽयं विज्ञानमयः प्राणेषु' इत्यादि प्रतिवचनवाक्यार्थाचा उपसंहार करितात--) 'कतम आत्मा' असें म्हणून तूं ज्याच्याविषयीं प्रश्न करीत आहेस तो हा पुरुष स्वतःच ज्योतिःस्वभाव आहे.

बाह्यानां ज्योतिषां सर्वकरणानुग्राहकाणां प्रत्यस्तमयेऽन्तःकरणद्वारेण हृद्यन्तर्ज्योतिः पुरुष आत्माऽनुग्राहकः करणानामित्युक्तम्। यदाऽपि बाह्यकरणानुग्राहकाणामादित्यादिज्योतिषां भावस्तदाऽप्यादित्यादिज्योतिषां परार्थत्वात्कार्यकरणसंघातस्याचैतन्ये स्वार्थानुपपत्तेः स्वार्थ-

1 अनुगमन म्ह० मागून जाणें. दुसरा जात असतांना त्याच्या मागून जाणाराला स्वतःही गमन करावें लागतें. त्याप्रमाणें त्याच्या प्रकाशामागून सर्व जगत् आपल्या प्रकाशानें प्रकाशमान होईल असा भावार्थ.

ज्योतिष आत्मनोऽनुग्रहाभावेऽयं कार्यकरणसंघातो न व्यवहाराय कल्पते । आत्मज्योतिरनुग्रहेणैव हि सर्वदा सर्वः संव्यवहारः । "यदेतद्धृदयं मनश्चैतत्संज्ञानम्" इत्यादिश्रुत्यन्तरात् । साभिमानो हि सर्वप्राणिसंव्यवहारः । अभिमानहेतुं च मरकतमणिदृष्टान्तेनावोचाम ॥

भाष्यार्थ—(' स समानः सन्०'इत्यादिक पुढील वाक्याचें व्याख्यान आरंभण्यासाठीं गतार्थ सांगतात–) सर्व इंद्रियांवर अनुग्रह करणाऱ्या बाह्य ज्योतींचा अस्त झाला असतां हृदयांतील–बुद्धींतील वृत्तींच्या आंत असणारा ज्योतिःस्वरूप पुरुष -पूर्ण आत्मा अन्तःकरणाच्या द्वारा इंद्रियांचा अनुग्राहक आहे, असें सांगितलें. (' तर मग जेव्हां आदित्यादि बाह्य ज्योति असतात त्यावेळीं आत्मज्योतीचा कांहीं उपयोग नाहीं,' म्हणून म्हणाल तर सांगतात--) ज्यावेळीं इंद्रियांवर अनुग्रह करणाऱ्या बाह्य आदित्यादि ज्योतींचा भाव असतो [म्ह० त्या असतात] त्यावेळींही आदित्यादि ( जड ) ज्योतींना परार्थत्व असल्यामुळें आणि कार्यकरणसंघात अचेतन--जड असल्यामुळें तोही स्वतःकरितां ( स्वार्थ ) असण्याचा संभव नाहीं. त्यामुळें स्वार्थज्योति जो आत्मा त्याच्या अनुग्रहाच्या अभावीं हा कार्यकरणसंघात व्यवहार करण्यास समर्थ होत नाहीं. (याप्रमाणें आत्मानुग्रहाच्या अभावीं शरीराच्या व्यवहाराचा अभाव होतो, असा व्यतिरेकमुखानें सांगितलेला अर्थच अन्वयमुखानें सांगतात--) कारण आत्मज्योतीच्या अनुग्रहानेंच सर्वदा सर्व संव्यवहार होतो, हें प्रसिद्ध आहे. ( आत्मज्योति सर्वानुग्राहक आहे, याविषयीं प्रमाण- ) ' हें जें हृदय तेंच मन होय, तेंच संज्ञान ' अशी दुसरी ऐतरेय श्रुतिही आहे. ( अन्तःकरणादि सर्व प्रज्ञानेत्र आहे, असें ऐतरेयकांत सांगितलेलें असल्यामुळें आत्मज्योतीला सर्वानुग्राहकत्व असणें युक्तच आहे. शिवाय जड शरीराला व इंद्रियांना चेतनत्व संभवत नाहीं, त्यामुळेंही त्यांच्या ठिकाणीं चिदात्मव्याप्ति अवश्य मानली पाहिजे,असें सांगतात--)सर्व प्राण्यांचा संव्यवहार साभिमान होतो, हें प्रसिद्ध आहे. ( पण असंग

आत्म्याचा बुद्ध्यादिकांच्या ठिकाणीं अहंभाव कसा ? तें सांगतात--) त्या अभिमानाचा हेतु मरकतमण्याच्या दृष्टान्तानें आम्हीं वर सांगितला आहे.

यद्यप्येवमेतत्तथाऽपि जाग्रद्विषये सर्वकरणागोचरत्वादात्मज्योतिषो बुद्ध्यादिबाह्याभ्यन्तरकार्यकरणव्यवहारसंनिपातव्याकुलत्वान्न शक्यते तज्ज्योतिरात्माख्यं मुञ्जेषीकावन्निष्कृष्य दर्शयितुमित्यतः स्वप्ने दिदर्शयिषुः प्रक्रमते । स समानः सन्नुभौ लोकावनुसंचरति । यः पुरुषः स्वयमेव ज्योतिरात्मा स समानः सदृशः सन् । केन । प्रकृतत्वात्संनिहितत्वाच्च हृदयेन । हृदीति च हृच्छब्दवाच्या बुद्धिः प्रकृता संनिहिता च । तस्मात्तयैव सामान्यम् ॥

भाष्यार्थ—( गतार्थाचा अनुवाद करून उत्तर वाक्य व्याख्यानासाठीं घेतात--) जरी हें असें आहे तरी जाग्रद्विषयांत -जाग्रदवस्थेंत आत्मज्योति सर्व इंद्रियांना अगोचर असल्यामुळें व बुद्ध्यादि बाह्य व आभ्यन्तर शरीरेंद्रियांच्या व्यवहाराच्या संयोगानें व्याकुल झाल्यामुळें ती आत्मा या नांवाची ज्योति मुंजातृणांतून जशी काडी त्याप्रमाणें कार्यकरणांपासून अगदीं पृथक् करून दाखवितां येत नाहीं. म्हणून स्वप्नांत तिला पृथक् करून दाखविण्याची इच्छा करणारे मुनि आरंभ करतात. 'स समानः सन्नुभौ लोकौ अनुसंचरति-' जो पुरुष स्वयंज्योतिच आत्मा तो समान म्ह० सदृश होत्साता, ( अनुसंचार करतो, असा पुढें संबंध. ) कोणाशीं सदृश ? हृदय येथें प्रकृत व संनिहित असल्यामुळें हृदयाशीं सदृश. ( प्रकृतत्व व संनिहितत्व हे दोन्ही हेतू साधतात--) ' हृदि ' अशारीतीनें हृद्--या शब्दानें वाच्य असलेली बुद्धि येथें प्रकृत आहे--तिचें प्रकरण चाललें आहे व ती संनिहित--समीप आहे. यास्तव आत्मा तिच्याशींच सामान्य--सादृश्य--पावतो.

किं पुनः सामान्यमश्वमाहिषवद्विवेकतोऽनुपलब्धिः । अवभास्या बुद्धिरवभासकं तदात्मज्योतिरालोकवत् । अवभास्यावभासकयोर्विवे-

कतोऽनुपलब्धिः प्रसिद्धा । विशुद्धत्वाद्ध्यालोकोऽवभास्येन सदृशो भवति । यथा रक्तमवभासयन्रक्तसदृशो रक्ताकारो भवति । यथा हरितं नीलं लोहितं चावभासयन्नालोकस्तत्समानो भवति । तथा बुद्धिमवभासयन्बुद्धिद्वारेण कृत्स्नं क्षेत्रमवभासयतीत्युक्तं मरकतमणि-निदर्शनेन । तेन सर्वेण समानो बुद्धिसामान्यद्वारेण ॥

भाष्यार्थ—( तें सामान्यच प्रश्नपूर्वक विशद करितात—) त्यांचें तें सामान्य—सादृश्य कोणतें ? ( उत्तर -) घोडा व रेडा यांप्रमाणें भिन्नरूपानें त्यांचा प्रत्यय न येणें हेंच सामान्य होय. ( विवेकतः म्ह० भिन्नत्वानें अनुपलब्धिच व्यक्त करण्यासाठीं बुद्धि व आत्मज्योति यांचें स्वरूप सांगतात—) बुद्धि अवभास्या—प्रकाशित केली जाण्यास योग्य व ती आत्मज्योति प्रकाशाप्रमाणें अवभासक आहे. अवभास्य विषय व अवभासक विषयी यांची विवेकतः अनुपलब्धि—भिन्नत्वानें प्रतीति न येणें, प्रसिद्ध आहे. ( ती प्रसिद्धिच प्रकट करितात—) प्रकाश अतिशय शुद्ध असल्यामुळेंच अवभास्या—विषया—सारखा होतो. जसें—लाल पदार्थाला प्रकाशित करणारा प्रकाश लालपदार्थासारखा—रक्ताकार होतो. त्याप्रमाणें हिरव्या, निळ्या, लोहित पदार्थाला प्रकाशित करणारा प्रकाश तत्तत्सदृश होतो. त्याचप्रमाणें बुद्धीला प्रकाशित करणारा आत्मा बुद्धीच्या द्वारा सर्व क्षेत्रास—शरीरास प्रकाशित करतो, असें मरकतमणीच्या दृष्टान्तानें सांगितलें, ( तो सर्वावभासक जर आहे तर त्याचें केवळ बुद्धीशींच साम्य कसें ? उत्तर—) सर्वावभासकत्वामुळें तो बुद्धिसादृश्याच्या द्वारा सर्वांशीं समान—सदृश होतो.

सर्वमय इति चात एव वक्ष्यति । तेनासौ कुताश्चित्प्रविभज्य मुञ्जेषीकावत्स्वेन ज्योतीरूपेन दर्शयितुं न शक्यत इति सर्वव्यापारं तत्राध्यारोप्य नामरूपगतं ज्योतिर्धर्मं च नामरूपयोर्नामरूपे चाऽऽत्मज्योतिषि सर्वो लोको मोमुह्यतेऽयमात्मा नायमात्मैवंधर्मा नैवंधर्मा कर्ताऽ-







कर्ता शुद्धोऽशुद्धो बद्धो मुक्तः स्थितो गत आगतोऽस्ति नास्तीत्यादि-विकल्पैः ॥

भाष्यार्थ—( आत्म्याचें सर्वांशीं साम्य असतें याविषयीं पुढील वाक्यही अनुकूल आहे असें सांगतात—) म्हणूनच श्रुति पुढें 'सर्वमयः' असें सांगेल. ( याविषयीं लोकांची भ्रांति हेंच ज्ञापक प्रमाण आहे, असें सांगतात—) आत्मा सर्वमय असल्यामुळेंच त्याला मुंजातृणांतील शलाकेप्रमाणें कोणत्याही पदार्थापासून अगदीं विभक्त करून स्वतःच्या ज्योतीरूपानें दाखवितां येत नाहीं. ( याप्रमाणें आत्मा व अनात्मा यांचें विवेकतः दर्शन करविणें अशक्य झालें असतां त्यांचा परस्पर अध्यास होतो व त्यांच्या धर्मांचाही अध्यास होतो आणि त्यामुळें लोकांना मोह होतो, असें सांगतात—)आणि तो स्वरूपानें दाखवितां न आल्यामुळें नाम-रूपगत सर्व व्यापार त्याच्यावर आरोपित करून, ज्योतीचे धर्म नामरूपांच्या ठिकाणीं व नाम-रूप आत्मज्योतीवर आरोपित करून हा आत्मा, हा आत्मा नव्हे, तो अशा अशा धर्मांनीं युक्त आहे व तसा नाहीं, कर्ता, अकर्ता, शुद्ध, अशुद्ध, बद्ध, मुक्त, स्थित, गत, आगत, आहे, नाहीं इत्यादि विकल्पांनीं सर्व लोक वारंवार मोहित होतो.

अतः समानः सन्नुभौ लोकौ प्रतिपन्नप्रतिपत्तव्याविहलोकपरलोकावुपात्तदेहेन्द्रियादिसंघातत्यागान्योपादानसंतानप्रबन्धशतसंनिपातैरनुक्रमण संचरति । धीसादृश्यमेवोभयलोकसंचरणहेतुर्न स्वत इति ॥

भाष्यार्थ—( 'स समानः सन्' याचा अर्थ सांगून अवशिष्ट भागाचें व्याख्यान करितात—) यास्तव समान होऊन 'उभौ लोकौ' प्राप्त झालेला इहलोक व प्राप्त करून घ्यावयाचा परलोक यांत घेतलेल्या शरीरेंद्रियसंघाताचा त्याग व दुसऱ्या संघाताचें ग्रहण यांच्या परंपरेनें सतत शतशः संबंधांनीं अनुक्रमानें संचार करतो. बुद्धिसादृश्य—

१ पूर्वदेहाचा त्याग व उत्तर देहाचें ग्रहण सतत करण्याची त्याची परंपरा अविच्छिन्न चालते.

बुद्धीप्रमाणें बनणें- हाच उभयलोकांत संचार करण्याचा हेतु -कारण आहे. तो स्वतः संचार करीत नाहीं.

तत्र नामरूपोपाधिसादृश्यं भ्रान्तिनिमित्तं यत्तदेव हेतुर्न स्वत इत्येतदुच्यते। यस्मात्स समानः सन्नुभौ लोकावनुक्रमेण संचरति तदेतत्प्रत्यक्षमित्येतद्दर्शयति। यतो ध्यायतीव ध्यानव्यापारं करोतीव चिन्तयतीव ध्यानव्यापारवतीं बुद्धीं स तत्स्थेन चित्स्वभावज्योतीरूपेणावभासयंस्तत्सदृशस्तत्समानः सन्ध्यायतीवाऽऽलोकवदेव। अतो भवति चिन्तयतीति भ्रान्तिर्लोकस्य। न तु परमार्थतो ध्यायति॥

भाष्यार्थ—( आत्म्याचें उभयलोकसंचरण स्वाभाविक आहे, अशी आशंका घेऊन पुढील वाक्य घेतात-) आत्म्याच्या ठिकाणीं जें भ्रांतिनिमित्त नामरूपोपाधिसादृश्य तेंच त्याच्या उभयलोकसंचरणाचें निमित्त आहे, त्याचें तें स्वाभाविक नव्हे, हें सांगितलें जातें-ज्याअर्थीं तो समान--सदृश होऊन दोन्ही लोकांत अनुक्रमानें संचार करतो त्याअर्थीं तें प्रत्यक्ष आहे, असें श्रुति दाखवितें-' ध्यायति इव-' ज्याअर्थीं जणुकाय ध्यान करतो--ध्यानव्यापारच जणु करतो, जणुं काय चिंतन करतो. ध्यानव्यापार करणाऱ्या बुद्धीला बुद्धिस्थ चित्स्वभावज्योतीरूपानें प्रकाशित करणारा तो प्रकाशप्रमाणेंच भासमान होत्साता जणु काय ध्यान करतो. (जसा निळ्या किंवा पिवळ्या विषयाला व्यापणारा प्रकाश तदाकार दिसतो तसा हाही ध्यानयुक्त बुद्धीला प्रकाशित करणारा आत्मा स्वतः ध्यान करणारासा होतो, असा भावार्थ.) ज्याअर्थीं ध्यानसें करतो त्याअर्थीं तो चिंतन करीत आहे, अशी लोकांना भ्रांति होते. (' इव-' शब्दाचा अर्थ सांगतात-) पण तो परमार्थतः--वस्तुतः ध्यान करीत नाहीं.

तथा लेलायतीवात्यर्थं चलतीव। तेष्वेव करणेषु बुद्ध्यादिषु वायुषु च चलत्सु तदवभासकत्वात्तत्सदृशं तदिति लेलायतीव। न तु परमार्थतश्चलनधर्मकं तदात्मज्योतिः॥

भाष्यार्थ—( आत्म्याच्या ठिकाणीं भासणारे बुद्धीचे धर्म औपाधिक असल्यामुळें मिथ्या आहेत, असें सांगून प्राणधर्मांना मिथ्यात्व आहे, असें सांगतात--) त्याचप्रमाणें 'लेलायति इव-' जणुकाय अत्यंत चळतो--हालतो. ( आत्म्याचें चलन औपाधिक आहे, ही गोष्ट सिद्ध करितात--) तींच बुद्ध्यादिक इंद्रियें व प्राण वायु हे चलन करूं लागले असतां आत्मा त्यांचा अवभासक असल्यामुळें तोही तत्सदृश होतो. यास्तव जणुंकाय आत्मा चलन करतो. ( इवशब्दावरून सिद्ध होणारा अर्थ सांगतात--) पण वस्तुतः ती आत्मज्योति चलनधर्मयुक्त नाहीं.

कथं पुनरेतदवगम्यते तत्समानत्वभ्रान्तिरेवोभयलोकसंचरणादिहेतुर्न स्वत इत्यस्यार्थस्य प्रदर्शनाय हेतुरुपदिश्यते । स आत्मा हि यस्मात्स्वप्नो भूत्वा । स यया धिया समानः सा धीर्यद्यद्भवति तत्तद्सावपि भवतीव तस्माद्यदाऽसौ स्वप्नो भवति स्वापवृत्तिं प्रतिपद्यते । धीस्तदा सोऽपि स्वप्नवृत्तिं प्रतिपद्यते । यदा धीर्जिजागरिषति, तदाऽसावप्यत आह । स्वप्नो भूत्वा स्वप्नवृत्तिमवभासयन्धियः स्वापवृत्त्याकारो भूत्वेमं लोकं जागरितव्यवहारलक्षणं कार्यकरणसंघातात्मकं लौकिकशास्त्रीयव्यवहारास्पदमतिक्रामत्यतीत्य क्रामति विविक्तेन स्वेनाऽऽत्मज्योतिषा स्वप्नात्मिकां धीवृत्तिमवभासयन्नवतिष्ठते यस्मात्तस्मात्स्वयंज्योतिःस्वभाव एवासौ विशुद्धः स कर्तृक्रियाकारकफलशून्यः परमार्थतो धीसादृश्यमेव तूभयलोकसंचारादिसंव्यवहारभ्रान्तिहेतुः ॥

भाष्यार्थ—( 'स हि स्वप्नो भूत्वा' हें पुढील वाक्य आकांक्षाद्वारा उत्थापित करितात--) आत्मा बुद्धिसदृश आहे, अशी भ्रांति हेंच त्याच्या उभयलोकसंचरणादिकांचें कारण आहे, तो स्वतः नाहीं हें कसें, बरें अवगत होतें ? हा अर्थ प्रदर्शित करण्यासाठीं हेतु सांगितला जातो--'स हि स्वप्नो भूत्वा-' तो आत्मा ज्याअर्थीं स्वप्न होऊन ( लोकाचें अतिक्रमण करतो असा संबंध. संचरणादि येथील आदिशब्द ध्यानादिव्यापारांच्या संग्रहार्थ आहे. आत्मा स्वप्न कसा होतो, तें सांगतात--) तो

ज्या बुद्धीशीं समान--सदृश होतो ती बुद्धि जें जें होते तें तें हाही जणु-काय होतोच. तस्मात् ही बुद्धि ज्यावेळीं स्वप्न होते-स्वापवृत्तीला प्राप्त होते तेव्हां हाही स्वप्नवृत्तीस प्राप्त होतो. जेव्हां बुद्धि जागरित होण्याची इच्छा करते तेव्हां हा आत्माही जणुकाय जागा होऊं लागतो. म्हणून श्रुति म्हणते 'स्वप्नो भूत्वा-' बुद्धीच्या स्वप्नवृत्तीला प्रकाशित करणारा—स्वप्नवृत्त्याकार होऊन 'इमं लोकं-' लौकिक व शास्त्रीय व्यवहाराचें आस्पद,जागरितव्यवहारलक्षण अशा या कार्यकरणसंघातात्मक लोकास 'अतिक्रामति-' उल्लंघून जातो. आपल्या सर्वथा असंग स्वभावभूत आत्मज्योतीनें स्वप्नात्मक बुद्धिवृत्तीला प्रकाशित करीत ज्या-अर्थीं तो अवस्थित होतो त्याअर्थीं हा स्वयंज्योतिः-स्वभावच असून परमार्थतः कर्तृ-क्रिया-कारक फलशून्य आहे. त्याचें बुद्धिसादृश्यच उभय लोकसंचारादि संव्यवहाराच्या भ्रांतीचें निमित्त आहे.

मृत्यो रूपाणि मृत्युः कर्माविद्यादिर्न तस्यान्यद्रूपं स्वतः कार्य-करणान्येवास्य रूपाणि । अतस्तानि मृत्यो रूपाण्यतिक्रामति क्रियाफलाश्रयाणि ॥

भाष्यार्थ—( प्रत्यगात्मा शरीरेंद्रियातीत असल्यामुळें त्याला स्वतः संचारित्व नाहीं, असें सांगतात—) 'मृत्यो रूपाणि-' कर्म, अविद्या इत्यादि हा मृत्यु आहे. स्वतः त्याचें अन्य रूप नाहीं. शरीर व इंद्रियें हींच त्याचीं रूपें आहेत. यास्तव त्या मृत्यूच्या रूपांचें—क्रिया व त्यांचें फळ यांच्या आश्रयाचें—आत्मा उल्लंघन करतो.

ननु नास्त्येव धिया समानमन्यद्धियोऽवभासकमात्मज्योतिः । धीव्यतिरेकेण प्रत्यक्षेण वाऽनुमानेन वाऽनुपलम्भात् । यथाऽन्या तत्काल एव द्वितीया धीः । यत्त्ववभास्यावभासकयोरन्यत्वेऽपि विवेकानुपलम्भात्सादृश्यमिति घटाद्यालोकयोः । तत्र भवत्वन्यत्वेनाऽऽलोकस्योपलम्भाद्घटादेः सांश्लिष्टयोः सादृश्यं भिन्नयोरेव न च तथेह घटादेरिव धियोऽवभासकं ज्योतिरन्तरं प्रत्यक्षेण वाऽनुमानेन वोपल-

भामहे । धीरेव हि चित्स्वरूपावभासकत्वेन स्वाकारा विषयाकारा च । तस्मान्नानुमानतो नापि प्रत्यक्षतो धियोऽवभासकं ज्योतिः शक्यते प्रतिपादयितुं व्यतिरिक्तम् ॥

भाष्यार्थ—( बुद्धीला प्रकाशित करणारी ज्योति आत्मा आहे, असें सांगितलेलें ऐकून शाक्य शंका घेतो–) ' अहोपण बुद्धीसारखी बुद्धीला प्रकाशित करणारी दुसरी आत्मज्योति नाहींच. कारण त्या आत्मज्योतीची बुद्धीहून भिन्नत्वानें प्रत्यक्ष किंवा अनुमान यांतील कोणत्याही प्रमाणानें उपलब्धि होत नाहीं. जशी त्याचवेळीं दुसरी बुद्धि उपलब्ध होत नाहीं, त्याप्रमाणें ?' ( घटादि प्रकाश्य पदार्थ व प्रकाश यांचा परस्पर संसर्ग झाल्यामुळें पृथक्त्वानें जसा प्रत्यय येत नाहीं त्याप्रमाणें अवभास्य बुद्धि व अवभासक आत्मा यांचा जरी भेद असला तरी पृथक्पणें अनुभव येत नाहीं. पण वस्तुतः त्यांचा भेदच आहे, असें जें सिद्धान्त्याचें ह्मणणें आहे त्याचा शाक्य अनुवाद करतो.–) पण तुह्मीं ' अवभास्य घटादिक व अवभासक प्रकाश यांना पृथक्त्व जरी असलें तरी त्यांच्या पृथक्त्वाची प्रतीति येत नसल्यामुळें त्यांचें सादृश्य भासतें ' इत्यादि जें ह्मटलें आहे ( तें बरोबर नाहीं. कारण त्यांत वैषम्य आहे–) दृष्टान्तांत घटादिकांहून प्रकाशाचा अन्यत्वानें अनुभव येत असल्यामुळें भिन्न असलेल्याच पण परस्परसंसर्ग पावलेल्या त्यांचें सादृश्य असो; पण तसें दार्ष्टान्तिकांत घटादिकांप्रमाणें बुद्धीच्या दुसऱ्या अवभासक ज्योतीचा प्रत्यक्ष प्रमाणानें अथवा अनुमानानें अनुभव येत नाहीं; ( दुसरी ज्योति जर नाहींच तर ग्राह्य व ग्राहक हें भान कसें होतें ? अशी आशंका घेऊन शाक्य–बौद्ध सांगतो-) उलट बुद्धिच चित्स्वरूपाचें अवभासन करणारी असल्यामुळें बुद्ध्याकार व विषयाकार होते ( याप्रमाणें सांगून बाह्यार्थवादी सौत्रान्तिक व वैभाषिक यांच्या अभिप्रायाचा उपसंहार करितात–) तस्मात् बुद्धीची अवभासक ज्योति व्यतिरिक्त आहे असें प्रत्यक्षप्रमाणानें प्रतिपादन करितां येत नाहीं व अनुमानानेंही प्रतिपादन करतां येणें शक्य नाहीं.

यदपि दृष्टान्तरूपमभिहितमवभास्यावभासकयोर्भिन्नयोरेव घटाद्या-लोकयोः संयुक्तयोः सादृश्यमिति । तत्राभ्युपगममात्रमस्माभिरुक्तं न तु तत्र घटाद्यवभास्यावभासकौ भिन्नौ । परमार्थतस्तु घटादिरेवा-वभासात्मकः सालोकः । अन्योऽन्यो हि घटादिरुत्पद्यते । विज्ञान-मात्रमेव सालोकघटादिविषयाकारमवभासते । यदैवं तदा न बाह्यो दृष्टान्तोऽस्ति विज्ञानलक्षणमात्रत्वात्सर्वस्य ॥

भाष्यार्थ—( सौत्रान्तिक व वैभाषिक यांनीं स्वीकारलेल्या दृष्टा-न्ताचा अनुवाद विज्ञानवादी बौद्ध करतो–) भिन्न असलेल्याच अव-भास्य व अवभासक अशा संयुक्त घटादिकांचें व प्रकाशाचें सादृश्य आहे, असें जें दृष्टान्तरूप सांगितलें आहे तेंही आम्हीं केवळ सिद्धान्त म्हणून सांगितलें आहे. पण घटादि अवभास्य व अवभासक भिन्न नाहींत. ('अहोपण अवभास्य घटादिकांहून अवभासक प्रकाश भिन्न असलेला दिसतो,' याचें उत्तर ' नाहीं ' असें देतात–) परमार्थतः तर प्रकाशासह घटादिकच अवभासात्मक आहे. (त्याचें स्थिरत्व घाल-वितात–) प्रतिक्षणीं निराळा निराळाच घटादिक उत्पन्न होतो. ( प्रतीत होणाऱ्या घटादिविषयांचेंच प्राधान्य घालविण्यासाठीं उक्त वाक्यच व्यक्त करितात–) विज्ञानमात्रच सालोक घटादिविषयाकार भासतें. ( अर्थात् या विज्ञानवादांत पूर्वोक्त दृष्टान्ताचें राहित्य निष्पन्न होतें, असें सांगतात–) आणि असें जेव्हां आहे तेव्हां सर्व विज्ञानलक्षणमात्र असल्यामुळें बाह्य दृष्टान्तच नाहीं.

एवं तस्यैव विज्ञानस्य ग्राह्यग्राहकाकारतामलं परिकल्प्य तस्यैव पुनर्विशुद्धीं परिकल्पयन्ति । तद्ग्राह्यग्राहकविनिर्मुक्तं विज्ञानं स्वच्छी-भूतं क्षणिकं व्यवतिष्ठत इति केचित् । तस्यापि शान्तिं केचिदिच्छ-न्ति । तदपि विज्ञानं संवृतं ग्राह्यग्राहकांशविनिर्मुक्तं शून्यमेव घटादि-बाह्यवस्तुवदित्यपरे माध्यमिका आचक्षते ॥

भाष्यार्थ—( शिष्याच्या बुद्ध्यनुसार त्रिविध बुद्धाभिप्रायाचा उप-

संहार करितात–) याप्रमाणें त्याच विज्ञानाची ग्राह्य-ग्राहक-आकारता पूर्णपणें कल्पून ( येथवर बाह्यार्थवादाचा उपसंहार करून विज्ञानवादाचा उपसंहार करितात–) पुनः त्याचीच अत्यंत शुद्धि कल्पितात.(याचेंच विवरण–) तें ग्राह्यग्राहकविरहित विज्ञान स्वच्छ झालेलें व क्षणिक असें अवस्थित होतें,असें कित्येक म्हणतात. ( शून्यवाद्याचें मत–)दुसरे कित्येक बौद्ध त्या विज्ञानाचीही शांति इच्छितात. ( शून्यवाद्यांचेंच म्हणणें स्पष्ट करितात–) तेंही अविद्येनें आच्छादित झालेलें विज्ञान ग्राह्य–ग्राहकांशांनीं विरहित होत्सातें घटादिबाह्यवस्तूप्रमाणें शून्यच आहे, असें दुसरे माध्यमिक बौद्ध म्हणतात.

सर्वा एताः कल्पना बुद्धिविज्ञानावभासकस्य व्यतिरिक्तस्याऽऽत्मज्योतिषोऽपह्नवादस्य श्रेयोमार्गस्य प्रतिपक्षभूता वैदिकस्य । तत्र येषां बाह्योऽर्थोऽस्ति तान्प्रत्युच्यते तावत् । न स्वात्मावभासकत्वं घटादेः । तमस्यवस्थितो घटादिस्तावन्न कदाचिदपि स्वात्मनाऽवभास्यते । प्रदीपाद्यालोकसंयोगेन तु नियमेनैवावभास्यमानो दृष्टः सालोको घट इति । सांश्लिष्टयोरपि घटालोकयोरन्यत्वमेव पुनः पुनः संश्लेषे विश्लेषे च विशेषदर्शनाद्रज्जुघटयोरिव । अन्यत्वे च व्यतिरिक्तावभासकत्वं न स्वात्मनैव स्वमात्मानमवभासयति ॥

भाष्यार्थ—( या तिन्ही पक्षीं दोषांचा संभव आहे, असें दाखवितात–) या सर्व कल्पना बुद्धिस्थ विज्ञानाला प्रकाशित करणारी जी देहादि-व्यतिरिक्त आत्मज्योति तिचा प्रतिषेध करणाऱ्या असल्यामुळें या वैदिक श्रेयोमार्गाच्या प्रतिपक्षभूत आहेत ( प्रथम बाह्यार्थवाद्यांचेंच खंडन करितात–) त्यांतील ज्यांच्या मतीं घटादि बाह्य अर्थ आहे त्यांना उद्देशून प्रथम असें सांगितलें जातें–घटादिकाला स्वतःच्या स्वरूपाचें प्रकाशकत्व नाहीं, ( त्यामुळें बुद्धिच आपली प्रकाशिका आहे, हें म्हणणें खोटें आहे. ) अंधकारांत असलेला घटादिक केव्हांही स्वतःच्या रूपाकडून प्रकाशित होत नाहीं, ( जें जें अवभास्य तें तें आपल्याहून

भिन्न असलेल्या अवभासकाकडून प्रकाशित होणारें असतें. जसें–घटादिक. बुद्धिही अवभास्य आहे. त्यामुळें तिच्याहून व्यतिरिक्त साक्षी सिद्ध होतो, असा भावार्थ. ) तर प्रदीपादिकांच्या प्रकाशाचा संयोग झाला असतां ' हा प्रकाशयुक्त घट आहे ' अशा रीतीनें तो नियमानें प्रकाशमान होत असल्याचा अनुभव येतो.(याला अवभासकाची अपेक्षा असते, हें दाखविण्यासाठीं ' सालोकः घटः ' प्रकाशयुक्त घट, असें भाष्यांत विशेषण आहे. ) आतां घट व प्रकाश हे दोन्ही संश्लिष्ट असतात, परस्पर संसर्ग पावलेले असतात हें खरें आहे;तथापि त्या संश्लिष्ट अशाही घट व प्रकाश यांना अन्यत्वच आहे. कारण घट व दोरी यांप्रमाणें त्यांचा संयोग व वियोग झाला असतां त्यांच्यामध्यें विशेष उपलब्ध होतो आणि त्यांना अन्यत्व आहे–ते दोन भिन्न पदार्थ आहेत असें ठरलें कीं त्यांतील अप्रकाशरूप पदार्थ त्यांहून भिन्न असलेल्या प्रकाशाकडून प्रकाशमान होणारा आहे, असेंच मानावें लागतें. कारण घटादि पदार्थ स्वरूपानेंच स्वरूपाला प्रकाशित करीत नाहीं.

ननु प्रदीपः स्वात्मानमेवावभासयन्दृष्ट इति । न हि घटादिवत्प्रदीपदर्शनाय प्रकाशान्तरमुपाददते लौकिकाः । तस्मात्प्रदीपः स्वात्मानं प्रकाशयति । न । अवभास्यत्वाविशेषात् । यद्यपि प्रदीपोऽन्यस्यावभासकः स्वयमवभासात्मकत्वात्तथाऽपि व्यतिरिक्तचैतन्यावभास्यत्वं न व्यभिचरति घटादिवदेव । यदा चैवं तदा व्यतिरिक्तावभास्यत्वं तावदवश्यंभावि ॥

भाष्यार्थ—( याप्रमाणें दृष्टान्त साध्यशून्य नाहीं, असें उदाहरणानें दाखविलें असतां त्याविषयीं व्यभिचार दाखवितात–) ' अहो पण प्रदीप स्वरूपालाच प्रकाशित करतो असा अनुभव आहे.कारण व्यवहारी लोक घटादिकांप्रमाणें प्रदीप पाहावयाचा झाल्यास दुसरा प्रकाश घेत नाहींत, त्यावरून प्रदीप स्वरूपाला प्रकाशित करतो, ( असें ठरतें. ' प्रदीपही घटादिकांसारखाच असल्यामुळें व्यभिचार दोष येत नाहीं, असें

सिद्धान्ती सांगतात–) हें म्हणणें बरोबर नाहीं. कारण घटादिकांप्रमाणेंच प्रदीपालाही अवभास्यत्व सारखेंच आहे. प्रदीप स्वतः अवभासात्मक असल्यामुळें दुसऱ्याचा अवभासक जरी असला तरी घटादिकांप्रमाणेंच त्याहून व्यतिरिक्त अशा चैतन्याकडून प्रकाशित होणें, याचा प्रदीपामध्येंही व्यभिचार होत नाहीं; आणि असें जेव्हां आहे तेव्हां बुद्धीला व्यतिरिक्तावभास्यत्व म्ह० भिन्न अवभासकाकडून प्रकाशित होणें अवश्यंभावि आहे.

ननु यथा घटश्चैतन्यावभास्यत्वेऽपि व्यतिरिक्तमालोकान्तरमपेक्षते नत्वेवं प्रदीपोऽन्यमालोकान्तरमपेक्षते । तस्मात्प्रदीपोऽन्यावभास्योऽपि सन्नात्मानं घटं चावभासयति । न स्वतः परतो वा विशेषाभावात् । यथा चैतन्यावभास्यत्वं घटस्य तथा प्रदीपस्यापि चैतन्यावभास्यत्वमविशिष्टम् ॥

भाष्यार्थ—'अहो पण घटाला चैतन्यावभास्यत्व जरी असलें तरी तो आपल्याहून भिन्न अशा दुसऱ्या प्रकाशाची जशी अपेक्षा करतो त्याप्रमाणें प्रदीप दुसऱ्या प्रकाशाची अपेक्षा करीत नाहीं; तस्मात् प्रदीप चैतन्याकडून अवभासित होणारा जरी असला तरी आपल्याला व घटाला प्रकाशित करतो.' ( जर प्रदीपानें स्वतःला प्रकाशित करण्याच्या पूर्वी त्याच्यामध्यें नसलेला एकादा विशेष प्रकाशनानंतर होईल तर तो स्वरूपाला प्रकाशित करतो, असें म्हणणें युक्त होईल; पण तसा कांहीं विशेष प्रकाशनानंतर होत नाहीं, असें म्हणून दोष देतात-) तसें नाहीं. कारण त्याच्यामध्यें स्वतः किंवा परतः कोणत्याही प्रकारचा विशेष नसतो. ( हेंच म्हणणें अधिक स्पष्ट करितात–) जसें घटाला चैतन्यावभास्यत्व आहे तसेंच-त्याच्याच सारखें प्रदीपालाही चैतन्यावभास्यत्व आहे. (कारण दोघांनाही अवभास्यत्व एकसारखेंच आहे.)

यत्तूच्यते प्रदीप आत्मानं घटं चावभासयतीति तदसत् । कस्मात् । यदाऽऽत्मानं नावभासयति तदा कीदृशः स्यात् । न हि तदा

प्रदीपस्य स्वतो वा परतो वा विशेषः कश्चिदुपलभ्यते । स ह्यवभास्यो भवति यस्यावभासकसंनिधावसंनिधौ च विशेष उपलभ्यते । न हि प्रदीपस्य स्वात्मसंनिधिरसंनिधिर्वा शक्यः कल्पयितुम् । असति च कादाचित्के विशेष आत्मानं प्रदीपः प्रकाशयतीति मृषैवोच्यते ॥

भाष्यार्थ—( आतां प्रतीपासंबंधीं वाद्याचें जें म्हणणें आहे त्याचा अनुवाद करून दूषण देतात -) आतां प्रदीप आपल्याला व घटाला प्रकाशित करतो, असें जें वर म्हटलें आहे तें बरोबर नाहीं. तें कां ? जेव्हां दीप आपल्याला प्रकाशित करीत नाहीं तेव्हां तो कशाप्रकारचा असतो ? ( 'तेव्हां तो अप्रकाशमान असतो—त्यावेळीं त्याचें भानच नसतें' म्हणून म्हणाल तर सांगतों -) त्यावेळीं प्रदीपाचा स्वतः किंवा परतः कोणताही विशेष उपलब्ध होत नाहीं. ('अहो पण त्याचा विशेष जरी कांहीं नसला तरी तो आपणच आपल्याला प्रकाशित कां करणार नाहीं,' ह्मणून म्हणाल तर सांगतों—) ज्याचा अवभासक समीप असतां व तो संनिध नसतां विशेष उपलब्ध होतो तोच अवभास्य होतो. (दगड घटापाशीं असतांना किंवा नसतांना कांहीं विशेष उपलब्ध होत नाहीं, म्हणून घट दगडाचा अवभास्यच नव्हे. पण प्रदीप संनिध असतांना घट प्रकाशित होतो व नसतांना होत नाहीं, असा घटाचा विविशेष उपलब्ध होतो. यास्तव घट प्रदीपाचा अवभास्य आहे. ) स्वतः प्रदीपाचीच संनिधि अथवा असंनिधि यांची कल्पना करतां येणें शक्य नाहीं; आणि केव्हां केव्हां प्रतीत होणारा विशेष जर नसेल तर प्रदीप आपल्याला प्रकाशित करतो, हें खोटेंच म्हटलें जातें.

चैतन्यग्राह्यत्वं तु घटादिभिरविशिष्टं प्रदीपस्य। तस्माद्विज्ञानस्याऽऽत्मग्राह्यग्राहकत्वेन प्रदीपो दृष्टान्तः ॥

भाष्यार्थ—( व्यभिचारदोषाचें निरसन करून व प्रदीप अवभास्य आहे या अनुमानाचें उपपादन करून दुसरें अनुमान सांगतात–) प्रदीपाचें चैतन्यग्राह्यत्व घटादिकांशीं समान आहे. [ म्ह० घटादिकांप्रमा-

णेंच प्रदीप चैतन्याचा विषय आहे. जें व्यंजक–व्यक्त करणारें–असतें तें आपल्या जातीच्या दुसऱ्या व्यंजकाचें व्यंग्य–त्याच्याकडून प्रकाशित होणारें असतें, जसें–सूर्यादिक. विज्ञान व्यंजक आहे. त्यामुळें विज्ञान-बुद्धि-व्यतिरिक्त चिदात्मा सिद्ध होतो, असा भावार्थ. प्रदीपाला स्वाव-भास्यत्व नाहीं तर विजातीयचैतन्यावभास्यत्व आहे, इतकें ठरलें असतां फलित सांगतात–] तस्मात् स्वतःच्या ग्राह्य विषयाचा ग्राहक या रूपानें प्रदीप विज्ञानाचा दृष्टान्त आहे.

चैतन्यग्राह्यत्वं च विज्ञानस्य बाह्यविषयैरविशिष्टम् । चैतन्यग्राह्य-त्वे च विज्ञानस्य किं ग्राह्यविज्ञानग्राह्यतैव किं वा ग्राहकविज्ञानग्रा-ह्यतेति तत्र संदिह्यमाने वस्तुनि योऽन्यत्र दृष्टो न्यायः स कल्पयितुं युक्तो न तु दृष्टविपरीतः । तथा च सति यथा व्यतिरिक्तेनैव ग्राह-केण बाह्यानां प्रदीपादीनां ग्राह्यत्वं दृष्टं तथा विज्ञानस्यापि चैतन्यग्रा-ह्यत्वात्प्रकाशकत्वे सत्यपि प्रदीपवद्व्यतिरिक्तचैतन्यग्राह्यत्वं युक्तं कल्पयितुं न त्वनन्यग्राह्यत्वम् । यश्चान्यो विज्ञानस्य ग्रहीता स आत्मा ज्योति-रन्तरं विज्ञानात् ॥

भाष्यार्थ—( जें जें ग्राह्य तें तें दुसऱ्या ग्राहकानें ग्राह्य असतें, जसा दीप. हें विज्ञानही ग्राह्य आहे, असें दुसरें अनुमान सांगतात–) विज्ञानाचें चैतन्यग्राह्यत्व बाह्य विषयांशीं अविशिष्ट–समान–आहे [ म्ह० बाह्य विषय जसे चैतन्यग्राह्य–चैतन्याचे विषय–त्याचप्रमाणें विज्ञान चैतन्यग्राह्य आहे, ] आणि विज्ञानाला चैतन्यग्राह्यत्व आहे असं ठरल्यावर त्याला ग्राह्य–विषय जें विज्ञान त्याचीच ग्राह्यता–विषयत्व आहे कीं ग्राहक विज्ञानाची विषयता आहे? असा वस्तूविषयीं संदेह आला असतां जो न्याय दुसऱ्या[1] ठिकाणीं अनुभवाला आला असेल त्याचीच येथेंही कल्पना करणें उचित होय. अनुभूत न्यायाच्या विप-रीत कल्पना करणें योग्य नव्हे. ( ' बरें लोकानुसार निश्चय करा; पण

१ दुसऱ्या ठिकाणीं म्हणजे लौकिकांत–व्यवहारांत.

लोक तरी काय समजतात ?' तें सांगतात–) लौकिक न्यायानुसार निश्चय करावयाचा असें ठरलें असतां ज्याप्रमाणें व्यतिरिक्त ग्राहका-कडूनच बाह्य प्रदीपादि विषयांचें ग्राह्यत्व दृष्ट आहे त्याप्रमाणें विज्ञाना-लाही चैतन्यग्राह्यत्व असल्यामुळें त्याला प्रकाशकत्व जरी असलें तरी प्रदीपाप्रमाणें व्यतिरिक्तचैतन्यग्राह्यत्व आहे, अशी कल्पना करणेंच उचित आहे, विज्ञानाला अनन्यग्राह्यत्व आहे–विज्ञान विज्ञानग्राह्यच आहे, असें मानणें उचित नाहीं; आणि जो दुसरा विज्ञानाचा ग्रहीता ग्रहण करणारा तो आत्मा विज्ञानाच्या पलीकडे असणारी अंतर् ज्योति आहे.

तदाऽनवस्थेति चेत् । न । ग्राह्यत्वमात्रं हि तद्ग्राहकस्य वस्त्वन्तरत्वे लिङ्गमुक्तं न्यायतः ॥ न त्वेकान्ततो ग्राहकत्वे तद्ग्राहकान्तरास्तित्वे वा कदाचिदपि लिङ्गं संभवति । तस्मान्न तदनवस्थाप्रसङ्गः ॥

भाष्यार्थ—'अहोपण ग्राहक विज्ञानालाही दुसऱ्या ग्राहकाचें ग्राह्य मानल्यास त्या ग्राहकाला तिसऱ्या ग्राहकाचें ग्राह्य मानावें लागेल व त्यामुळें अनवस्था दोष येईल,' म्हणून म्हणाल तर तें बरोबर नाहीं. ( कारण विज्ञानाचा साक्षी असा जो कूटस्थ बोध तो विषय नाहीं. त्यामुळें अनवस्थादोष येत नाहीं. ) जें ग्राह्य असतें तें आपल्याहून भिन्न असलेल्या ग्राहकाचेंच ग्राह्य असतें, जसें–घटादि विषयजात. या न्यायानें बुद्धीचें केवळ ग्राह्यत्व हेंच तिचा ग्राहक तिच्याहून व्यतिरिक्त पदार्थ आहे, याविषयीं लिंग सांगितलें. ( पण बुद्धीच्या साक्षीला ग्राह्यत्व नाहीं. कारण तो साक्षी निर्विकार ज्ञानस्वरूप आहे. त्यामुळें अनवस्था संभवत नाहीं. )

( 'अहो पण जो साक्षी तोही स्वतःहून भिन्न अशा कोणाचा तरी ग्राह्य आहे. कारण तो ग्राहक आहे. बुद्धीप्रमाणें,' अशी आशंका घेऊन सांगतात–) पण त्या साक्षीच्या अव्यभिचारी ग्राहकत्वाविषयीं अथवा त्याचा दुसरा ग्राहक आहे, अशाविषयीं केव्हांही लिंग संभवत नाहीं.

( ग्राहकत्व म्हणजे ग्रहणकर्तृत्व कीं त्याचें साक्षित्व ? बुद्धिसाक्षीच्या ग्रहणकर्तृत्वाविषयीं कांहीं लिंग संभवत नाहीं. बरें ग्राहकत्व म्ह० साक्षित्व असें जर म्हणाल तर त्याचा दुसरा ग्राहक आहे; याविषयीं कांहीं प्रमाण नाहीं. ) तेव्हां ग्राहकाच्या अनवस्थेचा प्रसंगच नाहीं.

विज्ञानस्य व्यतिरिक्तग्राह्यत्वे करणान्तरापेक्षायामनवस्थेति चेत् । न । नियमाभावात् । न हि सर्वत्रायं नियमो भवति । यत्र वस्त्वन्तरेण गृह्यते वस्त्वन्तरं तत्र ग्राह्यग्राहकव्यतिरिक्तं करणान्तरं स्यादिति नैकान्तेन नियन्तुं शक्यते । वैचित्र्यदर्शनात् । कथम् । घटस्तावत्स्वात्मव्यतिरिक्तेनाऽऽत्मना गृह्यते तत्र प्रदीपादिरालोको ग्राह्यग्राहकव्यतिरिक्तं करणम् । न हि प्रदीपाद्यालोको घटांशश्चक्षुरंशो वा । घटवच्चक्षुर्ग्राह्यत्वेऽपि प्रदीपस्य चक्षुः प्रदीपव्यतिरेकेण न बाह्यमालोकस्थानीयं किंचित्करणान्तरमपेक्षते । तस्मान्नैव नियन्तुं शक्यते यत्र यत्र व्यतिरिक्तग्राह्यत्वं तत्र तत्र करणान्तरं स्यादेवेति । तस्माद्विज्ञानस्य व्यतिरिक्तग्राहकग्राह्यत्वे न करणद्वाराऽनवस्था नापि ग्राहकद्वारा कदाचिदप्युपपादयितुं शक्यते । तस्मात्सिद्धं विज्ञानव्यतिरिक्तमात्मज्योतिरन्तरमिति ॥

भाष्यार्थ—( ग्राहकाविषयींच्या अनवस्थेचा परिहार करून करणाविषयींच्या अनवस्थेचा परिहार करितात—) विज्ञान त्याहून व्यतिरिक्त पदार्थाकडून जर ग्राह्य असेल तर चक्षुरादिस्थानीय करण पाहिजे. म्ह० दुसऱ्या करणाची अपेक्षा असते, तें करणही ग्राह्य असल्यामुळें त्याला तिसऱ्या करणाची अपेक्षा होते आणि याप्रमाणें अनवस्था प्राप्त होते, म्हणून म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण असा कांहीं नियम नाहीं. हा नियम सर्वत्र संभवत नाहीं. जेथें एका वस्तूकडून दुसऱ्या वस्तूचें ग्रहण केलें जातें तेथें ग्राह्य व ग्राहक यांहून भिन्न असें दुसरेंच करण असावें, असा अव्यभिचारी नियम करतां येणें शक्य नाहीं. कारण याविषयीं वैचित्र्य दिसतें—निरनिराळा अनुभव येतो. ( वैचि-

ऱ्यदर्शनच व्यक्त करितात--) तो कसा? घट हा पदार्थ त्याहून अगदीं भिन्न अशा आत्म्याकडून ग्रहण केला जातो. त्या ग्रहणांत प्रदीपादिकांचा प्रकाश हें ग्राह्य--घट व ग्राहक--चक्षु यांहून व्यतिरिक्त करण--साधन आहे. प्रदीपादिकांचा प्रकाश हा घटाचाही अंश नव्हे किंवा चक्षूचाही अंश नव्हे. आतां प्रदीपाला घटाप्रमाणें चक्षुग्राह्यत्व जरी असलें तरी प्रदीपाचें ग्रहण करितांना चक्षु प्रदीपाहून निराळ्या बाह्य आलोकाच्या स्थानीं असलेल्या कोणत्याही दुसऱ्या करणाची अपेक्षा करीत नाहीं. यास्तव जेथें जेथें व्यतिरिक्तग्राह्यत्व असतें तेथें तेथें दुसरें करण असतेंच असा नियम करितां येणें शक्यच नाहीं. तस्मात् विज्ञानाला व्यतिरिक्त ग्राहकाचें ग्राह्यत्व जरी असलें तरी करणद्वारा अनवस्था होते, अथवा ग्राहकद्वारा अनवस्था होते असें केव्हांही उपपादन करतां येत नाहीं. तस्मात् विज्ञानव्यतिरिक्त दुसरी आत्मज्योति आहे, हें सिद्ध झालें.

ननु नास्त्येव बाह्योऽर्थो घटादिः प्रदीपो वा विज्ञानव्यतिरिक्तः। यद्धि यद्व्यतिरेकेण नोपलभ्यते तत्तावन्मात्रं वस्तु दृष्टम्। यथा स्वप्नविज्ञानग्राह्यं घटपटादिवस्तु स्वप्नविज्ञानव्यतिरेकेणानुपलम्भात्स्वप्नघटप्रदीपादेः स्वप्नविज्ञानमात्रताऽवगम्यते। तथा जागरितेऽपि घटप्रदीपादेर्जाग्रद्विज्ञानव्यतिरेकेणानुपलम्भाज्जाग्रद्विज्ञानमात्रतैव युक्ता भवितुम्। तस्मान्नास्ति बाह्योऽर्थो घटप्रदीपादिर्विज्ञानमात्रमेव तु सर्वम्। तत्र यदुक्तं विज्ञानस्य व्यतिरिक्तावभास्यत्वाद्विज्ञानव्यतिरिक्तमस्ति ज्योतिरन्तरं घटादेरिवेति तन्मिथ्या। सर्वस्य विज्ञानमात्रत्वे दृष्टान्ताभावात्॥

भाष्यार्थ—( याप्रमाणें बाह्यार्थवादी बौद्धाचें खंडन झालें असतां विज्ञानवादी आक्षेप करतो–) अहो पण घटादिक किंवा प्रदीप हा बाह्य अर्थच विज्ञानाहून व्यतिरिक्त नाहीं आणि जी वस्तु ज्या वस्तूहून

भिन्नत्वानें उपलब्ध होत नाहीं ती वस्तु तन्मात्र–तद्रूप असते, असा अनुभव येतो. जसें--स्वप्नांतील विज्ञानानें ग्राह्य असे घट-पटादि पदार्थ स्वप्नांतील विज्ञानाहून भिन्नत्वानें उपलब्ध होत नाहींत; त्यामुळें स्वप्नांतील घट, प्रदीप इत्यादि वस्तूंना स्वप्नविज्ञानमात्रत्व आहे, असा निश्चय होतो. त्याच न्यायानें जागरितांतही घट, प्रदीप इत्यादिकांचा जाग्रतींतील विज्ञानाहून व्यतिरेकानें अनुभव येत नसल्यामुळें त्यांना जाग्रद्विज्ञानमात्रत्वच असणें युक्त होय. तस्मात् घट, प्रदीप इत्यादि बाह्य अर्थ नाहीं, तर सर्व केवल विज्ञानमात्र आहे; आणि असें सिद्ध झालें असतां 'घटादिकांच्या प्रमाणें विज्ञान त्याहून व्यतिरिक्त असलेल्या साक्षीकडून प्रकाशित होणारें असल्यामुळें विज्ञानव्यतिरिक्त दुसरी ज्योति आहे,' असें जें तुम्ही वर म्हटलें आहे तें खोटें आहे. कारण सर्वांलाच विज्ञानमात्रत्व आहे, असें ठरल्यावर तद्व्यतिरिक्त ज्योति आहे, याविषयीं दृष्टान्ताचाच अभाव होतो.

न । यावत्तावदभ्युपगमात् । न तु बाह्योऽर्थो भवतैकान्तेनैव नाभ्युपगम्यते । ननु मया नाभ्युपगम्यत एव । न । विज्ञानं घटः प्रदीप इति च शब्दार्थपृथक्त्वाद्यावत्तावदपि बाह्यमर्थान्तरमवश्यमभ्युपगन्तव्यम् । विज्ञानादर्थान्तरं वस्तु न चेदभ्युपगम्यते विज्ञानं घटः पट इत्येवमादीनां शब्दानामेकार्थत्वे पर्यायशब्दत्वं प्राप्नोति । तथा साधनानां फलस्य चैकत्वे साध्यसाधनभेदोपदेशशास्त्रानर्थक्यप्रसङ्गः । तत्कर्तुरज्ञानप्रसङ्गो वा ॥

भाष्यार्थ—( याप्रमाणें बाह्यार्थच नाहींत; असें म्हणणाऱ्या वाद्याला दूषण देतात–) असें नाहीं. कारण तुम्हींही बाह्यार्थाचा थोडासा तरी अंगीकार केला आहे. ( याचेंच स्पष्टीकरण–) तुम्ही घटादि बाह्य अर्थ सर्वथा मानीतच नाहीं, असें नाहीं. अहो पण ( मी विज्ञानवादी बाह्य अर्थ विज्ञानमात्र आहेत असें मानीत असल्यामुळें ) मजकडून बाह्य अर्थ स्वीकारला जात नाहींच. ( सिद्धान्ती विज्ञानवाद्याकडून बाह्य

अर्थाचा बलात्कारानें स्वीकार करवितो—) असें नाहीं. ' कारण ' विज्ञानच घट आहे, विज्ञानच प्रदीप आहे, असे पृथक् व शब्द पृथक् अर्थ तुम्हीही योजीत असतां. यास्तव क्षणभर तरी बाह्य विज्ञानव्यतिरिक्त अर्थ तुम्हांला अवश्य मानला पाहिजे. ( हीच अन्वयमुखानें सांगितलेली गोष्ट व्यतिरेकमुखानें विशद करितात—) विज्ञानाहून निराळी वस्तु जर तुम्ही मानीत नसाल तर विज्ञान, घट, पट इत्यादि प्रकारच्या शब्दांना एकार्थत्व असल्यामुळें पर्यायशब्दत्व प्राप्त होतें. [ म्हणजे त्या सर्वांचा अर्थ एकच असल्यामुळें ते सर्व परस्पर पर्याय शब्द आहेत, असें होतें. आतां ज्ञान व ज्ञेय यांचें ऐक्य मानलें असतां दुसरा कोणता दोष येतो तें सांगतात—] आणि ते सर्व पर्यायशब्द आहेत असें झालें असतां साधनांचें व फलाचें एकत्व होऊन साधन व साध्य यांच्या भेदाचा उपदेश करणारें शास्त्र व्यर्थ होण्याचा प्रसंग येतो. तसेंच व्यर्थ असलेल्या शास्त्राचा उपदेश करणाऱ्या बुद्धाकडे अज्ञानत्वाचा प्रसंग येतो ( त्याच्या सर्वज्ञत्वाचा बाध होतो. )

किंचान्यत् । विज्ञानव्यतिरेकेण वादिप्रतिवादिवाददोषाभ्युपगमात् । न ह्यात्मविज्ञानमात्रमेव वादिप्रतिवादिवादस्तद्दोषो वाऽभ्युपगम्यते निराकर्तव्यत्वात्प्रतिवाद्यादीनाम् । न ह्यात्मीयं विज्ञानं निराकर्तव्यमभ्युपगम्यते स्वयं वाऽऽत्मा कस्यचित् । तथा च सति सर्वसंव्यवहारलोपप्रसङ्गः ॥

भाष्यार्थ—( ह्याही कारणानें सर्व पदार्थांना विज्ञानमात्रत्व नाहीं, असें सांगतात—) शिवाय बाह्यार्थ मानण्याचें दुसरेंही कारण आहे.( तेंच स्पष्ट करून सांगतात—) विज्ञानाहून भिन्नत्वानें वादी, प्रतिवादी, वाद व दोष यांचा अभ्युपगम[1] केलेला आहे. ( जें ग्राह्य असतें तें स्वतःहून व्यतिरिक्त पदार्थाकडून ग्राह्य असतें. जसें—प्रतिवादी वगैरे, असें अनुमान होत असल्यामुळें बाह्यार्थाचा अपलाप करितां येत नाहीं, असा

१ अभ्युपगम—अंगीकार स्वीकार.

भावार्थ. ) वादी व प्रतिवादी यांचा वाद किंवा त्याचा दोष विज्ञानमात्रच आहे, असें स्वीकारलें जात नाहीं. कारण प्रतिवाद्यादिकांचें निराकरण करावयाचें असतें. ( त्यांचें निराकरण जरी करावयाचें असलें तरी ज्ञानमात्रत्व कां नाहीं, अशी आशंका घेऊन त्यांना आत्मीय[1]ज्ञानमात्रत्व आहे, कीं आत्मज्ञानमात्रत्व आहे, असा विकल्प करून दोन्ही पक्षांचें क्रमानें निरसन करितात-) आत्मीय-आत्मसंबंधी विज्ञान निराकरण करण्यास योग्य आहे, असें किंवा स्वतः[2] आत्मा कोणालाही निराकरण करण्यास योग्य आहे, असें म्हणतां येत नाहीं. कारण त्यांतील कोणाचेंही निराकरण करतां येतें, असें म्हटल्यास सर्व संव्यवहाराचा लोप होण्याचा प्रसंग येतो.

न च प्रतिवाद्यादयः स्वात्मनैव गृह्यन्त इत्यभ्युपगमः । व्यतिरिक्तग्राह्या हि तेऽभ्युपगम्यन्ते । तस्मात्तद्वत्सर्वमेव व्यतिरिक्तग्राह्यं वस्तु जाग्रद्विषयत्वाज्जाग्रद्वस्तु प्रतिवाद्यादिवदिति सुलभो दृष्टान्तः । संतत्यन्तरवद्विज्ञानान्तरवच्चेति । तस्माद्विज्ञानवादिनाऽपि न शक्यं विज्ञानव्यतिरिक्तं ज्योतिरन्तरं निराकर्तुम् ॥

भाष्यार्थ—( विज्ञानवाद्याच्या सिद्धान्ताकडे जरी दृष्टि दिली तरी प्रतिवादी, वाद, दोष इत्यादिक विज्ञानाहून व्यतिरिक्त आहेत, असें सिद्ध होतें ) कारण प्रतिवादी, वाद, इत्यादि विज्ञानरूप स्वात्म्यांकडूनच ग्रहण केले जातात, असा विज्ञानवाद्यांचा सिद्धान्त नाहीं. ( कारण तसें जर असतें तर वादी, प्रतिवादी, वाद, दोष इत्यादि सर्व केवल विज्ञानरूपच असल्यामुळें विवादाचाच अभाव होणार ! ) विज्ञानवादी बौद्ध तर प्रतिवादी इत्यादिक त्यांहून व्यतिरिक्त अशा वाद्याकडून ग्रहण केले जातात, असें मानतात. तस्मात् त्याच न्यायानें सर्वच वस्तुजात व्यतिरिक्त ग्राहकाकडून ग्राह्य आहे. कारण त्याला जाग्रद्विषयत्व आहे. जाग्रतींतील प्रतिवाद्यादि वस्तूप्रमाणें, असा हा सुलभ दृष्टान्त आहे.

---

१ आत्मसंबंधी ज्ञानमात्रत्व. २ स्वतःकडूनच.

( शिवाय चैत्र या नांवाच्या मनुष्याच्या संतानानें मैत्राचा संतान व्यवहारावरून अनुमानानें जाणतां येतो. त्याचप्रमाणें सर्वज्ञाच्या ज्ञानानें असर्वज्ञांचीं ज्ञानें जाणलीं जातात. त्यामुळें विज्ञानवाद्याच्या मतींही भेद सिद्ध होतो, त्याच्याच दृष्टान्तावरून नीलादिक पदार्थ व त्याविषयींचें विज्ञान यांच्या भेदाचें अनुमान करितां येणें शक्य आहे, असें सांगतात--) दुसऱ्या संतानाप्रमाणें अथवा दुसऱ्या विज्ञानाप्रमाणें ( जाग्रद्विषयक वस्तु व्यतिरिक्त ग्राहकाकडून ग्राह्य आहे, त्यामुळें बाह्य विषयाचा अपलाप करितां येणें शक्य नाहीं) आणि तस्मात्--बाह्य अर्थाचा अपलाप अशक्य झाल्यामुळें--विज्ञानवाद्यालाही विज्ञानव्यतिरिक्त साक्षिज्योतीचें निराकरण करतां येणें शक्य नाहीं.

स्वप्ने विज्ञानव्यतिरेकाभावादयुक्तमिति चेत् । न । अभावादपि भावस्य वस्त्वन्तरत्वोपपत्तेः । भवतैव तावत्स्वप्ने घटादिविज्ञानस्य भावभूतत्वमभ्युपगतम् । तदभ्युपगम्य तद्व्यतिरेकेण घटाद्यभाव उच्यते । स विज्ञानविषयो घटादिर्यद्यभावो यदि वा भावः स्यादुभयथाऽपि घटादिविज्ञानस्य भावभूतत्वमभ्युपगतमेव । न तु तन्निवर्तयितुं शक्यते । तन्निवर्तकन्यायाभावात् ॥ एतेन सर्वस्य शून्यता प्रत्युक्ता । प्रत्यगात्मग्राह्यता चाऽऽत्मनोऽहमिति मीमांसकपक्षः प्रत्युक्तः ॥

भाष्यार्थ—( विज्ञानाहून अर्थाचा म्ह० विषयाचा भेद आहे, असें सांगून प्रत्यगात्मा विज्ञानाहून अतिरिक्त आहे, हें सांगितलें. आतां विषय ज्ञानाहून भिन्न नाहीं, कारण त्याला ग्राह्यत्व आहे. स्वप्नांतील ग्राह्याप्रमाणें, असें जें वर वाद्यानें म्हटलें होतें त्याचा अनुवाद करितात--) 'स्वप्नांत विषयांचा विज्ञानाहून भिन्नत्वानें अभाव असतो, वास्तव विषयाला विज्ञानाहून अतिरिक्तत्व असणें अयोग्य आहे,' म्हणून म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण अभावाहूनही भाव ही निराळी वस्तु आहे, असें म्हणणेंच उपपन्न आहे. ( याचाच विस्तार करितात--) कारण तुम्हीच तर स्वप्नांत घटादिविज्ञानाला भावभूतत्व ( घटादिविज्ञान भाव-

रूप आहे, असें—) मानलेलें आहे आणि घटादिविज्ञानाला भावरूप मानून त्या विज्ञानाहून भिन्नत्वानें घटादिकांचा अभाव तुम्हीच सांगतां. तो विज्ञानाचा विषय--घटादिक भावरूप असो कीं अभावरूप असो; पण तो कसाही जरी असला तरी घटादिविषयक विज्ञानाला भावरूप मानलेलेंच आहे. त्याचें निवर्तन करतां येणें शक्य नाहीं. कारण त्याची निवृत्ति करणाऱ्या न्यायाचा अभाव आहे. ( घटादिविज्ञान भावभूत आहे, असें मानलेलें आहे. त्यामुळें तें भावरूप अथवा अभावरूप घटादिविषयांहून निराळा पदार्थ आहे, हें सिद्ध होतें. त्यामुळें कोणत्या कां होईना पण बाह्य अर्थाचा स्वीकार करावा लागतो, त्यामुळें तुमचा स्वप्नविज्ञानाचा दृष्टान्त साध्यविकल आहे. म्हणजे दृष्टान्तांतील स्वप्नगत ग्राह्य विज्ञानमात्र नाहीं, त्याहून भिन्न आहे. )

( याच न्यायाच्या अतिदेशानें शून्यवादी माध्यमिक बौद्धाचें निरसन करितात—) ज्ञान व ज्ञेय यांचें निराकरण करतां येणें अशक्य आहे, असें सांगणाऱ्या या वचनानें सर्वांच्या शून्यत्वाचेंही प्रत्याख्यान केलें आहे, असें जाणावें. ग्राह्य असलेला जो आत्मा त्याचें 'अहं' असें प्रत्यगात्म्याकडूनच ग्रहण होतें. म्ह० त्याला 'अहं' अशी प्रत्यगात्मग्राह्यता आहे, असा जो मीमांसकांचा पक्ष आहे त्याचेंही प्रत्याख्यान या कथनानें झालें आहे, ( कारण एकालाच ग्राह्यत्व व ग्राहकत्व संभवत नाहीं. )

यत्तूक्तं सालोकोऽन्यश्चान्यश्च घटो जायत इति तदसत् । क्षणान्तरेऽपि स एवायं घट इति प्रत्यभिज्ञानात् । सादृश्यात्प्रत्यभिज्ञानं कृत्तोस्थितकेशनखादिष्विवेति चेत् । न । तत्रापि क्षणिकत्वस्यासिद्धत्वात् । जात्येकत्वाच्च । कृत्तेषु पुनरुत्थितेषु च केशनखादिषु केशनखत्वजातेरेकत्वात्केशनखत्वप्रत्ययस्तन्निमित्तोऽभ्रान्त एव । न हि दृश्यमानलूनोत्थितकेशनखादिषु व्यक्तिनिमित्तः स एवेति प्रत्ययो भवति । कस्यचिद्दीर्घकालव्यवहितदृष्टेषु च तुल्यपरिमाणेषु तत्काली-

नवालादितुल्या इमे केशनखाद्या इति प्रत्ययो भवति न तु त एवेति । घटादिषु पुनर्भवति स एवेति प्रत्ययः । तस्मान्न समो दृष्टान्तः ॥

भाष्यार्थ—( क्षणभंगवाद्यानें वर जें म्हटलें आहे त्याचा अनुवाद करून निराकरण करितात--) आतां 'प्रतिक्षणीं प्रकाशासह अन्य अन्य घट उत्पन्न होतो,' असें जें म्हटलें आहे तें खोटें आहे. कारण तो उत्पन्न झालेल्या क्षणाहून इतर क्षणींही ' तोच हा घट ' अशी प्रत्यभिज्ञा--ओळख होत असते. ' अगोदर कापून काढलेले व पुनः वाढलेले केंस, नखें इत्यादिकांविषयीं ' तोच हा केंस .' किंवा ' तेंच हें नख,' असें प्रत्यभिज्ञान केवल सादृश्यामुळें जसें होतें त्याप्रमाणें एका क्षणांतील घटासारखा दुसऱ्या क्षणांतील घट असल्यामुळें ' तोच हा घट ' अशी ओळख पटते,' म्हणून म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण तसें जरी असलें तरी त्यांचें क्षणिकत्व असिद्ध होतें. ( तरी पण ' तोच हा ' अशी प्रत्यभिज्ञा कशी होते ? म्हणून म्हणाल तर सांगतों) त्यांची जाति एक असल्यामुळें प्रत्यभिज्ञा होते. ( हेंच अधिक स्पष्ट करितात--) कापलेल्या व पुनः वाढलेल्या--केंस, नखें इत्यादिकांमध्यें केशत्व, नखत्व इत्यादि जाति एकच असल्यामुळें हा केंस, हें नख अशा प्रकारचा प्रत्यय जातिनिमित्तक व अभ्रान्त आहे, म्हणजे तो जातिनिमित्त खरा प्रत्यय आहे, मिथ्या नव्हे. ( पण तोच हा केंस इत्यादि प्रत्यय जातिनिमित्तच कसा ? व्यक्तिनिमित्त कां नाहीं ? तें सांगतात--) प्रत्यक्ष दिसणाऱ्या--प्रथम कापलेल्या व मागून पुनः वाढलेल्या--केंस-नखादिकांविषयीं 'तोच हा' असा प्रत्यय येणें शक्य नाहीं. (' अहो पण सादृश्यामुळें व्यक्तीलाच विषय करून केशादिकांविषयींचें तें प्रत्यभिज्ञान कां नव्हे,' तें सांगतात--) कोणाही अभ्रान्त पुरुषाला फार दिवसांपूर्वीं व भिन्न देशीं पाहिलेल्या तुल्य परिमाणांच्या केंस-नखादिकांविषयीं हे तत्कालीन केशादितुल्य केंस नखादिक आहेत,

असा प्रत्यय येतो; 'पण हे तेच आहेत,' असा प्रत्यय येत नाहीं. पण घटादिकांविषयीं 'तोच हा' असा प्रत्यय येतो. यास्तव घटादिकांना केंसादिकांचा दृष्टान्त सम नाहीं, विषम आहे. (त्यामुळें 'तोच हा' हा घटाविषयींचा प्रत्यय भ्रामक नाहीं, खरा आहे; त्याचप्रमाणें 'तोच हा केंस,' 'तेंच हें नख' इत्यादि प्रत्यय व्यक्तिविषयक नसून जातिविषयक जसे आहेत तसा 'तोच हा घट' हा प्रत्यय जातिविषयक नाहीं; तर व्यक्तिविषयक आहे. त्यामुळें त्याला क्षणिकत्व नाहीं.)

प्रत्यक्षेण हि प्रत्यभिज्ञायमाने वस्तुनि तदेवेति न चान्यत्वमनुमातुं युक्तं प्रत्यक्षविरोधे लिङ्गस्याऽऽभासत्वोपपत्तेः ॥ सादृश्यप्रत्ययानुपपत्तेश्च । ज्ञानस्य क्षणिकत्वात् । एकस्य हि वस्तुदर्शिनो वस्त्वन्तरदर्शने सादृश्यप्रत्ययः स्यात् । न तु वस्तुदर्श्येको वस्त्वन्तरदर्शनाय क्षणान्तरमवतिष्ठते । विज्ञानस्य क्षणिकत्वात्सकृद्वस्तुदर्शनेनैव क्षयोपपत्तेः ॥

भाष्यार्थ—('जें सत् तें क्षणिक असतें. ज्याप्रमाणें प्रदीपादिक. हे सर्व भाव पदार्थ सत् आहेत, त्यामुळें क्षणिक आहेत,' या अनुमानाशीं विरोध येत असल्यामुळें 'तो हा घट' हें प्रत्यभिज्ञान भ्रामक आहे, अशी आशंका घेऊन सांगतात–) 'तीच ही' अशा रीतीनें एकाद्या वस्तूला प्रत्यक्ष प्रमाणानें ओळखिलें जात असतांना 'ती वस्तु अन्य आहे, पहिल्या वस्तूहून भिन्न आहे,' असें अनुमान करणें योग्य नव्हे. कारण प्रत्यक्ष प्रमाणाशीं विरोध आला असतां लिंगाला आभासत्वच योग्य आहे. (त्याला खरें लिंग न समजतां लिंगाभास–हेत्वाभास मानणेंच योग्य आहे. अग्नि उष्ण नाहीं, असें अनुमान जरी केलें तरी त्याचा प्रत्यक्ष प्रमाणाशीं विरोध येत असल्यामुळें तें बाधित होतें, त्याचप्रमाणें 'तो हा घट' या प्रत्यक्षाच्या विरुद्ध 'घट क्षणिक आहे' असें अनुमानच संभवत नाहीं. कारण अनुमानाचा विषय अबाधित असावा लागतो, असा भावार्थ.)

( याही कारणानें प्रत्यभिज्ञान हा सादृश्यामुळें होणारा भ्रम नव्हे, असें सांगतात-) ज्ञानाला क्षणिकत्व असल्यामुळें सादृश्य प्रत्ययाचीही अनुपपत्ति आहे. ( ' अहो पण ज्ञान जरी क्षणिक असलें तरी सादृश्य-प्रत्यय येण्यास कोणती हरकत आहे ?' अशी आशंका घेऊन सांगतात-) एका वस्तुदर्शी पुरुषाला दुसऱ्या वस्तूचें जर दर्शन होईल तर ' हें त्या-सारखें ' असा सादृश्य प्रत्यय येईल. ( ' एक द्रष्टा दोन वस्तु पाहतो, असेंच समजूं या' म्हणून म्हणाल तर तसा शाक्यसिद्धान्त नाहीं, असें सांगतात-) पण एका वस्तूला पाहणारा दुसरी वस्तु पाहण्यास दुसऱ्या क्षणीं रहातच नाहीं. कारण विज्ञानाला क्षणिकत्व असल्यामुळें एकदा एक वस्तु पाहण्यानेंच त्याचा क्षय होणें उपपन्न आहे.

तेनेदं सदृशमिति हि सादृश्यप्रत्ययो भवति । तेनेति दृष्टस्मरण-मिदमिति वर्तमानप्रत्ययः । तेनेति दृष्टं स्मृत्वा यावदिदमिति वर्तमान-क्षणकालमवतिष्ठेत । ततः क्षणिकवादहानिः । अथ तेनेत्येवोपक्षीणः स्मार्तः प्रत्यय इदमिति चान्य एव वार्तमानिकः प्रत्ययः क्षीयते ततः सादृश्यप्रत्ययानुपपत्तिस्तेनेदं सदृशमिति । अनेकदर्शिन एकस्या-भावात् ॥

भाष्यार्थ—( वर सांगितलेला अर्थच विशद करितात-) ' हें त्या-च्याशीं-त्याच्या-सारखें ' असाच सादृश्यप्रत्यय होतो. ' तेन ' म्हणजे त्याच्याशीं हें पूर्वी पाहिलेल्याचें स्मरण आहे; आणि ' हें ' हा वर्तमान प्रत्यय आहे. पण ' तेन ' म्ह० त्याच्याशीं, असें पूर्वी पाहिलेलें आठ-वून जर ' हें ' असें म्हणण्यास द्रष्टा वर्तमानक्षणकालापर्यंत राहील तर क्षणिकवादाची हानि होईल. आतां तुम्ही कदाचित् म्हणाल कीं ' त्याच्याशीं ' एवढ्यानें स्मरणसंबंधी प्रत्यय उपक्षीण झाला; व ' हें ' असा हा दुसराच वर्तमान कालीन प्रत्यय असून तोही तत्काल क्षीण होतो. तर ' त्याच्याशीं हें सदृश आहे ' अशा सादृश्यप्रत्ययाची अनु-पपत्ति होते. कारण क्षणवाद्याच्या मतीं एकाला अनेक पदार्थांचें दर्शन होत नाहीं. ( द्रष्टा एक पदार्थ पाहतांच क्षय पावतो. )

व्यपदेशानुपपत्तिश्च । द्रष्टव्यदर्शनेनैवोपक्षयाद्विज्ञानस्येदं पश्याम्य-दोऽद्राक्षमितिव्यपदेशानुपपत्तिर्द्दष्टवतो व्यपदेशक्षणानवस्थानात् । अ-थावतिष्ठेत क्षणिकवादहानिः । अथादृष्टवतो व्यपदेशः सादृश्यप्रत्य-यश्च तदानीं जात्यन्धस्येव रूपविशेषव्यपदेशस्तत्सादृश्यप्रत्ययश्च सर्व-मन्धपरंपरेति प्रसज्येत सर्वज्ञशास्त्रप्रणयनादि न चैतदिष्यते ॥ अकृ-ताभ्यागमकृतविप्रणाशदोषौ तु प्रसिद्धतरौ क्षणवादे ॥

भाष्यार्थ—( क्षणभंगवादावर दुसरा दोष– ) तशीच व्यपदेशाची अनुपपत्ति होते. ( या सूत्रभूत वाक्याचाच विस्तार करितात–)विज्ञान द्रष्टव्य पदार्थांच्या दर्शनानेंच उपक्षीण झाल्यामुळें 'हें पाहतों, तें पा-हिलें' इत्यादि निर्देशाची अनुपपत्ति होते. कारण पाहणाऱ्या विज्ञा-नाचें- निर्देश करावयाचा जो उत्तर क्षण ( ज्यांत 'हें पाहिलें व हें पाहतों' असें म्हणावयाचें तो क्षण ) त्या क्षणापर्यंत -अवस्थानच होत नाहीं; आणि जर तें राहील तर क्षणिकवादाची हानि होईल. ( ती होऊं नये म्हणून द्रष्टा निराळा व 'मीं पाहिलें, मी पाहतों,' असा व्यपदेश –निर्देश करणारा निराळा,अशी आशंका घेऊन तिचा परिहार करितात–) आतां न पाहिलेल्याचाच वरील व्यपदेश व सादृश्यप्रत्यय आहे, म्हणून म्हणाल तर जात्यन्धानें जसा विशेष रूपाचा व्यपदेश करावा अथवा त्याला सादृश्याचा प्रत्यय यावा, तसाच तो व्यपदेश व सादृश्यप्रत्यय आहे. त्यामुळें सर्वज्ञ बुद्ध देवानें शास्त्रनिर्माण करणें, साध्य, साधनें इत्यादि सर्व ही शुद्ध अंधपरंपरा आहे, असें म्हणावें लागेल. पण तें तर इष्ट नाहीं. ( तस्मात् क्षणभंगवाद अप्रामाणिक आहे. )

( त्या पक्षावर आणखीं एक दोष देतात--) क्षणवादामध्यें अकृत अभ्यागम व कृतविप्रणाश हे दोष तर अतिशय प्रसिद्ध आहेत.

दृष्टव्यपदेशहेतुः पूर्वोत्तरसहित एक एव हि शृङ्खलावत्प्रत्ययो जायत इति चेत् । तेनेदं सदृशमिति च । न । वर्तमानातीतयोर्भिन्न-कालत्वात् । तत्र वर्तमानप्रत्यय एकः शृङ्खलावयवस्थानीयोऽतीतश्चा-

परस्तौ प्रत्ययौ भिन्नकालौ तदुभयप्रत्ययविषयस्पृक्चेच्छृङ्खलाप्रत्ययस्ततः क्षणद्वयव्यापित्वादेकस्य विज्ञानस्य पुनः क्षणवादहानिः। ममतवतादिविशेषानुपपत्तेश्च सर्वसंव्यवहारलोपप्रसङ्गः॥

भाष्यार्थ—( व्यपदेशाची अनुपपत्ति वर जी दाखविली आहे तिचें समाधान करणारा क्षणभंगवादी शंका घेतो–)पूर्वी पाहिलेल्या पदार्थाच्या निर्देशाचा–व्यपदेशाचा हेतु-कारण, असा पूर्वोत्तरप्रत्यययुक्त–सांखळी सारखा--एकच प्रत्यय उत्पन्न होतो आणि 'हें त्याच्या सारखें आहे' हा सादृश्यप्रत्ययही त्या शृंगलास्थानीय प्रत्ययानेंच होतो, म्हणून म्हणाल तर तें बरोबर नाहीं.कारण वर्तमान व भूत हे अगदीं भिन्न काल आहेत.त्या दोन प्रत्ययांतील शृंखलेच्या अवयवाच्या–दुव्याच्या स्थानीं असलेला वर्तमान प्रत्यय एक व भूत प्रत्यय दुसरा आहे. ते दोन्ही प्रत्यय भिन्न कालीन आहेत. ( यांचा काल एक नाहीं. ) आतां ते दोन्ही प्रत्यय, याच विषयांस स्पर्श करणारा असा जर शृंखलाप्रत्यय असेल [ त्या दोन प्रत्ययांना जोडणारा असा जर तिसरा प्रत्यय असेल ] तर एका विज्ञानाला क्षणद्वयव्यापित्व असल्यामुळें पुनः क्षणवादाची हानि होते. ( 'असें जर होत असेल तर क्षणांचा परस्पर संबंध न होवो,' म्हणून म्हणाल तर मग ) ममत्व, तवत्व–तुझेपणा इत्यादि विशेषांची अनुपपत्ति होत असल्यामुळें सर्व संव्यवहाराचा लोप होण्याचा प्रसंग येतो. ( अर्थात् व्यपदेश व सादृश्यप्रत्यय यांची अनुपपत्ति स्थिरच राहिली. )

सर्वस्य च स्वसंवेद्यविज्ञानमात्रत्वे विज्ञानस्य च स्वच्छावबोधावभासमात्रस्वाभाव्याभ्युपगमात्तद्दर्शिनश्चान्यस्याभावेऽनित्यदुःखशून्यानात्मत्वाद्यनेककल्पनानुपपत्तिः॥

भाष्यार्थ—( आतां विज्ञान दुःखादिकांनीं दूषित होईल, असें जें शाक्याचें म्हणणें आहे त्यावर दोष देतात–) आणि सर्वांला स्वसंवेद्य विज्ञानमात्रत्व असून विज्ञानाचा स्वच्छ ज्ञानप्रकाशमात्रत्व हा स्वभाव मानलेला असल्यामुळें व त्याच्या दुसऱ्या साक्षीचा अभाव असल्यामुळें

अनित्य, दुःख, अनात्मत्व इत्यादि अनेक कल्पनांची अनुपपत्ति आहे. ( विज्ञान शुद्ध आहे, व विषयांशीं होणाऱ्या त्याच्या संसर्गाला पहाणारा दुसरा साक्षी नाहीं, त्यामुळें ज्ञानाला दुःखादिकांचा संसर्ग होत नाहीं. कारण त्या विज्ञानाला स्वसंवेद्य मानलेलें आहे, असा भावार्थ. )

न च दाडिमादेरिव विरुद्धानेकांशवत्त्वं विज्ञानस्य । स्वच्छावभासस्वाभाव्याद्विज्ञानस्य । अनित्यदुःखादीनां विज्ञानांशत्वे च सत्यनुभूयमानत्वव्यतिरिक्तविषयत्वप्रसङ्गः ॥

भाष्यार्थ—( ज्ञानाचा शुद्ध बोध ह्याच एक स्वभाव आहे--तो बोधैकरस आहे हें म्हणणें बरोबर नाहीं. कारण डाळिंबादिकांप्रमाणें तो नानाविध दुःखादि अंशांनीं युक्त आहे, असें मानलेलें आहे अशी आशंका घेऊन सांगतात—) डाळिंबादिकांप्रमाणें विज्ञानाला विरुद्ध अनेक अंश आहेत, असेंही म्हणतां येत नाहीं. कारण विज्ञानाचें स्वरूप शुद्ध प्रकाश हें आहे. अनित्य दुःखादिकांना विज्ञानाचें अंशत्व आहे, ते विज्ञानाचे अंश आहेत, असें जर म्हटलें तर दुःखादिकांचा अनुभव येत असल्यामुळें त्यांना व्यतिरिक्तविषयत्व आहे, म्ह० ते विषय विज्ञानाहून निराळे आहेत, असें म्हणण्याचा प्रसंग येतो. ( दुःखादिकांना जर विज्ञानाचें धर्मत्व असेल तर त्यांचा अनुभव येत असल्यामुळें ते विज्ञानाहून व्यतिरिक्त आहेत. असें ठरतें. कारण धर्म केवल धर्मिमात्र असणें युक्त नाहीं. त्याचप्रमाणें प्रमेय नेहमींच प्रमाणांहून भिन्न वस्तु असतें. यास्तव जें मेय तो ज्ञानाचा अंश होऊं शकत नाहीं. घटादिक हे मेय -प्रमाणाचे विषय आहेत. ते जसे ज्ञानाचे अंश नव्हेत त्याचप्रमाणें दुःखादि मेय ज्ञानाचे अंश नव्हेत, असा भावार्थ. )

अथानित्यदुःखाद्यात्मैकत्वमेव विज्ञानस्य तदा तद्वियोगाद्विशुद्धिकल्पनानुपपत्तिः । संयोगिमलवियोगाद्धि विशुद्धिर्भवति । यथाऽऽदर्शप्रभृतीनाम् । न तु स्वाभाविकेन धर्मेण कस्यचिद्वियोगो दृष्टः । न ह्यग्नेः स्वाभाविकेन प्रकाशेनौष्ण्येन वा वियोगो दृष्टः ॥

भाष्यार्थ—( दुःखादिक हा ज्ञानाचा धर्म नव्हे तर स्वरूपच आहे, या आशंकेचा अनुवाद करून त्यावर दोष सांगतात–) आतां 'विज्ञानाला अनित्य दुःखादिरूपत्वच आहे,' म्हणून म्हणाल तर मग 'त्याच्या वियोगामुळें विज्ञानाची विशुद्धि होते' ही कल्पना अयोग्य ठरते. कारण संयोग पावणाऱ्या मळाच्या वियोगामुळेंच द्रव्याची विशुद्धि होत असते, हें प्रसिद्ध आहे. जसें–आरसा इत्यादि पदार्थांवरील मळ घालविला असतां ते शुद्ध होतात. पण स्वाभाविक धर्माशीं कोणाचा वियोग झालेला आढळत नाहीं. अग्नीचा स्वाभाविक प्रकाशाशीं अथवा उष्णतेशीं वियोग होत असल्याचें दिसत नाहीं.

यदपि पुष्पगुणानां रक्तत्वादीनां द्रव्यान्तरयोगेन वियोजनं दृश्यते तत्रापि संयोगपूर्वत्वमनुमीयते। बीजभावनया पुष्पफलादीनां गुणान्तरोत्पत्तिदर्शनात्। अतो विज्ञानस्य विशुद्धिकल्पनानुपपत्तिः॥

भाष्यार्थ—('पुष्पाच्या स्वाभाविक लालीचा वगैरे वियोग दिसतो,' अशी आशंका घेऊन सांगतात–) 'पुष्पांच्या रक्तत्वादि गुणांचा दुसऱ्या[1] द्रव्याच्या योगानें वियोग होत असल्याचें दिसतें,' असें जें तुम्हीं म्हटलें आहे, त्यांतही संयोगपूर्वकत्वाचें अनुमान होतें. [ म्हणजे तो गुणांचा वियोग इतर द्रव्याच्या अवयवांच्या संयोगामुळें होतो, असें अनुमान होतें.] पुष्पाच्या गुणांचा वियोग संयोगपूर्वक आहे. कारण त्याला विभागत्व आहे, तो विभाग आहे. दोन बकऱ्यांच्या विभागाप्रमाणें, असें त्याविषयीं अनुमान होतें. कारण कोणत्याही स्वाभाविक धर्माचा नाश ती वस्तु असेपर्यंत होत नाहीं, असा भावार्थ. आतां या अनुमानाच्या अनुसार प्रत्यक्षही दाखवितात–कापसाच्या सरक्या व तशींच इतर बीजें यांमध्यें विशेष द्रव्याचा संपर्क झाल्यामुळें रक्तत्वादि वासनेनें ( बीजगत भावनेनें ) त्यापासून झालेल्या झाडावरील पुष्पें,

[1] पुष्पसंबंधी अवयव पुष्पाच्या गुणाचे आरंभक होतात, आपला गुण दुसऱ्यांत उत्पन्न करूं शकतात.

फळें इत्यादिकांत रक्तत्वादि गुण उत्पन्न होत असल्याचें दिसतें. (अर्थात् त्या बीजाशीं संयुक्त झालेल्या द्रव्याच्या अनुवृत्तीमुळेंच त्याच्या पुष्पादिकांत रक्तत्वादि गुणांची अनुवृत्ति होते, असा भावार्थ. असो; आतां विज्ञानाच्या विशुद्धीच्या अनुपपत्तीचा उपसंहार करितात.) यास्तव विज्ञान अनित्य दुःखादिस्वरूप आहे, असें म्हटल्यास त्याच्या विशुद्धीच्या कल्पनेचीच अनुपपत्ति होते.

विषयविषय्याभासत्वं च यन्मलं परिकल्प्यते विज्ञानस्य तदप्यन्यसंसर्गाभावादनुपपन्नम् । न ह्यविद्यमानेन विद्यमानस्य संसर्गः स्यात् । असति चान्यसंसर्गे यो धर्मो यस्य दृष्टः स तत्स्वभावत्वान्न तेन वियोगमर्हति । यथाऽग्नेरौष्ण्यं सवितुर्वा प्रभा । तस्मादनित्यसंसर्गेण मलिनत्वं तद्विशुद्धिश्च विज्ञानस्येतीयं कल्पनाऽन्धपरंपरैव प्रमाणशून्येत्यवगम्यते ॥

भाष्यार्थ—( आणखीं एका कल्पाचा अनुवाद करून त्यावर दोष देतात–) जें मळाची कल्पना करवितें तें विज्ञानाचें विषयविषय्याभासत्वही अनुपपन्न आहे. कारण विज्ञानाचा अन्य विषयाशीं संसर्गच होत नाहीं: ( 'ज्ञानाचा विषयाशीं असंसर्ग कसा ? कारण त्याचा विषयाशीं संसर्ग होतो,' अशी आशंका घेऊन म्हणतात–) विद्यमान पदार्थाचा अविद्यमान पदार्थाशीं संसर्ग होत नाहीं ['आणि अन्य संसर्गावाचूनही ज्ञानाला विषयाभासत्व व विषयीच्या रूपानें आभासत्व होऊं शकेल' म्हणून म्हणाल तर] अन्य पदार्थाशीं संसर्ग झालेला नसतांना ज्याचा जो धर्म अनुभवाला येतो तो त्याचा स्वभावच असल्यामुळें त्याच्याशीं त्याचा वियोग होणें योग्य नाहीं. जसें—अग्नीचें उष्णत्व किंवा सूर्याची प्रभा. तस्मात् अनित्य दुःखादिकाशीं संसर्ग झाल्यानें विज्ञानाला मलिनत्व येतें व त्याचा वियोग झाल्यानें त्याची विशुद्धि होते ही कल्पना शुद्ध अंधपरंपरा असून प्रमाणशून्य आहे, असें सिद्ध होतें.

यदपि तस्य विज्ञानस्य निर्वाणं पुरुषार्थं कल्पयन्ति तत्रापि फलाश्रयानुपपत्तिः। कण्टकविद्धस्य हि कण्टकवेधजनितदुःखनिवृत्तिः फलं न तु कण्टकविद्धमरणे तद्दुःखनिवृत्तिफलस्याऽऽश्रय उपपद्यते। तद्वत्सर्वनिर्वाणेऽसति च फलाश्रये पुरुषार्थकल्पना व्यर्थैव। यस्य हि पुरुषशब्दवाच्यस्य सत्त्वस्याऽऽत्मनो विज्ञानस्य चार्थः परिकल्प्यते तस्य पुनः पुरुषस्य निर्वाणे कस्यार्थः पुरुषार्थ इति स्यात्। यस्य पुनरस्त्यनेकार्थदर्शी विज्ञानव्यतिरिक्त आत्मा तस्य दृष्टस्मरणदुःखसंयोगवियोगादि सर्वमेवोपपन्नमन्यसंयोगनिमित्तं कालुष्यं तद्वियोगनिमित्ता च विशुद्धिरिति॥

भाष्यार्थ —( दुसऱ्या कल्पनेला उत्थापित करितात–) त्याचप्रमाणें त्या विज्ञानाचें निर्वाण म्ह० उपशांति हाच पुरुषार्थ आहे, असें जें ते बौद्ध कल्पितात त्यांतही फलाश्रयाची अनुपपत्ति होते. ( 'फलाचा आश्रय जरी नसला तरी फल होईल,' म्हणून म्हणाल तर तें बरोबर नाहीं, असें सांगतात–) ज्याच्या पायांत कांटा बोंचला आहे त्याच्या–कांटा टोंचल्यामुळें होणाऱ्या–दुःखाची निवृत्ति होणें हें फळ आहे. पण ज्याला कांटा लागला आहे तो जर मेला तर मरणामुळें होणारी जी कंटकवेधजन्य दुःखाची निवृत्ति त्या फलाचा तो आश्रय होऊं शकत नाहीं. त्याचप्रमाणें सर्व निर्वाण होऊन फलाचा आश्रयही जर नाहींसा झाला तर पुरुषार्थकल्पना व्यर्थच होते. ( दार्ष्टान्तिकाचें विवरण करितात–) ज्या पुरुषशब्दवाच्य सत्त्वाचा–आत्म्याचा–विज्ञानाचा अर्थ कल्पिला जातो त्याच पुरुषाचें निर्वाण झाल्यावर कोणाचा अर्थ पुरुषार्थ या शब्दाला पात्र होईल, ( विज्ञान हा पुरुषच उपशांत झाल्यावर पुरुषार्थ कोणाचा ? 'अहो पण तुमच्या मतींही वस्तु अद्वय व असंग असल्यामुळें तिचा कोणाशींही संयोग-वियोग संभवत नाहीं, त्यामुळें वस्तूला फलित्व संभवत नाहीं, त्यामुळें मोक्षाचा असंभव,इत्यादि सर्व दोष तुम्हांवरही येतात;' अशी आशंका घेऊन सांगतात–) पण ज्याच्या मतीं

अनेक विषयांचा साक्षी विज्ञानाहून अतिरिक्त आत्मा आहे त्याला पूर्वी पाहिलेल्या वस्तूचें स्मरण, दुःखाचा संयोग, वियोग इत्यादि सर्वच उपपन्न आहे. अन्यसंयोगाच्या निमित्तानें कलुषितपणा व त्याच्या वियोगाच्या निमित्तानें विशुद्धि संभवते. ( पूर्ण ब्रह्म वस्तुतः असंग आहे, असेंच आम्ही मानतों. तथापि क्रिया, कारण, फल हा भेद अविद्यामात्रकृत असल्यामुळें आमच्या मतीं अविद्यावस्थेंत सर्व व्यवहार संभवतो. )

शून्यवादिपक्षस्तु सर्वप्रमाणविप्रतिषिद्ध इति तन्निराकरणाय नाऽऽदरः क्रियते ॥ ७ ॥

भाष्यार्थ—( 'बाह्यार्थवादाचें व विज्ञानवादाचें जसें तुम्ही निराकरण केलें आहे, तसेंच शून्यवादाचेंही निराकरण करणें उचित आहे;' असें कोणी म्हणेल म्हणून सांगतात–) शून्यवाद्यांचा पक्ष तर सर्वप्रमाणांनीं विशेषतः प्रतिषिद्ध आहे. यास्तव त्याचें निराकरण करण्याविषयीं फारसा आदर केला जात नाहीं. ( सर्व पदार्थ विद्यमान आहेत, असें भान होतें; व सर्व प्रमाणें विद्यमान वस्तूंनाच विषय करितात. त्यामुळें शून्य प्रमाणाचा विषयच होत नाहीं. त्यामुळें त्याची प्राप्ति नाहीं. शून्याची प्राप्तिच नसल्यामुळें तें निराकरणासही योग्य नाहीं. शिवाय शून्यवाद्यानेंच विषयनिराकरणाच्या योगानें शून्याचा प्रतिषेध केला आहे. त्या शून्याचें स्फुरण होतें असें म्हटलें अथवा होत नाहीं, असें म्हटलें तरी सर्व शून्य आहे, असें ठरत नाहीं. त्याचप्रमाणें 'शून्यवादी तरी आहे कीं नाहीं,' या प्रश्नाचें 'तो आहे' असें किंवा 'तो नाहीं' असें जरी उत्तर दिलें तरी शून्यवादाची अनुपपत्ति होते. शून्यवादी 'संवृतीनें म्ह० अविद्येनें पदार्थाचें भान होतें' असें म्हणतात, पण शून्यवादांत संवृतीला आश्रयच नाहींसा होतो. त्यामुळें त्या अविद्येचाच असंभव होतो. पण तिचा आश्रय मानल्यास शून्याचें स्वरूपच नष्ट होतें. ती आश्रयावाचूनच राहते असें मानल्यास तिला संवृतित्वच

राहत नाहीं. कारण आवरण घालणाऱ्या संवृतीला आश्रय अवश्य पाहिजे. तात्पर्य शून्यवादांत असे अनेक दोष असल्यामुळें आम्ही त्याचें निराकरण करीत नाहीं. तस्मात् बुद्ध्यादिकांहून अतिरिक्त, नित्यसिद्ध, अत्यन्त शुद्ध, कूटस्थ, अद्वय, आत्मज्योति सिद्ध झाली.) ७.

स वा अयं पुरुषो जायमानः शरीरमभि-
संपद्यमानः पाप्मभिः सꣳसृज्यते स उत्क्रा-
मन्म्रियमाणः पाप्मनो विजहाति ॥ ८ ॥

अर्थ—तोच हा पुरुष उत्पन्न होणारा–शरीरास आत्मा समजणारा असा होत्सातां पापांनीं म्ह० शरीरेंद्रियांनीं संयुक्त होतो. पण तोच मरूं लागला असतां–एक शरीर सोडून दुसऱ्या शरीरास जाऊं लागला असतां त्या देहेंद्रियांस सोडतो; त्यांचा परित्याग करतो. ८.

यथैवेहैकस्मिन्देहे स्वप्नो भूत्वा मृत्यो रूपाणि कार्यकरणान्यतिक्रम्य स्वप्ने स्व आत्मज्योतिष्यास्त एवम् ॥ स वै प्रकृतः पुरुषोऽयं जायमानः । कथं जायमान इत्युच्यते । शरीरं देहेन्द्रियसंघातमभिसंपद्यमानः शरीर आत्मभावमापद्यमान इत्यर्थः । पाप्मभिः पाप्मसमवायिभिर्धर्माधर्माश्रयैः कार्यकरणैरित्यर्थः। संसृज्यते संयुज्यते स एवोत्क्रामञ्छरीरान्तरमूर्ध्वं क्रामन्गच्छन्म्रियमाण इत्येतस्य व्याख्यानमुत्क्रामन्निति । तानेव संश्लिष्टान्पाप्मरूपान्कार्यकरण लक्षणान्विजहाति तैर्वियुज्यते तान्परित्यजति ॥

भाष्यार्थ—( याप्रमाणें प्रसंगप्राप्त परपक्षाचें निराकरण करून श्रुतिव्याख्यानाचेंच अनुवर्तन करणारे भाष्यकार पुढील वाक्याचें तात्पर्य सांगतात–) ज्याप्रमाणें येथें–एका देहांत आत्मा स्वप्न होऊन मृत्यूचीं रूपें अशीं जीं कार्यकरणें–शरीरेंद्रियें त्यांचें अतिक्रमण करून स्वप्नामध्यें स्वरूपांत–आत्मज्योतींत राहतो त्याप्रमाणें ( दुसऱ्या देहांतही वर्तमान जन्म सोडून दुसरा जन्म घेणारा आत्मा कार्य-करणांचें अतिक्रमण

करतो, असा या वाक्यास शेष लावावा. यास्तव स्वप्न व जागरित यांतील संचारामुळें तो देहादिकांहून अतिरिक्त आहे, हें जसें ठरतें त्याचप्रमाणें तो इहलोक व परलोक यांतून संचार करतो, असें म्हटल्यानेंही तो देहादिकांहून अतिरिक्त आहे, असें होतें, हें पुढील वाक्यानें सांगितलें जातें, असा भावार्थ. )

( असो, आतां पुढील वाक्य घेऊन त्याचें व्याख्यान करितात–) 'स वा अयं पुरुषो जायमानः-' तोच हा प्रकृत पुरुष जायमान–उत्पन्न होणारा आहे. त्याला 'जायमान' कसें म्हटलें जातें ? ( तेंच श्रुतींतील अक्षरांनीं सांगतात–) 'शरीरं अभिसंपद्यमानः-' शरीराला म्ह० देहेंद्रियसंघाताला सर्वप्रकारें संपन्न होणारा म्ह० शरीरामध्यें 'हाच मी' अशा आत्मभावास प्राप्त होणारा असा भावार्थ. 'पाप्मभिः' पापाचे समवायी, धर्म व अधर्म यांचे आश्रय, यांशीं म्हणजे शरीरेंद्रियांशीं असा भावार्थ, 'संसृज्यते-' संयुक्त केला जातो. 'स उत्क्रामन्०-' पण तोच दुसऱ्या शरीरास 'उत्' म्ह० ऊर्ध्व व 'क्रामन्' म्ह० जाणारा एका शरीरास सोडून दुसऱ्या शरीरास जाणारा असा तो, श्रुतींतील 'म्रियमाणः-' मरणारा याचें व्याख्यान 'उत्क्रामन्' हें आहे. 'पाप्मनः-' त्याच संयुक्त झालेल्या कार्यकरणलक्षण पापरूपांस विशेषतः टाकतो. त्यांशीं वियुक्त होतो. त्यांचा–शरीरेंद्रियांचा–परित्याग करतो.

यथाऽयं स्वप्नजाग्रद्वृत्त्योर्वर्तमान एवैकस्मिन्देहे पाप्मरूपकार्यकरणोपादानपरित्यागाभ्यामनवरतं संचरति धिया समानः सन् । तथा सोऽयं पुरुष उभाविहलोकपरलोकौ जन्ममरणाभ्यां कार्यकरणोपादानपरित्यागावनवरतं प्रतिपद्यमान आ संसारमोक्षात्संचरति । तस्मात्सिद्धमस्याऽऽत्मज्योतिषोऽन्यत्वं कार्यकरणरूपेभ्यः पाप्मभ्यः संयोगवियोगाभ्याम् । न हि तद्धर्मत्वे सति तैरेव संयोगो वियोगो वा युक्तः ॥८॥

भाष्यार्थ—( ह्याच अर्थाचा दृष्टान्त रूपानें अनुवाद करितात–) ज्याप्रमाणें हा एका देहांतच असतांना स्वप्न व जाग्रत् या वृत्तींमध्यें

पाप्मरूप कार्य-करणांचें उपादान करणें व त्यांचा परित्याग करणें यांच्या द्वारा बुद्धीशीं सदृश होत्साता सतत संचार करतो, त्याप्रमाणें तो हा पुरुष दोन लोकांत म्ह० इह लोकीं व परलोकीं सतत संचार करतो. ( संचाराचा प्रकार प्रकट करितात–) जन्मानें शरीरेंद्रियांचें उपादान व मरणानें त्यांचा परित्याग यांस अविच्छिन्नपणें प्राप्त होणारा तो संसारापासून मोक्ष होईपर्यंत सतत संचार करतो [ व दुःखी होतो, असा भावार्थ.] तस्मात् म्हणजे या संयोग-वियोगांवरून आत्मज्योतीचें शरीरेंद्रियरूप पापांहून अन्यत्व सिद्ध झालें. ( तें कसें तेंच स्पष्ट करितात–) आत्मज्योतीला शरीरेंद्रियांचें धर्मत्व जर असतें म्ह० चैतन्य जर संघाताचा धर्म असता तर त्याचा शरीरेंद्रियांशीं संयोग व वियोग होणें उचित नव्हतें. ( कारण स्वाभाविक धर्माचा स्वभाव असेपर्यंत संयोग व वियोग होत नाहीं. कारण अग्नि व त्याची उष्णता यांचा नित्यसंबंध दिसतो. पण आत्मा व शरीरेंद्रियें यांचा संयोग व वियोग होतो. त्यामुळें शरीरेंद्रियांना स्वाभाविकत्व नाहीं. त्यावरून आत्म्याचें देहेंद्रियातीतत्व सिद्ध झालें, असा भावार्थ. ) ८.

तस्य वा एतस्य पुरुषस्य द्वे एव स्थाने
भवत इदं च परलोकस्थानं च संध्यं तृतीयꣳ
स्वप्नस्थानं तस्मिन्संध्ये स्थाने तिष्ठन्नेते
उभे स्थाने पश्यतीदं च परलोकस्थानं च ॥

अर्थ—त्याच या पुरुषाचीं दोनच स्थानें असतात. हें स्थान व परलोकस्थान. तिसरें स्वप्नस्थान हें संध्य स्थान आहे. त्या संध्यस्थानामध्यें राहणारा पुरुष हें स्थान व परलोक स्थान हीं दोन्ही स्थानें पाहतो.

अथ यथाक्रमोऽयं परलोकस्थाने भवति
तमाक्रममाक्रम्योभयान्पाप्मन आनन्दाꣳश्च
पश्यति ॥

अर्थ—आतां ( तो तीं स्थानें कशीं पाहतो तें ऐक. ) हा पुरुष परलोकप्राप्तीच्या निमित्तानें जशा प्रकारच्या आक्रमानें—परलोकप्राप्तिसाधनानें—युक्त होतो त्याच आक्रमाचा आश्रय करून पापफळें--दुःखें व धर्मफळें--आनंद या दोघांस पाहतो.

स यत्र प्रस्वपित्यस्य लोकस्य सर्वावतो मात्रामपादाय स्वयं विहत्य स्वयं निर्माय स्वेन भासा स्वेन ज्योतिषा प्रस्वपित्यत्रायं पुरुषः स्वयंज्योतिर्भवति ॥ ९ ॥

अर्थ—तो प्रकृत आत्मा ज्यावेळीं गाढ निद्रेचा अनुभव घेतो तेव्हां या दृष्ट—जागरितलक्षण लोकाची—कार्य-करणसंघाताची मात्रा—एकदेश—काढून घेऊन [ त्या जन्मांतील वासनांनीं वासित होऊन ] स्वतःच देहाला पाडवून—भानशून्य करून व वासनामय स्वप्नदेह स्वतः निर्माण करून आपल्याच प्रकाशानें व आपल्याच नित्य साक्षिज्योतीनें निजतो ( आपल्या नित्य ज्योतीनें वासनात्मक प्रकाशास पहातो. ) या अवस्थेत हा पुरुष स्वयंज्योति होतो. ९.

ननु न स्तोऽस्योभौ लोकौ यौ जन्ममरणाभ्यामनुक्रमेण संचरति स्वप्नजागरिते इव । स्वप्नजागरिते तु प्रत्यक्षमवगम्येते न त्विहलोकपरलोकौ केनचित्प्रमाणेन । तस्मादेते एव स्वप्नजागरिते इहलोकपरलोकाविति ॥

भाष्यार्थ—( ' तस्य वा एतस्य ' या वाक्यानें जिचें निरसन करावयाचें आहे ती शंका सांगतात—) 'अहो पण स्वप्न व जागरित या दोन स्थानांप्रमाणें जन्म व मरण यांच्या योगानें अनुक्रमानें ज्यांत हा पुरुष संचार करतो ते याचे दोन लोक नाहींतच. स्वप्न व जागरित हीं दोन्ही प्रत्यक्ष अनुभवाला येतात, पण त्याप्रमाणें इहलोक व परलोक कोण-

त्याही प्रमाणानें अवगत होत नाहींत. यास्तव स्वप्न व जागरित हेंच इहलोक व परलोक आहेत.'

उच्यते । तस्यैतस्य पुरुषस्य वै द्वे एव स्थाने भवतो न तृतीयं चतुर्थं वा । के ते । इदं च यत्प्रतिपन्नं वर्तमानं जन्म शरीरेन्द्रियविषयवेदनाविशिष्टं स्थानं प्रत्यक्षतोऽनुभूयमानम् । परलोक एव स्थानं परलोकस्थानम् । तच्च शरीरादिवियोगोत्तरकालानुभाव्यम् ॥

भाष्यार्थ---(या शंकेचें उत्तर म्हणून पुढील वाक्य घेतात--) याविषयीं सांगतों--'तस्य वै एतस्य०-'त्या या प्रकृत पुरुषाचीं दोनच स्थानें असतात. तिसरें किंवा चवथें स्थान नाहीं. तीं कोणतीं ? ' इदं च-' जें प्राप्त झालेलें वर्तमान जन्म-शरीर, इंद्रियें, विषय, व सुखदुःखादिरूप वेदना यांनीं विशिष्ट असलेलें हें प्रत्यक्षतः अनुभविलें जाणारें स्थान. ' परलोकस्थानं च-' परलोक हेंच स्थान--परलोक स्थान. ( या परलोक स्थानाची सिद्धि आगमावरून होते, अशा अभिप्रायानें सांगतात--) तें परलोकस्थान शरीरेंद्रियादिकांचा वियोग झाल्यानंतर अनुभव घेण्यास योग्य आहे.

ननु स्वप्नोऽपि परलोकस्तथा च सति द्वे एवेत्यवधारणमयुक्तम् । न । कथं तर्हि । संध्यं तत् । इहलोक परलोकयोर्यः संधिस्तस्मिन्भवं संध्यं यत्तृतीयं तत्स्वप्नस्थानम् । तेन स्थानद्वित्वावधारणम् । न हि ग्रामयोः संधिस्तावेव ग्रामावपेक्ष्य तृतीयत्वपरिगणनमर्हति ॥

भाष्यार्थ—( ' दोनच स्थानें ' असें जें वर ' वै-' शब्दानें अवधारण केलें आहे त्याविषयीं आक्षेप घेतात -) अहो पण स्वप्न हाही परलोक आहे, आणि असें असल्यामुळें ' दोनच ' हें अवधारण अयुक्त आहे. ( त्याचें समाधान--) असें नाहीं; तर कसें ? ' संध्यं-' तें संध्य स्थान आहे. इहलोक व परलोक यांचा जो संधि त्यामध्यें झालेलें तें संध्य. जें तिसरें स्थान तूं समजतोस तें इहलोक व परलोक यांचें ' संध्य' स्थान आहे. त्यामुळें ' दोनच स्थानें आहेत, ' असें अवधारण

केलें आहे. ( 'अहो पण स्वप्नस्थानाला ' तृतीय ' असें म्हटलेलें असल्यामुळें तें स्वतंत्र स्थानच कां नव्हे ? 'अशी शंका घेऊन 'तसें मानल्यास त्यापूर्वीं असलेल्या संध्यशब्दाशीं विरोध येतो, यास्तव स्वप्नाला तिसरें स्थान मानतां येत नाहीं, ' असें सांगतात–) दोन गावांचा संधि त्याच दोन गांवांच्या अपेक्षेनें ' तिसरा ' म्हणून गणना करण्यास योग्य नसतो.

कथं पुनस्तस्य परलोकस्थानस्यास्तित्वमवगम्यते यदपेक्ष्य स्वप्नस्थानं संध्यं भवेत् । यतस्तस्मिन्संध्ये स्वप्नस्थाने तिष्ठन्भवन्वर्तमान एते उभे स्थाने पश्यति । के ते उभे । इदं च परलोकस्थानं च । तस्मात्तः स्वप्नजागरितव्यंतिरेकेणोभौ लोकौ यौ धिया समानः सन्ननुसंचरति जन्ममरणसंतानप्रबन्धेन ॥

भाष्यार्थ—( पर लोकाच्या अस्तित्वाविषयीं आणखीं प्रमाण जाणण्याच्या इच्छेनें विचारतो–) अहो पण ज्याच्या अपेक्षेनें स्वप्नस्थान हें संध्यस्थान ठरतें त्या परलोकस्थानाचें अस्तित्व कसें अवगत होतें ? ( उत्तर–) ' तस्मिन्संध्ये०-' ज्याअर्थीं त्या संध्य–संधींतील–स्वप्नस्थानांत ' तिष्ठन्-' होणारा–रहाणारा पुरुष ' एते उभे :-' हीं दोन्ही स्थानें पाहतो ( त्याअर्थीं परलोक स्थान आहेच. ) तीं दोन स्थानें कोणतीं ? ' इदं च परलोकस्थानं च-' हें व परलोक स्थान. तस्मात् बुद्धीशीं समान–सदृश होऊन जन्म-मरणांच्या अविच्छिन्न परंपरेनें ज्या दोन लोकांत तो अनुसंचार करतो ते दोन लोक स्वप्न व जागरित यांहून भिन्न आहेत.

कथं पुनः स्वप्ने स्थितः सन्नुभौ लोकौ पश्यति । किमाश्रयः केन विधिनेति । उच्यते । अथ कथं पश्यतीति । शृणु । यथाक्रम आक्रामत्यनेनेत्याक्रम आश्रयोऽवष्टम्भ इत्यर्थः । यादृश आक्रमोऽस्य सोऽयं यथाक्रमः । अयं पुरुषः परलोकस्थाने प्रतिपत्तव्ये निमित्ते यथाक्रमो भवति यादृशेन परलोकप्रतिपत्तिसाधनेन विद्याकर्मपूर्वप्रज्ञालक्षणेन युक्तो भवतीत्यर्थः । तमाक्रमं परलोकस्थानायोन्मुखीभूतं प्रासाङ्कुरी-

भावमिव बीजं तमाक्रमसाक्रम्यावष्टभ्याऽऽश्रित्योभयान्पश्यति बहुवचनं धर्माधर्मफलानेकत्वादुभयानुभयप्रकारानित्यर्थः ॥

भाष्यार्थ—( स्वप्नप्रत्यक्ष हेंच परलोकाच्या अस्तित्वाविषयीं प्रमाण आहे, असें जें सांगितलें तेंच आतां पुढील वाक्यानें स्पष्ट करण्यासाठीं वादी विचारतो–) स्वप्नांत स्थित होऊन दोन्ही लोक कसे पाहतो ? कसे म्हणजे कशाचा आश्रय घेऊन व कोणत्या विधीनें ? सांगतों– 'अथ-' आतां अगोदर कसे पाहतो तेंच सांगतों; ऐक. ' यथाक्रमः-' ज्याच्या योगानें आक्रमण करतो तो आक्रम–आश्रय-आधार असा भावार्थ. जशा प्रकारचा याचा आक्रम–आश्रय असतो तो हा यथाक्रम; ' अयं परलोकस्थाने भवति ' हा पुरुष प्राप्त करून घ्यावयास योग्य असलेल्या परलोकस्थानाच्या निमित्तानें–परलोकस्थानासाठीं यथाक्रम होतो–जशा प्रकारच्या विद्या, कर्म व पूर्वप्रज्ञा एतद्रूप परलोकप्राप्तीच्या–साधनानें युक्त होतो, असा याचा भावार्थ. ( कोणत्या विधीनें, असें जें वर म्हटलें आहे तें सांगतात -) ' तं आक्रमं-' ज्याला अंकुरीभाव प्राप्त झाला आहे अशा जमिनींत पेरलेल्या बीजाप्रमाणें परलोकस्थानासाठीं उन्मुख झालेल्या त्या आक्रमास ' आक्रम्य-' आक्रमून–त्याचा आधार–आश्रय घेऊन ' उभयान् पश्यति-' दोघांना पाहतो. धर्म व अधर्म यांचीं फळें अनेक असल्यामुळें ' उभयान् ' असें बहुवचन योजलें आहे. ' उभयान-' म्हणजे दोन्ही प्रकारच्या व त्याहून अधिक प्रकारच्या फळांस पाहतो, असा भावार्थ.

कांस्तान्पाप्मनः पापफलानि । न तु पुनः साक्षादेव पाप्मनां दर्शनं संभवति तस्मात्पापफलानि दुःखानीत्यर्थः । आनन्दांश्च धर्मफलानि सुखानीत्येतत् । तानुभयान्पाप्मन आनन्दांश्च पश्यति जन्मान्तरदृष्टवासनामयान् । यानि च प्रतिपत्तव्यजन्मविषयाणि क्षुद्रधर्माधर्मफलानि धर्माधर्मप्रयुक्तो देवतानुग्रहाद्वा पश्यति ॥

भाष्यार्थ—त्या कोणत्या उभयरूप फळांस ? 'पाप्मनः' पापाच्या फलांस. ('पापांस' असा सरळ अर्थ न करितां 'पापफळें' असा कां करितां ?) साक्षात्च पापांचें दर्शन संभवत नाहीं. यास्तव 'पाप्मनः' म्ह० पापाचीं फळें—दुःखें, असा भावार्थ. 'आनन्दांश्च' व आनंदांस धर्मफळांस -सुखांस असा भावार्थ. त्या दोन प्रकारच्या--पापांस--दुःखांस व सुखांस पाहतो. (पूर्व वयांत स्वप्नामध्यें सुख-दुःखांचा अनुभव कसा येतो–) पूर्वीच्या जन्मीं अनुभविलेल्या विषयांच्या वासनेपासून उद्भवलेल्या सुखदुःखांचा अनुभव तो घेतो; ('मध्यम वयांत इंद्रियांच्या पटुत्वामुळें ऐहिक वासनेनें स्वप्न जरी दिसलें तरी अंतिम वयांत तें कसें दिसेल ?' अशी आशंका घेऊन सांगतात -) आणि पुढें व्हावयाच्या जन्मांतील जीं क्षुद्र धर्माधर्म फळें तीं तो धर्म व अधर्म यांकडून प्रेरित होत्साता अथवा देवतेच्या अनुग्रहानें पाहतो.

तत्कथमवगम्यते परलोकस्थानभावितत्पाप्मानन्ददर्शनं स्वप्न इति। उच्यते। यस्मादिह जन्मन्यननुभाव्यमपि पश्यति बहु। न च स्वप्नो नामापूर्वं दर्शनम्। पूर्वदृष्टस्मृतिर्हि स्वप्नः प्रायेण। तेन स्वप्नजागरितस्थानव्यतिरेकेण स्त उभौ लोकौ॥

भाष्यार्थ—(ऐहिक वासनांमुळें ऐहिक दुःखांचें व आनंदांचेंच स्वप्नांत दर्शन होण्याचा संभव असल्यामुळें स्वप्न प्रत्यक्ष परलोकाची सिद्धि करणारें नाहीं, अशी आशंका घेतात --) अहो पण स्वप्नांत परलोक स्थानांत होणाऱ्या सुख-दुःखांचें दर्शन होतें, हें कसें अवगत होतें? (समाधान--) सांगतों- ज्याअर्थी तो या जन्मीं अनुभव घेण्यास योग्य नसलेलेंही पुष्कळ पाहतो (त्याअर्थी तो परलोकभावीच सुखदुःख पाहतो, असें म्हणावें लागतें. 'अहो पण स्वप्नांत मनुष्यांनीं न अनुभविलेला असाही इंद्रादिभाव भासतो, हें खरें; पण तेंही अपूर्वच दर्शन होय, पूर्वसंस्कारजन्य नव्हे,' अशी आशंका घेऊन सांगतात--) स्वप्न

१ ज्यांचें फळ अंशतः याच जन्मीं भोगलें आहे, अशीं.

हें कांहीं कोणी अपूर्व दर्शन नव्हे. स्वप्न म्हणजे प्रायः पूर्वी पाहिलेल्याची स्मृति. ( स्वप्नबुद्धीकडून केव्हां केव्हां पुढील जन्मांतील सुखादिकांचेंही दर्शन घडते, म्हणून वर ' प्रायेण ' प्रायः असें म्हटलें आहे. पण तें अपूर्व दर्शनही सम्यग्ज्ञान नव्हे. कारण जागें होतांच त्याचा बाध होतो. पण तेवढ्यावरून स्वप्नबुद्धीनें उत्तर जन्माची असिद्धि होत नाहीं. कारण जसें पदार्थाचें ज्ञान होईल त्याप्रमाणें पदार्थाचा अंगीकार केला जातो, असा याचा भाव. प्रमाणफलाचा उपसंहार करितात--) त्यामुळें स्वप्न व जागरित या दोन स्थानांहून निराळे दोन लोक आहेत.

यदादित्यादिबाह्यज्योतिषामभावेऽयं कार्यकरणसंघातः पुरुषो येन व्यतिरिक्तेनाऽऽत्मना ज्योतिषा व्यवहरतीत्युक्तम् । तदेव नास्ति यदादित्यादिज्योतिषामभावगमनं यत्रेदं विविक्तं स्वयंज्योतिरुपलभ्येत । येन सर्वदैवायं कार्यकरणसंघातः संसृष्ट एवोपलभ्यते । तस्मादसत्समोऽसन्नेव वा स्वेन विविक्तस्वभावेन ज्योतीरूपेणाऽऽत्मेति ॥

भाष्यार्थ—( ' स यत्र ' या वाक्याचा दूरान्वय सांगण्यासाठीं गतार्थाचा अनुवाद करून त्यावर आक्षेप घेतात--) आदित्यादि बाह्य ज्योतींच्या अभावीं हा कार्य-करणसंघातरूप पुरुष ज्या देहादिव्यतिरिक्त आत्मज्योतीनें गमनागमनादि व्यवहार करतो ती आत्मज्योति आहे, असें जें सांगितलें ( विशिष्ट स्थानाचा अभाव सांगण्यासाठीं अगोदर विशेषणाचा अभाव सांगतात--) जें आदित्यादि ज्योतींचें अभावगमन—ज्या आदित्यादि ज्योतींच्या अभावविशिष्ट स्थानीं हा अगदीं शुद्ध स्वयंज्योति उपलब्ध होईल तेंच स्थान नाहीं. ( कारण विशेषणाचा अभाव आहे, एवढा या वाक्याला शेष लावावा. ) कारण हा कार्यकरणसंघात सर्वदाच बाह्य ज्योतींनीं संसृष्ट असाच उपलब्ध होतो. ( व्यवहारांत बाह्य ज्योतीचा अभाव नसतो, असें ठरलें असतां काय निष्पन्न होतें तें सांगतात--) तस्मात् स्वतःच्या शुद्धस्वभावानें ज्योतीरूपानें आत्मा असत्-सारखा अथवा असत्-च आहे.

अथ कश्चिद्विविक्तः स्वेन ज्योतीरूपेणोपलभ्येत बाह्याध्यात्मिकभूतभौतिकसंसर्गशून्यस्ततो यथोक्तं सर्वं भविष्यतीत्येतदर्थमाह । स यः प्रकृत आत्मा यत्र यस्मिन्काले प्रस्वपिति प्रकर्षेण स्वापमनुभवति तदा किमुपादानः केन विधिना स्वपिति संध्यं स्थानं प्रतिपद्यत इत्युच्यते ॥

भाष्यार्थ—( पुढील ग्रंथ हें वरील शंकेचें उत्तर असल्यामुळें त्यालाच अवतरण देऊन त्याचें व्याख्यान करितात—) आतां तो आत्मा जर कोठें अगदीं शुद्ध व स्वतःच्या ज्योतीरूपानें, बाह्य व आध्यात्मिक भूतें व भौतिक पदार्थ यांच्या संसर्गानें शून्य असा उपलब्ध होईल तर पूर्वोक्त सर्व—देहादिव्यतिरिक्तत्व, स्वयंज्योतिष्ट्व, इत्यादि सर्व—सिद्ध होईल, एवढ्यासाठीं श्रुति किंवा याज्ञवल्क्य सांगतात—[ म्हणजे स्वप्नाच्या वर्णनास आरंभ करितात—] ' सः-' जो प्रकृत आत्मा तो ' यत्र-' ज्या वेळीं ' प्रस्वपिति-' उत्कृष्ट तऱ्हेनें स्वापाचा अनुभव घेतो तेव्हां तो कोणता परिग्रह बरोबर घेऊन व कोणत्या विधीनें निजतो—संध्य स्थानास प्राप्त होतो तें सांगितलें जातें.

अस्य दृष्टस्य लोकस्य जागरितलक्षणस्य सर्वावतः सर्वमवतीति सर्वावानयं लोकः कार्यकरणसंघातो विषयवेदनासंयुक्तः । सर्वावत्त्वमस्य व्याख्यातमन्नत्रयप्रकरणेऽथो अयं वा आत्मेत्यादिना । सर्वा वा भूतभौतिकमात्रा अस्य संसर्गकारणभूता विद्यन्त इति सर्ववान्सर्ववानेव सर्वावांस्तस्य सर्वावतो मात्रामेकदेशमवयवमपादायापच्छिद्याऽऽदाय गृहीत्वा दृष्टजन्मवासनावासितः सन्नित्यर्थः । स्वयमात्मनैव विहत्य देहं पातयित्वा निःसंबोधमापाद्य । जागरिते ह्यादित्यादीनां चक्षुरादिष्वनुग्रहो देहव्यवहारार्थः । देहव्यवहारश्चाऽऽत्मनो धर्माधर्मफलोपभोगप्रयुक्तस्तद्धर्माधर्मफलोपभोगोपरमणमस्मिन्देह आत्मकर्मोपरमकृतमित्यात्माऽस्य विहन्तेत्युच्यते ॥

भाष्यार्थ—' अस्य लोकस्य सर्वावतः-' या दृष्ट जागरितलक्षण सर्वावान् लोकाची ' सर्वं अवति इति सर्वावान्-' सर्वांचें रक्षण करतो म्हणून 'सर्वावान्' हा लोक आहे. विषय व सुख-दुःखादि वेदना यांनीं युक्त असा हा कार्य-करणसंघात हाच सर्वावान् लोक.( त्याला सर्वावत्त्व कसें ? तें सांगतात–) याचें सर्वावत्त्व अन्नत्रयप्रकरणांत–' अथो अयं वा आत्मा ' इत्यादि वाक्यानें ( अ. १ पृ. ३६१ ) स्पष्टपणें सांगितलें आहे. अथवा सर्व भूत व भौतिक मात्रा अध्यात्मादि भागासह याच्या संसर्गाच्या कारणभूत आहेत; म्हणून हा सर्ववान्–सर्ववान्च येथें सर्वावान् म्हटला गेला आहे, त्या सर्वावानाची मात्रा -एकदेश–अवयव ' अपादाय-' तोडून--काढून–घेऊन म्ह० दृष्ट–वर्तमान–जन्मांतील वासनांनीं वासित होऊन, असा भावार्थ. ( ' किमुपादानः' याचें उत्तर सांगून ' केन विधिना-' याचें उत्तर सांगतात–) ' स्वयं-' आपणच ' विहत्य-'देहाचा पात करवून त्याला संबोध–चेतना--रहित करून, (उत्तमप्रकारें निजतो, असा पुढें संबंध. ' अहो पण जागरिताला कारण होणाऱ्या कर्मफलाचा उपभोग शांत झाल्यानेंच देह चेतनारहित–निद्रित होतो, असें असतांना 'स्वयं विहत्य-' असें कसें श्रुतींत म्हटलें आहे ?' तें सांगतात–) जागरितांत आदित्यादिकांचा चक्षुरादिकांच्या ठायीं देहाच्या व्यवहारासाठीं अनुग्रह होतो, हें प्रसिद्ध आहे. देहाचा व्यवहार आत्म्याच्या धर्माधर्मादि--फलोपभोगप्रयुक्त होतो. त्या धर्माधर्माच्या फलभोगाची शांति या देहांत आत्म्याच्या कर्मोपरमामुळें होते. यास्तव आत्माच याचा विहन्ता आहे, असें म्हटलें जातें.

स्वयं निर्माय निर्माणं कृत्वा वासनामयं स्वप्नदेहं मायामयमिव । निर्माणमपि तत्कर्मापेक्षत्वात्स्वयंकर्तृकमुच्यते । स्वेनाऽऽत्मीयेन भासा मात्रोपादानलक्षणेन भासा दीप्त्या प्रकाशेन सर्ववासनात्मकेनान्तःकरणवृत्तिप्रकाशेनेत्यर्थः । सा हि तत्र विषयभूता सर्ववासनामयी प्रकाशते । सा तत्र स्वयं भा उच्यते । तेन स्वेन भासा विषयभूतेन

स्वेन च ज्योतिषा तद्विषयिणा विविक्तरूपेणालुप्तदृक्स्वभावेन तद्भारूपं वासनात्मकं विषयीकुर्वन्प्रस्वपिति । यदेवं वर्तनं तत्प्रस्वपितीत्युच्यते॥

भाष्यार्थ—( निर्माणविषय दाखवितात— ) ' स्वयं निर्माय-' मायामय देहासारखा वासनामय स्वप्नदेह स्वयं निर्माण करून, हें निर्माण करणेंही आत्म्याच्या कर्माच्या अपेक्षेनें असल्यामुळें स्वयंकर्तृकच आहे, तो स्वतः-च वासनामय देह करणारा आहे, असें सांगितलें जातें. ' स्वेन-' आत्मीय–आपल्या ' भासा-' मात्रोपादानरूप दीप्तीनें-प्रकाशानें सर्व वासनात्मक अन्तःकरणवृत्तिप्रकाशानें, असा याचा भावार्थ. ( ' स्वेन भासा ' ही ' करणे तृतीया ' नव्हे तर ' इत्थंभूतलक्षणे तृतीया ' आहे, हें सुचवितात-) कारण स्वप्नांत तीच विषयभूत सर्ववासनामयी ' भाः-' कांति–तेज प्रकाशमान होते. ('अहो पण ती ' स्वभा ' पूर्वोक्त अन्तःकरणवृत्तीच्या विषयत्वानें जरी प्रकाशमान होत असली तरी तिला करणत्व–साधनत्व असावयास कोणती हरकत आहे ?' अशी आशंका घेऊन सांगतात–) ती स्वप्नांत स्वयं भा–प्रकाश म्हटली जाते. त्यामुळें ' स्वेन भासा–'विषयभूत स्वप्रकाशरूपानें–स्वप्रकाशरूप ' स्वेनें च ज्योतिषा-' त्याचप्रमाणें तिला विषयी करणारी--तिचें ग्रहण करणारी अशा स्वयंज्योतीनें ( ही कर्तृरि तृतीया आहे ) विविक्त–शुद्ध–रूपानें नित्य दृक्-स्वभावानें त्या वासनात्मक भारूपाला विषय करीत प्रस्वाप करतो. ( प्रस्वाप म्हणजे काय ? ) जें असें राहणें त्यासच प्रस्वाप–प्रस्व-पिति--म्हणतात.

अत्रैतस्यामवस्थायामेतस्मिन्कालेऽयं पुरुष आत्मा स्वयमेव विविक्तज्योतिर्भवति बाह्याध्यात्मिकभूतभौतिकसंसर्गरहितं ज्योतिर्भवति ॥ नन्वस्य लोकस्य मात्रोपादानं कृतं कथं तस्मिन्सत्यत्रायं पुरुषः स्वयं ज्योतिर्भवतीत्युच्यते ॥

---

१ जसा गारुडी मायामय देह निर्माण करतो त्याप्रमाणें २ येथील स्वशब्द आत्मपिषय आहे. आत्मज्योतीनें, असा त्याचा अर्थ.

भाष्यार्थ—'अत्र-' या अवस्थेंत -या कालीं 'अयं पुरुषः-' हा पुरुष आत्मा 'स्वयं ज्योतिर्भवति-' स्वतःच विविक्त ज्योति होतो. ('विविक्त' या विशेषणाचें विवरण--) बाह्य-आध्यात्मिक भूत-भौतिक-संसर्गानें रहित होतो.

('स्वप्नांत आत्मा स्वयंज्योति होतो,' असें जें येथें म्हटलें आहे त्यावर आक्षेप--)'अहो पण त्यानें या लोकाचें--विषयवेदनासंयुक्त कार्य-करणसंघाताचें--मात्रोपादान केलें आहे. तेव्हां त्याच्यापाशीं संघाताची मात्रा असतांना 'या स्वप्नांत हा पुरुष स्वयंज्योति होतो,' असें कसें म्हटलें जात आहे?'

नैष दोषः। विषयभूतमेव हि तत्। तेनैव चात्रायं पुरुषः स्वयं ज्योतिर्दर्शयितुं शक्यः। न त्वन्यथाऽसति विषये कस्मिंश्चित्सुषुप्तकाल इव। यदा पुनः सा भा वासनात्मिका विषयभूतोपलभ्यमाना भवति तदाऽसिः कोशादिव निष्कृष्टः सर्वसंसर्गरहितं चक्षुरादिकार्यकरण-व्यावृत्तस्वरूपमलुप्तदृगात्मज्योतिः स्वेन रूपेणावभासयद्‌दृश्यते। तेनात्रा-यं पुरुषः स्वयं ज्योतिर्भवतीति सिद्धम्॥ ९॥

भाष्यार्थ--( मनोवृत्तिरूप वासनापरिग्रहाला विषयत्व आहे; विष-यित्व नाहीं. आत्मा नेहमीं विषयी आहे, विषय नव्हे, त्यामुळें आत्म्याचें स्वप्नांतील स्वयंज्योतिष्ट्व विरुद्ध नाहीं, असें समाधान करितात--) हा कांहीं दोष नाहीं. तें मात्रोपादान विषयभूतच आहे. ('अहो पण वासनापरिग्रहाला तरी विषयत्व आहे, हें कशावरून' अशी आशंका घेऊन 'स्वयंज्योतिष्ट्व-' श्रुतीच्या सामर्थ्यावरून त्याला विषयत्व आहे, असें सांगतात--) मात्रोपादानाला विषयत्व असल्यामुळेंच तर स्वप्नांत हा पुरुष स्वयंज्योति आहे, असें दाखवितां येणें शक्य आहे. (हेंच व्यतिरेकमुखानें सांगतात--) त्यावाचून ज्याप्रमाणें सुषुप्तिकालीं कोण-ताही व्यक्त विषय नसल्यामुळें आत्मा स्वयंज्योति आहे, हें दाखवितां

येत नाहीं त्याप्रमाणें स्वप्नांतही कोणत्याच विषयाच्या अभावीं पुरुष स्वयंज्योति आहे असें दाखवितां आलें नसतें. स्वयंज्योतिष्ट्व-श्रुतीनें मात्राप्रणाचें विषयत्व व्यक्त केलें आहे, असा भावार्थ. (' अहो पण स्वप्नांतील वासनापरिग्रहाला विषयत्व जरी असलें तरी स्वयंज्योति आत्मा पृथक् करून दाखवितां येणें कसें शक्य आहे ?' अशी आशंका घेऊन सांगतात--) पण जेव्हां ती वासनात्मिका भा विषयरूपानें उपलब्ध होणारी अशी होते तेव्हां म्यानांतून बाहेर काढिलेल्या तरवारीप्रमाणें सर्वसंसर्गरहित, चक्षुरादिकार्यकरणापासून व्यावृत्त झालली--त्यांहून व्यतिरिक्त--असें जिचें स्वरूप आहे, व जिची ज्ञानशक्ति अलुप्त--नित्य आहे, अशी आत्मज्योति स्वतःच्या स्वरूपानें वासनात्मक अन्तःकरणाला प्रकाशित करीत असल्याचा अनुभव येतो.(अर्थात् येणेंप्रमाणें स्वप्नांत आत्म्यावाचून दुसरा कोणी अवभासक नाहीं, असें ठरलें असतां काय निष्पन्न होतें तें सांगतात--) त्यामुळें या स्वप्नांत हा पुरुष स्वयंज्योति होतो हें सिद्ध झालें ९.

न तत्र रथा न रथयोगा न पन्थानो भवन्त्यथ रथान्रथयोगान्पथः सृजते न तत्राऽऽनन्दा मुदः प्रमुदो भवन्त्यथाऽऽनन्दान्मुदः प्रमुदः सृजते न तत्र वेशान्ताः पुष्करिण्यः स्रवन्त्यो भवन्त्यथ वेशान्तान्पुष्करिणीः स्रवन्तीः सृजते स हि कर्ता ॥ १० ॥

अर्थ—स्वप्नांत रथ नसतात, रथाला जोडावयाचे अश्वादिक नसतात, रथाचे मार्ग नसतात; पण तो रथ, अश्वादिक व मार्ग यांस स्वतः उत्पन्न करतो. तेथें आनंद, मुद—पुत्रादिलाभनिमित्त हर्ष व प्रमुद नसतात पण तो आनंदास, मोदास व प्रमोदास उत्पन्न करतो,

स्वप्नांत डबकीं नसतात, तडाग नसतात व नद्या नसतात; पण तो डबकीं,तडाग व नद्या यांस निर्माण करतो.तोच त्यांचा कर्ता आहे १०,

नन्वत्र कथं पुरुषः स्वयंज्योतिर्येन जागरित इव ग्राह्यग्राहकादिलक्षणः सर्वो व्यवहारो दृश्यते। चक्षुराद्यनुग्राहकाश्चाऽऽदित्याद्या लोकास्तथैव दृश्यन्ते यथा जागरिते। तत्र कथं विशेषावधारणं क्रियतेऽत्रायं पुरुषः स्वयंज्योतिर्भवतीति ॥

भाष्यार्थ—( स्वप्नांत आत्मा स्वयंज्योति होतो, असें जें म्हटलें आहे त्यावर दुसऱ्या प्रकारानें आक्षेप घेतात–) 'अहो पण स्वप्नांत पुरुष स्वयंज्योति कसा ? कारण जागरितांत जसा त्याप्रमाणेंच स्वप्नांतही ग्राह्यग्राहकादिलक्षण सर्व व्यवहार दिसतो. ज्याप्रमाणें जागरितांत त्याप्रमाणेंच चक्षुरादिकांचे अनुग्राहक आदित्यादिक व त्यांचे लोक स्वप्नांत दिसतात. असें असतांना ' अत्रायं पुरुषः स्वयंज्योतिः-' स्वप्नांत हा पुरुष स्वयंज्योति आहे, असें विशेषाचें अवधारण कसें केलें जात आहे ?

उच्यते। वैलक्षण्यात्स्वप्नदर्शनस्य। जागरिते हीन्द्रियबुद्धिमनआलोकादिव्यापारसंकीर्णमात्मज्योतिः। इह तु स्वप्न इन्द्रियाभावात्तदनुग्राहकादित्याद्यालोकाभावाच्च विविक्तं केवलं भवति। तस्माद्विलक्षणम् ॥

भाष्यार्थ—( जागरित व स्वप्न यांत कांहीं विशेष नाहीं, या म्हणण्यावर दूषण देतात–) सांगतों. स्वप्नदर्शनाला वैलक्षण्य आहे. (तेंच स्पष्ट करितात–) जागरितांत आत्मज्योति इंद्रियें, बुद्धि, मन, प्रकाश इत्यादिकांच्या व्यापारांनीं संकीर्ण झालेली असते. पण या स्वप्नांत इंद्रियांचा अभाव असल्यामुळें व त्या इंद्रियांवर अनुग्रह करणाऱ्या आदित्यादिकांच्या प्रकाशाचा अभाव असल्यामुळें ती आत्मज्योति विविक्त–व्यतिरिक्त व केवल होते, ( स्वप्नांत मन जरी असतें तरी तें विषयरूपानें असतें; त्यामुळें तें आत्म्याच्या स्वयंज्योतिष्ट्वाचें विघातक होत नाहीं.)तस्मात् स्वप्नदर्शन जागरितदर्शनाहून विलक्षण आहे.

ननु तथैव विषया उपलभ्यन्ते स्वप्नेऽपि यथा जागरिते तत्र कथमिन्द्रियाभावाद्वैलक्षण्यमुच्यत इति । शृणु । न तत्र विषयाः स्वप्ने रथादिलक्षणाः । तथा न रथयोगा रथेषु युज्यन्त इति रथयोगा अश्वादयस्तत्र न विद्यन्ते । न च पन्थानो रथमार्गा भवन्ति । अथ रथान्रथयोगान्पथश्च सृजते स्वयम् ॥

भाष्यार्थ—( या वैलक्षण्यावर प्रतीतीच्या आश्रयानें आक्षेप घेतात-) 'अहो पण जसे जागरितांत तसेच स्वप्नांतही विषय उपलब्ध--प्रतीत-होतात. तेव्हां स्वप्नांत—इंद्रियांचा अभाव असल्यामुळें वैलक्षण्य—कसें सांगितलें जात आहे,' म्हणून विचाराल तर त्याचें उत्तर ऐका. ( 'न तत्र रथाः' इत्यादि श्रुतिवाक्याचें व्याख्यान करून त्यानेंच उत्तर सांगतात–) 'न तत्र रथाः–' त्या स्वप्नांत रथादिरूप विषय नसतात; 'न रथयोगाः--' त्याचप्रमाणें रथयोग नसतात. 'रथेषु-' रथाचे ठिकाणीं 'युज्यन्ते-' जोडले जातात म्हणून 'रथयोगाः-' अश्वादिक. ते स्वप्नांत नसतात. 'न पन्थानः-' त्याचप्रमाणें रथाचे मार्ग नसतात. 'अथ-' पण 'रथान्०-' रथ, अश्वादि व रथमार्ग तो स्वतः उत्पन्न करतो.

कथं पुनः सृजते रथादिसाधनानां वृक्षादीनामभावे।उच्यते।ननूक्तमस्य लोकस्य सर्वावतो मात्रामपादाय स्वयं विहत्य स्वयं निर्मायेत्यन्तःकरणवृत्तिरस्य लोकस्य वासनामात्रा तामपादाय रथादिवासनारूपान्तःकरणवृत्तिस्तदुपलब्धिनिमित्तेन कर्मणा चोद्यमाना दृश्यत्वेन व्यवतिष्ठते तदुच्यते स्वयं निर्मायेति । तदेवाऽऽह रथादीन्सृजत इति ॥

भाष्यार्थ—( स्वप्नांतील रथादिसृष्टीविषयीं आक्षेप–) रथादिकांचीं साधनें असे जे वृक्षादिक त्यांच्या अभावीं तो त्यांना कसा उत्पन्न करतो ? ( तेथें वासनमयी सृष्टि दिसते, असें उत्तर सांगतात–) सांगतों. 'अहो पण वर 'या सर्वांचें रक्षण करणाऱ्या देहेंद्रियसंघातरूप लोकाची मात्रा--एकदेश--घेऊन स्वतः देहाला मारून पाडून; स्वतः

दुसऱ्या देहादिकांना निर्माण करून ' इत्यादि प्रकारें अन्तःकरणवृत्ति ही या लोकाची वासनामात्रा आहे. तिला घेऊन रथादिकांची वासनात्मक अन्तःकरणवृत्ति त्या रथादिकांच्या वासनात्मकवृत्तीच्या उपलब्धीचें निमित्त अशा कर्मानें प्रेरित होत्साती दृश्यरूपानें--विषयरूपानें व्यवस्थित होते, असें सांगितलें आहे. तेंच 'स्वयं निर्माय' अशा शब्दांनीं सांगितलें जातें; व तेंच 'रथादिकांस उत्पन्न करते' या शब्दांनीं सांगितलें आहे.'

न तु तत्र करणं वा करणानुग्राहकाणि वाऽऽदित्यादिज्योतींषि तदवभास्या वा रथादयो विषया विद्यन्ते । तद्वासनामात्रं तु केवलं तदुपलब्धिकर्मनिमित्तचोदितोद्भूतान्तःकरणवृत्त्याश्रयं दृश्यते । तद्यस्य ज्योतिषो दृश्यतेऽलुप्तदृशस्तदात्मज्योतिरत्र केवलमसिरिव कोशाद्विविक्तम् ॥

भाष्यार्थ—( पूर्वोक्ताचाच विस्तार करितात--) त्या स्वप्नदर्शेत करण किंवा करणावर अनुग्रह करणाऱ्या आदित्यादि ज्योती अथवा त्या ज्योतींनीं प्रकाशित होणारे रथादिक विषय नसतात; पण वासनेच्या उपलब्धीचें निमित्त असें जें कर्म त्या कर्मनिमित्तानें प्रेरित झालेली जी अन्तःकरणाची उद्भूतवृत्ति--ग्राहकावस्था तदाश्रय--तद्रूप असें केवल रथादिवासनामात्र दिसतें. ( तथापि स्वप्नांत आत्मज्योति केवल असते हें कसें सिद्ध होतें ? तें सांगतात--) तें अन्तःकरणवृत्तीच्या आश्रयानें असलेलें रथादिरूप ज्या नित्य ज्ञानरूप ज्योतीला दिसतें ती आत्मज्योति म्यानाहून भिन्न असलेल्या खड्गाप्रमाणें स्वप्नांत केवल आहे, असें ठरतें ( ज्याप्रमाणें म्यानांतून खड्ग--तरवार वेगळें केलें जातें त्याप्रमाणें दृश्य बुद्धीहून आत्मज्योति भिन्न ठरते. )

तथा न तत्राऽऽनन्दाः सुखविशेषाः । मुदो हर्षाः पुत्रादिलाभनिमित्ताः प्रमुदस्त एव प्रकर्षोपेताः । अथ चाऽऽनन्दादीन्सृजते । तथा न तत्र वेशान्ताः पल्वलाः पुष्करिण्यस्तडागाः स्रवन्त्यो नद्यो भवन्ति। अथ वेशान्तादीन्सृजते वासनामात्ररूपान् । यस्मात्स हि कर्ता ।

तद्वासनाश्रयचित्तवृत्त्युद्भवनिमित्तकर्महेतुत्वेनेत्यवोचाम तस्य कर्तृत्वं न तु साक्षादेव तत्र क्रिया संभवति साधनाभावात् ॥

भाष्यार्थ—स्वप्नांत ज्याप्रमाणें रथादिकांचा अभाव असतो त्याप्रमाणेंच 'न तत्रानन्दाः-' तेथें आनन्द--सुखविशेष नसतात--[ येथें सुखविशेष म्ह० सुखाचे विशेष -प्रकार--भेद असा अर्थ नसून ज्यांच्या कडून सुखेंच विशिष्ट केलीं जातात, ते सुखविशेष म्हणजे सुखांची सामाग्र्यें--साधारण सुखें स्वप्नांत नसतात, असा भावार्थ ] 'मुदः-' पुत्रादि प्रिय वस्तूच्या लाभामुळें होणारे हर्ष; 'प्रमुदः-' तेच आधिक्यानें युक्त असलेले हर्ष तेथें नसतात; 'अथानन्दान्मुदः प्रमुदः सृजते-' पण तो आनंदांस, हर्षांस व प्रकृष्ट हर्षांस उत्पन्न करतो. 'न तत्र वेशान्ताः पुष्क०-' आनंदादिकांच्या अभावांप्रमाणेंच स्वप्नांत पाण्याचीं डबकीं, तलाव, व नद्या नसतात 'अथ वेशान्तान्०-' पण तो वासनामय डबक्यांना, तळ्यांना व नद्यांना निर्माण करतो. 'स हि कर्ता--' ज्याअर्थीं तो कर्ता आहे ( त्याअर्थीं त्यांस निर्माण करतो, असा याच्या पुढें शेष लावून वाक्य पूर्ण करून घ्यावें. 'अहोपण स्वप्नांत आत्म्यापाशीं सहकारीं कारणें नसल्यामुळें त्याला कर्तृत्व कसें ' तें सांगतात--) 'त्या विषयांच्या वासनेचा आश्रय, अशा चित्तवृत्तीच्या परिणामाच्या निमित्तानें होणारें जें कर्म त्या कर्मामुळें त्याला कर्तृत्व आहे,' असें आम्हीं नुक्तेंच वर सांगितलें आहे. स्वप्नांत साक्षात् क्रियाच संभवत नाहीं. कारण त्या अवस्थेंत क्रियांचीं साधनें नसतात.

न हि कारकमन्तरेण क्रिया संभवति । न च तत्र हस्तपादादीनि क्रियाकारकाणि संभवन्ति । यत्र तु तानि विद्यन्ते जागरिते तत्राऽऽत्मज्योतिरवभासितैः कार्यकरणै रथादिवासनाश्रयान्तःकरणवृत्त्युद्भवनिमित्तं कर्म निर्वर्त्यते तेनोच्यते स हि कर्तेति । तदुक्तमात्मनैवायं ज्योतिषाऽऽस्ते पल्ययते कर्म कुरुत इति ॥

भाष्यार्थ—(' अहो पण स्वप्नांत साधनें जरी नसलीं तरी क्रिया घडण्यास कोणती हरकत आहे ? ' अशी आशंका घेऊन सांगतात--)

कारकावाचून क्रिया संभवत नाहीं, हें प्रसिद्ध आहे. स्वप्नांत हात, पाय, इत्यादि क्रियांचीं कारकें संभवत नाहींत. ( तर मग त्याला कर्तृत्व कसें ? ) ज्या जागरितांत तीं क्रियेचीं साधनें असतात त्यांत आत्मज्योतीकडून प्रकाशित होणाऱ्या कार्यकरणांनीं रथादिवासनांचा आधार अशी जी चित्तवृत्ति तिच्या परिणामाच्या निमित्तानें होणारें कर्म केलें जातें. म्हणून ' स हि कर्ता ' असें म्हटलें जातें, ( या आपल्या म्हणण्यास वाक्याचा उपक्रम अनुकूल आहे, असें सांगतात--) म्हणूनच वर ' आत्मनैवायं ज्योतिषाऽऽस्ते०--' (पृ. ५० पहा ) असें म्हटलें आहे.

तत्रापि न परमार्थतः स्वतःकर्तृत्वं चैतन्यज्योतिषोऽवभासकत्वव्यतिरेकेण । यच्चैतन्यात्मज्योतिषाऽन्तःकरणद्वारेणावभासयति कार्यकरणानि तदवभासितानि कर्मसु व्याप्रियन्ते कार्यकरणानि तत्र कर्तृत्वमुपचर्यत आत्मनः । यदुक्तं ध्यायतीव लेलायतीवेति तदेवानूद्यते स हि कर्तेतीह हेत्वर्थम् ॥ १० ॥

भाष्यार्थ—( ' अहो पण उपक्रमांत मुख्य कर्तृत्व आहे व येथें औपचारिक आहे, हा त्या दोन कर्तृत्वांत विशेष आहे,' म्हणून म्हणाल तर सांगतों–) वाक्योपक्रमांतही परमार्थतः व्यापारयुक्त अंतःकरणोपाधीला प्रकाशित करणें, यावाचून चैतन्य ज्योतीला स्वतःकर्तृत्व विवक्षित नाहीं. ( अर्थात् वाक्योपक्रमांतही आत्म्याचें कर्तृत्व औपचारिक आहे, असा उपसंहार करितात–) जें चैतन्यात्मज्योतीनें अन्तःकरणाच्या द्वारा देहेंद्रियादिक प्रकाशित करतें त्याच्याकडून अवभासित– प्रकाशित झालेलीं शरीरेंद्रियें कर्मांमध्यें व्यापृत होतात आणि तशीं तीं व्यापृत झालीं असतां आत्म्याच्या कर्तृत्वाचा उपचार होतो म्ह० आत्म्याला उपचारानें कर्ता म्हटलें जातें. (' स हि कर्ता,' हें औपचारिक कर्तृत्व आहे, असें जर म्हणाल तर तें ' ध्यायतीव लेलायतीव ' या शब्दांनींच वर ( पृ. ६६ ) सांगितलेलें असल्यामुळें त्यावर पुनरुक्ति हा दोष येईल, अशी आशंका घेऊन सांगतात–) ' ध्यायतीव-'

जणुं काय चिंतन करतो, ' लेलायतीव ' जणुं काय चंचल होतो, असें जें वर म्हटलें आहे त्याचाच येथें ' स हि कर्ता ' याप्रमाणें अनुवाद केला जात आहे. ( कशासाठीं ) स्वप्नांतील रथादिकांच्या सृष्टीविषयीं हेतु सांगण्याकरितां हा अनुवाद आहे. १०.

तदेते श्लोका भवन्ति । स्वप्नेन शारीरमभि-
प्रहत्यासुप्तः सुप्तानभिचाकशीति । शुक्रमा-
दाय पुनरैति स्थानꣳ हिरण्मयः पुरुष एक-
हꣳसः ॥ ११ ॥

अर्थ—याच अर्थी हे श्लोक—मंत्र आहेत.—स्वप्नानें शरीराला निश्चेष्ट करून स्वतः न निजलेला नित्य दृग्रूप आत्मा सुप्त—वासनाकार—सर्व पदार्थांस प्रकाशित करतो. शुद्ध—इंद्रियमात्रारूप घेऊन पुनः (कर्म करण्यासाठीं ) जागरित स्थानास येतो. जणुकाय हिरण्मय—चैतन्यात्मस्वभाव पुरुष एकच जाग्रत्, स्वप्न, इहलोक व परलोक या स्थानीं जातो. ११.

तदेत्त एतस्मिन्नुक्तेऽर्थे एते श्लोका मन्त्रा भवन्ति । स्वप्नेन स्वप्नभावेन शारीरं शरीरमभिप्रहत्य निश्चेष्टमापाद्यासुप्तः स्वयमलुप्तदृगादिशक्तिस्वाभाव्यात्सुप्तान्वासनाकारोद्भूतानन्तःकरणवृत्त्याश्रयान्बाह्याध्यात्मिकान्सर्वानेव भावान्स्वेन रूपेण प्रत्यस्तमितान्सुप्तानभिचाकशीत्यलुप्तयाऽऽत्मदृष्टया पश्यत्यवभासयतीत्यर्थः ॥

भाष्यार्थ—' तदेते-' या उक्त अर्थी हे श्लोक—मंत्र आहेत.' स्वप्नेन-' स्वप्नभावानें ' शारीरं-' शरीराला ' अभिप्रहत्य-' निश्चेष्ट करून ' असुप्तः-' स्वतः न निजलेला—नित्य दृक् इत्यादि शक्ति हा स्वभाव

१ ' स्वयंज्योतिष्ट्वादि ' हा उक्त अर्थ आहे. २ शरीरशब्दालाच ' शारीर ' ही स्वार्थी वृद्धि झाली आहे.

असल्यामुळें असुप्त–जाग्रत् ' सुप्तान्-' वासनाकारानें उद्भूत झालेल्या, अन्तःकरणवृत्तीचा आश्रय केलेल्या बाह्य व आध्यात्मिक [ शरीरगत ] अशा सर्व पदार्थांस–स्वतःच्या रूपानें अस्त पावलेल्या--सुप्त--पदार्थांस 'अभिचाकशीति-' लुप्त न झालेल्या आत्मदृष्टीनें पाहतो–अवभासित करतो, असा भावार्थ.

शुक्रं शुद्धं ज्योतिष्मदिन्द्रियमात्रारूपमादाय गृहीत्वा पुनः कर्मणे जागरितस्थानमैत्यागच्छति हिरण्मयो हिरण्मय इव चैतन्यज्योतिः-स्वभावः पुरुष एकहंस एक एव हन्तीत्येकहंसः । एको जाग्रत्स्वप्नेह-लोकपरलोकादीन्गच्छतीत्येकहंसः ॥ ११ ॥

भाष्यार्थ—'शुक्रं-' शुद्ध ज्योतिर्युक्त इंद्रियमात्रारूप 'आदाय-' घेऊन ' पुनः ' 'कर्मणे' कर्म करण्यासाठीं ' स्थानं-' जागरित स्थानास 'एति-' येतो. ' हिरण्मयः ' जणुंकाय सुवर्णाचा--चैतन्यज्योतिःस्वभाव ' पुरुष ' ' एकहंसः-' एकटाच ' हन्ति-'जातो तो एकहंस. एकटाच जाग्रत्,स्वप्न, इहलोक, परलोक इत्यादिकांत जातो, म्हणून एकहंस. [ चैतन्यज्योतिः-स्वरूप एकटाच गमन करणारा पुरुष पुनः जागरितस्थानास प्राप्त होतो. ] ११.

प्राणेन रक्षन्नवरं कुलायं बहिष्कुलायादमृत-
श्चरित्वा । स ईयतेऽमृतो यत्र कामꣳ हिर-
ण्मयः पुरुष एकहꣳसः ॥ १२ ॥

अर्थ—ह्या निकृष्ट शरीराचें प्राणानें रक्षण करणारा तो स्वतः अम-रणधर्मवान् शरीराच्या बाहेर फिरून तो अमृत हिरण्मय -ज्योतिःस्वभाव एकहंस--एकटाच गमन करणारा पुरुष जेथें वासनारूपानें उद्भूत झाले-ला काम असतो तेथें जातो १२.

तथा प्राणेन पञ्चवृत्तिना रक्षन्परिपालयन्नन्यथा मृतभ्रान्तिः स्या-दवरं निकृष्टमनेकाशुचिसंघातत्वादत्यन्तबीभत्सं कुलायं नीडं शरीरं

स्वयं तु बहिस्तस्मात्कुलायाच्चरित्वा । यद्यपि शरीरस्थ एव स्वप्नं पश्यति तथाऽपि तत्संबन्धाभावात्तत्स्थ इवाऽऽकाशो बहिश्चरित्वेत्युच्यते । अमृतः स्वयममरणधर्मेयते गच्छति यत्र कामं यत्र यत्र कामो विषयेषूद्भूतवृत्तिर्भवति तं तं कामं वासनारूपेणोद्भूतं गच्छति ॥१२॥

भाष्यार्थ—त्याचप्रमाणें ' प्राणेन-' प्राणापानादि पंचवृत्ति प्राणवायूनें ' रक्षन्-' रक्षण--परिपालन करणारा, कारण प्राणानें रक्षण न केल्यास शरीर मेल्याची भ्रांति होईल, यास्तव ' अवरं-' हें निकृष्ट-अनेक अशुचि पदार्थांचा संघात, असेंच तें असल्यामुळें अत्यंत बीभत्स--किळसवाणें ' कुलायं-' घरटें--शरीर ( त्याचें प्राणानें रक्षण करणारा आत्मा) ' बहिष्कुलायादमृतश्चरित्वा-' स्वतः तर त्या घरट्याच्या बाहेर फिरून, यद्यपि तो शरीरांत स्थित होऊनच स्वप्नाला पाहतो तथापि शरीरस्थ आकाशाप्रमाणें त्या शरीराशीं त्याचा संबंध नसल्यामुळें ' बाहेर फिरून' असें म्हटलें जातें. ' अमृतः' स्वतः अमरणधर्मा--मरण हा ज्याचा धर्म नाहीं, असा तो ' ईयते-' जातो ' यत्र कामं-' जेथें जेथें कामना होते, काम ज्या ज्या विषयाविषयीं उद्भूतवृत्ति होतो त्या त्या वासनारूपानें उद्भूत झालेल्या कामास जातो--प्राप्त होतो. १२

स्वप्नान्त उच्चावचमीयमानो रूपाणि देवः
कुरुते बहूनि । उतेव स्त्रीभिः सह मोदमानो
जक्षदुतेवापि भयानि पश्यन् ॥ १३ ॥

अर्थ—स्वप्नस्थानीं उच्च-नीच भावास प्राप्त होणारा देव असंख्य वासनारूपें करतो. तसेंच स्त्रियांसह आनंद भोगणारासा ( मित्रांबरोबर ) हंसणारासा व व्याघ्रसिंहादि भयांना पहातसा असतो १३.

किंच स्वप्नान्ते स्वप्नस्थान उच्चावचमुच्चं देवादिभावमवचं तिर्यगादिभावं निकृष्टं तदुच्चावचमीयमानो गम्यमानः प्राप्नुवन्रूपाणि देवो द्योतनावान्कुरुते निर्वर्तयति वासनारूपाणि बहून्यसंख्येयानि । उतापि

स्त्रीभिः सह मोदमान इव जक्षदिव हसन्निव वयस्यैः। उतेवापि भयानि बिभेत्येभ्य इति भयानि सिंहव्याघ्रादीनि पश्यन्निव॥ १३ ॥

भाष्यार्थ—( स्वप्नांतील दुसरा विशेष सांगतात–) शिवाय ' स्वप्नान्ते ' स्वप्नस्थानीं ' उच्चावचं-' उच्च देवादिभाव व अवच–निकृष्ट तिर्यगादिभाव त्या उच्चावचास ' ईयमानः-' जाणारा–प्राप्त होणारा ( उच्चावच पदार्थांस विषय करून त्या त्या आपल्याच रूपानें स्वतः होणारा ) ' रूपाणि देवः कुरुते बहूनि-' द्योतनावान्–प्रकाशवान्'देव' वासनामय असंख्य रूपें करतो. ' उत स्त्रीभिः सह-' तसेंच स्त्रियांसह ' मोदमानः-' आनंद भोगीत असल्यासारखा, ' जक्षदिव-' मित्रांसह जणुकाय हंसणारा, ' उतेवापि भयानि पश्यन्-' त्याचप्रमाणें ज्यांपासून भितो तीं भयें--सिंह-व्याघ्रादिक–यांस पाहणारासा होतो १३.

आराममस्य पश्यन्ति न तं पश्यति कश्च-
नेति। तं नाऽऽयतं बोधयेदित्याहुः। दुर्भि-
षज्यꣳहास्मै भवति यमेष न प्रतिपद्यते॥

अर्थ—सर्व लोक त्याच्या गृह-नगरादि आरामास--आक्रीडेस पाहतात; पण त्याला कोणी पहात नाहीं. त्या निजलेल्या आत्म्याला सहसा–अत्यंत जागें करूं नये, असें वैद्यादि लोक सांगतात. ज्यां इंद्रियप्रदेशांतून हा निघाला त्याला पुनः कदाचित् प्राप्त होत नाहीं. त्यामुळें याचें शरीर दुश्चिकित्स्य होतें.

अथो खल्वाहुर्जागरितदेश एवास्यैष इति
यानि ह्येव जाग्रत्पश्यति तानि सुप्त इत्य-
त्रायं पुरुषः स्वयंज्योतिर्भवति सोऽहं भग-
वते सहस्रं ददाम्यत ऊर्ध्वं विमोक्षाय
ब्रूहीति ॥ १४ ॥

अर्थ—पण खरोखर कित्येक म्हणतात—'या आत्म्याचा हा स्वप्न जागरितदेशींच होतो. कारण तो जें पदार्थजात जाग्रत् दशेंत पाहतो, तेंच निजल्यावर.' पण तें बरोबर नाहीं. कारण स्वप्नांत हा पुरुष स्वयंज्योति होतो. तो मी जनक तुला यास्तव एक सहस्र धन देतों. यापुढें विमोक्षासाठीं मला सांग ( सम्यग्ज्ञानाचा उपदेश कर.) १४.

आराममारमणमाक्रीडामनेन निर्मितां वासनारूपामस्याऽऽत्मनः पश्यन्ति सर्वे जनाः । ग्रामं नगरं स्त्रियमन्नाद्यमित्यादिवासनानिर्मितमाक्रीडनरूपम् । न तं पश्यति तं न पश्यति कश्चन । कष्टं भो वर्ततेऽत्यन्तविविक्तं दृष्टिगोचरापन्नमप्यहो भाग्यहीनता लोकस्य यच्छक्यदर्शनमप्यात्मानं न पश्यतीति लोकं प्रत्यनुक्रोशं दर्शयति श्रुतिः । अत्यन्तविविक्तः स्वयं ज्योतिरात्मा स्वप्ने भवतीत्यभिप्रायः ॥

भाष्यार्थ—'आरामं अस्य पश्यन्ति-' आराम म्ह० आरमण—आक्रीडा, यानें निर्मिलेल्या या आत्म्याच्या वासनारूप आरामास सर्व जन पाहतात. ( आरामाचेंच विवरण करितात—) ग्राम, नगर, स्त्री, भक्ष्य अन्न इत्यादि वासनानिर्मित आक्रीडनरूपास [ खेळास सर्व जन पाहतात ] 'न तं पश्यति कश्चनेति-' पण त्याला कोणी पहात नाहीं. अरेरे फार दुःखाची गोष्ट आहे. ( 'कष्टं भो वर्तते' या भाष्यवाक्याचा विस्तार करितात -) अत्यंत भिन्न व दृष्टीचा गोचर—विषय—होण्याच्या अवस्थेस प्राप्त झालेला अशाही—ज्याचें दर्शन होणें शक्य आहे, अशाही—आत्म्याला जन पहात नाहीं, ही या लोकाची केवढी भाग्यहीनता आहे ? असें म्हणून श्रुति लोकांविषयीं दया दाखविते. ( या श्लोकांच्या तात्पर्याचा उपसंहार करितात-) स्वप्नांत आत्मा अत्यन्त विविक्त--भिन्न स्वयंज्योति होतो असा याचा अभिप्राय.

तं नाऽऽयतं बोधयेदित्याहुः । प्रसिद्धिरपि लोके विद्यते स्वप्न आत्मज्योतिषो व्यतिरिक्तत्वे । काऽसौ । तमात्मानं सुप्तमायतं सहसा भृशं न बोधयेदित्याहुरेवं कथयन्ति चिकित्सकादयो जना लोके ।

नूनं ते पश्यन्ति जाग्रद्देहादिन्द्रियद्वारतोऽपसृत्य केवलो बहिर्वर्तत इति यत आहुस्तं नाऽऽयतं बोधयेदिति ॥

भाष्यार्थ—( श्रुतीचें पुढील वाक्य घेऊन त्याचें तात्पर्य सांगून त्यांतील अक्षरांचें व्याख्यान करितात--) 'तं नायतं बोधयेदित्याहुः-' स्वप्नांत आत्मज्योति देहादिकांहून व्यतिरिक्त आहे याविषयीं लोकांत प्रसिद्धिही आहे. ती कोणती ? 'तं-' त्या निजलेल्या आत्म्याला 'आयतं-' सहसा--एकाएकीं 'न बोधयेत्-' जागें करूं नये, 'इत्याहुः-' असें व्यवहारांत वैद्यादिक लोक सांगतात. ( त्यांचा तसें सांगण्यांतील अभिप्राय व्यक्त करितात- ) खरोखर इंद्रियें हींच ज्याचीं द्वारें आहेत अशा जाग्रत् देहांतून निघून केवल आत्मा बाहेर असतो, असें ते पाहतात--जाणतात, त्यामुळें ते 'तं नायतं बोधयेत्-' असें म्हणतात.

तत्र च दोषं पश्यन्ति भृशं ह्यसौ बोध्यमानस्तानीन्द्रियद्वाराणि सहसा प्रतिबोध्यमानो न प्रतिपद्यत इति । तदेतदाह दुर्भिषज्यं हास्मै भवति यमेष न प्रतिपद्यते यमिन्द्रियद्वारदेशं यस्माद्देशाच्छुक्रमादायापसृतस्तमिन्द्रियदेशमेष आत्मा पुनर्न प्रतिपद्यते । कदाचिद्व्यत्यासेनेन्द्रियमात्राः प्रवेशयति । तत आन्ध्यबाधिर्यादिदोषप्राप्तौ दुर्भिषज्यं दुःखभिषक्कर्मता हास्मै देहाय भवति दुःखेन चिकित्सनीयोऽसौ देहो भवतीत्यर्थः । तस्मात्प्रसिद्ध्याऽपि स्वप्ने स्वयंज्योतिष्ट्वमस्य गम्यते ॥

भाष्यार्थ—('अहो पण लोक जरी असें सांगत असले तरी त्याला सहसा जागें करण्यास काय हरकत आहे ?' अशी आशंका घेऊन सांगतात--) त्याला जर एकाएकीं जागें केलें तर त्यांत हा दोष पाहतात. एकाएकीं अत्यंत जागा केला जाणारा हा त्या इंद्रियद्वारांस प्राप्त होत नाहीं. ( याविषयीं प्रमाण काय ?) श्रुति तेंच हें सांगते-' दुर्भिषज्यं भवति यमेष न प्रतिपद्यते-' 'यं' ज्या इंद्रियद्वारप्रदेशास -ज्या देशांतून शुक्र--इंद्रियामात्रारूप घेऊन हा निघाला त्या इंद्रियदेशास हा आत्मा

पुनः प्राप्त होत नाहीं. ( पुनः प्राप्त न झाल्यास कोणत्या दोषाचा प्रसंग येतो तें सांगतात --) कदाचित् तो आत्मा इंद्रियांच्या मात्रांना --अंशांना वैपरीत्यानें- विपरीतपणें प्रविष्ट करील; आणि त्यामुळें अंधत्व, बधिरत्व इत्यादि दोषांची प्राप्ति झाली असतां ' दुर्भिषज्यं ' कष्टकर वैद्यक्रिया ' अस्मै ' या देहाला ' भवति-' होते. मग हा देह मोठ्या दुःखानें चिकित्सा करण्यास योग्य असा होतो, असा भावार्थ. ( या सांगितले- ल्या लोकप्रसिद्धीचा उपसंहार--) तस्मात् लोकप्रसिद्धीनेंही स्वप्नांत याचें स्वयंज्योतिष्ट्व ज्ञात होतें.

स्वप्नो भूत्वाऽतिक्रान्तो मृत्यो रूपाणीति तस्मात्स्वप्ने स्वयं ज्योति- रात्मा । अथो अपि खल्वन्य आहुर्जागरितदेश एवास्यैष यः स्वप्नः । न संध्यं स्थानान्तरमिहलोकपरलोकाभ्यां व्यतिरिक्तं किंतर्हीहलोक एव जागरितदेशः । यद्येवं किंचातः । शृण्वतो यद्भवति यदा जागरितदेश एवायं स्वप्नस्तदाऽयमात्मा कार्यकरणेभ्यो न व्यावृत्तस्तैर्मिश्रीभूतः । अतो न स्वयंज्योतिरात्मेत्यतः स्वयंज्योतिष्ट्वबाधनायान्य आहुर्जाग- रितदेश एवास्यैष इति । तत्र च हेतुमाचक्षते जागरितदेशत्वे यानि हि यस्माद्धस्त्यादीनि पदार्थजातानि जाग्रज्जागरितदेशे पश्यति लौकि- कस्तान्येव सुप्तोऽपि पश्यतीति ॥

भाष्यार्थ—( गतार्थाचा अनुवाद करून दुसरें मत उत्थापित करितात --) ज्याअर्थी स्वप्न होऊन मृत्यूच्या शरीरेंद्रियादि रूपांचें अति- क्रमण केलेला असा तो होतो त्याअर्थी आत्मा स्वप्नांत स्वयंज्योति आहे. ' अथो खल्वाहु-' खरोखर दुसरेही म्हणतात ' जागरितदेश एव अस्य एष स्वप्नः-' याचा हा स्वप्न जागरितदेशांतच होतो. ( आतां हेंच मतान्तर व्यक्त करितात --) ' संध्य ' हें इहलोक व परलोक यांहून व्यतिरिक्त स्थान नाहीं. तर इहलोकच जागरित देश आहे. असें जरी असलें तरी त्यापासून बिघडलें काय ? त्यामुळें काय होतें तें ऐक. जर जागरित देशांतच हा स्वप्न आहे असें मानलें तर हा आत्मा कार्यकर-

णाहून व्यावृत्त झाला नाहीं, उलट त्यांच्याशीं मिश्रीभूत असा झाला, त्यामुळें आत्मा स्वयंज्योति नाहीं, असें होतें; त्यामुळें स्वयंज्योतिष्ट्वाला बाध आणण्याकरितां 'जागरितदेश एवास्यैषः-' असें अन्य म्हणतात. ते त्याच्या जागरितदेशत्वाविषयीं हेतु सांगतात-'यानि हि-' ज्याअर्थी हत्ती, पर्वत इत्यादि जे जे पदार्थ तो लौकिक पुरुष 'जाग्रत्-' जागरितदेशीं पाहतो तेच निजला असतांही पाहतो, (असा हेतु सांगतात.)

तदसत्। इन्द्रियोपरमात्। उपरतेषु हीन्द्रियेषु स्वप्नान्पश्यति। तस्मान्नान्यस्य ज्योतिषस्तत्र संभवोऽस्ति। तदुक्तं न तत्र रथा न रथयोगा इत्यादि। तस्मादत्रायं पुरुषः स्वयं ज्योतिर्भवत्येव ॥

भाष्यार्थ—(स्वप्नाचें जागरितदेशत्व दूषित करितात–) पण तें म्हणणें बरोबर नाहीं-कारण स्वप्नांत इंद्रियांचा उपरम झालेला असतो. इंद्रियें उपरम झाल्यावरच स्वप्नांना पहातो हें प्रसिद्ध आहे. त्यामुळें स्वप्नांत-अन्य ज्योतीचा संभव नाहीं; तेंच 'न तत्र रथा न रथयोगाः' इत्यादि म्हटलें आहे. [म्ह० हें त्याविषयीं प्रमाण आहे. याप्रमाणें बाह्य ज्योतीच्या अभावीही स्वप्नांत व्यवहार होत असल्याचें दिसत असल्यामुळें त्या अवस्थेंत आत्म्याच्या स्वयंज्योतिष्ट्वाविषयीं आक्षेप घेतां येणें अशक्य आहे, असा उपसंहार करितात–] तस्मात् या स्वप्नांत हा पुरुष स्वयंज्योति आहेच.

स्वयं ज्योतिरात्माऽस्तीति स्वप्ननिदर्शनेन प्रदर्शितम्। अतिक्रामति मृत्यो रूपाणीति च। क्रमेण संचरन्निहलोकपरलोकादीनिहलोकपरलोकादिव्यतिरिक्तः। तथा जाग्रत्स्वप्नकुलायाभ्यां व्यतिरिक्तः। तत्र च क्रमसंचारान्नित्यश्चेत्येतत्प्रतिपादितं याज्ञवल्क्येन ॥

भाष्यार्थ—(विद्या सांगितलेली नसतांना 'सहस्रं भगवते ददामि' हें पुढील वचन कसें उपपन्न होतें, अशी आशंका घेऊन गतार्थाचा अनुवाद करितात–) आत्मा स्वयंज्योति आहे, हें स्वप्नाच्या दृष्टान्तानें सांगितलें, तसेंच 'अतिक्रामति मृत्यो रूपाणि-' मृत्यूच्या

रूपांचें अतिक्रमण करतो, ( या वाक्यानें आत्म्याचें शरीरेंद्रियांहून व्यतिरिक्तत्व सांगितलें. ) त्याचप्रमाणें इह लोक, परलोक इत्यादिकांमध्यें क्रमानें संचार करणारा तो इहलोक-परलोकादिकांहून व्यतिरिक्त आहे, त्याचप्रमाणें जाग्रत्-स्वप्न–शरीरांहूनही व्यतिरिक्त आहे. ( लोकद्वय व स्थानद्वय यांतील क्रमसंचारामुळें सिद्ध होणारा आणखीं एक अर्थ सांगतात–) आणि त्या दोन लोकांतून व दोन स्थानांतून क्रमानें संचार केल्यामुळें तो आत्मा नित्य आहे, असें याज्ञवल्क्यानें प्रतिपादन केलें आहे.

अतो विद्यानिष्क्रयार्थं सहस्रं ददामीत्याह जनकः। सोऽहमेवं बोधितस्त्वया भगवते तुभ्यं सहस्रं ददामि । विमोक्षश्च कामप्रश्नो मयाऽभिप्रेतः। तदुपयोग्ययं तादर्थ्यात्तदेकदेश एव । अतस्त्वां नियोक्ष्यामि समस्तकामप्रश्ननिर्णयश्रवणेन विमोक्षायात ऊर्ध्वं ब्रूहीति । येन संसाराद्विप्रमुच्येयम् । त्वत्प्रसादात् । विमोक्षपदार्थैकदेशनिर्णयहेतोः सहस्रदानम् ॥ १४ ॥

भाष्यार्थ—आत्मा स्वयंज्योति आहे, देहादिकांहून व्यतिरिक्त आहे व नित्य आहे, असें ज्ञान करून दिलेलें असल्यामुळें या विद्यानिष्क्रयार्थ मी सहस्रधन देतों; असें जनक म्हणतो–' सोऽहं भगवते सहस्रं ददामि-' तो मी याप्रमाणें तुजकडून बोध केला गेलेला तुम्हांला सहस्र देतों. ( ऐच्छिक प्रश्नाचा निर्णय झालेला असल्यामुळें राजा आतां आकांक्षाशून्य झाला आहे, असें कोणाला वाटेल म्हणून म्हणतात--) विमोक्ष हा कामप्रश्न मला अभीष्ट आहे. ( सम्यक् बोध हा विमोक्षाचा हेतु आहे. यास्तव मला यथार्थ ज्ञान द्या. ' अरे राजा तुला वर सम्यग्बोधच–सम्यग्ज्ञानच सांगितलें आहे, यास्तव तो आतां सांगावयाचा राहिलेला नाहीं,' असें याज्ञवल्क्य म्हणतील, म्हणून सांगतात· ) वरील आत्मप्रत्ययाची उक्ति त्या यथार्थ बोधाच्या उपयोगी आहे. त्याला तादर्थ्य असल्यामुळें म्ह० पदार्थज्ञानाला वाक्यार्थज्ञानांगत्व असल्यामुळें वरील ज्ञान हा सम्यग्बोधाचा एकदेशच आहे. ( जनकाच्या ऐच्छिक

प्रश्नाचा अद्यापि निर्णय झालेला नाहीं, याविषयीं पुढील वाक्यच गमक[1] आहे, असें सांगतात-); यास्तव तुला प्रश्न करतों--समस्त कामप्रश्नाच्या निर्णयाचें श्रवण व्हावें, म्हणून यापुढें विमोक्षाकरितां सांग; असा प्रश्न करतों. ( येथील विमोक्ष हा शब्द सम्यग्ज्ञान या अर्थी आहे, असें सुचवितात--) ज्या विमोक्षानें म्ह० सम्यग्ज्ञानानें मी संसारापासून तुमच्या प्रसादानें मुक्त होईन (सम्यग्ज्ञानप्राप्तीमध्यें गुरुप्रसादाला प्राधान्य आहे असें 'त्वत्प्रसादात्' या पदानें सुचविलें आहे. 'अहो पण विमोक्षपदाचा अर्थ निर्णीत झालाच आहे. नाहींतर सहस्रदान आकस्मिक होतें,' अशी आशंका घेऊन सांगतात--) विमोक्ष-पदाच्या अर्थाच्या एकदेशाचा निर्णय झाल्यामुळें हें सहस्रदान आहे. ( समस्त विमोक्षपदाचा अर्थ निर्णीत झाला म्हणून नव्हे.) १४.

स वा एष एतस्मिन्संप्रसादे रत्वा चरित्वा दृष्ट्वैव पुण्यं च पापं च पुनः प्रतिन्यायं प्रतियोन्याद्रवति स्वप्नायैव स यत्तत्र किंचित्पश्यत्यनन्वागतस्तेन भवत्यसङ्गो ह्ययं पुरुष इत्येवमेवैतद्याज्ञवल्क्य सोऽहं भगवते सहस्रं ददाम्यत ऊर्ध्वं विमोक्षायैव ब्रूहीति ॥ १५ ॥

अर्थ—तो हा प्रकृत आत्मा या संप्रसादांत- सुषुप्तांत रतीचा अनुभव घेऊन व विहार करून पुण्यफल व पापफल यांस केवळ पाहूनच पुनः गेल्या मार्गानें व त्या त्या पूर्व स्थानींच स्वप्नस्थानार्थच परत येतो. तो स्वप्नांत जें कांहीं पुण्य-पापफळ पाहतो त्यानें असंबद्ध असतो. कारण हा पुरुष असंग आहे. जनक--'याज्ञवल्क्या, अगदीं खरें आहे.

१ ज्ञापक, सूचक.

१८

या ज्ञानासाठीं मी तुला एक सहस्र दान देतों. आतां या पुढें विमोक्षासाठींच ज्ञान सांग ' १५.

यत्प्रस्तुतमात्मनैवायं ज्योतिषाऽऽस्त इति तत्प्रत्यक्षतः प्रतिपादितमत्रायं पुरुषः स्वयंज्योतिर्भवतीति स्वप्ने । यत्तूक्तं स्वप्नो भूत्वेमं लोकमतिक्रामति मृत्यो रूपाणीति तत्रैतदाशङ्क्यते मृत्यो रूपाण्येवातिक्रामति न मृत्युम् । प्रत्यक्षं ह्येतत्स्वप्ने कार्यकरणव्यावृत्तस्यापि मोदत्रासादिदर्शनम् । तस्मान्नूनं नैवायं मृत्युमतिक्रामति । कर्मणो हि मृत्योः कार्यं मोदत्रासादि दृश्यते ॥

भाष्यार्थ—( पुढील कंडिकेचें व्याख्यान करण्यासाठीं गतार्थाचा अनुवाद करितात–) ' आत्मना एव अयं ज्योतिषा आस्ते-' इत्यादि वाक्यानें जें आत्म्याचें स्वयंज्योतिष्ट्व ब्राह्मणादिकांत प्रस्तुत आहे तेंच ' अत्रायं पुरुषः स्वयंज्योतिर्भवति-' या वाक्यानें प्रत्यक्षतः स्वप्नांत प्रतिपादिलें. ( आतां प्रश्न उत्थापित करितात–) पण ' स्वप्नो भूत्वा इमं लोकं अतिक्रामति मृत्यो रूपाणि-' तो स्वप्न होऊन या लोकाचें–मृत्यूच्या रूपांचें अतिक्रमण करतो, असें जें वर म्हटलें आहे त्याविषयीं ही आशंका घेतली जाते. आत्मा मृत्यूच्या रूपांचेंच अतिक्रमण करतो; मृत्यूचें नाहीं. कारण स्वप्नांत शरीर व इंद्रियें यांपासून व्यावृत्त झालेल्याही आत्म्याला आनंद, भय ( इच्छा, द्वेष ) इत्यादिकांचा अनुभव येतो, हें प्रसिद्ध आहे. तस्मात् [ म्ह० कार्याची कारणाहून अन्य स्थळीं प्रवृत्ति होणें अयोग्य असल्यामुळें ] खचित हा मृत्यूचें अतिक्रमण करितच नाहीं. ( याचेंच उपपादन–) मोद-भय इत्यादि हें कर्मरूप मृत्यूचें कार्य आहे, हें प्रसिद्ध आहे. ( यास्तव स्वप्नाला प्राप्त झालेला आत्मा कर्माख्य मृत्यूचें उल्लंघन करीत नाहीं, असा भावार्थ. )

यदि च मृत्युना बद्ध एवायं स्वभावतस्ततो विमोक्षो नोपपद्यते । न हि स्वभावात्कश्चिद्विमुच्यते । अथ स्वभावो न भवति मृत्युस्ततस्तस्मान्मोक्ष उपपत्स्यते । यथाऽसौ मृत्युरात्मीयो धर्मो न भवति

तथा प्रदर्शनायात ऊर्ध्वं विमोक्षाय ब्रूहीत्येवं जनकेन पर्यनुयुक्तो या-ज्ञवल्क्यस्तद्दिदर्शयिषया प्रववृते ॥

भाष्यार्थ—( 'अहो पण मृत्यूचें अतिक्रमण न कां होईना, त्यांत काय बिघडलें ?' उत्तर-) जर हा आत्मा स्वभावतः मृत्यूनें बद्धच अ-सेल तर विमोक्ष उपपन्नच होत नाहीं. कारण स्वभावापासून कोणी विमुक्त होत नाहीं. आतां मृत्यु हा जर आत्म्याचा स्वभाव नसेल तर त्यापासून मोक्ष उपपन्न होईल. यास्तव ज्याप्रकारें हा मृत्यु आत्म्याचा धर्म नव्हे, असें सिद्ध होईल त्याप्रकारें प्रदर्शित करण्यासाठीं 'अत ऊर्ध्वं विमोक्षाय ब्रूहि' याप्रमाणें जनकाकडून प्रश्न केला गेलेला याज्ञवल्क्य मृत्यूचें अतिक्रमण दाखविण्याच्या इच्छेनें प्रवृत्त झाला आहे.

स वै प्रकृतः स्वयंज्योतिः पुरुषः एष यः स्वप्ने प्रदर्शित . एतस्मि-न्संप्रसादे सम्यक्प्रसीदत्यस्मिन्निति संप्रसादः । जागरिते देहेन्द्रिय-व्यापारशतसंनिपातजं हित्वा कालुष्यं तेभ्यो विप्रमुक्त ईषत्प्रसीदति स्वप्ने । इह तु सुषुप्ते सम्यक्प्रसीदतीत्यतः सुषुप्तं संप्रसाद उच्यते ॥

भाष्यार्थ—'स वै.' तोच प्रकृत स्वयंज्योति पुरुष कीं 'एषः' जो स्वप्नांत प्रदर्शित केलेला ( पुरुष ) 'एतस्मिन्संप्रसादे.' या संप्रसादांत ( स्थित होऊन मृत्यूचें अतिक्रमण करतो, असा शेष लावावा. ) ज्यांत चांगल्या रीतीनें प्रसन्न होतो तो संप्रसाद. ( सुषुप्ताचें संप्रसादत्व सिद्ध करितात--) जागरितांतील देह व इंद्रियें यांच्या शेकडों व्यापारांच्या संबंधामुळें प्राप्त झालेलें कालुष्य—मालिन्य -टाकून त्या व्यापारांपासून मुक्त झालेला आत्मा स्वप्नांत थोडासा प्रसन्न होतो. पण या सुषुप्तांत 'सम्यक्.' चांगल्याप्रकारें प्रसन्न होतो; म्हणून सुषुप्ताला 'संप्रसाद' असें म्हटलें जातें.

तीर्णो हि तदा सर्वाञ्शोकोन्सलिल एको द्रष्टेति हि वक्ष्यति सुषु-प्तस्थमात्मानम् । स वा एष एतस्मिन्संप्रसादे क्रमेण संप्रसन्नः सन्सु-षुप्ते स्थित्वा ॥

भाष्यार्थ—( याविषयीं पुढील वाक्याचें आनुकुल्य दाखवितात--) ' तीर्णो हि०-' त्यावेळीं सर्व शोकांचें उल्लंघन केलेला ( कं० २२पहा) असाच होतो. 'सलिल एको द्रष्टा०-'( कं० ३२ पहा) जळांतील प्रतिबिं-बाप्रमाणें-एकच द्रष्टा असें पुढें सुषुप्तस्थ आत्म्याला उद्देशून म्हणती-ल. ( संप्रसाद हें सुषुप्त स्थान जरी असलें तरी त्याचा प्रकृत विषयाशीं काय संबंध ? तें सांगतात–) तोच हा प्रकृत आत्मा या संप्रसादांत क्रमानें संप्रसन्न होत्साता सुषुप्तांत स्थिर होऊन ( मृत्यूचें अतिक्र-मण करतो. )

कथं संप्रसन्नः । स्वप्नात्सुषुप्तं प्रविविक्षुः स्वप्नावस्थ एव रत्वा रतिमनुभूय मित्रबन्धुजनदर्शनादिना चरित्वा विहृत्यानेकधा चरणफलं श्रममुपलभ्येत्यर्थः । दृष्ट्वैव न कृत्वेत्यर्थः । पुण्यं च पुण्य-फलं पापं च पापफलम् । न तु पुण्यपापयोः साक्षाद्दर्शनमस्ती-त्यवोचाम । तस्मान्न पुण्यपापाभ्यामनुबद्धः ॥

भाष्यार्थ—( या उक्तार्थाचें उपपादन करण्यासाठीं आकांक्षा सांग-तात–) संप्रसन्न कसा ? स्वप्नस्थानापासून सुषुप्तस्थानांत प्रवेश कर-ण्याची इच्छा करणारा आत्मा ' स्वप्न ' या अवस्थेंत असतांनाच ' रत्वा-' मित्र, बंधुजन यांच्या दर्शनादिकांच्या योगानें रतीचा अनुभव घेऊन ' चरित्वा-' अनेक प्रकारें विहार करून म्ह० त्या विहाराचें श्रम हें फळ मिळवून, असा भावार्थ. ' दृष्ट्वा एव-' केवळ पाहूनच, करून नव्हे ( काय ? ) ' पुण्यं च पापं च-' पुण्याचें फळ व पापाचें फळ ( केवळ पाहूनच ) पुण्य व पाप यांचें साक्षात् दर्शन संभवत नाहीं, हें आम्ही[१] वर सांगितलें आहे, ( पुण्यपापांचें नुस्तें दर्शनच करून, साक्षात् पुण्यपापाचरण करून नव्हे, या म्हणण्यानें काय निष्पन्न झालें तें सां-गतात–) तस्मात् पुण्य व पाप यांच्या योगानें अनुबद्ध न झालेला ( असा तो पुनः सुषुप्तास प्राप्त होतो. )

---

१ ' उभयान् पाप्मन आनन्दांश्च पश्यति ' या ठिकाणीं सांगितलें आहे.

योहि करोति पुण्यपापे स ताभ्यामनुबध्यते । न हि दर्शनमात्रेण तदनुबद्धः स्यात् । तस्मात्स्वप्नो भूत्वा मृत्युमतिक्रामत्येव न मृत्युरूपाण्येव केवलम् । अतो न मृत्योरात्मस्वभावत्वाशङ्का । मृत्युश्चेत्स्वभावोऽस्य स्वप्नेऽपि कुर्यात् । न तु करोति । स्वभावश्चेत्क्रिया स्यादनिर्मोक्षतैव स्यात् । न तु स्वभावः स्वप्नेऽभावात् । अतो विमोक्षोऽस्योपपद्यते मृत्योः पुण्यपापाभ्याम् ॥

भाष्यार्थ—( 'पुण्यपापदर्शकालाही त्यांचा बंध लागेल,' अशी आशंका घेऊन सांगतात–) जो पुण्य व पाप करतो तोच त्यांच्या योगानें अनुबद्ध होतो. नुसत्या दर्शनानें त्यांनीं कोणी अनुबद्ध होत नाहीं. तस्मात् आत्मा स्वप्न होऊन मृत्यूचें अतिक्रमण करतोच; केवल मृत्यूच्या रूपांचेंच नव्हे. यास्तव मृत्यूला आत्मस्वभावता आहे, म्हणजे मृत्यु हा आत्म्याचा स्वभाव आहे, ही शंका उरत नाहीं. मृत्यु जर याचा स्वभाव असता तर स्वप्नांतही त्यानें पुण्यपापकर्में केलीं असतीं. पण तो स्वप्नांत पुण्य-पाप करीत नाहीं. ( कारण पुढें याच कंडिकेंत पुण्यपापांनीं तो ' अनन्वागत ' असतो, असें सांगितलें आहे. तसेंच त्याविषयीं असंगत्ववाक्य आहे. शिवाय मृत्यूला जर आत्म्याचा स्वभाव मानलें तर मोक्षशास्त्राचें प्रामाण्यही नष्ट होतें, अशा आशयानें म्हणतात–) क्रिया हा जर आत्मस्वभाव असेल तर अनिर्मोक्षताच प्राप्त होईल.पण क्रिया हा आत्मस्वभाव नव्हे. कारण स्वप्नांत तिचा अभाव असतो.यास्तव या आत्म्याचा मृत्यूपासून म्हणजे पुण्यपापांपासून विमोक्ष होणें उपपन्न आहे.

ननु जागरितेऽस्य स्वभाव एव । न । बुद्ध्याद्युपाधिकृतं हि तत् । तच्च प्रतिपादितं सादृश्याद्ध्यायतीव लेलायतीवेति । तस्मादेकान्तेनैव स्वप्ने मृत्युरूपातिक्रमणान्न स्वाभाविकत्वाशङ्काऽनिर्मोक्षता वा ॥

भाष्यार्थ—( 'स्वप्नांत जरीं मृत्यूच्या स्वभावत्वाचा अभाव असला तरी जागरितांत कर्तृत्व हा आत्म्याचा स्वभाव आहे, त्यामुळें नियमानें त्या मृत्यूचा अतिक्रम सिद्ध होत नाहीं;' अशीं शंका घेतात–)' अहो पण

जागरितांत कर्तृत्व हा त्याचा स्वभावच आहे.' ('कर्तृत्व औपाधिक आहे, स्वाभाविक नाहीं. त्यामुळें आत्म्याला मृत्यूचें अतिक्रमण करतां येतें,' असें समाधान करितात–) जागरितांतही कर्तृत्व हा आत्मस्वभाव नव्हे. तें त्याचें कर्तृत्व बुद्ध्यादि-उपाधिकृत आहे आणि तें औपाधिक आहे ही गोष्ट 'ध्यायतीव लेलायतीव' यांतील सादृश्यवाचक इव शब्दांनीं प्रतिपादिली आहे. (जागरितांतही कर्तृत्वाला स्वाभाविकत्व नाहीं, असें सिद्ध झाले असतां फलित सांगतात–) तस्मात् आत्मा स्वप्नांत अगदीं नियमानेंच मृत्युरूपाचें अतिक्रमण करीत असल्यामुळें तो स्वाभाविक आहे, अशी शंका येतच नाहीं. किंवा मृत्यु हा आत्म्याचा स्वाभाविक धर्म असल्यामुळें त्याचा मोक्ष होणें शक्य नाहीं, असें ठरून अनिर्मोक्षतेचाही प्रसंग येत नाहीं.

तत्र चरित्वेति चरणफलं श्रममुपलभ्येत्यर्थः । ततः संप्रसादानुभवोत्तरकालं पुनः प्रतिन्यायं यथान्यायं यथागतं निश्चित आयो न्यायः। अयनमायो निर्गमनं । पुनः पूर्वगमनवैपरीत्येन यदागमनं स प्रतिन्यायः । यथागतं पुनरागच्छतीत्यर्थः । प्रतियोनि यथास्थानम् । स्वप्रस्थानाद्धि सुषुप्तं प्रतिपन्नः सन्यथास्थानमेव पुनरागच्छति । प्रतियोन्याद्रवति स्वप्नायैव स्वप्नस्थानायैव ॥

भाष्यार्थ—('पुण्यं च पापं च.' येथपर्यंतच्या वाक्याचें व्याख्यान करून 'पुनः प्रतिन्यायं.' इत्यादि वाक्याचें व्याख्यान करितात–) स्वप्नांत 'चरित्वा' म्ह० चरणाचें–विहाराचें फळ असा जो श्रम त्याचा अनुभव घेऊन, असा भावार्थ. त्यानंतर म्ह० स्वप्नांतून निघून सुषुप्तीचा अनुभव घेऊन त्यानंतरच्या काळीं 'पुनः.' पुनरपि 'प्रतिन्यायं.' यथान्याय जसा आला होता त्याप्रमाणें 'नि+आयः.' निश्चित आय = न्याय. अयन म्ह० आय–निर्गमन–निघणें, जाणें. पुनः म्ह०

---

१ एका स्थानापासून दुसऱ्या स्थानास प्राप्त होण्याचा त्याचा दृढ अभ्यास व्यक्त करण्यासाठीं 'पुनः' असें म्हटलें आहे.

संप्रसादानंतर पूर्व गमनाच्या वैपरीत्यानें—उलट—जें आगमन तो प्रतिन्याय, जसा गेला तसाच तो पुनरपि परत येतो, असा भावार्थ. 'प्रतियोनि-' यथास्थान. स्वप्नस्थानापासूनच तो सुषुप्तास प्राप्त होत्साता यथास्थानींच पुनः येतो. 'प्रतियोनि आद्रवति स्वप्नाय एव-' स्वप्नस्थानासाठींच यथास्थानीं परत येतो.

ननु स्वप्ने न करोति पुण्यपापे तयोः फलमेव पश्यतीति कथमवगम्यते यथा जागरिते तथा करोत्येव स्वप्नेऽपि तुल्यत्वाद्दर्शनस्येति। अत आह स आत्मा यत्किंचित्तत्र स्वप्ने पश्यति पुण्यपापफलमनन्वागतोऽननुबद्धस्तेन दृष्टेन भवति नैवानुबद्धो भवति ॥

भाष्यार्थ—('स यत्तत्र०' इत्यादि वाक्याचें शंकापूर्वक व्याख्यान-) 'अहो पण आत्मा स्वप्नांत पुण्य व पाप करीत नाहीं, तर त्याचें फलच पाहतो, हें कशावरून अवगत होतें? जसा जागरितांत त्याचप्रमाणें स्वप्नांतही तो करतोच. कारण त्याविषयींचा अनुभव सारखाच असतो,' असें कोणी म्हणेल म्हणून श्रुति सांगते—'सः-' तो आत्मा 'यत् किंचित्-' जें कांहीं पुण्य-पापफल 'तत्र-' स्वप्नांत 'पश्यति-' पाहतो 'अनन्वागतः तेन भवति' त्या दृष्ट—अनुभूत पुण्य-पापफलानें तो अननुबद्ध होतो, त्यानें तो अनुबद्ध होत नाहीं.

यदि हि स्वप्ने कृतमेव तेन स्यात्तेनानुबध्येत। स्वप्नादुत्थितोऽपि समन्वागतः स्यात्। न च तल्लोके स्वप्नकृतकर्मणाऽन्वागतत्वप्रसिद्धिः। न हि स्वप्नकृतेनाऽऽगसाऽऽगस्कारिणमात्मानं मन्यते कश्चित्। न च स्वप्नदृश आगः श्रुत्वा लोकस्तं गर्हति परिहरति वा। अतोऽनन्वागत एव तेन भवति। तस्मात्स्वप्ने कुर्वन्निवोपलभ्यते न तु क्रियाऽस्ति परमार्थतः॥ उतेव स्त्रीभिःसह मोदमानं इति श्लोक उक्तः। आख्याता-

---

१ जागरितांतून स्वप्नास, व स्वप्नांतून सुषुप्तास जातो, हें पूर्व गमन; त्याच्या वैपरीत्यानें म्ह० सुषुप्तांतून स्वप्नास किंवा जागरितास जाणें, हें उलट आगमन हाच प्रतिन्याय होय.

रश्च स्वप्नस्य सहेवशब्देनाऽऽचक्षते हस्तिनोऽद्य घटीकृता धावन्तीव मया दृष्टा इति । अतो न तस्य कर्तृत्वमिति ॥

भाष्यार्थ—( वरील वाक्यार्थाचेंच उपपादन–) जर त्या आत्म्यानें स्वप्नांत केलेंच असतें तर तो त्यानें[1] ' समन्वागत-' उत्तमप्रकारें अन्वागत–संयुक्त झाला असता, स्वप्नांतून उठलेलाही तो त्यानें ' समन्वागत-' उत्तमप्रकारें अन्वागत--संयुक्त झाला असता. पण स्वप्नांत केलेल्या कर्मानें स्वप्नद्रष्टा अन्वागत होतो, अशी व्यवहारांत प्रसिद्धि नाहीं. (जागें झाल्यावरही तो पुरुष त्या त्या कर्मानें पापी किंवा पुण्यवान् होतो अशी प्रसिद्धि नाहीं, याविषयींच स्वानुभव सांगतात–) स्वप्नांत केलेल्या दोषानें–अपराधानें कोणीही आपल्याला दोषी–अपराधी मानीत नाहीं. ( याविषयीं लोकांचीही संमति दाखवितात–) स्वप्न पाहणाराचा दोष ऐकून लोकही त्याची निंदा किंवा परिहार करीत नाहींत. त्यामुळें तो स्वप्नांतील पुण्य-पापकर्मानें अनन्वागतच--असंबद्धच असतो. तस्मात् स्वप्नांत आत्मा जणुकाय करणारा असा उपलब्ध होतो; पण वस्तुतः त्याची क्रिया संभवत नाहीं.

( स्वप्नाला आभासत्व असल्यामुळेंही वस्तुतः त्यांत क्रियाच नाहीं, असें सांगतात--) ' उतेव स्त्रीभिः सह मोदमानः-' जणु काय स्त्रियांसह आनंदानुभव घेत, हा श्लोक वर (श्लोक १३ पहा) सांगितला आहे. (स्वप्नाच्या आभासत्वाला लोकप्रसिद्धिही अनुकूल आहे, असें सांगतात–) स्वप्नाचें कथन करणारे ' इव-' जणुं काय या शब्दासह–हा शब्द योजून--स्वप्न सांगत असतात. मी आज समूहरूपानें एकत्र जमून हत्ती जणु काय धांवत आहेत असें पाहिलें, असें सांगतात. यास्तव स्वप्नद्रष्ट्याला कर्तृत्व नाहीं.

कथं पुनरस्याकर्तृत्वमिति । कार्यकरणैर्मूर्तैः संश्लेषो मूर्तस्य स तु

---

१ स्वप्नांत केलेल्या कर्मानें.

क्रियाहेतुर्दृष्टः । न ह्यमूर्तः कश्चित्क्रियावान्दृश्यतेऽमूर्तश्चाऽऽत्माऽतोऽसङ्गः । यस्माच्चासङ्गोऽयं पुरुषस्तस्मादनन्वागतस्तेन स्वप्नदृष्टेन । अत एव न क्रियाकर्तृत्वमस्य कथंचिदुपपद्यते । कार्यकरणसंश्लेषेण हि कर्तृत्वं स्यात्स च संश्लेषः सङ्गोऽस्य नास्ति यतोऽसङ्गो ह्ययं पुरुषः । तस्मादमृतः ॥

भाष्यार्थ—( प्रतिज्ञारूप अनन्वागतवाक्याचें व्याख्यान करून हेतुरूप असंगवाक्याचें व्याख्यान करण्यासाठीं अगोदर आकांक्षा सांगतात–) याला अकर्तृत्व कसें बरें ? ( एका मूर्त पदार्थाचा दुसऱ्या मूर्त पदार्थाशीं संयोग होतांना क्रियेचा अनुभव येतो. पण अमूर्ताचा संयोगच संभवत नाहीं, आत्मा अमूर्त आहे, त्यामुळें त्याचा संयोग संभवत नाहीं, संयोगाच्या अभावीं क्रियेचाही अभाव होतो. याप्रमाणें आत्म्याच्या अकर्तृत्वाची सिद्धि होते, असें उत्तर ' असंगो ह्ययं पुरुषः ' या हेतुवाक्याचा अर्थ सांगून, देतात–) मूर्त पदार्थाचा मूर्त शरीरेंद्रियांशीं संयोग होतो. तो क्रियेचा हेतु आहे, असें अनुभवानें ठरलेलें आहे. अमूर्त असलेला कोणताही पदार्थ क्रियावान् असलेला दिसत नाहीं. आत्मा अमूर्त आहे. त्यामुळेंच असंग आहे; आणि ज्याअर्थीं हा पुरुष–आत्मा असंग आहे, त्याअर्थीं तो स्वप्नांत पाहिलेल्या पुण्य-पापानें अनन्वागत–असंबद्ध आहे. ( आत्मा असंग असल्यामुळें अकर्ता आहे, असें जें सांगितलें आहे त्याचेंच समर्थन करितात–) त्यामुळेंच याचें क्रियाकर्तृत्व कोणत्याही प्रकारें उपपन्न होत नाहीं. कारण शरीरेंद्रियसंयोगानेंच–संश्लेषानेंच कर्तृत्व होतें. तो संश्लेष–संग आत्म्याला नाहीं, कारण हा पुरुष असंग आहे. ( क्रियावत्त्वाच्या अभावीं जन्म मरणादिराहित्य सिद्ध होतें, तेंच कूटस्थत्व होय, असें सांगतात–) असंग असल्यामुळेंच तो अमृत आहे.

एवमेवैतद्याज्ञवल्क्य । सोऽहं भगवते सहस्रं ददाम्यत ऊर्ध्वं वि-

मोक्षायैव ब्रूहि । मोक्षपदार्थैकदेशस्य कर्मप्रविवेकस्य सम्यग्दर्शितत्वात् । अत ऊर्ध्वं विमोक्षायैव ब्रूहीति ॥ १५ ॥

भाष्यार्थ—( याज्ञवल्क्यांनीं सांगितलेल्या या कर्मप्रविवेकाचा अंगीकार करितात–) 'एवमेवैतत्०-' हे याज्ञवल्क्या, तुम्ही सांगतां तें मला मान्य आहे. ( जनक कर्माहून अगदीं भिन्न अशा आत्म्याच्या ज्ञानाविषयीं आपली दृढता सुचवितो–) ' सोऽहं०-' तो मी आपल्याला सहस्त्र धन देतो. ( पण या ज्ञानानें मी आकांक्षाशून्य झालों नाहीं. ) या पुढें मला विमोक्षासाठींच आत्मज्ञान सांग. (तर मग सहस्त्रदान कशासाठीं केलेंस ? ) मोक्षपदार्थाचा एकदेश असा जो कर्मप्रविवेक तो चांगल्याप्रकारें प्रदर्शित केल्यामुळें ( मी त्या ज्ञानासाठीं सहस्त्रदान केलें. ) आतां यापुढें विमोक्षासाठींच सांग. १५.

स वा एष एतस्मिन्स्वप्ने रत्वा चरित्वा दृष्ट्वैव पुण्यं च पापं च पुनः प्रतिन्यायं प्रतियोन्याद्रवति बुद्धान्तायैव स यत्तत्र किंचित्पश्यत्यनन्वागतस्तेन भवत्यसङ्गो ह्ययं पुरुष इत्येवमेवैतद्याज्ञवल्क्य सोऽहं भगवते सहस्रं ददाम्यत ऊर्ध्वं विमोक्षायैव ब्रूहीति ॥ १६ ॥

अर्थ—तोच हा प्रकृत आत्मा या स्वप्नांत रतीचा अनुभव घेऊन, विहार करून पुण्य व पाप यांचीं फलें नुस्तीं पाहूनच पुनः यथागत व यथास्थान जागरितस्थानासच परत येतो. तो स्वप्नांत जें कांहीं पुण्यपाप पाहतो त्यानें अनन्वागत—असंबद्ध असतो. कारण हा पुरुष असंग आहे. जनक–" हे याज्ञवल्क्या, खरें आहे. आपल्याला मी या ज्ञानासाठीं एक सहस्त्र द्रव्य देतों. या पुढें विमोक्षासाठींच ज्ञान सांग." १६

तत्रासङ्गो ह्ययं पुरुष इत्यसङ्गताऽकर्तृत्वे हेतुरुक्तः । उक्तं च पूर्वं

कर्मवशात्स ईयते यत्र काममिति । कामश्च सङ्गोऽतोऽसिद्धो हेतुरुक्तोऽसङ्गो ह्ययं पुरुष इति ॥ न त्वेतदस्ति । कथं तर्हि । असङ्ग एवेत्येतदुच्यते । स वा एष एतस्मिन्स्वप्ने स वा एष पुरुषः संप्रसादात्प्रत्यागतः स्वप्ने रत्वा चरित्वा यथाकामं दृष्ट्वैव पुण्यं च पापं चेति सर्वं पूर्ववत् । बुद्धान्तायैव जागरितस्थानाय । तस्मादसङ्ग एवायं पुरुषः । यदि स्वप्ने सङ्गवान्स्यात्कामी ततस्तत्सङ्गजैर्दोषैर्बुद्धान्ताय प्रत्यागतो लिप्येत ॥ १६ ॥

भाष्यार्थ—( सोळाव्या कंडिकेनें ज्या शंकेचें निरसन करावयाचें आहे ती शंका सांगतात–) पूर्व कंडिकेंत ' असंगो ह्ययं पुरुषः ' या वाक्यानें आत्म्याचें असंगत्व हा त्याच्या अकर्तृत्वाविषयीं हेतु सांगितला आहे. पूर्वी–श्लोकांचा उपन्यास करीत असतांना 'तो कर्मवशात् [ स्वप्नाला कारण होणाऱ्या कर्मांच्या सामर्थ्यानें ] जेथें जेथें काम असेल तेथें जातो,' असें सांगितलें आणि काम हाच संग आहे. यास्तव ' असंगो ह्ययं पुरुषः ' असा जो वर आत्म्याच्या अकर्तृत्वाविषयीं हेतु सांगितला आहे तो असिद्ध आहे.

( या हेतूच्या असिद्धीचा परिहार करितात–) असें नाहीं. तर मग त्या हेतूची सिद्धि कशी होते ? ( पुढील कंडिकेंत ) आत्मा असंगच आहे, हें सांगितलें जातें. ' स वा एष एतस्मिन्स्वप्ने-' तोच हा पुरुष संप्रसादांतून–सुषुप्तांतून परत आलेला स्वप्नांत–' रत्वा चरित्वा-' रति व विहार यथेच्छ करून ' दृष्ट्वैव पुण्यं च पापं च-' पुण्यफल व पापफल पाहूनच; करून नव्हे इत्यादि सर्व अर्थ पूर्वकंडिकेंतील अर्थाप्रमाणेंच जाणावा. ' बुद्धान्तायैव-' जागरितस्थानालाच. तस्मात म्ह० स्वप्नांत कर्तृत्वाचा अभाव असल्यामुळें हा पुरुष असंगच आहे. ( हेंच असंगत्व व्यतिरेकमुखानें विशद करितात–) जर आत्मा स्वप्नांत संगवान् म्हणजे कामी होईल तर जागरितस्थानास प्राप्त झालेला तो त्या संगजन्य दोषांनीं लिप्त होईल ! ( स्वप्नांत विशिष्ट विषयां-

विषयीं जो कामसंज्ञक संग त्या संगाच्या सामर्थ्यानें उद्भवलेल्या अपराधांनीं आत्मा लिप्त झाला असता, पण तो तर लिप्त होत नाहीं. कांहीं अशुभसूचक स्वप्नांना प्रायश्चित्त सांगितलेलें आढळतें; पण तेंही स्वप्नसूचित अशुभाची निवृत्ति व्हावी म्हणून सांगितलेलें असतें, स्वप्नांतील वस्तु व वृत्त खरें आहे, म्हणून नव्हे. ) १६.

स वा एष एतस्मिन्बुद्धान्ते रत्वा चरित्वा
दृष्ट्वैव पुण्यं च पापं च पुनः प्रतिन्यायं
प्रतियोन्याद्रवति स्वप्नान्तायैव ॥ १७ ॥

अर्थ—तो हा प्रकृत आत्मा या जागरितांत रतीचा अनुभव घेऊन व विहार करून पुण्य व पाप यांच्या फळांना केवळ पाहूनच पुनः यथागत—पूर्वीं गेलेल्या मार्गानेंच व यथास्थान- पूर्वींच्याच आपापल्या स्थानीं स्वप्नान्तासाठींच-स्वप्नस्थानासाठींच परत येतो. (तो त्या जागरितांत जें कांहीं पाहतो त्यानें अनन्वागत—असंबद्ध होतो. कारण हा पुरुष असंग आहे. जनक—" तुम्ही सांगतां तें कबूल आहे. तो मी तुम्हांला या विद्येसाठीं सहस्रदान देतों. आतां या पुढें विमोक्षासाठीच सांगा.) १७.

यथासौ स्वप्नेऽसङ्गत्वात्स्वप्नसङ्गजैर्दोषैर्जागरिते प्रत्यागतो न लिप्यत एवं जागरितसङ्गजैरपि दोषैर्न लिप्यत एव बुद्धान्ते । तदेतदुच्यते । स वा एष एतस्मिन्बुद्धान्ते जागरिते रत्वा चरित्वेत्यादि पूर्ववत् । स यत्तत्र बुद्धान्ते किंचित्पश्यत्यनन्वागतस्तेन भवत्यसङ्गो ह्ययं पुरुष इति ।

भाष्यार्थ—( पूर्वोक्त अर्थालाच दृष्टान्त करून जागरितांतही आत्म्याचें निर्लेपत्व दाखवितात--) ज्याप्रमाणें हा आत्मा असंग असल्यामुळें स्वप्नांत स्वप्नसंगजन्य दोषांनींही जागरितांत आला असतां लिप्त

होत नाहीं त्याप्रमाणेंच जागरित संगजन्य दोषांनींही जागरितांत लिप्त होत नाहीं. ( त्याविषयीं प्रमाण–) तेंच हें पुढें सांगितलें जातें– ' स वा एष एतास्मिन्बुद्धान्ते ' तोच हा प्रकृत आत्मा या बुद्धान्तांत –जागरितांत 'रत्वा चरित्वा०' इत्यादिकांचा अर्थ पूर्वींप्रमाणें समजावा. तो जें कांहीं त्या जागरितांत पाहतो त्यानें अनन्वागत होतो. कारण हा पुरुष असंग आहे.

ननु दृष्ट्वैवेति कथमवधार्यते करोति च तत्र पुण्यपापे तत्फलं च पश्यति । न । कारकावभासकत्वेन कर्तृत्वोपपत्तेः । आत्मनैवायं ज्योतिषाऽऽस्त इत्यादिनाऽऽत्मज्योतिषाऽवभासितः कार्यकरणसंघातो व्यवहरति तेनास्य कर्तृत्वमुपचर्यते न स्वतः कर्तृत्वम् । तथा चोक्तं ध्यायतीव लेलायतीवेति । बुद्ध्याद्युपाधिकृतमेव न स्वतः ॥

भाष्यार्थ—( जाग्रदवस्थेंतही आत्म्याचें अकर्तृत्व जें सांगितलें आहे त्यावर आक्षेप घेतात–) ' अहो पण केवल पुण्य-पापांस पाहूनच ' असें अवधारण कसें केलें जात आहे ? कारण जागरितांत आत्मा पुण्यपाप करतो व त्याचें फळ पाहतो -भोगतो!' ( तें कल्पित कर्तृत्व आहे, असें उत्तर– ) असें नाहीं. कारण आत्म्याला कर्ता, कर्म, करण इत्यादि कारकांचें अवभासकत्व आहे. त्यामुळें त्याच्या कर्तृत्वाची उपपत्ति लागते. ( या उत्तराचेंच विवरण करितात– ) ' आत्मना एवायं ज्योतिषा आस्ते ' इत्यादि वाक्यानें ' आत्मज्योती- कडून अवभासित--प्रकाशित झालेला हा कार्यकरणसंघात व्यवहार करतो, त्यामुळें आत्म्याच्या कर्तृत्वाचा उपचार केला जातो; त्याचें कर्तृत्व स्वतः–स्वाभाविक नाहीं. ( स्वतः आत्म्याच्या अकर्तृत्वाविषयीं पूर्वींच्या वाक्याची अनुकूलता दाखवितात– ) आणि तसेंच ' ध्यायतीव लेला- यतीव' येथें सांगितलें आहे. कर्तृत्व बुद्ध्यादि-उपाधिकृतच आहे, स्वतः– स्वाभाविक नाहीं.

इह तु परमार्थापेक्षयोपाधिनिरपेक्ष उच्यते दृष्ट्वैव पुण्यं च पापं च न कृत्वेति तेन न पूर्वापरव्याघाताशङ्का । यस्मान्निरुपाधिकः परमार्थतो न करोति न लिप्यते क्रियाफलेन ॥

भाष्यार्थ—( 'अहो पण पूर्वीं आत्म्याचें औपाधिक कर्तृत्व सांगितलें आहे. यास्तव आतां त्याचें निराकरण केल्यास पूर्वापरविरोध येईल,' अशी आशंका घेऊन सांगतात– ) पण येथें ( या कंडिकेंत–या पर्यायांत ) परमार्थाच्या अपेक्षेनें ' दृष्ट्वैव पुण्यं च पापं च-' पुण्य व पाप पाहूनच करून नव्हे, या वाक्यानें उपाधिनिरपेक्ष कर्तृत्वाभाव सांगितला जात आहे. त्यामुळें पूर्वापर व्याघाताची आशंका येत नाहीं. ( 'तेन–त्यामुळें' या भाष्यांतील पदानें सांगितलेल्या हेतूचें स्पष्टीकरण करितात– ) ज्याअर्थीं आत्मा परमार्थतः निरुपाधिक आहे त्याअर्थीं तो कर्म करीत नाहीं व कर्मफलानें लिप्त होत नाहीं.

तथा च भगवतोक्तम्—" अनादित्वान्निर्गुणत्वात्परमात्माऽयमव्ययः । शरीरस्थोऽपि कौन्तेय न करोति न लिप्यते " इति ॥

भाष्यार्थ—( आत्म्याला पुण्य पाप-फलाचा लेप लागत नाहीं, याविषयीं भगवद्वचनही प्रमाण आहे, असें सांगतात– ) तसेंच भगवानांनीं–" हा परमात्मा अनादि व निर्गुण असल्यामुळें अव्यय आहे. हे अर्जुना, तो शरीरांत स्थित असला तरी करीत नाहीं व लिप्त होत नाहीं. " असें ' अनादित्वान्निर्गुणत्वात्०- ' इत्यादि श्लोकांत सांगितलें आहे.

तथा सहस्रदानं तु कामप्रविवेकस्य दर्शितत्वात् । तथा स वा एष एतस्मिन्स्वप्ने स वा एष एतस्मिन्बुद्धान्त इत्येताभ्यां कण्डिकाभ्यामसङ्गतैव प्रतिपादिता । यस्माद्बुद्धान्ते कृतेन स्वप्नान्तं गतः संप्रसन्नोऽसंबद्धो भवति स्तैन्यादिकार्यादर्शनात्तस्मात्त्रिष्वपि स्थानेषु स्वतोऽसङ्ग एवायम् । अतोऽमृतः स्थानत्रयधर्मविलक्षणः ॥

भाष्यार्थ—( 'तिन्ही अवस्थेंत आत्म्याचें असंगत्व व अनन्वागतत्व जर सिद्ध झालें असेल तर मोक्षपदार्थाचा निर्णय झालाच; व तो झाल्यामुळें जनकाची आकांक्षाही उरली नाहीं,' असें कोणी समजेल म्हणून म्हणतात ज्याप्रमाणें मोक्षाचा एकदेश असा कर्मविवेक प्रदर्शित केल्यामुळें पूर्वीं सहस्रदान सांगितलें ) त्याप्रमाणें मोक्षाचा एकदेश असा कामविवेक प्रदर्शित केल्यामुळें हें सहस्रदान आहे. ( दुसऱ्या व तिसऱ्या म्ह० १६ व्या व १७ व्या कडिकांचें तात्पर्य सांगतात— ) त्याचप्रमाणें[1] 'स वा एष एतस्मिन्स्वप्ने.' व 'स वा एष एतस्मिन्बुद्धान्ते' या दोन कंडिकांनीं आत्म्याची असंगताच प्रतिपादिली आहे. ( तिन्ही (१५–१७)कंडिकांच्या अर्थाचा संक्षेपानें अनुवाद करून उपसंहार करितात— ) ज्याअर्थीं बुद्धान्तांत—जागरितांत केलेल्या कर्मांशीं स्वप्नान्तांत जाऊन संप्रसन्न—सुषुप्त—झालेला आत्मा असंबद्ध होतो, कारण चौर्यादिकर्मांच्या कार्याचें तेथें दर्शन होत नाहीं त्याअर्थीं हा स्वतः तिन्ही स्थानीं असंगच असतो. ( याप्रमाणें तिन्ही अवस्थांमध्यें आत्मा असंग आहे, असें ठरलें असतां काय सिद्ध होतें तें सांगतात— ) यास्तव अमृत आत्मा स्थानत्रयांतील धर्मांहून विलक्षण आहे.

प्रतियोन्याद्रवति स्वप्नान्तायैव संप्रसादायेत्यर्थः । दर्शनवृत्तेः स्वप्नस्य स्वप्नशब्देनाभिधानदर्शनादन्तशब्देन च विशेषणोपपत्तेः । एतस्मा अन्ताय धावतीति च सुषुप्तं दर्शयिष्यति ॥

भाष्यार्थ—( श्रुतीचें प्रतीक घेऊन 'स्वप्नान्तं' पदाचा अर्थ सांगतात— ) 'प्रतियोनि आद्रवति स्वप्नान्तायैव' तो यथास्थान स्वप्नान्तासाठींच म्ह. संप्रसादासाठीं, असा भावार्थ, परत येतो. ( येथील 'स्वप्नान्त' हा शब्द सुषुप्तिविषयक कसा ? तें सांगतात— ) वासनामय दर्शनाची वृत्ति ज्यांत आहे, या व्युत्पत्तीनें स्वप्न दर्शनवृत्ति

१ पहिल्या(१५ व्या) कंडिकेनें जसा कर्मविवेक प्रतिपादिला आहे त्याप्रमाणें.

आहे, त्या स्वप्नाचें स्वप्नशब्दानें कथन केलेलें दिसत असल्यामुळें त्या पुढील अन्तशब्दानें विशेषणाचीच उपपत्ति लागते. ( नाहीं पेक्षां अन्तशब्द व्यर्थ होतो तो होऊं नये म्हणून 'स्वप्नाचा अन्त–लय ज्यांत होतो तो स्वप्नान्त' अशा व्युत्पत्तीनें सुषुप्तीचें ग्रहण केलें असतां अन्तशब्दानें स्वप्नाची व्यावृत्ति होणेंच युक्त आहे. तस्मात् येथें सुषुप्तस्थान हाच स्वप्नान्तशब्दाचा अर्थ आहे, असा भावार्थ. या अर्थालाच पुढील वाक्याचें आनुकूल्य दाखवितात–) 'एतस्मा अन्ताय धावति-' अशा रीतीनें श्रुति पुढें ( कं. १९) सुषुप्तच दाखवील.

यदि पुनरेवमुच्यते स्वप्नान्ते रत्वा चरित्वैतावुभावन्तावनुसंचरति स्वप्नान्तं च बुद्धान्तं चेति दर्शनात्स्वप्नान्तायैवेत्यत्रापि दर्शनवृत्तिरेव स्वप्न उच्यत इति तथाऽपि न किंचिद्दुष्यत्यसङ्गता हि सिषाधयिषिता सिध्यत्येव। यस्माज्जागरिते दृष्ट्वैव पुण्यं च पापं च रत्वा चरित्वा च स्वप्नान्तमागतो न जागरितदोषेणानुगतो भवति ॥ १७ ॥

भाष्यार्थ—('अहो पण स्वप्नान्तशब्दाचा स्वप्न या अर्थीं प्रयोग दिसत असल्यामुळें येथेंही स्वप्नान्तशब्दानें स्वप्न या अर्थाचेंच ग्रहण करावें,' असा दुसरा पक्ष उत्थापित करून त्याचा अंगीकार करितात–) पण यावर जर असें म्हणाल कीं 'स्वप्नान्ते रत्वा चरित्वा एतावुभावन्तावनुसंचरति स्वप्नान्तं च बुद्धान्तं च' असें पुढें म्हटलेलें दिसत असल्यामुळें 'स्वप्नान्तायैव' येथेंही दर्शनवृत्तिच स्वप्न सांगितलेलें आहे, तर तसा अर्थ केला तरी कांहीं दोष नाहीं. कारण येथें असंगता सिद्ध करावयाची आहे व ती तसा अर्थ केला तरी सिद्ध होतेच. कारण जागरितांत पुण्यफल व पापफल पाहूनच रतीचा अनुभव घेऊन व विहार करून स्वप्नान्तास म्हणजे स्वप्नास प्राप्त झालेला आत्मा जागरितदोषानें अनुगत होत नाहीं. ( जागरितांतील दोष त्याच्या बरोबर येत नाहींत. ) १७.

तद्यथा महामत्स्य उभे कूले अनुसंचरति पूर्वं चापरं चैवमेवायं पुरुष एतावुभावन्तावनुसंचरति स्वप्नान्तं च बुद्धान्तं च ॥ १८ ॥

अर्थ—त्याविषयीं दृष्टान्त—ज्याप्रमाणें लौकिकांत फार मोठा मासा नदीच्या दोन्ही म्हणजे पूर्व व अपर तीरीं अनुक्रमानें संचार करतो त्याचप्रमाणें हा पुरुष या दोन्ही अन्तांतून म्ह. स्वप्नान्त व बुद्धान्त यांतून अनुक्रमानें संचार करतो १८.

एवमयं पुरुष आत्मा स्वयं ज्योतिः कार्यकरणविलक्षणस्तत्प्रयोजकाभ्यां कामकर्मभ्यां विलक्षणो यस्मादसङ्गो ह्ययं पुरुषोऽसङ्गत्वादित्ययमर्थः स वा एष एतस्मिन्संप्रसाद इत्याद्याभिस्तिसृभिः कण्डिकाभिः प्रतिपादितः। तत्रासङ्गतैवाऽऽत्मनः कुतो यस्माज्जागरितात्स्वप्नं स्वप्नाच्च संप्रसादं संप्रसादाच्च पुनः स्वप्नं क्रमेण बुद्धान्तं जागरितं बुद्धान्ताच्च पुनः स्वप्नान्तमित्येवमनुक्रमसंचारेण स्थानत्रयस्य व्यतिरेकः साधितः॥

भाष्यार्थ—( १५–१७ या कंडिकात्रयानें सिद्ध झालेल्या अर्थाचा अनुवाद करितात ) याप्रमाणें हा पुरुष आत्मा स्वयंज्योति, कार्यकरणांहून विलक्षण, शरीरेंद्रियांचे प्रयोजक अशा--काम व कर्म या दोघांहून विलक्षण, कारण 'असंगो ह्ययं पुरुषः' असंगत्वामुळें तो विलक्षण आहे, हा अर्थ 'स वा एष एतस्मिन्संप्रसादे०-' इत्यादि तीन कंडिकांनीं प्रतिपादिला आहे. ( आत्मा तीन स्थानांमध्यें संचार करीत असल्यामुळें असंगत्व हा हेतु असिद्ध आहे, अशी शंका घेतात--) पण प्रतिज्ञा व हेतु यांतील हेतुभूत जी आत्म्याची असंगता तीच कोठें सिद्ध होत आहे ? ( 'मग काम व कर्म या प्रयोजकांसह दोन देहांहून विलक्षणता तर दूरच राहिली,' असा 'असंगता एव' येथील एवशब्दाचा अर्थ आहे. ) कारण जागरितापासून स्वप्न, स्वप्नापासून संप्रसाद, व संप्रसादापासून पुनः स्वप्न, क्रमानें बुद्धान्तास—जागरितास, बुद्धान्तापासून

पुनः स्वप्नान्तास अशाप्रकारें अनुक्रमानें होणारा जो संचार त्या संचारानें स्थानत्रयाचा व्यतिरेक सिद्ध केला.

पूर्वमप्युपन्यस्तोऽयमर्थः स्वप्नो भूत्वेमं लोकमतिक्रामति मृत्यो रूपाणीति तं विस्तरेण प्रतिपाद्य केवलं दृष्टान्तमात्रमवशिष्टं तद्वक्ष्यामीत्यारभते ॥

भाष्यार्थ—( असा आक्षेप केला असतां वरील हेतूच्या समर्थनासाठीं पुढील महामत्स्यवाक्य आहे, अशी एक या कंडिकेची या प्रकरणाशीं संगति आहे, अशा अभिप्रायानें दुसरी संगति सांगतात—) आणि असंगत्व व कार्यकरणराहित्य ह्या अर्थाचा उपन्यास पूर्वीं 'स्वप्नो भूत्वा इमं लोकमतिक्रामति मृत्यो रूपाणि' (अ. ४ पृ. ६६) असा केला आहे. त्याचेंच विस्तारानें प्रतिपादन करून केवल दृष्टान्त अवशिष्ट राहिला होता तो मी सांगेन म्हणून श्रुति पुढील कंडिकेचा आरंभ करिते.

तत्त्रैतस्मिन्यथाप्रदर्शितेऽर्थे दृष्टान्तोऽयमुपादीयते यथा लोके महामत्स्यो महांश्चासौ मत्स्यश्च नादेयेन स्रोतसाऽहार्य इत्यर्थः। स्रोतश्च विष्टम्भयति स्वच्छन्दचार्युभे कूले नद्याः पूर्वं चापरं चानुक्रमेण संचरति। संचरन्नपि कूलद्वयं तन्मध्यवर्तिनोदकस्रोतोवेगेन न परवशीक्रियते। एवमेवायं पुरुष एतावुभा अन्ता अनुसंचरति। कौ तौ। स्वप्नान्तं च बुद्धान्तं च। दृष्टान्तप्रदर्शनफलं तु मृत्युरूपः कार्यकरणसंघातः सह तत्प्रयोजकाभ्यां कामकर्मभ्यामनात्मधर्मोऽयं चाऽऽत्मैतस्माद्विलक्षण इति विस्तरतो व्याख्यातम् ॥ १८ ॥

भाष्यार्थ—' तत्-' त्या या वर प्रदर्शित केलेल्या अर्थी हा दृष्टान्त घेतला जात आहे. 'यथा-' ज्याप्रमाणें लोकांत ' महामत्स्यः- ' मोठा असा मत्स्य, नदीच्या मोठया प्रवाहानें अहार्य-अप्रकम्प्य-अतिशय कापविला जाण्यास योग्य नसलेला, असा याचा भावार्थ; पण स्वतः प्रवाहाला प्रतिबंध करतो, असा स्वच्छंदानें संचार करणारा महामत्स्य

'उभे कूले-' नदीचें पूर्व व अपर म्हणजे अलीकडचें व पलीकडचें अशा दोन्ही तीरीं अनुक्रमानें संचार करतो. (त्याचें स्वच्छंदचारित्वच प्रकट करितात--) तो त्या दोन्ही तीरीं जरी संचार करीत असला तरी त्या दोन तीरांच्या मध्यवर्ती असलेल्या उदकप्रवाहाच्या वेगानें परवश केला जात नाहीं याच न्यायानें हा पुरुष या दोन्ही अन्तांमध्यें संचार करतो. ते दोन अन्त कोणते ? स्वप्नान्त व बुद्धान्त. [ म्ह० स्वप्न व जागरित. या दृष्टान्तानें दार्ष्टान्तिकाला काय लाभ होतो, तें सांगतात-] या दृष्टान्ताच्या प्रदर्शनाचें फळ तर-मृत्युरूप कार्यकरणसंघात त्याचे प्रयोजक अशा काम-कर्मांसह अनात्मधर्म आहे आणि हा आत्मा त्याहून विलक्षण आहे, हें असून त्याचें सविस्तर व्याख्यान केलें आहे ! ८.

तद्यथाऽस्मिन्नाकाशे श्येनो वा सुपर्णो वा विपरिपत्य श्रान्तः सꣳहत्य पक्षौ संलयायैव ध्रियत एवमेवायं पुरुष एतस्मा अन्ताय धावति यत्र सुप्तो न कंचन कामं कामयते न कंचन स्वप्नं पश्यति ॥ १९ ॥

अर्थ—त्याविषयीं दृष्टान्त--ज्याप्रमाणें या आकाशांत फार मोठा पण मंद श्येन किंवा अति वेगवान् श्येन विहार करून श्रांत होतो व पंख पसरून आपल्या घरट्याकडेच जावयास निघतो त्याप्रमाणेंच हा आत्मा पुरुष या अन्ताला धावतो. ज्या अज्ञात ब्रह्मरूप अंतांत निजलेला तो कोणत्याही कामाची कामना करीत नाहीं व कोणतेंही स्वप्न पहात नाहीं १९.

अत्र च स्थानत्रयानुसंचारेण स्वयंज्योतिष आत्मनः कार्यकरणसंघातव्यतिरिक्तस्य कामकर्मभ्यां विविक्ततोक्ता । स्वतो नायं संसारधर्मवानुपाधिनिमित्तमेव त्वस्य संसारित्वमविद्याध्यारोपितमित्येष समुदा-

यार्थ उक्तः । तत्र च जाग्रत्स्वप्नसुषुप्तस्थानानां त्रयाणां विप्रकीर्णरूप उक्तो न पुञ्जीकृत्यैकत्र दर्शितः ॥

भाष्यार्थ—(पुढील श्येनवाक्याला अवतरण देण्यासाठीं पूर्वोक्त अर्थाचा अनुवाद–) पूर्वे संदर्भामध्यें कार्यकरणसंघाताहून--शरीरेंद्रियसमूहाहून व्यतिरिक्त असलेल्या स्वयंज्योति आत्म्याची स्थानत्रयांतील अनुसंचार या हेतूवरून काम व कर्म यांहून विविक्तता–भिन्नता सांगितली. ( प्रयोजकांसह स्थूल-सूक्ष्म देहांशीं आत्म्याचा वस्तुतः असंबंध आहे, असें ठरलें असतां काय निष्पन्न होतें तें सांगतात–) तो आत्मा स्वतः संसारधर्मवान् नाहीं. तर याचें संसारित्व उपाधिनिमित्तच अविद्याध्यारोपित आहे, हा समुदायार्थ–संक्षिप्तार्थ सांगितला. ( याप्रमाणें होऊन गेलेल्या अर्थाचा अनुवाद करून पुढील ग्रंथाच्या व्याख्यानाची भूमिका रचतात–) पण त्यांत जाग्रत्, स्वप्न व सुषुप्त या तीन स्थानांच्या संबंधित्वानें विप्रकीर्णरूप असाच तो सांगितला; सर्व विवक्षित विशेषणें घेऊन एका वाक्यांत आत्मा दाखविला नाहीं.

यस्माज्जागरिते ससङ्गः समृत्युः सकार्यकरणसंघात उपलक्ष्यतेऽविद्यया । स्वप्ने तु कामसंयुक्तो मृत्युरूपविनिर्मुक्त उपलभ्यते । सुषुप्ते पुनर्बुद्धान्तमागतो बुद्धान्ताच्च सुषुप्ते संप्रसन्नोऽसङ्गो भवतीत्यसङ्गताऽपि दृश्यते । एकवाक्यतया तूपसंह्रियमाणं फलं नित्यमुक्तबुद्धशुद्धस्वभावताऽस्य नैकत्र पुञ्जीकृत्य प्रदर्शितेति तत्प्रदर्शनाय कण्डिकाऽऽरभ्यते ॥

भाष्यार्थ—कारण आत्मा जागरितांत ससंग, समृत्यु, सकार्यकरणसंघात, (संग, मृत्यु व शरीरेंद्रियसमूह यांसहवर्तमान) असा अविद्येनें उपलक्षित होतो. स्वप्नांत तर कामसंयुक्त व मृत्युरूपापासून विनिर्मुक्त असा उपलब्ध होतो.सुषुप्तांत तर जागरितस्थानास आलेला व जागरिता-

१ औपाधिक संसारित्वही खरें असेल, असें कोणाला वाटेल म्हणून अविद्याध्यारोपित म्ह० मिथ्या असें म्हटलें आहे.

पासून सुषुप्तांत संप्रसन्न झालेला तो असंग होतो, अशी असंगताही अनुभवास येते. [म्ह० या अवस्थेंतही आत्मा अविद्येपासून सर्वथा निर्मुक्त होतो, असें दिसत नाहीं. ] पण पूर्व वाक्यांचें एकवाक्यतेनें उपसंहृत केलें जाणारें फळ म्ह० याची नित्य-मुक्त बुद्ध-शुद्ध-स्वभावता एके ठिकाणीं गोळा करून प्रदर्शित केली नाहीं. ती प्रदर्शित करण्यासाठीं ही कंडिका आरंभिली जाते.

सुषुप्ते ह्येवंरूपताऽस्य वक्ष्यमाणा तद्वा अस्यैतदतिच्छन्दा अपहतपाप्माऽभयं रूपमिति। यस्मादेवंरूपं विलक्षणं सुषुप्तं प्रविविक्षति। तत्कथमित्याह दृष्टान्तेनास्यार्थस्य प्रकटीभावो भवतीति तत्र दृष्टान्त उपादीयते ॥

भाष्यार्थ—( तर मग आत्म्याचें नित्य-शुद्ध-बुद्ध-मुक्त-स्वरूप एकत्र गोळा करून कोठें प्रदर्शित केलें आहे ? तें सांगतात—) सुषुप्तांतच आत्म्याची एवंरूपता 'तद्वा अस्य एतदतिच्छन्दा अपहतपाप्माऽभयं रूपं' ( कं. २१ ) तेंच या आत्म्याचें रूप कामरहित, धर्माधर्मशून्य व अविद्यावर्जित आहे, या वाक्यानें पुढें सांगितली जाणार आहे. ज्याअर्थीं सुषुप्तांत असें आत्मरूप सांगितलें जाणार आहे त्याअर्थीं आत्मा अशा रूपाच्या म्ह० विलक्षण ( कार्यकरणशून्य, अविद्या-काम-कर्मरहित ) सुषुप्तांत प्रवेश करण्याची इच्छा करतो; ( दोन स्थानें सोडून सुषुप्तांत प्रवेश करण्याची इच्छा कशी करतो ? असें जनक विचारतो ) तें कसें ? (स्वप्न व जागरित या दोन अवस्थांमध्यें दुःखाचा अनुभव येत असल्यामुळें त्यांना सोडून सुषुप्तास प्राप्त होतो, असें ) पुढील श्रुति सांगते; पण दृष्टान्तानें या अर्थाचा[1] प्रकटीभाव होईल म्हणून अगोदर त्याविषयीं दृष्टान्त घेतला जातो.

तद्यथाऽस्मिन्नाकाशे भौतिके श्येनो वा सुपर्णो वा। सुपर्णशब्देन क्षिप्रः श्येन उच्यते। यथाऽऽकाशेऽस्मिन्विहृत्य विपरिपत्य श्रान्तो नानापरिपतनलक्षणेन कर्मणा परिखिन्नः संहृत्य पक्षौ संगमय्य

१ सुषुप्तप्राप्तिरूप अर्थाचा.

संप्रसार्य पक्षौ सम्यग्लीयतेऽस्मिन्निति संलयो नीडो नीडायैव ध्रियते स्वात्मनैव धार्यते स्वयमेव । यथाऽयं दृष्टान्त एवमेवायं पुरुष एतस्मा एतस्मै अन्ताय धावति ॥

भाष्यार्थ--'तत्-' त्या सुषुप्तप्राप्तिरूप अर्थाविषयीं दृष्टान्त-'यथा-' ज्याप्रमाणें 'अस्मिन् आकाशे-' या भौतिक आकाशांत श्येनें किंवा सुपर्ण, सुपर्णशब्दानें त्वरित श्येन--ससाणा--सांगितला जातो. तो जसा या आकाशांत 'विपरिपत्य-' विहार करून 'श्रान्तः-' नाना-प्रकारचीं परिपतनें--उड्डाणें, याच कर्मानें अतिशय खिन्न झालेला असा 'संहत्य पक्षौ-' दोन्ही पंखांना संगमयुक्त करून म्ह० पंख चांगले पसरून 'संलयाय एव-' ज्यांत चांगल्या प्रकारें लीन होतो तो संलय-नीड-घरटें, त्या घरट्यासच 'ध्रियते' स्वात्म्याकडूनच धारण करविला जातो-स्वतःच--आपोआप-सहज घरट्याकडे निघतो, जसा हा दृष्टान्त आहे 'एवमेवायं पुरुषः-' त्याप्रमाणेंच हा पुरुष 'एतस्मा अन्ताय-' या अन्तास-स्वप्न व जागरित यांच्या अवसानभूत अंतास म्ह० अज्ञात ब्रह्मास धावतो; त्या अन्ताकडे धावतो.

अन्तशब्दवाच्यस्य विशेषणं यत्र यस्मिन्नन्ते सुप्तो न कंचन न कंचिदपि कामं कामयते । तथा न कंचन स्वप्नं पश्यति । न कंचन काममिति स्वप्नबुद्धान्तयोरविशेषेण सर्वः कामः प्रतिषिध्यते कंचनेत्यविशेषिताभिधानात् । तथा न कंचन स्वप्नमिति ॥

भाष्यार्थ—अन्तशब्दाचा अर्थ असें जें अज्ञात ब्रह्म त्याचें विशेषण-' यत्र-' ज्या अंतामध्यें ' सुप्तः-' निजलेला-लीन झालेला हा आत्मा -' न कंचन कामं कामयते-' कोणत्याही कामाची कामना करीत नाहीं, त्याचप्रमाणें ' न कंचन स्वप्नं पश्यति-' कोणतेंही-एकादेंही स्वप्न पहात नाहीं; ' न कंचन कामं ' यानें स्वप्न व जागरित या दोन्ही

१ श्येन म्ह० ज्याचें शरीर फार मोठें आहे, व वेग मंद आहे आणि सुपर्ण म्ह० शरीर अल्प व वेग मोठा आहे.

अवस्थांमध्यें एकसारखाच ( कोणत्याही प्रकारचा विशेष न ठेवतां ) सर्व कामाचा प्रतिषेध केला जातो. कारण श्रुतींत ' कंचन ' असें अविशेषित कथन आहे. त्याचप्रमाणें ' न कंचन स्वप्नं० ' या वाक्यानें ( स्वप्न व जागरित या दोन्हीमध्यें अविशेषतः सर्वदर्शनाचा निषेध केला जात आहे, असा शेष लावावा ).

जागरितेऽपि यद्दर्शनं तदपि स्वप्नं मन्यते श्रुतिरत आह न कंचन स्वप्नं पश्यतीति । तथा च श्रुत्यन्तरम् " तस्य त्रय आवसथास्त्रयः स्वप्नाः" इति । यथा दृष्टान्ते पक्षिणः परिपतनजश्रमापनुत्तये स्वनीडोपसर्पणमेवं जाग्रत्स्वप्नयोः कार्यकरणसंयोगजक्रियाफलैः संयुज्यमानस्य पक्षिणः परिपतनज इव श्रमो भवति तच्छ्रमापनुत्तये स्वात्मनो नीडमायतनं सर्वसंसारधर्मविलक्षणं सर्वक्रियाकारकफलायासशून्यं स्वयमात्मानं प्रविशति ॥ १९ ॥

भाष्यार्थ—( कांहीं स्वप्न पहात नाहीं, असें श्रुतींत म्हटलें आहे. तेव्हां त्यावरून जाग्रद्दर्शनाचा निषेध कसा सिद्ध होतो ? तें सांगतात--) जागरितांतीलही जें दर्शन तेंही स्वप्न आहे, असें श्रुति मानते; ( पण श्रुतीचा हा अभिप्राय कशावरून कळला, तें सांगतात–) म्हणूनच ' न कंचन स्वप्नं पश्यति ' असें ती म्हणते. ( त्याविषयीं प्रमाण–) ' तस्य त्रय आवसथाः त्रयः स्वप्नाः' (ब्र. वि. ग्रं. र. माला रत्न २ रें पृ. १२५) त्या जीवाचे तीन आवसथ व तीन स्वप्न आहेत, अशी याविषयीं दुसरी श्रुति आहे. ( आतां दृष्टान्त व दार्ष्टान्तिक यांतील विवक्षित अंश दाखवितात–) ज्याप्रमाणें दृष्टान्तांत पक्षी परिपतनामुळें उत्पन्न झालेल्या श्रमाचा अपनय करण्याकरितां आपल्या घरट्याकडे जातो त्याप्रमाणें जाग्रत् व स्वप्न या दोन अवस्थांमध्यें कार्यकरणसंयोगजन्य क्रियाफलांनीं संयुक्त होणाऱ्या क्षेत्रज्ञाला, पक्ष्याला जसा परिपतनामुळें– उडण्यामुळें त्याप्रमाणें, श्रम होतो. त्या श्रमाच्या निरसनार्थ स्वात्म्याचें

नीड–आयतन–स्थान सर्वसंसारधर्मविलक्षण म्ह० सर्व क्रिया-कारक-फलविस्तार यांनीं शून्य अशा आत्म्यामध्यें तो स्वयं प्रवेश करतो १९.

ता वा अस्यैता हिता नाम नाड्यो यथा केशः सहस्रधा भिन्नस्तावताऽणिम्ना तिष्ठन्ति शुक्लस्य नीलस्य पिङ्गलस्य हरितस्य लोहितस्य पूर्णा ॥

अर्थ—या शिरःपाण्यादिमान्–देहरूप पुरुषाच्या त्या या ' हिता ' या नांवाच्या नाड्या ज्याप्रमाणें सहस्रधा तोडलेला केंस त्याप्रमाणें तेवढ्या अणुत्वानें–तेवढ्या सूक्ष्म प्रमाणानें ( शरीरांत पसरलेल्या अशा) राहतात. त्या शुभ्र, निळा, पिंगट, हिरवा, लाल या रंगाच्या रसानें भरलेल्या असतात.

अथ यत्रैनं घ्नन्तीव जिनन्तीव हस्तीव विच्छाययति गर्तमिव पतति यदेव जाग्रद्भयं पश्यति तदत्राविद्यया मन्यतेऽथ यत्र देव इव राजेवाहमेवेदꣳ सर्वोऽस्मीति मन्यते सोऽस्य परमो लोकः ॥ २० ॥

अर्थ—वस्तुस्थिति अशी असतां ज्यावेळीं शत्रु किंवा चोर येऊन मला जणुं काय मारीत आहेत, जणुं काय वश करीत आहेत, जणु काय हत्ती पळवीत आहे, गर्तेमध्यें जणुकाय तो पडत आहे, असें पाहतो; फार काय पण जें जाग्रदवस्थेंत भय पाहतो तेंच येथें अविद्येनें मानतो. पण तेंच, ज्यावेळीं स्वतः देवसा होतो, राजासा होतो; ( तेव्हां अविद्येचा अपकर्ष व विद्येचा उत्कर्ष होत आहे असें जाणावें. त्याचप्रमाणें जेव्हां अविद्येचा अत्यंत क्षय होऊन विद्येचा चांगला उद्भव

होतो तेव्हां जाग्रद्वासनेनेंच ) मीच हें, व सर्व आहें; असें तो स्वप्नांतही मानतो; हा सर्वात्मभाव हा याचा परम लोक आहे २०.

यद्यस्यायं स्वभावः सर्वसंसारधर्मशून्यता परोपाधिनिमित्तं चास्य संसारधर्मित्वम् । यन्निमित्तं चास्य परोपाधिकृतं संसारधर्मित्वं सा चाविद्या । तस्या अविद्यायाः किं स्वाभाविकत्वमाहोस्वित्कामकर्मादिवदागन्तुकत्वम् । यदि चाऽऽगन्तुकत्वं ततो विमोक्ष उपपद्यते । तस्याश्चाऽऽगन्तुकत्वे कोपपत्तिः कथं वा नाऽऽत्मधर्मोऽविद्येति । सर्वानर्थबीजभूताया अविद्यायाः सतत्त्वावधारणार्थं परा कण्डिकाऽऽरभ्यते ॥

भाष्यार्थ —( वरील श्येनवाक्यानें आत्म्याचें सुषुप्तींतील रूप सांगितलें. अतां नाडीखंडाचा संबंध सांगण्यासाठीं प्रश्न करितात—) सर्वसंसारधर्मशून्यता हा जर या आत्म्याचा स्वभाव आहे व याचें संसारधर्मित्व—संसारधर्मवत्त्व परोपाधिनिमित्त [ म्ह० आत्म्याहून पर असून त्याची उपाधि होणारी जी बुद्धि वगैरे त्यामुळें] आहे, तर ( पण आत्मा असंग असल्यामुळें स्वतः त्याचा बुद्धयादिकांशीं संबंध संभवत नाहीं, असें समजून भाष्यकार म्हणतात—) जिच्यामुळें या आत्म्याला परोपाधिकृत संसारधर्मित्व आहे ती अविद्या होय. ( याप्रमाणें सिद्धान्ताचा अभिप्राय सांगून पूर्वपक्ष करितात—) ' अहो पण त्या अविद्येला स्वाभाविकत्व आहे कीं काम-कर्मादिकांप्रमाणें आगंतुकत्व—अस्वाभाविकत्व आहे-? जर आगंतुकत्व असेल तर मोक्ष उपपन्न होतो. ( तरच मोक्ष संभवतो ) पण अविद्या आगंतुक आहे, याविषयीं काय उपपत्ति—युक्ति आहे ? त्याचप्रमाणें अविद्या हा आत्मधर्म कसा नव्हे ? [1] ' ( अशी आशंका येत असल्यामुळें ) सर्व अनर्थांच्या बीजभूत अविद्येचें स्वरूप निश्चित करण्यासाठीं पुढील कंडिका आरंभिली जात आहे.

ता वा अस्य शिरःपाण्यादिलक्षणस्य पुरुषस्यैता हिता नाम नाड्यो यथा केशः सहस्रधा भिन्नस्तावता तावत्परिमाणेनाणिम्नाऽणु-

१ अविद्या आत्म्याचा स्वभाव नसला तरी धर्म असण्याला कोणती हरकत आहे?

त्वेन तिष्ठन्ति । ताश्च शुक्लस्य रसस्य नीलस्य पिङ्गलस्य हरितस्य लोहितस्य पूर्णा एतैः शुक्लत्वादिभी रसविशेषैः पूर्णा इत्यर्थः । एते च रसानां वर्णविशेषा वातपित्तश्लेष्मणामितरेतरसंयोगवैषम्यविशेषाद्विचित्रा बह्वश्च भवन्ति ॥

भाष्यार्थ—' ता वा अस्य एता हिता नाम नाड्यः-' या शिरःपाण्यादिलक्षण—मस्तक-हात इत्यादि अवयवविशिष्ट—पुरुषाच्या त्याच या ' हिता 'नांवाच्या नाड्या ' यथा केशः सहस्रधा भिन्नः-' ज्याप्रमाणें सहस्रधा तोडलेला केंस ( अतिसूक्ष्म होतो ) त्याप्रमाणें ' तावता अणिम्ना तिष्ठन्ति-' तेवढ्यां अणुत्वानें—त्या सहस्रधा तोडलेल्या—कापलेल्या केंसाच्या प्रमाणा एवढ्या अणुप्रमानें राहतात. ' शुक्लस्य०-' त्या शुभ्र रसाच्या, नील—काळ्या—रसाच्या, पिंगट रसाच्या, हिरव्या रसाच्या, लाल रसाच्या पूर्ण असतात; त्या या शुभ्रादि निरानिराळ्या रसांनीं भरलेल्या असतात, असा याचा भावार्थ. हे रसांचे विशेष वर्ण ( निरानिराळे रंग ) आहेत. ( ' अहो ! पण अन्नरसाला अशा विशेष वर्णांची प्राप्ति कशी होते ? ' अशी आशंका घेऊन सांगतात—) वात, पित्त व कफ यांच्या परस्पर संयोगाच्या विशेष प्रकारच्या वैषम्यामुळें ते वर्णविशेष विचित्र व पुष्कळ होतात. ( खालेल्या अन्नाचा परिणामविशेष वाताचें बाहुल्य झालें असतां निळा होतो, पित्ताचें आधिक्य झाल्यास पिंगट होतो, कफाचें आधिक्य झाल्यास शुक्ल होतो, पित्ताचें अल्पत्व झाल्यास हिरवा होतो व त्या तिन्ही धातूंचें साम्य असल्यास रक्तवर्ण होतो. याप्रमाणें त्या वात-पित्त-कफांच्या परस्परसंयोगवैषम्यामुळें ते अन्नरस विचित्र व अनेक होतात. त्या तसल्या रसांनीं व्याप्त झालेल्या नाड्यांचाही तसाच वर्ण होतो. कारण सुश्रुतांत " अरुणाः शिरा वातवहा नीलाः पित्तवहाः शिराः । असृग्वहास्तु रोहिण्यो गौर्यः श्लेष्मवहाः शिराः ॥ " असें म्हटलें आहे. )

तास्वेवंविधासु नाडीषु सूक्ष्मासु वालाग्रसहस्रभेदपरिमाणासु शुक्लादिरसपूर्णासु सकलदेहव्यापिनीषु सप्तदशकं लिङ्गं वर्तते । तदाश्रिताः सर्वा वासना उच्चावचसंसारधर्मानुभवजनिताः । तल्लिङ्गं वासनाश्रयं सूक्ष्मत्वात्स्वच्छं स्फटिकमणिकल्पं नाडीगतरसोपाधिसंसर्गवशाद्धर्माधर्मप्रेरितोद्भूतवृत्तिविशेषं स्त्रीरथहस्त्याद्याकारविशेषैर्वासनाभिः प्रत्यवभासते ॥

भाष्यार्थ—( याप्रमाणें नाड्यांच्या स्वरूपाचें वर्णन करून जागरितांत लिंगशरीराची वृत्ति दाखवितात–) त्या अशा प्रकारच्या म्हणजे सूक्ष्म–केंसाच्या अग्राचा सहस्रधा भेद–विभाग केला असतां त्यांतील एकेका भेदाचें जें परिमाण असतें त्या परिमाणाच्या, शुक्लादिवर्णांच्या अन्नरसानें पूर्ण असलेल्या व सकल देहाला व्यापणाऱ्या नाड्यांमध्यें पांच भूतें, दहा इंद्रियें, प्राण व अन्तःकरण अशा सतरा अवयवांनीं विशिष्ट असलेलें लिंगशरीर राहतें. उच्च–नीच संसारधर्माच्या अनुभवामुळें उत्पन्न झालेल्या सर्व वासना त्या लिंगाच्या आश्रयानें राहिलेल्या असतात. ( याप्रमाणें जागरितांत लिंगशरीराची स्थिति सांगून स्वप्नांत त्याची स्थिति सांगतात–) सूक्ष्मत्वामुळें स्फटिक मण्यासारखें स्वच्छ, नाड्यांतील रसरूप उपाधीच्या संसर्गामुळें ज्यांत धर्माधर्मांनीं प्रेरणा केल्या कारणानें विशेष वृत्ति उद्भूत झाली आहे असें तें वासनाश्रयभूत लिंगशरीर वासनांमुळें स्त्री, रथ, हत्ती इत्यादि विशेष आकारांनीं भासतें. ( लिंगशरीराचाच त्या त्या आकारांनीं प्रत्यवभास होतो. )

अथैवं सति यत्र यस्मिन्काले केचन शत्रवोऽन्ये वा तस्करा मामागत्य घ्नन्तीति मृषैव वासनानिमित्तः प्रत्ययोऽविद्याख्यो जायते तदेतदुच्यत एनं स्वप्नदृशं घ्नन्तीवेति । तथा जिनन्तीव वशीकुर्वन्तीव । न केचन घ्नन्ति नापि वशीकुर्वन्ति केवलं त्वविद्यावासनोद्भवनिमित्तं भ्रान्तिमात्रम् । तथा हस्तीवैनं विच्छाययति विच्छादयति विद्रावयति धावयतीवेत्यर्थः । गर्तमिव पतति गर्तं जीर्णकूपादिकमिव पतन्तमात्मा-

नमुपलक्षयति । तादृशी ह्यस्य मृषा वासनोद्भवत्यत्यन्तनिकृष्टाऽधर्मो-द्भासितान्तःकरणवृत्त्याश्रया दुःखरूपत्वात् ॥

भाष्यार्थ—( याप्रमाणें विवक्षित असलेली स्वप्नस्थिति सांगून श्रुतींतील अक्षरांची योजना करितात–) 'अथ-' असें असतां 'यत्र-' ज्यावेळीं कोणी शत्रु किंवा तस्करादि दुसरे येऊन मला जणु काय मारीत आहेत, असा खोटाच वासनानिमित्त अविद्यारूप प्रत्यय उत्पन्न होतो. तेंच श्रुतीकडून सांगितलें जात आहे. 'एनं-' या स्वप्नद्रष्ट्याला 'घ्नन्ति इव-' जणु काय मारतात. त्याचप्रमाणें 'जिनन्ति इव-' जणु काय वश करून घेतात. ( श्रुतींतील इवशब्दाचा अर्थ सांगतात–) वस्तुतः कोणी येऊन मारीत नाहींत व वश करीत नाहींत. केवळ अविद्यावासनोद्भव झाल्यामुळें भ्रांतीनें तसें भासतें. 'हस्तीव विच्छा-यति-' त्याचप्रमाणें हत्ती याला जणु काय धाववितो ( हत्ती आपल्या मागें लागला आहे, असें समजून हा धांवत सुटतो, असा भावार्थ. ) 'गर्तमिव पतति-' जणुं काय गर्तांत–जुन्या कूपादिकांत आपण पडत आहों, असें पाहतो. ( अशा प्रतीतीचें कारण–) कारण तशा प्रकारची त्याची मिथ्या वासना उद्भूत होते. ती दुःखरूप असल्यामुळें अत्यंत निकृष्ट व अधर्मानें उद्भासित-प्रकाशित झालेल्या अन्तःकरणवृत्तीचा आश्रय केलेली असते. ( गर्तपतनादिकांमुळें दुःख होतें. म्हणून त्या प्रतीतीला कारण होणारी वासना अधर्मापासून उत्पन्न झाली आहे, असें अनुमान होतें. )

किंबहुना यदेव जाग्रद्भयं पश्यति हस्त्यादिलक्षणं तदेव भय-रूपमत्रास्मिन्स्वप्ने विनैव हस्त्यादिरूपं भयमविद्यावासनया मृषैवोद्भू-तया मन्यते ॥

भाष्यार्थ—('यदेव जाग्रद्भयं०' इत्यादि श्रुतीचा अर्थ–) फार काय सांगावें पण जें जाग्रदवस्थेंत हत्ती, वाघ, इत्यादि रूप भय पाहतो

१ असा प्रत्यय जेव्हां उत्पन्न होतो तेव्हां हें स्वप्नदर्शन आहे, असें जाणावें.

'तदेव-' तेंच भयरूपं[1] 'अत्र-' या स्वप्नांत हत्ती, वाघ, इत्यादिरूप भयावाचूनच उद्भूत झालेल्या अविद्यावासनेनें खोटेंच मानतो. ( खरोखर हत्ती, वाघ इत्यादि स्वप्नांत जरी नसले तरी अविद्यावासनेनें ते खोटेच भासतात. )

अथ पुनर्यत्राविद्याऽपकृष्यमाणा विद्या चोत्कृष्यमाणा किंविषया किंलक्षणा चेत्युच्यते । अथ पुनर्यत्र यस्मिन्काले देव इव स्वयं भवति । देवताविषया विद्या यदोद्भूता जागरितकाले तदोद्भूतया वासनया देवमिवाऽऽत्मानं मन्यते स्वप्नेऽपि तदुच्यते । देव इव राजेव राज्यस्थोऽभिषिक्तः स्वप्नेऽपि राजाऽहमिति मन्यते राजवासनावासितः । एवमत्यन्तप्रक्षीयमाणाऽविद्योद्भूता च विद्या सर्वात्मविषया यदा तदा स्वप्नेऽपि तद्भावभावितोऽहमेवेदं सर्वोऽस्मीति मन्यते ॥

भाष्यार्थ—('अथ यत्र देवः०-' इत्यादि श्रुतीचें तात्पर्य–) पण पुनः जेव्हां अविद्येचा अपकर्ष होऊं लागून विद्येचा[2] उत्कर्ष होतो (तेव्हां तिचें फळ काय तें सांगतों–) त्याचप्रमाणें त्या उत्कर्ष पावणाऱ्या विद्येचा विषय व स्वरूप काय आहे, तेंही सांगितलें जातें. 'अथ-' पुनः 'यत्र-' ज्यावेळीं तो स्वतः 'देव इव-' देवसा होतो, जागरितकालीं[3] जेव्हां देवताविषयें विद्या उद्भूत झालेली असते तेव्हां तो त्या उद्भूत वासनेनें आपल्याला देवसें मानतो; स्वप्नांतही तेंच सांगितलें जातें–'देव इव-' देवसा, 'राजा इव-' जाग्रदवस्थेंत अभिषिक्त, राज्यावर स्थित असलेला स्वप्नांतही त्या राजाविषयींच्या वासनेनें वासित झालेला तो मी राजा आहें, असें मानतो. याच न्यायानें [ म्ह० वर अविद्या क्षीण होऊं लागली असतां जसें विद्येचें कार्य सांगितलें त्याचप्रमाणें ] जेव्हां अविद्या अत्यंत क्षीण होत चालली असून सर्वात्मविषय विद्या उद्भूत होते तेव्हां स्वप्नांतही त्या भावनेनें भावनावान् झालेला पुरुष 'अहमेव

१ ज्यामुळें भय निरूपित होतें तें भयकारण–भयाचें निमित्त, असा याचा अर्थ.
२ येथें विद्या म्ह० उपासना ३ जागरितांत,

इदं-' हें चैतन्य मीच आहें, चिन्मात्राहून भिन्न कांहीं नाहीं, तस्मात् मी सर्व—पूर्ण आहें, असें मानतो.

स यः सर्वात्मभावः सोऽस्याऽऽत्मनः परमो लोकः परम आत्मभावः स्वाभाविकः । यत्तु सर्वात्मभावादर्वाग्वालाग्रमात्रमप्यन्यत्वेन दृश्यते नाहमस्मीति तदवस्थाऽविद्या । तयाऽविद्यया ये प्रत्युपस्थापिता अनात्मभावा लोकास्तेऽपरमाः स्थावरान्तास्तान्संव्यवहारविषयाँल्लोकानपेक्ष्यायं सर्वात्मभावः समस्तोऽनन्तरोऽबाह्यः सोऽस्य परमो लोकः । तस्मादपकृष्यमाणायामविद्यायां विद्यायां च काष्ठां गतायां सर्वात्मभावो मोक्षः । यथा स्वयंज्योतिष्ट्वं स्वप्ने प्रत्यक्षत उपलभ्यते तद्वद्विद्याफलमुपलभ्यत इत्यर्थः ॥

भाष्यार्थ---हा जो सर्वात्मभाव तो या आत्म्याचा परम लोक आहे. परम—स्वाभाविक आत्मभाव. (या सर्वात्मभावाच्या परमत्वाचें उपपादन करितात -) पण जें या सर्वात्मभावाच्या पूर्वी बालाग्रमात्रही--अल्पस्पही अन्यत्वानें -हें मी नव्हे—अशा रीतीनें पाहिलें जातें ती अविद्याच अवस्थित आहे.(वरील सर्वात्मभाव पूर्णपणें प्राप्त होईपर्यंत अल्पस्पही भेदभाव जरी भासला तरी त्याच कारणानें ती अविद्याच अवस्थित आहे, असें जाणावें. तिचें कार्य दाखवितात—) त्या अविद्येनें प्रत्युपस्थापित--प्राप्त करून दिलेले जे अनात्मभाव ते सर्व स्थावरभावापर्यंतचे लोक अपरम आहेत. त्या व्यवहाराचा विषय होणाऱ्या लोकांच्या अपेक्षेनें हा सर्वात्मभाव समस्त--पूर्ण, अनन्तर--एकरस, अबाह्य--प्रत्यक्, आहे. हा अशा प्रकारचा जो लोक तो या आत्म्याच्या पूर्वोक्त लोकांच्या अपेक्षेनें परम आहे. (आतां या वाक्यार्थाचा उपसंहार करितात—) तस्मात् अविद्येचा अपकर्ष झाला असतां व विद्या पराकाष्ठेला पोचली असतां सर्वात्मभाव रूढ होणें हाच मोक्ष (—विद्याफल प्रत्यक्षतः उपलब्ध होतो असा पुढें संबंध. मोक्षाचें प्रत्यक्षत्व दृष्टान्तानें स्पष्ट करितात—) ज्याप्रमाणें स्वप्नांत स्वयंज्योतिष्ट्व प्रत्यक्षतः उपलब्ध होतें त्याप्रमाणें मोक्ष हें विद्याफल प्रत्यक्षतः उपलब्ध होतें, असा भावार्थ.

तथाऽविद्यायामप्युत्कृष्यमाणायां तिरोधीयमानायां च विद्यायाम- विद्यायाः फलं प्रत्यक्षत एवोपलभ्यतेऽथ घ्नन्तीव जिनन्तीवेति । ते एते विद्याविद्याकार्ये सर्वात्मभावः परिच्छिन्नात्मभावश्च ॥

भाष्यार्थ—(विद्याफलाप्रमाणें अविद्याफलही स्वप्नांत प्रत्यक्ष आहे, असें जें वर म्हटलें होतें त्याचा अनुवाद करितात–) त्याचप्रमाणें अविद्येचा उत्कर्ष होऊं लागून विद्येचें तिरोधान- लोप–अपकर्ष झाला असतां 'अथ यत्रैनं घ्नन्तीव जिनन्तीव' इत्यादि (पृ. १६०) अविद्येचें फळ प्रत्यक्षतःच उपलब्ध होतें. ( याप्रमाणें सांगितलेल्या विद्याफलाचा व अविद्याफलाचा उपसंहार करितात–) सर्वात्मभाव व परिच्छिन्न आत्मभाव हीं क्रमानें विद्या व अविद्या यांचीं कार्यें आहेत.

विद्यया शुद्धया सर्वात्मा भवति । अविद्यया चासर्वो भवति । अन्यतः कुतश्चित्प्रविभक्तो भवति । यतः प्रविभक्तो भवति तेन विरुध्यते । विरुद्धत्वाद्धन्यते जीयते विच्छाद्यते च । असर्वविषयत्वे च भिन्नत्वादेतद्भवति । समस्तस्तु सन्कुतो भिद्यते येन विरुध्येत विरोधाभावे केन हन्यते जीयते विच्छाद्यते च ॥

भाष्यार्थ—(वरील दोन फळांचा विभाग करितात–) शुद्ध विद्येनें सर्वात्मा होतो; व अविद्येनें असर्व होतो. दुसऱ्या कोणत्याही पदार्था- पासून अगदीं विभक्त होतो. ज्याच्यापासून प्रविभक्त होतो त्याच्याशीं विरुद्ध होतो–विरोध करतो. विरुद्धत्वामुळेंच मारला जातो, वश केला जातो, व धावविला जातो. (अविद्याकार्याचें निगमन–) असर्व- विषयत्वामध्यें भिन्नत्वामुळें हें सर्व होतें. (अविद्येला परिच्छिन्नफलत्व जर असेल तर त्याला भिन्नत्व असल्यामुळेंच पूर्वोक्त विरोधादि सर्व दुर्वार होतें, असा भावार्थ. विद्याफलाचा उपसंहार करितात–) पण समस्त–पूर्ण झाल्यावर कोणापासून भेद पावणार कीं, ज्याच्याशीं विरोध करील ? आणि विरोधच जर नाहीं तर कोणाकडून मारला जाणार, वश केला जाणार व पळविला जाणार ?

अत इदमविद्यायाः सतत्त्वमुक्तं भवति । सर्वात्मानं सन्तमसर्वात्मत्वेन ग्राहयति । आत्मनोऽन्यद्वस्त्वन्तरमविद्यमानं प्रत्युपस्थापयति । आत्मानमसर्वमापादयति । ततस्तद्विषयः कामो भवति । यतो भिद्यते । कामतः क्रियामुपादत्ते । ततः फलम् । तदेतदुक्तम् । वक्ष्यमाणं च यत्र हि द्वैतमिव भवति तदितर इतरं पश्यतीत्यादि ॥

भाष्यार्थ—('अहोपण तुम्ही अविद्येचें स्वरूप निरूपण करावयास आरंभ केला होता. पण तें तर अद्यापि केलेंच नाहीं,' असें कोणी म्हणेल म्हणून सांगतात–) कार्यवशात् वर सांगितलेल्या अविद्येच्या कार्यावरून हें अविद्येचें स्वरूप सांगितलें आहे, असें होतें. (हें म्हणजे काय तेंच सांगतात–)अविद्या सर्वात्मा असलेल्याचें असर्वात्मत्वानें ग्रहण करविते, आत्म्याहून निराळी नसलेलीच वस्तु पुढें उपस्थापित करते, आत्म्याला असर्व--परिच्छिन्न करते. (दुसरी वस्तु पुढें उपस्थित झाली म्हणजे) त्यानंतर त्याविषयीं कामना होते. कामना झाल्यामुळेंच पुरुष त्या कामित पदार्थाहून भिन्न होतो. कामामुळें क्रियेचें ग्रहण करतो. क्रियेमुळें तिचें फळ मिळतें. (त्या फळाचा भोग घेत असतांना त्याविषयींची आसक्ति वाढून पुनः क्रिया करतो. याप्रमाणें संसार अविच्छिन्न सुरू होतो व तो सम्यग्ज्ञान होईपर्यंत राहतो. अर्थात् मिथ्या ज्ञानाचें कारण, भेदानुभवाचें आदिकारण अविद्या आहे) ही गोष्ट येथें सांगितली आहे, व तीच पुढें 'यत्र हि द्वैतमिव भवति तदितर इतरं पश्यति-' ज्यावेळीं द्वैतसें होतें तेव्हां इतर इतरास पाहतो इत्यादि सांगितली आहे.

इदमविद्यायाः सतत्त्वं सह कार्येण प्रदर्शितम् । विद्यायाश्च कार्यं सर्वात्मभावः प्रदर्शितोऽविद्याया विपर्ययेण । सा चाविद्या नाऽऽत्मनः स्वाभाविको धर्मो यस्माद्विद्यायामुत्कृष्यमाणायां स्वयमपचीयमाना सती काष्ठां गतायां विद्यायां परिनिष्ठिते सर्वात्मभावे सर्वात्मना निवर्तते रज्ज्वामिव सर्पज्ञानं रज्जुनिश्चये । तच्चोक्तं यत्र त्वस्य सर्वमात्मैवाभूत्तत्केन कं पश्येदित्यादि । तस्मान्नाऽऽत्मधर्मोऽविद्या । न हि

स्वाभाविकस्योच्छित्तिः कदाचिदप्युपपद्यते सवितुरिवौष्ण्यप्रकाशयोः । तस्मात्तस्या मोक्ष उपपद्यते ॥ २० ॥

भाष्यार्थ—( अविद्या हा आत्म्याचा स्वभाव आहे कीं नाहीं असा विचार केला असतां निर्णय काय झाला, असें कोणी विचारील म्हणून गतार्थाचा अनुवाद करितात- ) हें अविद्येचें स्वरूप कार्यासह प्रदर्शित केलें. (अविद्येला परिच्छिन्नफलत्व आहे) त्या अविद्याफलाच्या वैपरीत्यानें—उलट विद्येचें कार्य—फल—सर्वात्मभाव प्रदर्शित केला. (आतां निर्णीत अर्थ सांगतात—) ती अविद्या हा आत्म्याचा स्वाभाविक धर्म नव्हे. कारण विद्येचा उत्कर्ष होऊं लागला असतां अविद्या स्वतः उत्तरोत्तर क्षीण होत्साती विद्या पराकाष्ठेस जाऊन पोचली असतां व सर्वात्मभाव अत्यंत रूढ झाला असतां 'ही रज्जु आहे' असा निश्चय होतांच रज्जूच्या ठिकाणीं भासलेला सर्प जसा निवृत्त होतो त्याप्रमाणें ती सर्वरूपानें—निःशेष निवृत्त होते. ( ज्ञान झालें असतां अविद्येची निवृत्ति होते, याविषयीं पुढील वाक्याचें प्रमाण देतात-- ) हेंच ' यत्र त्वस्य सर्वमात्मैवाभूत्तत्केन कं पश्येत्'[1] इत्यादि वाक्यांत सांगितलें आहे. (यास्तव अविद्या हा आत्म्याचा स्वभाव नव्हे. कारण तो निवृत्त होण्यास योग्य—निवर्त्य आहे. रज्जुसर्पाप्रमाणें, असें सांगतात-) तस्मात् अविद्या हा आत्मधर्म नव्हे. ( ती निवर्त्य असली तरी आत्मस्वभाव आहे, असें म्हणण्यास कोणती हरकत आहे ? उत्तर—) सूर्याच्या उष्णतेप्रमाणें व प्रकाशाप्रमाणें स्वाभाविक धर्माचा उच्छेद केव्हांही संभवत नाहीं. तस्मात्—म्ह० अविद्या स्वाभाविक नसल्यामुळें—तिच्यापासून मोक्ष होणें योग्य आहे. मोक्ष उपपन्न होतो. २०.

तद्वा अस्यैतदतिच्छन्दा अपहतपाप्माभयꣳ रूपम् । तद्यथा प्रियया स्त्रिया संपरिष्वक्तो न

1 जेव्हां याला सर्व आत्माच झालें तेव्हां हा कोणत्या साधनानें कोणाला पाहणार ?

बाह्यं किंचन वेद नाऽऽन्तरमेवमेवायं पुरुषः प्राज्ञेनाऽऽत्मना संपरिष्वक्तो न बाह्यं किंचन वेद नाऽऽन्तरं तद्वा अस्यैतदाप्तकाममात्मकाममकामꣳरूपꣳशोकान्तरम् ॥ २१ ॥

अर्थ—तेंच हें याचें रूप कामरहित, धर्माधर्मरहित, भयकारण जी अविद्या तिनें विरहित असें आहे. (सुषुप्तींत चैतन्यज्योतिःस्वभाव आत्मा जर असतो तर आपल्याला व दुसऱ्याला जाणत कां नाहीं, तें दृष्टान्तपूर्वक सांगतात–) व्यवहारांत ज्याप्रमाणें इष्ट भार्येकडून आलिंगन दिला गेलेला पुरुष आपल्याहून अन्य–बाह्य पदार्थास किंवा स्वतःलाही जाणत नाहीं त्याचप्रमाणें प्राज्ञ आत्म्याकडून आलिंगिलेला–एकरूप झालेला हा पुरुष इतर अनात्मवस्तूलाही जाणत नाहीं व ' हा मी ' असें आपल्यालाही जाणत नाहीं. तेंच हें याचें आप्तकाम, आत्मकाम अकाम व शोकशून्य रूप आहे २१.

इदानीं योऽसौ सर्वात्मभावो मोक्षो विद्याफलं क्रियाकारकफलशून्यं स प्रत्यक्षतो निर्दिश्यते । यत्राविद्याकामकर्माणि न सन्ति । तदेतत्प्रस्तुतं यत्र सुप्तो न कंचन कामं कामयते न कंचन स्वप्नं पश्यतीति । तदेतद्वा अस्य रूपं यः सर्वात्मभावः सोऽस्य परमो लोक इत्युक्तस्तदतिच्छन्दा अतिच्छन्दमित्यर्थः । रूपपरत्वात् । छन्दः कामोऽतिगतश्छन्दो यस्माद्रूपात्तदतिच्छन्दं रूपम् ॥

भाष्यार्थ—( ' तद्वा अस्य० ' या पुढच्या वाक्याचें तात्पर्य सांगतात–) आतां[1] हा जो सर्वात्मभावरूप मोक्ष–क्रियाकारकफलशून्य विद्याफल त्याचा प्रत्यक्षतः निर्देश केला जातो. ज्या मोक्षांत अविद्या, काम व कर्म हीं नाहींत ( तो मोक्ष दाखविला जातो. श्रुतींतील ' तत् ' व ' एतत् ' या दोन पदांचा अन्वय दाखवून विवक्षित अर्थ सांगतात–)

१ विद्या, अविद्या व त्या दोघींचें फळ सांगितल्यानंतर.

' तद्वा अस्य एतत्-' तें हें--' यत्र सुप्तो न कंचन कामं कामयते न कं-चन स्वप्नं पश्यति-' ज्या अन्तसंज्ञक ब्रह्मामध्यें निजलेला हा कोणत्याही विषयाची कामना करीत नाहीं व कोणतेंही स्वप्न पहात नाही-- इत्यादि याचें रूप प्रस्तुत आहे. ' तो ह्याचा परम लोक आहे, ' असें म्हणून सांगितलेला जो सर्वात्मभाव तेंच हें याचें रूप; तें 'अतिछन्दा-' अतिछन्दं असा याचा अर्थ. ' अतिछन्दा ' याला रूपपरत्व अस-ल्यामुळें--तो शब्द रूपाचें विशेषण असल्यामुळें--त्याचें ' अतिच्छदं ' असें रूपान्तर करून घ्यावें. छंद म्ह० काम; ज्या रूपापासून छंद-काम अतिगत-अतिक्रमण करून गेला आहे तें अतिच्छंद रूप होय.

अन्योऽसौ सान्तश्छन्दःशब्दो गायत्र्यादिच्छन्दोवाची । अयं तु कामवचनोऽतः स्वरान्त एव । तथाऽप्यतिच्छन्दा इति पाठः स्वाध्या-यधर्मो द्रष्टव्यः । अस्ति च लोके कामवचनप्रयुक्तश्छन्दःशब्दः स्व-च्छन्दः परच्छन्द इत्यादौ । अतोऽतिच्छन्दमित्येवमुपनेयं कामवर्जि-तमेतद्रूपमित्यस्मिन्नर्थे ॥

भाष्यार्थ—( 'अहो पण ' छन्दस् ' हा शब्द गायत्री, अनुष्टुब्, इत्यादि छन्द या अर्थीं आहे. तेव्हां त्याचा ' काम ' हा अर्थ कसा कं-रितां ?-' अशी आशंका घेऊन सांगतात--) गायत्र्यादि छन्दोवाची सान्त छन्दःशब्द निराळा आहे. पण हा छन्द-शब्द काम या अर्थीं आहे. यास्तव तो स्वरान्तच--अकारान्तच आहे. ('अहो पण आत्मरूप काम-वर्जित आहे, हें जरी येथें विवक्षित असलें तरी 'अतिच्छंदा' असा दीर्घ प्रयोग कां केला आहे ?' उत्तर--) तथापि 'अतिछन्दा' हा पाठ छान्दस आहे, तो स्वाध्यायधर्म आहे असें समजावें. ( छन्द म्ह० काम असा अर्थ करण्यास वृद्धव्यवहाराचें प्रमाण दाखवितात--) स्वच्छंद, परच्छंद, इत्यादि प्रयोगांमध्यें 'छन्द' हा शब्द काम या अर्थीं व्यवहारांत योज-लेला असतो. यास्तव ' अतिच्छंदं ' अशा रीतीनें 'हें रूप कामवर्जित आहे,' या अर्थीं विपरिणत करावें.

तथाऽपहतपाप्म । पाप्मशब्देन धर्माधर्मावुच्येते । पाप्मभिः संसृज्यते पाप्मनो विजहातीत्युक्तत्वात् । अपहतपाप्म धर्माधर्मवर्जितमित्येतत् ॥

भाष्यार्थ—कामवर्जितत्वाप्रमाणें ' अपहतपाप्म ' येथें पाप्मशब्दानें धर्म व अधर्म सांगितले जातात. कारण ( पूर्वी उपक्रमांत ) ' पाप्मभिः संसृज्यते ' ' पाप्मनो विजहाति ' [ पृ. १०९ ] असें म्हटलें आहे. [ त्यांत पाप्मशब्द धर्म व अधर्म या दोन्ही अर्थी योजलेला आहे. अर्थात् ] ' अपहतपाप्म ' म्ह० धर्माधर्मवर्जित असा भावार्थ.

किंचाभयम् । भयं हि नामाविद्याकार्यम् । अविद्यया भयं मन्यत इति ह्युक्तम् । तत्कार्यद्वारेण कारणप्रतिषेधोऽयम् । अभयं रूपमित्यविद्यावर्जितमित्येतत् । यदेतद्विद्याफलं सर्वात्मभावस्तदेतदतिच्छन्दापहतपाप्माभयं रूपं सर्वसंसारधर्मवर्जितमतोऽभयं रूपमेतत् ॥

भाष्यार्थ—शिवाय ' अभयं ' भय म्हणजे अविद्याकार्य, हें प्रसिद्ध आहे. अविद्येनें भय मानतो हें वर सांगितलें आहे. तस्मात् येथें कार्याच्या द्वारा हा कारणाचा निषेध केला जात आहे. अर्थात् ' अभयं रूपं ' म्हणजे अविद्यावर्जित असा याचा भावार्थ. ( याप्रमाणें सर्व विशेषणांचा अर्थ सांगून वाक्यार्थाचा उपसंहार करितात– ) हें जें सर्वात्मभावरूप विद्याफल तें हें कामवर्जित, धर्माधर्मवर्जित व अविद्यावर्जित रूप आहे. सारांश सर्वसंसारधर्मवर्जित असल्यामुळें हें अभय रूप आहे.

इदं च पूर्वमेवोपन्यस्तमतीतानन्तरब्राह्मणसमाप्तावभयं वै जनक प्राप्तोऽसीत्यागमतः । इह तु तर्कतः प्रपञ्चितं दर्शितागमार्थप्रत्ययदार्ढ्याय ॥

भाष्यार्थ—( कूर्च ब्राह्मणाच्या शेवटींही हेंच रूप सांगितलें, असें म्हणतात– ) हें अभयरूप पूर्वीच याच्या मागच्याच ब्राह्मणाच्या समाप्ती-

चे वेळीं ' अभयं वै जनक प्राप्तोसि ' अशा प्रकारें आगमतः सांगितलें आहे. ( या रूपाचाच तेथें उपन्यास केला आहे. ) आणि येथें तर त्या प्रदर्शित आगमार्थाच्या प्रत्ययाची दृढता व्हावी म्हणून तर्कतः त्याचाच प्रपंच [ विस्तार ] केला आहे.

अयमात्मा स्वयं चैतन्यज्योतिःस्वभावः सर्वं स्वेन चैतन्यज्योतिषाऽवभासयति । स यत्तत्र किंचित्पश्यति रमते चरति जानाति चेत्युक्तम् । स्थितं चैतन्न्यायतो नित्यं स्वरूपं चैतन्यज्योतिष्ट्वमात्मनः ॥

भाष्यार्थ—( पुढील श्रुतिवाक्याची संगति सांगण्यासाठीं गतार्थाचा अनुवाद करितात–) हा आत्मा स्वयं चैतन्यज्योतिःस्वभाव आहे. तो स्वाभाविक चैतन्यज्योतीनें सर्व प्रकाशित करतो. ( आणि मागील अनन्वागतवाक्यामध्यें आत्म्याचें चेतनत्व सांगितलें आहे, असें सांगतात–) ' तो जें कांहीं तेथें पहातो, रतीचा अनुभव घेतो, विहार करतो, व जाणतो त्या सर्वानें अनन्वागत असतो,' असें सांगितलें आहे. (आत्म्याचें सदा चैतन्यज्योतिष्ट्व हें स्वरूप केवळ उक्त आगमावरूनच सिद्ध होतें, असें नाहीं तर पूर्वोक्त अनुमानावरूनही तें सिद्ध होतें, असें सांगतात–)आत्म्याचें चैतन्यज्योतिष्ट्व हें नित्य स्वरूप न्यायतः सिद्ध आहे.

स यद्यात्माऽत्राविनष्टः स्वेनैव रूपेण वर्तते कस्मादयमहमस्मीत्यात्मानं वा बहिर्वेमानि भूतानीति जाग्रत्स्वप्नयोरिव न जानातीत्यत्रोच्यते । शृण्वत्राज्ञानहेतुम् । एकत्वमेवाज्ञानहेतुः । तत्कथमिति । उच्यते ॥

भाष्यार्थ—( याप्रमाणें गतार्थाचा अनुवाद करून संबंध सांगण्याच्या इच्छेनें प्रश्न करितात–) तो आत्मा जर सुषुप्तींत विनष्ट होत नाहीं, स्वतःच्या नित्य रूपानेंच असतो, तर जागरित व स्वप्न यांप्रमाणें 'हा मी

---

१ आत्मा जर सविशेष असेल तर त्याचें आत्मत्वच उपपन्न होत नाहीं, हा तर्क.

आहें ' असें आपल्याला किंवा ' हीं बाह्य भूतें आहेत ' असें दुसऱ्यांना कां जाणत नाहीं, असें विचाराल तर ( चैतन्यस्वभाव आत्म्यालाच सुषुप्तांत विशेष ज्ञान कां नसतें ) तेंच सांगतों. सुषुप्तांतील अज्ञानाचा हेतु ऐक. एकत्वच अज्ञानाचें कारण आहे. ( ' जीवाचें पर आत्म्याशीं जें एकत्व तें सुषुप्तांतील विशेष ज्ञानाच्या अभावाचें कारण कसें ? कारण तें जरी असलें तरी चैतन्यस्वभावाची निवृत्ति होत नाहीं,' अशी आशंका घेतात–) तें कसें बरें ? ( ' तद्यथा प्रियया स्त्रिया' हें पुढील वाक्य या शंकेचें उत्तर म्हणून उत्थापित करितात–) सांगतों.

दृष्टान्तेन हि प्रत्यक्षीभवति विवक्षितोऽर्थ इत्याह । तत्तत्र यथा लोके प्रिययेष्टया स्त्रिया संपरिष्वक्तः सम्यक्परिष्वक्तः कामयन्त्या कामुकः सन्न बाह्यमात्मनः किंचन किंचिदपि वेद मत्तोऽन्यद्वस्त्विति न चाऽऽन्तरमयमहमस्मि सुखी दुःखी वेति । अपरिष्वक्तस्तु तया प्रविभक्तो जानाति सर्वमेव बाह्यमाभ्यन्तरं च । परिष्वङ्गोत्तरकालं त्वेकत्वापत्तेर्न जानाति ॥

भाष्यार्थ — दृष्टान्तानें विवक्षित अर्थ प्रत्यक्ष होतो हें प्रसिद्ध आहे, म्हणून श्रुति सांगते–' तत्-' त्या एकत्वकृत विशेषविज्ञानाच्या अभावाविषयीं दृष्टान्त--' यथा-' ज्याप्रमाणें व्यवहारांत ' प्रियया स्त्रिया-' पुरुषाची इच्छा करणाऱ्या प्रिय--इष्ट स्त्रीकडून ' संपरिष्वक्तः-' चांगल्याप्रकारें आलिंगिलेला -दृढ आलिंगन दिला गेलेला असा होत्साता कामुक ' न बाह्यं किंचन वेद ' स्वतःहून बाह्य कांहीं--माझ्याहून निराळी वस्तु आहे असें जाणत नाहीं, ' न आन्तरं-' त्याचप्रमाणें आन्तर- हा मी सुखी किंवा दुःखी आहें असेंही जाणत नाहीं; ( 'अहो पण तें त्याचें बाह्याभ्यंतर वस्तूंचें अज्ञान स्वाभाविकच आहे, स्त्रीच्या आलिंगनानें झालेल्या सुखाभिनिवेशामुळें नव्हे, असें कां मानूं नये ?' तें सांगतात--) पण तो तिच्याकडून जेव्हां दृढ आलिंगन दिला गेलेला नसतो- म्हणजे अगदीं विभक्त असतो तेव्हां सर्वच बाह्य व आभ्यंतर जाणतो; ( तर मग आ-

लिंगन दिलेल्या पुरुषालाही विशेष विज्ञान होईल, कारण स्वभावाचा विपरिणाम होण्याचा संभव नाहीं, अशी आशंका घेऊन सांगतात--) पण स्त्री व पुरुष यांचें एकमेकांस आलिंगन देणें हा परिष्वंग; त्याचा उत्तरकाल-संभोगप्राप्ति. त्यावेळीं त्यांचें एकत्व होत असल्यामुळें त्याला विशेष विज्ञान नसतें.

एवमेव यथा दृष्टान्तोऽयं पुरुषः क्षेत्रज्ञो भूतमात्रासंसर्गतः सैन्धवखिल्यवत्प्रविभक्तो जलादौ चन्द्रादिप्रतिबिम्बवत्कार्यकरण इह प्रविष्टः। सोऽयं पुरुषः प्राज्ञेन परमार्थेन स्वाभाविकेन स्वेनाऽऽत्मना परेण ज्योतिषा संपरिष्वक्तः सम्यक्परिष्वक्त एकीभूतो निरन्तरः सर्वात्मा न बाह्यं किंचन वस्त्वन्तरं नाप्यान्तरमात्मन्ययमहमस्मि सुखी दुःखी वेति वेद ॥

भाष्यार्थ—(याप्रमाणें दृष्टान्त सांगून दार्ष्टान्तिकाचें व्याख्यान करितात—) 'एवमेव-'जसा हा दृष्टान्त आहे त्याप्रमाणें 'अयं पुरुषः-' हा पुरुष क्षेत्रज्ञ शरीरेंद्रियरूप भूतमात्रांच्या संसर्गानें सैंधवखिल्याप्रमाणें—मिठाच्या खड्याप्रमाणें—अगदीं भिन्न झालेला (असा भासतो.) जलादिकांतील चंद्रादिकांच्या प्रतिबिंबाप्रमाणें या शरीरेंद्रियांत प्रविष्ट झालेला तो हा पुरुष 'प्राज्ञेन आत्मना-' परमार्थानें—स्वाभाविक स्व-आत्म्यानें -पर ज्योतीनें 'संपरिष्वक्तः-'[1] चांगल्या प्रकारें आलिंगित झालेला, एकीभूत, निरंतर[2], सर्वात्मा[3] 'न बाह्यं किंचन वेद नान्तरं-'बाह्य असलेलें कोणतेंही दुसरें वस्तुजात जाणत नाहीं, तसेंच आन्तर आत्म्याविषयीं 'हा मी आहें, सुखी किंवा दुःखी' असें जाणत नाहीं.

तत्र चैतन्यज्योतिःस्वभावत्वे कस्मादिह न जानातीति यदप्राक्षी-

१ 'संपरिष्वक्तः' यांतील 'सं' या उपसर्गावरून 'एकीभूत' हा अर्थ निष्पन्न होतो. २ हा एकीभाव म्ह० तादात्म्य नव्हे, हें सांगण्यासाठीं 'निरंतरः' हें विशेषण आहे. ३ परमात्म्याशीं अभेद झाल्यामुळें 'अपरिच्छिन्नत्व' हा पुरुषधर्म व्यक्त होतो व तो 'सर्वात्मा' या विशेषणानें सांगितला आहे.

स्तत्रायं हेतुर्मयोक्त एकत्वं यथा स्त्रीपुंसयोः संपरिष्वक्तयोः ॥ तत्रार्थान्नानात्वं विशेषविज्ञानहेतुरित्युक्तं भवति। नानात्वे च कारणमात्मनो वस्त्वन्तरस्य प्रत्युपस्थापिकाऽविद्येत्युक्तम्। तत्र चाविद्याया यदा प्रविविक्तो भवति तदा सर्वेणैकत्वमेवास्य भवति। ततश्च ज्ञानज्ञेयादिकारकाविभागेऽसति कुतो विशेषविज्ञानप्रादुर्भावः कामो वा संभवति स्वाभाविके स्वरूपस्थ आत्मज्योतिषि ॥

भाष्यार्थ—(याप्रमाणें स्त्रीवाक्यांतील अक्षरांचें व्याख्यान करून वरील प्रश्नाचा परिहार प्रकट करितात–) प्रत्यगात्म्याला चैतन्यज्योतिःस्वभावत्व जर आहे तर सुषुप्तींत तो स्वतःला किंवा दुसऱ्याला कां जाणत नाहीं, असें जें विचारलें होतेंस त्याचा 'एकत्व' हा हेतु मी सांगितला आहे. ज्याप्रमाणें परस्परांना आलिंगन दिलेल्या स्त्री पुरुषांचें एकत्व हें पुरुषाच्या विशेष विज्ञानाच्या अभावाचें कारण आहे त्याचप्रमाणें सुषुप्तांत जीवाचें व पर आत्म्याचें एकत्व हें त्यावेळीं त्याच्या विशेष विज्ञानाच्या अभावाचें कारण आहे.

(याप्रमाणें स्त्रीवाक्याचा श्रौत अर्थ सांगून आर्थिक अर्थ सांगतात–) अर्थात् नानात्व हें प्रत्यगात्म्याच्या विशेष विज्ञानाचें कारण आहे, हें त्यावरून सांगितल्यासारखेंच होतें, आणि नानात्वाचें कारण आत्म्याहून निराळ्या वस्तूला प्रत्युपस्थापित करणारी अविद्या आहे, हेंही वर ('अथ योऽन्यां देवतामुपास्ते॰' बृ. अ. १ ब्रा. ४ कं. १० पृ. ३३४) सांगितलें आहे. याप्रमाणें विशेष विज्ञानाचें नानात्व हें कारण आहे व नानात्वाचें अविद्या हें कारण आहे, असें ठरलें असतां जेव्हां सुषुप्तींत पुरुष अविद्येपासून अगदीं विभक्त[1] होतो तेव्हां सर्व–पूर्ण–परमात्म्याशीं विज्ञानात्म्याचें एकत्वच होतें. त्यानंतर ज्ञान-ज्ञेयादिकारकविभाग नाहींसा झाला असतां स्वाभाविक--स्वरूपस्थ--आत्मज्योतीमध्यें विशेष विज्ञानाचा प्रादुर्भाव किंवा काम कोठून संभवणार?

१ कार्य-अविद्या–शरीरेंद्रियादिक व कारण-अविद्या यांनीं विरहित होतो.

यस्मादेवं सर्वैकत्वमेवास्य रूपमतस्तद्वा अस्याऽऽत्मनः स्वयंज्योतिःस्वभावस्यैतद्रूपमाप्तकामं यस्मात्समस्तमेतत्तस्मादाप्ताः कामा अस्मिन्रूपे तदिदमाप्तकामं। यस्य ह्यन्यत्वेन प्रविभक्तः कामस्तदनाप्तकामं भवति। यथा जागरितावस्थायां देवदत्तादिरूपं न त्विदं तथा कुतश्चित्प्रविभज्यतेऽतस्तदाप्तकामं भवति ॥

भाष्यार्थ—( वर सांगितलेल्या अर्थाच्याच आधारानें आप्तकाम-वाक्याचें अवतरण घेऊन व्याख्यान करितात–) ज्याअर्थी येणेंप्रमाणें सर्वैकत्व हेंच याचें रूप आहे त्याअर्थी 'तत् वै अस्य-' या स्वयंज्योतिःस्वभाव आत्म्याचें तेंच 'एतत्-' हें रूप आप्तकाम आहे. (आप्तकामत्वाचेंच समर्थन करितात–) ज्याअर्थी हें रूप समस्त आहे त्याअर्थीं या रूपांत सर्व काम आप्त–प्राप्त आहेत, म्हणून तें हें आप्तकाम होय. ( हेंच व्यतिरेकमुखानें विशद करितात–) कारण काम ज्याच्या अन्यत्वानें–ज्याहून भिन्न या रूपानें–अगदीं विभक्त असतो तें रूप अनाप्तकाम होतें. जसें जागरित अवस्थेंत देवदत्तादि रूप. पण हें तसें कोणापासून विभक्त होत नाहीं. म्हणून तें आप्तकाम होतें.

किमन्यस्माद्वस्त्वन्तरान्न प्रविभज्यत आहोस्विदात्मैव तद्वस्त्वन्तरमत आह। नान्यदस्त्यात्मनः। कथम्। यत आत्मकाममात्मैव कामा यस्मिन्रूपेऽन्यत्र प्रविभक्ता इवान्यत्वेन काम्यमाना यथा जाग्रत्स्वप्नयोस्तस्याऽऽत्मैवान्यत्वप्रत्युपस्थापकत्वहेतोरविद्याया अभावादात्मकाममत एवाकाममेतद्रूपं काम्यविषयाभावाच्छोकान्तरं शोकच्छिद्रं शोकशून्यमित्येतच्छोकमध्यामिति वा सर्वथाऽप्यशोकमेतद्रूपं शोकवर्जितमित्यर्थः ॥ २१ ॥

भाष्यार्थ—( दुसरें विशेषण आकांक्षापूर्वक घेऊन त्याचें व्याख्यान करितात–) 'तें रूप आत्मभिन्न दुसऱ्या वस्तूहून अगदीं भिन्न होतच नाहीं कीं आत्माच ती दुसरी वस्तु आहे?' असें कोणी म्हणेल म्हणून

श्रुति सांगते–आत्म्याहून अन्य वस्तूच नाहीं. तें कसें ? कारण 'आत्म-कामं-' तें रूप आत्मकाम आहे. ज्या रूपांत आत्मा हेच काम आहेत. सुषुप्तीहून अन्य म्ह० जागरित व स्वप्न या अवस्थांमध्यें ( सुषुप्तीला सोडून दुसऱ्या कोणत्याही अवस्थेंत ) कामनेचे विषय आत्म्याहून अगदीं विभक्तसे असतात व ते आत्म्याहून अन्य आहेत अशा रूपा-नेंच इच्छिले जातात, ( पण सुषुप्तींत आत्माच काम आहे. त्यामुळें आत्मरूप ' आत्मकाम ' आहे. हेंच आतां दृष्टान्तानें स्पष्ट करितात–) ज्याप्रमाणें जागरित व स्वप्न या दोन अवस्थांमध्यें ( काम जणुं काय आत्म्याहून अगदीं भिन्न आहेत, अशा भावनेनें इच्छिले जातात. पण सुषुप्तींत ते आत्म्याहून भिन्न नसतात. तर ) सुषुप्त पुरुषाचा आत्मा हेच काम आहेत. कारण त्या अवस्थेंत आत्म्याहून भिन्नत्वानें विषयांना प्रत्युपस्थापित करणारी अविद्या नसते. ( यद्यपि सुषुप्तींत अविद्येचा सर्वथा अभाव झालेला नसतो तथापि ती त्या अवस्थेंत कार्यरूपानें अभिव्यक्त नसते. त्यामुळें सुषुप्तींत अनर्थांचा परिहार होऊं शकतो, असा भावार्थ. आतां कामांना आत्म्याचा आश्रय आहे, या पक्षाचें निरसन करण्यासाठीं ' अकामं ' हें तिसरें विशेषण आहे, अशा आशयानें म्हणतात–) म्हणूनच तें रूप ' अकामं ' कामशून्य आहे. कारण कामना करण्यास योग्य अशा विषयाचा त्यांत अभाव असतो. काम्य विषयाच्या अभावामुळें तें ' शोकान्तरं ' शोकच्छिद्र–शोकशून्य असा भावार्थ, अथवा 'शोकान्तरं' म्हणजे शोकमध्य [शोकाचें अन्तर–प्रत्यग्भूत; असा भावार्थ. तर मग तें शोकयुक्त झालें, म्हणून म्हणाल तर तसें नाहीं. ] शोकान्तर या शब्दाचा अर्थ वर सांगितलेल्या दोन प्रकारांतील कोणत्याही प्रकारानें जरी केला तरी हें रूप अशोक आहे, शोकवर्जित आहे, असा भावार्थ. ( शोक ज्या आत्म्यानें आत्मवान् होतो त्या आत्म्याला शोकवत्त्व नाहीं. कारण शोकाची सत्ता व स्फूर्ति आत्म्याच्या अधीन असतात. त्यामुळें आत्म्याहून भिन्नत्वानें शोकाचा अभाव असतो, असा भावार्थ. ) २१.

अत्र पिताऽपिता भवति माताऽमाता लोका अलोका देवा अदेवा वेदा अवेदाः । अत्र स्तेनोऽस्तेनो भवति भ्रूणहाऽभ्रूणहा चाण्डालोऽचाण्डालः पौल्कसोऽपौल्कसः श्रमणोऽश्रमणस्तापसोऽतापसोऽनन्वागतं पुण्येनानन्वागतं पापेन तीर्णो हि तदा सर्वाञ्छोकान्हृदयस्य भवति ॥ २२ ॥

अर्थ—या सुषुप्तिकालीं पिता अपिता होतो, माता अमाता होते, लोक अलोक होतात, देव अदेव होतात, व वेद अवेद होतात; त्या अवस्थेंत ब्राह्मणसुवर्ण चोरणारा असोन अचोर होतो. भ्रूणहत्या करणारा अभ्रूणहा होतो. चांडाल अचांडाल होतो. पुल्कस अपुल्कस होतो. श्रमण—संन्यासी अश्रमण होतो. तापस—वानप्रस्थ अतापस होतो. तें अभय आत्मरूप पुण्यानें असंबद्ध, पापानें असंबद्ध आहे. तो पुरुष ज्याअर्थी सर्वकामातीत आहे त्याअर्थी सुषुप्तींत बुद्धीचे जे शोक—काम त्यांना उल्लंघिलेला असा होतो. २२.

प्रकृतः स्वयंज्योतिरात्माऽविद्याकामकर्मविनिर्मुक्त इत्युक्तम् । असङ्गत्वादात्मन आगन्तुकत्वाच्च तेषाम् । तत्रैवमाशङ्का जायते चैतन्यस्वभावत्वे सत्यप्येकीभावान्न जानाति स्त्रीपुंसयोरिव संपरिष्वक्तयोरित्युक्तम् । तत्र प्रासङ्गिकमेतदुक्तं कामकर्मादिवत्स्वयंज्योतिष्ट्वमप्यस्याऽऽत्मनो न स्वभावः । यस्मात्संप्रसादे नोपलभ्यत इत्याशङ्कायां प्राप्तायां तन्निराकरणाय स्त्रीपुंसयोर्दृष्टान्तोपादानेन विद्यमानस्यैव स्वयंज्योतिष्ट्वस्य सुषुप्तेऽग्रहणमेकीभावाद्धेतोर्न तु कामकर्मादिवदागन्तुकम् ॥

भाष्यार्थ—( 'अत्र पिता०' इत्यादि वाक्य व्याख्यानासाठीं घेण्याकरितां गतार्थाचा अनुवाद करितात—) प्रकृत स्वयंज्योति आत्मा

अविद्या काम कर्मरहित आहे, असें सांगितलें. कारण आत्मा असंग आहे व अविद्यादिक आगंतुक आहेत. ( अविद्येला आगंतुकत्व असणें युक्त नव्हे. तथापि ती अभिव्यक्त होऊन आगंतुक अनर्थहेतु होते. वरील स्त्रीवाक्यानें ज्या शंकेचें निरसन होतें तिचा अनुवाद करितात-) आत्मा कामादिकांनीं विरहित आहे, असें सिद्ध झालें असतां अशी आशंका येते-आत्मा चैतन्यस्वभाव जरी असला तरी सुषुप्तींत त्याला एकीभाव प्राप्त होत असल्यामुळें एकमेकांना आलिंगन दिलेल्या स्त्री-पुरुषांप्रमाणें तो स्वतःला व दुसऱ्याला जाणत नाहीं, असें सांगितलें आहे. त्याविषयीं हें प्रासंगिक सांगितलें आहे- काम-कर्मादिकांप्रमाणें स्वयंज्योतिष्ट्वही या आत्म्याचा स्वभाव नव्हे, कारण तें स्वयंज्योतिष्ट्व संप्रसादांत-सुषुप्तींत--उपलब्ध होत नाहीं. ( तो जर स्वभाव असता तर त्याचा असा नाश झाला नसता. ) अशी आशंका प्राप्त झाली असतां तिचें निराकरण करण्यासाठीं स्त्रीपुरुषांचा दृष्टान्त घेऊन विद्यमान असलेल्याच स्वयंज्योतिष्ट्वाचें एकीभाव या हेतूमुळें सुषुप्तींत अग्रहण होतें, त्यामुळें स्वयंज्योतिष्ट्व काम-कर्मादिकांप्रमाणें आगंतुक नाहीं.

इत्येतत्प्रासङ्गिकमभिधाय यत्प्रकृतं तदेवानुप्रवर्तयति । अत्र चैतत्प्रकृतमविद्याकामकर्मविनिर्मुक्तमेव तद्रूपं यत्सुषुप्त आत्मनो गृह्यते प्रत्यक्षत इति । तदेतद्यथाभूतमेवाभिहितं सर्वसंबन्धातीतमेतद्रूपमिति । यस्मादत्रैतस्मिन्सुषुप्तस्थानेऽतिच्छन्दापहतपाप्माभयमेतद्रूपं तस्मादत्र पिता जनकः ॥

भाष्यार्थ—(याप्रमाणें गतार्थ सांगून उत्तर ग्रंथ उत्थापित करितात-) याप्रमाणें आत्म्याचें स्वयंज्योतिष्ट्व स्वाभाविक आहे, असें प्रासंगिक[1] सांगून जें प्रकृत असलेलें निष्कामत्वादि रूप त्याचेंच वर्णन पुढें अनुप्रवृत्त करितात. येथें म्ह० अतिच्छंदादि-वाक्यांत हें प्रकृत आहे-अविद्या-काम-कर्मशून्य असेंच तें आत्म्याचें रूप आहे, कीं जें सुषुप्तांत

१ प्रासंगिक म्ह० कामादिक आगंतुक आहेत हें सांगण्याच्या प्रसंगानें प्राप्त झालेलें.

प्रत्यक्षतः ग्रहण केलें जातें. हें रूप सर्वसंबंधातीत आहे, असें यथाभूतच सांगितलें आहे. ज्याअर्थी या सुषुप्तस्थानांत कामरहित, धर्माधर्मरहित व अभय असें हें रूप आहे त्याअर्थी 'अत्र-' या सुषुप्तांत 'पिता' जनक -उत्पादक 'अपिता भवति-' अपिता होतो.

तस्य च जनयितृत्वाद्यत्पितृत्वं पुत्रं प्रति तत्कर्मनिमित्तं तेन च कर्मणाऽयमसंबद्धोऽस्मिन्काले तस्मात्पितापुत्रसंबन्धनिमित्तात्कर्मणो विनिर्मुक्तत्वात्पिताऽप्यपिता भवति । तथा पुत्रोऽपि पितुरपुत्रो भवतीति सामर्थ्याद्गम्यते । उभयोर्हि संबन्धनिमित्तं कर्म तदयमतिक्रान्तो वर्तते । अपहतपाप्मेति ह्युक्तम् ॥

भाष्यार्थ—(पिताही येथें अपिता होतो, याचेंच उपपादन करितात–) पित्याला जनयितृत्व–उत्पादकत्व असल्यामुळें पुत्राप्रत जें पितृत्व तें कर्मनिमित्तानें आहे; व त्या कर्माशीं हा या काळीं असंबद्ध असतो. तस्मात् पिता-पुत्रसंबंधनिमित्त कर्मापासून विनिर्मुक्त झालेला असल्यामुळें पिताही अपिता होतो. तसाच पुत्रही पित्याचा अपुत्र होतो, असें वरील वाक्याच्या सामर्थ्यावरून कळतें. (तेंच सामर्थ्य दाखवितात–) त्या दोघांच्या–पिता-पुत्रांच्या संबंधाचें निमित्त कर्म आहे. त्या कर्माचें अतिक्रमण केलेला असा हा असतो. कारण 'अपहतपाप्म--' धर्माधर्मशून्य असें म्हटलें आहे.

तथा माताऽमाता । लोकाः कर्मणा जेतव्या जिताश्च तत्कर्मसंबन्धाभावाल्लोका अलोकाः । तथा देवाः कर्माङ्गभूतास्तत्कर्मसंबन्धात्ययाद्देवा अदेवाः । तथा वेदाः साध्यसाधनसंबन्धाभिधायका (ब्राह्मणलक्षणा) मन्त्रलक्षणाश्चाभिधायकत्वेन कर्माङ्गभूता अधीता अध्येतव्याश्च कर्मनिमित्तमेव संबध्यन्ते पुरुषेण तत्कर्मातिक्रमणादेतस्मिन्काले वेदा अप्यवेदाः संपद्यन्ते ॥

---

१ स्वरूपचैतन्याच्या सामर्थ्यानें सुषुप्तांत आत्म्याच्या निष्कामत्वादि रूपाचें ग्रहण होतें. त्यामुळेंच निजून उठल्यावर मी शांत सर्वकामनाशून्य होतों, असें स्मरण होतें, असें जाणावें. २ जसें आहे तसेंच, कामादिकांप्रमाणें कल्पित नव्हे.

भाष्यार्थ—तशीच 'माता अमाता-' आई, आई नाहीं, अशी होते. 'लोका:-' कर्मानें जिंकावयाचे व जिंकलेले लोक त्या कर्माचा संबंध नसल्यामुळें ' अलोक ' होतात. तसेच कर्मांगभूत ' देव ' त्या कर्माच्या संबंधाचें उल्लंघन केल्यामुळें ' अदेव ' होतात. त्याचप्रमाणें ' वेदाः-' साध्य-साधनसंबंध सांगणारे ब्राह्मणलक्षण व मंत्रलक्षण, प्रमाणत्वानें व प्रमेयत्वानें कर्मांगभूत होणारे, अध्ययन केलेले व अध्ययन करावयाचे असे वेद कर्मनिमित्तच पुरुषाशीं संबंध ठेवतात. पण त्या कर्माचें अतिक्रमण केलेलें असल्यामुळें सुषुप्तींत वेदही अवेद होतात.

न केवलं शुभकर्मसंबन्धातीतः किं तर्ह्यशुभैरप्यत्यन्तघोरैः कर्मभिरसंबद्ध एवायं वर्तत इत्येतमर्थमाह। अत्र स्तेनो ब्राह्मणसुवर्णहर्ता। भ्रूणघ्ना सह पाठादवगम्यते। स तेन घोरेण कर्मणैतस्मिन्काले विनिर्मुक्तो भवति। येनायं कर्मणा महापातकी स्तेन उच्यते॥

भाष्यार्थ—('अत्र स्तेनोऽस्तेनो भवति-' इत्यादिकाचें तात्पर्य—) पुरुष केवल शुभकर्मसंबंधातीत होतो असें नाहीं तर अशुभ व अत्यन्त घोर अशा कर्मांशींही हा असंबद्ध असाच राहतो, हा अर्थ श्रुति सांगते—'अत्र स्तेनोऽस्तेनो भवति ' या सुषुप्तींत स्तेन–ब्राह्मणाचें सुवर्ण हरण करणारा (सामान्य चोर न घेतां महापातकीच येथें कां घ्यावयाचा ? तें सांगतात-) ' भ्रूणहा ' या शब्दासह 'स्तेन' या शब्दाचा पाठ असल्यामुळें येथें स्तेन म्ह० ब्राह्मणसुवर्णहर्ता हा अर्थ अवगत होतो. तो पुरुष त्या घोर कर्मानें यावेळीं विशेषतः निर्मुक्त होतो, कीं ज्या घोर कर्मामुळें हा महापातकी चोर म्हटला जातो.

तथा भ्रूणहाऽभ्रूणहा तथा चाण्डालो न केवलं प्रत्युत्पन्नेनैव कर्मणा विनिर्मुक्तः किं तर्हि सहजेनाप्यत्यन्तनिकृष्टजातिप्रापकेणापि विनिर्मुक्त एवायम्। चाण्डालो नाम शूद्रेण ब्राह्मण्यामुत्पन्नश्चण्डाल एव चाण्डालः। स जातिनिमित्तेन कर्मणाऽसंबद्धत्वादचाण्डालो भवति॥

भाष्यार्थ—त्याचप्रमाणें ' भ्रूणहाऽभ्रूणहा-' श्रेष्ठ ब्राह्मणाचें हनन

करणारा भ्रूणहा सुषुप्तींत अभ्रूणहा होतो. तसाच चांडाल. ( ' स्तेन ' या शब्दांत चांडालाचाही अर्थ येत असल्यामुळें हें वाक्य पुनरुक्त आहे, अशी आशंका घेऊन सांगतात–) केवळ प्रत्युत्पन्न इ० आगंतुक कर्मानेंच पुरुष सुषुप्तींत विशेषतः निर्मुक्त होतो असें नाहीं; तर काय ? सहज अशाही इ० अत्यंत निकृष्ट जातीला प्राप्त करून देणाऱ्याही कर्मानें हा विनिर्मुक्तच असतो. चांडाल म्हणजे शूद्रानें ब्राह्मणीच्या ठिकाणीं उत्पन्न केलेला जो पुत्र तो चंडाल. चंडालच चांडाल होय. तो जातिनिमित्त कर्मानें असंबद्ध असल्यामुळें अचांडाल होतो.

पौल्कसः पुल्कस एव पौल्कसः। शूद्रेणैव क्षत्रियायामुत्पन्नः। सोऽप्यपुल्कसो भवति। तथाऽऽश्रमलक्षणैश्च कर्मभिरसंबद्धो भवतीत्युच्यते। श्रमणः परिव्राड्यत्कर्मनिमित्तो भवति स तेन विनिर्मुक्तत्वादश्रमणः। तथा तापसो वानप्रस्थोऽतापसः। सर्वेषां वर्णाश्रमादीनामुपलक्षणार्थमुभयोर्ग्रहणम्॥

भाष्यार्थ—' पौल्कसः-' पुल्कसालाच येथें ' पौल्कस ' असें म्हटलें आहे. शूद्रानेंच क्षत्रिया स्त्रीच्या ठिकाणीं उत्पन्न केलेला जो पुत्र तो पुल्कस. सुषुप्तींत तोही ' अपुल्कस ' होतो. त्याचप्रमाणें तो आश्रमलक्षण कर्मांनींही असंबद्ध होतो, असें सांगितलें जातें–' श्रमणः-' परिव्राड्-संन्यासी, ज्या कर्माच्या निमित्तानें होतो तो त्या कर्मानें विनिर्मुक्त झाला असल्यामुळें ' अश्रमण ' होतो. तसाच ' तापसः-' वानप्रस्थ ' अतापस ' होतो. (' परिव्राट् व तापस यांचेंच येथें ग्रहण केलेलें असल्यामुळें सुषुप्त पुरुषाला त्यांच्या कर्मांचा लेप जरी लागत नसला तरी इतर वर्णाश्रमांच्या कर्मांचा लेप लागतो, अशी शंका घेऊन सांगतात--) संन्यासी व वानप्रस्थ या दोघांचें ग्रहण सर्व वर्णाश्रमादिकांच्या उपलक्षणार्थ आहे. ( अर्थात् सुषुप्त पुरुषाला कोणत्याही कर्माचा लेप लागत नाहीं. )

---

१ ' ब्राह्मण्यां क्षत्रियात्सूतो वैश्याद्वैदेहकस्तथा। शूद्राज्जातस्तु चाण्डालः सर्वधर्मबहिष्कृतः। ' या स्मृतिवचनाच्या आश्रयानें हें म्हटलें आहे.

२ आदिशब्दानें वय, अवस्था इत्यादिकांचें ग्रहण करावें.

किं बहुनाऽनन्वागतं नान्वागतमनन्वागतमसंबद्धमित्येतत्पुण्येन शास्त्रविहितेन कर्मणा तथा पापेन विहिताकरणप्रतिषिद्धक्रियालक्षणेन । रूपपरत्वान्नपुंसकलिङ्गम् । अभयं रूपमिति ह्यनुवर्तते ॥

भाष्यार्थ—फार काय सांगावें ? 'अनन्वागतं०-' अन्वागत नसलेलें तें अनन्वागत. असंबद्ध असा याचा भावार्थ. 'पुण्येन-' शास्त्रविहितकर्मानें( असंबद्ध)त्याचप्रमाणें'पापेन-'विहिताचें अननुष्ठान व प्रतिषिद्धाचें अनुष्ठान एतद्रूप पापानें 'अनन्वागत-' असंबद्ध. ( 'अहो पण पुरुष येथें प्रकृत असतांना 'अनन्वागतं' असें नपुंसक लिंग कसें योजलें आहे,' असें कोणी विचारील म्हणून सांगतात--) त्या वचनाला रूपपरत्व असल्यामुळें नपुंसक लिंग योजलें आहे. 'अभयं रूपं' याचीच येथें अनुवृत्ति होते.

किं पुनरसंबद्धत्वे कारणमिति तद्धेतुरुच्यते । तीर्णोऽतिक्रान्तो हि यस्मादेवंरूपस्तदा तस्मिन्काले सर्वाञ्छोकाञ्शोकाः कामाः । इष्टविषयप्रार्थना हि तद्विषयवियोगे शोकत्वमापद्यते । इष्टं हि विषयमप्राप्तं वियुक्तं चोद्दिश्य चिन्तयानस्तद्गुणान्संतप्यते पुरुषोऽतः शोकोऽरतिः काम इति पर्यायाः ॥

भाष्यार्थ—( 'तीर्णो हि०' इत्यादि हेतुवाक्याला आकांक्षापूर्वक उत्थापित करून त्याचें व्याख्यान करितात--) 'पुरुष कर्माशीं असंबद्ध असण्याचें कारण काय ?' असें कोणी विचारील म्हणून त्याचा हेतु सांगितला जातो--'तीर्णः' अतिक्रान्त, 'हि-' ज्याअर्थी हा आत्मा अतिच्छन्दादिरूप आहे त्याअर्थी'तदा-'त्यासमयीं'ह्र त्याच्या सर्व कामांस'उल्लंघिलेला असा तो होतो. 'सर्वान् शोकान्' यांतील शोक म्ह० काम. इष्ट विषयांविषयींची इच्छाच त्या विषयाचा वियोग झाला असतां शोकत्वास प्राप्त होते. अप्राप्त [ प्राप्त न झालेल्या ] किंवा वियुक्त [ दूर--नष्ट झालेल्या ] इष्ट विषयाला उद्देशून त्याच्या गुणांचें चिंतन करणारा पुरुष संतप्त होतो. यास्तव शोक, अरति, काम हे पर्यायशब्द आहेत.

यस्मात्सर्वकामातीतो ह्यत्रायं भवति । न कंचन कामं कामयतेऽतिच्छन्दा इति ह्युक्तं तत्प्रक्रियापतितोऽयं शोकशब्दः कामवचन एव भवितुमर्हति । कामश्च कर्महेतुः । वक्ष्यति हि " स यथाकामो भवति तत्क्रतुर्भवति यत्क्रतुर्भवति तत्कर्म कुरुते " इति । अतः सर्वकामातितीर्णत्वाद्युक्तमुक्तमनन्वागतं पुण्येनेत्यादि ॥

भाष्यार्थ—( 'शोकादिशब्द जरी परस्पर पर्याय असले तरी त्याचा प्रकृत विषयांत काय उपयोग आहे,' अशी आशंका घेऊन सांगतात–) ज्याअर्थी सुषुप्तींत हा पुरुष सर्वकामातीत होतो ( त्याअर्थी 'अनन्वागतं पुण्येन०' इत्यादि जें म्हटलें आहे तें युक्तच आहे, असा पुढें संबंध.) 'न कंचन कामं कामयते-' (पृ. १५५) 'अतिच्छान्दा-' (पृ. १६९) असें वर म्हटलें आहे. त्या प्रक्रियेमध्यें पडलेला हा शोकशब्द 'काम' या अर्थींच असणें युक्त आहे. ( पण केवल कामाच्या अत्ययानें कर्माचा अत्यय कसा ? तें सांगतात--) आणि काम कर्माचा हेतु आहे. ( याविषयीं पुढील वाक्याचें प्रमाण देतात -) ' तो पुरुष ज्या कामानें युक्त होतो त्याविषयीं निश्चय करतो, आणि ज्याविषयीं निश्चयवान् असतो तें कर्म करतो. ' असें पुढें सांगणारच आहे. सारांश पुरुषाला सर्वकामातितीर्णत्व असल्यामुळें ' अनन्वागतं पुण्येन ' इत्यादि, जें म्हटलें आहे तें युक्त आहे.

हृदयस्य हृदयमिति पुण्डरीकाकारो मांसपिण्डस्तत्स्थमन्तःकरणं बुद्धिर्हृदयमित्युच्यते । तात्स्थ्यान्मञ्चक्रोशनवत् । हृदयस्य बुद्धेर्ये शोकाः । बुद्धिसंश्रया हि ते । कामः संकल्पो विचिकित्सेत्यादि सर्वं मन एवेत्युक्तत्वात् । वक्ष्यति च " कामा येऽस्य हृदि श्रिताः" इति ॥

भाष्यार्थ—' हृदयस्य-' हृदय म्हणून शुभ्रकमलाकार मांसपिंड आहे. त्यांत स्थित असलेलें अन्तःकरण--बुद्धि ' हृदय ' असें म्हटलें जातें. ( अहो पण एका मांसाच्या गोळ्याचें 'हृदय' हें नांव बुद्धि हा अर्थ कसें सांगतें ? उत्तर-) बुद्धि त्या मांसपिंडांत स्थित असल्यामुळें. जसें ' माचे ओरडतात ' असें म्हटलें असतां त्यांवरील पुरुष ओरडतात असें

लक्षणेनें कळतें त्याप्रमाणेंच हृदयशब्द हृदयस्थ बुद्धीला लक्षित करतो, असें समजावें. हृदयाचे--बुद्धीचे जे शोक--काम, त्यांचें उल्लंघन केलेला असा होतो. कारण ते बुद्धीच्या आश्रयानेंच असतात. 'कामः संकल्पो विचिकित्सा०' इत्यादि सर्व मनच आहे, असें सांगितलें आहे. 'कामा येऽस्य हृदि श्रिताः' असें पुढें वेदच सांगणार आहे.

आत्मसंश्रयभ्रान्त्यपनोदाय हीदं वचनं हृदि श्रिता हृदयस्य शोका इति च । हृदयकरणसंबन्धातीतश्चायमस्मिन्कालेऽतिक्रामति मृत्यो रूपाणीति ह्युक्तम् । हृदयसंबन्धातीतत्वात्तत्संश्रयकामसंबन्धातीतो भवतीति युक्ततरं वचनम् ॥

भाष्यार्थ—('अहो पण काम आत्म्याच्या आश्रयानें राहणारे आहेत. ते बुद्धीचा आश्रय करीत नाहींत,' या शंकेचें निरसन--) 'हृदि श्रिताः' हें वचन व 'हृदयस्य शोकाः' हेंही वचन 'ते आत्माश्रय आहेत' ह्या भ्रांतीचें निरसन करण्यासाठीं आहे. ('अहो काम बुद्धीच्या आश्रयानें जरी असले तरी बुद्धीशीं आत्म्याचा संबंध असतो. त्यामुळें त्या संबंधाच्या द्वारा काम आत्माश्रयही होऊं शकतात. तेव्हां सुषुप्तींत तो कामांचें उल्लंघन कसा करतो?' उत्तर--) आत्मा यावेळीं म्ह० सुषुप्तींत हृदय या अंतःकरणाच्या संबंधाचें उल्लंघन केलेला असा असतो. 'अतिक्रामति मृत्यो रूपाणि' असें सांगितलेंच आहे. आत्मा हृदयसंबंधातीत असल्यामुळें हृदयाच्या आश्रयानें असलेल्या कामांच्या संबंधाचेंही उल्लंघन केलेला असा तो होतो, असें म्हणणें अतिशय युक्त आहे.

ये तु वादिनो हृदि श्रिताः कामा वासनाश्च हृदयसंबन्धिनमात्मानमुपसृप्योपश्लिष्यन्ति हृदयवियोगेऽपि चाऽऽत्मन्यवतिष्ठन्ते पुटतैलस्थ इव पुष्पादिगन्ध इत्याचक्षते । तेषां "कामः संकल्पो हृदये ह्येव रूपाणि हृदयस्य शोका" इत्यादीनां वचनानामानर्थक्यमेव ॥

भाष्यार्थ—(भर्तृप्रपंचाचें याविषयींचें मत व त्याचें खंडन-) पण जे वादी—हृदयांत आश्रित असलेले काम व वासना हृदयसंबंधी आत्म्या-

पाशीं जाऊन त्याला दृढ आलिंगन देतात- आत्म्याला लिप्त करितात, ("तर मग हृदय जेव्हां असतें तेव्हांच हृदयस्थ कामादिकांचा आत्म्याशीं संसर्ग होतो, हृदयाची निवृत्ति झाल्यावर नाहीं,' अशी आशंका घेऊन सांगतात-) हृदयाचा वियोग- निवृत्ति जरी झाली तरी करंड्यांतील तेलांत घालून ठेवलेल्या पुष्पादिकांचा सुवास तीं पुष्पें वगैरे जरी काढून टाकिलीं तरी जसा तेलांत राहतो त्याप्रमाणें आत्म्यामध्यें काम व वासना राहतात, —असें म्हणतात. (पण या मताशीं श्रुतिविरोध सांगतात-) त्यांच्या मतीं 'काम, संकल्प इत्यादि; हीं हृदयांतीलच रूपें आहेत; हृदयाचे शोक' इत्यादि वचनांचा कांहीं अर्थ नाहीं, असेंच होतें.

हृदयकरणोत्पाद्यत्वादिति चेत्। न। "हृदि श्रिता" इति विशेषणात्। न हि हृदयस्य करणमात्रत्वे "हृदि श्रिता" इति वचनं समञ्जसं "हृदये ह्येव रूपाणि प्रतिष्ठितानि" इति च। आत्मविशुद्धेश्च विवक्षितत्वाद्धृच्छ्रयणवचनं यथार्थमेव युक्तम्। "ध्यायतीव लेलायतीव" इति च श्रुतेरन्यार्थासंभवात्॥

भाष्यार्थ—'अहो पण कामादिक हे आत्मविकार जरी असले तरी ते हृदय या करणानें उत्पाद्य असल्यामुळें त्यांचा हृदयाशीं संबंध संभवतो. त्यामुळें वरील श्रुतींना आनर्थक्य नाहीं,' म्हणून म्हणाल तर तें बरोबर नाहीं. 'हृदि श्रिताः-' हृदयांत आश्रय करून राहिलेले, असें विशेषण दिलेलें आहे. कारण [अर्थात् केवल कामादिकांचा हृदयाशीं संबंध आहे, एवढाच श्रुतीचा अर्थ नाहीं; तर हृदय आश्रय असून कामादिक त्याचे आश्रित आहेत. पण केवल करण आश्रय होऊं शकत नाहीं. कारण रूपादि विषयांचें ज्ञान चक्षुरादि करणांच्या आश्रयानें असतें, असा कोठें अनुभव नाहीं, अशा आशयानें परिहार करितात—] हृदय हें कामाचें जर केवल करण असतें तर 'हृदि श्रिताः' हें वचन समंजस झालें नसतें. त्याचप्रमाणें 'हृदये ह्येव रूपाणि प्रतिष्ठितानि' हें वचनही समंजस होत नाहीं. शिवाय आत्म्याची अत्यंत शुद्धि विवक्षित असल्यामुळें 'काम हृदयांत आहेत' हें वचन यथार्थ असणेंच

युक्त आहे. त्याचप्रमाणें 'ध्यायतीव लेलायतीव' अशी श्रुति आहे. त्यामुळें 'हृदि श्रिताः' या श्रुतीचा दुसरा अर्थ संभवत नाहीं.

कामा येऽस्य हृदि श्रिता इति विशेषणादात्माश्रया अपि सन्तीति चेत् । न । अनाश्रितापेक्षत्वात् । नात्राश्रयान्तरमपेक्ष्य ये हृदीति विशेषणं किं तर्हि ये हृद्यनाश्रिताः कामास्तानपेक्ष्य विशेषणम् । ये त्वप्ररूढा भविष्या भूताश्च प्रतिपक्षतो निवृत्तास्ते नैव हृदि श्रिताः। संभाव्यन्ते च ते । अतो युक्तं तानपेक्ष्य विशेषणम् । ये प्ररूढा वर्तमाना विषये ते सर्वे प्रमुच्यन्त इति ॥

भाष्यार्थ—(उजव्या डोळ्यानें पाहतो, असें म्हटलें असतां डाव्यानें पहात नाहींत, हें जसें सहज सिद्ध होतें त्याप्रमाणें 'प्रमुच्यन्ते हृदि श्रिताः' या विशेषणाच्या आश्रयानें शंका घेतात-) 'कामा येऽस्य हृदि श्रिताः' असें विशेषण असल्यामुळें काम आत्माश्रितही आहेत, ( कारण ते आत्माश्रित जर नसते तर 'हृदि श्रिताः ' असें म्हटलें नसतें ) म्हणून म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण तें वचन अनाश्रित कामांच्या अपेक्षेनें आहे. कामांचा आत्मा हा दुसराही आश्रय आहे, या अपेक्षेनें 'ये हृदि०-' (जे हृदयांत स्थित आहेत ते नाहींसे होतात) हें विशेषण या श्रुतींत दिलेलें नाहीं. तर काय ? जे हृदयांत आश्रय न केलेले काम त्यांच्या अपेक्षेनें विशेषण आहे. ('अहो आत्मा हा कामांचा दुसरा आश्रय जर नाहींच तर सर्व काम हृदय श्रितच असले पाहिजेत; अर्थात् हृदयाचा आश्रय न केलेले दुसरे कामच जर नाहींत तर 'हृदि श्रिताः' हें विशेषण कां दिलें आहे ?' याचें उत्तर-) जे चित्तांत प्ररूढ न झालेले भविष्यकालीन काम व विषयदोषदर्शनादिकांमुळें निवृत्त झालेले भूतकालीन काम त्यांच्या अपेक्षेनें हें विशेषण आहे. कारण ते दोन्ही प्रकारचे काम 'हृदि श्रिताः' हृदयाचा आश्रय केलेले नसतातच. पण तेही संभवतात. यास्तव त्यांच्या अपेक्षेनें ' हृदि श्रिताः ' हें विशेषण योग्य आहे. जे चित्तावर अतिशय रूढ झालेले विषयसंबंधी वर्तमानकालीन काम ते सर्व सर्वथा नाहींसे होतात.

तथाऽपि विशेषणानर्थक्यमिति चेत् । न । तेषु यत्नाधिक्याद्धेयार्थत्वात् । इतरथाऽश्रुतमनिष्टं च कल्पितं स्यादात्माश्रयत्वं कामानाम् ॥

भाष्यार्थ—('अहो पण हृदयाचा आश्रय न केलेले असे भूत व भविष्यत् कालीन काम जरी संभवत असले तरी सर्व कामांची निवृत्ति विवक्षित असल्यामुळें 'वर्तमान' हें भाष्यांतील विशेषण निरुपयोगी आहे,' अशी आशंका घेऊन सांगतात—) तथापि 'वर्तमान' हें विशेषण अनर्थक आहे, म्हणून म्हणाल तर तसें नाहीं. कारण (भूत व भविष्यत्कामांचा स्वतःसिद्ध अभाव संभवतो. त्यामुळें त्यांच्या निवृत्तीसाठीं यत्न करण्याची अपेक्षा नसते. पण शुद्धात्म्याला पाहण्याची इच्छा करणाऱ्या मुमुक्षूला वर्तमान कामांच्या निरासासाठीं पुष्कळ यत्न करणें उचित आहे, हें ज्ञापित करण्यासाठीं 'वर्तमान' या विशेषणाचें ग्रहण केलें आहे, अशा आशयानें म्हणतात-) वर्तमानकालीन कामांना हेयार्थत्व आहे. यास्तव त्यांच्या त्यागासाठीं पुष्कळ यत्न केला पाहिजे. असें जर न मानलें [ म्हणजे आम्ही जसें व्याख्यान करीत आहों तसें न करितां काम आत्माश्रितच आहेत, असें म्हटल्यास ] अश्रुत -श्रुतीनें न सांगितलेलें व मोक्षाचा असंभव होत असल्यामुळें अनिष्ट असें कामांचें आत्माश्रयत्व कल्पिल्यासारखें होईल.

न कंचन कामं कामयत इति प्राप्तप्रतिषेधादात्माश्रयत्वं कामानां श्रुतमेवेति चेत् । न । सधीः स्वप्नो भूत्वेति परनिमित्तत्वात्कामाश्रयत्वप्राप्तेरसङ्गवचनाच्च । न हि कामाश्रयत्वेऽसङ्गवचनमुपपद्यते । सङ्गश्च काम इत्यवोचाम ॥

भाष्यार्थ—(अश्रुतत्वच असिद्ध आहे, असा पूर्वपक्ष करून समाधान सांगतात-) 'न कंचन कामं कामयते' या वचनानें आत्म्याच्या ठिकाणीं प्राप्त झालेल्या कामाचा प्रतिषेध केलेला असल्यामुळें कामांचें आत्माश्रयत्व श्रुतच आहे, म्हणून म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण 'सधीः स्वप्नो भूत्वा-' सधी स्वप्न होऊन या वचनावरून आत्म्याची

कामाश्रयत्वप्राप्ति परनिमित्त आहे. ( अर्थात् निषेध केवळ प्राप्तीची अपेक्षा करतो; काम आत्मधर्मच असले पाहिजेत, अशी कांहीं तो अपेक्षा करीत नाहीं. त्यामुळें त्यांची प्राप्ति भ्रांतीनेंही होऊं शकते. यास्तव आत्मा वस्तुतः कामादिकांचा आश्रय नव्हे. ) शिवाय तो असंग आहे, असेंही वचन आहे. आत्मा जर कामांचा आश्रय असेल तर श्रुतीनें 'तो असंग आहे,' असें जें म्हटलें आहे, तें उपपन्न होत नाहीं. काम हा संग आहे, असें आम्ही वर सांगितलें आहे. ( त्यामुळें काम आत्माश्रय आहेत याविषयीं सांगितलेला हेतु असिद्ध आहे, असा या वाक्यास शेष लावावा. )

आत्मकाम इति श्रुतेरात्मविषयोऽस्य कामो भवतीति चेत् । न । व्यतिरिक्तकामाभावार्थत्वात्तस्याः । वैशेषिकादितन्त्रन्यायोपपन्नमात्मनः कामाद्याश्रयत्वमिति चेत् । न । "हृदि श्रिता" इत्यादिविशेषश्रुतिविरोधादनपेक्ष्यास्ता वैशेषिकादितन्त्रोपपत्तयः । श्रुतिविरोधे न्यायाभासत्वोपगमात् ॥

भाष्यार्थ—( दुसऱ्या वाक्याच्या आधारानें आत्म्याच्या कामाश्रयत्वाविषयीं शंका घेऊन तिचा परिहार करितात--) ' अहो पण " आत्मकामः " अशी श्रुति असल्यामुळें याचा काम आत्मविषयक असतो,' म्हणून म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण त्या श्रुतीचा अर्थ--आत्मव्यतिरिक्त कामाचा अभाव असतो—असा आहे. ' अहो पण वैशेषिकादि शास्त्रकारांच्या न्यायानें आत्म्याचें कामाद्याश्रयत्व उपपन्न आहे [ कारण इच्छादि धर्म कोणत्या तरी द्रव्याच्या आश्रयानेंच असले पाहिजेत. कारण तेही रूपादिकांप्रमाणें गुण आहेत. पण इच्छादिक हे पृथिव्यादि इतर आठ द्रव्यांचे गुण आहेत, असें ह्मणतां येत नाहीं. यास्तव पारिशेष्य न्यायानें आत्माच त्यांचा आश्रय आहे, असें अनुमान होतें ]' असें ह्मणाल तर तें बरोबर नाहीं. कारण ' हृदि श्रिताः ' इत्यादि विशेषश्रुतीशीं विरोध येत असल्यामुळें त्या वैशेषिकादि शास्त्रातील

युक्ति अनपेक्ष्य--अप्रमाण--आहेत. कारण युक्तींना श्रुतिविरोध आला असतां आभासत्व येत असतें. [ श्रुतिविरुद्ध युक्ति युक्त्याभास ठरतात, असा भावार्थ. ]

स्वयंज्योतिष्ट्वबाधनाच्च । कामादीनां च स्वप्ने केवलदृशिमात्रविषयत्वात्स्वयंज्योतिष्ट्वं सिद्धं स्थितं च बाध्येत । आत्मसमवायित्वे दृश्यत्वानुपपत्तेश्चक्षुर्गतविशेषवत् । द्रष्टुर्हि दृश्यमर्थान्तरभूतमिति द्रष्टुः स्वयंज्योतिष्ट्वं सिद्धम् । तद्बाधितं स्याद्यदि कामाद्याश्रयत्वं परिकल्प्येत ॥

भाष्यार्थ —शिवाय कामादिक हे आत्म्याचे गुण आहेत, असें मानल्यास आत्म्याच्या स्वयंज्योतिष्ट्वाचा--स्वयंप्रकाशत्वाचा बाध होतो. ( त्यामुळें कामादिकांना आत्माश्रयत्व नाहीं, असा या वाक्याला शेष लावावा. याचेंच विवरण करितात--) कामादिक स्वप्नांत केवल चैतन्यज्योतीचे विषय असल्यामुळें त्यांना आत्मगुण मानल्यास आत्म्याचें श्रुतिप्रमाणानें सिद्ध झालेलें व अनुमानानें दृढ झालेलें स्वयंज्योतिष्ट्व बाधित होईल. कामादिकांना आत्मसमवायित्व जर असेल तर कामादिकांचें दृश्यत्व—आत्मविषयत्व अनुपपन्न होतें. ( कारण जें ज्याच्यामध्यें समवेत--नित्यसंबद्ध असतें तें त्याच्याकडून पाहिलें जात नाहीं—तें त्याचा विषय होत नाहीं ) चक्षूंतील विशेषाप्रमाणें ( जसें चक्षूंतील कृष्णत्व--काळें बुब्बुळ त्याच चक्षूकडून पाहिलें जात नाहीं, त्याप्रमाणें कामादिक जर आत्मसमवायी[1] असतील तर ते दृश्य होणार नाहींत, पण वर 'ते दृश्य आहेत,' या बळानेंच आत्म्याचें स्वयंज्योतिष्ट्व सिद्ध केलें आहे. पण कामादिकांना आत्माश्रित मानल्यानें त्यांचें दृश्यत्व बाधित होतें आणि तें बाधित झालें म्हणजे वरील अनुमानही बाधित होतें, असा भावार्थ.) द्रष्ट्याचें दृश्य हा द्रष्ट्याहून भिन्न पदार्थ आहे, या युक्तीनेंच द्रष्ट्याचें स्वयंज्योतिष्ट्व सिद्ध केलें आहे. पण आत्मा कामादिकांचा आश्रय आहे, असें जर कल्पिलें तर तें स्वयंजोतिष्ट्व बाधित होतें.

---

१ गुण द्रव्यसमवेत असतात, कामादिक गुण आहेत व आत्मा त्यांचें आश्रयभूत द्रव्य आहे. तर्कसंग्रहसार पृ. ५ व ७४ पहा.

सर्वशास्त्रार्थविप्रतिषेधाच्च । परस्यैकदेशकल्पनायां कामाद्याश्रयत्वे च सर्वशास्त्रार्थजातं कुप्येत । एतच्च विस्तरेण चतुर्थेऽवोचाम । महता हि प्रयत्नेन कामाद्याश्रयत्वकल्पनाः प्रतिषेद्धव्या आत्मनः परेणैकत्वशास्त्रार्थसिद्धेः । तत्कल्पनायां पुनः क्रियमाणायां शास्त्रार्थ एव बाधितः स्यात् । यथेच्छादीनामात्मधर्मत्वं कल्पयन्तो वैशेषिका नैयायिकाश्चोपनिषच्छास्त्रार्थेन न संगच्छन्ते । तथेयमपि कल्पनोपनिषच्छास्त्रार्थबाधनान्नाऽऽदरणीया ॥ २२ ॥

भाष्यार्थ—(आतां 'जीव हा परमात्म्याचा एकदेश आहे व कामादिक त्या जीवाचे आश्रित आहेत,' असें जें म्हटलें होतें त्याविषयीं सांगतात--)सर्व शास्त्रांनीं विप्रतिषिद्ध--विशेषतः प्रतिषिद्ध--असल्यामुळें कामादिक जीवधर्म आहेत असें म्हणतां येत नाहीं. ( हेंच अधिक स्पष्ट करितात--) 'जीव हा परमात्म्याचा एकदेश आहे' अशी कल्पना केल्यास व तो कामादिकांचा आश्रय आहे, असें म्हटल्यास सर्व शास्त्रार्थवर्ग[1] कुपित होतो. ही गोष्ट आम्हीं चवथ्या अध्यायांत सविस्तर सांगितली आहे. ( मग भर्तृप्रपंचाचें मत एकदा जर खोडून काढलें आहे तर पुनः त्याचेंच निरसन करण्यांत काय अर्थ आहे ? तें सांगतात—) परमात्म्याशीं प्रत्यगात्म्याचें जें एकत्व तोच शास्त्रार्थ असून त्याच्या सिद्धीसाठीं आत्म्याचें कामद्याश्रयत्व--आत्मा कामादिकांचा आश्रय आहे हें मत--ह्या कल्पना—मोठ्या प्रयत्नानें प्रतिषेध करण्यास योग्य आहेत. पुनः आत्म्याच्या अंशत्वादिकांची कल्पना केल्यास शास्त्रार्थच बाधित होतो. ( तात्पर्य भर्तृप्रपंचकल्पना त्याज्य आहे, असा उपसंहार करितात--) ज्याप्रमाणें इच्छादिकांना आत्मधर्मत्व आहे, म्ह० कामादिक हे आत्म्याचे धर्म आहेत, अशी कल्पना करणारे वैशेषिक व नैयायिक उपनिषद् या शास्त्राच्या अर्थाशीं सुसंगत होत नाहींत तशी ही कल्पनाही उपनिषद् या शास्त्राच्या अर्थाचा बाध करीत असल्यामुळें आदरणीय नाहीं. २२.

---

१ निरवयवत्व, प्रत्यगेकत्व इत्यादि हें शास्त्रार्थजात आहे.

यद्वै तन्न पश्यति पश्यन्वै तन्न पश्यति न हि द्रष्टुर्दृष्टेर्विपरिलोपो विद्यतेऽविनाशित्वात्। न तु तद्द्वितीयमस्ति ततोऽन्यद्विभक्तं यत्पश्येत्॥ २३॥

अर्थ—आत्मा सुषुप्तींत जें पहात नाहीं, असें तूं समजतोस तें तसें नाहीं, तो पहाणारा असतो. तथापि विशेष दर्शनाच्या अभावीं, विशेष दर्शनाचा अभाव पहात असून पहात नाहीं, अशी भ्रांति होते. कारण द्रष्ट्याच्या दृष्टीचा विनाश होत नाहीं. कारण तिला अविनाशित्व आहे. त्या दृष्ट्याहून निराळी—विभक्त अशी ती द्वितीय विषयभूत वस्तु नाहीं, कीं जी तो पाहील २३.

स्त्रीपुंसयोरिवैकत्वान्न पश्यतीत्युक्तं स्वयंज्योतिरिति च। स्वयंज्योतिष्ट्वं नाम चैतन्यात्मस्वभावता। यदि ह्यग्न्युष्णत्वादिवच्चैतन्यात्मस्वभाव आत्मा स कथमेकत्वेऽपि हि स्वभावं जह्यान्न जानीयात्। अथ न जहाति कथमिह सुषुप्ते न पश्यति। विप्रतिषिद्धमेतच्चैतन्यमात्मस्वभावो न जानाति चेति। न विप्रतिषिद्धमुभयमप्येतदुपपद्यत एव॥

भाष्यार्थ—( 'यद्वै तन्न पश्यति०' इत्यादि पुढील कंडिकेचा संबंध सांगण्यासाठीं गतार्थाचा अनुवाद करितात--)'स्त्री-पुरुषांप्रमाणें सुषुप्तींत जीवात्म-परमात्म्याचें एकत्व असल्यामुळें पहात नाहीं,' असें सांगितलें. 'आत्मा स्वयंज्योति आहे,'असेंही सांगितलें. स्वयंज्योतिष्ट्व म्ह० चैतन्यात्मस्वभावता. आत्मा जर अग्नीच्या उष्णत्वादिकांप्रमाणें चैतन्य-आत्मस्वभाव-चैतन्यस्वरूप असेल तर, जरी त्याचें परमात्म्याशीं एकत्व झालें तरी, तो स्वभाव कसा सोडील? म्हणजे आपल्याला व दुसऱ्याला कसा जाणणार नाहीं? आतां 'तो आपला चैतन्यस्वभाव सोडीतच नाहीं,' म्हणून म्हणाल तर तो या सुषुप्तावस्थेंत पहात कसा नाहीं? 'तो चैतन्यात्मस्व-

भाव आहे ' व ' जाणत नाहीं ' असें म्हणणें परस्परविरुद्ध आहे. (या म्हणण्याचा परिहार--) यांत विरुद्ध कांहींच नाहीं. कारण तीं दोन्हीं उपपन्न होतातच.

कथम् । यद्वै सुषुप्ते तन्न पश्यति पश्यन्वै तत्तत्र पश्यन्नेव न पश्यति । यत्तत्र सुषुप्ते न पश्यतीति जानीषे तन्न तथा गृह्णीयाः । कस्मात् । पश्यन्वै भवति तत्र । नन्वेवं न पश्यतीति सुषुप्ते जानीमो यतो न चक्षुर्वा मनो वा दर्शने करणं व्यापृतमस्ति । व्यापृतेषु हि दर्शनश्रवणादिषु पश्यतीति व्यवहारो भवति शृणोतीति वा । न च व्यापृतानि करणानि पश्यामः । तस्मान्न पश्यत्येवायम् ॥

भाष्यार्थ—(आकांक्षापूर्वक श्रुतीनें वरील विरोधाचा परिहार करितात–) तीं कशीं ? ' यद्वै तन्न पश्यति-' आत्मा सुषुप्तांत पहात नाहीं, असें जें तूं जाणतोस तें तसें जाणूं नकोस. कां बरें ? तर ' पश्यन्वै तन्न पश्यति-' तो सुषुप्तांत पहातच असतो. ' अहो पण आम्ही सुषुप्तांत तो पहात नाहीं, असें या कारणास्तव समजतों. कारण त्या अवस्थेंत दर्शनाचें निमित्त–करण चक्षु किंवा मन व्यापृत--व्यापार करीत नसतें; पण चक्षु, श्रवण इत्यादि इंद्रियें जेव्हां व्यापृत असतात तेव्हांच 'पाहतो' असा किंवा 'ऐकतो' असा व्यवहार होतो. पण सुषुप्तांत करणें व्यापृत असलेलीं आपण पहात नाहीं. त्यामुळें हा सुषुप्त--निजलेला पुरुष–पहात नाहींच.'

न हि । किं तर्हि । पश्यन्नेव भवति । कथम् । न हि यस्माद्द्रष्टुर्दृष्टिकर्तुर्या दृष्टिस्तस्या दृष्टेर्विपरिलोपो विनाशः स न विद्यते । यथाऽग्नेरौष्ण्यं यावदग्निभावि तथाऽयं चाऽऽत्मा द्रष्टाऽविनाश्यतोऽविनाशित्वादात्मनो दृष्टिरप्यविनाशिनी यावद्द्रष्टृभाविनी हि सा ॥

भाष्यार्थ—(पहात नाहींच, या नियमाचा निषेध करितात--) असें नाहीं. तर काय, पाहतच असतो.( ' न हि ' इत्यादि हेतुवाक्या-

२ चैतन्यस्वभावत्व व विशेषविज्ञानराहित्य.

चें व्याख्यान--) तें कसें ? 'न हि द्रष्टुर्दृष्टेर्विपरिलोपो विद्यते--' ज्या-अर्थीं दृष्टिकर्त्याची--पाहणाऱ्याची जी दृष्टि त्या दृष्टीचा विपरिलोप--विनाश होत नाहीं. जसें अग्नीचें औष्ण्य--उष्णता अग्नि विद्यमान असेपर्यंत असणारें असतें तसा हा आत्मा--द्रष्टा अविनाशी आहे. यास्तव आत्म्याच्या अविनाशित्वामुळें त्याची दृष्टिही अविनाशिनी आहे. कारण ती द्रष्टा असेपर्यंत असणारी आहे.

ननु विप्रतिषिद्धमिदमभिधीयते द्रष्टुः सा दृष्टिर्न विपरिलुप्यत इति च । दृष्टिश्च द्रष्ट्रा क्रियते । दृष्टिकर्तृत्वाद्धि द्रष्टेत्युच्यते । क्रियमाणा च द्रष्ट्रा दृष्टिर्न विपरिलुप्यत इति चाशक्यं वक्तुम् ॥

भाष्यार्थ—( द्रष्ट्याची दृष्टि विनाश पावत नाहीं, याविषयीं विरोध दाखवितात--)अहो पण द्रष्ट्याची ती दृष्टि, व ती विनाश पावत नाहीं, हें तुम्ही विरुद्ध सांगत आहां ! कारण दृष्टि द्रष्ट्याकडून केली जाते. दृष्टिकर्तृत्वामुळेंच तो 'द्रष्टा' असें म्हटलें जातें. पण द्रष्ट्या-कडून केली जाणारी दृष्टि विनाश पावत नाहीं, हें म्हणणें अशक्य आहे.

ननु न विपरिलुप्यत इतिं वचनादविनाशिनी स्यात् । न । वच-नस्य ज्ञापकत्वात् । न हि न्यायप्राप्तो विनाशः कृतकस्य वचनशतेना-पि वारयितुं शक्यते । वचनस्य यथाप्राप्तार्थज्ञापकत्वात् ॥

भाष्यार्थ—( मध्यस्थाचा आक्षेप–) अहो पण 'ती विनाश पावत नाहीं,' असें वचन असल्यामुळें कार्यरूप असलेलीही ती दृष्टि अविनाशिनी आहे; ( शंकाकाराचें समाधान–) असें नाहीं. कारण वचन केवळ ज्ञा-पक असतें. 'जें कृतक असतें तें अनित्य असतें' या न्यायानें प्राप्त झा-लेला विनाश शेकडों वचनांनींही कुंठित होऊं शकत नाहीं–शेकडों वचनेंही कृतकाच्या विनाशाचें निवारण करूं शकत नाहींत. कारण पदार्थ जसा प्राप्त असेल तसें त्याचें ज्ञापन करणें एवढेंच वचनाचें काम आहे. ( वचन पदार्थ असेल तसें त्याचें ज्ञापक आहे. )

नैष दोषः । आदित्यादिप्रकाशकत्ववद्दर्शनोपपत्तेः । यथाऽऽदित्यादयो नित्यप्रकाशस्वभावा एव सन्तः स्वाभाविकेन नित्येनैव प्रकाशेन प्रकाशयन्ति । न ह्यप्रकाशात्मानः सन्तः प्रकाशं कुर्वन्तः प्रकाशयन्तीत्युच्यन्ते । किं तर्हि स्वभावेनैव नित्येन प्रकाशेन । तथाऽयमप्यात्माऽविपरिलुप्तस्वभावया दृष्ट्या नित्यया द्रष्टेत्युच्यते ॥

भाष्यार्थ—( सिद्धान्ती या शंकेचा परिहार करितात–) हा दोष येत नाहीं. ( येथील ' द्रष्टृ ' या शब्दाचा अर्थ दृष्टिकर्ता असा नाहीं, तर नित्यदृष्टि असा आहे, त्यामुळें वरील दोष येत नाहीं. ) कारण आदित्यादिकांच्या प्रकाशकत्वाप्रमाणें नित्यदृष्टि आत्म्याचेंही दर्शन उपपन्न होतें. ( दृष्टान्त विशद करितात–) जसे आदित्यादिक नित्य प्रकाशस्वभावच असून स्वाभाविक–नित्य अशाच प्रकाशानें पदार्थांस प्रकाशित करितात. ते अप्रकाशरूप असून प्रकाश करितात व त्यामुळें त्यांना 'ते प्रकाशित करितात, ' असें म्हटलें जात नाहीं. तर काय स्वभावभूत नित्य प्रकाशानेंच ' प्रकाशित करितात ' असें म्हटलें जातें. त्याचप्रमाणें हाही आत्मा अविनाशस्वरूप नित्य दृष्टीनें 'द्रष्टा' असें म्हटला जातो.

गौणं तर्हि द्रष्टृत्वम् । नैवमेव मुख्यत्वोपपत्तेः । यदि ह्यन्यथाऽप्यात्मनो द्रष्टृत्वं दृष्टं तदाऽस्य द्रष्टृत्वस्य गौणत्वं न त्वात्मनोऽन्यो दर्शनप्रकारोऽस्ति । तदेवमेव मुख्यं द्रष्टृत्वमुपपद्यते नान्यथा । यथाऽऽदित्यादीनां प्रकाशयितृत्वं नित्येनैव स्वाभाविकेनाक्रियमाणेन प्रकाशेन तदेव च प्रकाशयितृत्वं मुख्यं प्रकाशयितृत्वान्तरानुपपत्तेः । तस्मान्न द्रष्टुर्दृष्टिर्विपरिलुप्यत इति न विप्रतिषेधगन्धोऽप्यस्ति ॥

भाष्यार्थ—(पण आत्म्याला नित्य दृष्टिस्वभाव मानल्यास कोणता दोष येतो तें वादी सांगतो–) असें जर असेल तर तें आत्म्याचें द्रष्टृत्व गौण आहे. (पण कोणत्याही गौणाला मुख्याची अपेक्षा असते. येथें दुसरें मुख्य द्रष्टृत्व उपलब्ध होत नाहीं, त्यामुळें त्याला गौण म्हणतां येत नाहीं, असें उत्तर देतात–) असें नाहीं. नित्यदृष्टीनेंच त्याच्या मुख्यत्वाची उपप-

त्ति लागते. नित्य दृष्टिस्वभावावाचूनही जर आत्म्याचें द्रष्टृत्व उपलब्ध झालें असतें तर त्याचें द्रष्टृत्व गौण आहे, असें म्हणतां आलें असतें. पण आत्म्याचा अन्य दर्शनप्रकार नाहीं. [ म्हणजे त्याला क्रियारूपत्व नाहीं. कारण त्याच्या ठिकाणीं क्रिया मानल्यास तो निष्क्रिय आहे, असें सांगणाऱ्या श्रुति-स्मृतींशीं विरोध येतो. ] यास्तव नित्य दृष्टित्वानेंच आत्म्याचें मुख्य द्रष्टृत्व उपपन्न होतें. त्यावाचून म्हणजे दर्शनक्रियाकर्तृत्वानें होत नाहीं. जसें आदित्यादिकांचें प्रकाशयितृत्व नित्य, स्वाभाविक, अक्रियमाण—अकृतक--प्रकाशानेंच आहे आणि तेंच प्रकाशयितृत्व मुख्य आहे. कारण दुसऱ्या प्रकाशयितृत्वाची अनुपपत्ति आहे. तस्मात् ' न द्रष्टुर्दृष्टेर्विपरिलोपो विद्यते-' द्रष्ट्याची दृष्टि विनाश पावत नाहीं, या म्हणण्यांत विरोधाचा गंधही नाहीं.

मनन्वनित्यक्रियाकर्तृविषय एव तृच्प्रत्ययान्तस्य शब्दस्य प्रयोगो दृष्टो यथा छेत्ता भेत्ता गन्तेति तथा द्रष्टेत्यत्रापीति चेत् । न । प्रकाशयितेति दृष्टत्वात् । भवतु प्रकाशकेष्वन्यथाऽसंभवान्न त्वात्मनीति चेत् । न । दृष्टयविपरिलोपश्रुतेः ॥

भाष्यार्थ—( ' दृष्टृ ' या शब्दांतील ' तृ ' या कर्तरि प्रत्ययाचा आश्रय करून शंका घेतात--) 'अहो पण अनित्य क्रियाकर्तृत्व या अर्थींच तृच्प्रत्ययान्तशब्दाचा प्रयोग दिसतो. जसा--छेत्ता--छेद करणारा, भेत्ता- भेद करणारा, गन्ता--गमन करणारा, इत्यादि; त्याचप्रमाणें 'द्रष्टा-' पाहणारा या शब्दांतही अनित्य दर्शन करणारा, या अर्थींच ' तृ-' प्रत्यय आहे' ह्मणून ह्मणाल तर तें बरोबर नाहीं. कारण नित्य प्रकाशस्वरूप आदित्याला प्रकाशयिता असें म्हटलेलें दिसतें. ( आदित्याहून आत्म्यामध्यें विशेष आहे, असें सांगतात--) आदित्यादि प्रकाशकांमध्यें

---

१ त्याचप्रमाणें आत्म्याचेंही द्रष्टृत्व नित्य–स्वाभाविक चैतन्यज्योतीनेंच सिद्ध होतें; आणि तेंच मुख्य द्रष्टृत्व आहे. कारण दुसऱ्या द्रष्टृत्वाची अनुपपत्ति आहे, असा या वाक्यास शेष लावावा.

असा उलट प्रकार असो; [ म्ह० त्यांच्या स्वाभाविक प्रकाशानें प्रकाशयितृत्व असो ] कारण त्यांच्या ठिकाणीं केव्हां केव्हां आलेल्या प्रकाशानें प्रकाशयितृत्व संभवत नाहीं. पण आत्म्यामध्यें नित्य दृष्टि नाहीं, ( कारण ती आहे, असें मानण्यास कांहीं प्रमाण नाहीं. त्यामुळें कादाचित्क दृष्टीनेंच त्याला द्रष्टृत्व आहे असा भावार्थ.) म्हणून म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण आत्मदृष्टीचा लोप–विनाश होत नाहीं, असें सांगणारी श्रुति आहे. ( प्रत्यगात्मा चिद्रूप आहे,असें श्रुतीनें सांगितलेलें असल्यामुळें त्याला आदित्यादिकांप्रमाणें कर्तृत्वावाचून प्रकाशयितृत्व आहे.)

पश्यामि न पश्यामीत्यनुभवदर्शनान्नेति चेत् । न । करणव्यापारविशेषापेक्षत्वात् । उद्धृतचक्षुषां च स्वप्न आत्मदृष्टेरविपरिलोपदर्शनात् । तस्मादविपरिलुप्तस्वभावैवाऽऽत्मनो दृष्टिः । अतस्तयाऽविपरिलुप्तया दृष्ट्या स्वयंज्योतिःस्वभावया पश्यन्नेव भवति सुषुप्ते ॥

भाष्यार्थ—( आत्मा नित्य दृष्टिस्वरूप आहे, असें म्हटल्यास प्रत्यक्षविरोध येतो, अशी शंका घेतात–) 'अहो पण मी पाहतों, व मी पहात नाहीं, असा अनुभव येत असल्यामुळें आत्मा नित्य दृष्टिस्वरूप नाहीं,' म्हणून ह्मणाल तर तें बरोबर नाहीं. कारण तो तसा दोन प्रकारचा अनुभव इंद्रियांच्या विशेष प्रकारच्या व्यापाराच्या अपेक्षेनें येतो. [ म्ह० तो दोन प्रकारचा अनुभव आत्म्याची नित्यदृष्टिच सिद्ध करतो. कारण चक्षुरादि इंद्रियांचा व्यापार जेव्हां चालतो तेव्हां बुद्धि पाहते व तो जेव्हां बंद असतो तेव्हां ती पहात नाहीं. आत्मा बुद्धीचा केवळ साक्षी असल्यामुळें तो ' मी पाहतों व पहात नाहीं,' अशारीतीनें बुद्धीचा अनुभव व्यक्त करतो. आत्मदृष्टि नित्य आहे, याविषयीं आणखीं एक हेतु–] ज्यांचे डोळे काढले आहेत अशा लोकांच्या आत्मदृष्टीचा स्वप्नांत विनाश होत नसल्याचा अनुभव येतो. तस्मात् आत्म्याची दृष्टि अविनाशस्वभावच आहे. यास्तव त्या अवि-

नष्ट व स्वयंज्योतिःस्वभाव अशा दृष्टीनें सुषुप्तांत तो निजलेला पुरुष पहातच असतो.

कथं तर्हि न पश्यतीति । उच्यते । न तु तदस्ति । किं तत् । द्वितीयं विषयभूतम् । किंविशिष्टम् । ततो द्रष्टुरन्यदन्यत्वेन विभक्तं यत्पश्येद्यदुपलभेत । यद्धि तद्विशेषदर्शनकारणमन्तःकरणं चक्षू रूपं च तदविद्ययाऽन्यत्वेन प्रत्युपस्थापितमासीत् । तदेतस्मिन्काल एकीभूतम् । आत्मनः परेण परिष्वङ्गात् । द्रष्टुर्हि परिच्छिन्नस्य विशेषदर्शनाय करणमन्यत्वेन व्यवतिष्ठते । अयं तु स्वेन सर्वात्मना संपरिष्वक्तः स्वेन परेण प्राज्ञेनाऽऽत्मना प्रिययेव पुरुषः । तेन न पृथक्त्वेन व्यवस्थितानि करणानि विषयाश्च । तदभावाद्विशेषदर्शनं नास्ति । करणादिकृतं हि तन्नाऽऽत्मकृतम् । आत्मकृतमिव प्रत्यवभासते । तस्मात्तत्कृतेयं भ्रान्तिरात्मनो दृष्टिः परिलुप्यत इति ॥२३॥

भाष्यार्थ— (पुढील वाक्य आकांक्षापूर्वक घेऊन त्याचें व्याख्यान करितात -) मग 'न पश्यति--' तो पहात नाहीं, असें कसें म्हटलें जातें ? सांगतों-' न तु तदस्ति-' पण तें नाहीं. तें काय ? 'द्वितीयं-' दुसरी विषयभूत वस्तु. कोणत्या विशेषानें विशिष्ट अशी दुसरी वस्तु नसते ! कीं जी 'ततः-' त्या द्रष्ट्याहून 'अन्यत्-' अन्यत्वानें विभक्त असते 'यत्पश्येत्-' कीं जिला तो पाहील. जें त्या विशेषदर्शनाचें कारण आभासयुक्त अन्तःकरण [ प्रमातृ ], त्याहून दुसरें चक्षुरादि प्रमाण व त्याहूनही विभक्त असें रूपादि प्रमेय तें जागृति व स्वप्न या दोन अवस्थांमध्यें अविद्येनें त्यांहून अन्यत्वानें प्राप्त केलें होतें. तें या सुषुप्तिसमयीं एकीभूत झालेलें असतें. ( कारणरूपत्वास प्राप्त होऊन अनभिव्यक्त होतें. सुषुप्तींत दुसरें प्रमातृरूप नाहीं, असें उपपादन करतात-) कारण प्रमाता परमात्म्याशीं एकरूप होतो. ( त्यामुळें सुषुप्तींत प्रमातृरूप पृथक् रहात नाहीं, असा भावार्थ. 'तथापि इंद्रियव्यापारामुळें आत्म्याला विषयाचें दर्शन होईल,' अशी आशंका घेऊन सांगतात--) परिच्छिन्न द्रष्ट्याला विशेष दाखविण्यासाठीं करण--इंद्रिय पृथक्त्वानें

अवस्थित होतें. पण हा सुषुप्त पुरुष, प्रियभार्येकडून जसा लौकिक पुरुष आलिंगत होतो त्याप्रमाणें, स्वतः सर्वस्वरूपानें स्वतः प्राज्ञ परमात्म्याशीं संपरिष्वक्त होतो. [ सर्वथा एकरूप होतो. ] त्यामुळें त्या अवस्थेंत करणें व विषय पृथक्पणें व्यवस्थित नसतात. त्यांच्या अभावीं विशेषदर्शनही होत नाहीं. कारण तें विशेषदर्शन इंद्रियादिकांमुळें होणारें आहे; आत्मकृत नव्हे. पण तें आत्मकृत आहे, असें केवळ भासतें. तस्मात् आत्म्याची दृष्टि लुप्त होते ही त्यामुळें--जाग्रत् व स्वप्न यांतील विशेषदर्शन आत्मकृत आहे असें भासणें व सुषुप्तींत त्या दर्शनाचा अभाव होणें यामुळें—होणारी भ्रांति आहे. २३

यद्वै तन्न जिघ्रति जिघ्रन्वै तन्न जिघ्रति न हि घ्रातुर्घ्रातेर्विपरिलोपो विद्यतेऽविनाशित्वान्न तु तद्द्वितीयमस्ति ततोऽन्यद्विभक्तं यज्जिघ्रेत्॥

अर्थ—आत्मा सुषुप्तींत जें हुंगीत नाहीं तें तो हुंगणारा असतांनाच हुंगीत नाहीं असें वाटतें. वास घेणाऱ्याच्या गंधग्रहणशक्तीचा विनाश होत नाहीं. कारण ती शक्ति अविनाशी आहे. सुषुप्तींत त्या घ्रात्याहून निराळी विभक्त अशी दुसरी विषयभूत वस्तुच नाहीं,कीं जिचा तो वास घेईल २४.

यद्वै तन्न रसयते रसयन्वै तन्न रसयते न हि रसयितू रसयतेर्विपरिलोपो विद्यतेऽविनाशित्वान्न तु तद्द्वितीयमस्ति ततोऽन्यद्विभक्तं यद्रसयेत् ॥२५॥

अर्थ—आत्मा सुषुप्तींत जें चाखीत नाहीं तें तो तेथें रस ग्रहण करणारा असतांनाच रस ग्रहण करीत नाहीं. कारण रसास्वाद घेणाऱ्या

---

१ विशेषदृष्टि प्रमाता, प्रमाण—करण, व प्रमेय—विषय यांमुळें होणारी आहे. पण सुषुप्तींत त्या तिघांचाही अभाव होतो. त्यामुळें त्यांचें कार्य अशी जी विशेषदृष्टि तिचाही त्या अवस्थेंत अभाव होतो, म्हणून.

पुरुषाच्या रसग्रहणशक्तीचा विनाश होत नाहीं. कारण ती अविनाशी आहे. त्या पुरुषाहून निराळी विभक्त अशी दुसरी वस्तु नाहीं कीं जिचा तो रस चाखील २५.

यद्वै तन्न वदति वदन्वै तन्न वदति न हि वक्तुर्वक्तेर्विपरिलोपो विद्यतेऽविनाशित्वान्न तु तद्द्वितीयमस्ति ततोऽन्यद्विभक्तं यद्वदेत् ॥२६॥

अर्थ—आत्मा सुषुप्तींत जें बोलत नाहीं तें तो तेथें बोलणारा असा असतांनाच बोलत नाहीं. वक्त्याच्या वक्तीचा--वचनशक्तीचा विनाश होत नाहीं. कारण ती अविनाशी आहे. त्या वक्त्याहून निराळी--विभक्त विषयभूत दुसरी वस्तु नाहीं कीं जिच्याविषयीं तो बोलेल २६.

यद्वै तन्न शृणोति शृण्वन्वै तन्न शृणोति न हि श्रोतुः श्रुतेर्विपरिलोपो विद्यतेऽविनाशित्वान्न तु तद्द्वितीयमस्ति ततोऽन्यद्विभक्तं यच्छृणुयात् ॥२७॥

अर्थ—आत्मा सुषुप्तींत जें ऐकत नाहीं तें तो तेथें ऐकणारा असा असतांनाच ऐकत नाहीं. कारण श्रोत्याच्या श्रुतीचा विनाश होत नाहीं. कारण ती अविनाशी आहे. त्या श्रोत्याहून निराळें—विभक्त असें दुसरें विषयभूत कांहीं नाहीं, कीं जें तो ऐकेल २७.

यद्वै तन्न मनुते मन्वानो वै तन्न मनुते न हि मन्तुर्मतेर्विपरिलोपो विद्यतेऽविनाशित्वान्न तु तद्द्वितीयमास्ति ततोऽन्यद्विभक्तं यन्मन्वीत ॥२८॥

अर्थ—आत्मा सुषुप्तींत जें मनन करीत नाहीं तें तेथें तो मनन करणारा असा असतांनाच मनन करीत नाहीं. कारण मनन करणाऱ्याच्या मतीचा विनाश होत नाहीं. कारण ती मति अविनाशी आहे. मनन करणाराहून निराळें--विभक्त असें दुसरें विषयभूत नाहीं, कीं ज्याचें तो मनन करील २८.

यद्वै तन्न स्पृशति स्पृशन्वै तन्न स्पृशति न हि स्प्रष्टुः स्पृष्टेर्विपरिलोपो विद्यतेऽविनाशित्वान्न तु तद्द्वितीयमस्ति ततोऽन्यद्विभक्तं यत्स्पृशेत् ॥२९॥

अर्थ—आत्मा सुषुप्तींत जो स्पर्श करीत नाहीं तो तेथं स्पर्श करणारा असा असतांना स्पर्श करीत नाहीं. कारण स्पर्श करणाराच्या स्पर्शनशक्तीचा विनाश होत नाहीं. कारण ती शक्ति अविनाशी आहे. त्या स्पर्शकर्त्याहून निराळी विभक्त अशी दुसरी विषयभूत वस्तु नसते कीं ज्याला तो स्पर्श करील २९.

यद्वै तन्न विजानाति विजानन्वै तन्न विजानाति न हि विज्ञातुर्विज्ञातेर्विपरिलोपो विद्यतेऽविनाशित्वान्न तु तद्द्वितीयमस्ति ततोऽन्यद्विभक्तं यद्विजानीयात् ॥ ३० ॥

अर्थ—आत्मा सुषुप्तींत जें जाणत नाहीं तें तो तेथें जाणणारा असा असतांनाच जाणत नाहीं. कारण विज्ञात्याच्या विज्ञातीचा विनाश होत नाहीं. कारण ती विज्ञानशक्ति अविनाशी असते. सुषुप्तींत विज्ञानाहून निराळी—विभक्त दुसरी विषयभूत वस्तु नसते कीं जिला तो जाणील ३०.

समानमन्यत् । यद्वै तन्न जिघ्रति । यद्वै तन्न रसयते । यद्वै तन्न वदति । यद्वै तन्न शृणोति । यद्वै तन्न मनुते । यद्वै तन्न स्पृशति ।

यद्वै तन्न विजानातीति । मननविज्ञानयोर्दृष्ट्यादिसहकारित्वेऽपि सति चक्षुरादिनिरपेक्षो भूतभविष्यद्वर्तमानविषयव्यापारो विद्यत इति पृथग्ग्रहणम् ॥

भाष्यार्थ—('यद्वै तन्न पश्यति-' या वाक्यांत सांगितलेल्या न्यायाचाच पुढील वाक्यांत अतिदेश करितात-) 'यद्वै तन्न जिघ्रति' 'यद्वै तन्न रसयते' 'यद्वै तन्न वदति' 'यद्वै तन्न शृणोति' 'यद्वै तन्न मनुते' 'यद्वै तन्न स्पृशति' व 'यद्वै तन्न विजानाति' इत्यादि दुसरें सर्व पूर्वी सारखेंच आहे. ('मन व बुद्धि यांना साधारण करणत्व असल्यामुळें त्यांचा पृथक् व्यापार नाहीं, तेव्हां त्यांचा पृथक् निर्देश कसा संभवतो,' अशी आशंका घेऊन सांगतात--) मनन व विज्ञान यांना दृष्ट्यादिकांचें सहकारित्व जरी असलें तरी चक्षुरादिकांच्या अपेक्षेवाचून त्यांचा भूत, भविष्यत् व वर्तमानविषयक व्यापार असतोच. यास्तव त्यांचें पृथक् ग्रहण केलें आहे.

किं पुनर्दृष्ट्यादीनामग्नेरौष्ण्यप्रकाशनज्वलनादिवद्धर्मभेद आहोस्विदभिन्नस्यैव धर्मस्य परोपाधिनिमित्तं धर्मान्यत्वमिति ॥

भाष्यार्थ—(याप्रमाणें वाक्यांचें व्याख्यान करून स्वसिद्धान्त स्पष्ट करण्यासाठीं विचार करितात—) अग्नीचें उष्णत्व, प्रकाशन व ज्वलन इत्यादिकांप्रमाणें दृष्ट्यादिकांचा धर्मभेद आहे कीं धर्मीहून भिन्न नसलेल्या अशाच दृष्ट्यादिधर्मांचें दुसऱ्या उपाधीच्या निमित्तानें धर्मान्यत्व आहे? [ म्हणजे दृष्टि, श्रुति, मति इत्यादि हे आत्म्याचे अग्नीच्या उष्णत्वादिकांप्रमाणें वास्तविक पृथक् धर्म आहेत कीं दृष्ट्यादिक हें आत्म्याचें स्वरूपच असतांना अंतःकरण, चक्षु, श्रोत्र इत्यादि उपाधींमुळें ते आत्म्याचे आत्म्याहून भिन्न धर्म आहेत व दृष्टि, श्रुति इत्यादिकही परस्पर भिन्न आहेत असें नुस्तें भासतें ? ]

अत्र केचिद्व्याचक्षते । आत्मवस्तुनः स्वत एवैकत्वं नानात्वं च यथा गोर्गोद्रव्यतयैकत्वं सास्नादीनां धर्माणां परस्परतो भेदः । यथा

स्थूलेष्वेकत्वं नानात्वं च तथा निरवयवेष्वमूर्तवस्तुष्वेकत्वं नानात्वं चानुमेयम् । सर्वत्राव्यभिचारदर्शनादात्मनोऽपि तद्वदेव द्रष्टयादीनां परस्परं नानात्वमात्मना चैकत्वमिति ॥

भाष्यार्थ—(भर्तृप्रपंचांच्या मतानें पूर्वपक्ष करितात–) याविषयीं कित्येक असें सांगतात. आत्मा या पदार्थाचें स्वतःच [म्ह०स्वभावतःच] एकत्व व नानात्व आहे. जसें–गाय या पदार्थाचें गोद्रव्य या रूपानें एकत्व व सास्ना[1], शिंगें, कान, पाय इत्यादि धर्मांचा परस्पर भेद असतो. (त्याप्रमाणें आत्म्याचें 'आत्मा' या पदार्थरूपानें एकत्व व शरीरेंद्रियादिरूपानें अनेकत्व आहे.'अहो पण गायीसारखे पदार्थ सावयव असल्यामुळें त्यांचा रूपभेद संभवतो. त्यामुळें गाय गोद्रव्य या रूपानें एक व अवयवांच्या दृष्टीनें अनेक आहे, असें म्हणतां येतें. पण निरवयव आत्म्याच्या ठिकाणीं तें कसें संभवतें ?' अशी आशंका घेऊन सांगतात–) ज्याप्रमाणें स्थूल पदार्थांमध्यें एकत्व व नानात्व उपलब्ध होतें त्याप्रमाणें अमूर्त निरवयव वस्तूमध्येंही एकत्व व नानात्व यांचें अनुमान करावें (वस्तु एकरूप असते,अशा विषयीं दृष्टान्त नाहीं. पण तिच्या नानारूपत्वाविषयीं दृष्टान्त हवे तितके आहेत. यास्तव आत्म्याच्याही नानात्वाचें अनुमान करावें. 'आत्मा भिन्न व अभिन्नही आहे. कारण तोही वस्तु पदार्थ आहे. गाय, घोडा इत्यादिकांप्रमाणें' असें अनुमान होऊं शकतें. 'अहोपण गाय, घोडा इत्यादिकांविषयीं जरी तसें अनुमान संभवलें तरी आत्म्याविषयीं तें कसें संभवेल ?' अशी आशंका घेऊन वस्तुत्वाचें नानारूपत्व अव्यभिचारी आहे, म्हणजे कोणतीही वस्तु नियमानें नानारूप असते, त्यामुळें आत्म्याविषयींही तसें अनुमान निःशंकपणें करतां येतें, असें पूर्वपक्षकारच म्हणतो–) नानात्वाचा सर्वत्र अव्यभिचार उपलब्ध होत असल्यामुळें त्याच न्यायानें आत्म्याच्याही द्रष्टयादिकांचें परस्पर नानात्व व आत्मरूपानें एकत्व आहे. [ अर्थात् अशा

१ गळ्याखालची पोळी, सासळी.

तऱ्हेच्या अनुमानानें ही गोष्ट सिद्ध होत असल्यामुळें 'यद्वै तन्न पश्यति' इत्यादिवाक्याचें तात्पर्य भिन्नाभिन्न वस्तूमध्यें आहे, असा भावार्थ.]

नान्यपरत्वात् । न हि दृष्ट्यादिधर्मभेदप्रदर्शनपरमिदं वाक्यं यद्वै तादित्यादि । किं तर्हि यदि चैतन्यात्मज्योतिः कथं न जानाति सुषुप्ते । नूनमतो न चैतन्यात्मज्योतिरित्येवमाशङ्काप्राप्तौ तन्निराकरणायैतदारब्धं यद्वै तादित्यादि यदस्य जाग्रत्स्वप्नयोश्चक्षुराद्यनेकोपाधिद्वारं चैतन्यात्मज्योतिःस्वाभाव्यमुपलक्षितं दृष्ट्याद्यभिधेयव्यवहारापन्नं सुषुप्त उपाधिभेदव्यापारनिवृत्तावनुद्भास्यमानत्वादनुपलक्ष्यमाणस्वभावमप्युपाधिभेदेन भिन्नमिव यथाप्राप्तानुवादेनैव विद्यमानत्वमुच्यते । तत्र दृष्ट्यादिधर्मभेदकल्पनाऽविवक्षितार्थोऽनभिज्ञतया ॥

भाष्यार्थ—( या पूर्वपक्षाचें निरसन--) असें नाहीं. कारण 'यद्वै तत्०' इत्यादि वाक्य याहून अन्य अर्थ सांगणारें आहे. 'यद्वै तत्' इत्यादि वाक्य दृष्ट्यादि धर्मांचा भेद सांगणारें नाहीं. तर काय ? 'चैतन्यात्मज्योतीचा विनाश जर होत नाहीं, ती ज्योति जर नित्य आहे, तर सुषुप्तांत पुरुष जाणत कसा नाहीं ? यास्तव खचित तो चैतन्यात्मज्योति नाहीं,' अशी आशंका प्राप्त झाली असतां तिचें निराकरण करण्यासाठीं 'यद्वै तत्०' इत्यादि वाक्य आरंभिलें आहे. ( चैतन्याच्या अविनाशामध्यें जर वाक्याचें तात्पर्य आहे तर दृष्ट्यादिकांचा भेद कसा सांगितला आहे ? तें सांगतात--) जागरित व स्वप्न या दोन अवस्थांमध्यें चक्षुरादि अनेक उपाधि हें ज्याचें द्वार आहे असें चैतन्यात्मज्योतिःस्वाभाव्य दृष्ट्यादि विषयव्यवहारास प्राप्त झालेलें असें उपलक्षित होतें, पण सुषुप्तींत उपाधिभेदाचा व्यापार निवृत्त झाला असतां तें अभिव्यक्त होईनासें होतें. त्यामुळें त्याचा स्वभाव उपलक्षित होत नाहीं. तथापि तें यथाप्राप्त भेदाच्या अनुवादानेंच उपाधिभेदानें भिन्न झालेलें असें त्याचें विद्यमानत्व सांगितलें जातें. [ म्ह० सुषुप्तींत अन्तःकरणाचा चक्षुरादिभे-

दांच्या अधीन असलेला परिणाम हाच व्यापार, तो निवृत्त झाला असतां उपाधिभेद उद्भासित–व्यक्त होईनासा होतो. त्यामुळें तें चैतन्यही भिन्न असल्या सारखी प्रतीति येत नाहीं, हें जरी खरें आहे तरी चक्षूच्या द्वारा उत्पन्न झालेल्या बुद्धिवृत्तींत व्यक्त झालेलें चैतन्य ही दृष्टि, घ्राणाच्या द्वारा उत्पन्न झालेल्या बुद्धिवृत्तींत व्यक्त झालेलें चैतन्य ही घ्राति, असा उपाधिभेदामुळें प्राप्त झालेल्या भेदाचा अनुवाद करून श्रुतीनें चैतन्याच्या अविनाशित्वामध्यें वाक्याचें तात्पर्य दाखविलें आहे, असा भावार्थ, याप्रमाणें उक्त अर्थी वाक्याचें तात्पर्य सिद्ध झालें असतां फलित सांगतात–] त्यामुळें केवल अनभिज्ञतेनें केलेली दृष्टयादि धर्मभेदाची कल्पना विवक्षितार्थ नाहीं. [ म्ह० ती कल्पना श्रुतीला विवक्षित नाहीं. ]

सैन्धवघनवत्प्रज्ञानैकरसघनश्रुतिविरोधाच्च । " विज्ञानमानन्दम् " " सत्यं ज्ञानम् " " प्रज्ञानं ब्रह्म " इत्यादिश्रुतिभ्यश्च ॥

भाष्यार्थ—( याही कारणानें दृष्टयादि भेदकल्पना योग्य नाहीं–) सैन्धवघनाप्रमाणें--मिठाच्या खड्याप्रमाणें आत्मा प्रज्ञान-एकरसघन आहे, असें सांगणाऱ्या श्रुतीशींही विरोध येत असल्यामुळें वरील कल्पना अयोग्य आहे. ( हेंच अधिक विशद करितात–) ' विज्ञानं आनंदं ' ' सत्यं ज्ञानं' 'प्रज्ञानं ब्रह्म' इत्यादि श्रुतींवरूनही ती कल्पना उपपन्न होत नाहीं.

शब्दप्रवृत्तेश्च । लौकिकी च शब्दप्रवृत्तिश्चक्षुषा रूपं विजानाति श्रोत्रेण शब्दं विजानाति रसनेनान्नस्य रसं विजानातीति च सर्वत्रैव च दृष्टयादिशब्दाभिधेयानां विज्ञानशब्दवाच्यतामेव दर्शयति । शब्दप्रवृत्तिश्च प्रमाणम् ॥

भाष्यार्थ—( ' घटाकाश, महाकाश ' इत्यादि प्रकारें 'आकाश' या एका शब्दाचा विषय होत असल्यामुळें उपाधींचा जरी भेद असला तरी आकाशाचें जसें एकत्व इष्ट आहे त्याप्रमाणें चैतन्याला उद्देशून एकाच शब्दाची प्रवृत्ति होत असल्यामुळें चित्-चेंही एकत्व स्वीकारणें

इष्ट आहे आणि तें स्वीकारल्यावर दृष्ट्यादिभेदाची सिद्धि कोठून होणार? असें सांगतात–) शिवाय शब्दप्रवृत्तीवरून चैतन्यभेदकल्पना उपपन्न होत नाहीं. लौकिक शब्दप्रवृत्ति ' चक्षूनें घटाला जाणतो, श्रोत्रानें शब्दाला जाणतो, रसनेनें अन्नाच्या रसाला जाणतो' अशी होते. ती शब्दप्रवृत्ति सर्वत्रच दृष्ट्यादिशब्दांच्या वाचक अर्थांना विज्ञानशब्दवाच्यता आहे असेंच दाखविते; [म्ह० दृष्ट्यादि शब्दांचे अर्थ विज्ञान या शब्दानेंच सांगितले जातात, ] आणि शब्दप्रवृत्ति प्रमाण आहे. ( तस्मात् दृष्ट्यादि धर्मभेदाची कल्पना अनुपपन्न आहे. )

दृष्टान्तोपपत्तेश्च ॥ तथा हि लोके स्वच्छस्वाभाव्ययुक्तः स्फटिकस्तन्निमित्तमेव केवलं हरितनीललोहिताद्युपाधिभेदसंयोगात्तदाकारत्वं भजते। न च स्वच्छस्वाभाव्यव्यतिरेकेण हरितनीललोहितादिलक्षणा धर्मभेदाः स्फटिकस्य कल्पयितुं शक्यन्ते। तथा चक्षुराद्युपाधिभेदसंयोगात्प्रज्ञानघनस्वभावस्यैवाऽऽत्मज्योतिषो दृष्ट्यादिशक्तिभेद उपलक्ष्यते। प्रज्ञानघनस्य स्वच्छस्वाभाव्यात्स्फटिकस्वच्छस्वाभाव्यवत्स्वयंज्योतिष्ट्वाच्च। यथा चाऽऽदित्यज्योतिरवभास्यभेदैः संयुज्यमानं हरितनीलपीतलोहितादिभेदैरविभाग्यं तदाकाराभासं भवति। तथा च कृत्स्नं जगदवभासयच्चक्षुरादीनि च तदाकारं भवति ॥

भाष्यार्थ--( आतां सिद्धान्तपक्षीं दृष्टान्तच नाहीं, असें जें वाद्याचें म्हणणें होतें, त्याविषयीं सांगतात--)याविषयीं दृष्टान्ताचीही उपपत्ति आहे. (वस्तूच्या एकरूपत्वाविषयीं दृष्टान्त नाहीं, कीं त्याचें नानारूपत्व मिथ्या आहे, याविषयीं दृष्टान्त नाहीं, असें म्हणतां ?अशी आशंका घेऊन त्यांतील पहिल्यापक्षीं सांगतात-नानारूप वस्तु आहे, असें म्हणणाऱ्यांनींही एकेक रूपाच्या पदार्थांचें अनानारूपत्व अनवस्थादोषाच्या परिहारार्थ स्वीकारलेलें असल्यामुळें आमच्या दृष्टान्ताची सिद्धि होते; त्याचप्रमाणें ' वस्तुत्व ' असा जो वाद्यानें आपल्या अनुमानांत[1] हेतु दिला होता तो

[1] आत्मवस्तु भिन्नाभिन्न आहे. कारण तिला वस्तुत्व आहे. गाय, घोडा इत्यादिकांप्रमाणें; या वरील अनुमानांत.

व्यभिचारी आहे. यास्तव एकरूप वस्तूचाच स्वीकार करावा, असा भावार्थ.)

( आतां नानारूपाच्या मिथ्यात्वाविषयीं दृष्टान्त नाहीं, असें जें म्हटलें होतें त्यावर दूषण देतात--) ज्याप्रमाणें व्यवहारांत स्वच्छस्वाभाव्य-युक्त ( स्वच्छता या स्वभावानें युक्त ) असलेला स्फटिक केवल स्वच्छ-स्वभावामुळेंच हिरवा, निळा, तांबडा, इत्यादि रंगाच्या भिन्न उपाधींचा संयोग झाल्यामुळें त्या त्या आकारत्वास पात्र होतो--हिरवा, निळा, तांबडा, इत्यादि दिसतो, पण स्फटिकाच्या स्वच्छ स्वभावत्वावांचून हिरवा, निळा, लाल इत्यादि लक्षण धर्मभेद कल्पितां येणें शक्य नसतें; [म्ह० ते स्फटिकाचे स्वाभाविक धर्म आहेत असें म्हणतां येत नाहीं, ] त्याच-प्रमाणें चक्षुरादि उपाधिभेदसंयोगामुळें प्रज्ञानघनस्वभाव अशाच आत्म-ज्योतीचे दृष्ट्यादिशक्तिभेद उपलक्षित होतात. कारण स्फटिकाच्या स्वच्छता या स्वभावाप्रमाणें प्रज्ञानघनाला स्वच्छस्वाभाव्य आहे व स्व-यंज्योतिष्ट्व आहे. ( त्यामुळें एकाचें नानारूपत्व मिथ्या आहे, याविषयीं दृष्टान्त नाहीं, या म्हणण्यांत कांहीं अर्थ नाहीं. ) ज्याप्रमाणें आदित्यादि ज्योति आपल्या निरनिराळ्या अवभास्य--प्रकाश्य पदार्थांशीं संयुक्त हो-त्साती हिरवा, निळा, पिवळा, लाल, इत्यादि भेदांनीं वस्तुतः विभाग पावण्यास--विभक्त होण्यास अयोग्य असूनही त्या त्या आकारानें प्रका-शित होते त्याचप्रमाणें आत्मज्योति सर्व जगाला व चक्षुरादि इंद्रियांना प्रकाशमान करणारी होत्साती त्यांच्या त्यांच्या आकाराची होते.

तथा चोक्तमात्मनैवायं ज्योतिषाऽऽस्त इत्यादि । न च निरवय-वेष्वनेकात्मता शक्यते कल्पयितुम् । दृष्टान्ताभावात् । यदप्याकाशस्य सर्वगतत्वादिधर्मभेदः परिकल्प्यते परमाण्वादीनां च गन्धरसाद्यनेक-गुणत्वं तदपि निरूप्यमाणं परोपाधिनिमित्तमेव भवति ॥

भाष्यार्थ-- ( आत्मा सर्वावभासक आहे, याविषयीं वाक्याच्या उपक्रमाचेंच प्रमाण देतात--) 'आत्मना एवायं ज्योतिषा आस्ते-' हा त्यावेळीं आत्मज्योतीनेंच राहतो, इत्यादि वर सांगितलेंच आहे. ( निर-

वयव पदार्थांच्या नानारूपत्वाचें अनुमान करावें, असें जें वाद्याचें ह्मणणें आहे त्याविषयीं सांगतात--) निरवयव पदार्थांमध्यें अनेकरूपत्वाची कल्पना करितां येणें शक्य नाहीं. कारण तशी कल्पना करण्यास दृष्टान्त नाहीं. (आकाश, परमाणु इत्यादिकांचे दृष्टान्त घाल तर ते बरोबर नाहींत, असें सांगतात--) आतां आकाशाचा सर्वगतत्वादि धर्मभेद जो कल्पिला जातो किंवा परमाणु इत्यादिकांचें गंध रसादि अनेक गुणत्व कल्पिलें जातें त्याचेंही निरूपण करूं लागलें असतां तेंही [ म्ह० आकाशाचें सर्वगतत्वादिक व परमाण्वादिकांचें गंधरसादिगुणत्व ] परोपाधिनिमित्त--दुसऱ्या उपाधीच्या निमित्तानेंच आहे, असें सिद्ध होतें.

आकाशस्य तावत्सर्वगतत्वं नाम न स्वतो धर्मोऽस्ति । सर्वोपाधिसंश्रयाद्धि सर्वत्र स्वेन रूपेण सत्त्वमपेक्ष्य सर्वगतत्वव्यवहारो न त्वाकाशः क्वचिद्गतो वाऽगतो वा स्वतः । गमनं हि नाम देशान्तरस्थस्य देशान्तरेण संयोगकारणम् । सा च क्रिया नैवाविशेषे संभवति एवं धर्मभेदा नैव सन्त्याकाशे ॥

भाष्यार्थ--(आकाशाचें अनेकधर्मवत्त्व औपाधिक कसें ? अशी आशंका घेऊन अगोदर त्याच्या सर्वगतत्वाचेंच औपाधिकत्व सिद्ध करितात--) सर्वगतत्व हा कांहीं आकाशाचा स्वाभाविक धर्म नव्हे. सर्व पदार्थ या उपाधीच्या आश्रयत्वामुळेंच आकाशाचें स्वतःच्या रूपानें जें सर्वत्र सत्त्व, त्या सत्त्वाच्या--विद्यमानतेच्या अपेक्षेनें त्याच्या सर्वगतत्वाचा व्यवहार होतो. [ म्ह० तें सर्वत्र विद्यमान आहे. त्यामुळेंच त्याला सर्वगत म्हटलें जातें. अर्थात् सर्व या उपाधीमुळें तसा व्यवहार होतो.] वस्तुतः आकाश स्वतः कोठें गेलेलें अथवा न गेलेलें असें नाहीं. कारण गमन एका प्रदेशांत असलेल्या पदार्थाचा दुसऱ्या प्रदेशाशीं होणारा जो संयोग त्याचें कारण असतें. तें संयोगकारणरूप गमन ही क्रिया आहे. ती अविशेष--निरवयव वस्तूमध्यें संभवत नाहीं. (क्रिया

सावयव वस्तूंतच संभवते, हें प्रसिद्ध आहे. ) याप्रमाणें निरवयव आकाशांत क्रिया जशी संभवत नाहीं त्याचप्रमाणें इतर धर्मभेदही आकाशांत संभवत नाहींत. (कारण ते इतर धर्म क्रियापूर्वक असतात. निरवयव आकाशांत क्रियाच संभवत नसल्यामुळें इतर धर्मही संभवत नाहींत, असा भावार्थ. )

तथा परमाण्वादावपि । परमाणुर्नाम पृथिव्या गन्धघनायाः परमसूक्ष्मोऽवयवो गन्धात्मक एव । न तस्य पुनर्गन्धवत्त्वं नाम शक्यते कल्पयितुम् ॥

भाष्यार्थ—( हाच न्याय परमाण्वादिकांस लागू आहे, असें सांगतात–) त्याचप्रमाणें परमाण्वादिकांत सुद्धां धर्मभेद संभवत नाहीं. परमाणु म्हणजे गंधघन–गंधपूर्ण अशा पृथिवीचा अति सूक्ष्म अवयव; तो तर गंधात्मकच असतो. त्यामुळें त्याचा पुनः गंधवत्त्व हा दुसरा धर्म कल्पितां येत नाहीं. ( कारण पार्थिवत्व या धर्माहून गंधवत्त्व हा धर्म निराळा आहे, अशी कल्पना करण्यास कांहीं प्रमाण नाहीं. )

अथ तस्यैव रसादिमत्त्वं स्यादिति चेन्न । तत्राप्यबादिसंसर्गनिमित्तत्वात् । तस्मान्न निरवयवस्यानेकधर्मवत्त्वे दृष्टान्तोऽस्ति ॥

भाष्यार्थ—( आतां वैशेषिकांच्या परिभाषेचा आश्रय करून शंका घेतात–) 'अहो पण त्या पार्थिव परमाणूलाच रसादिमत्त्व असतें, ( त्यामुळें गंधवत्त्वही पार्थिवत्वाहून भिन्न आहे, )' म्हणून म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण पार्थिव परमाणूमध्यें रसादिमत्त्व जें उपलब्ध होतें तें अनौपाधिक-स्वाभाविक आहे, असें म्हणतां येत नाहीं. कारण पार्थिव परमाणूंत जलादिसंसर्गामुळेंच रसादिमत्त्व उपलब्ध होतें. तस्मात् निरवयव पदार्थाला अनेक धर्मवत्त्व असतें याविषयीं दृष्टान्तच नाहीं.

एतेन दृगादिशक्तिभेदानां पृथक्चक्षूरूपादिभदेन परिणामभेदकल्पना परमात्मनि प्रत्युक्ता ॥ २४–३०॥

भाष्यार्थ—परमात्म्यामध्यें दृष्टि, घ्राति, इत्यादि निरानिराळ्या शक्ति आहेत. त्यांतील दृक्-शक्ति चक्षूरूपानें व रूपाच्या आकारानें पृथक्-च परिणत होते, घ्रातिशक्ति घ्राणरूपानें व गंधरूपानें पृथक् परिणत होते इत्यादि क्रमानें मतृप्रपंचांनीं परमात्म्यामध्यें जी परिणामकल्पना केली आहे तीही परमात्मा एकरूप आहे, या उपपादनानें निरस्त केली आहे असें समजावें. ( त्या कल्पनेचें निरसन या उपपादनानें झालें आहे, असें समजावें. ) २४-३०.

यत्र वा अन्यदिव स्यात्तत्रान्योऽन्यत्पश्येद-
न्योऽन्यज्जिघ्रेदन्योऽन्यद्रसयेदन्योऽन्यद्वदे-
दन्योऽन्यच्छृणुयादन्योऽन्यन्मन्वीतान्योऽ-
न्यत्स्पृशेदन्योऽन्याद्विजानीयात् ॥ ३१ ॥

अर्थ—ज्या जागरित किंवा स्वप्न दशेंत आत्म्याहून भिन्न वस्तूशी होते त्या अवस्थेंत आपल्याला अन्यसा मानणारा प्रमाता अन्य वस्तु पाहतो, त्याचप्रमाणें अन्य अन्याचा वास घेतो, अन्य अन्याचा रस चाखतो, अन्य अन्य वक्तव्य बोलतो, अन्य स्वतःहून भिन्न शब्दाला ऐकतो, अन्य अन्य मन्तव्याचें मनन करितो, अन्य अन्य पदार्थाला स्पर्श करितो व अन्य अन्याला जाणतो. ३१.

जाग्रत्स्वप्नयोरिव यद्विजानीयात्तद्द्वितीयं प्रविभक्तमन्यत्वेन नास्तीत्युक्तमतः सुषुप्ते न विजानाति विशेषम् । ननु यद्यस्यायमेव स्वभावः किंनिमित्तमस्य विशेषविज्ञानं स्वभावपरित्यागेन । अथ विशेषविज्ञानमेवास्य स्वभावः कस्मादेष विशेषं न विजानातीति ॥

भाष्यार्थ —जाग्रत् व स्वप्न या अवस्थांमध्यें जसें त्याप्रमाणें सुषुप्तींतही पुरुष ज्याला जाणील अशी दुसरी--अन्यत्वानें अगदीं विभक्त झालेली वस्तु नाहीं, असें सांगितलें. त्यामुळें सुषुप्तींत तो विशेषाला जाणत नाहीं. ( याप्रमाणें गतार्थाचा अनुवाद करून उत्तर कंडिकेनें

ज्या शंकेचें निरसन करावयाचें आहे ती शंका दाखवितात--) अहो पण या पुरुषाचा–आत्म्याचा जर हाच स्वभाव आहे, तर त्या स्वभावाचा परित्याग करून याला जें विशेष विज्ञान होतें तें कोणत्या निमित्तानें ? बरें विशेष विज्ञान हाच याचा स्वभाव आहे, म्हणून म्हणावें तर हा सुषुप्तींत विशेषाला कां जाणत नाहीं ?[1]

उच्यते शृणु । यत्र यस्मिञ्जागरिते स्वप्ने वा अन्यदिवाऽऽत्मनो वस्त्वन्तरमिवाविद्यया प्रत्युपस्थापितं भवति तत्र तस्मादविद्याप्रत्युपस्थापितादन्योऽन्यमिवाऽऽत्मानं मन्यमानोऽसत्यात्मनः प्रविभक्ते वस्त्वन्तरेऽसति चाऽऽत्मनि ततः प्रविभक्तेऽन्योऽन्यत्पश्येदुपलभेत । तच्च दर्शितं स्वप्ने प्रत्यक्षतो घ्नन्तीव जिनन्तीवेति । तथाऽन्योऽन्यज्जिघ्रेद्रसयेद्वदेच्छृणुयान्मन्वीत स्पृशेद्विजानीयादिति ॥३१॥

भाष्यार्थ—( चिन्मात्रज्योति प्रत्यगात्म्याचें विशेषविज्ञानराहित्य हेंच स्वरूप आहे. तथापि आत्माच्या अज्ञानाख्य अविद्येनें कल्पिलेल्या विशेषांच्या विज्ञानानें जाग्रत् व स्वप्न या अवस्था सिद्ध होतात, असें पुढील वाक्याच्या आश्रयानें उत्तर देतात– ) या शंकेचें समाधान सांगितलें जात आहे तें ऐक– ' यत्र- ' ज्या जागरावस्थेंत किंवा स्वप्नांत ' अन्यदिव- ' आत्म्याहून भिन्न वस्तु असें होतें, अविद्येनें आत्मभिन्न वस्तु प्रत्युपस्थापित होते ' तत्र- ' त्या अवस्थेंत ' अन्यः- ' आपल्याहून अगदीं विभक्त अशी दुसरी वस्तु नसतांना व त्या वस्तूहून अगदीं विभक्त असा आपण–आत्मा नसतांना आपल्याला त्या अविद्याप्रत्युपस्थापित वस्तूहून अन्यसा मानणारा अन्य प्रमाता ' अन्यत्- ' दुसरी वस्तु ' पश्येत् ' पाहतो, त्याला दुसरी वस्तु उपलब्ध होते, आणि ही गोष्ट स्वप्नांतील 'घ्नन्तीव-'

---

१ विशेषविज्ञानराहित्य हें आत्म्याचें स्वरूप आहे कीं विशेषविज्ञानवत्त्व हें आत्म्याचें स्वरूप आहे ? यांतील पहिल्यापक्षीं जाग्रत् व स्वप्न यांची अनुपपत्ति होते आणि दुसऱ्या पक्षीं सुषुप्तीची असिद्धि होते, असा भावार्थ.

जणुं काय मारतो, 'जिनन्तीव' जणुं काय वश करून घेतो, या अनुभवावरून वर दाखविली आहे. त्याचप्रमाणें अन्य अन्याचा वास घेतो, रस घेतो, बोलतो, ऐकतो, मनन करतो, स्पर्श करतो व जाणतो ३१.

सलिल एको द्रष्टाऽद्वैतो भवत्येष ब्रह्मलोकः सम्राडिति हैनमनुशशास याज्ञवल्क्य एषाऽस्य परमा गतिरेषाऽस्य परमा संपदेषोऽस्य परमो लोक एषोऽस्य परम आनन्द एतस्यैवाऽऽनन्दस्यान्यानि भूतानि मात्रामुपजीवन्ति ॥ ३२ ॥

अर्थ--ज्याप्रमाणें जलांत त्याप्रमाणें सुषुप्तींत एक द्रष्टा अद्वैत होतो. हा ब्रह्मलोक आहे, 'हे सम्राट्,' असें संबोधून याज्ञवल्क्य जनकाला असें अनुशासन करता झाला. ही याची परमा गति, ही याची परमा संपत्, हा याचा परम लोक, हा याचा परम आनन्द. याच आनंदाच्या मात्रेवर--कलेवर अन्य भूतें आपली उपजीविका करितात ३२.

यत्र पुनः साऽविद्या सुषुप्ते वस्त्वन्तरप्रत्युपस्थापिका शान्ता तेनान्यत्वेनाविद्याप्रविभक्तस्य वस्तुनोऽभावात्तत्केन कं पश्येज्जिघ्रेद्विजानीयाद्वा। अतः स्वेनैव हि प्राज्ञेनाऽऽत्मना स्वयंज्योतिःस्वभावेन संपरिष्वक्तः समस्तः संप्रसन्न आप्तकाम आत्मकामः सलिलवत्स्वच्छीभूतः सलिल इव सलिल एको द्वितीयस्याभावात्। अविद्यया हि द्वितीयः प्रविभज्यते। सा च शान्ताऽत्रात एको द्रष्टा दृष्टेरविपरिलुप्तत्वादात्मज्योतिःस्वभावाया अद्वैतो द्रष्टव्यस्य द्वितीयस्याभावात्। एतदमृतमभयमेष ब्रह्मलोको ब्रह्मैव लोको ब्रह्मलोकः पर एवायमस्मिन्काले व्यावृत्तकार्यकरणोपाधिभेदः स्व आत्मज्योतिषि शान्तसर्वसंबन्धो वर्तते॥

भाष्यार्थ— पण तेंच, ज्या सुषुप्तांत दुसऱ्या वस्तूला प्रत्युपस्थापित करणारी अविद्या शान्त झालेली असते त्या अवस्थेंत अविद्या शांत झाल्यामुळें अविद्येनें अन्यत्वानें अगदीं विभक्त केलेल्या वस्तूचा [ दुसऱ्या वस्तूचा ] अभाव झाल्यामुळें कोणत्या साधनानें कोणाला पाहणार, हुंगणार किंवा जाणणार ? यास्तव पूर्वी सांगितल्याप्रमाणें स्वतः स्वयंज्योतिःस्वरूप प्राज्ञ आत्म्याकडून संपरिष्वक्त झालेला—प्राज्ञ आत्म्याशीं एकरूप झालेला त्यामुळें समस्त—अपरिच्छिन्न—अपरिच्छिन्न-त्वामुळेंच संप्रसन्न, कारण तो आप्तकाम—पूर्णकाम आत्मकाम जला-प्रमाणें अगदीं स्वच्छ असलेला, असा असतो. ( याच अर्थीं वाक्यां-तील अक्षरांची योजना करितात—) 'सलिल एको द्रष्टा-' जसें जल स्वच्छ तसा, एक कारण दुसऱ्याचा अभाव असतो. (सुषुप्तांत दुसऱ्याचा अभाव व्यक्त करितात– ) अविद्येकडून दुसरा अत्यंत भिन्न केला जातो. पण सुषुप्तींत ती अविद्या तर शांत झालेली असते. यास्तव तो एक, आत्मज्योतिःस्वरूप दृष्टि अविनाशी असल्यामुळें द्रष्टा 'अद्वैतः-' दुसरें द्रष्टव्य नसल्यामुळें अद्वैत ' भवति– ' होतो. ( त्यालाच परम पुरुषार्थत्व आहे, असें दाखविणारे भाष्यकार त्याचें कूटस्थत्व सांगतात–) हें अमृत अभय आहे. ' एष ब्रह्मलोकः- ' हा ब्रह्मलोक; ( ब्रह्मलोक हा कर्मधारय समास आहे, षष्ठीतत्पुरुष नव्हे, असें सुचविण्यासाठीं ब्रह्मलोकशब्दाचा विग्रह करितात– ) ब्रह्म हाच लोक ब्रह्मलोक. कारण या वेळीं हा परब्रह्मच असतो. शरीरेंद्रियरूप उपाधिभेदापासून व्यावृत्त झालेला व ज्याचे सर्व संबंध शांत झाले आहेत असा हा त्या-वेळीं स्वतःच्या आत्मज्योतीमध्यें राहतो.

हे सम्राडिति हैवं हैनं जनकमनुशशासानुशिष्टवान्याज्ञवल्क्य इति श्रुतिवचनमेतत् । कथं वाऽनुशशास । एषाऽस्य विज्ञानमयस्य परमा गतिः । यास्त्वन्या देहग्रहणलक्षणा ब्रह्मादिस्तम्बपर्यन्ता अविद्याक-

१ संप्रसन्नत्व स्पष्ट करण्यासाठीं हा जलाचा दृष्टान्त दिला आहे.

ल्पितास्ता गतयोऽतोऽपरमा अविद्याविषयत्वात् । इयं तु देवत्वादि-गतीनां कर्मविद्यासाध्यानां परमोत्तमा यः समस्तात्मभावो यत्र नान्यत्पश्यति नान्यच्छृणोति नान्यद्विजानातीति ॥

भाष्यार्थ—( श्रुति म्हणते— ) 'हे सम्राड्' असें म्हणून 'याज्ञवल्क्य' 'एनं' त्या जनकाला असें अनुशासन -उपदेश करता झाला. हें श्रुतीचें वचन आहे. तें कसें अनुशासन करिता झाला? 'एषास्य परमा गतिः-' ही या विज्ञानमयाची परम गति आहे. ( गतीचें परमत्व सिद्ध करितात - ) ज्या दुसऱ्या शरीरग्रहणरूप ब्रह्मादिस्तंबपर्यंत गति त्या अविद्याकल्पित आहेत. त्यामुळें त्या अपरम होत. कारण त्यांना अविद्याविषयत्व आहे. पण ही कर्म व उपासना यांनीं साध्य असलेल्या देवत्वादिगतींमध्यें 'परमा' उत्तम आहे. ही म्हणजे जो हा समस्त आत्मभाव. ज्या सर्वात्मभावदर्शेत 'दुसरें पहात नाहीं, दुसरें ऐकत नाहीं, व दुसरें जाणत नाहीं.' (असें श्रुतीनें सांगितलें आहे.)

एषैव च परमा संपत्सर्वासां संपदां विभूतीनामियं परमा स्वाभाविकत्वादस्याः कृतका ह्यन्याः संपदः । तथैषोऽस्य परमो लोकः । येऽन्ये कर्मफलाश्रया लोकास्तेऽस्मादपरमाः । अयं तु न केनचन कर्मणा मीयते स्वाभाविकत्वादेषोऽस्य परमो लोकः ॥

भाष्यार्थ—'एषास्य परमा संपत्-' ही याची 'परमा' संपत् आहे. सर्व संपदांतील—विभूतींतील ही श्रेष्ठ आहे. कारण हिला स्वाभाविकत्व आहे; व इतर संपत्ति कृतक आहेत. त्याचप्रमाणें 'एषोऽस्य परमो लोकः-' हा याचा परम लोक आहे. जे दुसरे कर्मफलाश्रयभूत लोक ते याहून अपरम आहेत. कारण हा लोक कोणत्याही कर्मानें परिच्छिन्न केला जात नाहीं, कोणत्याही कर्मानें साध्य होत नाहीं. कारण त्या लोकाला स्वाभाविकत्व आहे. म्हणून हा याचा परम लोक आहे.

तथैषोऽस्य परम आनन्दः । यान्यन्यानि विषयेन्द्रियसंबन्धजनितान्यानन्दजातानि तान्यपेक्ष्यैषोऽस्य परम आनन्दो नित्यत्वात् । "यो वै भूमा तत्सुखम्" इति श्रुत्यन्तरात् । यत्रान्यत्पश्यत्यन्यद्विजानाति तदल्पं मर्त्यममुख्यं सुखमिदं तु तद्विपरीतम् । अत एव एषोऽस्य परम आनन्दः । एतस्यैवाऽऽनन्दस्य मात्रां कलामविद्याप्रत्युपस्थापितां विषयेन्द्रियसंबन्धकालविभाव्यामन्यानि भूतान्युपजीवन्ति । कानि तानि तत एवाऽऽनन्दादविद्यया प्रविभज्यमानस्वरूपाण्यन्यत्वेन तानि ब्रह्मणः परिकल्प्यमानान्यन्यानि सन्त्युपजीवन्ति भूतानि विषयेन्द्रियसंपर्कद्वारेण विभाव्यमानाम् ॥३२॥

भाष्यार्थ—त्याप्रमाणें 'एषोऽस्य परम आनन्दः' हा याचा परम आनंद आहे.(सुषुप्तींतील सर्वात्मभावाला परमानन्दत्व आहे, असें विशद करितात—) विषय व इंद्रियें यांच्या संबंधापासून उत्पन्न झालेले जे दुसरे सर्व आनंद त्यांच्या अपेक्षेनें हा याचा परम आनन्द आहे. कारण याला नित्यत्व आहे. 'यो वै भूमा तत्सुखं' अशी दुसरी श्रुति आहे. 'यत्रान्यत्पश्यति०-' ज्या अवस्थेंत स्वत:हून अन्य वस्तूला पाहतो, अन्य वस्तूला जाणतो, तें अल्प, मर्त्य, अमुख्य सुख आहे. पण हें तर त्याच्या विपरीत आहे. म्हणूनच हा याचा परम आनंद आहे. (वैषयिक सुख एक व आत्मरूप सुख दुसरें, असें येथें सुखाचें द्वैविध्य नसून विषयेंद्रियसंयोगामुळें होणारें सुख अमुख्य व आत्मसुख मुख्य, अशी या सुखाची व्यवस्था जरी लाविली आहे तरी वस्तुतः विषयसुख हें आत्मसुखाहून निराळें सुखच नव्हे, असें दाखवितात—) 'एतस्यैव आनंदस्य०-' याच आनंदाच्या 'कलां-' कलेस—कलेवर अविद्येनें प्रत्युपस्थापित केलेल्या, विषय व इंद्रियें यांच्या संबंधाचे वेळीं प्रतीत होणाऱ्या, आनंदाच्या कलेवर 'अन्यानि भूतानि-' दुसरीं भूतें उपजीविका करितात.( 'अहोपण ब्रह्माहून अतिरिक्त चेतनाचाच अभाव असल्यामुळें

१ आत्म्याला अमर्याद आनन्दत्व आहे, याविषयीं छान्दोग्य श्रुतीची संमति दाखविण्यासाठीं हें वचन येथें घेतलें आहे.

उपजीविका करणारीं भूतें कोण आहेत ? कोणीच नाहींत,' अशी आशंका घेऊन सांगतात--) तीं उपजीविका करणारीं भूतें कोणतीं ? त्याच ब्रह्माख्य आनंदापासून अविद्येनें ज्यांचें स्वरूप पृथक्त्वानें अगदीं प्रविभक्त आहे, अशीं परिकल्पिलीं जाणारीं भूतें अन्यशीं होऊन विषयें-द्रियसंपर्काच्या द्वारा अनुभवास येणाऱ्या त्या आनंदाच्या कलेवर उपजीविका करितात. ३२.

स यो मनुष्याणाꣳ राद्धः समृद्धो भवत्यन्येषामधिपतिः सर्वैर्मानुष्यकैर्भोगैः संपन्नतमः स मनुष्याणां परम आनन्दोऽथ ये शतं मनुष्याणामानन्दाः स एकः पितॄणां जितलोकानामानन्दोऽथ ये शतं पितॄणां जितलोकानामानन्दाः स एको गन्धर्वलोक आनन्दोऽथ ये शतं गन्धर्वलोक आनन्दाः स एकः कर्मदेवानामानन्दो ये कर्मणा देवत्वमभिसंपद्यन्तेऽथ ये शतं कर्मदेवानामानन्दाः स एक आजानदेवानामानन्दो यश्च श्रोत्रियोऽवृजिनोऽकामहतोऽथ ये शतमाजानदेवानामानन्दाः स एकः प्रजापतिलोक आनन्दो यश्च श्रोत्रियोऽवृजिनोऽकामहतोऽथ ये शतं प्रजापतिलोक आनन्दाः स एको ब्रह्मलोक आनन्दो यश्च श्रोत्रियोऽवृजिनोऽकामहतोऽथैष एव परम आनन्द एष ब्रह्मलोकः

सम्राडिति होवाच याज्ञवल्क्यः सोऽहं भगवते सहस्रं ददाम्यत ऊर्ध्वं विमोक्षायैव ब्रूहीत्यत्र ह याज्ञवल्क्यो बिभयांचकार मेधावी राजा सर्वेभ्यो माऽन्तेभ्य उदरौत्सीदिति ॥ ३३ ॥

अर्थ--तो जो मनुष्यांतील अविकल--समग्रावयव, समृद्ध--उपभोगोपकरणसंपन्न असतो, दुसऱ्या स्वसमान जातीच्या लोकांचा अधिपति असतो, सर्व मनुष्यांच्या भोगसाधनांनीं अत्यंत संपन्न असतो, तोच मनुष्यांचा परम आनंद होय. असे जे मनुष्यांचे शंभर आनंद तो कर्मानें पितृलोकास जिंकलेल्या पितरांचा एक आनंद होय. जे जितलोक पितरांचे शंभर आनंद तो गंधर्वलोकचा एक आनंद. जे शंभर गंधर्वलोकांतील आनंद तो कर्मदेवांचा एक आनंद. जे कर्मानें देवत्वास प्राप्त होतात ते कर्मदेव. जे कर्मदेवांचे शंभर आनंद तो जन्मसिद्ध देवांचा एक आनन्द, तसाच जो निष्पाप, निष्काम श्रोत्रिय त्याचाही आनंद आजानदेवांच्या आनंदाच्या परिमाणाचाच असतो. आजान देवांचे जे शंभर आनंद तो प्रजापतिलोकांतील एक आनंद; व जो निष्पाप निष्काम श्रोत्रिय त्याचाही तो आनंद होय. आतां जे प्रजापतिलोकांतील शत आनंद तो एक ब्रह्मलोकांतील आनन्द. तसाच जो निष्पाप व निष्काम श्रोत्रिय त्याचाही तो आनंद होय. आतां 'हाच परम आनन्द, हे सम्राट्, हा ब्रह्मलोक' असें याज्ञवल्क्य म्हणाला. त्यावर जनक म्हणतो— "मी तुम्हांला सहस्र गाई देतों. आतां या पुढें विमोक्षासाठीं त्याचेंच साधन सांग." तें ऐकून याज्ञवल्क्य भ्याला. हा मेधावी—धारणा शक्तिमान् राजा मला सर्व निर्णयान्तासाठीं अवरोध करीत आहे. ३३

यस्य परमानन्दस्य मात्रा अवयवा ब्रह्मादिभिर्मनुष्यपर्यन्तैर्भूतैरुपजीव्यन्ते तदानन्दमात्राद्वारेण मात्रिणं परमानन्दमधिजिगमयिषन्नाह

सैन्धवलवणशकलैरिव लवणशैलम् । स यः कश्चिन्मनुष्याणां मध्ये राद्धः संसिद्धोऽविकलः समग्रावयव इत्यर्थः । समृद्ध उपभोगोपकरणसंपन्नो भवति । किंचान्येषां समानजातीयानामधिपतिः स्वतन्त्रः पतिर्न माण्डलिकःसर्वैःसमस्तैर्मानुष्यकैरिति दिव्यभोगोपकरणनिवृत्त्यर्थं मनुष्याणामेव यानि भोगोपकरणानि तैः संपन्नानामप्यतिशयेन संपन्नः संपन्नतमः स मनुष्याणां परम आनन्दः । तत्राऽऽनन्दानन्दिनोरभेदनिर्देशान्नार्थान्तरभूतत्वमित्येतत् । परमानन्दस्यैवेयं विषयविषय्याकारेण मात्रा प्रसृतेति ह्युक्तं यत्र वा अन्यदिव स्यादित्यादिवाक्येन । तस्माद्युक्तोऽयं परम आनन्द इत्यभेदनिर्देशः ॥

भाष्यार्थ—( 'स यो मनुष्याणां०' इत्यादि वाक्याचें तात्पर्य सांगतात–) ज्या परमानंदाच्या मात्रा–अवयव ब्रह्मापासून–हिरण्यगर्भापासून मनुष्यापर्यंत भूतांकडून उपभोगिले जातात, त्यांवर उपजीविका केली जाते त्या आनन्दाच्या कलांच्या द्वारा, सैंधव मिठाच्या शकलांच्या योगानें ज्याप्रमाणें मिठाच्या डोंगराचें ज्ञान करवावें त्याप्रमाणें मात्रावान् –कलावान् परमानन्दाचें ज्ञान करून देण्याची इच्छा करणारा पुढील ग्रंथ प्रवृत्त झाला आहे. ( याप्रमाणें तात्पर्य सांगून अक्षरांचें व्याख्यान करितात -) 'स यो मनुष्याणां-' तो जो कोणी मनुष्यांमध्यें 'राद्धः-' संसिद्ध अविकल–समग्र अवयवसंपन्न, असा भावार्थ. 'समृद्धः-' उपभोगाच्या उपकरणांनीं संपन्न होतो. इतकेंच नव्हे तर 'अन्येषां-' समान जातीच्या लोकांचा 'अधिपतिः–' स्वतंत्र पति, मांडलिक नव्हे, 'सर्वैर्मानुष्यकैर्भोगैः संपन्नतमः-' समस्त मनुष्यांच्या भोगांनीं अतिशय संपन्न 'मानुष्यकैः' हें विशेषण दिव्य भोगांच्या उपकरणांची निवृत्ति करण्यासाठीं आहे. मनुष्यांचींच जीं भोगोपकरणें त्यांनीं संपन्न अस-

१ राद्धशब्दानें अन्तःसंपत्ति व समृद्धशब्दानें बाह्यसंपत्ति सांगितली आहे, असा भावार्थ. २ कारण दिव्य उपकरणांची निवृत्ति न केल्यास या मानुषानंदाचा गंधर्वादि-आनंदांत अन्तर्भाव होईल, म्हणून मुद्दाम 'मानुष्यकैः' या विशेषणानें त्यांची निवृत्ति केली आहे.

लेल्याही लोकांत अतिशय संपन्न-संपन्नतम 'स मनुष्याणां परम आनन्दः' तो मनुष्यांचा परम आनन्द आहे. येथें आनंद व आनंदवान् यांचा अभेदानें निर्देश केलेला असल्यामुळें आनंदी आत्म्याहून आनंद हा निराळा पदार्थ आहे, असें नाहीं, असा भावार्थ. 'यत्र वा अन्यदिव स्यात्०' या वाक्यानें परमानंदाचीच ही मात्रा विषयाच्या व विषयीच्या आकारानें पसरलेली आहे असें सांगितलें आहे. तस्मात् 'हा परम आनंद आहे', असा अभेदनिर्देश युक्त आहे.

युधिष्ठिरादितुल्यो राजाऽत्रोदाहरणम् । दृष्टं मनुष्यानन्दमादिं कृत्वा शतगुणोत्तरोत्तरक्रमेणोन्नीय परमानन्दं यत्र भेदो निवर्तते तमधिगमयति । अत्रायमानन्दः शतगुणोत्तरोत्तरक्रमेण वर्धमानो यत्र वृद्धिकाष्ठामनुभवति । यत्र गणितभेदो निवर्ततेऽन्यदर्शनश्रवणमननाभावात्तं परमानन्दं विवक्षन्नाह ॥

भाष्यार्थ—( पण असा मनुष्यच दृष्टीं पडत नाहीं, असें कोणी म्हणेल म्हणून सांगतात–) युधिष्ठिरादिकांसारखा राजा हें अशा आनंदाचें उदाहरण आहे. आतां या दृष्ट--अनुभवसिद्ध मनुष्यानन्दाला आदि करून शतपट उत्तरोत्तर आनंदाचा उत्कर्ष दाखविणें या क्रमानें परमानंदाचें अनुमान करून जेथें भेद निवृत्त होतो त्याचें पुढील ग्रंथानें ज्ञान करवून देतात. येथें शतगुण उत्तरोत्तर क्रमानें वाढणारा हा आनंद जेथें वृद्धीच्या पराकाष्ठेस प्राप्त होतो, जेथें अन्य दर्शन, श्रवण,मनन,यांच्या अभावामुळें गणितभेद-संख्येचा व्यवहार–निवृत्त होतो तो परमानन्द आहे, असें सांगण्याच्या इच्छेनें म्हणतात.—

अथ ये मनुष्याणामेवंप्रकाराः शतमानन्दभेदाः स एकः पितृणाम् । तेषां विशेषणं जितलोकानामिति । श्राद्धादिकर्मभिः पितॄंस्तोषयित्वा तेन कर्मणा जितो लोको येषां ते जितलोकाः पितरस्तेषां पितॄणां जितलोकानां मनुष्यानन्दशतगुणीकृतपरिमाण एक आनन्दो भवति ॥

भाष्यार्थ—आतां जे मनुष्यांचे अशा प्रकारचे ( समृद्ध्यादियुक्त )

शंभर आनंदभेद--शंभर निरनिराळे आनंद तो एक पितरांचा आनंद. त्या पितरांचेंच ' जितलोकानां ' हें विशेषण आहे. श्राद्धादि[1] कर्मांनीं पितरांना संतुष्ट करून त्या कर्मानें ज्यांचा लोक जिंकलेला आहे ते जितलोक पितर, त्या जितलोक पितरांचा ज्याचें परिमाण मनुष्यानन्दाच्या शतपट आहे असा एक आनंद आहे.

सोऽपि शतगुणीकृतो गन्धर्वलोक एक आनन्दो भवति । स च शतगुणीकृतः कर्मदेवानामेक आनन्दः । अग्निहोत्रादिश्रौतकर्मणा ये देवत्वं प्राप्नुवन्ति ते कर्मदेवाः । तथैवाऽऽजानदेवानामेक आनन्दः । आजानत एवोत्पत्तित एव ये देवास्त आजानदेवाः । यश्च श्रोत्रियोऽधीतवेदोऽवृजिनो वृजिनं पापं तद्रहितो यथोक्तकारीत्यर्थः । अकामहतो वीततृष्ण आजानदेवेभ्योऽर्वाग्यावन्तो विषयास्तेषु । तस्य चैवंभूतस्याऽऽजानदेवैः समान आनन्द इत्येतदन्वाकृष्यते चशब्दात् ॥

भाष्यार्थ—तो पितरांचा आनंदही शतगुणित केला असतां गंधर्वलोकांतील एक आनंद होतो. तो शतगुणित केला असतां 'कर्मदेवांचा एक आनन्द ' होतो. 'अग्निहोत्रादि श्रौतकर्मानें जे देवत्वास प्राप्त होतात ते कर्मदेव' होत. (जसा शतपट केलेला गंधर्वानंद कर्मदेवांचा एक आनंद होतो ) त्याप्रमाणेंच ' शतगुणित केलेला कर्मदेवांचा आनंद हा आजानदेवांचा एक आनन्द ' होतो. आजानतःच म्हणजे उत्पत्तितःच–जन्मतःच.जे देव असतात ते 'आजान देव' होत; आणि जो 'श्रोत्रिय' म्ह० वेदाचें अध्ययन केलेला ' अवृजिनः–' वृजिन म्ह० पाप त्यानें रहित म्हणजे यथाविधि आचरण करणारा, असा भावार्थ, 'अकामहतः ' आजान देवांच्या अलीकडे जितके विषय आहेत त्या सर्वांविषयीं तृष्णाशून्य, त्या अशा प्रकारच्या म्ह० दोन विशेषणांनीं विशिष्ट अशा श्रोत्रियाचा आनंद आजान देवांच्या आनंदाशीं समान असतो, अशी अनुवृत्ति करून श्रोत्रियवाक्याची प्रकृत वाक्याशीं संगति लावावी. कारण 'यश्च श्रोत्रियो०-' असा तेथें 'च' शब्द आहे.

---

१ येथील आदिशब्दानें पिंडपितृयज्ञादिक कर्मे घ्यावीं.

तच्छतगुणीकृतपरिमाणः प्रजापतिलोक एक आनन्दो विराट्शरीरे। तथा तद्विज्ञानवाञ्श्रोत्रियोऽधीतवेदश्चावृजिन इत्यादि पूर्ववत्। तच्छतगुणीकृतपरिमाण एक आनन्दो ब्रह्मलोके हिरण्यगर्भात्मनि। यश्चेत्यादि पूर्ववदेव। अतः परं गणितनिवृत्तिः। एष परम आनन्द इत्युक्तः॥

भाष्यार्थ—त्या आजान देवांचा आनन्द शंभरपट केला असतां त्याचें जें परिमाण होतें त्या परिमाणाचा प्रजापतिलोकांतील म्ह० विराट्शरीरांतील[1] एक आनन्द असतो. (ज्याप्रमाणें विराडात्म्यामध्यें आजान देवांचा आनंद शतगुणित केला असतां एक आनंद होतो) त्याप्रमाणें वेदाध्यायी, निष्पाप व निष्काम अशा विराडात्मोपासकाचा आनंद विराडात्म्याच्या आनंदासारखा असतो, इत्यादि पूर्वीप्रमाणें जाणावें. त्या आनंदाच्या शतपट परिमाणाचा एक आनन्द ब्रह्मलोकीं म्ह० हिरण्यगर्भात्म्यामध्यें असतो. 'यश्च श्रोत्रियोऽवृजिनो०-' इत्यादिकाचा अर्थ पूर्वी केलेल्या अर्थाप्रमाणेंच [म्ह० श्रोत्रियत्वादि विशेषणांनीं विशिष्ट असलेल्या हिरण्यगर्भोपासकाचा आनंद हिरण्यगर्भाच्या आनंदाइतकाच असतो.] या पुढें आनंदाच्या गणिताची निवृत्ति होते. 'एषोऽस्य परम आनन्दः' असें म्हणून जो आनंद वर सांगितला तो हाच आहे.

यस्य च परमानन्दस्य ब्रह्मलोकाद्यानन्दा मात्रा उदधेरिव विप्रुषः। एवं शतगुणोत्तरोत्तरवृद्ध्युपेता आनन्दा यत्रैकतां यान्ति यश्च श्रोत्रियप्रत्यक्षोऽथैष एव संप्रसादलक्षणः परम आनन्दस्तत्र हि नान्यत्पश्यति नान्यच्छृणोति। अतो भूमा भूमत्वादमृतः। इतरे तद्विपरीताः॥

भाष्यार्थ—(तथापि सुषुप्तींतील सर्वात्मत्वाची उपेक्षा झाली आहे, असें म्हणाल तर तसें नाहीं, असें सांगतात--) समुद्राचे जसे तुषार त्याप्रमाणें ज्या परमानंदाचे ब्रह्मलोकादि आनंद ह्या-मात्रा अवयव-अंश-कला आहेत. याप्रमाणें उत्तरोत्तर शतपट वृद्धीनें युक्त असलेले आनंद

---

१ प्रजापति लोक म्ह० ब्रह्मलोक नव्हे, असें सुचविण्यासाठीं विराट्शरीरांत असें म्हटलें आहे.

ष्यांत एकत्वास प्राप्त होतात, जो श्रोत्रियप्रत्यक्ष आहे, तो हाच संप्रसादलक्षण परम आनंद आहे. त्यांतच दुसरें पहात नाहीं, ऐकत नाहीं, [ म्ह० तो ब्रह्मानन्द अपरिच्छिन्न आहे. ] म्हणूनच तो भूमा (व्यापक), भूमत्वामुळेंच अमृत. इतर त्याच्या विपरीत म्ह० विनाशी.

अत्र च श्रोत्रियत्वावृजिनत्वे तुल्ये । अकामहतत्वकृतो विशेष आनन्दशतगुणवृद्धिहेतुः । अत्रैतानि साधनानि श्रोत्रियत्वावृजिनत्वाकामहतत्वानि तस्य तस्याऽऽनन्दस्य प्राप्तावर्थादभिहितानि । यथा कर्माण्यग्निहोत्रादीनि देवानां देवत्वप्राप्तौ ॥

भाष्यार्थ—( श्रोत्रियादि पदांचें व्याख्यान करून तात्पर्य सांगतात—) वरील तीन विशेषणांतील श्रोत्रियत्व व अवृजिनत्व हीं विशेषणें सर्व पर्यायांत एकसारखींच आहेत. पण अकामहतत्वामुळें होणारा जो विशेष तो आनंदाच्या शतपट वृद्धीचें कारण आहे. ' यश्च श्रोत्रियो०-' इत्यादि वाक्यांत श्रोत्रियत्व, अवृजिनत्व व अकामहतत्व हीं देवांचा आनंद, प्रजापतीचा आनंद इत्यादि त्या त्या आनंदाच्या प्राप्तीविषयीं अर्थात् साधनें सांगितलीं आहेत. ( अर्थात् सांगितलेलीं असणें याविषयीं दृष्टान्त—) जशीं अग्निहोत्रादि कर्में देवांच्या देवत्वप्राप्तीचीं साधनें आहेत, ( त्याप्रमाणें श्रोत्रियत्वादिक हीं त्या त्या पूर्वोक्त आनंदाच्या प्राप्तीचीं साधनें आहेत, असा भावार्थ. )

तत्र च श्रोत्रियत्वावृजिनत्वलक्षणे कर्मणी अधरभूमिष्वपि समाने इति नोत्तरानन्दप्राप्तिसाधने अभ्युपेयेते ॥ अकामहतत्वं तु वैराग्यतारतम्योपपत्तेरुत्तरोत्तरभूम्यानन्दप्राप्तिसाधनमित्यवगम्यते ॥

भाष्यार्थ—( ' अहो पण श्रोत्रियत्वादि तीन साधनें सर्व पर्यायांत एकसारखींच सांगितलेलीं असतांना त्यांतील पहिलीं दोन सर्वत्र सारखींच व तिसऱ्यामध्यें मात्र विशेष आहे, असें कसें म्हणतां ? कारण श्रोत्रियत्व व अवृजिनत्व हीं दोन साधनें मनुष्य, जितलोक पितर, गंधर्व व कर्मदेव या भूमिकांमध्यें श्रुत नाहींत. त्यामुळें अकामहतत्वाप्रमाणेंच तींही

आनंदाच्या उत्कर्षास कारण होतात, अशी आशंका घेऊन सांगतात–) त्या तीन साधनांतील श्रोत्रियत्वरूप व अवृजिनत्वरूप कर्में पूर्व भूमींमध्येंही समान आहेत. त्यामुळें तीं पुढील आनन्दाच्या प्राप्तीचीं साधनें मानलीं जात नाहींत. ( वेदाध्ययन व निष्पापत्व यांनीं रहित असलेला पुरुष सार्वभौमादि सुख घेऊं शकत नाहीं. अर्थात् तीं सर्व ठिकाणीं समान असल्यामुळें आनंदातिरेकाच्या प्राप्तीचें असाधारण साधन नव्हे, असा भावार्थ. )

(आतां 'अकामहतत्व' यांतील विशेषाचें उपपादन करितात–)पण वैराग्याच्या न्यूनाधिक्याचा संभव असल्यामुळें अकामहतत्व हें उत्तरोत्तर भूमींतील आनंदाच्या प्राप्तीचें साधन आहे, असें अवगत होतें. ( पूर्व पूर्व भूमीविषयींचें वैराग्य उत्तरोत्तर भूमींतील आनंदाच्या प्राप्तीचें साधन आहे. कारण त्याच्या मध्यें न्यूनाधिक्यानें परम काष्ठा संभवते. त्यामुळें निरतिशय वैराग्य हें परमानन्दाच्या प्राप्तीचें साधन होऊं शकतें. )

स एष परम आनन्दो वितृष्णश्रोत्रियप्रत्यक्षोऽधिगतः । तथा च वेदव्यासः—"यच्च कामसुखं लोके यच्च दिव्यं महत्सुखम् । तृष्णाक्षयसुखस्यैते नार्हतः षोडशीं कलाम्" इति ॥

भाष्यार्थ—( 'यश्च श्रोत्रियो०-' इत्यादि वाक्याचें तात्पर्य सांगून प्रकृत परमानंदाविषयीं विद्वानाचा अनुभव हेंच प्रमाण देतात–) तो हा परम आनंद विरक्त श्रोत्रियाच्या प्रत्यक्ष अनुभवास येतो हें ज्ञात झालें. ( निरातिशय अकामहतत्व हें परमानन्दाच्या प्राप्तीचें कारण आहे, याविषयीं प्रमाण सांगतात–) याविषयीं वेदव्यासांनीं 'यच्च कामसुखं लोके०' इत्यादि वाक्यांत तसें म्हटलें आहे. 'जें या व्यवहारांत कामसुख आहे व जें दिव्य महत्सुख आहे तीं दोन्ही सुखें या तृष्णाक्षयसुखाच्या सोळाव्या कलेलाही पात्र होत नाहींत'.

एष ब्रह्मलोको हे सम्राडिति होवाच याज्ञवल्क्यः । सोऽहमेवमनुशिष्टो भगवते तुभ्यं सहस्रं ददामि गवाम् । अत ऊर्ध्वं विमोक्षायैव ब्रूही-

ति व्याख्यातमेतत् । अत्र ह विमोक्षायेत्यस्मिन्वाक्ये याज्ञवल्क्यो बिभयांचकार भीतवान् ॥

भाष्यार्थ—'एष ब्रह्मलोकः०-' हे राजा, हा प्रकृत प्रत्यग्भूत परमानन्द ब्रह्मलोक आहे, असें याज्ञवल्क्य म्हणाला. 'सोऽहं भगवते०-' तो मी, याप्रमाणें अनुशासन केला गेलेला, पूज्य अशा तुला सहस्र गायी देतों. 'अत ऊर्ध्वं०-' यापुढें विमोक्षासाठींच सांग, या वाक्याचें सविस्तर व्याख्यान वर (पृ. १३६,१४६.) केलें आहे. 'अत्र ह-' पण 'विमोक्षासाठीं सांग' असें जनकानें येथें म्हटलें, तें वाक्य ऐकून 'याज्ञवल्क्यो बिभयांचकार-' याज्ञवल्क्य भ्याला.

याज्ञवल्क्यस्य भयकारणमाह श्रुतिः । न याज्ञवल्क्यो वक्तृत्वसामर्थ्याभावाद्भीतवानज्ञानाद्वा किं तर्हि मेधावी राजा सर्वेभ्यो मा मासन्तेभ्यः प्रश्ननिर्णयावसानेभ्य उदरौत्सीदावृणोदवरोधं कृतवानित्यर्थः । यद्यन्मया निर्णीतं प्रश्नरूपं विमोक्षार्थं तत्तदेकदेशत्वेनैव कामप्रश्नस्य गृहीत्वा पुनः पुनर्मां पर्यनुयुङ्क्त एव मेधावित्वादित्येतद्भयकारणं सर्वं मदीयं विज्ञानं कामप्रश्नव्याजेनोपादित्सतीति ॥ ३३ ॥

भाष्यार्थ—श्रुति याज्ञवल्क्याच्या भयाचें कारण सांगते—याज्ञवल्क्य आपल्यामध्यें वक्तृत्वसामर्थ्य नाहीं म्हणून भ्याला नाहीं किंवा त्याला मोक्षसाधनाचें ज्ञान नव्हतें म्हणून भ्याला नाहीं. तर काय? 'मेधावी राजा-' अतिशय बुद्धिमान् राजा 'मा-' मला 'सर्वेभ्योऽन्तेभ्यः-' सर्व प्रश्नांच्या निर्णयांचें अवसान- समाप्ति करण्यासाठीं 'उदरौत्सीदिति-' अवरोध करीत आहे, म्हणून असा भावार्थ. (म्हणून भ्यावयास काय झालें? तें सांगतात—) मी विमोक्षासाठीं ज्या ज्या प्रश्नरूपाचा निर्णय केला तो तो कामप्रश्नाचा एकदेश आहे, असें समजून अतिशय बुद्धिमत्त्वामुळें मला पुनः पुनः प्रश्न करीत आहेच. माझें सर्व विज्ञान कामप्रश्नाच्या मिषानें काढून घेण्याची इच्छा करीत आहे, हें भयाचें कारण होय. ३३.

स वा एष एतस्मिन्स्वप्नान्ते रत्वा चरित्वा

दृष्ट्वैव पुण्यं च पापं च पुनः प्रतिन्यायं
प्रतियोन्याद्रवति बुद्धान्तायैव ॥ ३४ ॥

अर्थ—तोच हा या स्वप्नान्तांत रत होऊन, विहार करून, पुण्यफल व पापफल यांना नुस्तें पाहूनच पुनः गेल्या मार्गानें व यथास्थान बुद्धान्तासाठींच परत येतो ३४.

अत्र विज्ञानमयः स्वयंज्योतिरात्मा स्वप्ने प्रदर्शितः । स्वप्नान्त-बुद्धान्तसंचारेण कार्यकरणव्यतिरिक्तता । कामकर्मप्रविवेकश्चासङ्गतया महामत्स्यदृष्टान्तेन प्रदर्शितः । पुनश्चाविद्याकार्यं स्वप्न एव घ्नन्तीवे-त्यादिना प्रदर्शितम् । अर्थादविद्यायाः सतत्त्वं निर्धारितमतद्धर्माध्यारो-पणरूपत्वमनात्मधर्मत्वं च । तथा विद्यायाश्च कार्यं प्रदर्शितं सर्वात्मभावः स्वप्न एव प्रत्यक्षतः सर्वोऽस्मीति मन्यते सोऽस्य परमो लोक इति । तत्र च सर्वात्मभावः स्वभावोऽस्य ॥

भाष्यार्थ—('स वा एष एतस्मिन्० ' इत्यादि पुढील ग्रंथाचा संबंध सांगण्यासाठीं मागील ग्रंथाचा अनुवाद करितात--) 'अत्रायं पुरुषः स्वयंज्योतिर्भवति-' या वाक्यांत विज्ञानमय आत्मा स्वप्नावस्थेंत स्वयं-ज्योति असल्याचें दाखविलें आहे. स्वप्नान्त व बुद्धान्त यांतील संचारानें त्याची कार्य-करणव्यतिरिक्तता दाखविली. महामत्स्याच्या दृष्टान्तानें असंगत्वामुळें काम-कर्मप्रविवेक—कामकर्मभिन्नत्व—दाखविला. पुनः स्वप्नां-तच अविद्याकार्य ' घ्नतीव० ' इत्यादि वाक्यानें प्रदर्शित केलें. अर्थात् त्या अविद्येच्या कार्याचें प्रदर्शन करून अविद्येच्या स्वरूपाचा निश्चय केला. (तें स्वरूप कोणतें तें सांगतात—) अनात्मधर्मांचा आत्म्यावर आरोप करणें, हें अविद्येचें स्वरूप आहे. तसेंच आत्म्याच्या ठिकाणीं चैतन्याप्रमाणें स्वाभाविकपणें नसणें हेंही अविद्येचें स्वरूप आहे. [ म्ह० अविद्येला अनात्मधर्मत्व आहे, हेंही सांगितलें.] अविद्याकार्याप्रमा-णेंच सर्वात्मभाव हें विद्येचें कार्य स्वप्नांतच 'सर्वोऽस्मीति मन्यते सोऽस्य

परमो लोकः-' अशा वाक्यानें (पृ. १६१ पहा) प्रत्यक्षतः प्रदर्शित केलें. तेथें सर्वात्मभाव हा याचा स्वभाव आहे.

एवमविद्याकामकर्मादिसर्वसंसारधर्मसंबन्धातीतं रूपमस्य साक्षात्सुषुप्ते गृह्यत इत्येतद्विज्ञापितं स्वयंज्योतिरात्मैष परम आनन्दः। एष विद्याया विषयः। स एष परमः संप्रसादः सुखस्य च परा काष्ठेत्येतदेवमन्तेन ग्रन्थेन व्याख्यातम्। तच्चैतत्सर्वं विमोक्षपदार्थस्य दृष्टान्तभूतं बन्धनस्य च। ते चैते मोक्षबन्धने सहेतुके सप्रपञ्चे निर्दिष्टे विद्याविद्याकार्ये तत्सर्वं दृष्टान्तभूतमेवेति तद्दार्ष्टान्तिकस्थानीये मोक्षबन्धने सहेतुके कामप्रश्नार्थभूते त्वया वक्तव्ये इति पुनः पर्यनुयुङ्क्ते जनकोऽत ऊर्ध्वं विमोक्षायैव ब्रूहीति ॥

भाष्यार्थ---स्वप्नाप्रमाणेंच सुषुप्तांत याचें अविद्या-काम-कर्मादि सर्व संसारधर्मसंबंधातीत रूप साक्षात् [ म्ह० स्वरूपचैतन्याच्या सामर्थ्यानें] ग्रहण केलें जातें हें विशेषतः ज्ञापित केलें. आत्मा स्वयंज्योति आहे, हा परम आनन्द आहे. ( कारण तो जर स्वयंज्योति व परम आनंद नसता तर निजून उठलेल्या पुरुषाला झोंपेंतील सुखाचें स्मरण झालें नसतें, असा भावार्थ. ) हा विद्येचा विषय आहे. तोच हा परम संप्रसाद व सुखाची पराकाष्ठा आहे, हें वरील ब्रह्मलोकान्त वाक्यानें अगदीं स्पष्टपणें सांगितलें. ( वरील कंडिकेंतील ' सोऽहं ' इत्यादि वाक्याच्या तात्पर्याचा अनुवाद करितात-) तें हें सर्व विमोक्ष पदार्थाचें व बन्धनाचें दृष्टान्तभूत आहे. विद्याकार्य मोक्ष व अविद्याकार्य बंध यांचा हेतूसह व प्रपंचासह--सविस्तर निर्देश केला. पण तें सर्व दृष्टांतभूतच आहे. यास्तव त्यांच्या दार्ष्टान्तिकाच्या स्थानीं असलेले सहेतुक मोक्ष व बंध माझ्या कामप्रश्नाचे विषयभूत आहेत, तेच तूं सांगावेस म्हणून जनक पुनः ' अत ऊर्ध्वं विमोक्षायैव ब्रूहि ' या वाक्यानें प्रश्न करीत आहे. ( राजा ज्याअर्थी एवढा वेळ सांगितलेलें सर्व दृष्टान्तभूत मानीत आहे त्याअर्थी सहस्र गोदानाकडे जी त्याची प्रवृत्ति झाली

आहे ती योग्यच आहे. वस्तुतः याज्ञवल्क्यांनीं मोक्ष व बंधन यांचा उपदेश पूर्वीच केला आहे. तथापि जनक भ्रमानें त्यांना दृष्टान्तभूत समजत आहे. व त्यामुळें याज्ञवल्क्यानें दार्ष्टान्तिक बंधन व मोक्ष सांगावे, असें समजून त्यांस त्याविषयीं प्रेरणा करीत आहे, असा याचा भावार्थ. )

तत्र महामत्स्यवत्स्वप्नबुद्धान्तावसङ्गः संचरत्येक आत्मा स्वयंज्योतिरित्युक्तम्। यथा चासौ कार्यकरणानि मृत्युरूपाणि परित्यजन्नुपाददानश्च महामत्स्यवत्स्वप्नबुद्धान्तावनुसंचरति तथा जायमानो म्रियमाणश्च तैरेव मृत्युरूपैः संयुज्यते वियुज्यते च। उभौ लोकावनुसंचरतीति संचरणं स्वप्नबुद्धान्तानुसंचारस्य दार्ष्टान्तिकत्वेन सूचितम्। तदिह विस्तरेण सनिमित्तं संचरणं वर्णयितव्यमिति तदर्थोऽयमारम्भः ॥

भाष्यार्थ—( याप्रमाणें बंध व मोक्ष सांगणें प्राप्त झालें असत प्रथम बंध वर्णिला जातो, असें सांगण्यासाठीं वरील दृष्टान्ताचें स्मरण करून देतात--) वर महामत्स्याप्रमाणें स्वप्नान्त व बुद्धान्त या अवस्थांत एक स्वयंज्योति असंग आत्मा संचार करतो, असें सांगितलें; ( याप्रमाणें दृष्टान्ताचा अनुवाद करून दार्ष्टान्तिक बंधही तेथें सूचित केला आहे--संक्षेपतः सांगितला आहे, असें दाखवितात--) आणि ज्याप्रमाणें हा मृत्युरूप कार्य-करणांचा परित्याग करणारा व ग्रहण करणारा आत्मा महामत्स्याप्रमाणें स्वप्न व जागरित यांत अनुसंचार करतो, त्याचप्रमाणें उत्पन्न होणारा व मरणारा तो त्याच मृत्युरूप कार्य-करणांनीं संयुक्त होतो व वियुक्त होतो. त्याचप्रमाणें 'उभौ लोकावनुसंचरति-' दोन्ही लोकांत अनुसंचार करतो, या वाक्यानें त्याचें उभय लोकांतील संचरण. स्वप्न-जागरितांतील अनुसंचरणाच्या दार्ष्टान्तिकत्वानें सुचविलें आहे. ( याप्रमाणें सर्व गतार्थाचा अनुवाद करून पुढील प्रकरण उत्थापित करितात--) यास्तव आतां अज्ञ संसारी जीवाचें कामादि निमित्तासह संचरण वर्णावें--संचरणाचें वर्णन करावें, म्हणून तदर्थ हा पुढील आरंभ आहे.

तत्र च बुद्धान्तात्स्वप्नान्तमयमात्माऽनुप्रवेशितः । तस्मात्संप्रसाद-स्थानं मोक्षदृष्टान्तभूतम् । ततः प्रच्याव्य बुद्धान्ते संसारव्यवहारः प्रदर्शयितव्य इति तेनास्य संबन्धः । स वै बुद्धान्तात्स्वप्नान्तक्रमेण संप्रसन्न एष एतस्मिन्संप्रसादे स्थित्वा ततः पुनरीषत्प्रच्युतः स्वप्नान्ते रत्वा चरित्वेत्यादि पूर्ववद्बुद्धान्तायैवाऽऽद्रवति ॥ ३४ ॥

भाष्यार्थ—( याप्रमाणें प्रकरणाचा आरंभ सांगून पुढील वाक्याचा मागील दूरच्या वाक्याशीं असलेला संबंध सांगतात--) ' स वा एष एतस्मिन्बुद्धान्ते रत्वा० ' (कं. १७ पृ. १४८ पहा.) या वाक्यांत हा आत्मा बुद्धान्तापासून स्वप्नान्तांत म्ह० संप्रसादांत अनुप्रवेशित केला. तस्मात् तें संप्रसादस्थान मोक्षाच्या दृष्टान्तभूत आहे. ( 'अहो पण संप्रसन्न झालेल्या आत्म्याच्या संसाराचें वर्णन कसें करितां ' अशी आशंका घेऊन सांगतात--) त्या संप्रसादस्थानापासून त्याला ढळवून प्रच्युत करून जागरितांत संसारव्यवहार प्रदर्शित करावा म्हणून पूर्वोक्त ग्रंथाशीं या पुढील ग्रंथाचा संबंध आहे. ( याप्रमाणें वाक्याचा दूर संबंध सांगून अक्षरांचें व्याख्यान करितात--) ' स वै-' तोच जागरितापासून स्वप्नान्त व स्वप्नान्तापासून संप्रसन्न झालेला ' एष ' हा या संप्रसादांत राहून त्या अवस्थेपासून पुनः थोडासा प्रच्युत होत्साता, ' एतस्मिन्स्वप्नान्ते-' या स्वप्नान्तांत रतीचा अनुभव घेऊन व संचार--विहार करून इत्यादि सर्व पूर्वींप्रमाणेंच जाणावें, तो पुनः जागरितासाठींच परत येतो. ३४.

तद्यथाऽनः सुसमाहितमुत्सर्जद्यायादेवमेवायꣳ शारीर आत्मा प्राज्ञेनाऽऽत्मनाऽन्वारूढ उत्सर्जन्याति यत्रैतदूर्ध्वोच्छ्वासी भवति ॥ ३५ ॥

अर्थ—लोकांत ज्याप्रमाणें सामानानें अतिशय लादलेला गाडा मोठा शब्द करीत जातो त्याचप्रमाणें हा शारीर--लिंगोपाधि आत्मा

पर आत्म्याकडून अधिष्ठित होत्साता शब्द करीत जातो; जेव्हां त्याला हें ऊर्ध्वोच्छ्वासित्व प्राप्त होतें (तेव्हां तो दुःखानें दीन शब्द करीत जातो. ) ३५.

इत आरभ्यास्य संसारो वर्ण्यते । यथाऽयमात्मा स्वप्नान्ताद्बुद्धान्तमागत एवमयमस्माद्देहाद्देहान्तरं प्रतिपत्स्यत इत्याहात्र दृष्टान्तम् । तत्तत्र यथा लोकेऽनः शकटं सुसमाहितं सुष्ठु भृशं वा समाहितं भाण्डोपस्करणेनोलूखलमुसलशूर्पपिठरादिनाऽन्नाद्येन च संपन्नं संभारेणाऽऽक्रान्तमित्यर्थः । तथा भाराक्रान्तं सदुत्सर्जच्छब्दं कुर्वद्यथा यायाद्गच्छेच्छाकटिकेनाधिष्ठितं सत् । एवमेव यथोक्तो दृष्टान्तोऽयं शारीरः शरीरे भवः । कोऽसौ । आत्मा लिङ्गोपाधिः । यः स्वप्नबुद्धान्ताविव जन्ममरणाभ्यां पाप्मसंसर्गवियोगलक्षणाभ्यामिहलोकपरलोकावनुसंचरति । यस्योत्क्रमणमनु प्राणाद्युत्क्रमणं स प्राज्ञेन परेणाऽऽत्मना स्वयंज्योतिःस्वभावेनान्वारूढोऽधिष्ठितोऽवभास्यमानः । तथा चोक्तमात्मनैवायं ज्योतिषाऽऽस्ते पल्ययत इति । उत्सर्जन्याति ॥

भाष्यार्थ—येथून पुढें याच्या संसाराचें वर्णन केलें जातें. जसा हा आत्मा स्वप्नान्तापासून बुद्धान्तास आलेला आहे तसाच तो या देहापासून दुसऱ्या देहास प्राप्त होतो, याविषयीं दृष्टान्त सांगतात—'तत्-' त्या 'यथा-' लोकांत ज्याप्रमाणें 'अनः-' शकट 'सुसमाहितं-' 'सु' चांगल्या प्रकारें किंवा अत्यंत 'समाहितं' भांडीं वगैरे गृहांतील उपकरणांनीं-उखळ, मुसळ, सूप, स्वयंपाकाचें मोठें भांडें इत्यादिकांनीं व अन्नानें संपन्न, अशा संभारानें लादलेला असा भावार्थ; त्याप्रमाणें भारानें अतिशय आक्रान्त झालेला, शकट--गाडा 'उत्सर्जत्-' शब्द करीत—मोठा आवाज करीत जसा 'यायात्-' जातो, गाडीवाला ज्यावर बसला आहे असा [ तो पुष्कळ ओझ्यानें लादलेला गाडा मोठा आवाज करीत जसा जातो ] 'एवमेव-' या उक्त दृष्टान्ताप्रमाणेंच 'अयं शारीरः-' हा शरीरांत असलेला, हा कोण? 'आत्मा-' लिंगात्मा--लिंगोपाधि--

लिंगविशिष्ट आत्मा--जो स्वप्नान्त व बुद्धान्त यांप्रमाणें जन्म-मरणांच्या योगानें म्ह० शरीरेंद्रियादि पापाचा संसर्ग व वियोग एतद्रूप जन्म-मरणांच्या द्वारा इहलोक व परलोक यांत अनुसंचार करतो. ज्याच्या उत्क्रमणाच्या मागोमाग प्राणादिकांचें उत्क्रमण होतें तो 'प्राज्ञेन आत्मना-' स्वयंज्योतिःस्वभाव पर आत्म्याकडून 'अन्वारूढः-' अधिष्ठित–प्रकाशित केला जाणारा असा होत्साता, कारण 'आत्मनैवायं ज्योतिषाऽऽस्ते पल्ययते-' इत्यादि त्यांविषयीं वर (पृ.५०) सांगितलें आहे, असो; असा तो लिंगोपाधि आत्मा 'उत्सर्जन्याति--' शब्द करीत जातो.

तत्र चैतन्यात्मज्योतिषा भास्ये लिङ्गे प्राणप्रधाने गच्छति तदुपाधिरप्यात्मा गच्छतीव । तथा श्रुत्यन्तरम् । "कस्मिन्न्वहम्" इत्यादि "ध्यायतीव" इति च । अत एवोक्तं प्राज्ञेनाऽऽत्मनाऽन्वारूढ इति । अन्यथा प्राज्ञेनैकीभूतः शकटवत्कथमुत्सर्जन्याति । तेन लिङ्गोपाधिरात्मोत्सर्जन्मर्मसु निकृत्यमानेषु दुःखवेदनयाऽऽर्तः शब्दं कुर्वन्याति गच्छति ॥

भाष्यार्थ—(तो शब्द करीत जर जात असेल तर आत्म्याचें गमन सिद्ध झालें, अशी आशंका घेऊन सांगतात--) चैतन्यात्मज्योतीकडून प्रकाशित होण्यास योग्य असलेलें प्राणप्रधान लिंगशरीर गमन करूं लागलें असतां लिंगोपाधि आत्माही जणुं काय जातो. (लिंगशरीराबरोबर लिंगोपाधि आत्मा जातोसा दिसतो, याविषयीं प्रमाण--) तशाच दुसऱ्या श्रुति आहेत. 'कस्मिन्न्वहमुत्क्रान्त उत्क्रान्तो भविष्यामि' (ब्र.वि.ग्रं.र.माला रत्न १४ पृ. १०५) इत्यादि त्याविषयीं दुसरी श्रुति आहे; तशीच 'ध्यायतीव लेलायतीव-' असेंही याच उपनिषदांत म्हटलें आहे. (आत्म्याचें गमन औपाधिक आहे याविषयीं दुसरें लिंग सांगतात–) म्हणूनच येथें 'प्राज्ञेन आत्मना अन्वारूढः-' पर आत्म्याकडून अधिष्ठित, असें म्हटलें आहे. (पण तेवढ्यावरून निरुपाधिक आत्मा गमन करीत नाहीं, हें कसें ठरतें? उत्तर--) नाहीं तर ह्मणजे लिंगोपाधि

आत्मा प्राज्ञ आत्म्याकडून अधिष्ठित जर नसता तर त्या प्राज्ञाशीं एकरूप झालेला आत्मा शकटाप्रमाणें शब्द करीत कसा जातो ? त्यामुळें म्ह० तसें प्रमाण असल्यामुळें लिंगोपाधि आत्मा मर्मांचा च्छेद होऊं लागला असतां--मर्में तोडलीं जाऊं लागलीं असतां दुःखवेदनेनें आर्त होत्साता शब्द करीत जातो.

तत्कस्मिन्काल इति । उच्यते । यत्रैतद्भवति । एतदिति क्रियाविशेषणम् । ऊर्ध्वोच्छ्वासी यत्रोर्ध्वोच्छ्वासित्वमस्य भवतीत्यर्थः । दृश्यमानस्याप्यनुवदनं वैराग्यहेतोः । ईदृशः कष्टः खल्वयं संसारः । येनोत्क्रान्तिकाले मर्मसूत्कृत्यमानेषु स्मृतिलोपो दुःखवेदनार्तस्य पुरुषार्थसाधनप्रतिपत्तौ चासामर्थ्यं परवशीकृतचित्तस्य । तस्माद्यावदियमवस्था नाऽऽगमिष्यति तावदेव पुरुषार्थसाधनकर्तव्यतायामप्रमत्तो भवेदित्याह कारुण्याच्छ्रुतिः ॥३५॥

भाष्यार्थ—पण हें आर्त होऊन शब्द करीत जाणें तो कोणत्या वेळीं करतो ? तेंच सांगितलें जातें. ' यत्रैतदूर्ध्वोच्छ्वासी भवति-', जेव्हां हें होतें, ' एतत्-' हें, हें क्रियाविशेषण आहे. याचें हें ऊर्ध्वोच्छ्वासित्व जशारीतीनें होईल तशाप्रकारची त्याची अवस्था जेव्हां होते तेव्हां, असा त्याचा अर्थ. ( ' अहो पण ही गोष्ट प्रत्यक्ष आहे. मग तिचा अनुवाद श्रुति कां करीत आहे ? ' उत्तर–) ही कष्टकर अवस्थ दृश्यमान–अनुभवास येणारी जरी असली तरी जन्म-मरणरूप संसाराविषयीं वैराग्य उत्पन्न व्हावें, म्हणून श्रुति तिचा अनुवाद करीत आहे. खरोखर हा संसार अशाप्रकारचा अतिशय कष्टकर आहे; कीं ज्यामुळें उत्क्रान्तिसमयीं मर्मांचा छेद होऊं लागला असतां दुःखाच्या वेदनेनें आर्त झालेल्या पुरुषाची स्मृति नष्ट होते व ज्याचें चित्त परवश झालें आहे त्याला पुरुषार्थाच्या साधनाचें अनुष्ठान करण्याचें सामर्थ्य नसतें. तस्मात् जोंवर ही अवस्था प्राप्त झाली नाहीं तोंवरच पुरुषार्थाच्या साध-

नाचें अनुष्ठान करण्याविषयीं अप्रमत्त--सावधान--रहावें, असें श्रुति कारुण्यानें सांगत आहे. ३५

स यत्रायमणिमानं न्येति जरया वोपतपता वाऽणिमानं निगच्छति तद्यथाऽऽम्रं वोदुम्बरं वा पिप्पलं वा बन्धनात्प्रमुच्यत एवमेवायं पुरुष एभ्योऽङ्गेभ्यः संप्रमुच्य पुनः प्रतिन्यायं प्रतियोन्याद्रवति प्राणायैव ॥ ३६ ॥

अर्थ—तो हा देह ज्यावेळीं कृशत्वास प्राप्त होतो, एक तर जरेनें--वार्द्धक्यामुळें किंवा ज्वरादिरोगानें तो कृशत्वास प्राप्त होतो तेव्हां जसें आम्रफळ किंवा उदुंबरफळ अथवा पिंपळाचें फळ बंधनापासून--देंठापासून सुटतें त्याचप्रमाणें हा लिंगोपाधि पुरुष या चक्षुरादि शरीरावयवांपासून अगदीं प्रमुक्त होऊन पुनः आल्यामार्गानें प्रत्येक योनीप्रत प्राणाच्या विशेष अभिव्यक्तीसाठींच जातो ३६.

तदस्योर्ध्वोच्छ्वासित्वं कस्मिन्काले किंनिमित्तं कथं किमर्थं वा स्यादित्येतदुच्यते । सोऽयं प्राकृतः शिरःपाण्यादिमान्पिण्डो यत्र यस्मिन्कालेऽयमणिमानमणोर्भावमणुत्वं कार्श्यमित्यर्थः । न्येति निगच्छति । किंनिमित्तं जरया वा स्वयमेव कालपक्वफलवज्जीर्णः कार्श्यं गच्छति । उपतपतीत्युपतपञ्ज्वरादिरोगस्तेनोपतपता वा । उपतप्यमानो हि रोगेण विषमाग्नितयाऽन्नं भुक्तं न जरयति ततोऽन्नरसेनानुपचीयमानः पिण्डः कार्श्यमापद्यते तदुच्यत उपतपता वेति । अणिमानं निगच्छति । यदाऽत्यन्तकार्श्यं प्रतिपन्नो जरादिनिमित्तैस्तदोर्ध्वोच्छ्वासी भवति ॥

भाष्यार्थ—तें याचें ऊर्ध्वोच्छ्वासित्व कोणत्या वेळीं, कोणत्या निमि-

त्तानें, कसें, किंवा कशासाठीं होतें, तें हें सांगितलें जातें. ' सः अयं-' तो हा प्राकृत–प्रकृतीचा परिणाम मस्तक, हात इत्यादिकांनीं विशिष्ट असा हा पिंड–देह ' यत्र-' ज्यावेळीं हा ' अणिमानं ' अणुभावास–अणुत्वास–कृशत्वास, असा याचा अर्थ; ' न्येति-' प्राप्त होतो, ( कृशतेचीं स्वाभाविक व आगंतुक अशीं दोन निमित्तें सांगतात–) कोणत्या निमित्तानें ? ' जरया वा-' एक तर जरेनें–आपोआपच कालानें परिपक्व झालेल्या फलाप्रमाणें जीर्ण होत्साता कृशतेस प्राप्त होतो किंवा ' उपतपता वा ' उपताप देतो तो ' उपतपन् ' म्ह० ज्वरादि रोग–त्या उपतापानें कृश होतो, ( ' अहोपण ज्वरादिकांच्या योगानें कृशत्व कसें येतें ?' उत्तर–) रोगानें उपतप्त होणारा–रोगाकडून संतप्त केला जाणारा पिंड विषमाग्नीनें युक्त झाल्यामुळें खाल्लेलें अन्न पचवूं शकत नाहीं. त्यामुळें अन्नरसानें परिपुष्ट न होणारा तो पिंड कृशतेस प्राप्त होतो. तेंच 'उपतपता वा ' या वाक्यानें सांगितलें जातें. तो याप्रमाणें दोन प्रकारच्या निमित्तानें ' अणिमानं निगच्छति-' कृशतेस प्राप्त होतो. जेव्हां वृद्धत्वादि निमित्तांनीं अत्यन्त कृशत्वास प्राप्त होतो तेव्हां ऊर्ध्वोच्छ्वासी होतो.

यदोर्ध्वोच्छ्वासी तदा भृशाहितसंभारशकटवदुत्सर्जन्याति । जराभिभवो रोगादिपीडनं कार्श्यापत्तिश्च शरीरवतोऽवश्यंभाविन एतेऽनर्था इति वैराग्यार्थेदमुच्यते ॥

भाष्यार्थ—( आतां वरील प्रश्नांतील राहिलेल्या तीन प्रश्नांचें उत्तर–) जेव्हां ऊर्ध्वोच्छ्वासी होतो–ऊर्ध्व लागलेला असा होतो तेव्हां ज्याच्यावर पुष्कळ संभार लादला आहे, अशा गाड्याप्रमाणें तो शब्द करीत जातो. ( त्यांत कृशतेमुळें ओझें लादलेल्या गाड्याप्रमाणें विविध ध्वनि करणें हें स्वरूप व शरीरत्याग हें प्रयोजन आहे असा भावार्थ. ' स यत्रायं अणिमानं०' इत्यादि वाक्यावरून अर्थात् सिद्ध झालेला अर्थ सांगतात–) जरेनें पराभूत होणें, रोगादिकांचीं पीडा होणें व कृश-

त्याची प्राप्ति होणें हे शरीरवानाला अवश्य होणारे अनर्थ आहेत, असें हें वैराग्यासाठीं सांगितलें जातें.

यदाऽसावुत्सर्जन्याति तदा कथं शरीरं विमुञ्चतीति दृष्टान्त उच्यते । तत्तत्र यथाऽऽम्रं वा फलमुदुम्बरं वा फलं पिप्पलं वा फलम् । विषमानेकदृष्टान्तोपादानं मरणस्यानियतनिमित्तत्वख्यापनार्थम् । अनियतानि हि मरणस्य निमित्तान्यसंख्यातानि च । एतदपि वैराग्यार्थमेव। यस्मादयमनेकमरणनिमित्तवांस्तस्मात्सर्वदा मृत्योरास्ये वर्तत इति ॥

भाष्यार्थ--( ' यद्यथा०' इत्यादि वाक्य प्रश्नपूर्वक घेऊन त्याचें व्याख्यान करितात-) जेव्हां हा शब्द करीत जातो तेव्हां शरीराला कसा सोडतो, तें सांगण्यासाठीं दृष्टान्त सांगितला जातो. ' तत् ' तेथें ' यथा आम्रं वा पिप्पलं वा-' जसें आम्रफल, किंवा उदुंबर फल, किंवा पिंपळाचें फळ, ( बंधनापासून प्रमुक्त होतें, देंठापासून सुटतें, असा संबंध. ' अहो पण एकाच दृष्टान्तानें विवक्षित कार्य होत असतांना अनेक विषम दृष्टान्त येथें कां घेतले आहेत ? ' तें सांगतात-) अनेक विषम दृष्टान्त मरणाचें अनियत-निमित्तत्व प्रख्यापित करण्यासाठीं घेतले आहेत. मरणाचीं निमित्तें अनियत व असंख्यात आहेत, ही गोष्ट प्रसिद्ध आहे. मरणाचीं निमित्तें अनेक आहेत व तीं अमुकच असाही नियम नाहीं, हेंही वैराग्यासाठींच सांगितलें आहे. ज्याअर्थीं हा अनेक मरण-निमित्तांनीं युक्त असतो त्याअर्थीं सर्वदा मृत्यूच्या तोंडांतच राहतो. ( यास्तव मनुष्यानें नेहमीं सावधान असावें, असा याला शेष लावावा. )

बन्धनाद्बध्यते येन वृन्तेन सह स बन्धनकारणो रसो यस्मिन्वा बध्यत इति वृन्तमेवोच्यते बन्धनं तस्माद्रसाद्वृन्ताद्वा बन्धनात्प्रमुच्यते वाताद्यनेकनिमित्तमेवमेवायं पुरुषो लिङ्गात्मा लिङ्गोपाधिरेभ्योऽङ्गेभ्यश्चक्षुरादिदेहावयवेभ्यः संप्रमुच्य सम्यङ्निर्लेपेन प्रमुच्य । न सुषुप्तगमनकाल इव प्राणेन रक्षन् । किं तर्हि सह वायुनोपसंहृत्य । पुनः प्रतिन्यायं पुनःशब्दात्पूर्वमप्ययं देहाद्देहान्तरमसकृद्गतवान्यथा

स्वप्नबुद्धान्तौ पुनः पुनर्गच्छति तथा पुनः प्रतिन्यायं प्रतिगमनं यथागतमित्यर्थः । प्रतियोनि योनिं योनिं प्रति कर्मश्रुतादिवशाद्द्रवति ॥

भाष्यार्थ—' बन्धनात्-' देंठाशीं फळ ज्या रसानें चांगलें बांधलें जातें तो बंधकारणभूत रसच बंधन होय; किंवा ज्यांत रसाकडून फळ बांधलें जातें तें देंठच बंधन आहे, असें म्हटलें जातें. त्या बंधनापासून म्हणजे रसापासून किंवा देंठापासून वातादि अनेक निमित्तांमुळेंच पूर्वोक्त आम्रादि फळ ' प्रमुच्यते-' प्रमुक्त होतें, ' एवमेवायं पुरुषः-' त्याचप्रमाणें हा पुरुष लिंगात्मा–म्हणजे लिंग हीच ज्याची उपाधि आहे असा तो शारीर आत्मा ' एभ्योऽङ्गेभ्यः-' या चक्षुरादि देहावयवांपासून ' सं·प्रमुच्य ' चांगल्याप्रकारें-निर्लेपानें प्रमुक्त होऊन (' सं ' या उपसर्गाचें तात्पर्य सांगतात–)सुषुप्तांत जाण्याच्या वेळीं शरीराचें प्राणानें रक्षण करून जसा जातो तसा नव्हे तर काय ? (तर मग तो मरणावस्थेंत कोणत्या प्रकारानें दुसऱ्या देहास जातो ? तेंच सांगतात–) प्राणासह करणांचा उपसंहार करून पुनः ' प्रतिन्यायं-' येथें ' पुनः ' हा शब्द असल्यामुळें पूर्वींही हा एका देहांतून दुसऱ्या देहांत वारंवार गेलेला आहे, जसा स्वप्न--सुषुप्ति व जागर यांत पुनः पुनः जातो त्याचप्रमाणें पुनः ' प्रतिन्यायं-' प्रतिगमन--जसा पूर्वी या देहांत आला होता तसा --त्या मार्गानें दुसऱ्या देहास जातो असा भावार्थ. ' प्रतियोनि-' कर्म व श्रुत–विद्या इत्यादिकांच्या सामर्थ्यानें प्रत्येक योनीप्रत जातो.

किमर्थम् । प्राणायैव प्राणव्यूहायैवेत्यर्थः । सप्राण एव हि गच्छति ततः प्राणायैवेति विशेषणमनर्थकम् । प्राणव्यूहाय हि गमनं देहाद्देहान्तरं प्रति । तेन ह्यस्य कर्मफलोपभोगार्थसिद्धिर्न प्राणसत्तामात्रेण । तस्मात्तादर्थ्यार्थे युक्तं विशेषणं प्राणव्यूहायेति ॥ ३६ ॥

भाष्यार्थ—तो कशाकरितां जातो ? ' प्राणायैव-' प्राणव्यूहासाठींच जातो, असा भावार्थ. ( प्राणांची विशेष अभिव्यक्ति व्हावी म्हणून जातो. पण ' प्राणाय ' याचें असें कां व्याख्यान केलें जात आहे ?

उत्तर--) तो प्राणासहवर्तमानच जातो त्यामुळें ' प्राणायैव ' प्राणासाठीं हें विशेषण व्यर्थ आहे. (याविषयीं ब्रह्ममीमांसेच्या तदन्तरप्रतिपत्त्यधिकरणांत निश्चय केला आहे. ' प्राणाय ' हें विशेषण व्यर्थ होत असल्यामुळें त्याचा अर्थ वरच्यासारखा करणेंच योग्य आहे, असें सांगतात--) एका देहापासून दुसऱ्या देहाप्रत लिंगात्म्याचें जें गमन होतें तें प्राणाच्या व्यूहासाठींच--विशेष अभिव्यक्तीसाठींच होय, हें प्रसिद्ध आहे. ( अहो पण प्राण जर त्याच्या बरोबरच असतो तर प्राणव्यूहाची आणखीं काय गरज ? कारण त्या प्राणानेंच भोगाची सिद्धि होईल, अशी आशंका घेऊन सांगतात--) त्यामुळें केवळ प्राणाच्या सत्तेनें याच्या कर्मफलोपभोगार्थाची सिद्धि होत नाहीं. ( कारण केवळ प्राणाच्या सत्तेनेंच जर भोगसिद्धि झाली असती तर सुषुप्ति व मूर्च्छा या अवस्थांमध्येंही भोगसिद्धि होणें अवश्य होतें; पण तसें होत नाहीं.) तस्मात् प्राण भोगाचें अंग आहे, ही गोष्ट सिद्ध होण्यासाठीं ' प्राणव्यूहाय ' हें विशेषण युक्त आहे. ३६

तद्यथा राजानमायान्तमुग्राः प्रत्येनसः सूतग्रामण्योऽन्नैः पानैरावसथैः प्रतिकल्पन्तेऽयमायात्ययमागच्छतीत्येवꣳहैवंविदꣳसर्वाणि भूतानि प्रतिकल्पन्त इदं ब्रह्माऽऽयातीदमागच्छतीति ॥ ३७ ॥

अर्थ---त्याविषयीं दृष्टान्त--जसे राजा येत असतां उग्रकर्मे करणारे--पाप कर्मांत नियुक्त केलेले लोक, सूत व ग्रामनायक विविध अन्न, पान व प्रासादादिक तयार करून 'हा येत आहे, हा येत आहे' असें म्हणत त्याची प्रतीक्षा करितात त्याप्रमाणें या कर्मफलवेत्त्या भोक्त्याची सर्व भूतें 'हें ब्रह्म येत आहे, हें येत आहे,' असें म्हणून प्रतीक्षा करितात. ३७.

तत्रास्येदं शरीरं परित्यज्य गच्छतो नान्यस्य देहान्तरस्योपादाने

सामर्थ्यमस्ति देहेन्द्रियवियोगात् । न चान्येऽस्य भृत्यस्थानीया गृह-मिव राज्ञे शरीरान्तरं कृत्वा प्रतीक्षमाणा विद्यन्ते । अथैवं सति कथ-मस्य शरीरान्तरोपादानमिति ॥

भाष्यार्थ—( ' तद्यथा राजानं० -' या वाक्यानें ज्या शंकेची निवृत्ति करावयाची आहे ती शंका सांगतात -- )मुमूर्षावस्थेंत हें शरीर सोडून जाणाऱ्या याला दुसऱ्या पृथक् देहाचें ग्रहण करण्याचें सामर्थ्य नसतें. कारण त्याच्या देहेंद्रियांचा वियोग झालेला असतो; ( पण त्याला स्वतः दुसरा देह घेण्याचें सामर्थ्य जरी नसलें तरी राजाचे जसे गृहादि निर्माण करणारे भृत्य असतात तसे त्याचे दुसरे कोणी दुसरा देह करणारे असतील, अशी आशंका घेऊन सांगतात-- ) राजाकरितां गृह निर्माण करून राजाचे भृत्य जसे त्याची प्रतीक्षा करीत राहतात त्याचप्रमाणें याचे दुसरे भृत्यस्थानीय लोक दुसरें शरीर निर्माण करून प्रतीक्षा करणारे नसतात. ( अहो पण त्याला स्वतः तर निर्माण करण्याचें सामर्थ्य नाहीं, तें करणारे दुसरेही कोणी नाहींत असें असतां निष्पन्न काय होतें तें सांगतात-- ) मग असें जर आहे तर याचें दुसऱ्या शरीराचें उपादान-ग्रहण कसें होतें ? ( तो दुसऱ्या शरीराचें ग्रहण कसें करतो ? )

उच्यते । सर्वं ह्यस्य जगत्स्वकर्मफलोपभोगसाधनत्वायोपात्तं स्वकर्मफलोपभोगाय चायं प्रवृत्तो देहाद्देहान्तरं प्रतिपित्सुस्तस्मात्सर्वमेव जगत्स्वकर्मणा प्रयुक्तं तत्कर्मफलोपभोगयोग्यं साधनं कृत्वा प्रतीक्षत एव " कृतं लोकं पुरुषोऽभिजायते " इति श्रुतेः । यथा स्वप्नाज्जागरितं प्रतिपित्सोः ॥

भाष्यार्थ—( 'तद्यथा०' इत्यादि वाक्याचें तात्पर्य दाखविणारें उत्तर देतात--, सांगतात—सर्व जगत् या अज्ञाच्या स्वकर्मफलोपभोगासाठीं साधन सिद्ध व्हावें म्हणून ग्रहण केलेलें आहे. हा एका देहापासून दुसऱ्या देहास प्राप्त होण्याची इच्छा करणारा भोक्ता आपल्या कर्माचें फळ भोगण्यासाठीं प्रवृत्त झाला आहे. यास्तव सर्वच जगत् भोक्त्याच्या कर्मानें

प्रेरित होत्सातें त्याच्या कर्मफलोपभोगास योग्य असें साधन निर्माण करून प्रतीक्षा करीतच राहतें. कारण त्याविषयीं ‘ कृतं लोकं पुरुषोऽभिजायते-’ म्ह० ज्यानें वर्तमान देहाचा त्याग केला आहे असा पुरुष भूतपंचकादिकांच्या योगानें निर्माण केलेल्याच दुसऱ्या देहास सर्वतः व्यापून उत्पन्न होतो, अशी श्रुति प्रमाण आहे. ( हाच अर्थ दृष्टान्तानें स्पष्ट करितात–) ज्याप्रमाणें स्वप्नस्थानांतून जागरित स्थानास प्राप्त होण्याची इच्छा करणाऱ्या पुरुषाचें शरीर पूर्वींच केलेलें असतें ( त्यावेळीं अपूर्व शरीर कांहीं केलें जात नाहीं त्याचप्रमाणें एका देहांतून दुसऱ्या देहास प्राप्त होण्याची इच्छा करणाराचें दुसरें शरीर पंचभूतादिकांनीं केलेलेंच असतें, असा भावार्थ. )

तत्कथमिति लोकप्रसिद्धो दृष्टान्त उच्यते । तत्तत्र यथा राजानं राज्याभिषिक्तमायान्तं स्वराष्ट्र उग्रा जातिविशेषाः क्रूरकर्माणो वा प्रत्येनसः प्रति प्रत्येनसि पापकर्मणि नियुक्ताः प्रत्येनसस्तस्करादिदण्डनादौ नियुक्ताः सूताश्च ग्रामण्यश्च सूतग्रामण्यः सूता वर्णसंकरजातिविशेषा ग्रामण्यो ग्रामनेतारस्ते पूर्वमेव राज्ञ आगमनं बुद्ध्वाऽन्नैर्भोज्यभक्ष्यादिप्रकारैः पानैर्मदिरादिभिरावसथैश्च प्रासादादिभिः प्रतिकल्पन्ते निष्पन्नैरेव प्रतीक्षन्तेऽयं राजाऽऽयात्ययमागच्छतीत्येवं वदन्तः ॥

भाष्यार्थ—(संसारी जीव याप्रमाणें पूर्व शरीर सोडून परलोकास निघाला असतां सर्व भूतें दुसरें शरीर करून त्याचें प्रतीक्षण कोणत्या प्रकारें करितात, अशाविषयीं प्रश्नपूर्वक दृष्टान्त घेऊन त्याचें व्याख्यान करितात–) तें कसें ? हें कळण्यासाठीं लोकप्रसिद्ध दृष्टान्त सांगितला जातो. ‘तद्यथा-’ त्याविषयीं दृष्टान्त ज्याप्रमाणें ‘राजानं-’ राज्यावर अभिषेक केलेल्या राजाला ‘आयान्तं-’ आपल्या राष्ट्रांत येणाऱ्या राजाला ‘उग्राः-’ उग्र या जातीचे अथवा उग्र कर्में करणारे ‘प्रत्येनसः-’ प्रत्येक पाप कर्मा-

मध्यें नियुक्त केलेले ते प्रत्येनस, चोरादिकांना[1] दंड करणें इत्यादि हिंसा-प्रचुर कामांत नेमलेले, 'सूतग्रामण्यः-' सूत व ग्रामणी, सूत म्हणजे वर्णसंकर जातींतील विशेष—ब्राह्मणी स्त्रीच्या ठिकाणीं क्षत्रियापासून झालेले--व ग्रामनेते--गांवचे नायक असे ते सर्व राजा येणार हें पूर्वीच ऐकून 'अन्नैः-' भोज्य, भक्ष्य, लेह्य व चोष्य अशा चार प्रकारच्या अन्नांनीं, 'पानैः-' मदिरादि (क्षीरादि) पानांनीं 'आवसथैः-' प्रासादादि निवास स्थानांनीं 'परिकल्पन्ते-' निष्पन्न केलेल्या अशा त्या अन्नादिकांनींच प्रतीक्षा करितात 'अयमायात्ययमागच्छति-' हा राजा येत आहे, हा येत आहे, असें बोलणारे ते प्रत्येनसादिक प्रतीक्षा करतात.

यथाऽयं दृष्टान्त एवं हैवंविदं कर्मफलस्य वेदितारं संसारिणमित्यर्थः। कर्मफलं हि प्रस्तुतं तदेवंशब्देन परामृश्यते। सर्वाणि भूतानि शरीरकर्तॄणि करणानुग्रहीतॄणि चाऽऽदित्यादीनि तत्कर्मप्रयुक्तानि कृतैरेव कर्मफलोपभोगसाधनैः प्रतीक्षन्ते। इदं ब्रह्म भोक्तृ कर्तृ चास्माकमायाति तथेदमागच्छतीत्येवमेव च कृत्वा प्रतीक्षन्त इत्यर्थः॥ ३७॥

भाष्यार्थ—जसा हा दृष्टान्त आहे 'एवं ह एवंविदं-' त्याप्रमाणें कर्मफळाच्या वेत्याला, संसारी भोक्त्याला असा भावार्थ; कारण कर्मफल प्रस्तुत आहे, 'एवं-'शब्दानें त्याचाच परामर्श केला जातो; 'सर्वाणि भूतानि-' शरीराला करणारीं भूतें व करणांवर अनुग्रह करणाऱ्या आदित्यादि देवता हीं त्या संसारी जीवाच्या कर्मांकडून प्रेरित होत्सातीं निर्माण केलेल्याच कर्मफलोपभोगसाधनांनीं त्याची प्रतीक्षा करितात. 'इदं ब्रह्म आयाति, इदं आगच्छति-' हें ब्रह्म—आमचा उपभोग घेणारें व करणारें येत आहे. तसेंच हें येत आहे, अशा प्रकारेंच भोगसाधनें करून प्रतीक्षा करितात, असा भावार्थ. (दृष्टान्त व दार्ष्टान्तिक या दोन्ही ठिकाणीं 'अयं आयाति' व 'इदं आयाति' या वाक्याचा जो अभ्यास-द्विरुक्ति--केला आहे तो आदरार्थ आहे) ३७.

---

१ यांतील आदिशब्दानें वधदंडाला योग्य असलेल्या दुसऱ्याही अपराध्यांचें ग्रहण करावें.

तद्यथा राजानं प्रयियासन्तमुग्राः प्रत्येनसः सूतग्रामण्योऽभिसमायन्त्येवमेवेममात्मानमन्तकाले सर्वे प्राणा अभिसमायन्ति यत्रैतदूर्ध्वोच्छ्वासी भवति ॥३८॥ इति बृहदारण्यकोपनिषदि चतुर्थाध्यायस्य तृतीयं ब्राह्मणम् ॥३॥

अर्थ—त्याविषयीं दृष्टान्त--ज्याप्रमाणें प्रकर्षानें जाण्याची इच्छा करणाऱ्या राजाच्या अभिमुख होऊन हिंसादि पापकर्मांत नियुक्त केलेले उग्र, सूत व ग्रामणी येतात त्याप्रमाणेंच ज्यावेळीं हा आत्मा ऊर्ध्वोच्छ्वासी होतो त्यावेळीं—अन्तकाळीं सर्व प्राण या आत्म्याच्या अभिमुख होऊन येतात. (त्याच्या बरोबर जावयास तयार होतात.) ३८ (३)

तमेवं जिगमिषुं के सह गच्छन्ति । ये वा गच्छन्ति ते किं तत्क्रियाप्रणुन्ना आहोस्वित्तत्कर्मवशात्स्वयमेव गच्छन्ति परलोकशरीरकर्तॄणि च भूतानीति ॥

भाष्यार्थ—(या कंडिकेनें ज्या शंकेचा परिहार करावयाचा आहे ती उत्थापित करितात—) याप्रमाणें जाण्याची इच्छा करणाऱ्या त्याच्या बरोबर कोण जातात ? किंवा जे जातात ते त्या गमन करणाऱ्या भोक्त्याच्या क्रियेनें—वागादि व्यापारानें प्रेरित—बोलावले गेलेले—असे होत्साते जातात कीं त्याच्या कर्मांच्या सामर्थ्यानें आपोआपच जातात ? तशींच परलोकसंज्ञक शरीर करणारीं व इंद्रियांवर अनुग्रह करणारीं आदित्यादिक जीं भूतें तीं त्याच्याकडून बोलावलीं गेलेलीं अशीं जातात कीं त्याच्या कर्मांमुळें आपोआपच जातात ? ( पण या दोन पक्षांतील एकही पक्ष संभवत नाहीं. कारण परलोकीं निघालेल्या त्याच्या ठिकाणीं वागादि इंद्रियांचा व्यापार संभवत नसल्यामुळें त्याला बोलावतां येणें शक्य नाहीं. त्याचप्रमाणें वागादिक अचेतन असल्यामुळें भोक्त्याच्या

कर्मामुळेंही त्यांच्या ठिकाणीं आपोआप प्रवृत्ति संभवत नाहीं; असा वरील आक्षेप करणाराचा अभिप्राय आहे. )

अत्रोच्यते दृष्टान्तः । तद्यथा राजानं प्रयियासन्तं प्रकर्षेण यातुमिच्छन्तमुग्राः प्रत्येनसः सूतग्रामण्यस्तं यथाऽभिसमायन्त्याभिमुख्येन समायन्त्येकीभावेन तमभिमुखा आयन्त्यनाज्ञप्ता एव राज्ञा केवलं तज्जिगमिषाभिज्ञाः । एवमेवेममात्मानं भोक्तारमन्तकाले मरणकाले सर्वे प्राणा वागादयोऽभिसमायन्ति । यत्रैतदूर्ध्वोच्छ्वासी भवतीति व्याख्यातम् ॥ ३८ ॥

भाष्यार्थ—(पुढील वाक्यानें याचें उत्तर—) याविषयीं दृष्टान्त सांगितला जातो-'तद्यथा राजानं प्रयियासन्तं-' ज्याप्रमाणें सर्वथा जाण्याची इच्छा करणाऱ्या राजाला 'उग्राः प्रत्येनसः०-' हिंसादि पापकर्मे करण्यांत नियुक्त केलेले उग्र, सूत व ग्रामनायक 'अभिसमायन्ति-' आभिमुख्यानें—अभिमुखत्वानें एकीभावानें राजानें आज्ञा न केले गेलेले पण केवल त्याची जाण्याची इच्छा जाणणारे असेच ते त्याच्या अभिमुख येतात ' एवमेव-' त्याचप्रमाणें 'इममात्मानं-' या आत्म्याला—भोक्त्याला 'अन्तकाले-' मरणसमयीं 'सर्वे प्राणाः-' वागादिक सर्व प्राण 'अभिसमायन्ति-' सन्मुख येतात. ( त्याच्या बरोबर जाण्यासाठीं त्याच्या समीप येतात. मरणकालालाच विशेषण देतात-) 'यत्रो०-' ज्यावेळीं हें ऊर्ध्वोच्छ्वासित्व होतें, या वाक्याचें व्याख्यान वर केलें आहे. ३८ (३)

इति श्रीबृहदारण्यकभाष्यार्थाच्या तिसऱ्या अध्यायाचें
तिसरें ब्राह्मण समाप्त

---

**स यत्रायमात्माऽबल्यं न्येत्य संमोहमिव न्येत्यथैनमेते प्राणा अभिसमायन्ति स एता- स्तेजोमात्राः समभ्याददानो हृदयमेवान्वव- क्रामति स यत्रैष चाक्षुषः पुरुषः पराङ्पर्या- वर्ततेऽथारूपज्ञो भवति ॥ १ ॥**

अर्थ—तो हा प्रकृत आत्मा जेव्हां दुर्बलतेस प्राप्त होऊन संमूढतेससा प्राप्त होतो त्यावेळीं हे वागादिक प्राण यां आत्म्यास आभिमुख्यानें निःशेष प्राप्त होतात. तो यां चक्षुरादि तेजोमात्रा- तेजाचे अवयव निःशेष आकर्षण करून घेणारा असा होत्साता हृदयामध्यें अभिव्यक्त विज्ञानवान् होतो [चक्षु- रादि तेजोमात्रांचें आकर्षण करून घेतल्यावर त्याचें विज्ञान हृदयांतच अभिव्यक्त होतें.] ज्यावेळीं तो हा चाक्षुष-चक्षूंतील पुरुष—आदित्यांश सर्वतः व्यावृत्त होतो तेव्हां मुमूर्षु अरूपज्ञ होतो, त्याला रूपज्ञान होईनासें होतें. १.

स यत्रायमात्मा । संसारोपवर्णनं प्रस्तुतम् । तत्रायं पुरुष एभ्यो- ऽङ्गेभ्यः संप्रमुच्येत्युक्तम् । तत्संप्रमोक्षणं कस्मिन्काले कथं वेति सवि- स्तरं संसरणं वर्णयितव्यमित्यारभ्यते ॥

भाष्यार्थ—(या अध्यायाच्या चवथ्या ब्राह्मणाला उत्थापित करि- तात–) ' स यत्रायमात्मा-' ( असें अवतरण घेऊन त्याचा संबंध सांगण्यासाठीं उक्तार्थाचा अनुवाद करितात–) संसाराचें उपवर्णन प्रस्तुत आहे. त्या संसारप्रकरणांत हा पुरुष या अंगापासून उत्तम प्रकारें प्रमुक्त होऊन, असें सांगितलें. तें ' संप्रमोक्षण-' उत्तम प्रकारें मोक्षण— मुक्त होणें कोणत्या वेळीं किंवा कसें होतें? तें सांगण्यासाठीं--त्या संसर- णाचें सविस्तर वर्णन करावें, म्हणून हें ब्राह्मण आरंभिलें जात आहे.

सोऽयमात्मा प्रस्तुतो यत्र यस्मिन्कालेऽबल्यमबलभावं नि-एत्य

गत्वा । यद्देहस्य दौर्बल्यं तदात्मन एव दौर्बल्यमित्युपचर्यतेऽबल्यं न्येत्येति । न ह्यसौ स्वतोऽमूर्तत्वाद्बलभावं गच्छति ॥

भाष्यार्थ--('स यत्रायमात्माऽबल्यं न्येत्य०- ' इत्यादि अक्षरांचें व्याख्यान करितात–) 'सोऽयमात्मा-' तो प्रस्तुत आत्मा 'यत्र-' ज्यावेळीं 'अबल्यं-' अबलभावास 'नि+एत्य-' असामर्थ्यावस्थेस प्राप्त होऊन ['संमोह-मिव न्येति-' जणु काय संमोहास प्राप्त होतो, असा संबंध. 'अहोपण आत्म्याचें दौर्बल्य कसें ?' अशी आशंका घेऊन सांगतात–] जें देहाचें दौर्बल्य तें आत्म्याचेंच दौर्बल्य, असा ' अबल्यं न्येत्य-' यानें उपचार केला जातो. कारण स्वतः आत्मा अमूर्त असल्यामुळें अबलभावास प्राप्त होत नाहीं.

तथा संमोहमिव संमूढता संमोहो विवेकाभावः संमूढतामिव न्येति निगच्छति । न चास्य स्वतः संमोहोऽसंमोहो वाऽस्ति नित्यचै-तन्यज्योतिःस्वभावत्वात् । तेनेवशब्दः संमोहमिव न्येतीति । उत्क्रा-न्तिकाले हि करणोपसंहारनिमित्तो व्याकुलीभाव आत्मन इव लक्ष्यते लौकिकैः । तथा च वक्तारो भवन्ति संमूढः संमूढोऽयमिति ॥

भाष्यार्थ—( जसा हा अबलभावास प्राप्त होतो ) तसाच 'संमोह-मिव न्येति-' संमोह -संमूढता. संमोह म्ह० विवेकाभाव, जणुं काय संमूढतेस 'न्येति-' प्राप्त होतो. (वरील 'इव-'शब्दाचा अर्थ सांगतात–) या आत्म्याला स्वतः संमोह किंवा असंमोह नाहीं. कारण त्याला नित्य-चैतन्यज्योतिःस्वभावत्व आहे. त्यामुळें 'संमोहमिव न्येति' येथें 'इव-'शब्द घातला आहे. ('अहोपण आत्मा जर नित्यचैतन्यस्वभाव आहे तर त्याच्या ठिकाणीं आरोपित असाही संमोह कसा संभवतो?' उत्तर-) उत्क्रान्तिसमयीं—मरणकालीं इंद्रियांच्या उपसंहारामुळें होणारा अन्तःकर-णाचा व्याकुलीभाव आत्म्याचासा लौकिकांकडून समजला जातो.(सामान्य लोक हा व्याकुलीभाव आत्म्याचा आहे, असें जाणतात. याविषयीं लोकांची वार्ताही अनुकूल आहे, असें दाखवितात–) तसेंच त्याच्याविषयीं

बोलणारे लोक हा संमूढ झाला, संमूढ—मूर्च्छित झाला—याला वायु झाला—असें म्हणतात.

अथ वोभयत्रेवशब्दप्रयोगो योज्योऽबल्यमिव न्येत्य संमोहमिव न्येतीति। उभयस्य परोपाधिनिमित्तत्वाविशेषात्। समानकर्तृकनिर्देशाच्च॥

भाष्यार्थ—(याप्रमाणें जसा श्रुतींत आहे तसाच 'इव'शब्द घेऊन व त्याचें व्याख्यान करून दुसरा पक्ष सांगतात-) किंवा 'अबल्यं इव न्येत्य संमोहमिव न्येति-' असा दोन्ही ठिकाणीं 'इव' शब्द योजावा. कारण अबल्य—असामर्थ्य व संमोह या दोघांनाहीं परोपाधिनिमित्तत्व समान आहे. (तीं दोन्ही अंतःकरण या उपाधीच्या निमित्तानें होतात. शिवाय 'न्येत्य-' प्राप्त होऊन 'न्येति-' प्राप्त होतो, या दोन्ही क्रियांचा कर्ता एक आत्मा आहे. अर्थात्) समान कर्तृकत्वाचा निर्देश केलेला असल्यामुळें 'इव'शब्द दोन्ही ठिकाणीं योजला आहे.

अथास्मिन्काल एते प्राणा वागादय एनमात्मानमभिसमायन्ति तदाऽस्य शारीरस्याऽऽत्मनोऽङ्गेभ्यः संप्रमोक्षणम् ॥

भाष्यार्थ—(आतां श्रुतींतील 'अथैनमेते०' इत्यादि वाक्य घेऊन व त्याचें व्याख्यान करून संप्रमोक्षण कोणत्या वेळीं होतें तें सांगतात—) 'अथ-' यावेळीं 'एते प्राणाः-' हे वागादिक प्राण 'एनं आत्मानं अभिसमायन्ति-' या आत्म्याच्या अभिमुख येतात. त्यावेळीं या शारीर आत्म्याचें अंगांपासून संप्रमोक्षण होतें.

कथं पुनः संप्रमोक्षणं केन वा प्रकारेणाऽऽत्मानमभिसमायन्तीति। उच्यते। स आत्मैतास्तेजोमात्रास्तेजसो मात्रास्तेजोमात्रास्तेजोवयवा रूपादिप्रकाशकत्वाच्चक्षुरादीनि करणानीत्यर्थः। ता एताःसमभ्याददानः सम्यङ्निर्लेपेनाभ्याददानः आभिमुख्येनाऽऽददान संहरमाणस्तत्स्वप्नापेक्षया विशेषणं समिति। न तु स्वप्ने निर्लेपेन सम्यगादानम्। अस्ति त्वादानमात्रम्। गृहीता वाग्गृहीतं चक्षुरस्य लोकस्य सर्वावतो मात्रामपादाय शुक्रमादायेत्यादिवाक्येभ्यः॥

भाष्यार्थ---पण संप्रमोक्षण कसें होतें व प्राण आत्म्याच्या अभिमुख कोणत्या प्रकारानें येतात ? म्हणून विचाराल तर सांगितलें जातें– 'सः-' तो आत्मा 'एताः तेजोमात्राः-' या तेजोमात्रा--तेजाच्या ज्या मात्रा त्या तेजोमात्रा--तेजाचे अवयव, चक्षुरादिकांना रूपादिकांचें प्रकाशकत्व असल्यामुळें चक्षुरादि इंद्रियें, असा ' तेजोमात्राः ' याचा अर्थ. त्या या तेजोमात्रांस 'समभ्याददानः-' सम्यक् म्ह० निर्लेपानें 'अभ्याददानः-' आभिमुख्यानें उपसंहृत करणारा--त्यांचा निःशेष उपसंहार करणारा [ 'हृदयमेवान्ववक्रामति' याच्याशीं अन्वय लावावा ] 'समभ्याददानः-' यांतील ' सं ' हें विशेषण सुषुप्तीच्या अपेक्षेनें आहे. सुषुप्तींत निर्लेपानें इंद्रियांचा उपसंहार होत नाहीं, [ मरणांत तो निःशेष होतो, असा भावार्थ.] नुस्तें इंद्रियांचें आदान--उपसंहार सुषुप्तींतही होतो. कारण तसें सांगणारी 'गृहीता वाक् गृहीतं चक्षुः' 'अस्य लोकस्य सर्वावतो मात्रामपादाय' 'शुक्रमादाय' इत्यादि वाक्यें आहेत.

हृदयमेव पुण्डरीकाकारमन्ववक्रामत्यन्वागच्छति हृदयेऽभिव्यक्तविज्ञानो भवतीत्यर्थः । बुद्ध्यादिविक्षेपोपसंहारे सति । न हि तस्य स्वतश्चलनं विक्षेपोपसंहारादिविक्रिया वा । ध्यायतीव लेलायतीवेत्युक्तत्वात् । बुद्ध्याद्युपाधिद्वारैव हि सर्वविक्रियाऽध्यारोप्यते तस्मिन् ॥

भाष्यार्थ--( ' स एतास्तेजोमात्राः- ' या वाक्याचें व्याख्यान करून 'हृदयमेवान्ववक्रामति०-' या वाक्याचें व्याख्यान करितात--) 'हृदयमेव-' शुभ्रकमलाकार हृदयासच ' अनु-अव-क्रामति-'मागून प्राप्त होतो; हृदयांत ज्याचें विज्ञान व्यक्त झालें आहे, असा तो होतो, असा भावार्थ. (' अहोपण निष्क्रिय आत्मा तेजोमात्रांचें ग्रहण करणें ही क्रिया कशी करूं शकतो ? ' याचें उत्तर-)बुद्ध्यादिक व त्यांचे विक्षेप यांचा उपसंहार झाला असतां आत्मा तेजोमात्रांचा उपसंहार करतो म्हणजे तो[1] उपसंहारकर्ता होतो हें म्हणणें औपचारिक आहे. त्याला स्वतः चलन

१ 'सविज्ञानो भवति' या पुढील वाक्याचा आश्रय करून या वाक्याचा हा अर्थ सांगत आहेत.

नाहीं व विक्षेपोपसंहारादिक [ व तशीच दुसरी कोणतीही ] विक्रिया नाहीं. कारण 'ध्यायतीव लेलायतीव' इत्यादि सांगितलेलें आहे. ('तर मग तो कर्ता आहे इत्यादि लोकप्रसिद्धि कशी आहे?' उत्तर-) बुद्ध्यादि -उपाधींच्या द्वाराच त्याच्यावर सर्व विक्रियांचा आरोप केला जातो.

कदा पुनस्तस्य तेजोमात्राभ्यादानमिति । उच्यते । स यत्रैष चक्षुषि भवश्चाक्षुषः पुरुष आदित्यांशो भोक्तुः कर्मणा प्रयुक्तो यावद्देहधारणं तावच्चक्षुषोऽनुग्रहं कुर्वन्वर्तते । मरणकाले त्वस्य चक्षुरनुग्रहं परित्यजति स्वमादित्यात्मानं प्रतिपद्यते ॥

भाष्यार्थ—( ' स यत्रैष०' इत्यादि वाक्य आकांक्षापूर्वक घेऊन त्याचें व्याख्यान--) पण त्याचें तें तेजोमात्रांचें अभ्यादान--आभिमुख्यानें ग्रहण केव्हां होतें? सांगतों--' सः-' तो ' एषः-' हा ' यत्र-' ज्यावेळीं ' एष चाक्षुषः पुरुषः-' हा चक्षूंतील पुरुष आदित्याचा अंश भोक्त्याच्या कर्मानें प्रेरित होत्साता जोंवर देहधारण होत असतें तोंवर चक्षूवर अनुग्रह करीत राहतो. पण तो मरणकालीं याच्या चक्षूवरील अनुग्रहाचा परित्याग करून आपल्या आदित्यात्म्यास प्राप्त होतो. [ म्ह० चक्षूवर अनुग्रह करणारा आदित्याचा अंश स्वतंत्र रहात नाहीं, तर आपल्या आदित्यात्म्यास प्राप्त होतो. ]

तदेतदुक्तं यत्रास्य पुरुषस्य मृतस्याग्निं वागप्येति वातं प्राणश्चक्षुरादित्यमित्यादि । पुनर्देहग्रहणकाले संश्रयिष्यन्ति । तथा स्वप्स्यतः प्रबुध्यतश्च । तदेतदाह । चाक्षुषः पुरुषो यत्र यस्मिन्काले पराङ् पर्यावर्तते परि समन्तात्पराङ् व्यावर्तत इति । अथात्रास्मिन्कालेऽरूपज्ञो भवति मुमूर्षू रूपं न जानाति तदाऽयमात्मा चक्षुरादितेजोमात्राः समभ्याददानो भवति स्वप्नकाल इव ॥ १ ॥

भाष्यार्थ—(मरणावस्थेंत चक्षुरादिकांवर अनुग्रह करणाऱ्या देवतांशाचा अधिदेवतारूपानें उपसंहार होतो, ते अंश अधिदेवतारूपास

प्राप्त होतात, याविषयीं दुसऱ्या श्रुतीचें आनुकूल्य दाखवितात--) हेंच 'यत्रास्य पुरुषस्य०' इत्यादि वाक्यांत सांगितलें आहे. 'ज्यावेळीं या मेलेल्या पुरुषाची वाक् अग्नींत लीन होते, प्राण वायूंत, चक्षु आदित्यांत लीन होतो' इत्यादि त्या वाक्याचा अर्थ आहे. (तर मग दुसऱ्या देहांत वागादिकांचा अभाव होईल, अशी आशंका घेऊन सांगतात--) पुनः देहग्रहणसमयीं ते देवतांश त्या त्या देहांतील वागादिकांचा यथास्थान आश्रय करतील. मुमूर्षूप्रमाणें निजणाऱ्या पुरुषाच्या सर्व इंद्रियांचा उपसंहार लिंगात्म्याकडून केला जातो व उत्पन्न होणाऱ्या पुरुषाप्रमाणें जागा होणाऱ्या पुरुषाचीं तीं इंद्रियें आपापल्या स्थानीं प्रादुर्भूत होतात; तेंच हें वाक्य सांगतें--चाक्षुष पुरुष 'यत्र-' ज्यावेळीं 'पराङ् पर्यावर्तते-' सर्व बाजूंनीं व्यावृत्त होतो [म्ह० चक्षूंतील आदित्यांश रूपापासून विमुख होतो] 'अथ-' त्यावेळीं तो मुमूर्षु 'अरूपज्ञ' होतो. तो रूपाला जाणत नाहीं. त्यावेळीं हा आत्मा, निद्राकालीं जसा, तसाच चक्षुरादि तेजोमात्रांचें सम्यक्- निर्लेपानें- निःशेष अभितः आदान--ग्रहण करणारा होतो. १.

एकीभवति न पश्यतीत्याहुरेकीभवति न जिघ्रतीत्याहुरेकीभवति न रसयत इत्याहुरेकीभवति न वदतीत्याहुरेकीभवति न शृणोतीत्याहुरेकी भवति न मनुत इत्याहुरेकीभवति न स्पृशतीत्याहुरेकीभवति न विजानातीत्याहुः॥

अर्थ—चक्षुरिंद्रिय लिंगात्म्याशीं एकरूप होतें त्यावेळीं हा पहात नाहीं, असें म्हणतात. घ्राणेंद्रिय एकरूप होतें, तेव्हां वास घेत नाहीं, असें म्हणतात. रसनेंद्रिय एकरूप होतें, तेव्हां रस जाणत नाहीं, असें म्हणतात. वागिंद्रिय एकरूप होतें, तेव्हां बोलत नाहीं, असें

म्हणतात. श्रोत्रेंद्रिय एकरूप होतें, तेव्हां ऐकत नाहीं, असें म्हणतात. मन लिंगात्म्याशीं एकरूप होतें, तेव्हां मनन करीत नाहीं, असें म्हणतात. त्वगिंद्रिय एकरूप होतें, तेव्हां स्पर्श करीत नाहीं, असें म्हणतात. बुद्धि लिंगात्म्याशीं एकरूप होते, तेव्हां जाणत नाहीं, असें म्हणतात.

तस्य हैतस्य हृदयस्याग्रं प्रद्योतते तेन प्रद्योतेनैष आत्मा निष्क्रामति चक्षुष्टो वा मूर्ध्नो वाऽन्येभ्यो वा शरीरदेशेभ्यस्तमुत्क्रामन्तं प्राणोऽनूत्क्रामति प्राणमनूत्क्रामन्तँ सर्वे प्राणा अनूत्क्रामन्ति सविज्ञानो भवति सविज्ञानमेवान्ववक्रामति । तं विद्याकर्मणी समन्वारभेते पूर्वप्रज्ञा च ॥ २ ॥

अर्थ---त्या या हृदयाचें अग्र–नाडीमुख–बाहेर जाण्याचें द्वार प्रद्योतित--अतिशय प्रकाशित होतें. त्या आत्मज्योतिःप्रकाशानें हा लिंगात्मा चक्षूच्या द्वारा, मूर्धप्रदेशांतून, किंवा दुसऱ्या शरीरप्रदेशांतून बाहेर निघतो. तो लिंगोपाधि आत्मा शरीर सोडून जाऊं लागला असतां त्याच्या मागोमाग प्राण जाऊं लागतो. प्राण अनूत्क्रमण करूं लागला असतां सर्व इंद्रियें अनूत्क्रमण करितात. त्यावेळीं हा आत्मा सविज्ञान–विशेष विज्ञानवान् होतो. तो त्या विज्ञानासहवर्तमानच गन्तव्य प्रदेशास जातो. परलोकास जाणाऱ्या त्याच्या मागोमाग ज्ञान, कर्म व पूर्वप्रज्ञा–विषयानुभववासना जातात. २.

एकीभवति करणजातं स्वेन लिङ्गात्मना । तदैनं पार्श्वस्था आहुर्न पश्यतीति । तथा घ्राणदेवतानिवृत्तौ घ्राणमेकीभवति लिङ्गात्मना । तदा न जिघ्रतीत्याहुः । समानमन्यत् । जिह्वायां सोमो वरुणो वा देवता तन्निवृत्त्यपेक्षया न रसयत इत्याहुः । तथा न वदति न शृणोति न

मनुते न स्पृशति न विजानातीत्याहुः। तदोपलक्ष्यते देवतानिवृत्तिः करणानां च हृदय एकीभावः ॥

भाष्यार्थ---(तर मग भोक्त्यानें ज्याचा उपसंहार केला आहे असा चक्षु नाहींसा होतो, अशी आशंका घेऊन सांगतात--) इंद्रियवर्ग स्वतःच्या लिंगात्म्याशीं एकरूप होतो. त्यावेळीं त्याच्या बाजूला बसलेले लोक हा 'पहात नाहीं,' असें म्हणतात. त्याचप्रमाणें घ्राणदेवतेची निवृत्ति झाली असतां घ्राणेंद्रिय लिंगात्म्याशीं एकरूप होतें. तेव्हां 'वास घेत नाहीं,' असें म्हणतात. [ ज्याप्रमाणें चक्षुर्देवतेची निवृत्ति झाली असतां चक्षु लिंगात्म्याशीं एकरूप होतें त्याचप्रमाणें घ्राणदेवतेच्या अंशाचें घ्राणानुग्रहाच्या निवृत्तीच्या द्वारा अंशी देवतेशीं ऐक्य झालें असतां घ्राणेंद्रिय लिंगात्म्याशीं एकरूप होतें, असा भावार्थ. ] बाकीचें सर्व एकसारखेंच व्याख्यान करावें. जिह्वेमध्यें सोम किंवा वरुण देवता आहे. तिच्या निवृत्तीच्या अपेक्षेनें [ म्ह० वरुणादि देवतेचा जिह्वेवरील अनुग्रह निवृत्त झाला असतां जिह्वेचें लिंगात्म्याशीं जें ऐक्य होतें त्याच्या अपेक्षेनें ] 'न रसयते-' रस चाखीत नाहीं, असें म्हणतात. [ सारांश त्या त्या अनुग्राहक देवतांशाचा त्या त्या इंद्रियावरील अनुग्रह निवृत्त होऊन त्या त्या अंशी देवतेची प्राप्ति झाली असतां त्या त्या इंद्रियाचें लिंगात्म्याशीं ऐक्य होतें, अशा अभिप्रायानें सांगतात-- ] तसेंच बोलत नाहीं, ऐकत नाहीं, मनन करीत नाहीं, स्पर्श करीत नाहीं, व जाणत नाहीं, असें म्हणतात. (मरणदशेंत रूपादिकांचें दर्शन वगैरे न होणें हें दोन अर्थांचें साधक आहे, असें सांगतात-) त्यावेळीं देवतांची निवृत्ति व इंद्रियांचा हृदयांत एकीभाव उपलक्षित होतो.

तत्र हृदय उपसंहृतेषु करणेषु योऽन्तर्व्यापारः स कथ्यते । तस्य हैतस्य प्रकृतस्य हृदयस्य हृदयच्छिद्रस्येत्येतत् । अग्रं नाडीमुखं निर्गमनद्वारं प्रद्योतते स्वप्नकाल इव स्वेन भासा तेजोमात्रादानकृतेन स्वेनैव ज्योतिषाऽऽत्मनैव च । तेनाऽऽत्मज्योतिषा प्रद्योतेन हृदयाग्रे-

णैष आत्मा विज्ञानमयो लिङ्गोपाधिर्निर्गच्छति निष्क्रामति । तथाऽऽथर्वणे "कस्मिन्वहमुत्क्रान्त उत्क्रान्तो भविष्यामि कस्मिन्वा प्रतिष्ठिते प्रतिष्ठास्यामीति स प्राणमसृजत" इति ॥

भाष्यार्थ---('तस्य हैतस्य' या वाक्याचें व्याख्यान-) मुमूर्षावस्थेंत हृदयामध्यें इंद्रियांचा उपसंहार झाला असतां आंतल्या आंत होणारा जो व्यापार तो सांगितला जातो. 'तस्य ह एतस्य हृदयस्य-' त्या या प्रकृत हृदयाचें--हृदय छिद्राचें असा भावार्थ. 'अग्रं-'नाडीचें मुख बाहेर निघण्याचें द्वार 'प्रद्योतते-' अतिशय द्योतित--प्रकाशित होतें. ज्याप्रमाणें स्वप्नकालीं स्वयं भासानें, स्वयं ज्योतीनें निजतो असें वर[पृ. ११२]व्याख्यान केलें आहे त्याप्रमाणेंच येथेंही तेजोमात्रांचें जें आदान-ग्रहण--उपसंहार त्यामुळें झालेलें जें वासनारूप--प्राप्य फलविषयक बुद्धिवृत्तिरूप--जो स्वयं प्रकाश त्यानें व स्वयं चैतन्यज्योतीनेंच हृदयाग्रप्रद्योतन होतें. (त्याची अर्थक्रिया--उपयोग सांगतात--)' तेन प्रद्योतेन-' त्या आत्मज्योतीनें--प्रद्योतानें हृदयाग्रानें 'एष आत्मा-' हा विज्ञानमय लिंगोपाधि 'निष्क्रामति-' बाहेर निघतो. (लिंगद्वारा आत्म्याच्या निर्गमनाची प्रतिज्ञा कां केली जात आहे ? तें सांगतात-) आथर्वणोपनिषदांत--प्रश्नोपनिषदांत 'कस्मिन्वहमुत्क्रान्त उत्क्रान्तो भविष्यामि०-' इत्यादि सांगितलें आहे. 'कोणता कर्ता उत्क्रान्त झाला असतां मी उत्क्रान्त होईन व कोण प्रतिष्ठित झाला असतां मी प्रतिष्ठित होईन, असें ईक्षण-पर्यालोचन करून तो प्राणाला--हिरण्यगर्भाला उत्पन्न करता झाला.' (प्रश्नोप० पृ. १०५ पहा)

तत्र चाऽऽत्मचैतन्यज्योतिः सर्वदाऽभिव्यक्ततरम् । तदुपाधिद्वारा ह्यात्मनि जन्ममरणगमनागमनादिसर्वविक्रियालक्षणः संव्यवहारः । तदात्मकं हि द्वादशविधं करणं बुद्ध्यादि तत्सूत्रं तज्जीवनं सोऽन्तरात्मा जगतस्तस्थुषश्च ॥

भाष्यार्थ---(आत्मा जर मरणसमयीं तेजोमात्रांचें ग्रहण करीत असेल तर तो सदा लिंगोपाधि नसतो, असें होतें, अशी आशंका घेऊन

सांगतात-) त्या लिंगात्म्यामध्यें आत्मचैतन्यज्योति सदा[1] अतिशय अभिव्यक्त होते. (' अहोपण आत्मोपाधिभूत लिंगाविषयीं प्रमाण काय ? ' अशी आशंका घेऊन 'निर्विकार आत्म्यामध्यें संव्यवहाराची उपलब्धि होणें हेंच त्याविषयीं प्रमाण आहे,' अशा आशयानें सांगतात-) त्या लिंगाख्य उपाधीच्या द्वाराच आत्म्याच्या ठिकाणीं जन्म, मरण, गमन-आगमन इत्यादि सर्व विक्रियारूप संव्यवहार होतो. (चक्षुरादि इंद्रियांची प्रसिद्धि हेंही लिंगाच्या अस्तित्वाविषयीं प्रमाण आहे,. असें सांगतात-) त्या लिंगरूपच बुद्धिप्रभृति बाराप्रकारेंचें[2] करण आहे. (वायुर्वै गौतम तत्सूत्रम्' ही श्रुतिही त्या लिंगाविषयीं प्रमाण आहे, असें सांगतात-) तेंच सूत्र आहे (जगाचें जीवनही त्याविषयीं प्रमाण आहे, असें म्हणतात-) तें जगाचें जीवन आहे. 'एष सर्वभूतान्तरात्मा' ही श्रुतिही यथोक्त लिंगाची सिद्धि करते-तो स्थिर-चर सृष्टीचा अन्तरात्मा आहे.

तेन प्रद्योतेन हृदयाग्रप्रकाशेन निष्क्रममाणः केन मार्गेण निष्क्रामतीति । उच्यते । चक्षुष्टो वा । आदित्यलोकप्राप्तिनिमित्तं ज्ञानं कर्म वा यदि स्यात् । मूर्ध्नो वा ब्रह्मलोकप्राप्तिनिमित्तं चेत् । अन्येभ्यो वा शरीरदेशेभ्यः शरीरावयवेभ्यो यथाकर्म यथाश्रुतम् ॥

भाष्यार्थ—(लिंगोपाधि आत्म्याचा मरणसमयीं हृदयांतून पूर्वोक्त प्रकाशानें निघण्याचा मार्ग सांगतात-) त्या प्रद्योतानें-हृदयाग्रप्रकाशानें बाहेर निघणारा तो कोणत्या मार्गानें बाहेर पडतो?तेंच श्रुतींत सांगितलें जात आहे. चक्षूंच्या द्वारा किंवा (इतर द्वारानें तो बाहेर पडतो. 'अहो पण मार्गाचा असा विकल्प कां सांगतां ? कोणता तरी एकच मार्ग कां सांगत नाहीं ?' उत्तर-) आदित्यलोकाच्या प्राप्तीचें निमित्त असें ज्ञान किंवा कर्म जर त्याचें असेल तर तो चक्षूच्या द्वारा जातो. ब्रह्मलोकप्राप्तीला कारण

---

१ सदा म्ह० जोंवर लिंगाचें अस्तित्व असतें तोंवर.

२ मनासह इंद्रियें अकरा आहेत, अशी प्रसिद्धि असल्यामुळें 'बारा प्रकारचें' असें येथें म्हटलें आहे.

होणारें ज्ञान-उपासना किंवा कर्म जर त्यानें केलें असेल तर तो मूर्ध-प्रदेशांतून जातो. अथवा त्याचें जसें श्रुत--अध्ययन–विद्या असेल अथवा जसें कर्म असेल त्याप्रमाणें तो दुसऱ्या शरीरप्रदेशांतून--दुसऱ्या शरीरावयवांपासून बाहेर पडतो.

तं विज्ञानात्मानमुत्क्रामन्तं परलोकाय प्रस्थितं परलोकायोद्भूताकूतमित्यर्थः । प्राणः सर्वाधिकारिस्थानीयो राज्ञ इवानूत्क्रामति । तं च प्राणमनूत्क्रामन्तं वागादयः सर्वे प्राणा अनूत्क्रामन्ति । यथाप्रधानान्वाचिख्यासेयं न तु क्रमेण सार्थवद्गमनमिह विवक्षितम् ॥

भाष्यार्थ—'तं उत्क्रामन्तं-' त्या उत्क्रमण करणाऱ्या--परलोकास जावयास निघालेल्या विज्ञानात्म्याला ('अहोपण त्याचें गमन प्राणाच्या गमनाधीन असतें नव्हे का?' अशी आशंका घेऊन म्हणतात--) परलोकासाठीं ज्याची वासना उत्पन्न झाली आहे, असा 'परलोकास निघालेल्या' या शब्दांचा अर्थ आहे. असो; त्याला अनुसरून राजाच्या सर्वाधिकारी पुरुषाच्या स्थानीं असलेला प्राण जातो. (राजाचा सर्वाधिकारी जसा त्याच्या मागोमाग अनुक्रमण करतो त्याप्रमाणें सर्वाधिकाऱ्याच्या स्थानीं असलेला प्राण विज्ञानात्म्याच्या मागोमाग अनूत्क्रमण करतो.) त्या अनूत्क्रमण करणाऱ्या प्राणाच्या मागोमाग वागादिक सर्व प्राण अनूत्क्रमण करतात. ('अहोपण जीवाचें प्राणादिकांशीं तादात्म्य असतांना येथें 'अनु-'शब्दानें क्रम सांगण्याची इच्छा कशी केली आहे?' उत्तर–) ही येथील अनुगमन सांगण्याची इच्छा यथाप्रधान आहे.[म्ह० त्यांच्या प्राधान्याला अनुलक्षून आहे. ] विज्ञानात्मा, प्राण, वागादिक यांचें एकाद्या समूहांतील लोकांप्रमाणें क्रमानें गमन होतें, हें येथें विवक्षित नाहीं. (अर्थात् जीवादिकांच्या प्राधान्याच्या अभिप्रायानें हा अनुशब्दाचा प्रयोग आहे. गमनक्रमाच्या अभिप्रायानें नाहीं.कारण तेथें देश व काल यांच्या भेदाचा अभाव आहे.प्रवाश्यांच्या समूहांतील व्यक्तींमध्यें क्रमानें गमन होत असल्याचें दिसतें. तसें प्राणादिकांत दिसत नाहीं.)

तदैष आत्मा सविज्ञानो भवति स्वप्न इव विशेषविज्ञानवान्भवति कर्मवशान्न स्वतन्त्रः। स्वातन्त्र्येण हि सविज्ञानत्वे सर्वः कृतकृत्यः स्यात्। नैव तु तल्लभ्यते। अत एवाऽऽह व्यासः "सदा तद्भाव भावितः" इति। कर्मणा तूद्भाव्यमानेनान्तःकरणवृत्तिविशेषाश्रितवासनात्मकविशेषविज्ञानेन सर्वो लोक एतस्मिन्काले सविज्ञानो भवति। सविज्ञानमेव च गन्तव्यमन्ववक्रामत्यनुगच्छति विशेषविज्ञानोद्भासितमेवेत्यर्थः। तस्मात्तत्काले स्वातन्त्र्यार्थं योगधर्मानुसेवनं परिसंख्यानाभ्यासश्च विशिष्टपुण्योपचयश्च श्रद्दधानैः परलोकार्थिभिरप्रमत्तैः कर्तव्य इति॥

भाष्यार्थ--(वर हृदयाग्रप्रद्योतन जें सांगितलें आहे तें 'सविज्ञानो भवति' या श्रुतीनें प्रकट करितात-) त्यावेळीं हा आत्मा 'सविज्ञान होतो' स्वप्नांत जसा, त्याप्रमाणें कर्मवशात् विशेष विज्ञानवान् होतो. स्वतंत्रपणें-स्वेच्छेनें नव्हे. कारण स्वातंत्र्यानेंच जर त्याला सविज्ञानत्व असतें-स्वेच्छेनें जर तो सविज्ञान होऊं शकला असता तर प्रत्येकजण कृतकृत्य झाला असता. पण तें सविज्ञानत्व पूर्व दृढ संस्कारावाचून प्राप्त होत नाहीं. म्हणूनच व्यासांनीं भगवद्गीतेंत 'सदा[1] तद्भावभावितः' असें म्हटलें आहे. यावेळीं सर्व लोक-प्रत्येक शरीर सोडणारा जीव कर्माच्या योगानें उद्भूत होणाऱ्या अन्तःकरणवृत्तिविशेषाश्रित वासनात्मक विशेष विज्ञानानें सविज्ञान होतो. [कर्मवशात् हें त्याचें विज्ञान उत्पन्न होतें. अन्तःकरणाची पुढील देहाविषयीं जी वृत्ति तदाश्रित म्ह० तद्रूप जें वासनात्मक विशेष विज्ञान त्या विशेष विज्ञानानें, असा भावार्थ.] आणि याप्रमाणें तो सविज्ञान झाला म्हणजे तो त्या'सविज्ञानमेव-' विज्ञानासहवर्तमानच त्या उद्दिष्ट--त्या विशेष विज्ञानानें उद्भासित--अशा गन्तव्य स्थानीं 'अन्ववक्रामति-' अनुगमन करतो. (उत्क्रान्तीच्या--शरीरत्यागाच्या पूर्वींच--पूर्व क्षणींच तो सविज्ञान होतो, असें सांगणाऱ्या श्रुतीचें

१ सर्वदा त्या पदार्थांच्या भावनेनें भावित-सतत त्याचें स्मरण करीत असल्यामुळें त्याच्या स्मरणाचा विषय या रूपानें परिचित झालेला.

तात्पर्य सांगतात–) पुरुष कर्मानुसारी असल्यामुळें मरणसमयीं अन्त्य विज्ञान उत्पन्न करण्याचें स्वातंत्र्य रहावें–पुरुषाला आपल्या इच्छेप्रमाणें अन्त्य विज्ञान उत्पन्न करतां यावें म्हणून योगधर्मांचें अनुसेवन करावें. [योग म्हणजे चित्तवृत्तींचा निरोध, त्याचे धर्म यम-नियमादिक त्यांचें अनुसेवन म्ह० पुनः पुनः आवर्तन] व परिसंख्यानाभ्यास म्ह० योगानुष्ठान करावें. त्याचप्रमाणें श्रद्धाळू, परलोकार्थी, व अप्रमत्त–सावधनचित्त अशा लोकांनीं विशिष्ट पुण्याचा उपचय करावा, हा प्रकृत श्रुतीचा विधेय अर्थ आहे.

सर्वशास्त्राणां यत्नतो विधेयोऽर्थो दुश्चरिताच्चोपरमणम् । न हि तत्काले शक्यते किंचित्संपादयितुम् । कर्मणा नीयमानस्य स्वातन्त्र्याभावात् । पुण्यो वै पुण्येन कर्मणा भवति पापः पापेनेत्युक्तम् । एतस्य ह्यनर्थस्योपशमोपायविधानाय सर्वशाखोपनिषदः प्रवृत्ताः । न हि तद्विहितोपायानुसेवनं मुक्त्वाऽऽत्यन्तिकोऽस्यानर्थस्योपशमोपायोऽस्ति । तस्मादत्रैवोपनिषद्विहितोपाये यत्नपरैर्भवितव्यमित्येष प्रकरणार्थः ॥

भाष्यार्थ—(शिवाय पुण्याचा उपचय–वृद्धि करावी, या अर्थामध्यें सर्वच विधिकांडाचें पर्यवसान झालें आहे, असें सांगतात–) सर्वशास्त्रांचा यत्नपूर्वक विधेय अर्थ जर कांहीं असेल तर तो पुण्याची वृद्धि करावी व पुढील दुश्चरणापासून निवृत्त व्हावें, हा आहे. पण यांतील कांहींही त्यावेळीं संपादन करितां येणें शक्य नाहीं. कारण कर्माकडून नेल्या जाणाऱ्या त्याला त्यावेळीं स्वातंत्र्य नसतें. (त्यामुळें मरणकालीं आम्ही उत्तम भावना करूं, हें म्हणणें व्यर्थ आहे. कर्माकडूनच जीव परलोकीं नेला जातो, याविषयीं प्रमाण--)'पुण्य कर्मानें पुण्यवान् होतो व पापानें पापी होतो,' हें वर [अ. ३ पृ. ५९] सांगितलेंच आहे. ('अहोपण पुण्याच्या वृद्धीनेंच जर वरील अनर्थाची निवृत्ति होत असेल तर तत्त्वज्ञान व्यर्थ आहे,' अशी आशंका घेऊन सांगतात--) याच अनर्थाच्या उपशमाच्या उपायांचें विधान करण्यासाठीं सर्व शाखांच्या उपनिषदांची प्रवृत्ति झाली आहे. (येथें तत्त्व-

ज्ञान हाच अनर्थोपशमाचा उपाय आहे. त्याचें विधान म्हणजे प्रकाशन. त्यासाठीं उपनिषत्प्रवृत्ति आहे. 'अहोपण देवताध्यानानें अनर्थाची निवृत्ति होईल, तत्त्वज्ञानच कशाला हवें?' अशी आशंका घेऊन सांगतात--) सर्व शाखांच्या उपनिषदांत सांगितलेल्या उपायांचें अनुसेवन करणें यास सोडून या अनर्थाचा आत्यन्तिक उपशम होण्यास दुसरा उपाय नाहीं. तस्मात् त्याच उपनिषद्विहित उपायामध्यें मनुष्यांनीं यत्नपर व्हावें, [या सविज्ञानवाक्यानें ज्ञापित केलेल्या उपायाविषयींच अतिशय यत्न करावा,] हा या प्रकरणाचा अर्थ आहे.

शकटवत्संभृतसंभार उत्सर्जन्यातीत्युक्तं किं पुनस्तस्य परलोकाय प्रवृत्तस्य पथ्यदनं शाकटिकसंभारस्थानीयं गत्वा वा परलोकं यद्भुङ्क्ते शरीराद्यारम्भकं च यत्तत्किमिति । उच्यते ॥

भाष्यार्थ---(गतार्थाचा अनुवाद करून प्रश्नपूर्वक पुढील वाक्य घेतात व त्याचें व्याख्यान करितात--) गाड्याप्रमाणें ज्यानें सर्व संभार गोळा केला आहे, असा जीव शब्द करीत जातो हें सांगितलें.पण परलोकास जावयास निघालेल्या त्याचें मार्गांतील गाडीवानाच्या जेवणाच्या संभारासारखें-तत्स्थानीय भक्ष्य काय ? किंवा परलोकास जाऊन तो जें खातो, किंवा जें तेथें त्याच्या शरीरादिकांचा आरंभ करणारें तें काय?असा प्रश्न कराल तर श्रुतीकडून सांगितलें जातें.

तं परलोकाय गच्छन्तमात्मानं विद्याकर्मणी विद्या च कर्म च विद्याकर्मणी विद्या सर्वप्रकारा विहिता प्रतिषिद्धा चाविहिताऽप्रतिषिद्धा च । तथा कर्म विहितं प्रतिषिद्धं चाविहितमप्रतिषिद्धं च समन्वारभेते सम्यगन्वारभेते अन्वालभेते अनुगच्छतः पूर्वप्रज्ञा च पूर्वानुभूतविषया प्रज्ञा पूर्वप्रज्ञाऽतीतकर्मफलानुभववासनेत्यर्थः ॥

भाष्यार्थ—'तं' त्या परलोकास जाणाऱ्या आत्म्याला 'विद्याकर्मणी-' विद्या व कर्म,विद्या सर्वप्रकारची-विहित, प्रतिषिद्ध, अविहित,अप्रतिषिद्ध; तसेंच कर्म विहित-प्रतिषिद्ध, अविहित-अप्रतिषिद्ध 'समन्वा-

रभेते-' चांगल्याप्रकारें अन्वारब्ध होतात,त्याच्या मागून जातात. तशीच 'पूर्वप्रज्ञा-' पूर्वानुभूतविषय प्रज्ञा--पूर्वप्रज्ञा. मागील कर्मफलानुभवाची वासना, असा याचा इत्यर्थ. ( ध्यानरूप ही विहित विद्या आहे, नग्नस्त्रीदर्शनादिरूप ही निषिद्ध विद्या, घटादिविषयक विद्या ही अविहित विद्या आहे. मार्गातील पडलेल्या तृणादिकांचें ज्ञान ही अप्रतिषिद्ध विद्या आहे. यागादिक हें विहित कर्म आहे. ब्राह्मणहननादिक हें प्रतिषिद्ध कर्म आहे. गमनादिक हें अविहित कर्म आहे व पापण्या लवणें, इत्यादिक हें अप्रतिषिद्ध कर्म आहे. या सर्वप्रकारच्या विद्या व सर्वप्रकारचें कर्म त्याच्या मागोमाग जातें. )

सा च वासनाऽपूर्वकर्मारम्भे कर्मविपाके चाङ्गं भवति । तेनासावप्यन्वारभते । न हि तया वासनया विना कर्म कर्तुं फलं चोपभोक्तुं शक्यते । न ह्यनभ्यस्ते विषये कौशलमिन्द्रियाणां भवति । पूर्वानुभववासनाप्रवृत्तानां त्विन्द्रियाणामिहाभ्यासमन्तरेण कौशलमुपपद्यते । दृश्यते च केषांचित्कासुचित्क्रियासु चित्रकर्मादिलक्षणासु विनैवेहाभ्यासेन जन्मत एव कौशलं कासुचिदत्यन्तसौकर्ययुक्तास्वप्यकौशलं केषांचित् । तथा विषयोपभोगेषु स्वभावत एव केषांचित्कौशलाकौशले दृश्येते । तच्चैतत्सर्वं पूर्वप्रज्ञोद्भवानुद्भवनिमित्तम् । तेन पूर्वप्रज्ञया विना कर्मणि वा फलोपभोगे वा न कस्यचित्प्रवृत्तिरुपपद्यते ॥

भाष्यार्थ—( विद्या व कर्म हीं उपभोगाचीं साधनें आहेत अशी प्रसिद्धि असल्यामुळें त्यांचें अन्वारंभण-अनुगमन जरी होत असलें तरी वासना कशासाठीं जाते ? अशी आशंका घेऊन सांगतात--) ती वासना अपूर्व कर्माच्या आरंभीं व कर्मविपाकप्रसंगीं त्या दोघांचेंही अंग होते. त्यामुळें तीही त्याच्या मागोमाग जाते. कारण त्या वासनेवाचून जीव कर्म करण्यास अथवा फळाचा उपभोग घेण्यास समर्थ होत नाहीं. कारण अनभ्यस्त-अपरिचित विषयामध्यें इंद्रियांचें कौशल असत

नाहीं. पण या लोकीं पूर्वानुभवाच्या वासनेनें प्रवृत्त झालेल्या इंद्रियांचें कौशल अभ्यासावाचूनही उपपन्न होतें. कित्येकांचें चित्रें काढणें इत्यादिरूप कांहीं क्रियांमध्यें जन्मतःच—या जन्मांतील अभ्यासावाचूनच कौशल दिसतें; पण कित्येकांचें अत्यंत सौलभ्ययुक्त अशा क्रियांमध्येंही अकौशल दिसतें. त्याचप्रमाणें विषयोपभोगांमध्यें कित्येकांचें स्वभावतःच कौशल व अकौशल दिसतें. तें हें सर्व पूर्वप्रज्ञेचा उद्भव व अनुद्भव या निमित्तानें संभवतें. त्यामुळें पूर्वप्रज्ञेवाचून कर्मांमध्यें किंवा फलोपभोगामध्यें कोणाचीही प्रवृत्ति उपपन्न होत नाहीं.

तस्मादेतत्त्रयं शाकटिकसंभारस्थानीयं परलोकपथ्यदनं विद्याकर्मपूर्वप्रज्ञाख्यम् । यस्माद्विद्याकर्मणी पूर्वप्रज्ञा च देहान्तरप्रतिपत्त्युपभोगसाधनं तस्माद्विद्याकर्मादि शुभमेव समाचरेद्यथेष्टदेहसंयोगोपभोगौ स्यातामिति प्रकरणार्थः ॥ २ ॥

भाष्यार्थ—( समन्वारंभवचनाच्या अर्थाचें निगमन करितात--) तस्मात् विद्या, कर्म व पूर्वप्रज्ञा या नांवाचें हें त्रय गाडीवानाच्या संभाराच्या स्थानीं असलेलें परलोकाचें पाथेय आहे. ( याचाच तात्पर्यार्थ सांगतात—) ज्याअर्थीं विद्या, कर्म व पूर्वप्रज्ञा हें दुसऱ्या देहाची प्राप्ति व उपभोग यांचें साधन आहे त्याअर्थीं विद्या, कर्म इत्यादि शुभच आचरावें; म्हणजे इष्ट देहाची प्राप्ति व उपभोग मिळतील, असा या प्रकरणाचा अर्थ आहे. २

एवं विद्यादिसंभारसंभृतो देहान्तरं प्रतिपद्यमानो मुक्त्वा पूर्वं देहं पक्षीव वृक्षान्तरं देहान्तरं प्रतिपद्यते । अथ वाऽऽतिवाहिकेन शरीरान्तरेण कर्मफलजन्मदेशं नीयते । किंचात्रस्थस्यैव सर्वगतानां करणानां वृत्तिलाभो भवत्याहोस्विच्छरीरस्थस्य संकुचितानि करणानि मृतस्य भिन्नघटप्रदीपप्रकाशवत्सर्वतो व्याप्य पुनर्देहान्तरारम्भे संकोचमुपगच्छन्ति । किंच मनोमात्रं वैशेषिकसमय इव देहान्तरारम्भदेशं प्रति गच्छति किंवा कल्पनान्तरमेव वेदान्तसमय इति ॥

भाष्यार्थ—( तृणजलायुकावाक्याचें अवतरण करण्यासाठीं मागील अर्थाचा अनुवाद करून वाद्यांचे विवाद दाखविणारे भाष्यकार प्रथम दिगंबरमत सांगतात--) याप्रमाणें विद्यादि संभारानें संपन्न झालेला व दुसऱ्या देहास प्राप्त होणारा जीव, पक्षी जसा दुसऱ्या वृक्षावर जातो त्याप्रमाणें, पूर्व देह सोडून दुसऱ्या देहास प्राप्त होतो, ( देवतावाद्यांचें मत सांगतात–) अथवा दुसऱ्या आतिवाहिक शरीरानें कर्मफलभूत जन्म जेथें व्हावयाचा असतो तेथें तो नेला जातो ? ( देवता ज्या शरीरानें विशिष्ट अशा जीवाला परलोकास नेते तें आतिवाहिक शरीर होय. आतां सांख्यादिकांचें मत सांगतात-) कीं येथें असलेल्याच त्याला सर्वगत इंद्रियांचा वृत्तिलाभ होतो ? ( सिद्धान्त सुचवितात–) कीं शरीरांत असेपर्यंत संकुचित होऊन राहिलेलीं इंद्रियें तो मेला असतां फुटलेल्या घटांतील प्रदीपाच्या प्रकाशाप्रमाणें तीं सर्वतः व्यापून–पसरून पुनः दुसऱ्या देहाचा आरंभ जेव्हां होतो तेव्हां संकोच पावतात ? कीं वैशेषिकांच्या सिद्धान्ताप्रमाणें केवल मन दुसऱ्या देहाचा आरंभ जेथें होत असेल तेथें जातें कीं वेदान्तसिद्धान्तांत आणखीं कांहीं निराळीच कल्पना आहे ?

उच्यते । "त एते सर्व एव समा सर्वेऽनन्ताः" इति श्रुतेः सर्वात्मकानि तावत्करणानि । सर्वात्मकप्राणसंश्रयाच्च । तेषामाध्यात्मिकाधिभौतिकपरिच्छेदः प्राणिकर्मज्ञानभावनानिमित्तः । अतस्तद्वशात्स्वभावतः सर्वगतानामनन्तानामपि प्राणानां कर्मज्ञानवासनानुरूपेणैव देहान्तरारम्भवशात्प्राणानां वृत्तिः संकुचति विकसति च ॥

भाष्यार्थ—( सिद्धान्ताला प्रामाणिकत्व असल्यामुळें तेंच मत ग्राह्य असून इतर मतें अप्रामाणिक असल्यामुळें त्याज्य आहेत, अशा अभिप्रायानें सांगतात–) वरील प्रश्नांचें उत्तर सांगितलें जातें. 'त एते सर्वे एव०-' ते हे सर्व सम व सर्व अनन्त आहेत, अशी श्रुति असल्यामुळें इंद्रियें तर सर्वात्मक आहेत. ( त्याविषयीं दुसरा हेतु–) करणांनीं सर्वा-

त्मक प्राणाचा आश्रय केलेला असल्यामुळें तीं सर्वात्मक आहेत. ( असें जर आहे तर तीं आपल्या शरीरांत व इतर प्राण्यांच्या शरीरांत परिच्छिन्न असल्यासारखीं कशीं दिसतात ? अशी आशंका घेऊन सांगतात–) प्राण्यांचें कर्म, ज्ञान व भावना यांच्या निमित्तानें करणांचा आध्यात्मिक व आधिभौतिक परिच्छेद होतो. ( आधिदैविकरूपानें इंद्रियें जरी अपरिच्छिन्न असलीं तरी तीं आध्यात्मिक व आधिभौतिक रूपानें परिच्छिन्न होतात, असें सिद्ध झालें असतां फलित सांगतात--) यास्तव वरील श्रुतीच्या बळानें स्वभावतः म० देवतास्वरूपानुसार सर्वगत व अनन्त अशाही प्राणांची वृत्ति भ[illegible] कर्म-ज्ञान-वासनानुरूपच दुसऱ्या देहाच्या आरंभामुळें संकुचित होते व विकसित होते.

तथा चोक्तम्। " समः प्लुषिणा समो मशकेन समो नागेन सम एभिस्त्रिभिर्लोकैः समोऽनेन सर्वेण" इति । तथा चेदं वचनमनुकूलम्। "स यो हैताननन्तानुपास्ते"इत्यादि"तं यथा यथोपासते" इति च ॥

भाष्यार्थ—( इंद्रियांच्या वृत्तीचा संकोच व विकास होतो, याविषयीं प्रमाण--) ' समः प्लुषिणा समो मशकेन-' इत्यादि श्रुतींत तसें सांगितलें आहे. ' प्राण पिसवेच्या प्रमाणाचा, मशकाच्या एवढा, हत्तीच्या सारखा, या तीन लोकांच्या बरोबरीचा, या सर्वांशीं सम असा होतो ' असा त्या श्रुतीचा अर्थ आहे. ( परिच्छिन्न प्राणाच्या उपासनेंत गुण व दोष सांगितलेले आहेत, तें गुण-दोषकथनही प्राणाचा संकोच व विकास यांचें सूचक आहे, असें सांगतात--) त्यालाच ' स यो हैतान्०-' तो जो या अनन्ताची उपासना करतो इत्यादि वचन अनुकूल आहे. ' तं यथा यथोपासते०-' त्याची जशी जशी उपासना करतो तसाच होतो, हेंही त्याला अनुकूल आहे.

तत्र वासना पूर्वप्रज्ञाख्या विद्याकर्मतन्त्रा जलूकावत्संततैव स्वप्नकाल इव कर्मकृतं देहाद्देहान्तरमारभते हृदयस्थैव पुनर्देहान्तरारम्भे देहान्तरं पूर्वाश्रयं विमुञ्चतीत्येतस्मिन्नर्थे दृष्टान्त उपादीयते ॥

भाष्यार्थ—( आतां तृणावरील जळूचा दृष्टान्त दिलेला असल्यामुळें दुसरा देह घेऊन आत्मा पूर्वदेह सोडतो, असें होतें. त्यावरून पौराणिक ' आत्मा स्थूल देहासहवर्तमानच लोकान्तरास जातो, 'असें वर्णन करितात. पण त्याचा निषेध करण्यासाठीं दृष्टान्तवाक्याचें तात्पर्य सांगतात--) देहांतून निघण्याच्या पूर्वीं विद्या व कर्म यांच्या अधीन असलेली ' पूर्वप्रज्ञा ' या नांवाची वासना जळूप्रमाणें संततच--पसरलेलीच असून स्वप्नकालीं ज्याप्रमाणें, त्याप्रमाणें हृदयस्थ अशीच ती या देहाहून निराळा कर्मकृत देह आरंभिते व दुसऱ्या देहाचा आरंभ झाला म्हणजे पूर्वींचा आश्रय--पूर्व देह सोडते, याअर्थी दृष्टान्ताचें ग्रहण केलें जातें. ( देहांतून निघण्यापूर्वींच हृदयांत स्थित झालेली पूर्वप्रज्ञा विद्याकर्मनिमित्त भावी देहाला स्पर्श करते.जीवही त्या देहाचे ठिकाणीं अभिमान धरतो. नंतर ती पूर्वदेह सोडते. ज्याप्रमाणें स्वप्नांत 'मी देव आहें,' असा अभिमान धरणारा जीव त्या अन्य देहांत असलेला असाच होतो त्याचप्रमाणें उत्क्रान्तीच्या वेळीं तो या देहांत असतांनाच भावी देहावरील अभिमानामुळें त्या देहांतच असल्या सारखा होतो. त्यामुळें पूर्व देहविशिष्ट असाच तो परलोकीं जातो हें म्हणणें अयोग्य आहे, असा भावार्थ. )

तद्यथा तृणजलायुका तृणस्यान्तं गत्वाऽन्यमाक्रममाक्रम्याऽऽत्मानमुपसꣳहरत्येवमेवायमात्मेदꣳ शरीरं निहत्याविद्यां गमयित्वाऽन्यमाक्रममाक्रम्याऽऽत्मानमुपसꣳहरति ॥३॥

अर्थ—त्याविषयीं–देहान्तरसंचाराविषयीं हें निदर्शन--दृष्टान्त आहे. जशी गवतावरील जळू तृणाच्या टोंकाला जाऊन दुसरें तृण या आक्रमाचा आश्रय करून आपला उपसंहार करते--आपल्या शरीराचा पूर्व अवयव अन्त्य अवयवाच्या ठिकाणीं ओढून घेते त्याप्रमाणें हा आत्मा या

शरीराला मारून, त्याला अचेतन करून दुसऱ्या आक्रमाचें आक्रमण करून आपला उपसंहार करतो. ३.

तत्तत्र देहान्तरसंचार इदं निदर्शनम् । यथा येन प्रकारेण तृणजलायुका तृणजलूका तृणस्यान्तमवसानं गत्वा प्राप्यान्यं तृणान्तरमाक्रममाक्रम्यत इत्याक्रमस्तमाक्रममाक्रम्याऽऽश्रित्याऽऽत्मानमात्मनःपूर्वावयवमुपसंहरत्यन्त्यावयवस्थाने । एवमेवायमात्मा यः प्रकृतः संसारीदं शरीरं पूर्वोपात्तं निहत्य स्वप्नं प्रतिपित्सुरिव पातयित्वाऽविद्यां गमयित्वाऽचेतनं कृत्वा स्वात्मोपसंहारेणान्यमाक्रमं तृणान्तरमिव तृणजलूका शरीरान्तरं गृहीत्वा प्रसारितया वासनयाऽऽत्मानमुपसंहरति ॥

भाष्यार्थ—' तत्-' दुसऱ्या देहांतील संचाराविषयीं हें निदर्शन—दृष्टान्त आहे. ' यथा-' ज्याप्रमाणें ' तृणजलायुका-' तृणावरील जळू—कीड ' तृणस्यान्तं-' तृणाच्या टोंकास 'गत्वा-' जाऊन—पोंचून 'अन्यं आक्रमं आक्रम्य-' दुसऱ्या तृणास—' आक्रमं-' ज्याचें आक्रमण केलें जातें तो आक्रम—आश्रय, त्या दुसऱ्या तृणाच्या आश्रयाचें ' आक्रम्य-' आक्रमण--आश्रय--करून ' आत्मानं-' आपल्या पूर्वावयवास--अंत्यावयवाचे स्थानीं ' उपसंहरति-' ओढून घेते. ( आपला उपसंहार करते ) ' एवमेवायमात्मा-' याप्रमाणेंच हा आत्मा--जो प्रकृत संसारी ' इदं शरीरं निहत्य-' हें शरीर- पूर्वी संपादन केलेलें ' निहत्य-' मारून स्वप्नास प्राप्त होण्याची इच्छा करणारा जसा, त्याप्रमाणें पूर्वोपात्त शरीरास पाडवून ' अविद्यां गमयित्वा-' अचेतन करून स्वात्मोपसंहार करून [ म्हणजे पूर्वदेहाच्या ठिकाणीं हा मी असा जो अभिमान असतो त्याचा त्याग करून ] ' अन्यं आक्रमं ' तृणजळू जशी दुसऱ्या तृणास आक्रमिते त्याप्रमाणें अन्य आक्रमास--आश्रयास--भावी देहास आक्रमून -पसरलेल्या वासनेनें दुसरें शरीर घेऊन आपला उपसंहार करतो.

तत्राऽऽत्मभावमारभते यथा स्वप्ने देहान्तरमारभते स्वप्नदेहान्तरस्थ इव शरीरारम्भदेश आरभ्यमाणे देहे जङ्गमे स्थावरे वा । तत्र च

कर्मवशात्करणानि लब्धवृत्तीनि संहन्यन्ते। बाह्यं च कुशमृत्तिकास्थानीयं शरीरमारभ्यते। तत्र च करणव्यूहमपेक्ष्य वागाद्यनुग्रहायाग्न्यादिदेवताः संश्रयन्ते। एष देहान्तरारम्भविधिः ॥ ३ ॥

भाष्यार्थ—( उपसंहाराचें स्वरूप सांगतात--) ज्याप्रमाणें स्वप्नदेहान्तरस्थ जीव स्वप्नांत दुसऱ्या देहाचा आरंभ करतो त्याप्रमाणें शरीरारंभप्रदेशीं स्थावर किंवा जंगम देहाचा आरंभ होऊं लागला असतां जीव त्यांत आत्मभावाचा आरंभ करतो. ( आरब्ध झालेल्या--वाढूं लागलेल्या दुसऱ्या देहांत सूक्ष्म देहाची अभिव्यक्ति होते, असें सांगतात--) त्यांत कर्म-विद्या-पूर्वप्रज्ञांच्या योगानें इंद्रियें, ज्यांना वृत्ति—व्यापार प्राप्त झाला आहे, अशीं रचलीं जातात, (' अहो पण लिंगदेहाच्या बलानेंच अर्थक्रियासिद्धि जर होत आहे तर स्थूलशरीराचा कांहीं उपयोग नाहीं,' अशी आशंका घेऊन 'स्थूलशरीरावाचून सूक्ष्म शरीराचें अर्थक्रियाकारित्व—व्यवहारोपयोगी क्रियाकर्तृत्व--सिद्ध होत नाहीं,' अशा अभिप्रायानें सांगतात--) व बाह्य कुश-मृत्तिका यांच्या स्थानीं असलेलें जड शरीर आरब्ध होतें. त्याचा आरंभ होतो. ( याप्रमाणें दोन्ही देहांचा आरंभ झाला असतां इंद्रियांमध्यें देवतांचें अनुग्राहक या रूपानें अवस्थान दाखवितात--) त्या स्थूल देहांत इंद्रियांची अभिव्यक्ति व्हावी म्हणून अग्न्यादि देवता वागादिकांवर अनुग्रह करण्यासाठीं त्याचा आश्रय करितात. हा दुसऱ्या देहाच्या आरंभाचा विधि आहे. ३.

तद्यथा पेशस्कारी पेशसो मात्रामपादायान्यन्नवतरं कल्याणतरꣳ रूपं तनुत एवमेवायमात्मेदꣳ शरीरं निहत्याविद्यां गमयित्वाऽन्यन्नवतरं कल्याणतरꣳ रूपं कुरुते पित्र्यं वा गान्धर्वं वा दैवं वा प्राजापत्यं वा ब्राह्मं वाऽन्येषां वा भूतानाम् ॥ ४ ॥

अर्थ——ह्याविषयीं दृष्टान्त—ज्याप्रमाणें सुवर्णकार--सोनार सोन्याची मात्रा म्ह० अंश काढून घेऊन पूर्व रचनेहून निराळें अतिशय नवें व कल्याणाहून अधिक कल्याण--अधिक चांगलें रूप निर्माण करतो त्याप्रमाणें हा आत्मा हें शरीर मारून त्याला निश्चेष्ट करून दुसरें पहिल्यापेक्षां अधिक नवें व त्याहून अधिक चांगलें पितरांचें, गंधर्वांचें, देवांचें, प्रजापतीचें, ब्रह्मदेवाचें, किंवा अन्यभूतांचें रूप निर्माण करतो. ४.

तत्र देहान्तरारम्भे नित्योपात्तमेवोपादानमुपमृद्योपमृद्य देहान्तरमारभत आहोस्विदपूर्वमेव पुनः पुनरादत्त इति । अत्रोच्यते दृष्टान्तस्तत्रैतस्मिन्नर्थे । यथा पेशस्कारी पेशः सुवर्णं तत्करोतीति पेशस्कारी सुवर्णकारः पेशसः सुवर्णस्य मात्रामपादायापच्छिद्य गृहीत्वाऽन्यत्पूर्वस्माद्रचनाविशेषान्नवतरमभिनवतरं कल्याणात्कल्याणतरं रूपं तनुते निर्मिनोति । एवमेवायमात्मेत्यादि पूर्ववत् ॥

भाष्यार्थ——( पेशस्कारीवाक्यानें ज्या शंकेची व्यावृत्ति करावयाची आहे ती शंका सांगतात--) त्या दुसऱ्या देहाच्या अरंभाचे वेळीं नित्य उपात्त--संचित--उपादानच पुनः पुनः मोडून दुसरा देह आरंभिला जातो कीं अपूर्व असेंच उपादान पुनः पुनः घेतो ? ( संसारी जीवाचा प्रस्तुत दुसरा देह करावयाचा झाला म्हणजे त्याचें उपादानद्रव्य काय असतें ? कीं उपादान नसतेंच. जर उपादान नसेल तर भावरूप कार्य सिद्ध होणार नाहीं, आणि जर असेल तर तें काय ? भूतपंचक कीं दुसरें कांहीं ? जर भूतपंचकच असेल तर पूर्व--पूर्व देह मोडून नित्य उपात्त असलेल्या भूतपंचकाचाच दुसरा नवा देह आरंभिला जातो कीं प्रत्येक देहाच्या वेळीं निरनिराळें भूतपंचक घेऊन त्यानें देह बनविला जातो ? यांतील पहिला पक्ष संभवत नाहीं. कारण भूतपंचकच जर त्या त्या देहाचें उपादान असेल तर माया सर्वकारण आहे, या सिद्धान्ताशीं विरोध येतो. दुसरा पक्षही संभवत नाहीं. कारण भूतपंचकाच्या उत्पत्तीचेंही दुसरें कारण शोधावें लागतें; आणि भूतपंचकाचें

जें कारण तेंच दुसऱ्या देहाचें कारण होणें शक्य आहे. देहाच्या पांचभौतिकत्वाची जी प्रसिद्धि आहे तिच्याशीं विरोध येत असल्यामुळें इतर पक्षही संभवत नाहीं, असा भावार्थ. पुढील वाक्य याच्या उत्तरत्वानें व्याख्यानासाठीं घेतात--) याविषयीं सांगितलें जातें. या अर्थी हा दृष्टान्त आहे. 'यथा-' ज्याप्रमाणें 'पेशस्कारी-' पेश म्ह० सोनें तें करतो तो पेशस्कारी--सुवर्णकार--सोनार, 'पेशसः-' सोन्याची 'मात्रां-' मात्रा—अंश अवयव 'आदाय-' तोडून घेऊन 'अन्यन्नवतरं-' दुसरें पहिल्या विशेष रचनेहून अगदीं नवें व 'कल्याणतरं रूपं-' कल्याणाहून अतिशय कल्याण—फार चांगलें रूप 'तनुते-' निर्माण करतो, 'एवमेव०' त्याप्रमाणेंच हा आत्मा०' इत्यादि पुढील भागाचा अर्थ वरील प्रमाणेंच समजावा.

नित्योपात्तान्येव पृथिव्यादीन्याकाशान्तानि पञ्च भूतानि यानि द्वे वाव ब्रह्मणो रूपे इति चतुर्थे व्याख्यातानि पेशःस्थानीयानि तान्येवोपमृद्यान्यदन्यच्च देहान्तरं नवतरं कल्याणतरं रूपं संस्थानविशेषं देहान्तरमित्यर्थः । कुरुते पित्र्यं वा पितृभ्यो हितं पितृलोकोपभोगयोग्यमित्यर्थः । गान्धर्वं गन्धर्वाणामुपभोगयोग्यं तथा देवानां दैवं प्रजापतेः प्राजापत्यं ब्रह्मण इदं ब्राह्मं वा । यथाकर्म यथाश्रुतमन्येषां वा भूतानां संबन्धि शरीरान्तरं कुरुत इत्यभिसंबध्यते ॥ ४ ॥

भाष्यार्थ--( देहान्तराच्या आरंभीं कोणतें उपादान घेतलें जातें, असें यावरून ठरतें, तें सांगतात—) दोन्ही शरीरांचीं आरंभक अशीं पृथिवीपासून आकाशापर्यंत पांच भूतें नित्य उपात्तच आहेत. ज्यांचें 'द्वे वाव ब्रह्मणो रूपे०' इत्यादि भागानें चवथ्या [ म्ह० उपनिषदाच्या दुसऱ्या ] अध्यायांत व्याख्यान केलें आहे, सुवर्णाच्या स्थानीं असलेलीं तींच पुनः पुनः मोडून दुसरें देहान्तर- दुसरा दुसरा देह, पूर्वीच्याहून अधिक नवें व पूर्वीपेक्षां अधिक चांगलें रूप--विशेष आकार—दुसरा देह असा याचा अर्थ; 'कुरुते-' आत्मा करतो. 'पित्र्यं-' पितरांना हित—

पितृलोकांतील उपभोगांना योग्य, असा याचा अर्थ. 'गान्धर्वं-' गंधर्वांच्या उपभोगास योग्य. त्याचप्रमाणें 'दैवं-' देवांच्या उपभोगास योग्य, प्राजापत्य-प्रजापतीच्या उपभोगास योग्य, अथवा 'ब्राह्मं' ब्रह्माचें रूप; (पण अशा देहविकल्पाचें निमित्त काय ? तें सांगतात--) किंवा ज्याचें जसें कर्म असेल त्याप्रमाणें व ज्याचें जसें श्रुत--अध्ययन असेल त्याप्रमाणें अन्य भूतांच्या संबंधी—अन्य भूतांचें—दुसरें शरीर करतो, असा संबंध लागतो. ४.

स वा अयमात्मा ब्रह्म विज्ञानमयो मनोमयः प्राणमयश्चक्षुर्मयः श्रोत्रमयः पृथिवीमय आपोमयो वायुमय आकाशमयस्तेजोमयोऽतेजोमयः काममयोऽकाममयः क्रोधमयोऽक्रोधमयो धर्ममयोऽधर्ममयः सर्वमयस्तद्यदेतदिदंमयोऽदोमय इति । यथाकारी यथाचारी तथा भवति साधुकारी साधुर्भवति पापकारी पापो भवति पुण्यः पुण्येन कर्मणा भवति पापः पापेन । अथो खल्वाहुः काममय एवायं पुरुष इति । स यथाकामो भवति तत्क्रतुर्भवति यत्क्रतुर्भवति तत्कर्म कुरुते यत्कर्म कुरुते तदभिसंपद्यते ॥ ५ ।

अर्थ--तोच हा आत्मा ब्रह्म आहे. तो विज्ञानमय, मनोमय, प्राणमय, चक्षुर्मय, श्रोत्रमय, पृथिवीमय, आपोमय, वायुमय, आकाशमय, तेजोमय, अतेजोमय, काममय, अकाममय, क्रोधमय, अक्रोधमय, धर्ममय, अधर्ममय, सर्वमय; तात्पर्य याचें इदंमयत्व व अदोमयत्व म्ह०

प्रत्यक्ष पदार्थप्रायत्व व परोक्ष पदार्थप्रायत्व सिद्ध झालें. ( पूर्वपक्ष-) तो जसें करणारा व जसें आचरणारा असतो तसा होतो. शुभ करणारा शुभ होतो, पाप करणारा पापी होतो; पुण्य कर्मानें पुण्यवान् होतो व पाप कर्मानें पापी होतो. ( सिद्धान्त-) दुसरेही कित्येक म्हणतात-हा पुरुष काममयच आहे. तो जशा प्रकारच्या कामानें युक्त होतो तशा निश्चयाचा होतो. ज्या निश्चयाचा असतो तें कर्म करतो आणि जें कर्म करतो त्याच्या फळाला प्राप्त होतो ५.

येऽस्य बन्धनसंज्ञका उपाधिभूता यैः संयुक्तस्तन्मयोऽयमिति विभाव्यते ते पदार्थाः पुञ्जीकृत्येहैकत्र प्रतिनिर्दिश्यन्ते । स वा अयं य एवं संसरत्यात्मा ब्रह्मैव पर एव योऽशनायाद्यतीतो विज्ञानमयो विज्ञानं बुद्धिस्तेनोपलक्ष्यमाणस्तन्मयः । कतम आत्मेति योऽयं विज्ञानमयः प्राणेष्विति ह्युक्तम् । विज्ञानमयो विज्ञानप्रायो यस्मात्तद्धर्मत्वमस्य विभाव्यते ध्यायतीव लेलायतीवेति ॥

भाष्यार्थ—( शरीरारंभाचे वेळीं मायात्मक भूतपंचक हें त्याचें उपादान आहे असें सांगणाऱ्या भाष्यकारांनीं भूतांचे अवयवही लिंगात्म्याबरोबरच जातात, असें सांगितलें, आतां 'स वा अयमात्मा०' इत्यादिकाचें तात्पर्य सांगतात-) जे या आत्म्याचे उपाधिभूत बंधनसंज्ञक बुद्ध्यादि पदार्थ ज्यांनीं संयुक्त असलेला हा आत्मा तन्मय असल्यासारखा भासतो ते पदार्थ एकत्र गोळा करून-त्यांचा संग्रह करून येथें प्रतिनिर्देश केला जातो. 'स वा अयं आत्मा-ब्रह्म-' जो अशा रीतीनें तीन अवस्था व इह परलोक यांतून संचार करतो तो आत्मा ब्रह्मच आहे. जो अशनाया-पिपासा इत्यादि धर्मांनीं रहित आहे. तो परमात्माच आहे. ( याप्रमाणें आत्म्याचें वास्तव रूप सांगून अवास्तव रूप सांगतात-) 'विज्ञानमयः' विज्ञान म्ह० बुद्धि त्या विज्ञानानें उपलक्ष्यमाण-उपलक्षित होणारा--तन्मय. 'कतम आत्मेति योऽयं विज्ञानमयः प्राणेषु' आत्मा कोणता तर जो हा प्राणांतील विज्ञानमय असें ज्योतिर्ब्राह्मणांत सांगि-

तळें आहे. विज्ञानमय म्ह० विज्ञानप्राय, कारण याचें विज्ञानधर्मत्व प्रतीत होतें. [ म्ह० आत्मा बुद्धिधर्मांनें युक्त आहे, असें दिसतें. आत्म्याचा बुद्धीशीं ऐक्याध्यास झाल्यामुळें आत्म्याच्या ठिकाणीं कर्तृत्वादिकांची प्रतीति येते, याविषयीं प्रमाण सांगतात--] ' ध्यायतीव लेलायतीव ' असें वर म्हटलेंच आहे.

तथा मनोमयो मनःसंनिकर्षान्मनोमयः । तथा प्राणमयः प्राणः पञ्चवृत्तिस्तन्मयो येन चेतनश्चलतीव लक्ष्यते । तथा चक्षुर्मयो रूपदर्शनकाले । एवं श्रोत्रमयः शब्दश्रवणकाले । एवं तस्य तस्येन्द्रियस्य व्यापारोद्भवे तत्तन्मयो भवति ॥

भाष्यार्थ—' मनोमयः-' पाहण्यास योग्य, या रूपानें मनाचा त्याच्याशीं संबंध होत असल्यामुळें तो मनोमय; तसाच 'प्राणमयः-' प्राण--पंचवृत्ति वायु तन्मय, ज्याच्या योगानें चेतन चलन करितोसें दिसतें. त्याचप्रमाणें रूपदर्शनसमयीं चक्षुर्मय; त्याचप्रमाणें शब्दश्रवणसमयीं श्रोत्रमय, याप्रमाणें त्या त्या इंद्रियाचा व्यापार उद्भवला असतां आत्मा तत्तन्मय होतो.

एवं बुद्धिप्राणद्वारेण चक्षुरादिकरणमयः सर्वशरीरारम्भकपृथिव्यादिभूतमयो भवति । तत्र पार्थिवशरीरारम्भे पृथिवीमयो भवति ।तथा वरुणादिलोकेष्वाप्यशरीरारम्भ आपोमयो भवति । तथा वायव्यशरीरारम्भे वायुमयो भवति । तथाऽऽकाशशरीरारम्भ आकाशमयो भवति ॥

भाष्यार्थ—(उक्तार्थाचा असा अनुवाद करून सामान्यतः भूतमयत्व सांगतात--) याप्रमाणें बुद्धि व प्राण यांच्या द्वारा चक्षुरादि इंद्रियमय होऊन शरीरारंभक पृथिव्यादि भूतमय होतो. त्यांतील पार्थिव शरीराच्या आरंभीं पृथिवीमय होतो. त्याचप्रमाणें वरुणादि लोकांमध्यें आप्य—जलमय- शरीराच्या आरंभाचे वेळीं आपोमय होतो. तसाच वायव्य शरीराच्या आरंभीं वायुमय होतो. ( आकाशाचे परमाणु नाहींत, त्यामुळें आकाश शरीरारंभक होऊं शकत नाहीं; असें तार्किक म्हणतात, पण

श्रुतिविरुद्ध आरंभप्रक्रिया मान्य नसल्यामुळें सांगतात–) तसाच तो आकाशशरीराच्या आरंभाचे वेळीं आकाशमय होतो.

एवमेतानि तैजसानि देवशरीराणि । तेष्वारभ्यमाणेषु तन्मयस्तेजोमयो भवति । अतो व्यतिरिक्तानि पश्वादिशरीराणि नरकप्रेतादिशरीराणि चातेजोमयानि तान्यपेक्ष्याऽऽहातेजोमय इति ॥

भाष्यार्थ—अशींच हीं तैजस देवशरीरें. तीं आरंभिलीं जात असतां तो तन्मय–तेजोमय होतो. याहून व्यतिरिक्त जीं पश्वादिशरीरें व नरकप्रेतादि शरीरें तीं अतेजोमय आहेत. त्यांच्या अपेक्षेनें श्रुति 'अतेजोमयः' असें म्हणत आहे.

एवं कार्यकरणसंघातमयः सन्नात्मा प्राप्तव्यं वस्त्वन्तरं पश्यन्निदं मया प्राप्तमदो मया प्राप्तव्यमित्येवं विपरीतप्रत्ययस्तदभिलाषः काममयो भवति । तस्मिन्कामे दोषं पश्यतस्तद्विषयाभिलाषप्रशमे चित्तं प्रसन्नमकलुषं शान्तं भवति तन्मयोऽकाममयः ॥

भाष्यार्थ—याप्रमाणें कार्यकरणसंघातमय होऊन, आत्मा प्राप्त करून घेण्यास योग्य अशी दुसरी वस्तु पाहून 'हें मला प्राप्त झालें, हें मला प्राप्त करून घ्यावयाचें आहे,' अशा विपरीत प्रत्ययानें युक्त व त्याच्या अभिलाषानें युक्त म्हणजेच 'काममय' होतो. पण त्या कामामध्यें दोष पाहणाऱ्या त्याचा तद्विषयक अभिलाष शांत झाला असतां चित्त प्रसन्न--अकलुष--शांत होतें म्हणजे तो तन्मय--अकाममय होतो.

एवं तस्मिन्विहते कामे केनचित्स कामः क्रोधत्वेन परिणमते तेन तन्मयो भवन्क्रोधमयः । स क्रोधः केनचिदुपायेन निवर्तितो यदा भवति तदा प्रसन्नमनाकुलं चित्तं सदक्रोध उच्यते तेन तन्मयः ॥

भाष्यार्थ—याप्रमाणें त्या कामाला कोणी विघात केला असतां तो क्रोधत्वानें परिणत होतो. त्यामुळें तन्मय होणारा तो 'क्रोधमय' होतो. तो क्रोध कोणत्या तरी उपायानें जेव्हां निवृत्त केला जातो तेव्हां चित्त

प्रसन्न व अनाकुल होत्सातें ' अक्रोध ' असें म्हटलें जातें. त्यामुळें तन्मय--अक्रोधमय होतो.

एवं कामक्रोधाभ्यामकामक्रोधाभ्यां च तन्मयो भूत्वा धर्ममयोऽधर्ममयश्च भवति । न हि कामक्रोधादिभिर्विना धर्मादिप्रवृत्तिरुपपद्यते " यद्यद्धि कुरुते कर्म तत्तत्कामस्य चेष्टितम् " इति स्मरणात् । धर्ममयोऽधर्ममयश्च भूत्वा सर्वमयो भवति । समस्तं धर्माधर्मयोः कार्यं यावत्किंचिद्व्याकृतं तत्सर्वं धर्माधर्मयोः फलं तत्प्रतिपद्यमानस्तन्मयो भवति ॥

भाष्यार्थ—याप्रमाणें काम व क्रोध यांनीं काम-क्रोधमय आणि अकाम व अक्रोध यांच्या योगानें अकाम क्रोधमय होऊन आत्मा धर्ममय व अधर्ममय होतो. काम-क्रोधादिकांवाचून धर्मादिकांची प्रवृत्ति उपपन्न होत नाहीं. कारण 'प्राणी जें जें कांहीं कर्म करतो तें तें कामाचें कार्य आहे, ' असें स्मरण—स्मृतिवचन आहे. धर्ममय व अधर्ममय होऊन सर्वमय होतो. ( धर्मादिमयत्व हें सर्वमयत्वाचें कारण कसें ? तें सांगतात ) जेवढें म्हणून कांहीं व्याकृत--व्यक्त--आहे तें सर्व धर्म व अधर्म यांचें फळ आहे. त्याला प्राप्त होणारा आत्मा तन्मय होतो.

किं बहुना तदेतत्सिद्धमस्य यदयमिदंमयो गृह्यमाणविषयादिमयस्तस्मादयमदोमयः । अद इति परोक्षं कार्येण गृह्यमाणेन निर्दिश्यते । अनन्ता ह्यन्तःकरणे भावनाविशेषाः । नैव ते विशेषतो निर्देष्टुं शक्यन्ते । तस्मिंस्तस्मिन्क्षणे कार्यतोऽवगम्यन्त इदमस्य हृदि वर्ततेऽदोऽस्येति । तेन गृह्यमाणकार्येणेदंमथतया निर्दिश्यते परोक्षोऽन्तःस्थो व्यवहारोऽयमिदानीमदोमय इति ॥

भाष्यार्थ—फार काय सांगावें ' तदेतत्-' याची ही गोष्ट सिद्ध झाली कीं, हा ' इदंमयः-' दृश्य विषयादिमय म्ह० इंद्रियांनीं ग्रहण केल्या जाणाऱ्या शब्दादि विषयमय आहे. ( ' विषयादि ' येथील आदिशब्दानें प्रत्यक्ष ग्रहण केल्या जाणाऱ्या शब्दादि विषयांहून अन्य वस्तूंचेंही ग्रहण करावें. ' इदंमयत्व ' अदोमयत्वाचें ज्ञापक आहे, असें

सांगतात--) तस्मात् हा ' अदोमय ' आहे. ' अदः ' या शब्दानें परोक्ष--कार्यावरून जाणल्या जाणाऱ्या--पदार्थाचा निर्देश केला जातो. अन्तःकरणांत भावनाविशेष--निरानिराळ्या भावना--अनन्त आहेत. त्यांचा विशेषतः निर्देश करतां येणें शक्य नाहीं, त्या त्या क्षणीं कार्यावरून 'हें याच्या मनांत आहे व तें त्याच्या' असे ते जाणले जातात. त्यामुळें ग्रहण केल्या जाणाऱ्या कार्यावरून आत्मा इदंमयत्वानें सांगितला जातो व परोक्षावस्थेंत हा परोक्ष--अन्तःस्थ व्यवहार करणारा--असतो, त्यामुळें हा ' अदोमय ' आहे, असा निर्देश केला जातो.

संक्षेपतस्तु यथा कर्तुं यथा वा चरितुं शीलमस्य सोऽयं यथाकारी यथाचारी स तथा भवति । करणं नाम नियता क्रिया विधिप्रतिषेधादिगम्या चरणं नामानियतामिति विशेषः । साधुकारी साधुर्भवतीति यथाकारीत्यस्य विशेषणं पापकारी पापो भवतीति च यथाचारीत्यस्य ॥

भाष्यार्थ---आतां हेंच संक्षेपतः सांगतात--'यथाकारी०-' जसें करण्याचें अथवा जसें आचरण्याचें याचें शील असतें तो हा यथाकारी व यथाचारी; तो तसाच होतो. करण म्हणजे विधि व प्रतिषेध यांवरून ज्ञात होणारी नियत क्रिया आणि चरण म्ह० अनियत क्रिया, असा 'करण' व 'चरण' या शब्दांच्या अर्थांत विशेष आहे. 'साधुकारी साधुर्भवति-' चांगलें करणारा साधु भवति हें 'यथाकारी' याचें विशेषण आहे. तसेंच 'पापकारी पापो भवति-' पापाचरण करणारा पापी होतो, हें 'यथाचारी' याचें विशेषण आहे.

ताच्छील्यप्रत्ययोपादानादत्यन्ततात्पर्यैव तन्मयत्वं न तु तत्कर्ममात्रेणेत्याशङ्क्याऽऽह पुण्यः पुण्येन कर्मणा भवति पापः पापेनेति । पुण्यपापकर्ममात्रेणैव तन्मयता स्यान्न तु ताच्छील्यमपेक्षते । ताच्छील्यं तु तन्मयत्वातिशय इत्ययं विशेषः । तत्र कामक्रोधादिपूर्वकपुण्यापुण्यकारिता सर्वमयत्वे हेतुः संसारस्य कारणं देहाद्देहान्तरसंचारस्य च ।

१ आड असलेल्या विषयाशीं व्यवहार करणारा, असा याचा भावार्थ.

एतत्प्रयुक्तो ह्यन्यदन्यद्देहान्तरमुपादत्ते। तस्मात्पुण्यापुण्ये संसारस्य कारणम्। एतद्विषयौ हि विधिप्रतिषेधौ। अत्र शास्त्रस्य साफल्यमिति॥

भाष्यार्थ—('पुण्यः पुण्येन०' इत्यादि वाक्य शंकेचें उत्तर या रूपानें उत्थापित करून त्याचें व्याख्यान करितात–) 'यथाकारी, यथाचारी, साधुकारी, पापकारी' या शब्दांत 'णिनि' म्ह० 'इन्' या ताच्छील्य–तें त्याचें शील असतें–या अर्थीं असलेल्या प्रत्ययाचें ग्रहण केलेलें असल्यामुळें अत्यन्त तत्परता हेंच तन्मयत्व आहे; केवल त्या कर्मानें तन्मयत्व होत नाहीं, अशी आशंका घेऊन श्रुति सांगते–'पुण्यः पुण्येन०-' पुण्य कर्मानें पुण्यवान् होतो व पापकर्मानें पापी होतो. म्हणजे नुसत्या पुण्य-पाप-कर्मानेंच आत्म्याची तन्मयता होते तो तन्मय होण्यास ताच्छील्याची अपेक्षा करीत नाहीं. (मग ताच्छील्याचा उपयोग काय? उत्तर-) पण ताच्छील्य म्ह० पुण्य किंवा पाप कर्म करण्याचें शीलच झालें असतां आत्म्याचें अतिशय तन्मयत्व होणें, हा त्यांत विशेष आहे. असो; असें ठरलें असतां काम-क्रोधादिपूर्वक पुण्यापुण्याचें अनुष्ठान करणें हेंच सर्वमयत्वाचें निमित्त आहे. संसाराचें व एका देहांतून दुसऱ्या देहांत संचार करण्याचें तेंच कारण आहे. आत्मा या पुण्य-पाप-कारित्वामुळेंच–तत्प्रयुक्तच दुसऱ्या दुसऱ्या देहांचें ग्रहण करतो. तस्मात् पुण्य व पाप हें संसाराचें कारण आहे. विधि व प्रतिषेध यांचे हेच विषय आहेत. यांतच शास्त्राचें साफल्य आहे. (येथील 'इति'शब्द पूर्वपक्षाची समाप्ति झाली, हें सुचविण्यासाठीं आहे.)

अथो अप्यन्ये बन्धमोक्षकुशलाः खल्वाहुः। सत्यं कामादिपूर्वके पुण्यापुण्ये शरीरग्रहणकारणं तथाऽपि कामप्रयुक्तो हि पुरुषः पुण्यापुण्ये कर्मणी उपचिनोति कामप्रहाणे तु कर्म विद्यमानमपि पुण्यापुण्योपचयकरं न भवति। उपचिते अपि पुण्यापुण्ये कर्मणी कामशून्ये फलारम्भके न भवतः। तस्मात्काम एव संसारस्य मूलम्। तथा चोक्तमाथर्वणे "कामान्यः कामयते मन्यमानः स कामभिर्जायते

तत्र तत्र" इति । तस्मात्काममय एवायं पुरुषो यदन्यमयत्वं तदकारणं विद्यमानमपीत्यतोऽवधारयति काममय एवेति ॥

भाष्यार्थ---(आतां सिद्धान्त घेतात--) 'अथो खल्वाहुः०-' खरोखर दुसरे बंधमोक्षकुशल पुरुषही सांगतात; (संसाराचें कारण जें अज्ञान त्याचा काम प्राधान्यानें सहकारी आहे, या स्वसिद्धान्ताचें समर्थन करितात--)खरें आहे; कामादिपूर्वक पुण्य व अपुण्य हें शरीरग्रहणाचें कारण आहे, हें खरें; तथापि पुरुष कामाकडून प्रेरित होत्साताच पुण्यकर्म व पापकर्म यांचा उपचय करतो; ('अहोपण कामाच्या अभावींही कर्म घडत असल्याचें दिसतें,' अशी आशंका घेऊन सांगतात--) पण तेंच कामाचें प्रहाण केलें असतां विद्यमान असलेलेंही कर्म पुण्य व अपुण्य यांचा उपचय--संग्रह--वृद्धि करणारें होत नाहीं. ('अहोपण कामाच्या अभावींही नित्यादि कर्मांचें अनुष्ठान होत असल्यामुळें पुण्यापुण्यांचा संचय होतोच,' अशी आशंका घेऊन सांगतात--) कामनाशून्य असलेलीं पुण्य-पापरूप कर्में जरी उपचित झालीं तरी फलारंभक होत नाहींत. तस्मात् कामच संसाराचें मूल आहे. आथर्वणांतही 'कामान्यः कामयते मन्यमानः०-' इत्यादि सांगितलें आहे. 'जो पशु, पुत्र, स्वर्ग इत्यादिकांस सर्वोत्तम पुरुषार्थ मानणारा पुरुष त्यांचीच कामना करतो तो त्या त्या भोगभूमींत त्या त्या कामांनीं युक्त असा उत्पन्न होतो,' असा त्या श्रुतीचा अर्थ आहे. (आतां श्रुति व युक्ति यांनीं सिद्ध झालेल्या अर्थाचें निगमन करितात--) तस्मात् 'काममयच' हा पुरुष आहे. ('अहोपण तो धर्मादिमयही आहे, मग 'काममयच' असा निश्चय कसा करतां ?' उत्तर--) जें त्याचें धर्मादि-अन्यमयत्व तें जरी विद्यमान असलें तरी अकारण आहे. [म्ह० तें कारण नाहीं, काममयत्व हें सर्वमयत्वाचें कारण आहे,] म्हणून 'काममय एव' असें श्रुति अवधारण करिते.

यस्मात्स च काममयः सन्यादृशेन कामेन यथाकामो भवति तत्क्रतुर्भवति स काम ईषदभिलाषमात्रेणाभिव्यक्तो यस्मिन्विषये भवति

सोऽविहन्यमानः स्फुटीभवन्क्रतुत्वमापद्यते । क्रतुर्नामाध्यवसायो निश्चयो यदनन्तरा क्रिया प्रवर्तते ॥

भाष्यार्थ--('स यथाकामो भवति' इत्यादि वाक्याचें व्याख्यान--) आणि ज्याअर्थी तो काममय होऊन जशा प्रकारच्या कामानें 'यथाकाम' होतो 'तत्क्रतु-' होतो [म्हणजे त्या कामाविषयीं त्याचा दृढ निश्चय होतो.] तो काम केवळ थोडासा अभिलाष या रूपानें ज्या विषयाविषयीं अभिव्यक्त होतो तोच प्रतिबद्ध न केला गेल्यास व्यक्त होत्साता क्रतुत्वास प्राप्त होतो. क्रतु म्ह० अध्यवसाय--निश्चय, ज्याच्या नंतर लागलीच क्रिया प्रवृत्त होते, (त्या -तशा प्रकारच्या क्रतूनें तो संपन्न होतो. या वाक्यांतील 'यस्मात्-' ज्याअर्थीं याचा पुढील वाक्यांतील 'तस्मात्-'त्याअर्थीं[1] या पदाशीं संबंध आहे.)

यत्क्रतुर्भवति यादृक्कामकार्येण क्रतुना यथारूपः क्रतुरस्य सोऽयं यत्क्रतुर्भवति तत्कर्म कुरुते । यद्विषयः क्रतुस्तत्फलनिर्वृत्तये यद्योग्यं कर्म तत्कुरुते निर्वर्तयति । यत्कर्म कुरुते तदभिसंपद्यते । तदीयं फलमभिसंपद्यते । तस्मात्सर्वमयत्वेऽस्य संसारित्वे च काम एव हेतुरिति ॥ ५ ॥

भाष्यार्थ---'यत्क्रतुर्भवति-' जशा प्रकारच्या कामकार्य--कामाचा परिणाम--अशा क्रतूनें तो युक्त होतो, जशा स्वरूपाचा याचा क्रतु--निश्चय असतो तो हा 'यत्क्रतु-' पुरुष, तो 'यत्क्रतु' होतो तें कर्म करतो. ज्याच्या विषयीं त्याचा क्रतु असतो त्या फलाच्या निष्पत्तीकरितां 'तत्कर्म कुरुते-' जें योग्य कर्म तें तो करतो. 'यत्कर्म कुरुते०-' जें कर्म करतो त्याच्या फलाला प्राप्त होतो. त्याच्या फलानें अभिसंपन्न होतो. तस्मात्--त्याअर्थीं याच्या सर्वमयत्वाविषयीं व संसारित्वाविषयीं कामच कारण आहे.(आत्म्याचें सर्वमयत्व व संसारित्व याचें कारण कामच आहे. भाष्यांत शेवटीं 'इति,

१ या 'तस्मात्' शब्दाचा वरील 'यस्मात्' शब्दाशीं संबंध आहे.

असा जो शब्द आहे तो या ब्राह्मणाची समाप्ति झाली हें सुचविण्यासाठीं आहे.) ५

तदेष श्लोको भवति । तदेव सक्तः सह कर्मणैति लिङ्गं मनो यत्र निषक्तमस्य । प्राप्यान्तं कर्मणस्तस्य यत्किंचेह करोत्ययम् । तस्माल्लोकात्पुनरैत्यस्मै लोकाय कर्मण इति नु कामयमानोऽथाकामयमानो योऽकामो निष्काम आप्तकाम आत्मकामो न तस्य प्राणा उत्क्रामन्ति ब्रह्मैव सन्ब्रह्माप्येति ॥ ६ ॥

अर्थ—त्या अर्थी हा मंत्र आहे. याचें लिंग-मन ज्यामध्यें निषक्त--अत्यंत आसक्त असतें त्याच फलविषयीं ज्याचा अभिलाष उद्भूत झाला आहे असा होत्साता, असा भावार्थ, तो कर्मासह त्या फलालाच प्राप्त होतो. हा या लोकीं जें कांहीं कर्म करतो त्या कर्माच्या अन्तास प्राप्त होऊन त्या लोकापासून पुनः या लोकास कर्म करण्यासाठीं येतो. याप्रमाणेंच खरोखर कामयमान पुरुष संसार करतो. आतां अकामयमान--जो अकाम, निष्काम, आप्तकाम, आत्मकाम असतो त्याचे प्राण उत्क्रान्त होत नाहींत. तो ब्रह्मच होऊन ब्रह्माला प्राप्त होतो. ब्रह्म होतो. ६

तत्तस्मिन्नर्थ एष श्लोको मन्त्रोऽपि भवति । तदेवैति तदेव गच्छति सक्त आसक्तस्तत्रोद्भूताभिलाषः सन्नित्यर्थः । कथमेति । सह कर्मणा यत्कर्म फलासक्तः सन्नकरोत्तेन कर्मणा सहैव तदेति तत्फलमेति । किं तत् । लिङ्गं मनः । मनःप्रधानत्वाल्लिङ्गस्य मनो लिङ्गमित्युच्यते । अथ वा लिङ्ग्यतेऽवगम्यतेऽवगच्छति येन तल्लिङ्गं तन्मनो यत्र यस्मिन्निषक्तं निश्चयेन सक्तमुद्भूताभिलाषमस्य संसारिणः । तदभिलाषो हि तत्कर्म कृतवान् । तस्मात्तन्मनोऽभिषङ्गवशादेवास्य तेन कर्मणा तत्फलप्राप्तिः । तेनैतत्सिद्धं भवति कामो मूलं संसारस्येति ॥

भाष्यार्थ—'तत्-' त्याअर्थी 'एष श्लोकः-' हा मंत्रही आहे. 'तदेवैति-' त्यालाच जातो. 'सक्तः-'आसक्त- त्या गन्तव्य फलाविषयीं ज्याचा अभिलाष उद्भूत झाला आहे, असा भावार्थ; कसा जातो? 'सह कर्मणा-' फलासक्त होऊन त्यानें जें कर्म केलें होतें त्या कर्मासहवर्तमानच 'तदेति-' त्या फलास प्राप्त होतो. (तेंच गन्तव्य फल विशेषतः जाणण्यासाठीं प्रश्न करतात--) तें काय? तें फळ कोणतें? 'लिंगं मनः-' लिंगशरीर मनःप्रधान असल्यामुळें मनाला लिंग असें म्हटलें जातें. (अथवा जो जाणतो तो प्रमात्रादि साक्षी ज्या साक्ष्य - साक्षिविषयभूत मनाकडून जाणला जातो तें मन लिंग होय, असें पक्षान्तर सांगतात--) अथवा 'लिङ्ग्यते इति लिंगं-' ज्याच्या कडून जाणलें जातें, साक्षी ज्यानें जाणतो तें लिंग, असो; असें तें मन 'यत्र निषक्तं-' ज्यामध्यें निश्चयानें सक्त असतें 'अस्य-'या संसारी पुरुषाचें मन ज्याविषयीं उद्भूताभिलाष झालेलें असतें,ज्याविषयीं मनाचा अभिलाष उद्भूत--व्यक्त झालेला असतो त्या फलास जातो--प्राप्त होतो, असा संबंध. कारण तो त्याविषयींच अभिलाषयुक्त होऊन तें कर्म करता झाला. तस्मात् त्या मनोऽभिषंगवशात्च या पुरुषाला त्या कर्मानें त्या फलाची प्राप्ति होते.त्यामुळें काम हें संसाराचें मूळ आहे, हें सिद्ध होतें.

अत उच्छिन्नकामस्य विद्यमानान्यपि कर्माणि ब्रह्मविदो वन्ध्यप्रसवानि भवन्ति । "पर्याप्तकामस्य कृतात्मनश्च इहैव सर्वे प्रविलीयन्ति कामाः" इति श्रुतेः ॥

भाष्यार्थ—(कामाला संसारमूलत्व आहे असें सिद्ध झालें असतां अर्थसिद्ध अर्थ सांगतात--) यास्तव ज्याचा काम उच्छिन्न झाला आहे अशा ब्रह्मवेत्त्याचीं विद्यमान असलेलींही कर्में वंध्यप्रसव—निष्फळ होतात. कारण 'पर्याप्तकामस्य कृतात्मनश्च०' इत्यादि श्रुति आहे. 'पर्याप्तकाम' म्ह० ज्याला परम पुरुषार्थ प्राप्त झाला आहे व 'कृतात्मा-' म्ह०ज्याची बुद्धि शुद्ध आहे, ज्याला स्वरूप विदित आहे, असा भावार्थ, अशा

पर्याप्तकाम व कृतात्म्या पुरुषाचे सर्व काम 'इहैव-' या जीवदवस्थेंतच सर्वथा विलीन होतात, ( असा त्या श्रुतीचा अर्थ आहे. )

किंच प्राप्यान्तं कर्मणः प्राप्य भुक्त्वाऽन्तमवसानं यावत्कर्मणः फलपरिसमाप्तिं कृत्वेत्यर्थः । कस्य कर्मणोऽन्तं प्राप्येत्युच्यते । तस्य यत्किंच कर्मेहास्मिल्ँलोके करोति निर्वर्तयत्ययं तस्य कर्मणःफलं भुक्त्वा अन्तं प्राप्य तस्माल्लोकात्पुनरैत्यागच्छत्यस्मै लोकाय कर्मणेऽयं हि लोकः कर्मप्रधानस्तेनाऽऽह कर्मण इति पुनः कर्मकरणाय । पुनः कर्म कृत्वा फलासङ्गवशात्पुनरमुं लोकं यातीत्येवम् । इति न्वेवं नु कामयमानः संसरति ॥

भाष्यार्थ—("अहो पण पुरुष कामप्रधान होऊनच संसार करतो म्हणून म्हणाल तर कर्मफलभोगानन्तर कामाचा अभाव होत असल्यामुळें मुक्ति अनायासानें होईल' अशी आशंका घेऊन सांगतात-)'प्राप्यान्तं कर्मणः-'शि-वाय कर्माच्या अन्तास प्राप्त होऊन, जोंवर कर्माचा अन्त-अवसान होई तोंवर त्याच्या फलाचा भोग घेऊन म्ह० कर्माच्या फलाची परिसमाप्ति करून असा भावार्थ. कोणत्या कर्माच्या अन्तास प्राप्त होऊन, तें सांगितलें जातें 'तस्य यत्किंचेह करोत्ययम्-' त्याचें-जें कांहीं कर्म हा या लोकीं करतो त्या कर्माचें फळ भोगून, अन्तास प्राप्त होऊन 'तस्माल्लोका-त्पुनरैति०-' त्या लोकापासून पुनः या लोकास कर्म करण्यासाठीं परत येतो. हा लोक कर्मप्रधान आहे, हें प्रसिद्ध आहे. म्हणून येथें 'कर्मणे' असें म्हटलें आहे. पुनः कर्म करण्यासाठीं परत येतो. पुनरपि येथें कर्म करून फलासक्तीच्या बळानें पुनः त्या परलोकास जातो, याप्रमाणें तो संसरण करीत असल्यामुळें ज्ञानावाचून मुक्ति नाहीं.' इति नुं-' याप्र-माणेंच खरोखर तो कामना करणारा पुरुष संसार करतो—जन्ममरण परंपरेंत पडतो.

---

१ हा संसारप्रकरणाचा उपसंहार आहे.

यस्मात्कामयमान एवैवं संसरत्यथ तस्मादकामयमानो न क्वचित्संसरति । फलासक्तस्य हि गतिरुक्ता । अकामस्य हि क्रियानुपपत्तेरकामयमानो मुच्यत एव । कथं पुनरकामयमानो भवति । योऽकामो भवत्यसावकामयमानः । कथमकामतेत्युच्यते । यो निष्कामो यस्मान्निर्गताः कामाः सोऽयं निष्कामः । कथं कामा निर्गच्छन्ति । य आप्तकामो भवत्याप्ताः कामा येन स आप्तकामः ॥

भाष्यार्थ—( जाग्रत् व स्वप्न या दोन अवस्थांचा दार्ष्टान्तिक बंध गत प्रबंधानें दाखवून सुषुप्ताचा दार्ष्टान्तिक मोक्ष सांगण्यासाठीं 'अथ अकामयमानः-' इत्यादि वाक्य आहे, त्यांतील 'अथ' शब्दाचा अर्थ सांगतात–) ज्याअर्थीं कामना करणाराच अशाप्रकारें संसार करतो 'अथ-' त्याअर्थीं जो कामना करणारा नसतो तो केव्हांही संसरण[1] करीत नाहीं.( कामरहित पुरुषाच्या संसाराचा अभाव साधितात–) फलासक्त पुरुषाचीच गति सांगितलेली आहे. जो अकाम-निष्काम विद्वान् त्याच्या क्रियेची अनुपपत्ति असल्यामुळें कामना न करणारा पुरुष मुक्तच होतो. ( निष्काम विद्वानाचें नैष्कर्म्य यत्नावाचूनच सिद्ध होतें.) पण पुरुष 'अकामयमान' कामनाशून्य कसा होतो ? 'योऽकामः-' जो शब्दादि बाह्य विषयांविषयीं आसक्त नसतो त्याला 'अकामयमानता' असते. पण अकामता कशी असते ? तें सांगितलें जातें--' निष्कामः-' ज्याच्यापासून वासनारूप काम निघून गेलेले असतात—ज्याच्या ठिकाणीं वासनारूप कामांचा अभाव असतो तो हा निष्काम.काम कसे निघून जातात ? 'आप्तकामः' जो आप्तकाम होतो, ज्याला परमानन्द प्राप्त झाल्यामुळें त्यांत अन्तर्भूत होणारे सर्व काम ज्यानें प्राप्त करून घेतले आहेत तो आप्तकाम होतो. [ त्याला निष्कामता प्राप्त होते, त्याचे काम निघून जातात. ]

कथमाप्यन्ते कामा आत्मकामत्वेन यस्याऽऽत्मैव नान्यः कामयितव्यो वस्त्वन्तरभूतः पदार्थो भवति । आत्मैवानन्तरोऽबाह्यः कृत्स्नः

१ 'पुनरपि जननं पुनरपि मरणं पुनरपि जननीजठरे शयनं' हेंच संसरण होय.

प्रज्ञानघन एकरसो नोर्ध्वं न तिर्यङ्नाध आत्मनोऽन्यत्कामयितव्यं वस्त्वन्तरम् । यस्य सर्वमात्मैवाभूत्तत्केन कं पश्येच्छृणुयान्मन्वीत विजानीयाद्वैवं विजानन्कं कामयेत ॥

भाष्यार्थ—( आप्तकामत्वाविषयीं हेतु आकांक्षापूर्वक सांगतात—) काम कसे प्राप्त केले जातात ? ' आत्मकामः-' आत्मकामत्वानें ते प्राप्त होतात. ज्याला कामना करण्यास योग्य असा पदार्थ एक आत्माच आहे, त्याहून अन्य--दुसरी वस्तु असा पदार्थ कामयितव्य नाहीं. ( त्याचें आप्तकामत्व युक्तच आहे. हाच अर्थ प्रमाणप्रदर्शनार्थ सविस्तर सांगतात—) आत्माच अनन्तर, अबाह्य, कृत्स्न—पूर्ण, प्रज्ञानघन व एकरस आहे. कामना करण्यास योग्य अशी आत्म्याहून निराळी दुसरी वस्तु ऊर्ध्व नाहीं, तिरकस--समोर नाहीं व अधोभागीं नाहीं. (ब्रह्मवेत्त्याच्या कामयितव्य विषयाचाच अभाव आहे, ही गोष्ट श्रुतीचा आश्रय करून सांगतात—) ज्याला सर्व आत्माच झालें तो त्या विद्यादशेंत कोणत्या साधनानें कोणाला पाहणार ?कोणाला श्रवण करणार,कशाचें मनन करणार किंवा कोणाला जाणणार ? सर्व आत्माच आहे, असें जाणणारा कशाची कामना करणार ? ( विद्वानाला आत्मभिन्न पदार्थच दिसत नसल्यामुळें तो कशाचीही इच्छा करीत नाहीं.)

ज्ञायमानो ह्यन्यत्वेन पदार्थः कामयितव्यो भवति । न चासावन्यो ब्रह्मविद आप्तकामस्यास्ति । य एवाऽऽत्मकामतयाऽऽप्तकामः स निष्कामोऽकामोऽकामयमानश्चेति मुच्यते । न हि यस्याऽऽत्मैव सर्वं भवति तस्यानात्मा कामयितव्योऽस्ति । अनात्मा चान्यः कामयितव्यः सर्वं चाऽऽत्मैवाभूदिति विप्रतिषिद्धम् । सर्वात्मदर्शिनः कामयितव्याभावात्कर्मानुपपत्तिः ॥

भाष्यार्थ—आत्म्याहून अन्य, अशा रूपानें जाणला जाणारा पदार्थच ' कामयितव्य-' कामना—इच्छा करण्यास योग्य होतो. ( पूर्वी जाणलेला--अनुभूत पदार्थच वारंवार स्मरणाचा विषय होऊं लागला

म्हणजे त्याविषयीं इच्छा होते, असा नियम आहे. तर मग ब्रह्मवेत्त्यालाही हा नियम लागू होईल, अशी आशंका घेऊन सांगतात--) पण आप्तकाम ब्रह्मवेत्त्याला अन्य पदार्थच नाहीं. ( वर सांगितल्याप्रमाणें आप्तकाम ब्रह्मवेत्त्याला कामयितव्य नाहीं, असें झालें असतां मुक्ति सिद्ध होते, असा उपसंहार करितात--) जो आत्मकाम असल्यामुळें आप्तकाम असतो तो निष्काम, अकाम व अकामयमान होतो, त्यामुळें मुक्त होतो. ( 'अहो पण आत्मा कामयितव्य असतांना तो नाहींच असें कसें म्हणतां,' अशी आशंका घेऊन सांगतात--) ज्याचा आत्माच सर्व होतो त्याला कामयितव्य--कामना करण्यास योग्य असा अनात्माच नसतो. कारण दुसरा अनात्मा कामयितव्य असणें व सर्व आत्माच होणें हें परस्पर विरुद्ध आहे. ( अर्थात् ) सर्वात्मदर्शी पुरुषाला कामयितव्य विषयाचाच अभाव असल्यामुळें कर्माची अनुपपत्ति आहे.

ये तु प्रत्यवायपरिहारार्थं कर्म कल्पयन्ति ब्रह्मविदोऽपि तेषां नाऽऽत्मैव सर्वं भवति । प्रत्यवायस्य जिहासितव्यस्याऽऽत्मनोऽन्यस्याभिप्रेतत्वात् । येन चाशनायाद्यतीतो नित्यं प्रत्यवायासंबद्धो विदित आत्मा तं वयं ब्रह्मविदं ब्रूमः । नित्यमेवाशनायाद्यतीतमात्मानं पश्यति । यस्माच्च जिहासितव्यमन्यदुपादेयं वा यो न पश्यति तस्य कर्म शक्यत एव संबद्धुम् । यस्त्वब्रह्मवित्तस्य भवत्येव प्रत्यवायपरिहारार्थं कर्मेति न विरोधः । अतः कामाभावादकामयमानो न जायते मुच्यत एव ॥

भाष्यार्थ—( कर्मजडांचे मत उत्थापित करून श्रुतिविरोध येत असल्याचें दाखवितात व त्याचें प्रत्याख्यान करितात—) पण जे प्रत्यवायपरिहारार्थ ब्रह्मवेत्त्याच्याही कर्मांची कल्पना करितात त्यांच्या मतीं सर्व आत्माच होत नाहीं. कारण त्याग करण्याची इच्छा करण्यासारखा असा आत्मभिन्न प्रत्यवाय त्यांना अभिप्रेत असतो. पण आम्ही ज्यानें अशनायादिकांहून अगदीं निराळा, क्षुधादिशून्य व सतत प्रत्यवायाशीं असंबद्ध असा आत्मा जाणला आहे त्याला ब्रह्मवेत्ता म्हणतों. ( तसल्या ब्रह्मवेत्त्यालाही नित्यादि कर्मांचें, तीं विहित असल्यामुळेंच, अनुष्ठान

करणें अवश्य आहे, म्हणून म्हणाल तर सांगतों–) ते नित्यच अशनायादि अतीत आत्म्याला पाहतात. ( आणि जो सदैव असंसारी आत्म्याचा अनुभव घेतो ) तो आत्म्याहून भिन्न ग्राह्य किंवा त्याज्य पदार्थ पहात नाहीं, आणि ज्याअर्थी असें आहे त्याअर्थी कर्म त्याला संस्पर्शही करूं शकत नाहीं. (तर मग कर्मसंबंध कोणाशीं आहे, तें सांगतात– आतां जो असा ब्रह्मवेत्ता नसतो त्याला प्रत्यवायपरिहारार्थ कर्म कर्तव्य असतें. त्यामुळें विधिकांडाशीं विरोध येत नाहीं. तस्मात् कामाचा अभाव असल्यामुळें अकामयमान ( व न करणारा ) विद्वान् उत्पन्न होत नाहीं, तर विद्यासामर्थ्यानें मुक्त होतो. ( कारण त्याला काम नसतो व त्याचें कर्मही नसते. )

तस्यैवमकामयमानस्य कर्माभावे गमनकारणाभावात्प्राणा वागादयो नोत्क्रामन्ति नोर्ध्वं क्रामन्ति देहात् । स च विद्वानाप्तकाम आत्मकामतयेहैव ब्रह्मभूतः । सर्वात्मनो हि ब्रह्मणो दृष्टान्तत्वेन प्रदर्शितमेतद्रूपं तद्वा अस्यैतदाप्तकाममात्मकाममकामं रूपमिति । तस्य हि दार्ष्टान्तिकभूतोऽयमर्थ उपसंह्रियतेऽथाकामयमान इत्यादिना ॥

भाष्यार्थ—( ' अहो पण मुक्ति दुसऱ्या प्रदेशीं गेल्यानंतर मिळणारी आहे, ' असें कोणी म्हणेल तर त्याचें निराकरण करण्यासाठीं ' न तस्य०-' इत्यादि वाक्याचें व्याख्यान करितात--) ' तस्य-' याप्रमाणें अकामयमान पुरुषाच्या गमनाचें कारणच कर्माच्या अभावीं नष्ट होत असल्यामुळें त्याचे 'प्राणाः-' वागादिक प्राण ' न उत्क्रामन्ति-' देहापासून वर निघत नाहींत. (' ब्रह्मैव सन्० ' इत्यादि वाक्य घेतात -) आणि तो आत्मकामतेमुळें आप्तकाम विद्वान् वर्तमान देहांतच ब्रह्मभूत होतो.('अहो पण वर्तमान देहांत असतांनाच तो ब्रह्मभूत कसा होतो ?' तें सांगतात--) सर्वात्मा अशा ब्रह्माच्या दृष्टान्तत्वानें ' तद्वा अस्यैतदाप्तकाममात्मकाममकामं रूपं ' असें रूप प्रदर्शित केलें आहे; आणि त्याचाच दार्ष्टान्तिकभूत असा हा अर्थ ' अथाकामयमानः ' इत्यादि भागानें उपसंहृत केला

आहे. [ दृष्टान्ताच्या आलोचनानें दार्ष्टान्तिकांतही सदा ब्रह्मत्व भासतें, असा भाव. ]

स कथमेवंभूतो मुच्यत इत्युच्यते । यो हि सुषुप्तावस्थमिव निर्विशेषमद्वैतमलुप्तचिद्रूपज्योतिःस्वभावमात्मानं पश्यति तस्यैवाकामयमानस्य कर्माभावे गमनकारणाभावात्प्राणा वागादयो नोत्क्रामन्ति। किंतु विद्वान्स इहैव ब्रह्म यद्यपि देहवानिव लक्ष्यते स ब्रह्मैव सन्ब्रह्माप्येति। यस्मान्न हि तस्याब्रह्मत्वपरिच्छेदहेतवः कामाः सन्ति तस्मादिहैव ब्रह्मैव सन्ब्रह्माप्येति न शरीरपातोत्तरकालम् ॥

भाष्यार्थ—( अहो पण सदा ब्रह्मीभूत झालेल्या पुरुषाला मुक्ति म्हणून नाहींच, अशी आशंका घेऊन सांगतात--) तो अशा प्रकारचा साधक मुक्त कसा होतो, तें सांगितलें जातें. जो सुषुप्तावस्थेंतल्या प्रमाणें निर्विशेष, अद्वैत, नित्य चिद्रूपज्योतिःस्वभाव आत्म्याला पाहतो 'न तस्य प्राणा उत्क्रामन्ति-' त्याच अकामयमान पुरुषाचे प्राण—वागादिक कर्माच्या अभावीं गमनाच्या कारणाचाही अभाव होत असल्यामुळें उत्क्रान्त होत नाहींत; तर 'ब्रह्मैव सन्ब्रह्माप्येति-' तो विद्वान् जरी देहवान्-सा दिसतो तरी येथेंच ब्रह्मच होऊन ब्रह्माला प्राप्त होतो. कारण अब्रह्मत्व या परिच्छेदाला कारण होणारे काम त्याला नसतात; यास्तव येथेंच ब्रह्मच होऊन ब्रह्माला प्राप्त होतो; शरीरपात झाल्यानंतर नाहीं.

न हि विदुषो मृतस्य भावान्तरापत्तिर्जीवतोऽन्यो भावो देहान्तरप्रतिसंधानाभावमात्रेणैव तु ब्रह्माप्येतीत्युच्यते । भावान्तरापत्तौ हि मोक्षस्य सर्वोपनिषद्विवक्षितोऽर्थ आत्मैकत्वाख्यः स बाधितो भवेत् ॥

भाष्यार्थ—( 'अहो पण पूर्वीही ब्रह्मभूत झालेल्या विद्वानालाच देहपात झाल्यावर पुनः ब्रह्मप्राप्ति होणें अयुक्त आहे. कारण मेलेल्या विद्वानाला दुसऱ्या भावाची प्राप्ति होते, असें मानलेलें आहे,' अशी आशंका घेऊन सांगतात—) मेलेल्या विद्वानाला भावान्तरप्राप्ति—जीव-

दवस्थेहून अन्यभावप्राप्ति–होत नाहीं. ( तर मग वर ' ब्रह्माप्येति ' असें कसें म्हटलें आहे, तें सांगतात--) केवळ दुसऱ्या देहाच्या प्रतिसंधानाच्या अभावामुळेंच ' ब्रह्माला प्राप्त होतो,' असें म्हटलें आहे. ( ' अहो पण विद्वानाला दुसऱ्या भावाची प्राप्ति होणें हीच मुक्ति आहे, म्हणून म्हटलें तर काय बिघडलें ? ' याचें उत्तर- ) विद्वानाला मरणोत्तर दुसऱ्या भावाची प्राप्ति होणें हाच मोक्ष असें जर म्हटलें तर सर्व उपनिषदांचा आत्मैकत्व या नांवाचा जा विवक्षित अर्थ तो बाधित होतो.

कर्महेतुकश्च मोक्षः प्राप्नोति न ज्ञाननिमित्त इति । स चानिष्टोऽनित्यत्वं च मोक्षस्य प्राप्नोति । न हि क्रियानिर्वृतोऽर्थो नित्यो दृष्टः । नित्यश्च मोक्षोऽभ्युपगम्यते "एष नित्यो महिमा०" इति मन्त्रवर्णात् ॥

भाष्यार्थ—( दुसऱ्या भावाची प्राप्ति हीच मुक्ति, असें म्हटल्यास आणखीं एक दोष सांगतात--) मोक्ष म्ह० भावान्तरापत्ति असें मानल्यास त्याचें साधन कर्म आहे असें प्राप्त होतें, तो ज्ञाननिमित्त आहे, असें होत नाहीं, व मोक्ष कर्महेतुक आहे, ज्ञाननिमित्तक नाहीं असें ठरणें अनिष्ट आहे. शिवाय मोक्षाला कर्मसाध्य मानल्यास तो अनित्य होतो, त्याच्याकडे अनित्यत्व येतें. कारण कोणताही क्रियेनें संपादन केलेला अर्थ नित्य असल्याचा अनुभव येत नाहीं. ( तर मग प्रासादादि क्रियासाध्य पदार्थांप्रमाणें मोक्षालाही अनित्यत्व असो, म्हणून म्हणाल तर--) ' एष नित्यो महिमा ब्राह्मणस्य ' अशीं मंत्राक्षरें असल्यामुळें मोक्ष नित्य मानलेला आहे.

न च स्वाभाविकात्स्वभावादन्यन्नित्यं कल्पयितुं शक्यम् । स्वाभाविकश्चेदग्न्युष्णवदात्मनः स्वभावः स न शक्यते पुरुषव्यापारानुभावीति वक्तुम् । न ह्यग्नेरौष्ण्यं प्रकाशो वाऽग्निव्यापारानन्तरानुभावी । अग्निव्यापारानुभावी स्वाभाविकश्चेति विप्रतिषिद्धम् ॥

भाष्यार्थ—( ' अहो पण ब्रह्मभाव कृतक जरी असला तरी नैयायिकांच्या ध्वंसाप्रमाणें नित्य आहे,' म्हणून म्हणाल तर सांगतों–)

स्वाभाविक म्ह० अकृत्रिमें स्वभावांहून दुसरें कांहीं नित्य आहे, अशी कल्पना करतां येणें शक्य नाहीं. ( ' अतोऽन्यदार्तं ' याहून दुसरें सर्व विनाशी आहे, अशी श्रुति आहे. नैयायिकांचा ध्वंस हा केवल वस्तुशून्य शब्दमात्र आहे. त्यामुळें त्याचें नित्यत्व आम्हांला संमत नाहीं. आतां मोक्ष हा अकृत्रिम स्वभाव असला तरी कर्मजन्य आहे, म्हणून म्हणाल तर सांगतों–) अग्नीच्या उष्णतेप्रमाणें मोक्ष हा जर आत्म्याचा स्वाभाविक–अकृत्रिम स्वभाव असेल तर तो पुरुषाच्या व्यापाराच्या–क्रियेच्या मागून होणारा–क्रियासाध्य आहे,असें ह्मणणें शक्य नाहीं.अग्नीचें उष्णत्व किंवा प्रकाश अग्नीच्या व्यापारानन्तर होणारा–अग्नीच्या क्रियेनेंच साध्य–नाहीं. कारण उष्णत्व व प्रकाश हे दोन्ही अग्नीच्या क्रियेनें सिद्ध होणारे आहेत व त्याचे स्वाभाविक धर्मही आहेत, असें म्हणणें परस्पर विरुद्ध आहे.

ज्वलनव्यापारानुभावित्वमुष्णप्रकाशयोरिति चेत् । न । अन्योपलब्धिव्यवधानापगमाभिव्यक्त्यपेक्षत्वात् । ज्वलनादिपूर्वकमग्निरुष्णप्रकाशगुणाभ्यामभिव्यज्यते तन्नाग्न्यपेक्षया किं तर्ह्यन्यदृष्टेरग्नेरौष्ण्यप्रकाशौ धर्मौ व्यवहितौ कस्यचिद्दृष्ट्या त्वसंबध्यमानौ ज्वलनापेक्षया व्यवधानापगमे दृष्टेरभिव्यज्येते । तदपेक्षया भ्रान्तिरुपजायते ज्वलनपूर्वकावेतावुष्णप्रकाशौ धर्मौ जाताविति ॥

भाष्यार्थ—( अरणींतील उष्णत्व व प्रकाश उपलब्ध होत नाहींत, पण त्यांत अग्नि व्यक्त होतांच ते दिसतात त्यामुळें स्वाभाविक असलेलेही ते आगंतुक आहेत, असें म्हणावें लागतें. कारण त्यांची उपलब्धि केव्हां केव्हां होते, अशी शंका घेतात–) उष्णत्व व प्रकाश अग्नीच्या ज्वलन या व्यापाराच्या मागून होणारे आहेत, म्हणून म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण ( अग्नि विद्यमान असतांना त्याच्या उष्ण-प्रकाशस्वभावांना कादाचित्कत्व असणें युक्त नाहीं. यास्तव ) अग्नीच्या अभिव्यक्तीचें जें काष्ठादि दुसरें व्यवधान त्याचा अपगम–ध्वंस झाला म्हणजे

अग्नि अभिव्यक्त होतो; आणि त्याची अभिव्यक्ति झाली म्हणजे त्या अभिव्यक्तीच्या अपेक्षेनें त्याच्या धर्मांचीही अभिव्यक्ति होते. अग्नि ज्वलनादिपूर्वक म्ह० प्रथम ज्वलन पावून नंतरच उष्ण व प्रकाश या गुणांनीं अभिव्यक्त होतो. पण ती अभिव्यक्ति अग्नीच्या अपेक्षेनें नाहीं; तर अग्नीचे उष्ण व प्रकाश हे धर्म पाहणाऱ्या पुरुषाच्या दृष्टीच्या आड असतात. त्यामुळें कोणाच्याही दृष्टीशीं संबद्ध न होणारे ते ज्वलनाच्या अपेक्षेनें व्यवधान-मधील प्रतिबंध--नष्ट झालें असतां दृष्टीला अभिव्यक्त होतात. ( अरणीचें मंथन करणें, इत्यादि व्यापारामुळें अग्नि प्रकाशादिकांच्या द्वारा व्यक्त होतो, असें लोक समजतात; पण पाहणाराच्या दृष्टीला काष्ठादिक व्यवधानानें आच्छादित केलेलें असल्यामुळें ते दिसत नाहींत, पण ज्वलनानें तें व्यवधान नष्ट होतांच ते दिसूं लागतात, असा भावार्थ. ) आणि त्याच्या [1]अपेक्षेनें हे अग्नीचे उष्ण व प्रकाश धर्म ज्वलनपूर्वक उत्पन्न झाले, अशी भ्रांति होते.

यद्युष्णप्रकाशयोरपि स्वाभाविकत्वं न स्यात् । यः स्वाभाविकोऽग्नेर्धर्मस्तमुदाहरिष्यामः । न च स्वाभाविको धर्म एव नास्ति पदार्थानामिति शक्यं वक्तुम् ॥

भाष्यार्थ—( जसें अग्नीचें स्वाभाविक औष्ण्यादिक क्रियासाध्य नाहीं तशी आत्म्याची स्वाभाविक मुक्ति क्रियासाध्य नाहीं, असें सांगितलें. पण आतां ' अग्नीचें औष्ण्यादिक स्वाभाविक नाहीं, अशी आशंका घेऊन सांगतात--) जर उष्ण व प्रकाश यांनाही स्वाभाविकत्व नसेल तर अग्नीचा जो स्वाभाविक धर्म असेल त्याचाच आम्ही [ आत्म्याचा स्वाभाविक मोक्ष कर्मसाध्य नाहीं, याविषयीं ] दृष्टान्त देऊं. पदार्थांचा स्वाभाविक धर्मच नाहीं, असें म्हणतां येणें शक्य नाहीं. ( अर्थात् अग्नीचा स्वाभाविक धर्मच नाहीं कीं ज्याचा मोक्षाला दृष्टान्त देतां येईल, असें म्हणणें अयोग्य आहे. )

---

१ ज्वलनादि व्यापारानें दृष्टीच्या व्यवधानाचा--आड पडद्याचा--भंग झाला असतां अग्नीच्या उष्णतेची व प्रकाशाची अभिव्यक्ति होणें, या कार्याच्या अपेक्षेनें.

न च निगडभङ्ग इवाभावभूतो मोक्षो बन्धननिवृत्तिरुपपद्यते । परमात्मैकत्वाभ्युपगमात् । "एकमेवाद्वितीयम्" इति श्रुतेः । न चान्यो बद्धोऽस्ति यस्य निगडनिवृत्तिवद्बन्धननिवृत्तिर्मोक्षः स्यात् । परमात्मव्यतिरेकेणान्यस्याभावं विस्तरेणावादिष्म । तस्मादविद्यानिवृत्तिमात्रे मोक्षव्यवहार इति चावोचाम यथा रज्ज्वादौ सर्पाद्यज्ञाननिवृत्तौ सर्पादिनिवृत्तिः ॥

भाष्यार्थ—(याप्रमाणें शरीरपातानंतर दुसऱ्या भावाची प्राप्ति होणें हा मोक्ष, या पक्षाचें निराकरण करून दुसऱ्या पक्षाचें निराकरण करितात–) आतां मोक्ष अभावभूत आहे. कारण खोड्याचा जसा भंग होतो त्याप्रमाणें बंधनाची निवृत्ति होणें उपपन्न आहे; आणि बंधननिवृत्ति हाच मोक्ष आहे म्हणून म्हणाल तर तसेंही म्हणतां येत नाहीं. कारण परमात्मैकत्व मानलेलें आहे. 'एकमेवाद्वितीयं' अशी श्रुति आहे. परमात्म्याहून निराळा कोणी बद्ध नाहीं;कीं निगडनिवृत्तीप्रमाणें ज्याच्या बंधननिवृत्तीला मोक्ष म्हणतां येईल. परमात्म्याहून अन्य कोणी नाहीं, हें आम्हीं विस्तारानें सांगितलें आहे. तस्मात् अविद्येची निवृत्ति हाच मोक्ष होय, तिलाच मोक्ष म्हणतात, असें आम्हीं म्हटलें आहे. ज्याप्रमाणें रज्जू इत्यादि अधिष्ठानावर भासलेल्या सर्पादिकांचें कारण जें रज्जूचें अज्ञान त्याची निवृत्ति होतांच सर्पादिकांचीही निवृत्ति होते ( त्याप्रमाणें बंधाचें कारण जें आत्माज्ञान तें निवृत्त झालें असतां तेवढ्यानेंच त्याचें कार्य जो बंध त्याची निवृत्ति होते, अशी वरील वाक्याची योजना करावी. )

येऽप्याचक्षते मोक्षे विज्ञानान्तरमानन्दान्तरं चाभिव्यज्यत इति तैर्वक्तव्योऽभिव्यक्तिशब्दार्थः । यदि तावल्लौकिक्येवोपलब्धिविषयव्याप्तिरभिव्यक्तिशब्दार्थः । ततो वक्तव्यं किं विद्यमानमभिव्यज्यतेऽविद्यमानमिति वा । विद्यमानं चेद्यस्य मुक्तस्य तदभिव्यज्यते तस्याऽऽत्मभूतमेव तदित्युपलब्धिव्यवधानानुपपत्तेर्नित्याभिव्यक्तत्वान्मुक्तस्याभिव्यज्यत इति विशेषवचनमनर्थकम् ॥

१ निगड म्हणजे खोडा, बेडी

भाष्यार्थ—(दुसरें मत उत्थापित करितात–) आतां 'मोक्षांत वैषयिक ज्ञान व वैषयिक आनंद यांहून निराळें विज्ञान व निराळा आनंद अभिव्यक्त होतो' असें जे कित्येक सांगतात त्यांनीं अभिव्यक्ति या शब्दाचा अर्थ सांगावा. लौकिक उपलब्धि–विषयव्याप्ति हाच अभिव्यक्तिशब्दाचा अर्थ आहे, म्हणून म्हणत असाल तर विद्यमान सुखच अभिव्यक्त होतें कीं अविद्यमान तें सांगावें. विद्यमानच जर अभिव्यक्त होत असेल तर ज्या मुक्ताला तें अभिव्यक्त होतें त्याचें तें आत्मभूतच असल्यामुळें उपलब्धीच्या व्यवधानाची अनुपपत्ति होते. त्यामुळें तें सुख व ज्ञान नित्य अभिव्यक्तच असतें. त्यामुळें तें मुक्तालाच अभिव्यक्त होतें, हें विशेष वचन व्यर्थ आहे. [म्ह० आत्मा उपलब्धिस्वभाव आहे, त्याला विद्यमानच सुखादिक होतें, म्हणून जर म्हणाल तर ज्ञान व आनंद यांना भिन्नदेशादि व्यवधान नसल्यामुळें त्याला आनंद नित्य अभिव्यक्त होईल. त्यामुळें आनंद हें मुक्तीचें विशेषण आहे, हें म्हणणें व्यर्थ आहे; असा भावार्थ.]

अथ कदाचिदेवाभिव्यज्यत उपलब्धिव्यवधानादनात्मभूतं तदित्यन्यतोऽभिव्यक्तिप्रसङ्गः। तथा चाभिव्यक्तिसाधनापेक्षता। उपलब्धिसमानाश्रयत्वे तु व्यवधानकल्पनानुपपत्तेः सर्वदाऽभिव्यक्तिरनभिव्यक्तिर्वा ॥

भाष्यार्थ—(चक्षु व घट यांच्या विषय-विषयित्वाला प्रतिबंध करणाऱ्या भिंतीप्रमाणें वगैरे संसारदशेंत आनन्द व ज्ञान यांच्या अभिव्यक्तीला अधर्मादि प्रतिबंध करितात; पण मोक्षदशेंत त्या अधर्मादि प्रतिबंधाच्या अभावीं आनंद व ज्ञान व्यक्त होतात, अशी शंका घेतात–) आतां आनंद व ज्ञान केव्हां केव्हांच उपलब्ध होतें म्हणून म्हणाल तर उपलब्धिव्यवधानामुळें सुख अनात्मभूत ठरतें. त्यामुळें तें अन्यतः उपलब्ध होण्याचा प्रसंग होतो [म्ह० उपलब्धिदेशाहून भिन्न देशीं असलेल्याच घटादिकांच्या उपलब्धीचें व्यवधान प्रतीत होतें. अनात्मभूत सुख स्वभावभूत उपलब्धीनें प्रकाशित होणार नाहीं तर विषयेंद्रियसं-

योगानेंच तें प्रकाशित होतें,असें म्हणावें लागतें.]आणि याप्रमाणें त्याची अन्यत: म्ह० विषयेंद्रियसंपर्कानें उपलब्धि होण्याचा प्रसंग आला म्हणजे अभिव्यक्तीच्या साधनाची अपेक्षा आली. (आणि मुक्तींत अभिव्यक्तीचीं साधनें जर असलीं तर संसार व मोक्ष यांत कांहींच विशेष उरत नाहीं,असा भावार्थ.पण आम्ही हें सुद्धां आनंदाच्या उपलब्धीला व्यवधान आहे,असें मानून म्हणत आहों; पण वस्तुत: व्यवधानच नाहीं,असें सांगतात–)पण आनंदाला उपलब्धिसमानाश्रयत्व असल्यास म्हणजे ज्ञान व आनंद यांचा आश्रय एक आत्माच आहे, असें म्हटल्यास व्यवधानाची कल्पनाच करितां येत नसल्यामुळें सर्वदा अभिव्यक्ति किंवा अनभिव्यक्तिच होईल.

न त्वन्तरालकल्पनायां प्रमाणमस्ति । न च समानाश्रयाणामेकस्याऽऽत्मभूतानां धर्माणामितरेतरविषयविषयित्वं संभवति ॥

भाष्यार्थ––('कदाचित् अभिव्यक्ति व कदाचित् अनभिव्यक्ति याप्रमाणें कालभेदानें दोन्ही गोष्टी कां होऊं नयेत?' अशी आशंका घेऊन सांगतात–) अशी अन्तराल कल्पना करण्यास कांहीं प्रमाण नाहीं. (आनंद व ज्ञान यांचें विषयविषयित्व मानून कादाचित्की अभिव्यक्तीचें निरसन केलें; पण आतां तें विषयविषयित्वच संभवत नाहीं, असें म्हणतात–) समानाश्रय--एकाच्या स्वाभाविक--धर्मांना इतरेतरविषयविषयित्व संभवत नाहीं, (एकाच वस्तूच्या समानाश्रय स्वाभाविक धर्मांतील एक दुसऱ्याचा धर्म व तो त्याचा धर्म असा संबंध संभवत नाहीं.)

विज्ञानसुखयोश्च प्रागभिव्यक्तेः संसारित्वमभिव्यक्त्युत्तरकालं च मुक्तत्वं यस्य सोऽन्यः परस्मान्नित्याभिव्यक्तज्ञानस्वरूपादत्यन्तवैलक्षण्याच्छैत्यमिवौष्ण्यात् । परमात्मभेदकल्पनायां च वैदिकः कृतान्तः परित्यक्तः स्यात् ॥

भाष्यार्थ––(मुक्तींत आनन्द व ज्ञान यांची अभिव्यक्ति होते, यापक्षीं आणखी दोष देण्यासाठीं भूमिका रचतात–) विज्ञान व सुख यांच्या अभिव्यक्तीच्या पूर्वी ज्याला संसारित्व असतें व अभिव्यक्ति झाल्या-

नंतर मुक्तत्व असतें तो परमात्म्याहून अन्य आहे. जसें--शैत्य औष्ण्याहून अत्यंत विलक्षण असतें त्याप्रमाणें नित्य अभिव्यक्त ज्ञानस्वरूप व त्यामुळेंच अत्यंत विलक्षण अशा परमात्म्याहून तो विलक्षण आहे, असें म्हणावें लागतें. पण तशी परमात्मभेदकल्पना केल्यास वैदिक सिद्धान्त सोडल्यासारखा होतो.

मोक्षस्येदानीमिव निर्विशेषत्वे तदर्थाधिकयत्नानुपपत्तिः शास्त्रवैयर्थ्यं च प्राप्नोतीति चेन्न । अविद्याभ्रमापोहार्थत्वात् । न हि वस्तुतो मुक्तामुक्तत्वविशेषोऽस्ति । आत्मनो नित्यैकरूपत्वात् ॥

भाष्यार्थ—(याप्रमाणें परमताचें निराकरण करून सिद्धान्तावरही दोषद्वयाची शंका घेतात–) 'अहो पण मोक्षाला आतांप्रमाणें निर्विशेषत्व असेल तर मोक्षासाठीं शम दमादि अधिक यत्नाची अनुपपत्ति व मोक्षविषय शास्त्राला व्यर्थत्व हे दोष येतात,' म्हणून म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण अविद्या व तिच्यामुळें होणारा भ्रम यांचें निरसन करण्यासाठीं शमादि यत्न व शास्त्र आहे. वस्तुतः मुक्तत्व व अमुक्तत्व हा विशेष नाहीं. कारण आत्मा नित्य एकरूप आहे.

किंतु तद्विषयाऽविद्याऽपोह्यते शास्त्रोपदेशजनितविज्ञानेन । प्राक्तदुपदेशप्राप्तेस्तदर्थश्च प्रयत्न उपपद्यत एव ॥

भाष्यार्थ—( तर मग शास्त्रादिकाला अर्थवत्त्व कसें ? ) परंतु शास्त्रोपदेशजनित विज्ञानानें तद्विषय–आत्मविषय–अविद्येचा निरास होतो ( याप्रमाणें शास्त्राची उपयुक्तता सांगून यत्नाची उपयुक्तता सांगतात-) व तो शास्त्रोपदेश प्राप्त होण्यापूर्वी मोक्षासाठीं यत्न करणें उपपन्न होतेंच.

अविद्यावतोऽविद्यानिवृत्त्यनिवृत्तिकृतो विशेष आत्मनः स्यादिति चेत् । न । अविद्याकल्पनाविषयत्वाभ्युपगमाद्रज्जूषरशुक्तिकागगनानां सर्पोदकरजतमलिनत्वादिवददोष इत्यवोचाम ॥

भाष्यार्थ— (वर आत्मा सदा एकरूप असतो, असें जें म्हटलें होतें त्यावर आक्षेप घेतात–) अविद्यावान् आत्म्याचा अविद्यानिवृत्ति व अनि-

वृत्ति यांमुळें विशेष होईल, म्हणून म्हणाल तर तें बरोबर नाहीं. अविद्याकल्पनाविषयत्व–मानलेलें असल्यामुळें रज्जु, ऊषरभूमि, शुक्तिका, गगन यांच्या ठिकाणीं भासणाऱ्या सर्प, उदक, रजत व मलिनत्व यांप्रमाणें आत्म्याच्या ठिकाणीं कांहीं दोष येत नाहीं, असें आम्हीं सांगितलें आहे. ( आत्म्याच्या ठिकाणीं भासणारें सविशेषत्व अविद्याकल्पनाविषय असल्यामुळें कल्पित सर्पादिकांनीं रज्ज्वादिक जसे दूषित होत नाहींत त्याप्रमाणें कल्पित दोषांनीं आत्मा दूषित होत नाहीं,असा भावार्थ.)

तिमिरातिमिरदृष्टिवदविद्याकर्तृत्वाकर्तृत्वकृत आत्मनो विशेषः स्यादिति चेत् । न । ध्यायतीव लेलायतीवेति स्वतोऽविद्याकर्तृत्वस्य प्रतिषिद्धत्वात् । अनेकव्यापारसंनिपातजनितत्वाच्चाविद्याभ्रमस्य । विषयत्वोपपत्तेश्च । यस्य चाविद्याभ्रमो घटादिवद्विविक्तो गृह्यते स नाविद्याभ्रमवान् ॥

भाष्यार्थ—( आतां पुन्हा सविशेषत्वाविषयीं दुसऱ्या प्रकारें आशंका घेतात–) ज्याच्या दृष्टीला तिमिर हा रोग झालेला असतो त्याला दोन चंद्र दिसतात व ज्याला तो रोग नसतो त्याला एकच चंद्र दिसतो त्याप्रमाणें अविद्येचें कर्तृत्व व अकर्तृत्व यांमुळें आत्म्याचा विशेष होईल, ह्मणून ह्मणाल तर तें बरोबर नाहीं–कारण ( अविद्याकर्तृत्व ह्मणजे काय ? अविद्याजनकत्व कीं अविद्याश्रयत्व ? ' अविद्याजनकत्व ' ह्मणून ह्मणाल; तर तें बरोबर नाहीं. कारण ) याच उपनिषदांत पूर्वी 'ध्यायतीव लेलायतीव' ( बृह. अ. ४ पृ. ६७ पहा ) असें ह्मणून त्याच्या अविद्याकर्तृत्वाचा प्रतिषेध केला आहे. शिवाय अविद्याभ्रम अनेक व्यापारांचा संनिपात झाल्यामुळें होतो. ( अन्तःकरणच विषयाकार व विषयी-आकार होतें. त्या विषय-विषयी-आकार अन्तःकरणांत चिदाभासाचा उदय होणें हाच आत्म्याचा व्यापार होय. तशा अनेक व्यापारांचा संबंध झाला असतां ' मी संसारी आहें,' असा अविद्यात्मक भ्रम होतो. त्यामुळें तो आत्मकृत नव्हे, असा भावार्थ. आतां अविद्याश्रयत्व ह्मणजे अवि-

द्याकर्तृत्व हा पक्ष घेऊन त्याचें निराकरण करितात–) शिवाय अविद्येला विषयत्वाची उपपत्ति आहे. म्हणजे अविद्या आत्म्याचा विषय आहे. ती आत्म्याच्या दृष्टीचा विषय होते. ती आत्मदृश्य आहे. त्यामुळें ती त्याची आश्रित होऊं शकत नाहीं. कारण ज्याच्याकडून अविद्याभ्रम घटादिकांप्रमाणें अगदीं पृथक्त्वानें ग्रहण केला जातो तो अविद्याभ्रमवान् नाहीं.

अहं न जाने मुग्धोऽस्मीति प्रत्ययदर्शनादविद्याभ्रमवत्त्वमेवेति चेन्न। तस्यापि विवेकग्रहणात् । न हि यो यस्य विवेकेन ग्रहीता स तस्मिन्भ्रान्त इत्युच्यते । तस्य च विवेकग्रहणं तस्मिन्नेव च भ्रम इति विप्रतिषिद्धम् ॥

भाष्यार्थ—( अनुभवानुसार शंका–) अहो पण मी जाणत नाहीं, मी मूढ आहें, इत्यादि प्रत्यय येत असल्याचें दिसतें. त्यामुळें आत्म्याला अविद्याभ्रमवत्त्वच आहे, म्हणून म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण त्याचेंही विवेकानें–पृथक्त्वानें ग्रहण होतें. ( 'मी जाणत नाहीं, मी मुग्ध आहें,' हा प्रत्ययही साक्षीचा विषय होतो. अर्थात् त्याहून साक्षी भिन्न आहे;असें ठरतें. त्यामुळें तो साक्षी अविद्येचा विषय नव्हे.) जो ज्याचें पृथक्त्वानें ग्रहण करणारा तोच त्याविषयीं भ्रांत आहे, असें म्हटलें जात नाहीं. तोच भ्रांताला स्वतःहून भिन्नत्वानें जाणतो व त्याच्याच ठिकाणीं भ्रम आहे, हें म्हणणें विरुद्ध आहे.

न जाने मुग्धोऽस्मीति दृश्यत इति ब्रवीषि तद्दर्शिनश्चाज्ञानं मुग्धरूपता दृश्यत इति च तद्दर्शनस्य विषयो भवति कर्मतामापद्यत इति। तत्कथं कर्मभूतं सत्कर्तृस्वरूपदृशिविशेषणमज्ञानमुग्धते स्याताम् । अथ दृशिविशेषणत्वं तयोः कथं कर्म स्यातां दृशिना व्याप्येते । कर्म हि कर्तृक्रियया व्याप्यमानं भवति । अन्यश्च व्याप्यमन्यद्व्यापकं न तेनैव तद्व्याप्यते । वद कथमेवं सत्यज्ञानमुग्धते दृशिविशेषणे स्याताम् ॥

भाष्यार्थ—( अज्ञान व मुग्धत्व हीं आत्म्याचीं विशेषणें नव्हेत; असें दुसऱ्या प्रकारें सांगण्यासाठीं पूर्वपक्षाचा अनुवाद करितात–) 'मी जाणत

नाहीं, मी मुग्ध आहें' असें प्रतीत होतें, असें तूं म्हणतोस. (याचेंच स्पष्टीकरण–) अज्ञानादिकांच्या पाहणाराला अज्ञान व मुग्धरूपत्व दिसतें, असेंही तूं ह्मणतोस. त्यावरून तें अज्ञानादि दृश्य आहे–दर्शनाचा विषय आहे असें ठरतें. तें दर्शनाच्या कर्मत्वास प्राप्त होतें, असें तुझ्याच ह्मणण्यावरून सिद्ध होतें. पण अज्ञान व मुग्धता यांना जर कर्मत्व आहे तर तींच कर्तृस्वरूप जी दृशि–आत्मचैतन्य त्याचीं विशेषणें कशीं होतील? बरें, त्यांना दृशिस्वरूप आत्म्याचें विशेषणत्व आहे, ह्मणून म्हणाल तर त्यांना कर्मत्व कसें? व तीं दोन्ही दृशिस्वरूप साक्षीकडून व्यापलीं कशीं जातात? कारण कर्म कर्त्याच्या क्रियेनें व्यापलें जाणारें असतें आणि व्याप्य निराळें असतें व व्यापक निराळें असतें.त्याच्याकडूनच तें व्यापलें जात नाहीं. याप्रमाणें व्याप्य-व्यापकभाव भेदनिष्ठ आहे–भिन्न पदार्थांतच राहतो, असें सिद्ध झालें असतां अज्ञान व मुग्धत्व हीं दोन्ही साक्षीचीं विशेषणें कशीं होतील, तें सांग पाहू.

न चाज्ञानविवेकदर्श्यज्ञानमात्मनः कर्मभूतमुपलभमान उपलब्धृधर्मत्वेन गृह्णाति शरीरे कार्श्यरूपादिवत्तथा। सुखदुःखेच्छाप्रयत्नादीन्सर्वो लोको गृह्णातीति चेत्। तथाऽपि ग्रहीतुर्लोकस्य विविक्ततैवाभ्युपगता स्यात्॥

भाष्यार्थ––( शिवाय अज्ञान हा त्याला पाहणाराचा धर्म होऊं शकत नाहीं. कारण देहांतील कृशत्वादि धर्मांप्रमाणें अज्ञानही साक्षीचा विषय होतें, असें सांगतात–) अज्ञानाला स्वतःहून भिन्नत्वानें पाहणारा, अज्ञान हें आपल्या ज्ञानाचें कर्म आहे, असें जाणणारा त्याला उपलब्धृधर्मत्वानें–आत्मधर्मत्वानें जाणत नाहीं. शरीरांतील कृशता, रूप इत्यादिकांप्रमाणें. त्याचप्रमाणें अज्ञानकार्यही आत्मधर्म नव्हे–(' अहो पण अज्ञानापासून उद्भवलेल्या इच्छादिकांना आत्मधर्मत्व नाहीं, ह्मणून जर म्हणाल तर प्रतीतीशीं–अनुभवाशीं विरोध येईल,' अशी शंका घेतात-) ' अहो पण सुख, दुःख, इच्छा, प्रयत्न इत्यादिकांचें सर्व लोक ग्रहण

करतो,' म्हणून म्हणाल तर तें खरें आहे. पण त्यावरून ग्रहण करणाऱ्या लोकाची सुखादिकांहून विविक्तताच–पृथक्ताच स्वीकारल्यासारखी होते [ कारण सुख, दुःख, इच्छा, प्रयत्न इत्यादि हे जर आत्मनिष्ठ धर्म असते तर चैतन्याप्रमाणेंच त्यांचेंही ग्रहण करतां आलें नसतें. पण पण सुखादिकांचें तर ग्रहण होतें. म्हणून ते आत्मधर्म नव्हेत, असा भावार्थ-]

न जानेऽहं त्वदुक्तं मुग्ध एवेति चेत्। भवत्वज्ञो मुग्धो यस्त्वेवंदर्शी तं ज्ञममुग्धं प्रतिजानीमहे वयम्। तथा व्यासेनोक्तम्। इच्छादि कृत्स्नं क्षेत्रं क्षेत्री प्रकाशयतीति। "समं सर्वेषु भूतेषु तिष्ठन्तं परमेश्वरम्। विनश्यत्स्वविनश्यन्तम्" इत्यादि शतश उक्तम्। तस्मान्नाऽऽत्मनः स्वतो बद्धमुक्तज्ञानाज्ञानकृतो विशेषोऽस्ति। सर्वदा समैकरसस्वाभाव्याभ्युपगमात्॥

भाष्यार्थ—( दुसऱ्या प्रकारें वरील प्रश्नाचें निराकरण करण्यासाठीं वरील प्रश्नाचाच पुनः अनुवाद करितात–) तूं सांगितलेलें मला कळलें नाहीं, मी मुग्धच आहें, म्हणून म्हणशील तर तूं अज्ञ अस कीं, मुग्ध अस. पण तुझ्यांतीलच जो आपल्याला अज्ञ किंवा मुग्ध समजणारा तो ज्ञानी व अमुग्ध आहे, अशीच आम्ही प्रतिज्ञा करतों. त्याचप्रमाणें भगवान् व्यासानें इच्छादि सर्व क्षेत्रास क्षेत्री प्रकाशित करतो, असें सांगितलें आहे. 'सर्व भूतांमध्यें सम–एकरूपानें राहणाऱ्या परमेश्वराला,' 'भूतें विनाश पावत असलीं तरी विनाश न पावणाऱ्या ईश्वराला' इत्यादि[१] शतशः सांगितलें आहे. ( याप्रमाणें आत्म्याचें निर्विशेषत्व प्रामाणिक आहे, असें सिद्ध झालें असतां स्वमताचा उपसंहार करितात–) तस्मात् आत्म्यामध्यें स्वतः बद्ध, मुक्त, ज्ञान, अज्ञान इत्यादिकांमुळें कोणताही विशेष नाहीं. कारण तो सर्वदा सम व एकरस या स्वभावाचा आहे, असें मानलेलें आहे.

ये त्वतोऽन्यथाऽऽत्मवस्तु परिकल्प्य बन्धमोक्षादिशास्त्रं चार्थवाद-

---

१ येथील आदिशब्दानें 'समं पश्यन्हि सर्वत्र०' 'ज्योतिषामपि तज्ज्योतिः' इत्यादि वचनांचा संग्रह करावा.

मापादयन्ति न उत्सहन्ते खेऽपि शाकुनं पदं द्रष्टुं खं वा मुष्टिनाऽऽक्रष्टुं चर्मवद्वेष्टितुम ॥

भाष्यार्थ--( आणखी एका पक्षाचा अनुवाद करितात-) पण जे आत्मवस्तु याहून म्ह० निर्विशेष स्वाभाव्याहून विपरीत आहे अशी परिकल्पना करून बंध-मोक्षादिशास्त्र हा अर्थवाद आहे, असें म्हणतात ते आकाशांतही पक्ष्याचें पाऊल उठलेलें पाहूं शकतात, आकाशाला मुठींत धरून ओढूं शकतात. किंवा त्याला चामड्यानें मढवूं शकतात. ( पण आत्मा सुख-दुःखादि विशेषांनीं युक्त आहे, असें म्हणतां येणें शक्य नाहीं. कारण आत्मा सविशेष नसून निर्विशेष आहे, असें सांगणाऱ्या आगमाशीं विरोध येतो, असा भावार्थ. )

वयं तु तत्कर्तुमशक्ताः सर्वदा समैकरसमद्वैतमविक्रियमजमजरममरममृतमभयमात्मतत्त्वं ब्रह्मैव स्म इत्येष सर्ववेदान्तनिश्चितोऽर्थ इत्येवं प्रतिपद्यामहे । तस्माद्ब्रह्माप्येतीत्युपचारमात्रमेतद्विपरीतग्रहवद्देहसंततेर्विच्छेदमात्रं विज्ञानफलमपेक्ष्य ॥ ६ ॥

भाष्यार्थ---( तर मग तुम्ही आत्मवस्तु कशी मानतां ? तें सांगतात--) आम्ही तर वरील वाद्यांप्रमाणें आत्म्याचा अन्यथाभाव करण्यास असमर्थ आहों. त्यामुळें सर्वदा सम एकरस, अद्वैत, अविक्रिय, अज, अजर, अमर, अमृत, अभय आत्मतत्त्व ब्रह्मच आहे, व आम्ही तेंच आहों; हा अशा प्रकारचा सर्व वेदान्ताचा निश्चित अर्थ आहे, असें आम्हीं समजतों. तस्मात् ' ब्रह्मैव सन्ब्रह्माप्येति ' हें म्हणणें केवळ उपचारमात्र आहे. (पण तशा औपचारिक वर्णनाचें तरी कारण काय ? तें सांगतात-) आत्मा तत्त्वतः संसारी आहे, अशा विपरीत ग्रहानें युक्त असलेली जी देहसंतति तिचा विच्छेद होणें या एवढ्याच ज्ञान-फलाच्या अपेक्षेनें ' ब्रह्मैव सन्ब्रह्माप्येति ' हा शब्द उपचार आहे ६.

तदेष श्लोको भवति । यदा सर्वे प्रमुच्यन्ते

१ अज्ञानामुळें बंध, ज्ञानानें मोक्ष, हा अर्थवाद आहे.

कामा येऽस्य हृदि श्रिताः । अथ मर्त्योऽमृतो भवत्यत्र ब्रह्म समश्नुत इति । तद्यथाऽहिनिर्ल्वयनी वल्मीके मृता प्रत्यस्ता शयीतैवमेवेदꣳ शरीरꣳ शेतेऽथायमशरीरोऽमृतः प्राणो ब्रह्मैव तेज एव सोऽहं भगवते सहस्रं ददामीति होवाच जनको वैदेहः ॥ ७ ॥

अर्थ—त्याच अर्थी हा मंत्र आहे. ज्यावेळीं याच्या हृदयाचा आश्रय करून असलेले जे काम ते सर्व सर्वथा नाहींसे होतात तेव्हां हा मर्त्य अमृत होतो व या शरीरांत असतांनाच ब्रह्मभावास प्राप्त होतो. त्याविषयीं हा दृष्टान्त--ज्याप्रमाणें सापाची कात वारुळादि सर्पाच्या राहण्याच्या ठिकाणीं मेलेली व सर्पानें तिच्यावरील आत्मभाव काढून घेऊन टाकलेली अशी पडून राहते त्याप्रमाणें हें शरीर पडून राहतें व हा अशरीर, अमृत, प्राण ब्रह्मच, तेजच आहे. तेव्हां ' तो मी तुम्हाला सहस्र गायी देतों ' असें वैदेह जनक म्हणाला. ७

स्वप्नबुद्धान्तगमनदृष्टान्तस्य दार्ष्टान्तिकः संसारो वर्णितः । संसारहेतुश्च विद्याकर्मपूर्वप्रज्ञा वर्णिता । यैश्चोपाधिभूतैः कार्यकरणलक्षणभूतैः परिवेष्टितः संसारित्वमनुभवति तानि चोक्तानि । तेषां साक्षात्प्रयोजकौ धर्माधर्माविति पूर्वपक्षं कृत्वा काम एवेत्यवधारितम् । यथा च ब्राह्मणेनायमर्थोऽवधारित एवं मन्त्रेणापीति बन्धं बन्धकारणं चोक्त्वोपसंहृतं प्रकरणमिति नु कामयमान इति ॥

भाष्यार्थ—( ब्राह्मणानें सांगितलेल्या अर्थी मंत्राचें प्रमाण देण्यासाठीं ब्राह्मणाच्या अर्थाचा अनुवाद करितात–) स्वप्न व जागरित यांतील गमनाचा वर जो दृष्टान्त दिला होता त्याचा दार्ष्टान्तिक संसार असून त्याचें वर्णन केलें व संसाराचा हेतु विद्या, कर्म व पूर्वप्रज्ञा आहे, अ-

सेंही वर्णन केलें. ज्या उपाधिभूत कार्य-करणलक्षण भूतांनीं परिवेष्टित झालेला आत्मा संसारित्वाचा अनुभव घेतो तीं भूतेंही सांगितलीं. त्यांचे साक्षात् प्रयोजक–हेतु–प्रेरक धर्म व अधर्म आहेत असा पूर्वपक्ष करून कामच त्याचा प्रयोजक--हेतु आहे, असा निश्चय केला. ज्याप्रमाणें ब्राह्मणानें हा अर्थ [ म्ह० संसार व त्याचा हेतु ] निश्चित केला आहे त्याचप्रमाणें ( ' तदेव सक्तः सह कर्मणैति ' इत्यादि ) मंत्रानेंही हा अर्थ निश्चित केला आणि याप्रमाणें बंध व बंधकारण सांगून ' इति नु कामयमानः ' असा प्रकरणाचा उपसंहार केला आहे.

अथाकामयमान इत्यारभ्य सुषुप्तदृष्टान्तस्य दार्ष्टान्तिकभूतः सर्वात्मभावो मोक्ष उक्तः । मोक्षकारणं चाऽऽत्मकामतया यदाप्तकामत्वमुक्तम् । तच्च सामर्थ्यान्नाऽऽत्मज्ञानमन्तरेणाऽऽत्मकामतयाऽऽप्तकामत्वमिति सामर्थ्याद्ब्रह्मविद्यैव मोक्षकारणमित्युक्तम् । अतो यद्यपि कामो मूलमित्युक्तं तथाऽपि मोक्षकारणविपर्ययेण बन्धकारणमविद्येत्येतदप्युक्तमेव भवति ॥

भाष्यार्थ—नंतर 'अथाकामयमानः' असा आरंभ करून सुषुप्त दृष्टान्ताचा दार्ष्टान्तिकभूत सर्वात्मभाव मोक्ष सांगितला; आणि आत्मकाम झाल्यामुळें जें आप्तकामत्व तें मोक्षकारण आहे, असें सांगितलें. ( तर मग आत्मज्ञान हें मोक्षाचें कारण नव्हे, अर्थात् तुम्ही आत्मज्ञानाची उपेक्षा करतां, अशी आशंका घेऊन सांगतात—) पण जें आत्मकामत्वानें आप्तकामत्व तें सामर्थ्यावरूनच आत्मज्ञानावाचून प्राप्त होत नाहीं. यास्तव सामर्थ्यावरून ब्रह्मविद्याच मोक्षकारण आहे, असें सांगितलें आणि ब्रह्मज्ञानच मोक्षकारण आहे, असें सांगितलेलें असल्यामुळें जरी काम बंधाचें मूळ आहे, असें वर म्हटलें आहे तरी मोक्षाचें कारण जें ब्रह्मज्ञान त्याच्या विपर्ययानें--उलट अविद्याच बंधकारण आहे, हेंही सांगितलें आहे असेंच होतें.

अत्रापि मोक्षो मोक्षसाधनं च ब्राह्मणेनोक्तम् । तस्यैव दृढीकरणाय मन्त्र उदाह्रियते श्लोकशब्दवाच्यः । तत्तस्मिन्नेवार्थ एष श्लोको

मन्त्रो भवति । यदा यस्मिन्काले सर्वे समस्ताः कामास्तृष्णाप्रभेदा प्रमुच्यन्ते । आत्मकामस्य ब्रह्मविदः समूलतो विशीर्यन्ते । ये प्रसिद्धा लोक इहामुत्रार्थाः पुत्रवित्तलोकैषणालक्षणा अस्य प्रसिद्धस्य पुरुषस्य हृदि बुद्धौ श्रिता आश्रिताः । अथ तदा मर्त्यो मरणधर्मा सन्कामवियोगात्समूलतोऽमृतो भवति ॥

भाष्यार्थ—या मोक्षप्रकरणांतही ब्राह्मणानें मोक्ष व मोक्षसाधन सांगितलें आहे. त्याच्याच दृढीकरणार्थ श्लोक या शब्दानें ज्याचा उल्लेख केला आहे असा मंत्र सांगितला जातो. 'तदेष श्लोको भवति-' त्याच अर्थी हा श्लोक–मंत्र आहे.'यदा-'ज्यावेळीं'सर्वे कामाः-'सर्व काम–तृष्णेचे भेद नष्ट होतात (उप सर्गासह 'प्रमुच्यन्ते' या क्रियापदाचें व्याख्यान–) आत्म्याचाच ज्याला काम आहे अशा आत्मकाम ब्रह्मवेत्त्याचे सर्व काम मूळासहवर्तमान नष्ट होतात, (कामाचेंच स्पष्टीकरण-) 'ये-' जे लोकांत प्रसिद्ध असलेले ऐहिक व पारलौकिक अर्थ--पुत्रैषणा,वित्तैषणा,लोकैषणा, एतद्रूप काम 'अस्य-'या प्रसिद्ध पुरुषाच्या 'हृदि-'बुद्धींत 'श्रिताः-'आश्रित असलेले (समूळ नष्ट होतात) 'अथ-' तेव्हां 'मर्त्यः-' मरण हा ज्याचा धर्म आहे, असा असतांना तो कामांचा समूळ वियोग झाल्यामुळें 'अमृत'होतो.

अर्थादनात्मविषयाः कामा अविद्यालक्षणा मृत्यव इत्येतदुक्तं भवति । अतो मृत्युवियोगे विद्वाञ्जीवन्नेवामृतो भवति । अत्रास्मिन्नेव शरीरे वर्तमानो ब्रह्म समश्नुते ब्रह्मभावं मोक्षं प्रतिपद्यत इत्यर्थः । अतो मोक्षो न देशान्तरगमनाद्यपेक्षते । तस्माद्विदुषो नोत्क्रामन्ति प्राणा यथावस्थिता एव स्वकारणे पुरुषे समवनीयन्ते नाममात्रं ह्यवशिष्यत इत्युक्तम् ॥

भाष्यार्थ—(कामवियोगामुळें अमृत होतो या निर्देशाच्या सामर्थ्यावरून सिद्ध झालेला अर्थ सांगतात–) अर्थात् अनात्मविषय–अनात्म पदार्थांविषयींचे काम हे अविद्यालक्षण मृत्यु आहेत हें सांगितल्यासारखें होतें. यास्तव त्या मृत्यूचा वियोग झाला असतां विद्वान् जीवंत असतांनाच 'अमृत होतो.' 'अत्र-' याच शरीरांत विद्यमान असतांना 'ब्रह्म

समश्नुते-' ब्रह्मभावास--मोक्षास प्राप्त होतो, असा भावार्थ. यास्तव मोक्ष दुसऱ्या प्रदेशीं गमन करणें इत्यादिकांची अपेक्षा करीत नाहीं. तस्मात विद्वानाचे प्राण शरीरांतून वर निघून जात नाहींत तर ते शरीरांत जसे अवस्थित असतात तसेच आपलें कारण जो पुरुष त्यामध्यें पूर्णपणें लीन होतात. त्यानंतर त्याचें नाममात्र अवशिष्ट राहतें हें वर ( अ. ३ पृ. ५६ ) सांगितलेंच आहे.

कथं पुनः समवनीतेषु प्राणेषु देहे च स्वकारणे प्रलीने विद्वान्मुक्तोऽत्रैव सर्वात्मा सन्वर्तमानः पुनः पूर्ववद्देहित्वं संसारित्वलक्षणं न प्रतिपद्यत इति ॥

भाष्यार्थ—('तद्यथा-' इत्यादि वाक्यानें ज्या शंकेचें निरसन करावयाचें आहे ती सांगतात–) प्राण सर्वथा प्रलीन झाले असतां व देह आपल्या कारणांत प्रलीन झाला असतां विद्वान् मुक्त--येथेंच सर्वात्मा होऊन राहणारा--पुनः पूर्वीप्रमाणें संसारित्वलक्षण देहित्वास कसा प्राप्त होत नाहीं ? [म्ह० मुक्त झाल्यावरही जर तो शरीरांत रहात असेल तर पूर्वीप्रमाणेंच याला देहित्व असल्यामुळें विद्या व्यर्थ होते असा भावार्थ.]

अत्रोच्यते । तत्त्रायं दृष्टान्तो यथा लोकेऽहिस्सर्पस्तस्य निर्ल्वयनी निर्मोकः साऽहिनिर्ल्वयनी वल्मीके सर्पाश्रये वल्मीकादावित्यर्थः । मृता प्रत्यस्ता प्रक्षिप्ताऽनात्मभावेन सर्पेण परित्यक्ता शयीत वर्तेत । एवमेव यथाऽयं दृष्टान्त इदं शरीरं सर्पस्थानीयेन मुक्तेनानात्मभावेन परित्यक्तं मृतमिव शेते ॥

भाष्यार्थ—(या शंकेचा परिहार दृष्टान्तानें करितात–) याविषयीं सांगितलें जातें. 'तत्-' त्याविषयीं हा दृष्टान्त आहे. 'यथा-' ज्याप्रमाणें लोकांत 'अहिनिर्ल्वयनी–' अहि म्ह० सर्प, त्याची निर्ल्वयनी–कात, ती अहिनिर्ल्वलयनी--सापाची कात 'वल्मीके-' सर्पाच्या वारुळादि आश्रयांत, असा भावार्थ; 'मृता ' मेलेली, 'प्रत्यस्ता-' टाकलेली सर्पानें अनात्मभा-

१ येथील आदिशब्दानें उत्क्रांति, गति, आगति यांचें ग्रहण करावें.

वानें—ही माझी नव्हे, अशा भावनेनें टाकून दिलेली अशी 'शयीत-' राहते—वारुळादिकांवर पडून राहते 'एवमेव-' जसा हा दृष्टान्त आहे त्याप्रमाणें 'इदं शरीरं-' हें शरीर सर्पस्थानीय मुक्तानें टाकलेलें—अनात्म भावानें—हें मी नव्हे, या समजुतीनें--टाकलेलें मृत असल्यासारखें 'शेते-'राहतें.

अथेतरः सर्पस्थानीयो मुक्तः सर्वात्मभूतः सर्पवत्तत्रैव वर्तमानोऽप्यशरीर एव न पूर्ववत्पुनः सशरीरो भवति। कामकर्मप्रयुक्तशरीरात्मभावेन हि पूर्वं सशरीरो मर्त्यश्च। तद्वियोगादथेदानीमशरीरोऽत एव चामृतः॥

भाष्यार्थ—(सर्पदृष्टान्ताचा दार्ष्टान्तिक सांगतात—) 'अथ-' दुसरा सर्पस्थानीय मुक्त, सर्वात्मभूत 'अयं-' हा विद्वान् सर्पाप्रमाणें त्याच शरीरांत असूनही 'अशरीरच' असतो. पूर्वीप्रमाणें पुनः सशरीर होत नाहीं. काम-कर्मप्रयुक्त जो शरीरात्मभाव--[म्ह० शरीरच मी ही भावना] त्या भावानें हा पूर्वी म्ह० अविद्यावस्थेंत सशरीर व मर्त्य होता; पण आतां--विद्यावस्थेंत कामादिकांच्या वियोगामुळें अशरीर व त्यामुळेंच 'अमृत' होतो.

प्राणः प्राणितीति प्राणः। प्राणस्य प्राणमिति हि वक्ष्यमाणे श्लोके "प्राणबन्धनं हि सोम्य मनः" इति च श्रुत्यन्तरे। प्रकरणवाक्यसामर्थ्याच्च पर एवाऽऽत्माऽत्र प्राणशब्दवाच्यः। ब्रह्मैव परमात्मैव। किं पुनस्तत्तेज एव विज्ञानं ज्योतिर्येनाऽऽत्मज्योतिषा जगदवभास्यमानं प्रज्ञानेत्रं विज्ञानज्योतिष्मत्सदविभ्रंशद्वर्तते॥

भाष्यार्थ—'प्राणः' प्राणक्रिया करतो, ह्मणून प्राण 'प्राणाचा प्राण' असें पुढील श्लोकांत व 'हे शिष्या, मन प्राणबंधन आहे.' असें दुसऱ्या श्रुतींत म्हटलें आहे. [म्ह० पुढील श्लोकांत प्राणशब्दानें पर आत्माच जसा विवक्षित आहे, तसा येथेंही प्राणशब्दानें पर आत्माच उक्त आहे. तसेंच 'प्राणबंधनं हि०' इत्यादि दुसऱ्या श्रुतींत प्राणशब्दानें परमात्माच जसा विवक्षित आहे तसाच येथें प्राणशब्दानें परमा-

त्मा विवक्षित आहे. शिवाय हें प्रकरण परमात्मविषय आहे. कारण 'अथाकामयमानः' येथून मोक्षाच्या प्रतिपादनास आरंभ केला आहे. त्यामुळें 'अथायमशरीरः०' इत्यादि वाक्यही मोक्षविषय आहे. हें तसें जर नसतें तर यांतील ब्रह्मादिशब्द अनुपपन्न झाले असते. त्यामुळें शब्द व प्रकरण या दोन्ही सामर्थ्यावरून प्राणशब्दानें पर आत्माच घेणें अवश्य आहे, असें सांगतात—] शब्दाप्रमाणें प्रकरणवाक्याच्या सामर्थ्यावरून येथें पर आत्माच प्राणशब्दवाच्य आहे. 'ब्रह्मैव' तो परमात्माच. तें ब्रह्म काय आहे? 'तेज एव' तें तेजच—विज्ञान ज्योति आहे. ज्या आत्मज्योतीकडून प्रकाशित केलें जाणारें जगत् प्रज्ञानेत्र, व विज्ञानज्योतिष्मत्—विज्ञान या ज्योतीनें युक्त असें होत्सातें विशेषेंकरून भ्रंश न पावणारें असें होऊन राहतें.

यः कामप्रश्नो विमोक्षार्थो याज्ञवल्क्येन वरो दत्तो जनकाय सहेतुको बन्धमोक्षार्थलक्षणो दृष्टान्तदार्ष्टान्तिकभूतः स एष निर्णीतः सविस्तरो जनकयाज्ञवल्क्याख्यायिकारूपधारिण्या श्रुत्या। संसारविमोक्षोपाय उक्तः प्राणिभ्यः। इदानीं श्रुतिः स्वयमेवाऽऽह विद्यानिष्क्रयार्थं जनकेनैवमुक्तमिति। कथं सोऽहमेवं विमोक्षितस्त्वया भगवते तुभ्यं विद्यानिष्क्रयार्थं सहस्रं ददामीति हैवं किलोवाचोक्तवाञ्जनको वैदेहः ॥

भाष्यार्थ—('सोऽहं' इत्यादि पुढील श्रुतिवाक्याचें तात्पर्य सांगण्यासाठीं गतार्थाचा अनुवाद करितात—) याज्ञवल्क्यानें विमोक्षासाठीं जनकाला जो सहेतुक, दृष्टान्तदार्ष्टान्तिकभूत, बंध-मोक्षार्थलक्षण कामप्रश्न हा वर दिला होता त्याचा या जनक-याज्ञवल्क्य-आख्यायिकेचें रूप धारण करणाऱ्या श्रुतीनें हा सविस्तर निर्णय केला. (त्या निर्णयाचा प्रकारच थोडक्यांत सांगतात—) प्राण्यांना संसारापासून विमुक्त होण्याचा उपाय सांगितला. आतां स्वतः श्रुतिच विद्येच्या निष्क्रयासाठीं जनकानें असें असें म्हटलें असें सांगत आहे. तें कसें? 'सोऽहं' तो

१ स्वरूपचैतन्य हेंच ज्याचें प्रकाशक आहे.

मी तुजकडून असा विमुक्त केला गेलेला' भगवते-'तुम्हाला विद्यानिष्क्रयासाठीं 'सहस्रं ददामि-' सहस्र गायी देतों 'इति ह-' खरोखर असें 'उवाच जनको वैदेहः-' वैदेह जनक बोलला.

अत्र कस्माद्विमोक्षपदार्थे निर्णीते विदेहराज्यमात्मानमेव च न निवेदयत्येकदेशोक्ताविव सहस्रमेव ददाति तत्र कोऽभिप्राय इति । अत्र केचिद्वर्णयन्ति । अध्यात्मविद्यारसिको जनकः श्रुतमप्यर्थं पुनर्मन्त्रैः शुश्रूषति । अतो न सर्वमेव निवेदयति । श्रुत्वाऽभिप्रेतं याज्ञवल्क्यात्पुनरन्ते निवेदयिष्यामीति हि मन्यते । यदि चात्रैव सर्वं निवेदयामि निवृत्ताभिलाषोऽयं श्रवणादिति मत्वा श्लोकान्न वक्ष्यतीति च भयात्सहस्रदानं शुश्रूषालिङ्गज्ञापनायेति ॥

भाष्यार्थ—, सहस्रदानावर आक्षेप घेतात–) येथें विमोक्षपदार्थाचा निर्णय केला असतां विदेहराज्य व स्वतःचा देह यांचेंच जनक निवेदन कां करीत नाहीं? विमोक्षाचा एकदेश सांगितला असतां जसें, तसें सहस्रदानच कां करीत आहे? त्यांत त्याचा कोणता आशय आहे? (सर्वस्वदानाची प्राप्ति झाली असतांनाही सहस्रदानाचा हेतु सांगतात-) कित्येक याविषयीं असें वर्णन करितात–अध्यात्मविद्येचा मोठा रसिक असलेला जनक श्रुत–ऐकलेला अर्थही पुनः मंत्राच्या द्वारा ऐकण्याची इच्छा करतो. (त्याला हाच श्रुतार्थ मंत्रांच्या द्वारा ऐकण्याची इच्छा आहे.) म्हणून तो सर्वस्वाचें निवेदन करीत नाहीं. पण याज्ञवल्क्यापासून अभिप्रेत अर्थ ऐकून शेवटीं मी यांना सर्वस्व निवेदन करीन असेंच तो मनांत समजत आहे. ('अहो पण राजा जरी शुश्रूषु असला तरी तो याच वेळीं गुरूला सर्वस्व कां देत नाहीं? कारण पुष्कळ दक्षिणा गुरूला संतुष्ट करील व त्यामुळें त्याची शुश्रूषा पूर्ण होईल,' असें कोणी म्हणेल म्हणून राजाचा अभिप्राय सांगतात--) जर मी आतांच सर्व निवेदन करीन तर या राजाची श्रवणाविषयींची इच्छा निवृत्त झाली आहे, असें समजून मुनि श्लोक सांगणार नाहीं, या भीतीनें राजा आपल्या शुश्रूषेचें--श्रवणेच्छेचें चिह्न सुचविण्यासाठीं सहस्रदानच करीत आहे.

सर्वमप्येतदसत्पुरुषस्येव प्रमाणभूतायाः श्रुतेर्व्याजानुपपत्तेः । अर्थशेषोपपत्तेश्च । विमोक्षपदार्थ उक्तेऽप्यात्मज्ञानसाधन आत्मज्ञानशेषभूतः सर्वैषणापरित्यागः संन्यासाख्यो वक्तव्योऽर्थशेषो विद्यते । तस्माच्छ्लोकमात्रशुश्रूषाकल्पनाऽनृज्वी । अगतिका हि गतिः पुनरुक्तार्थकल्पना । सा चायुक्ता सत्यां गतौ ॥

भाष्यार्थ—पण हें सर्व म्हणणें असत् आहे. कारण एकाद्या (मनांत एक ठेवून बाहेर एक बोलणाऱ्या अप्रामाणिक ) पुरुषाप्रमाणें प्रमाणभूत श्रुतीला असें व्याजोक्तीनें बोलणें अयुक्त आहे. ( कारण अपौरुषेय व त्यामुळेंच कोणत्याही दोषाची जिच्यामध्यें शंकाही घेणें शक्य नाहीं अशा श्रुतीनेंही जर व्याजोक्तीचा अंगीकार केला तर तिच्या स्वाभाविक प्रामाण्याचा भंग होतो.)शिवाय वक्तव्य अर्थ अद्यापि सांगावयाचा राहिलेला आहे, असेंही संभवतें. विमोक्ष हा पदार्थ जरी सांगितला तरी आत्मज्ञानाचें साधन, आत्मज्ञानाचा शेषभूत–अंगरूप संन्यास या नांवाचा सर्वैषणापरित्याग हा अर्थशेष सांगावयाचा आहे. यास्तव केवल श्लोकांना ऐकण्याची इच्छा असल्यामुळें राजानें सर्वस्वदान न करितां सहस्रदानच केलें आहे, ही कल्पना सरळ नाहीं. ( ' अहो पण संन्यासही पूर्वी वारंवार सांगितलेला आहे. यास्तव तो ऐकण्यासाठीं सहस्रदान आहे, हें म्हणणें अयोग्य आहे. ' म्हणून म्हणाल तर तें खरें आहे. पण शमादिक हें ज्ञानसाधन आहे असें पूर्वी सांगितलेलें नाहीं. यास्तव त्यासह पुनरपि संन्यास सांगणें उचित असल्यामुळें त्याच्या अपेक्षेनें राजानें जें सहस्रदान केलें आहे तें योग्यच आहे. असें सांगतात–) पुनरुक्त अर्थाची कल्पना करणें ही अगतिका गति आहे. [ म्ह० जेव्हां दुसरी कांहीं गति नसेल तेव्हांच पुनरुक्त अर्थाची कल्पना करणें उचित असतें. ] अन्य गति असतांना पुनरुक्त अर्थाची कल्पना करणें अयोग्य आहे.

न च तत्स्तुतिमात्रमित्यवोचाम ॥ नन्वेवं सत्यत ऊर्ध्वं विमोक्षायै-

वेति वक्तव्यम् । नैष दोषः । आत्मज्ञानवदप्रयोजकः संन्यासः पक्षे प्रतिपत्तिकर्मवदिति हि मन्यते " संन्यासेन तनुं त्यजेत् " इति स्मृतेः । साधनत्वपक्षेऽपि नात ऊर्ध्वं विमोक्षायैवेति प्रश्नमर्हति । मोक्षसाधनभूतात्मज्ञानपरिपाकार्थत्वात् ॥ ७ ॥

भाष्यार्थ—( ' अहो पण संन्यासादि विद्येच्या स्तुतीकरितां सांगितला आहे. ही विद्या महाभागा आहे. म्हणून तिची इच्छा करणारा संन्यासासारखें दुष्कर कर्मही करतो.त्यामुळें अर्थशेषाची सिद्धि होते, ' असें म्हणाल तर सांगतों–) संन्यासादिक हें केवल स्तुतिमात्र आहे, असें म्हणतां येत नाहीं, हें आम्ही वर सांगितलें आहे. ( संन्यास ही विद्येची स्तुति नव्हे, कारण ' विदित्वा व्युत्थाय ' याप्रमाणें समानकर्तृकत्वाचा निर्देश केला आहे. म्ह० वेदन–ज्ञान व संन्यास यांचा कर्ता एकच सांगितला आहे. असें गेल्या पांचव्या म्ह० तिसऱ्या अध्यायांत [पृ. १४८] सिद्ध झालें आहे. शमादिक हीसुद्धां विद्यास्तुति नव्हे. कारण त्या शमादिकाविषयींही विधि पुढें सांगावयाचा आहे, असा याचा भावार्थ. )

मग असें जर आहे तर ' अत ऊर्ध्वं विमोक्षायैव ब्रूहि-' या पुढें विमोक्षासाठींच–विमोक्षच सांग, असें म्हणावयास पाहिजे होतें. नाहीं, त्यांत कांहीं दोष नाहीं. कारण आत्मज्ञानाप्रमाणें संन्यास अप्रयोजक आहे. [ म्ह० आत्मज्ञान मोक्षाविषयीं जसें प्रयोजक–मोक्षाचें असाधारण साधन आहे तसा संन्यास नाहीं. पण तेवढ्यावरून तो करावयासच नको असें होत नाहीं. ] कारण या पक्षीं प्रतिपत्ति कर्माप्रमाणें त्याचें अनुष्ठान संभवतें असें राजा समजत आहे. ' संन्यासानें शरीराचा त्याग करावा, ' असें त्याविषयीं स्मृतिवचन आहे. ( अर्थात् संन्यासाला ज्ञानतुल्यत्व नाहीं. म्हणून ' अत ऊर्ध्वं विमोक्षायैव ब्रूही'असें राजा विचारीत नाहीं. 'अहो पण विविदिषा संन्यासाचा अंगीकार करणाराला संन्यास प्रतिपत्ति कर्माप्रमाणें अनुष्ठेय आहे, असें म्हणतां

१ संन्यास प्रतिपत्तिकर्माप्रमाणें कर्तव्य आहे, याविषयीं हें प्रमाण आहे.

येणार नाहीं, ' असें कोणी म्हणेल म्हणून सांगतात--)संन्यास हें मोक्षाचें ज्ञानद्वारा साधन आहे, या पक्षींही 'अत ऊर्ध्वं विमोक्षायैव ब्रूहि-' यापुढें मोक्षासाठींच सांग, असा प्रश्न उपपन्न होत नाहीं. कारण संन्यास मोक्षसाधनभूत जें आत्मज्ञान त्याच्या परिपाकासाठीं आहे. ( कारण संन्यास करणारालाच तें संन्यास करणाराचें प्रत्यक् परम पद जाणण्यास योग्य होतें, तोच त्याला जाणूं शकतो, असें म्हटलेलें आहे, असा भावार्थ.)७.

तदेते श्लोका भवन्ति । अणुः पन्था विततः पुराणो माꣳ स्पृष्टोऽनुवित्तो मयैव । तेन धीरा अपियन्ति ब्रह्मविदः स्वर्गं लोकमित ऊर्ध्वं विमुक्ताः ॥ ८ ॥

अर्थ---त्याविषयीं हे श्लोक आहेत. हा मोक्षसाधनभूत ज्ञानमार्ग सूक्ष्म, विस्तीर्ण (अथवा माध्यंदिनीयांचा 'वितरः' हा पाठ घेतल्यास संसारतरणाचें साधन आहे, असा भावार्थ), तो पुराण -फार जुना आहे. तो मलाच लाधला आहे. मजमध्यें त्याचा फलावसानापर्यंत परिपाक झाला आहे. त्या मार्गानें दुसरेही बुद्धिमान् ब्रह्मवेत्ते जिवंत असतांनाच विमुक्त होत्साते शरीरपातानंतर स्वर्गलोकास--मोक्षास प्राप्त होतात. ८

आत्मकामस्य ब्रह्मविदो मोक्ष इत्येतस्मिन्नर्थे मन्त्रब्राह्मणोक्ते विस्तर-प्रतिपादका एते श्लोका भवन्ति । अणुः सूक्ष्मः पन्था दुर्विज्ञेयत्वाद्वि-ततो विस्तीर्णो विस्पष्टतरणहेतुत्वाद्वा वितर इति पाठान्तरान्मोक्षसाधनो ज्ञानमार्गः पुराणश्चिरंतनो नित्यश्रुतिप्रकाशितत्वान्न तार्किकबुद्धिप्रभव-कुदृष्टिमार्गवदर्वाक्कालिको मां स्पृष्टो मया लब्ध इत्यर्थः । यो हि येन लभ्यते स तं स्पृशतीव संबध्यते तेनायं ब्रह्मविद्यालक्षणो मोक्षमार्गो मया लब्धत्वान्मां स्पृष्ट इत्युच्यते ॥

भाष्यार्थ---(राजाच्या अकुशलतेचा परिहार करून मंत्राचें व्याख्यान करितात--) आत्म्याचीच कामना करणाऱ्या आत्मकाम ब्रह्मवेत्त्याला मोक्ष

मिळतो, या मंत्र-ब्राह्मणोक्त अर्थीं त्याच अर्थांच्या विस्ताराचें प्रतिपादन करणारे हे श्लोक आहेत. 'अणुः पन्थाः-' हा ज्ञानमार्ग अणु--सूक्ष्म आहे. कारण तो दुर्विज्ञेय आहे. [दुर्विज्ञेय असल्यामुळें सूक्ष्म आहे.] 'विततः-' तो विस्तीर्ण आहे. [त्या ज्ञानमार्गाचा विषय पूर्ण--पुरुष असल्यामुळें तोही विस्तीर्ण आहे, असा भावार्थ.] माध्यंदिन शाखीय 'वितरः' असा पाठ घेतात. अर्थात् 'विततः' या जागीं 'वितरः' असा दुसरा पाठ असल्यामुळें--अगदीं स्पष्टपणें संसारतरणास हा मार्ग कारण होत असल्यामुळें 'वितर' आहे, असा अर्थ करावा. (हा मार्ग दीर्घ प्रयत्नानेंच साध्य आहे.) मोक्षाचें साधन असा हा ज्ञानमार्ग 'पुराणः-' चिरंतन--फार जुना आहे. (आधुनिक वैदिक ज्ञानमार्ग चिरंतन कसा ? तें सांगतात--) हा नित्य श्रुतीनें प्रकाशित केलेला आहे, तार्किकांच्या बुद्धीपासून उद्भवलेल्या कुदृष्टिरूप मार्गाप्रमाणें हा ज्ञानमार्ग अर्वाचीन नाहीं. 'मां स्पृष्टः-' हा मार्ग मला स्पृष्ट झाला--मला मिळाला असा भावार्थ. जो ज्याच्याकडून मिळविला जातो तो त्यास जणुं काय स्पर्श करीत असल्याप्रमाणेंच त्याच्याशीं संबद्ध होतो; त्यामुळें हा ब्रह्मविद्यालक्षण मोक्षमार्ग मजकडून मिळविला गेला असल्यामुळें मला स्पर्श केलेला--मजशीं संबद्ध आहे, असें म्हटलें जातें.

न केवलं मया लब्धः । किंत्वनुवित्तो मयैव । अनुवेदनं नाम विद्यायाः परिपाकापेक्षया फलावसानतानिष्ठाप्राप्तिः । भुजेरिव तृप्त्यवसानता । पूर्वं तु ज्ञानप्राप्तिसंबन्धमात्रमेवेति विशेषः ॥

भाष्यार्थ---मीं केवळ त्या मार्गाला संपादन केलें आहे, इतकेंच नव्हे तर 'अनुवित्तो मयैव-' मींच त्याचें अनुवेदनही केलें आहे. अनुवेदन म्हणजे विद्येच्या परिपाकाच्या अपेक्षेनें फलावसानतानिष्ठाप्राप्ति--फलामध्यें पर्यवसान होणें या निष्ठेची प्राप्ति. म्ह० मोक्षस्थिति--स्वरूपावस्थान. भोजनाला जशी तृप्त्यवसानता आहे, म्हणजे भोजनाचें पर्यवसान जसें तृप्तींत होतें त्याप्रमाणें ब्रह्मविद्येचें पर्यवसान मोक्षनिष्ठेंत होतें.

'मां स्पृष्टः' या पूर्व वाक्यांत केवल ज्ञानप्राप्तिसंबंधच सांगितला आहे, अनुवेदन व लाभ—स्पर्श यांमध्यें हा विशेष आहे.

किमसावेव मन्त्रदृगेको ब्रह्मविद्याफलं प्राप्तो नान्यः प्राप्तवान्येनानुवित्तो मयैवेत्यवधारयति । नैष दोषः । अस्याः फलमात्मसाक्षिकमनुत्तममिति ब्रह्मविद्यायाः स्तुतिपरत्वात् । एवं हि कृतार्थात्माभिमानकरमात्मप्रत्ययसाक्षिकमात्मज्ञानं किमतः परमन्यत्स्यादिति ब्रह्मविद्यां स्तौति । न तु पुनरन्यो ब्रह्मवित्तत्फलं न प्राप्नोतीति "तद्यो यो देवानाम्" इति सर्वार्थश्रुतेः ॥

भाष्यार्थ——('मयैव' यांतील 'एव-'काराच्या आश्रयानें शंका घेतात--) हाच एकटा मंत्रद्रष्टा ब्रह्मविद्येच्या फळास प्राप्त झाला, व दुसरा कोणी प्राप्त झाला नाहीं कीं काय ? कीं ज्यामुळें तो 'अनुवित्तो मयैव' असें अवधारण करीत आहे ? (कारण हाच एकटा ब्रह्मविद्याफळास प्राप्त झाला असें म्हटल्यास 'तद्यो यो देवानां०' (बृह. अ.१ पृ.३१४ पहा) इत्यादि श्रुतींशीं विरोध येतो. या शंकेचा सिद्धान्ती परिहार करितात—) हा कांहीं दोष नाहीं. ('एव-'शब्दाला येथें अन्ययोगव्यवच्छेदकत्व नाहीं तर त्याचें तात्पर्य निराळेंच आहे.) या विद्येचें फळ आत्मसाक्षिक अनुत्तम आहे, या गोष्टीचा मीं अनुभव घेतला, अशी ब्रह्मविद्येची स्तुति करण्यासाठीं तो 'एव'कार आहे. हें आत्मज्ञान याप्रमाणें मी कृतार्थ आहें, असा स्वतःविषयीं अभिमान उत्पन्न करणारें व स्वानुभवसिद्ध आहे. याहून आणखी दुसरें उत्कृष्ट काय असणार ? कांहीं नाहीं. अशा प्रकारें ती अवधारणश्रुति ब्रह्मविद्येची स्तुति करते. दुसरा ब्रह्मवेत्ता त्या फळास प्राप्त होत नाहीं, असें त्या अवधारणश्रुतीला विवक्षित नाहीं. कारण 'तद्यो यो देवानां०' इत्यादि, सर्वांना ब्रह्मात्मरूप फल मिळतें असें सांगणारी श्रुति आहे. (ब्रह्मविद्या सर्वार्था—सर्वसाधारण आहे, असा त्या श्रुतीचा भावार्थ.)

तदेवाऽऽह । तेन ब्रह्मविद्यामार्गेण धीराः प्रज्ञावन्तोऽन्येऽपि ब्रह्मविद इत्यर्थः । अपियन्त्यपिगच्छन्ति ब्रह्मविद्याफलं मोक्षं स्वर्गं लोकम् ।

स्वर्गलोकशब्दस्त्रिविष्टपवाच्यपि सन्निह प्रकरणान्मोक्षाभिधायकः। इतोऽस्माच्छरीरपातादूर्ध्वं जीवन्त एव विमुक्ताः सन्तः॥ ८॥

भाष्यार्थ—(ब्रह्मविद्या सर्वांकरितां आहे, याविषयीं 'तेन धीराः०' इत्यादि याच कंडिकेचें शेवटलें वाक्य प्रमाण म्हणून घेतात व त्याचें व्याख्यान करितात–) तेंच ही श्रुति सांगते– 'तेन-' त्या ब्रह्मविद्या-मार्गानें 'धीराः' प्रज्ञावान् दुसरेही ब्रह्मवेत्ते, असा याचा भावार्थ. 'अपि-यन्ति-' जातात. (कोठें ?) 'स्वर्गं लोकं-' ब्रह्मविद्येचें फल असा जो मोक्ष–स्वर्गलोक त्यास (प्राप्त होतात. 'अहो पण 'स्वर्ग' हा शब्द स्वर्लोक याअर्थी रूढ आहे, मोक्ष याअर्थी रूढ नाहीं,' अशी आशंका घेऊन सांगतात–) 'स्वर्गलोक' हा शब्द त्रिविष्टप–देवलोक याचा जरी वाचक असला तरी येथें प्रकरण या लिंगावरून मोक्षवाचक आहे.(ज्या-प्रमाणें ज्योतिष्टोमप्रकरणांतील ज्योतिःशब्द ज्योतिष्टोमवाचक मानलेला आहे त्याप्रमाणें मोक्षप्रकरणांतील स्वर्गशब्द मोक्षवाचक आहे. कारण रूढीचा अंगीकार करून स्वर्ग या प्रसिद्ध अर्थीच जर तो शब्द घेतला तर ब्रह्मविद्येला हीनफलत्व प्राप्त होतें.) 'इतः ऊर्ध्वं-' या शरीरपातानंतर 'विमुक्ताः-' जिवंतपणींच मुक्त होत्साते (शरीरपातानंतर–मरणोत्तर ब्रह्म-वेत्ते मोक्षास प्राप्त होतात, असा संबंध.) ८

तस्मिञ्छुक्लमुत नीलमाहुः पिङ्गलꣳ हरितं लोहितं च। एष पन्था ब्रह्मणा हानुवित्त-स्तेनैति ब्रह्मवित्पुण्यकृत्तैजसश्च ॥ ९ ॥

अर्थ—त्या मार्गाविषयीं मुमुक्षूंचा वाद आहे. कोणी त्याला शुक्ल म्हणतात, कोणी निळा, पिंगट, हिरवा व लाल म्हणतात. हा ज्ञानमार्ग परमात्मस्वरूप ब्राह्मणानें साक्षात् अनुभविलेला आहे. पुण्य करणारा आत्मभूत ब्रह्मवेत्ता त्या मार्गानें जातो ९.

तस्मिन्मोक्षसाधनमार्गे विप्रतिपत्तिर्मुमुक्षूणाम्। कथम्। तस्मिञ्शु-क्लं शुद्धं विमलमाहुः केचिन्मुमुक्षवो नीलमन्ये पिङ्गलमन्ये हरितं लो-

हितं च यथादर्शनम् । नाड्यस्त्वेताः सुषुम्नाद्याः श्लेष्मादिरससंपूर्णाः शुक्लस्य नीलस्य पिङ्गलस्येत्याद्युक्तत्वात् ॥

भाष्यार्थ—( ' तस्मिन् ' इत्यादि पूर्वपक्ष उत्थापित करितात–) ' तस्मिन् ' त्या मोक्षसाधनमार्गाविषयीं मुमुक्षूंची विप्रतिपत्ति–मतविरोध आहे तो कसा ? ' शुक्लं- ' कांहीं मुमुक्षु त्याला शुद्ध–निर्मळ म्हणतात, दुसरे ' नील ' म्हणतात, कित्येक पिंगल–अग्नीच्या ज्वालेसारखा; हरित–हिरवा व जासवंदीच्या फूलाप्रमाणें लाल भडक मानतात. सारांश प्रत्येक मुमुक्षु आपल्या उपासनेप्रमाणें ब्रह्मप्राप्तीच्या मार्गाची कल्पना करतो. ( ' अहो पण ब्रह्मप्राप्तिमार्गामध्यें शुक्लादिकांचा संभव कसा आहे ? कारण ज्ञान रूपादियुक्त नसतें ' अशी आशंका घेऊन सांगतात–) या श्लेष्मादि रसानें भरलेल्या सुषुम्नादि नाड्या आहेत. ( ' तथापि त्यांना शुक्लादिरूपत्व कसें ? ' अशी आशंका घेऊन नाडीखंडांत सांगितलेल्याचें स्मरण करून देतात–) कारण ' शुक्लस्य, नीलस्य, पिंगलस्य ' इत्यादि सांगितलेलें आहे.

आदित्यं वा मोक्षमार्गमेवंविधं मन्यन्ते । " एष शुक्ल एष नीलः " इत्यादिश्रुत्यन्तरात् । दर्शनमार्गस्य च शुक्लादिवर्णासंभवात् । सर्वथाऽपि तु प्रकृताद्ब्रह्मविद्यामार्गादन्य एते शुक्लादयः ॥

भाष्यार्थ—( ' अहो पण, शुक्लादिशब्दानें नाड्यांचाच स्वीकार करण्यास कांहीं प्रमाण नाहीं, ' अशी आशंका घेऊन दुसरा पक्ष सांगतात–) अथवा ते मुमुक्षु आदित्य या मोक्षमार्गास अशा प्रकारचा मानतात. कारण ' हा शुक्ल, हा नील आहे, ' इत्यादि अर्थाची दुसरी श्रुति आहे. ( ' अहो पण या प्रकृत ज्ञानमार्गांत दुसऱ्या मार्गाची कल्पना कां करितां ? ' उत्तर–) दर्शनमार्गाचे–ज्ञानमार्गाचे शुक्लादि वर्ण संभवत नाहींत. ( ' तर मग येथें कोणता पक्ष विवक्षित आहे ? नाडीपक्ष कीं आदित्यपक्ष ? ' उत्तर–) कांहीं जरी मानलें तरी हे शुक्लादिक मार्ग प्रकृत ब्रह्मविद्यामार्गाहून अन्य आहेत.

१ शुक्ल, नील इत्यादि नाना वर्णाचा मानतात, असा भावार्थ.

ननु शुक्लः शुद्धोऽद्वैतमार्गः। न। नीलपीतादिशब्दैर्वर्णवाचकैः सहानुद्रवणात्। याञ्छुक्लादीन्योगिनो मोक्षपथानाहुर्न ते मोक्षमार्गाः संसारविषया एव हि ते। चक्षुष्टो वा मूर्ध्नो वाऽन्येभ्यो वा शरीरदेशेभ्य इति शरिरदेशान्निःसरणसंबन्धात्। ब्रह्मादिलोकप्रापका हि ते। तस्मादयमेव मोक्षमार्गो य आत्मकामत्वेनाऽऽप्तकामतया सर्वकामक्षये गमनानुपपत्तौ प्रदीपनिर्वाणवच्चक्षुरादीनां कार्यकरणानामत्रैव समवनय इत्येष ज्ञानमार्गः पन्था ब्रह्मणा परमात्मस्वरूपेणैव ब्राह्मणेन त्यक्तसर्वैषणेनानुवित्तः। तेन ब्रह्मविद्यामार्गेण ब्रह्मविदन्योऽप्येति ॥

भाष्यार्थ—' अहो पण शुक्ल म्हणजे शुद्ध अद्वैत मार्गच होय. ( तो ज्ञानमार्गाहून अन्य मार्ग नव्हे,') म्हणून म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण ' शुक्ल ' हा शब्द नील-पीतादि वर्णवाचक शब्दांबरोबर येथें उच्चारलेला आहे. आतां योगी ज्या शुक्लादि मोक्षमार्गांचें कथन करितात ते वास्तविक मोक्षमार्ग नव्हेत, तर ते संसारविषय मार्गच होत. कारण ' चक्षूपासून, किंवा मूर्ध्नेतून, किंवा दुसऱ्या एकाद्या शरीरदेशापासून तो निघतो' (अ. ४ पृ. २४९ पहा.) अशा वाक्यानें शरीरदेशापासून त्याच्या निघण्याचा संबंध दाखविला आहे. ( केवल शरीरप्रदेशांतून निघणें, एवढ्या संबंधानेंच निरानिराळ्या मार्गभूत नाड्यांना संसारविषयत्व आहे, असें नाहीं, तर ब्रह्मलोकादिसंबंधामुळेंही त्यांना संसारविषयत्व आहे, असें सांगतात--) ते मार्ग ब्रह्मादिलोकांची प्राप्ति करून देणारे आहेत. ( आदित्यही देवयान--उत्तरायण- मार्गामध्यें अन्तर्भूत होणारा असल्यामुळें ब्रह्मलोक देणारा व त्यामुळें संसारहेतुच आहे, असें मानणारे आचार्य मोक्षमार्गाचा उपसंहार करितात--) तस्मात् हाच मोक्षमार्ग आहे कीं जो आत्मकाम झाल्यामुळें आप्तकामत्व सिद्ध होऊन त्याच्या योगानें सर्व कामांचा ज्ञानानें क्षय होतो, त्यानंतर गतीची अनुपपत्ति होते. दिव्यांतील तेल संपतांच प्रदीपाचें ज्वलन--तेवणें--अशक्य होऊन तो जसा सामान्य तेजांत निर्वाण पावतो त्याप्रमाणें गमनाचाच

असंभव झाला असतां चक्षुरादि शरीरेंद्रियांचें येथेंच--प्रत्यगात्म्यामध्येंच--अवसान होतें. 'एष पन्थाः-' असा हा ज्ञानमार्ग आहे. 'ब्रह्मणा-' परमात्मस्वरूप अशाच सर्व एषणांचा त्याग केलेल्या ब्राह्मणानें हा मार्ग साक्षात् अनुभविलेला आहे ( याप्रमाणें मुमुक्षूंच्या मतविरोधाचें निराकरण करून,मोक्षमार्गाचें निर्धारण करून 'त्या मार्गानें धीर जातात' या वाक्यांत सांगितलेल्या अर्थाचें निगमन करितात--) त्या ब्रह्मविद्यामार्गानें दुसराही--या मंत्राचा द्रष्टा जो मुनि त्याहून निराळा ब्रह्मवेत्ताही जातो.

कीदृशो ब्रह्मवित्तेनैतीत्युच्यते । पूर्वं पुण्यकृद्भूत्वा पुनस्त्यक्तपुत्राद्येषणः परमात्मतेजस्यात्मानं संयोज्य तस्मिन्नभिनिर्वृतस्तैजसश्चाऽऽत्मभूत इहैवेत्यर्थः । ईदृशो ब्रह्मवित्तेन मार्गेणैति । न पुनः पुण्यादिसमुच्चयकारिणो ग्रहणं विरोधादित्यवोचाम ॥

भाष्यार्थ—कशा प्रकारचा ब्रह्मवेत्ता त्या मार्गानें जातो तें सांगितलें जातें. 'पुण्यकृत्-' पूर्वीं पुण्य करणारा असा होऊन पुनः पुत्रादि--एषणांचा ज्यानें त्याग केला आहे तो पुण्यकृत्. 'तैजसश्च-' परमात्मतेजामध्यें आत्म्याला संयुक्त करून त्यांत सर्वतः तद्रूप झालेला--जीवदवस्थेंतच आत्मभूत झालेला, असा भावार्थ. अशा प्रकारचा ब्रह्मवेत्ता त्या मार्गानें जातो. (ब्रह्मवित्-ला 'पुण्यकृत्'असें विशेषण दिलेलें असल्यामुळें 'ज्ञान व पुण्य कर्म यांचें सह अनुष्ठान करणाराला ब्रह्मप्राप्ति होते,' असें येथें विवक्षित आहे, असें कित्येक म्हणतात. पण तें बरोबर नाहीं, असें सांगतात--) येथें 'पुण्यकृत्' या शब्दानें पुण्यादि समुच्चय करणाराचें ग्रहण करितां येत नाहीं. कारण ज्ञान व कर्म यांचा विरोध आहे, असें आम्हीं सांगितलें आहे.

"अपुण्यपुण्योपरमे यं पुनर्भवनिर्भयाः । शान्ताः संन्यासिनो यान्ति तस्मै मोक्षात्मने नमः" ॥ इति च स्मृतेः । "त्यज धर्ममधर्मं

१ ही इत्थंभावलक्षणा तृतीया आहे, असें समजून येथें अर्थ केला आहे.

च" इत्यादि पुण्यापुण्यत्यागोपदेशात् । "निराशिषमनारम्भं निर्नमस्कारमस्तुतिम् ॥ अक्षीणं क्षीणकर्माणं तं देवा ब्राह्मणं विदुः" ॥ "नैतादृशं ब्राह्मणस्यास्ति वित्तं यथैकता समता सत्यता च । शीलं स्थितिर्दण्डनिधानमार्जवं ततस्ततश्चोपरमः क्रियाभ्यः" ॥ इत्यादि स्मृतिभ्यश्च ॥

भाष्यार्थ—( 'शिवाय येथें जो समुच्चय घ्यावयाचा तो कोणता? क्रमसमुच्चय कीं समसमुच्चय?-' यांतील पहिला क्रमसमुच्चय स्वीकारून दुसऱ्या समुच्चयास दूषित करितात--, 'पुण्य व अपुण्य यांचा उपरम झाला असतां पुनर्जन्माविषयीं निर्भय झालेले शांत संन्यासी ज्याला प्राप्त होतात त्या मोक्षात्म्याला नमस्कार असो,' अशी स्मृति आहे. ( 'अहो पण ज्ञानाचा कर्माशीं जरी समुच्चय होत नसला तरी विवेकाचा ज्ञानाशीं समुच्चय होतो,' अशी आशंका घेऊन सांगतात–) 'त्यज धर्ममधर्मं च-' धर्म व अधर्म यांचा त्याग कर, इत्यादि वाक्यांत पुण्य व अपुण्य यांच्या त्यागाचा उपदेश केला आहे. ( स्तुत्यादिकांशींही ज्ञानाचा समुच्चय होत नाहीं, याविषयीं प्रमाण–) सर्व आशाशून्य, काम्य कर्मांचे अनुष्ठान न करणारा, नमस्कार न करणारा (व नमस्कार न करून घेणारा), स्तुति न करणारा ( व न करून घेणारा ), निषिद्धाचरण न करणारा नित्यादिकर्मांचा त्याग करणारा, असा जो ब्रह्मवेत्ता त्याला देव ब्राह्मण समजतात. ( ज्ञान व कर्म यांच्या असमुच्चयाविषयीं आणखीं एक वाक्य–) 'जशी एकता--निरपेक्षता, समता--सर्वोदासीनता--मित्र, उदासीन व शत्रु अशी बुद्धि न ठेवतां सर्वत्र स्वतःप्रमाणें दृष्टि ठेवणें, सत्यता, शील, स्थिति, अहिंसापरत्व, सरळपणा व निरनिराळ्या क्रियांपासून उपरम पावणें, यांसारखें ब्राह्मणाचें दुसरें वित्त नाहीं.' इत्यादि स्मृतींवरून येथील 'पुण्यकृत्-'शब्दानें पुण्यादि समुच्चयकारी पुरुषाचें ग्रहण करूं नये.

उपदेक्ष्यति चेहापि त्वेष नित्यो महिमा ब्राह्मणस्य न वर्धते कर्मणा नो कनीयानिति कर्मप्रयोजनाभावे हेतुमुक्त्वा तस्मादेवंविच्छान्तो दान्त

इत्यादिना सर्वक्रियोपरमम् । तस्माद्यथाव्याख्यातमेव पुण्यकृत्त्वम् ॥

भाष्यार्थ—( ' अहो पण स्मृतिवचनांवरून समुच्चय जरी सिद्ध होत नसला तरी प्रस्तुत मंत्रामध्यें तो भासतो,' अशी आशंका घेऊन सांगतात–; येथेंही पण पुढें ' हा ब्राह्मणाचा नित्य महिमा आहे, तो कर्मानें वाढत नाहीं व न्यून होत नाहीं,' असा कर्मांचें कांहीं प्रयोजन नाहीं, याविषयीं हेतु सांगून ' तस्मादेवंवित् शान्तो दान्तः-' इत्यादि वाक्यानें सर्व क्रियांचा उपरम श्रुति सांगेल. ( पुढील वाक्यांचें वगैरे पर्यालोचन केल्यानें सिद्ध झालेल्या अर्थाचा उपसंहार करितात–) तस्मात् आम्हीं जसें वर व्याख्यान केलें आहे, तशा प्रकारचेंच पुण्यकृत्त्व येथें विवक्षित आहे.

अथवा यो ब्रह्मवित्तेनैति स पुण्यकृत्तैजसश्चेति ब्रह्मवित्स्तुतिरेषा । पुण्यकृति तैजसे च योगिनि महाभाग्यं प्रसिद्धं लोके ताभ्यामतो ब्रह्मवित्स्तूयते प्रख्यातमहाभाग्यत्वाल्लोके ॥ ९ ॥

भाष्यार्थ—( ' अहो पण पूर्वीं पुण्यकृत् होऊन नंतर ज्यानें पुत्रादि-एषणांचा त्याग केला आहे, असा ब्रह्मवित् त्या ज्ञानमार्गानें जातो, असा क्रम योग्य नाहीं. कारण तो श्रुत–श्रुतींनें सांगितलेला-नाहीं, अशी आशंका घेऊन सांगतात--) अथवा जो ब्रह्मवेत्ता त्या ज्ञानमार्गानें जातो तो पुण्यकृत् व तैजस आहे, अशी ही ब्रह्मवेत्त्याची स्तुति आहे. ( त्या स्तुतीचेंच उपपादन करितात--) पुण्यकृत् व तैजस अशा योग्यामध्यें असलेलें महाभाग्य लोकांत प्रसिद्ध आहे. ( इंद्रियांना तेजें असें म्हणतात, त्यांचा उपसंहार करून स्थित असलेला जो योगी तो तैजस, आणि हृदयांतील सूक्ष्म आकाशादिकांची उपासना करणारा योगी होय. त्यांच्या ठिकाणीं अणिमादि ऐश्वर्य असल्यामुळें त्यांचें महानुभावत्व प्रसिद्ध आहे. ) म्हणून ब्रह्मवित् व तैजस यांच्या योगानें ब्रह्मवेत्त्याची स्तुति केली जाते. कारण लोकांत त्या दोघांचें महाभाग्य प्रख्यात असतें ९.

अन्धं तमः प्रविशन्ति येऽविद्यामुपासते। ततो भूय इव ते तमो य उ विद्यायाꣳ रताः॥ १०॥

अर्थ—जे अविद्येचें–कर्माचें उपासन करितात तें अज्ञानाख्य तमाला प्राप्त होतात. जे कर्मकांडरूप वेदलक्षण विद्येमध्यें रत असतात ते त्याहून पुष्कळशाच तमांत प्रवेश करितात १०.

अन्धमदर्शनात्मकं तमः संसारनियामकं प्रविशन्ति प्रतिपद्यन्ते। के। येऽविद्यां विद्यातोऽन्यां साध्यसाधनलक्षणामुपासते कर्मानुवर्तन्त इत्यर्थः। ततस्तस्मादपि भूय इव वहुतरमिव तमः प्रविशन्ति। के। य उ विद्यायामविद्यावस्तुप्रतिपादिकायां कर्मार्थायां त्रय्यामेव विद्यायां रताः अभिरताः। विधिप्रतिषेधपर एव वेदो नान्योऽस्तीत्युपनिषदर्थानपेक्षिण इत्यर्थः॥ १०॥

भाष्यार्थ—( प्रस्तुत ज्ञानमार्गाची स्तुति करण्यासाठीं दुसऱ्या मार्गाची निन्दा करितात–) 'अन्धं-' अदर्शनात्मक संसारनियामक 'तमः' तमामध्यें 'प्रविशन्ति-' प्रवेश करितात. [ संसाराचें नियमन करणाऱ्या अज्ञानरूप तमाला प्राप्त होतात.] कोण? 'येऽविद्यामुपासते.' जे विद्येहून भिन्न अशा साध्य-साधनलक्षण अविद्येची उपासना करितात, कर्माचें अनुवर्तन करितात, असा भावार्थ. 'ततः-' त्याहूनही 'भूय इव-' पुष्कळसें 'तमः-' तम–अधिक तमांत प्रवेश करितात; कोण? 'ये उ विद्यायां रताः-' जे विद्येमध्यें–अविद्यावस्तूचें प्रतिपादन करणाऱ्या, कर्म हें जिचें प्रयोजन आहे अशा, त्रयीलक्षण–वेदत्रयरूप विद्येमध्येंच रत–अभिरत असतात. ( त्रयीमध्यें सर्वतः रत असणाऱ्या पुरुषांचें अधःपतन कसें होतें? अशी आशंका घेऊन सांगतात–) वेद विधि-निषेधपरच आहे; तदितर असलेला वेदभाग हा वेदच नव्हे, असें समजून उपनिषदांच्या अर्थाची अपेक्षा न करणारे, असा भावार्थ. १०.

अनन्दा नाम ते लोका अन्धेन तमसाऽऽ-
वृताः । ताꣳस्ते प्रेत्याभिगच्छन्त्यविद्वाꣳसोऽ-
बुधो जनाः ॥ ११ ॥

अर्थ—असुख या नांवाचे ते लोक अन्धतमानें व्याप्त आहेत. त्या लोकांस ते अविद्वान्, अनात्मज्ञ लोक मरून प्राप्त होतात. ११.

यदि तेऽदर्शनलक्षणं तमः प्रविशन्ति को दोष इत्युच्यते । अनन्दा अनानन्दा असुखा नाम ते लोकास्तेनान्धेनादर्शनलक्षणेन तमसाऽऽवृता व्याप्तास्ते तस्याज्ञानतमसो गोचरास्तांस्ते प्रेत्य मृत्वाऽभिगच्छन्त्यभियान्ति । के । येऽविद्वांसः । किं सामान्येनाविद्वत्तामात्रेण । नेत्युच्यते । अबुधः । बुधेरवगमनार्थस्य धातोः क्विप्प्रत्ययान्तस्य रूपम् । आत्मावगमवर्जिता इत्यर्थः । जनाः प्रकृता एव जननधर्मिणो वेत्येतत् ॥ ११ ॥

भाष्यार्थ—( दुसरा मंत्र आकांक्षाद्वारा उत्थापित करून त्याचें व्याख्यान करितात–) जर ते अदर्शनलक्षण तमांत प्रवेश करीत असले तर त्यांत दोष काय आहे ? म्हणून कोणी विचारील यास्तव श्रुतीकडून सांगितलें जातें–' अनन्दाः नाम ते लोकाः-' आनन्दरहित, सुखरहित–असुख नांवाचे ते लोक, ' अन्धेन तमसाऽऽवृताः ' त्या अदर्शनलक्षण तमानें आवृत–व्याप्त; ते त्या अज्ञानतमाचे गोचर–विषय होत. ' तान् ते प्रेत्य अभिगच्छन्ति–' त्या अनन्द लोकांस ते मरून प्राप्त होतात–जातात. कोण ? ' अविद्वांसः-' जे अविद्वान् ते. सामान्य अविद्वत्तेनेंच ते त्या लोकांस जातात काय ? ' नाहीं ' असें याचें उत्तर सांगितलें जातें. ' अबुधः ' अवगमन--ज्ञान हा ज्याचा अर्थ आहे, अशा बुध् या धातूचें हें क्विप्-प्रत्ययान्त रूप आहे. ('बुध्' या धातूचें क्विप्प्रत्ययान्त रूप ' बुध् ' असेंच होतें. त्याला मागें निषेधार्थी ' अ ' लावून अबुध् असें केलें; व ' अबुधः ' हें प्रथमा विभक्तीचें बहुवचन आहे.) आत्मज्ञानशून्य असा त्याचा अर्थ आहे. ' जनाः-' वरील प्रकृत लोकच, किंवा जनन-

धर्मी--जन्म घेणें हा ज्यांचा धर्म आहे ते ' जनाः ' ( अविद्वान् अनात्मज्ञ जन मरून त्या अन्धतमानें व्यापलेल्या अनन्द लोकांस जातात. ) ११

आत्मानं चेद्विजानीयादयमस्मीति पूरुषः ।
किमिच्छन्कस्य कामाय शरीरमनुसंज्वरेत् ॥ १२ ॥

अर्थ — जर कोणी संसारधर्मरहित आत्म्याला हा पुरुष मी आहें, असें जाणील तर तो आत्मातिरिक्त अशा कशाची इच्छा करणारा असा होत्साता व आत्मव्यतिरिक्त अशा कोणाच्या प्रयोजनासाठीं शरीरतापाच्या मागोमाग स्वतः संतप्त होईल ? [ कशाच्याही इच्छेनें व कोणासाठींही तो संतप्त होणार नाहीं. ] १२.

आत्मानं स्वं परं सर्वप्राणिमनीषितज्ञं हृत्स्थमशनायादिधर्मातीतं चेद्यदि विजानीयात्सहस्रेषु कश्चित्। चेदित्यात्मविद्याया दुर्लभत्वं दर्शयति । कथमयं पर आत्मा सर्वप्राणिप्रत्ययसाक्षी यो नेति नेतीत्याद्युक्तो यस्मान्नान्योऽस्ति द्रष्टा श्रोता मन्ता विज्ञाता समः सर्वभूतस्थो नित्यशुद्धबुद्धमुक्तस्वभावोऽस्मि भवामीति पूरुषः पुरुषः । स किमिच्छंस्तत्स्वरूपव्यतिरिक्तमन्यद्वस्तु फलभूतं ।किमिच्छन्कस्य वाऽन्यस्याऽऽत्मनो व्यतिरिक्तस्य कामाय प्रयोजनाय ॥

भाष्यार्थ—( उक्त आत्मज्ञानाच्या स्तुत्यर्थ आत्मज्ञाननिष्ठ पुरुषाला शरीरक्लेश होत नाहींत, असें सांगतात--) ' आत्मानं ' आत्म्याला--स्वला--पर आत्म्याला ( विज्ञानात्म्याहून वैलक्षण्य दाखविण्यासाठीं विशेषण देतात--) सर्व प्राण्यांच्या बुद्धिवृत्तीला जाणणाऱ्या, हृदयस्थ, अशनायादि सर्व धर्मरहित आत्म्याला ' चेत् ' जर ' विजानीयात् ' सहस्रावधि लोकांत कोणी जाणील, श्रुतींतील ' चेत् ' हा निपात आत्मविद्येचें दुर्लभत्व दाखवितो. (आतां प्रश्नपूर्वक ज्ञानाचा प्रकार सांगतात--) तो कसा जाणील ? ' अयं ' हा पर आत्मा सर्व प्राण्यांच्या प्रत्ययांचा साक्षी, ज्याचा ' नेति नेति ' असा वर निर्देश केला आहे, ज्याच्याहून

निराळा द्रष्टा, श्रोता, मन्ता, विज्ञाता नाहीं, तो सम, सर्वभूतस्थ, नित्य-शुद्ध बुद्ध-मुक्तस्वभाव 'पूरुषः-' पुरुष 'अस्मि-' मी आहें, असें जाणील तर तो 'किं इच्छन्-' त्या स्वरूपाहून व्यतिरिक्त अशी दुसरी फलभूत कोणती वस्तु इच्छिणारा असा होत्साता अथवा 'कस्य कामाय-' आत्म-व्यतिरिक्त अशा दुसऱ्या कोणाच्या प्रयोजनासाठीं [ शरीरतापाच्या मागोमाग स्वतः संतप्त होईल ? असा संबंध. ]

न हि तस्याऽऽत्मन एष्टव्यं फलम् । न चाप्यात्मनोऽन्योऽस्ति यस्य कामायेच्छति सर्वस्याऽऽत्मभूतत्वात् । अतः किमिच्छन्कस्य कामाय शरीरमनुसंज्वरेद्भ्रंशेत् । शरीरोपाधिकृतदुःखमनु दुःखी स्यात् । शरीरतापमनुतप्येत । अनात्मदर्शिनो हि तद्व्यतिरिक्तवस्त्वन्तरेप्सोः । ममेदं स्यात्पुत्रस्येदं भार्याया इदमित्येवमीहमानः पुनः पुनर्जननमरणप्रबन्धारूढः शरीररोगमनु रुज्यते । सर्वात्मदर्शिनस्तु तदसंभव इत्येतदाह ॥ १२ ॥

भाष्यार्थ—(' किमिच्छन्-' हा आक्षेप आहे प्रश्न नव्हे, या गोष्टीचें समर्थन करितात--) त्या आत्म्याला एष्टव्य--इच्छा करण्यास योग्य असें फळ नाहीं. त्याचप्रमाणें आत्म्याहून अन्य असा कोणी नाहीं, कीं ज्याच्या प्रयोजनासाठीं हा इच्छा करील, कारण याला सर्व आत्मभूत झालेलें असतें. यास्तव कशाची इच्छा करणारा, असा होत्साता व कोणाच्या प्रयोजनासाठीं तो ' शरीरमनुसंज्वरेत्-' शरीराच्या मागोमाग संतप्त होईल ? शरीर या उपाधीमुळें होणाऱ्या दुःखाच्या मागोमाग स्वतः दुःखी होईल ? शरीरतापाच्या मागोमाग स्वतः संतप्त होईल ? जो शरीरादि अनात्म्याला आत्मा समजणारा असतो त्या आत्मव्यतिरिक्त दुसऱ्या वस्तूची इच्छा करणाऱ्या अनात्मदर्शी पुरुषाला ( ताप संभवतो आणि तो ) मला हें मिळावें, माझ्या पुत्राला अमुक असावें, भार्येला अमक्या वस्तूची प्राप्ति व्हावी, अशी इच्छा करणारा अनात्मदर्शी पुनः पुनः जन्म-मरणप्रबंधावर आरूढ होत्साता शरीराच्या रोगाच्या मागोमाग

स्वतः पीडित होतो—पण सर्वात्मदर्शी पुरुषाला त्याचा असंभव आहे. हीच गोष्ट ' किमिच्छन्कस्य कामाय०' इत्यादि श्रुति सांगत आहे. १२.

यस्यानुवित्तः प्रतिबुद्ध आत्माऽस्मिन्संदेह्ये
गहने प्रविष्टः । स विश्वकृत्स हि सर्वस्य
कर्ता तस्य लोकः स उ लोक एव ॥ १३ ॥

अर्थ—या अनेक अनर्थांनीं भरलेल्या व अनेक विवेकविज्ञानप्रतिबंधांनीं विषम अशा शरीरांत प्रविष्ट झालेला आत्मा ज्या ब्राह्मणाला प्राप्त झालेला व साक्षात्कार झालेला आहे तो विश्वकृत्–विश्वाला करणारा आहे, तोच सर्वांचा कर्ता आहे. सर्व लोक त्याचा आहे व तो सर्व लोकच आहे १३.

किंच यस्य ब्राह्मणस्यानुवित्तोऽनुलब्धः प्रतिबुद्धः साक्षात्कृतः कथमहमस्मि परं ब्रह्मेत्येवं प्रत्यगात्मत्वेनावगत आत्माऽस्मिन्संदेह्ये संदेहेऽनेकानर्थसंकटोपचये गहने विषमेऽनेकशतसहस्रविवेकविज्ञानप्रतिपक्षे विषमे प्रविष्टः स यस्य ब्राह्मणस्यानुवित्तः प्रतिबोधेनेत्यर्थः । स विश्वकृद्विश्वस्य कर्ता । कथं विश्वकृत्त्वं तस्य किं विश्वकृदिति नामेत्याशङ्क्याऽऽह । स हि यस्मात्सर्वस्य कर्ता न नाममात्रं न केवलं विश्वकृत्परप्रयुक्तः सन् । किं तर्हि तस्य लोकः सर्वः । किमन्यो लोकोऽन्योऽसावित्युच्यते । स उ लोक एव । लोकशब्देनाऽऽत्मोच्यते तस्य सर्व आत्मा स च सर्वस्याऽऽत्मेत्यर्थः ॥

भाष्यार्थ—( आत्मविचारसिकाला शरीरक्लेश होत नाहींत इतकेंच नव्हे तर तो कृतकृत्यही होतो, असें सांगतात--) शिवाय ' यस्य-' ज्या ब्राह्मणाचा ' अनुवित्तः-' अनुलब्ध, ' प्रतिबुद्धः-' साक्षात् जाणलेला, तो कसा ? ' मी परं ब्रह्म आहें ' अशा प्रकारें प्रत्यगात्मत्वानें जाणलेला ' आत्मा ' ' अस्मिन्संदेह्ये-' या संदेहांत--( पृथिव्यादि भूतांच्या योगानें वृद्धि पावलेल्या शरीरांत--त्याचें संदेहत्वच साधतात -) अनेक अनर्थ-

संकटोपचयांत, गहन प्रदेशांत, विषमस्थानीं--ज्याला अनेक शतसहस्र विवेकविज्ञानप्रतिबंध आहेत अशा विषमस्थानीं--प्रविष्ट झालेला तो आत्मा ज्या ब्राह्मणाला प्रतिबोधानें-साक्षात्कारानें असा भावार्थ, प्राप्त झालेला आहे. 'स विश्वकृत्' तो विश्वकर्ता आहे. 'त्याला विश्वकृत्त्व कसें? विश्वकृत् हें त्याचें नांव आहे कीं काय?' अशी आशंका घेऊन सांगतात--'स हि सर्वस्य कर्ता' ज्याअर्थी तो सर्वांचा कर्ता आहे त्याअर्थीं, 'विश्वकृत्' हें नुस्तें नांव नव्हे. तो केवल दुसऱ्याकडून विद्येनें प्रेरित होत्साता विश्वकर्ता होत नाहीं; तर काय? 'तस्य लोकः' सर्व त्याचा लोक आहे. हा निराळा व लोक निराळा आहे, असें कीं काय? सांगतों--'स उ लोक एव' तो लोकच आहे. येथील लोकशब्दानें आत्मा सांगितला जातो. त्याचा सर्व आत्मा आहे व तो सर्वांचा आत्मा आहे, असा भावार्थ.

य एष ब्राह्मणेन प्रत्यगात्मा प्रतिबुद्धतयाऽनुवित्त आत्माऽनर्थसंकटे गहने प्रविष्टः स न संसारी किंतु पर एव । यस्माद्विश्वस्य कर्ता सर्वस्याऽऽत्मा तस्य च सर्व आत्मा । एक एवाद्वितीयः पर एवास्मीत्यनुसंधातव्य इति श्लोकार्थः ॥ १३ ॥

भाष्यार्थ—('यस्यानुवित्तः०'इत्यादि या मंत्राचा तात्पर्यार्थ सांगतात--) जो हा प्रत्यगात्मा ब्राह्मणानें साक्षात्कारत्वानें प्राप्त करून घेतलेला आत्मा अनर्थसमूहांत--गहन--विषम स्थानीं प्रविष्ट झाला आहे तो संसारी नव्हे तर परच आहे. कारण तो विश्वाचा कर्ता, सर्वांचा आत्मा आहे व सर्व त्याचा आत्मा आहे. जो एकच, अद्वितीय आणि परच--सर्व प्रकारच्या भेदानें रहित असल्यामुळें पूर्णत्वानें असणारा--आत्मा तोच मी आहें, असें आत्मानुसंधान करावें, असा या श्लोकाचा अर्थ आहे. १३

इहैव सन्तोऽथ विद्मस्तद्वयं न चेदवेदिर्महती विनष्टिः। ये तद्विदुरमृतास्ते भवन्त्यथेतरे दुःखमेवापियन्ति ॥ १४ ॥

अर्थ--या शरीरांतच असतांना आम्ही ब्रह्मतत्त्वाला जाणतों; आणि त्यामुळें कृतार्थ होतों. पण या शरीरांत असतांना जर त्याला न जाणलें तर मी अज्ञ होईन; आणि त्या अज्ञानानें फारच मोठा विनाश होईल. जे त्या ब्रह्माला जाणतात ते अमृत होतात. पण इतर अब्रह्मज्ञ दुःखासच प्राप्त होतात. १४.

किंचेहैवानेकानर्थसंकुले सन्तो भवन्तोऽज्ञानदीर्घनिद्रामोहिताः सन्तः कथंचिदिव ब्रह्मतत्त्वमात्मत्वेनाथ विद्मो विजानीमः । तदेतद्ब्रह्म प्रकृतमहो वयं कृतार्था इत्यभिप्रायः । यदेतद्ब्रह्म विजानीमस्तन्न चेद्विदितवन्तो वयं वेदनं वेदो वेदोऽस्यास्तीति वेदी वेद्येव वेदिर्न वेदिरवेदिः । ततोऽहमवेदिः स्याम् । यद्यवेदिः स्यां को दोषः स्यान्महत्यनन्तपरिमाणा जन्ममरणादिलक्षणा विनष्टिर्विनशनम् । अहो वयमस्मान्महतो विनशनान्निर्मुक्ता यदद्वयं ब्रह्म विदितवन्त इत्यर्थः ॥

भाष्यार्थ—(ब्रह्मवेत्ता विद्येनें कृतकृत्य होतो याविषयीं केवल श्रुतीचाच आधार नाहीं, तर स्वानुभवही तसाच आहे, असें सांगतात–) शिवाय 'इहैव-' अनेक अनर्थांनीं व्याप्त अशा यांतच 'सन्तः-' असणारे–अज्ञानरूपी दीर्घ निद्रेनें मोहित होत्साते 'अथ-' कसें तरी आम्ही 'विद्मः-'ब्रह्मतत्त्व आत्मत्वानें जाणतों; तें हें प्रकृत ब्रह्म आम्ही जाणतों. अहाहा ! खरोखर आम्ही कृतार्थ आहों, असा अभिप्राय. (ब्रह्मज्ञानानें पुरुष कृतार्थ होतो, हें श्रुति व अनुभव यांच्या योगानें सांगून त्या ज्ञानाच्या अभावीं दोष सांगतात–)हें जें ब्रह्म आम्ही जाणतों तें जर आम्हीं न जाणलें (तर फार मोठा विनाश होईल, असा संबंध. 'अवेदिः' या श्रुतिस्थ पदाचा विग्रह करितात–) 'वेदनं वेदः' जाणणें म्हणजे वेद. तो वेद--जाणणें ज्याला आहे तो वेदी.जो वेदी तोच'वेदिः'जो वेदि नव्हे तो 'अवेदिः' [आम्ही जर ब्रह्माला जाणलें नाहीं] तर मी अवेदि होईन; आणि जर अवेदि झालों, तर कोणता दोष होईल ? 'महती विनष्टिः-' जिच्या परिमाणाचा अंत नाहीं, अशी मोठी विनष्टि--विन-

शन--विनाश होईल. (याप्रमाणें विद्येच्या अभावीं दोष सांगून विद्वदनुभवसिद्ध अर्थाचें निगमन करितात ) अहाहा ! खरोखर, आम्ही अद्वय ब्रह्माला जाणलें व त्यामुळें या मोठ्या विनशनापासून सर्वथा मुक्त झालों, असा भावार्थ.

यथा च वयं ब्रह्म विदित्वाऽस्माद्विनशनाद्विप्रमुक्ता एवं ये तद्विदुरमृतास्ते भवन्ति ये पुनर्नैवं ब्रह्म विदुस्त इतरे ब्रह्मविद्भ्योऽन्येऽब्रह्मविद इत्यर्थः । दुःखमेव जन्ममरणादिलक्षणमेवापियन्ति प्रतिपद्यन्ते न कदाचिदप्यविदुषां ततो विनिवृत्तिरित्यर्थः । दुःखमेव हि त आत्मत्वेनोपगच्छन्ति ॥ १४ ॥

भाष्यार्थ—('इहैव०' या पूर्वार्धानें सांगितलेल्या अर्थाचाच उत्तरार्धानें विस्तार करितात-) ज्याप्रमाणें आम्ही ब्रह्माला जाणून या विनाशापासून अगदीं निर्मुक्त झालों त्याप्रमाणें दुसरेही 'ये तद्विदुः-' जे त्या ब्रह्माला जाणतात 'अमृतास्ते भवन्ति-' ते अमृत होतात. 'अथ-' पण जे अशा प्रकारें ब्रह्माला जाणत नाहींत 'इतरे-' ते इतर-ब्रह्मवेत्याहून निराळे-अब्रह्मवेत्ते, असा भावार्थ; 'दुःखमेवाऽपियन्ति-' जन्ममरणादिलक्षण दुःखासच प्राप्त होतात. अविद्वानांची त्यापासून केव्हांही सुटका होत नाहीं, असा भावार्थ. कारण ते दुःखालाच आत्मत्वानें कवटाळतात, दुःखाचें मूळ जें शरीर त्याला आत्मा मानतात. १४.

यदैतमनुपश्यत्यात्मानं देवमञ्जसा । ईशानं
भूतभव्यस्य न ततो विजुगुप्सते ॥ १५ ॥

अर्थ—जेव्हां या प्रकाशमान अथवा कर्मफल देणाऱ्या आत्म्याला आचार्यप्रसादानंतर साक्षात् जाणतो, भूत व भविष्यत् कालांच्या स्वामीला साक्षात् पाहतो तेव्हां मग त्या ईशानापासून आपलें रक्षण करण्याची इच्छा करीत नाहीं. १५.

यदा पुनरेतमात्मानं कथंचित्परमकारुणिकं कंचिदाचार्यं प्राप्य ततो लब्धप्रसादः सन्ननु पश्चात्पश्यति साक्षात्करोति स्वमात्मानं देवं द्योत-

नवन्तं दातारं वा सर्वप्राणिकर्मफलानां यथाकर्मानुरूपमञ्जसा साक्षादीशानं स्वामिनं भूतभव्यस्य कालत्रयस्येत्येतत्। न ततस्तस्मादीशानाद्देवादात्मानं विशेषेण जुगुप्सते गोपायितुमिच्छति ॥

भाष्यार्थ—(शिवाय विद्वानाला विहिताचें अनुष्ठान न करणें, यामुळें भय नाहीं, अशा रीतीनें विद्येची स्तुति करण्यासाठींच दुसरा मंत्र घेऊन त्याचें व्याख्यान करितात–) 'यदा-' पण ज्यावेळीं 'एतं-' या आत्म्याला कसें तरी एकाद्या परम कारुणिक आचार्यास शरण जाऊन त्याचा प्रसाद संपादन करून 'अनु-' त्यानंतर 'पश्यति-' साक्षात् जाणतो 'आत्मानं देवं-' आपल्या आत्म्याला द्योतनवान्–प्रकाशवान् देवास अथवा 'देवं-' सर्व प्राण्यांच्या कर्मांचीं ज्यांच्या त्यांच्या कर्मानुरूप फळें देणाऱ्यास 'अञ्जसा-' साक्षात् जाणतो, 'भूतभव्यस्य ईशानं-' भूत व भविष्यत् यांच्या–कालत्रयाच्या असा भावार्थ–स्वामीस जेव्हां मुमुक्षु साक्षात् जाणतो तेव्हां मग 'ततः-' त्या ईशान देवापासून आपल्याला 'न विजुगुप्सते-' विशेषतः रक्षण करण्याची इच्छा करीत नाहीं.

सर्वो हि लोक ईश्वराद्गुप्तिमिच्छति भेददर्शी। अयं त्वेकत्वदर्शी न बिभेति कुतश्चन। अतो न तदा विजुगुप्सते। यदेशानं देवमञ्जसाऽऽत्मत्वेन पश्यति न तदा निन्दति वा कंचित्। सर्वमात्मानं हि पश्यति स एवं पश्यन्कमसौ निन्द्यात् ॥ १५ ॥

भाष्यार्थ—सर्व भेददर्शी लोक ईश्वरापासून रक्षणाची इच्छा करतो, हें प्रसिद्ध आहे. पण हा एकत्वदर्शी कोणालाही भीत नाहीं. त्यामुळें त्यावेळीं तो रक्षण करण्याची इच्छा करीत नाहीं. ('अ:ो पण जुगुप्सा हा शब्द निंदा या अर्थी प्रसिद्ध असतांना त्यांतील 'गुप्' ह्या अवयवाचा –धातूचा अर्थ घेऊन व्याख्यान कसें करतां ?'रूढि योगाचा म्ह० अवयवशक्तीचा अपहार करते' असा न्याय आहे,' अशी आशंका घेऊन सांगतात–) अथवा जेव्हां ईशान देवास साक्षात् आत्मत्वानें पाहतो तेव्हां

कोणाची निंदा करीत नाहीं. कारण तो सर्व आत्मरूप पाहतो. मग असें पाहणारा तो कोणाची निंदा करणार ? १५.

यस्मादर्वाक्संवत्सरोऽहोभिः परिवर्तते ।
तद्देवा ज्योतिषां ज्योतिरायुर्होपासतेऽमृतम् ॥१६॥

अर्थ—ज्या ईश्वराच्या अलीकडेच संवत्सर अहोरात्राख्य अवयवांसह राहतो त्या आदित्यादि ज्योतींचीही अमृत ज्योति अशा ईश्वराची-ब्रह्माची देव 'आयुः' अशा भावनेनें उपासना करितात. १६

किंच यस्मादीशानादर्वाग्यस्मादन्यविषय एवेत्यर्थः । संवत्सरः कालात्मा सर्वस्य जनिमत परिच्छेत्ता यमपरिच्छिन्दन्नर्वागेव वर्ततेऽहोभिः स्वावयवैरहोरात्रैरित्यर्थः । तज्ज्योतिषां ज्योतिरादित्यादिज्योतिषामप्यवभासकत्वादायुरित्युपासते देवा अमृतं ज्योतिरतोऽन्यन्म्रियते न हि ज्योतिः सर्वस्य ह्येतज्ज्योतिरायुः । आयुर्गुणेन यस्माद्देवास्तज्ज्योतिरुपासते तस्मादायुष्मन्तस्ते तस्मादायुष्कामेनाऽऽयुर्गुणेनोपास्यं ब्रह्मेत्यर्थः ॥ १६ ॥

भाष्यार्थ—(आतां 'ईश्वरालाही कालाहून अन्यत्व आहे असें सिद्ध झालें असतां त्याला वस्तुत्व आहे, असें ठरतें आणि वस्तुत्वामुळें तो ईश्वर घटाप्रमाणें कालानें अवच्छिन्न झालेला असतो. त्यामुळें तो कालत्रयाचा स्वामी आहे, हें म्हणणें युक्त नव्हे,' असें कोणी म्हणेल म्हणून सांगतात—) शिवाय 'यस्मात्-' ज्या ईशानाहून 'अर्वाक्-' अलीकडे ज्याच्याहून अन्यविषयच, असा भावार्थ. 'संवत्सरः-' कालात्मा—सर्व उत्पन्न होणाऱ्या पदार्थांचा परिच्छेद करणारा, ज्या ईश्वराला परिच्छिन्न न करतां 'अहोभिः-' आपल्या अवयवभूत अहोरात्रांसहवर्तमान, असा भावार्थ, 'अर्वाक्'च—ईश्वरेतर वस्तूंना विषय करूनच राहतो (ईश्वराला आपला विषय करीत नाहीं,) 'तत् ज्योतिषां ज्योतिः-' आदित्यादि ज्योतींचाही तो प्रकाशक असल्यामुळें त्या आदित्यादि ज्योतींच्याही 'अमृत'ज्योतीची

'आयुः-' आयुष्य अशा भावनेनें 'देव' उपासना करितात. या ज्योतीहून अन्य मरतें; पण ही ज्योति मरत नाहीं. (आत्मज्योतीचा आयुष्यरूप गुण स्पष्ट करितात–) ही ज्योति हेंच सर्वांचें आयुष्य आहे. ज्याअर्थीं देव त्या ज्योतीची 'आयुः' या गुणानें उपासना करितात त्याअर्थीं ते आयुष्मान् आहेत. यास्तव ज्याला आयुष्याची इच्छा असते त्यानें 'आयुः' या गुणानें विशिष्ट अशा ब्रह्माची उपासना करावी, असा भावार्थ. (अर्थात् 'देवा उपासते' असें जरी मूळ श्रुतींत म्हटलेलें असलें तरी या उपासनेमध्यें सर्वांचा अधिकार आहे.) १६.

**यस्मिन्पञ्च पञ्चजना आकाशश्च प्रतिष्ठितः।**
**तमेव मन्य आत्मानं विद्वान्ब्रह्मामृतोऽमृतम्१७**

अर्थ—ज्या ब्रह्मामध्यें पांच गंधर्वादि पंचजन व अव्याकृतसंज्ञक आकाश प्रतिष्ठित आहे त्याच आत्म्याला मी अमृत ब्रह्म समजतों. ब्रह्माला जाणणारा असा होत्साता मी अमृतच आहें. १७.

किंच यस्मिन्यत्र ब्रह्मणि पञ्च पञ्चजना गन्धर्वादयः पञ्चैव संख्याता गन्धर्वाः पितरो देवा असुरा रक्षांसि निषादपञ्चमा वा वर्णा आकाशश्चाव्याकृताख्यो यस्मिन्सूत्रमोतं च प्रोतं च । यस्मिन्प्रतिष्ठित एतस्मिन्नु खल्वक्षरे गार्ग्याकाश इत्युक्तं तमेवाऽऽत्मानममृतं ब्रह्म मन्येऽहं न चाहमात्मानं ततोऽन्यत्वेन जाने । किं तर्ह्यमृतोऽहं ब्रह्म विद्वान्सन्ब्रह्मज्ञानमात्रेण तु मर्त्योऽहमासं तदपगमाद्विद्वानहममृत एव ॥ १७ ॥

भाष्यार्थ—('ज्योतिषां ज्योतिः अमृतं-' असें वरील मंत्रांत सांगितलें आहे, यास्तव त्याचें तें अमृतत्वच सर्वाधिष्ठानत्व या हेतूनें सिद्ध करितात–) शिवाय 'यस्मिन्-' ज्या ब्रह्मामध्यें 'पञ्च पञ्चजनाः' पांच पंचजन–गंधर्वादिक ते पांचच गणलेले आहेत. गंधर्व, पितर, देव, असुर व राक्षस किंवा निषाद ज्यांत पांचवा आहे असे ब्राह्मणादि वर्णच; 'आकाशश्च-' आणि अव्याकृत या नांवाचें आकाश 'ज्यांत सूत्र ओत व प्रोत आहे, असें वर (अ. ३ पृ. १९२) सांगितलेंच आहे. (अर्थात् वराले पांच

पंचजन व आकाश-अव्याकृत) ज्यांत 'प्रतिष्ठित' आहे. 'हे गार्गि, खरोखर याच अक्षरांत अव्याकृताकाश ओत-प्रोत आहे' असें वर (अ.३ पृ.२११) सांगितलें आहे. 'तमेव आत्मानं अमृतं ब्रह्म मन्ये-' त्याच आत्म्याला मी अमृत ब्रह्म समजतों. मी आत्म्याला त्याहून भिन्नत्वानें समजत नाहीं. तर काय ? मी ब्रह्माला जाणणारा असा होत्साता अमृत आहें. केवल अज्ञानानें मी मृत्यं होतों. पण तें अज्ञान नाहींसें झाल्यामुळें विद्वान् होत्साता मी अमृतच आहें १७.

**प्राणस्य प्राणमुत चक्षुषश्चक्षुरुत श्रोत्रस्य श्रोत्रं मनसो ये मनो विदुः। ते निचिक्युर्ब्रह्म पुराणमग्र्यम् ॥१८॥**

अर्थ—तो आत्मा-ब्रह्म प्राणाचा प्राण, चक्षूचा चक्षु, श्रोत्राचा श्रोत्र व मनाचें मन आहे असें जे जाणतात तेच त्या पुराण-फार प्राचीन व अत्यंत श्रेष्ठ ब्रह्माला निश्चयानें जाणतात. १८

किंच तेन हि चैतन्यात्मज्योतिषाऽवभास्यमानः प्राण आत्मभूतेन प्राणिति तेन प्राणस्यापि प्राणः स तं प्राणस्य प्राणम् । तथा चक्षुषोऽपि चक्षुरुत श्रोत्रस्यापि श्रोत्रम् । ब्रह्मशक्त्यधिष्ठितानां हि चक्षुरादीनां दर्शनादिसामर्थ्यं स्वतः काष्ठलोष्ठसमानि हि तानि चैतन्यात्मज्योतिःशून्यानि । मनसोऽपि मन इति ये विदुश्चक्षुरादिव्यापारानुमितास्तित्वं प्रत्यगात्मानं न विषयभूतं ये विदुस्ते निचिक्युर्निश्चयेन ज्ञातवन्तो ब्रह्म पुराणं चिरंतनमग्र्यमग्रे भवम् । "तद्यदात्मविदो विदुः" इति ह्याथर्वणे ॥ १८ ॥

भाष्यार्थ—(किंवा प्रकृत पांच पंचजन ज्योतीसह प्राणादिकही होऊं शकतील, अशा अभिप्रायानें सांगतात-) शिवाय आत्मभूत अशा त्या चैतन्यात्मज्योतीकडून प्रकाशमान होणारा प्राण प्राणनक्रिया करतो.त्यामुळें तो प्राणाचाही प्राण आहे. त्या प्राणाच्या प्राणास, त्याच-

प्रमाणें चक्षूच्याही चक्षूस, श्रोत्राच्या श्रोत्रास;[जे जाणतात, असा संबंध. 'अहोपण चक्षु इत्यादिकांच्या ठिकाणीं ब्रह्माला चक्षुःश्रोत्रादित्व आहे, हें कसें सिद्ध होतें ?' तें सांगतात–] ब्रह्मशक्तीनें अधिष्ठित झालेल्या अशाच चक्षुरादिकांना पाहणें, ऐकणें इत्यादि क्रियांचें सामर्थ्य असतें. तीं स्वतः चैतन्यात्मज्योतीनें शून्य असलेलीं काष्ठ, मातीचें ढेंकूळ यांसारखीं असतात. तो आत्मा–ब्रह्म मनाचेंही मन आहे असें जे जाणतात म्हणजे प्रत्यक् आत्म्याचें अस्तित्व चक्षुरादिकांच्या व्यापारांवरून अनुमान करण्यास योग्य आहे, तो प्रत्यगात्मा इंद्रियांचा विषयभूत नाहीं, असें जे जाणतात 'ते निचिक्युः ब्रह्म पुराणमग्र्यं' ते–पुराण –चिरंतन–फार जुनें व अग्रभागीं–प्रथम झालेलें ब्रह्म निश्चयानें जाणते झाले. आथर्वणोपनिषदांत–मुंडकांत 'तद्यदात्मविदो विदुः-' तें ज्याला आत्मवेत्ते जाणते झाले, असें म्हटलें आहे. १८

मनसैवानुद्रष्टव्यं नेह नानाऽस्ति किंचन।
मृत्योः स मृत्युमाप्नोति य इह नानेव
पश्यति ॥ १९ ॥

अर्थ—मनानेंच आचार्योपदेशपूर्वक ब्रह्म पहावें. त्या ब्रह्मामध्यें नाना असें कांहीं नाहीं. जो ब्रह्मामध्यें नाना–भेदसा पहातो तो मरणापासून मरणास प्राप्त होतो १९.

तद्ब्रह्मदर्शने साधनमुच्यते मनसैव परमार्थज्ञानसंस्कृतेनाऽऽचार्योपदेशपूर्वकं चानुद्रष्टव्यम् । तत्र च दर्शनविषये ब्रह्मणि नेह नानाऽस्ति किंचन किंचिदपि । असति नानात्वे नानात्वमध्यारोपयत्यविद्यया । स मृत्योर्मरणान्मृत्युं मरणमाप्नोति । कोऽसौ । य इह नानेव पश्यति। अविद्याध्यारोपणव्यतिरेकेण नास्ति परमार्थतो द्वैतमित्यर्थः ॥ १९ ॥

---

१ चक्षुरादि इंद्रियें कोणाकडून तरी अधिष्ठित होत्सातींच प्रवृत्त होतात. कारण तीं करणें आहेत, करवत, तासणी इत्यादिकांप्रमाणें, अशा प्रकारच्या अनुमानानें प्रत्यगात्म्याचें अस्तित्व सिद्ध होतें. २ या वचनानें आत्म्याच्या क्रियाविषयत्वाचें निवारण केलें.

भाष्यार्थ—त्या ब्रह्मदर्शनाविषयीं साधन सांगितलें जातें. ' मनसैव-' मनानेंच (' अहोपण मनाला जर ब्रह्मदर्शनसाधनत्व असेल तर ब्रह्म वाङ्मनसातीत आहे, असें सांगणाऱ्या श्रुतीची वाट काय ? ' अशी आशंका घेऊन सांगतात–) परमार्थ ज्ञानानें संस्कृत झालेल्या मनानेंच (केवल मन ब्रह्माला जरी विषय करीत नसलें तरी श्रवणादिकांनीं संस्कृत झालेलें मन ब्रह्माकार होतें. त्यामुळें तें ब्रह्म मनानें पहावें असें म्हटलें जातें. म्हणूनच ब्रह्म वृत्तिव्याप्य आहे, असें विद्वान् समजतात. ' अनुद्रष्टव्यं ' यांतील अनुशब्दाचा अर्थ सांगतात–) आचार्योपदेशपूर्वक मागून पहावें. (' तर मग त्यांत द्रष्टा, दर्शन, द्रष्टव्य हा भेद आहे, ' अशी आशंका घेऊन सांगतात–) त्या दर्शनाचा विषय असें जें ब्रह्म त्यांत ' नेह नानास्ति किंचन-' येथें नाना असें कांहीं नाहीं. (' मग आत्म्यामध्यें वस्तुतः भेद नसतांनाही तो भासतो कसा ? ' अशी आशंका घेऊन सांगतात–) नानात्व नसतांना अविद्येनें नानात्वाचा अध्यारोप होतो. ' मृत्योः स मृत्युं०-' तो मरणापासून मरणास प्राप्त होतो. तो कोण ? ' य इह नानेव पश्यति-' जो येथें नानासें पाहतो. [ भेददृष्टि ठेवतो.] अविद्याध्यारोपणावाचून परमार्थतः द्वैत नाहीं, असा भावार्थ १९.

**एकधैवानुद्रष्टव्यमेतदप्रमयं ध्रुवम् । विरजः पर आकाशादज आत्मा महान्ध्रुवः ॥२०॥**

अर्थ—आचार्योपदेशपूर्वक तें एक प्रकारानेंच पहावें. कारण तें ब्रह्म अप्रमेय, ध्रुव–निर्विकार आहे. तें धर्माधर्मादिमलरहित, अव्याकृत–आकाशाहूनही सूक्ष्म, जन्मरहित, आत्मा, महान् व अविनाशी आहे. २०

यस्मादेवं तस्मादेकधैवैकेनैव प्रकारेण विज्ञानघनैकरसप्रकारेणाऽऽकाशवन्निरन्तरेणानुद्रष्टव्यम् । यस्मादेतद्ब्रह्माप्रमयमप्रमेयम् । सर्वैकत्वात् । अन्येन ह्यन्यत्प्रमीयत इदं त्वेकमेवातोऽप्रमेयम् । ध्रुवं नित्यं कूटस्थमविचालीत्यर्थः । ननु विरुद्धमिदमुच्यतेऽप्रमेयं ज्ञायत इति च।ज्ञायत इति प्रमाणैर्मीयत इत्यर्थोऽप्रमेयमिति च तत्प्रतिषेधः ॥

भाष्यार्थ—( द्वैताचा जर अभाव आहे तर ब्रह्माला आचार्योपदेशानंतर पहावें कसें ? तें सांगतात—) ज्याअर्थी असें आहे त्याअर्थी 'एकधा एव-' एका प्रकारानेंच ( तो एक प्रकारच प्रकट करितात—) विज्ञानघनैकरस प्रकारानें—आकाशाप्रमाणें निरंतरतेनें आचार्योपदेशपूर्वक पहावें. कारण 'एतदप्रमयं-' हें ब्रह्म अप्रमय—अप्रमेय आहे. कारण ब्रह्मामध्यें सर्वैकत्व आहे. [ अर्थात् ज्याअर्थी ब्रह्म एकरस आहे त्याअर्थी अप्रमेय आहे. ] अन्य प्रमाणाकडून अन्य प्रमेय प्रमित होतें—विषय केलें जातें; पण हें ब्रह्म एकच आहे. म्हणून अप्रमेय आहे. 'ध्रुवं-' तें ध्रुव म्ह० नित्य—कूटस्थ—अचल [ अविचाली—विशेषतः चलन न पावणारें ] आहे, असा भावार्थ. ( शंका-) अहोपण 'तें अप्रमेय आहे व जाणलें जातें' हें विरुद्ध सांगितलें जात आहे. कारण 'ज्ञायते-' म्ह० प्रमाणांनीं मित केलें जातें,असा त्याचा अर्थ आहे व तेंच 'अप्रमेय' आहे, असें ह्मणणें हा त्याचाच प्रतिषेध आहे.

नैष दोषः । अन्यवस्तुवदनागमप्रमाणप्रमेयत्वप्रतिषेधार्थत्वात् । यथाऽन्यानि वस्तून्यागमनिरपेक्षैः प्रमाणैर्विषयीक्रियन्ते न तथैतदात्मतत्त्वं प्रमाणान्तरेण विषयीकर्तुं शक्यते । सर्वस्याऽऽत्मत्वे केन कं पश्येद्विजानीयादिति प्रमातृप्रमाणादिव्यापारप्रतिषेधेनैवाऽऽगमोऽपि विज्ञापयति न त्वभिधानाभिधेयलक्षणवाक्यधर्माङ्गीकरणेन । तस्मान्नाऽऽगमेनापि स्वर्गमेर्वादिवत्तत्प्रतिपाद्यते।प्रतिपादयित्रात्मभूतं हि तत्॥

भाष्यार्थ—( समाधान—) हा कांहीं दोष नव्हे. कारण 'अप्रमेयं-' या प्रतिषेधाचा अर्थ इतर वस्तूंप्रमाणें ब्रह्म आगमभिन्न प्रमाणांनीं प्रमित होणारें नाहीं, असा आहे. जशा इतर वस्तु आगमनिरपेक्ष प्रमाणांनीं विषय केल्या जातात तसें हें आत्मतत्त्व दुसऱ्या प्रमाणानें विषय करतां येण्याजोगें नाहीं. कारण सर्वांचें आत्मत्व झालें असतां—सर्व आत्माच आहे, असा प्रत्यय दृढ झाला असतां 'कोणत्या साधनानें कोणत्या विषयाला पहावें ? जाणावें ?' इत्यादि ( सर्व द्वैताची शांति सांगणारी

श्रुति आहे. ' तर मग आगम तरी आत्म्याचें ज्ञान कसें करून देणार?' तें सांगतात–) प्रमाता, प्रमाण इत्यादिकांच्या व्यापाराचा प्रतिषेध करूनच आगमही ब्रह्मतत्त्वाचा प्रतिबोध करतो, अभिधान-अभिधेयरूप[1] वाक्यधर्मांचा अंगीकार करून तो आगम आत्मबोध करीत नाहीं. तस्मात् आगमाकडूनही स्वर्ग, मेरु इत्यादिकांप्रमाणें ब्रह्म प्रतिपादिलें जात नाहीं.कारण तें ब्रह्म प्रतिपादन करणारा जो पुरुष त्याच्या आत्मभूत आहे.( त्यामुळें आत्मा–तें ब्रह्म–स्वर्गादि अनात्मपदार्थांप्रमाणें विषयत्वानें –विषय या रूपानें आगमाकडून प्रतिपादिला जात नाहीं.)

प्रतिपादयितुः प्रतिपादनस्य प्रतिपाद्यविषयत्वात् । भेदे हि सति तद्भवति । ज्ञानं च तस्मिन्परात्मभावनिवृत्तिरेव ॥

भाष्यार्थ—( ' ब्रह्म प्रतिपादकाच्या आत्मभूत जरी असलें तरी ' विषयत्वानें अप्रतिपाद्य ' कां ? ' या शंकेचें समाधान–) प्रतिपादन करणाऱ्या पुरुषाच्या प्रतिपादनाला प्रतिपाद्यविषयत्व असतें [म्ह० त्याच्या प्रतिपादनाचा विषय प्रतिपाद्यच असतो. ] पण तें प्रतिपाद्यत्व, प्रतिपादन करणारा व प्रतिपादनाचा विषय यांचा भेद असला तरच संभवतें. ( ' असें जर आहे तर त्या ब्रह्माविषयीं आगमजन्य ज्ञान कसें होतें, ' या शंकेचें समाधान–) परात्मभावाची निवृत्ति–देहादि अनात्मवस्तूंना आत्मा समजणें या मिथ्याप्रत्ययाची निवृत्ति–हेंच ब्रह्माविषयींचें ज्ञान होय. ( अर्थात् देहादि अनात्म वस्तूंच्या ठिकाणीं आरोपिलेल्या आत्मभावाची निवृत्तिच आगम करतो; आणि ती झाल्यावर केवळ आत्मा अवशिष्ट राहतो. त्यानंतर आत्म्याच्या स्वाभाविक स्फुरणाचा प्रतिबंध नष्ट होऊन केवळ आत्मा राहिला असतां तें–स्वाभाविक स्फुरण–प्रकट होतें. )

---

१ घटादिशब्द हें अभिधान व आंवळता गळा, पोट इत्यादि आकारानें युक्त असलेला मातीचा पदार्थ हें अभिधेय; या वाक्यधर्मांच्या योगानेंच वाक्यार्थाचा बोध होतो.

न तस्मिन्साक्षादात्मभावः कर्तव्यो विद्यमानत्वादात्मभावस्य। नित्यो ह्यात्मभावः सर्वस्यातद्विषय इव प्रत्यवभासते। तस्मादतद्विषयाभासनिवृत्तिव्यतिरेकेण न तस्मिन्नात्मभावो विधीयते ॥

भाष्यार्थ—('अहो पण श्रुतीला ब्रह्माचे ठिकाणीं आत्मभाव करावा, हें विवक्षित आहे. देहादिकांच्या ठिकाणच्या आत्मत्वाची व्यावृत्ति करावी, असें विवक्षित नाहीं' असें कोणी म्हणेल म्हणून सांगतात—) ब्रह्माच्या ठिकाणीं साक्षात् आत्मभाव करावयाचा नसतो; कारण ब्रह्माच्या आत्मभावाला विद्यमानत्व आहे. (तो नित्य आहेच 'तर मग विपरीत भावना कशी होते ?' तें सांगतात—)सर्वांचा म्ह० पूर्ण ब्रह्माचा आत्मभाव नित्य आहे. पण तो आत्मभाव ब्रह्मव्यतिरिक्तविषय असल्यासारखा अवभास होतो. [आत्मा ब्रह्माहून भिन्न आहे, असा भ्रामक प्रत्यय येतो. याप्रमाणें ब्रह्मामध्यें आत्मभाव सदा विद्यमान आहे, असें सिद्ध झालें असतां काय निष्पन्न होतें तें सांगतात—] तस्मात् अतद्विषय म्ह० अब्रह्मविषय जो आत्मावभास त्याच्या निवृत्तीवाचून निराळें ब्रह्मामध्यें आत्मभावाचें विधान केलें जात नाहीं. [म्ह० आगम देहादिकांविषयींची जी आत्मत्वबुद्धि तिचीच निवृत्ति करतो, त्या निवृत्तीवाचून इतर कांहीं करीत नाहीं. तो ब्रह्मामध्यें पूर्वीं विद्यमान नसलेल्या आत्मभावाचें नवें विधान करीत नाहीं, असा भावार्थ.]

अन्यात्मभावनिवृत्तावात्मभावः स्वात्मनि स्वाभाविको यः स केवलो भवतीत्यात्मा ज्ञायत इत्युच्यते। स्वतश्चाप्रमेयः प्रमाणान्तरेण न विषयीक्रियत इत्युभयमप्यविरुद्धमेव ॥

भाष्यार्थ—('अहो पण आगम देहादिकांच्या आत्मत्वाचीच जर निवृत्ति करीत असेल तर आगमानें आत्मज्ञान कसें संभवतें ?' तें सांगतात—) देहादि ब्रह्मभिन्न वस्तूंच्या ठिकाणच्या आत्मत्वाची निवृत्ति झाली असतां स्वात्म्याच्या ठिकाणचा जो स्वाभाविक आत्मभाव तो केवल—निरुपाधिक—होतो. त्यामुळें 'आत्मा जाणला जातो' असें

म्हटलें जातें. ( ' मग अशा प्रकारचें मेयत्व जर आत्म्याला आहे तर तो ' अप्रमेय ' आहे, असें येथें कसें म्हटलें आहे ? ' तें सांगतात–) पण तो स्वतः–स्वरूपानें अप्रमेय आहे, म्हणजे दुसऱ्या प्रमाणाकडून विषय केला जात नाहीं; ( अर्थात् 'आत्म्याला वृत्तिव्याप्यत्वानें मेयत्व व स्फुरणाच्या अव्याप्यत्वामुळें अप्रमेयत्व असणें यांत कांहीं दोष नाहीं,' असें सांगतात–) येणेंप्रमाणें ' आत्मा आगमाचा विषय आहे ' व ' तो अप्रमेय आहे ' हे श्रुतीचे दोन्ही उल्लेख अविरुद्धच आहेत. ( ' देहादिक आत्मा नव्हे ' अशा आगमवाक्यापासून उत्पन्न होणाऱ्या वृत्तीचा आत्मा विषय होतो, म्हणून त्याला वृत्तिव्याप्यत्व आहे, पण तो स्वतः स्फुरण–ज्ञान–स्वरूप असल्यामुळें साक्षात् वाक्यजन्य स्फुरणाचा विषय होत नाहीं; त्यामुळें वरील दोन्ही वर्णनें संभवतात. )

विरजो विगतरजो रजो नाम धर्माधर्मादिमलं तद्रहित इत्येतत् । परः परो व्यतिरिक्तः सूक्ष्मो व्यापी वाऽऽकाशादप्यव्याकृताख्यात् । अजो न जायते । जन्मप्रतिषेधादुत्तरेऽपि भावविकाराः प्रतिषिद्धाः । सर्वेषां जन्मादित्वात् । आत्मा महान्परिमाणतो महत्तरः सर्वस्मात् । ध्रुवोऽविनाशी ॥ २० ॥

भाष्यार्थ—( प्रस्तुत विसाव्या मंत्राच्या उत्तरार्धाचें व्याख्यान–) ' विरजः-' ज्याच्यापासून रज निघून गेलें आहे तें विरज; ' रज ' म्ह० धर्माधर्मादि मळ, त्या मळानें रहित, असा भावार्थ. ' आकाशात् परः-'अव्याकृतसंज्ञक आकाशाहूनही पर म्ह० व्यतिरिक्त, सूक्ष्म किंवा व्यापी. ' अजः-' उत्पन्न न होणारा; या विशेषणानें जन्माचा प्रतिषेध केल्यामुळें पुढील ' अस्ति, वर्धते,' इत्यादि भावविकारांचाही प्रतिषेध होतो. कारण सर्व भावविकारांचा आदि—आरंभ जन्म या भावविकारापासूनच होतो. ' आत्मा ' ' महान् ' परिमाणानें सर्वांहून अधिक मोठा ' ध्रुवः-' अविनाशी आहे ( तें ब्रह्मच विरज, अव्याकृताहून पर, अज, महान् व अविनाशी आत्मा आहे, असा संबंध. ) २०.

तमेव धीरो विज्ञाय प्रज्ञां कुर्वीत ब्राह्मणः।
नानुध्यायाद्बहूञ्छब्दान्वाचो विग्लापनꣳ हि
तदिति ॥ २१ ॥

अर्थ—बुद्धिमान् ब्राह्मणानें त्याच आत्म्याला शास्त्र व आचार्योपदेश यांच्या द्वारा जाणून ( परोक्ष शाब्द ज्ञान संपादन करून ) त्याविषयींची प्रज्ञा करावी. [ साक्षात्काराच्या साधनांचें अनुष्ठान करावें. ] पुष्कळ शब्दांचें अनुध्यान करूं नये. कारण तें बहुशब्दांचें अनुध्यान वाणीला शिणविणारें आहे २१.

तमीदृशमात्मानमेव धीरो धीमान्विज्ञायोपदेशतः शास्त्रतश्च प्रज्ञां शास्त्राचार्योपादिष्टविषयां जिज्ञासापरिसमाप्तिकरीं कुर्वीत ब्राह्मणः। एवं प्रज्ञाकरणसाधनानि संन्यासशमदमोपरमतितिक्षासमाधानानि कुर्यादित्यर्थः। नानुध्यायान्नानुचिन्तयेद्बहून्प्रभूताञ्छब्दान्। तत्र बहुत्वप्रतिषेधात्केवलात्मैकत्वप्रतिपादकाः स्वल्पाः शब्दा अनुज्ञायन्ते।"ओमित्येवं ध्यायथ आत्मानम्" "अन्या वाचो विमुञ्चथ"इति चाऽऽथर्वणे। वाचो विग्लापनं विशेषेण ग्लानिकरं श्रमकरं हि यस्मात्तद्बहुशब्दाभिध्यानमिति ॥ २१ ॥

भाष्यार्थ--( पूर्वोक्त वस्तुनिदर्शनाचें निगमन करितात–) 'तमेव-' त्या अशाप्रकारच्या आत्म्यालाच 'धीरः ब्राह्मणः-' बुद्धिमान् ब्राह्मणानें 'विज्ञाय-' आचार्यांचा उपदेश व शास्त्र यांच्या योगानें विशेषतः–साक्षात्–जाणून 'प्रज्ञां कुर्वीत-' प्रज्ञा करावी, शास्त्र व आचार्य यांनीं ज्याचा उपदेश केला आहे तद्विषयक जिज्ञासेची परिसमाप्ति करणारी प्रज्ञा करावी. ( अशा रीतीनें प्रज्ञा करण्यास साधनें कोणतीं ? तें सांगतात–) अशाप्रकारची प्रज्ञा करण्याचीं साधनें संन्यास [ काम्य व निषिद्ध कर्मांचा त्याग ], शम, दम, उपरम [ नित्य-नैमित्तिक

---

१ नित्य शुद्ध, बुद्ध, मुक्त इत्यादि स्वरूप.

कर्मांचा त्याग ], तितिक्षा, समाधान हीं आहेत. तीं करावींत असा भावार्थ. ' नानुध्यायात् बहून् शब्दान्-'पुष्कळ शब्दांचें अनुचिंतन करूं नये. चिंतन करण्यास योग्य असलेल्या शब्दांच्या बहुत्वाचा प्रतिषेध केलेला असल्यामुळें केवल आत्मैकत्वप्रतिपादक थोड्या शब्दांची अनुज्ञा दिली जाते. याविषयीं आथर्वणांत ' ओमित्येवं ध्यायथ आत्मानं अन्या वाचो विमुञ्चथ' असें सांगितलें आहे. ' वाचो विग्लापनं हि तत्-' कारण तें बहुशब्दांचें अभिध्यान वाणीला विशेषतः ग्लानि आणणारें—श्रम देणारें आहे. ( यास्तव बहु शब्दांचें अनुचिंतन करूं नये. ) २१.

स वा एष महानज आत्मा योऽयं विज्ञानमयः प्राणेषु य एषोऽन्तर्हृदय आकाशस्तस्मिञ्छेते सर्वस्य वशी सर्वस्येशानः सर्वस्याधिपतिः स न साधुना कर्मणा भूयान्नो एवासाधुना कनीयानेष सर्वेश्वर एष भूताधिपतिरेष भूतपाल एष सेतुर्विधरण एषां लोकानामसंभेदाय ॥

अर्थ—तोच हा महान् अज आत्मा कीं जो हा प्राणांतील विज्ञानमय. हा जो हृदयांत अव्याकृत आकाश त्यांत तो राहतो. तो सर्वांना स्ववश ठेवणारा, सर्वांचा ईशान, सर्वांचा अधिपति आहे. तो पुण्यकर्मानें वाढत नाहीं व पापकर्मानें न्यून होत नाहींच. हा सर्वेश्वर, हा भूतांचा अधिपति, हा भूतपाल, हा सर्वांचें विधारण करणारा या लोकांचीं मर्यादा तुटूं नये म्हणून सेतु आहे.

सहेतुकौ बन्धमोक्षावभिहितौ मन्त्रब्राह्मणाभ्यां श्लोकैश्च पुनर्मोक्षस्वरूपं विस्तरेण प्रतिपादितमेवमेतस्मिन्नात्मविषये सर्वो वेदो यथोपयुक्तो भवति तत्तथा वक्तव्यमिति तदर्थेयं कण्डिकाऽऽरभ्यते । तत्र

यथाऽस्मिन्प्रपाठकेऽभिहितं सप्रयोजनमनूद्यात्रैवोपयोगः कृत्स्नस्य वेदस्य काम्यराशिवर्जितस्येत्येवमर्थ उक्तार्थानुवादः स वा एष इत्यादिः ॥

भाष्यार्थ—( पुढील व्याख्यानासाठीं गतार्थाचा अनुवाद–) मंत्र-ब्राह्मणांनीं हेतूंसह बंध व मोक्ष सांगितले. पुनः श्लोकांनीं मोक्षाचें स्वरूप सविस्तर प्रतिपादिलें. (पुढील म्ह० २२ व्या कंडिकेचें तात्पर्य–) येथेंप्रमाणें या आत्मविषयामध्यें सर्व वेद कसा उपयुक्त होतो तें सांगावें म्हणून त्यासाठीं ही कंडिका आरंभिली जात आहे. ( 'अहो पण याच बाविसाव्या कंडिकेंत ' तं एतं वेदानुवचनेन ब्राह्मणा विविदिषन्ति' या वाक्यानें सर्व वेदाचा विनियोग ब्रह्मात्म्यामध्यें आहे, हें जर सांगावयाचें आहे तर त्यापूर्वीच्या वाक्याचा काय उपयोग ? ' असें कोणी विचारील म्हणून सांगतात–) या प्रपाठकांत सप्रयोजन–सफल आत्मज्ञान ज्याप्रमाणें सांगितलें आहे तसाच त्याचा अनुवाद करून ब्रह्मात्मैकत्वामध्येंच सर्व वेदाचा–फक्त काम्य वेदराशीला सोडून बाकीच्या सर्व वेदाचा–उपयोग आहे हें सांगण्यासाठीं उक्त सफल आत्मज्ञानाचा 'स वा एष महान् अज आत्मा ' इत्यादि हा अनुवाद आहे.

स इत्युक्तपरामर्शार्थः । कोऽसावुक्तः परामृश्यते तं प्रति निर्दिशति य एष विज्ञानमय इति । अतीतानन्तरवाक्योक्तसंप्रत्ययो मा भूदिति य एषः । कतम एष इत्युच्यते विज्ञानमयः प्राणेष्विति ॥

भाष्यार्थ—( 'स वै एषः महान् अज आत्मा ' तो हा महान् अज आत्मा आहे.) ' सः ' हा शब्द उक्ताचा परामर्श करण्यासाठीं आहे. ( अहो पण मागें पुष्कळ पदार्थ उक्त आहेत. त्यांतील ) येथें कोणत्या उक्त पदार्थाचा परामर्श केला जात आहे ? त्या उक्ताचाच श्रुति ' य एष विज्ञानमयः ' असा निर्देश करते. नुकत्यांच मागें संपलेल्या वाक्यांत सांगितलेल्या आत्म्याचा संप्रत्यय होऊं नये म्हणून ' य एषः ' असें म्हटलें आहे. ( 'विरजः परः' इत्यादि हें मागील वाक्य

१ ब्रह्मात्म्यामध्यें सर्व वेदाचा विनियोग होतो, हें दाखविण्यासाठीं.

आहे. त्यांत सांगितलेला जो ' महान् ' इत्यादि विशेषणांनीं युक्त असलेला परमात्मा त्याची येथील ' सः ' या शब्दानें प्रतीति न व्हावी म्हणून त्या 'सः-'शब्दानें ज्योतिर्ब्राह्मणोक्त जीवाचा परामर्श करून त्याचें-च 'वै-'शब्दानें स्मरण करवून देऊन 'एषः-' या शब्दानें संनिहित-समीप असलेल्या परमात्म्याशीं त्याचें ऐक्य आहे, असा श्रुति निर्देश करीत आहे, असा याचा भावार्थ. ) तो ' एषः ' कोणता ? तें 'विज्ञानमयः प्राणेषु ' या शब्दांनीं सांगितलें जातें.

उक्तवाक्योल्लिङ्गनं संशयनिवृत्त्यर्थम् । उक्तं हि पूर्वं जनकप्रश्नारम्भे कतम आत्मेति योऽयं विज्ञानमयः प्राणेष्वित्यादि । एतदुक्तं भवति योऽयं विज्ञानमयः प्राणेष्वित्यादिना वाक्येन प्रतिपादितः स्वयंज्योति-रात्मा स एष कामकर्माविद्यानामनात्मधर्मत्वप्रतिपादनद्वारेण मोक्षितः परमात्मभावमापादितः पर एवायं नान्य इत्येष स साक्षान्महानज आत्मेत्युक्तः । योऽयं विज्ञानमयः प्राणेष्विति यथाव्याख्यातार्थ एषः॥

भाष्यार्थ—( ' अहो पण जीव विज्ञानमय कसा ? व ' प्राणेषु ' ही सप्तमी कशी योजली आहे ?' तें सांगतात—) उक्त वाक्याचा जो उल्लेख केला आहे तो संशयाच्या निवृत्तीसाठीं आहे. पूर्वीं जनकाच्य प्रश्नाच्या आरंभीं ' कतम आत्मा ' असें व ' योऽयं विज्ञानमयः प्राणेषु, असें म्हटलें आहे. याचा भावार्थ असा—'जो हा प्राणांतील विज्ञान-मय आत्मा ' इत्यादि वाक्यानें प्रतिपादिलेला जो स्वयंज्योति आत्मा ते हा ' काम, कर्म व अविद्या हे अनात्म्याचे धर्म आहेत,' अशा प्रतिपा-दनाच्या द्वारा त्या धर्मांपासून सोडविलेला व परमात्मभावास प्राप्त कर-विलेला परमात्माच आहे, त्याहून दुसरा कोणी नव्हे अशा प्रकारें तोच साक्षात् ' महान् अज आत्मा ' असा सांगितलेला आहे. ' योऽयं वि-ज्ञानमयः प्राणेषु' याचा अर्थ पूर्वीं जसा सांगितला आहे तसाच समजावा.

य एषोऽन्तर्हृदये हृदयपुण्डरीकमध्ये य एष आकाशो बुद्धिविज्ञा-नसंश्रयस्तस्मिन्नाकाशे बुद्धिविज्ञानसहिते शेते तिष्ठति । अथवा संप्र-

सादकालेऽन्तर्हृदये य एष आकाशः पर एवाऽऽत्मा निरुपाधिको विज्ञानमयस्य स्वस्वभावस्तस्मिन्स्वस्वभावे परमात्मन्याकाशाख्ये शेते । चतुर्थ एतद्व्याख्यातं कैष तदाऽभूदित्यस्य प्रतिवचनत्वेन ॥

भाष्यार्थ—( दुसऱ्या वाक्याचें व्याख्यान– ) ' य एषः अन्तर्हृदये-' हृदयकमलामध्यें जो हा ' आकाशः-' बुद्धिविज्ञानाचा आश्रय आकाश ' तस्मिञ्छेते-' त्या बुद्धि-विज्ञानयुक्त आकाशांत हा विज्ञानमय राहतो. अथवा सुषुप्तिसमयीं हृदयांत जो हा आकाश–निरुपाधिक पर आत्माच विज्ञानमयाचा स्वस्वभाव त्या आकाशाख्य स्वस्वभावांत–परमात्म्यांत विज्ञानमय राहतो. चवथ्या ( म्ह० उपनिषदाच्या क्रमानें दुसऱ्या ) अध्यायांत ' कैष तदाभूत् ' ( पृ. ४३ ) या प्रश्नाच्या प्रतिवचनत्वानें याचें व्याख्यान केलें आहे.

स च सर्वस्य ब्रह्मेन्द्रादेर्वशी । सर्वो ह्यस्य वशे वर्तते । उक्तं चैतस्य वा अक्षरस्य प्रशासन इति । न केवलं वशी सर्वस्येशान ईशिता च ब्रह्मेन्द्रप्रभृतीनामीशितृत्वं च कदाचिज्जातिकृतं यथा राजकुमारस्य बलवत्तरानपि भृत्यान्प्रति तद्वन्मा भूदित्याह सर्वस्याधिपतिरधिष्ठाय पालयिता स्वतन्त्र इत्यर्थः । न राजपुत्रवदमात्यादिभृत्यतन्त्रः ॥

भाष्यार्थ—' सर्वस्य वशी-' ब्रह्मा, इंद्र इत्यादि सर्वांचा तो वशी आहे. सर्व प्रपंच त्याच्या अधीन राहतो. ' एतस्य वा अक्षरस्य प्रशासने०-' इत्यादि पूर्वीं सांगितलेंच आहे. तो केवळ वशीच नव्हे तर ' सर्वांचा ईशान-' ईशिता. ब्रह्मा, इंद्र इत्यादिकांचें ईशितृत्व केव्हां केव्हां असून तें जातिकृत आहे. [म्हणजे जसें राजपुत्राला त्याच्याहून अधिक बलवान् अशाही भृत्यादिकांचें ईशितृत्व असतें, पण तें स्वाभाविक नसून ' राजाचा पुत्र ' या जातीमुळें असतें त्याप्रमाणें ब्रह्मा, इंद्र इत्यादिकांचें ईशितृत्व ' ब्रह्मत्व, इंद्रत्व ' या जातीमुळें आहे.] पण परमात्म्याचें ईशितृत्व तसें जातिकृत न व्हावें म्हणून श्रुति म्हणते– ' सर्वस्य अधिपतिः-' सर्वांचा अधिपति–अधिष्ठाता होऊन पालन कर-

णारा—स्वतंत्र असा भावार्थ. अमात्यादि भृत्यांच्या तंत्रानें वागणारा राजपुत्र जसा असतो तसा हा अन्यतन्त्र नाहीं.

त्रयमप्येतद्वशित्वादि हेतुहेतुमद्रूपम् । यस्मात्सर्वस्याधिपतिस्ततोऽसौ सर्वस्येशानः । यो हि यमधिष्ठाय पालयति स तं प्रतीष्ट एवेति प्रसिद्धम् । यस्माच्च सर्वस्येशानस्तस्मात्सर्वस्य वशीति ॥

भाष्यार्थ—हें वशित्वादि त्रयही हेतुहेतुमद्रूप आहे. (तेंच विशद करितात—) ज्याअर्थीं हा सर्वांचा अधिपति आहे त्याअर्थीं तो सर्वांचा ईशान. कारण जो ज्याचा अधिष्ठाता होऊन पालन करतो तो त्याचें ईशन करतोच हें प्रसिद्ध आहे; आणि ज्याअर्थीं सर्वांचा ईशान आहे त्याअर्थीं सर्वांचा वशी आहे. (याप्रमाणें या तीन विशेषणांचा कार्यकारणभाव आहे. )

किंचान्यत्स एवं भूतो हृद्यन्तर्ज्योतिःपुरुषो विज्ञानमयो न साधुना शास्त्रविहितेन कर्मणा भूयान्भवति न वर्धते पूर्वावस्थातः केनचिद्धर्मेण । नो एव शास्त्रप्रतिषिद्धेनासाधुना कर्मणा कनीयानल्पतरो भवति पूर्वावस्थातो न हीयत इत्यर्थः ॥

भाष्यार्थ—(विद्याफळ सांगितलें एवढेंच नाहीं तर आणखींही आहे, असें सांगतात—) शिवाय दुसरें—'सः-' तो अशा प्रकारचा हृदयांतील ज्योतिःपुरुष विज्ञानमय 'न साधुना कर्मणा भूयान्-'साधु म्ह०शास्त्रविहित कर्मानें अधिक होत नाहीं. कोणत्याही धर्मानें तो पूर्वावस्थेहून वाढत नाहीं 'नो एव असाधुना कनीयान्-' शास्त्रप्रतिषिद्ध असाधुकर्मानें अल्पतर होत नाहींच; पूर्वावस्थेहून हीन होत नाहीं, असा भावार्थ.

किंच सर्वो ह्यधिष्ठानपालनादि कुर्वन्परानुग्रहपीडाकृतेन धर्माधर्माख्येन युज्यतेऽस्यैव तु कथं तदभाव इति । उच्यते । यस्मादेष सर्वेश्वरः सन्कर्मणोऽपीशितुं भवत्येव शीलमस्य तस्मान्न कर्मणा संबध्यते । किंचैष भूताधिपतिर्ब्रह्मादिस्तम्बपर्यन्तानां भूतानामधिपतिरित्युक्तार्थं पदम् ॥

भाष्यार्थ—'अहो पण अधिष्ठान, परिपालन इत्यादि करणारा सर्वही परानुग्रह व पीडा यांच्या योगानें होणाऱ्या धर्माधर्मांनीं युक्त होतो. मग यालाच तेवढा त्याचा अभाव कसा ?' म्हणून म्हणाल तर श्रुति सांगते– 'एष सर्वेश्वरः-' ज्याअर्थीं हा सर्वेश्वर होत्साता कर्मांचेंही ईशन करण्याचें याचें शील आहे, त्यामुळें कर्मानें संबद्ध होत नाहीं. तसेंच 'एष भूताधिपतिः-' हा ब्रह्मादिस्तंबपर्यंत भूतांचा अधिपति आहे, असें हें पद उक्तार्थ आहे. म्हणजे याचा अर्थ वर सांगितला आहे.

एष भूतानां तेषामेव पालयिता रक्षिता । एष सेतुः । किंविशिष्ट इत्याह विधरणो वर्णाश्रमादिव्यवस्थाया विधारयिता । तदाहैषां भूरादीनां ब्रह्मलोकान्तानां लोकानामसंभेदायासंभिन्नमर्यादायै । परमेश्वरेण सेतुवदविधार्यमाणा लोकाः संभिन्नमर्यादाः स्युः । अतो लोकानामसंभेदाय सेतुभूतोऽयं परमेश्वरो यः स्वयंज्योतिरात्मैव । एवंवित्सर्वस्य वशीत्यादि ब्रह्मविद्यायाः फलमेतन्निर्दिष्टम् ॥

भाष्यार्थ—'एष भूतपालः-' हा त्याच भूतांचा पालन–रक्षण करणारा आहे. 'एष सेतुः' हा सेतु आहे. किंविशिष्ट सेतु आहे, तें श्रुति सांगते–'विधरणः-' वर्णाश्रमादिव्यवस्थेचें विधारण करणारा. ('त्याचें विधारयितृत्व कसें?') तें श्रुति सांगते—'एषां लोकानां असंभेदाय-' या भूरादि-ब्रह्मलोकान्त लोकांच्या असंभेदासाठीं–त्यांची मर्यादा संभिन्न होऊं नये, म्हणून हा विधरण सेतु आहे. सेतु–धरण जसा पाण्याला अडवून धरतो त्याप्रमाणें परमेश्वराकडून विशेषतः न धारण केले जाणारे लोक संभिन्नमर्याद होतील. त्यांची मर्यादा तुटेल. यास्तव लोकांच्या असंभेदासाठीं सेतुभूत असलेला हा परमेश्वर होय; कीं, जो स्वयंज्योति आत्माच आहे. असें जाणणारा सर्वांचा वशी होतो, इत्यादि हें ब्रह्मविद्येचें फळ सांगितलें आहे.

**तमेतं वेदानुवचनेन ब्राह्मणा विविदिषन्ति यज्ञेन दानेन तपसाऽनाशकेनैतमेव विदित्वा**

**मुनिर्भवति । एतमेव प्रव्राजिनो लोकमिच्छन्तः प्रव्रजन्ति॥**

अर्थ—त्या या औपनिषद पुरुषाला ब्राह्मण नित्य स्वाध्यायलक्षण वेदानुवचनानें तसेंच यज्ञ, दान, व अनाशक तप यानें जाणण्याची इच्छा करितात. यालाच जाणून मुनि होतो. याच आत्मलोकाची इच्छा करणारे संन्यसनशील पुरुष संन्यास करितात.

किंज्योतिरयं पुरुष इत्येवमादिषष्ठप्रपाठकविहितायामेतस्यां ब्रह्मविद्यायामेवंफलायां काम्यैकदेशवर्जितं कृत्स्नं कर्मकाण्डं तादर्थ्येन विनियुज्यते । तत्कथमित्युच्यते । तमेतमेवंभूतमौपनिषदं पुरुषं वेदानुवचनेन मन्त्रब्राह्मणाध्ययनेन नित्यस्वाध्यायलक्षणेन विविदिषन्ति वेदितुमिच्छन्ति । के । ब्राह्मणाः । ब्राह्मणग्रहणमुपलक्षणार्थम् । अविशिष्टो ह्यधिकारस्त्रयाणां वर्णानाम् । अथवा कर्मकाण्डेन मन्त्रब्राह्मणेन वेदानुवचनेन विविदिषन्ति । कथं विविदिषन्तीत्युच्यते यज्ञेनेत्यादि ॥

भाष्यार्थ—(सफल ज्ञानाचा अनुवाद करून विविदिषा वाक्य व्याख्यानासाठीं घेतात—) 'किंज्योतिरयं पुरुषः' इत्यादि षष्ठप्रपाठकांत विधान केलेल्या या अशा फळाच्या[1] ब्रह्मविद्येमध्यें काम्यकर्में या एकदेशाला सोडून बाकीच्या सर्व कर्मकांडाचा परंपरेनें ज्ञानोत्पत्तीच्या अंगत्वानें विनियोग केला जात आहे. तो कसा तेंच सांगितलें जातें— 'तमेतं' त्या या अशा प्रकारच्या औपनिषद पुरुषास 'वेदानुवचनेन-' नित्य स्वाध्यायलक्षण मंत्र-ब्राह्मणाध्ययनानें 'विविदिषन्ति-' जाणण्याची इच्छा करितात. कोण ? 'ब्राह्मणाः-' ब्राह्मण. येथें ब्राह्मणांचें ग्रहण उपलक्षणार्थ आहे. कारण तिन्ही वर्णांचा अधिकार समान आहे. (दुसरा पक्ष सांगतात—) अथवा कर्मकांडभूत मंत्रब्राह्मणरूप वेदानुवचनानें जाण्याची इच्छा करितात. कसें जाणण्याची इच्छा करितात ? तें 'यज्ञेन०' इत्यादि भागानें सांगितलें जातें.

---

१ 'सर्वस्य वशी' इत्यादि वाक्यानें सांगितलेल्या फलानें युक्त असलेल्या ब्रह्मविद्येमध्यें.

ये पुनर्मन्त्रब्राह्मणलक्षणेन वेदानुवचनेन प्रकाश्यमानं विविदिषन्तीति व्याचक्षते तेषामारण्यकमात्रमेव वेदानुवचनं स्यात् । न हि कर्मकाण्डेन पर आत्मा प्रकाश्यते । तं त्वौपनिषदमिति विशेषश्रुतेः । वेदानुवचनेनेति चाविशेषितत्वात्समस्तग्राहीदं वचनम् । न च तदेकदेशोत्सर्गो युक्तः ॥

भाष्यार्थ—(आतां भर्तृप्रपंचाच्या व्याख्यानाचा अनुवाद करून त्याचें प्रत्याख्यान करितात–) परंतु जे 'मंत्र-ब्राह्मणलक्षण वेदानुवचनानें प्रकाशित केलें जाणारें ब्रह्म जाणण्याची इच्छा करितात' असें याचें व्याख्यान करितात त्यांच्या मतीं नुस्तें आरण्यक हेंच वेदानुवचन ठरतें. कारण कर्मकांडाकडून पर आत्म्याचें प्रकाशन केलें जात नाहीं. कारण 'तं तु औपनिषदं पुरुषं' अशी विशेष श्रुति आहे. 'वेदानुवचनेन' असें सामान्यतः म्हटलेलें असल्यामुळें हें वचन समस्त वेदाचें ग्रहण करविणारें आहे. असें असतांना त्या वेदाच्या एकदेशाचा त्याग करणें युक्त नाहीं.

ननु त्वत्पक्षेऽप्युपनिषद्वर्जमित्येकदेशत्वं स्यात् । नाऽऽद्यव्याख्यानेऽविरोधादस्मत्पक्षे नैष दोषो भवति । यदा वेदानुवचनशब्देन नित्यः स्वाध्यायो विधीयते तदोपनिषदपि गृहीतवेति वेदानुवचनशब्दार्थैकदेशो न परित्यक्तो भवति ॥

भाष्यार्थ—(अहोपण 'एकदेशाचा त्याग' हा दोष तुमच्या व्याख्यानावरही येतो, अशी आशंका–) 'अहो पण तुमच्या पक्षींही 'उपनिषद्वर्ज' हें एकदेशत्व आहेच.' (कारण वेदानुवचन या शब्दानें उपनिषदाला सोडून बाकीच्या कर्मकांडाचें ग्रहण होतें; आणि जो दोष दोघांवर सारखाच येतो. त्याविषयीं एकालाच प्रश्न करणें युक्त नाहीं. सिद्धान्ती 'वेदानुवचन म्हणजे नित्यस्वाध्याय' हा पक्ष स्वीकारून या शंकेचें समाधान करितात–) असें नाहीं. पहिल्या व्याख्यानावर विरोध हा दोष येत नाहीं. त्यामुळें आमच्या पक्षीं हा दोष नाहीं. (तो कसा तें पहा–) जेव्हां वेदानुवचनशब्दानें नित्य स्वाध्यायाचें विधान केलें जातें

तेव्हां त्याबरोबर उपनिषदाचेंही ग्रहण होतेंच. त्यामुळें आमच्या पहिल्या व्याख्यानांत वेदानुवचन या शब्दाच्या अर्थाचा एकदेश सोड-लेला आहे, असें होत नाहीं.

यज्ञादिसहपाठाच्च । यज्ञादीनि कर्माण्येवानुक्रमिष्यन्वेदानुवचन-शब्दं प्रयुङ्क्ते । तस्मात्कर्मैव वेदानुवचनशब्देनोच्यत इति गम्यते । कर्म हि नित्यस्वाध्यायः ॥

भाष्यार्थ—('तुम्ही वेदानुवचन या शब्दाचीं वर दोन व्याख्यानें केलीं आहेत. एक नित्य स्वाध्यायलक्षण मंत्रब्राह्मणात्मक वेदानुवचन असें व दुसरें मंत्रब्राह्मणात्मक कर्मकांडरूप वेदानुवचन; त्यांतील पहिल्या व्याख्यानावर वेदाच्या एकदेशाचा त्याग हा दोष जरी येत नसला तरी दुसऱ्या व्याख्यानावर तो दोष येतो. त्यामुळें तुम्हांला त्या दुसऱ्या व्याख्यानाची उपेक्षाच करावी लागते, अशी आशंका घेऊन 'असें नाहीं. 'यज्ञेन०' इत्यादि विविदिषावाक्यांतील शेषवाक्यानें त्या व्याख्या-नाचीही अपेक्षा आहे, असें होतें,' असें समाधान करितात—) यज्ञादि-कांसह वेदानुवचनाचा पाठ आहे. यज्ञादि कर्मांचेंच विधान करावयास आरंभ करणारा वेद 'वेदानुवचन' हा शब्द योजीत आहे. त्यामुळें कर्मच वेदानुवचनशब्दानें सांगितलें जात आहे, असें कळतें. ('तर मग तुमच्या पहिल्या व्याख्यानामध्यें 'यज्ञेन दानेन' इत्यादि शेषवाक्याची उपपत्ति कशी लागते ?' अशी आशंका घेऊन सांगतात—) नित्यस्वा-ध्याय हें कर्मच आहे, हें प्रसिद्ध आहे.

कथं पुनर्नित्यस्वाध्यायादिभिः कर्मभिरात्मानं विविदिषन्ति । नैव हि तान्यात्मानं प्रकाशयन्ति यथोपनिषदः। नैष दोषः । कर्मणां विशु-द्धिहेतुत्वात् । कर्मभिः संस्कृता हि विशुद्धात्मानः शक्नुवन्त्यात्मान-मुपनिषत्प्रकाशितमप्रतिबन्धेन वेदितुम् । तथा ह्याथर्वणे "विशुद्धस-त्त्वस्ततस्तु तं पश्यते निष्कलं ध्यायमानः" इति । स्मृतिश्च "ज्ञान-मुत्पद्यते पुंसां क्षयात्पापस्य कर्मणः" इत्यादिः ॥

भाष्यार्थ—('वेदानुवचनादिकांना आत्मविविदिषेचें साधनत्व कसें?' असा आक्षेप घेतात--) 'अहो पण नित्यस्वाध्यायादि कर्मांच्या योगानें आत्म्याला जाणण्याची इच्छा कशी करितात ? कारण जशीं उपनिषदें आत्म्याचें स्वरूप प्रकाशित करितात त्याप्रमाणें स्वाध्यायादि कर्में आत्म्याला प्रकाशित करीत नाहींत.' (कर्में आत्म्याचीं साक्षात् प्रमाणें जरी नसलीं तरी परंपरेनें ज्ञानाला कारण होतात. यास्तव विविदिषाश्रुति विरुद्ध नाहीं, असें समाधान करितात–) हा दोष येत नाहीं. कर्मांना विशुद्धिहेतुत्व आहे. कर्मांनीं संस्कृत झालेले विशुद्धचित्त पुरुष उपनिषदांनीं प्रकाशित केलेल्या आत्म्याला प्रतिबंधावाचून जाणण्यास समर्थ होतात. आथर्वणांत 'नित्यादि कर्मांच्या अनुष्ठानामुळें विशुद्धचित्त झालेला पुरुष आत्म्याचें सदा चिंतन करीत होत्साता उपनिषदांनीं निष्कल–निरवयव आत्म्याला पाहतो.' असें म्हटलें आहे. 'पापकर्मांच्या क्षयानें पुरुषांना ज्ञान उत्पन्न होतें,' अशा अर्थाची स्मृतिही आहे. ('कषायपक्तिः कर्माणि ज्ञानं तु परमा गतिः' इत्यादि दुसरीं स्मृतिवचनेंही याविषयीं प्रमाण आहेत.)

कथं पुनर्नित्यानि कर्माणि संस्कारार्थानीत्यवगम्यते "स ह वा आत्मयाजी यो वेदेदं मेऽनेनाङ्गं संस्क्रियत इदं मेऽनेनाङ्गमुपधीयते" इत्यादिश्रुतेः । सर्वेषु च स्मृतिशास्त्रेषु कर्माणि संस्कारार्थान्येवाऽऽचक्षतेऽष्टाचत्वारिंशत्संस्कारा इत्यादिषु । गीतासु च "यज्ञो दानं तपश्चैव पावनानि मनीषिणाम् । सर्वेऽप्येते यज्ञविदो यज्ञक्षपितकल्मषाः।।" इति । यज्ञेनेति द्रव्ययज्ञा ज्ञानयज्ञाश्च संस्कारार्थाः । संस्कृतस्य च विशुद्धसत्त्वस्य ज्ञानोत्पत्तिरप्रतिबन्धेन भविष्यत्यतो यज्ञेन विविदिषन्ति।।

भाष्यार्थ—(नित्य कर्में संस्कारार्थ आहेत, याविषयीं प्रमाण विचारतात–) नित्य कर्में संस्कारार्थ आहेत, हें कसें बरें अवगत होतें ? (याविषयीं श्रुतिप्रमाण देतात–) 'तोच आत्मयाजी कीं जो हें माझें अंग या कर्मानें संस्कृत होतें, असें जाणतो, हें माझें अंग या कर्मानें

योग्य केलें जातें.' इत्यादि अर्थाची श्रुति त्याविषयीं प्रमाण आहे. सर्व स्मृतिशास्त्रांमध्यें कर्में संस्कारार्थच आहेत, असें सांगितलें आहे. (स्मृति-शास्त्र कोणतें ? तेंही सांगतात–) 'अष्टाचत्वारिंशत्संस्काराः' इत्यादि स्मृतिशास्त्रांत तें सांगितलें आहे. (गौतमानें गर्भाधानादि चाळीस संस्कार व सर्वभूतदया, क्षमा, अनसूया, शौच, अनायास, मांगल्य, अकार्पण्य व अस्पृहा हे आठ आत्मगुण सांगून यांच्या योगानें ब्रह्माचें सायुज्य प्राप्त होतें, असें म्हटलें आहे ) तसेंच भगवानांनीं गाइलेल्या उपनिषदांत म्ह० भगवद्गीतेंतही 'यज्ञ, दान व तप हीं कर्में विद्वानांना पावन करणारीं आहेत, हे सर्वही यज्ञवेत्ते यज्ञानें ज्यांचें पाप क्षय पावलें आहे, असे आहेत.' असें म्हटलें आहे.'यज्ञेन' या शब्दानें द्रव्ययज्ञ व ज्ञानयज्ञ घ्यावेत.ते दोन्ही प्रकारचे यज्ञ संस्कारार्थ आहेत;आणि संस्कृत विशुद्धचित्त पुरुषाच्या ज्ञानाची उत्पत्ति प्रतिबंधावाचून होते.म्हणून यज्ञानें जाणण्याची इच्छा करितात.

दानेन । दानमपि पापक्षयहेतुत्वाद्धर्मवृद्धिहेतुत्वाच्च । तपसा तप इत्यविशेषेण कृच्छ्रचान्द्रायणादिप्राप्तौ विशेषणमनाशकेनेति । कामानशनमनाशकं न तु भोजननिवृत्तिः । भोजननिवृत्तौ म्रियत एव नाऽऽत्मवेदनम् ॥

भाष्यार्थ—' दानेन-' दानानें जाणण्याची इच्छा करितात. ( 'अहो पण दान स्वतंत्रपणें विविदिषेचें कारण कसें ?'तें सांगतात–)कारण दानही पापाच्या क्षयाचें निमित्त आहे व धर्माच्या वृद्धीचेंही कारण आहे. त्यामुळें तें विविदिषेचें निमित्त आहे. ' तपसा-' तपानें, पण तपःशब्दानें सामान्यतः कृच्छ्रचांद्रायणादिकांची प्राप्ति झाली असतां त्याला ' अनाशकेन ' हें विशेषण दिलें आहे. कामानशन हेंच अनाशक होय. भोजनापासून निवृत्त होणें हें अनाशक नव्हे. कारण भोजननिवृत्ति

१ रागद्वेषरहित इंद्रियांनीं विषयांचें सेवन करणें व यदृच्छाभसंतुष्टत्व हें कामानशन आहे.

केल्यास प्राणी मरतोच. त्याला त्यानें आत्मवेदन-आत्मज्ञान-होत नाहीं.

वेदानुवचनयज्ञदानतपःशब्देन सर्वमेव नित्यं कर्मोपलक्ष्यते । एवं काम्यवर्जितं नित्यं कर्मजातं सर्वमात्मज्ञानोत्पत्तिद्वारेण मोक्षसाधनत्वं प्रतिपद्यते । एवं कर्मकाण्डेनास्यैकवाक्यतावगतिः ॥

भाष्यार्थ—( ' अहो पण येथें सांगितलेल्या वेदानुवचनादिकांचा ज्ञानामध्यें जरी विनियोग केलेला असला तरी त्यावरून सर्व नित्य कर्मांचाच त्यांत विनियोग केला आहे, असें कसें म्हणतां येईल ? ' अशी आशंका घेऊन सांगतात-) वेदानुवचन, यज्ञ, दान व तप या शब्दांवरून सर्वच नित्य कर्म उपलक्षित होतें; आणि अशी वस्तुस्थिति असल्यामुळें काम्यवर्जित सर्व नित्य कर्मजात आत्मज्ञानोपत्तीच्या द्वारा मोक्षसाधनत्वास प्राप्त होतें. (अशा रीतीनें कर्म परंपरेनें मोक्षाचें साधन आहे, असें ठरलें असतां कर्मकांड व ज्ञानकांड यांची एकवाक्यताही सिद्ध होते, असें सांगतात-) अशा प्रकारेंच कर्मकांडाशीं या ज्ञानकांडाची एकवाक्यता आहे, हें कळतें.

एवं यथोक्तेन न्यायेनैतमेवाऽऽत्मानं विदित्वा यथाप्रकाशितं मुनिर्भवति मननान्मुनिर्योगी भवतीत्यर्थः । एतमेव विदित्वा मुनिर्भवति नान्यम् । नन्वन्यवेदनेऽपि मुनित्वं स्यात्कथमवधार्यत एतमेवेति । बाढमन्यवेदनेऽपि मुनिर्भवेत् । किंत्वन्यवेदने न मुनिरेव स्यात्किं तर्हि कर्म्यपि भवेत्सः । एतं त्वौपनिषदं विदित्वा मुनिरेव स्यान्न तु कर्मी । अतोऽसाधारणं मुनित्वं विवक्षितमस्येत्यवधारयत्येतमेवेति । एतस्मिन्हि विदिते केन कं पश्येदित्येवं क्रियासंभवान्मननमेव स्यात् ॥

भाष्यार्थ—( ' एतमेव विदित्वा मुनिर्भवति ' या वाक्याचें व्याख्यान-) अशारीतीनें म्ह० वर सांगितलेल्या न्यायानें[१] याच आत्म्याला जाणून-त्याचें मोक्षप्रकरणांत मंत्र-ब्राह्मणांनीं जसें प्रकाशन केलें आहे त्या-

---

१ यज्ञादिकांच्या अनुष्ठानानें चित्तशुद्धि, तिच्या द्वारा जिज्ञासेची उत्पत्ति, गुरूपसदन व श्रवणादि या क्रमानें, असा भावार्थ.

प्रमाणें त्यास जाणून–मुनि होतो. मननामुळें मुनि–योगी होतो, असा भावार्थ. यालाच जाणून मुनि होतो, दुसऱ्याला जाणून नव्हे. ( याविषयीं आक्षेप–) ' अहो पण दुसऱ्याला जाणल्यानेंही मुनित्व होईल; मग 'एतमेव-' यालाच, असा निर्धार कसा केला जात आहे?' (समाधान–) खरें आहे, दुसऱ्याला जाणलें तरी मुनि होईल. पण अन्यज्ञानानें नुस्ता मुनिच होणार नाहीं तर तो कर्मीही होईल. पण या औपनिषद पुरुषाला जाणून मुनिच होईल. कर्मी केव्हांही होणार नाहीं. यास्तव येथें याचें असाधारण मुनित्व विवक्षित आहे. म्हणून ' एतमेव-' यालाच जाणून, असें अवधारण केलें आहे. कारण याला जाणलें असतां ' केन कं पश्येत्'या न्यायानें क्रियेचा असंभव होतो. त्यामुळें त्याचें मननच होतें.

किंचैतमेवाऽऽत्मानं स्वं लोकमिच्छन्तः प्रार्थयन्तः प्रव्राजिनः प्रव्रजनशीलाः प्रव्रजन्ति प्रकर्षेण व्रजन्ति सर्वाणि कर्माणि संन्यस्यन्तीत्यर्थः । एतमेव लोकमिच्छन्त इत्यवधारणान्न बाह्यलोकत्रयेप्सूनां पारिव्राज्येऽधिकार इति गम्यते । न हि गङ्गाद्वारं प्रतिपित्सुः काशीदेशनिवासी पूर्वाभिमुखः प्रैति । तस्माद्बाह्यलोकत्रयार्थिनां पुत्रकर्मापरब्रह्मविद्याः साधनम् । " पुत्रेणायं लोको जय्यो नान्येन कर्मणा " इत्यादिश्रुतेः । अतस्तदर्थिभिः पुत्रादिसाधनं प्रत्याख्याय न पारिव्राज्यं प्रतिपत्तुं युक्तम् । अतत्साधनत्वात्पारिव्राज्यस्य । तस्मादेतमेव लोकमिच्छन्तः प्रव्रजन्तीति युक्तमवधारणम् ॥

भाष्यार्थ—( याही कारणानें आत्मवेत्त्याला कर्मित्व नाहीं–) तसेंच, ' एतमेव लोकं-' याच आत्म्याला ' स्वं-' स्वलोकाला 'इच्छन्तः-'इच्छिणारे ' प्रव्राजिनः-' प्रव्रजनशील पुरुष ' प्रव्रजन्ति-' प्रकर्षेकरून–आधिक्यानें जातात–सर्व कर्मांचा संन्यास करितात, असा भावार्थ. ' एतमेव लोकमिच्छन्तः-' याच आत्मलोकाची इच्छा करणारे, असें अवधारण–निर्धार–केलेलें असल्यामुळें बाह्य तीन लोकांची इच्छा करणारांचा पारिव्राज्यामध्यें अधिकार नाहीं, असें सिद्ध होतें. कारण गंगाद्वारास–हरिद्वारास

जाण्याची इच्छा करणारा काशीनिवासी पुरुष पूर्वेकडे तोंड करून जाऊं लागत नाहीं. तस्मात् आत्मभिन्न बाह्य–हा लोक, पितृलोक व देवलोक अशा–लोकत्रयाची इच्छा करणारांना पुत्र, कर्म व अपर ब्रह्म-विद्या -उपासना हें साधन आहे.( ज्याप्रमाणें स्वर्गेच्छूचा स्वर्गसाधनभूत यागामध्यें अधिकार असतो त्याप्रमाणें लोकत्रयाची इच्छा करणारांचाही तत्साधनभूत पुत्रादिकांविषयीं अधिकार आहे, असा भावार्थ. पुत्रादिक हें बाह्य लोकांचें साधन आहे, याविषयीं प्रमाण–) 'पुत्रेणायं लोको जय्यो नान्येन कर्मणा०-' पुत्रानेंच हा लोक संपादन करतां येणें शक्य आहे, अन्य कर्मानें नाहीं, कर्मानें पितृलोक व विद्येनें देवलोक, अशी याविषयीं श्रुति आहे. यास्तव त्या लोकत्रयाची इच्छा करणारांनीं पुत्रादि साधनांचें प्रत्याख्यान करून–परित्याग करून पारिव्राज्य स्वीकारणें युक्त नव्हे. कारण पारिव्राज्य हें लोकत्रयाचें साधनच नव्हे. तस्मात्[1] याच लोकाची इच्छा करणारे प्रव्रजन करितात हें अवधारण युक्तच आहे.

आत्मलोकप्राप्तिर्ह्यविद्यानिवृत्तौ स्वात्मन्यवस्थानमेव । तस्मादात्मानं चेल्लोकमिच्छति यस्तस्य सर्वक्रियोपरम एवाऽऽत्मलोकसाधनं मुख्यम-न्तरङ्गम् । यथा पुत्रादिरेव बाह्यलोकत्रयस्य । पुत्रादिकर्मण आत्मलोकं प्रत्यसाधनत्वात् ॥ असंभवेन च विरुद्धत्वमवोचाम । तस्मादात्मानं लोकमिच्छन्तः प्रव्रजन्त्येव सर्वक्रियाभ्यो निवर्तेरन्नेवेत्यर्थः ॥

भाष्यार्थ—( 'अहो पण आत्मलोक हें स्वरूपच असल्यामुळें सदा प्राप्तच आहे. तेव्हां त्या प्राप्त वस्तूविषयीं इच्छा कशी संभवते ?' अशी आशंका घेऊन सांगतात–) अविद्येची निवृत्ति झाली असतां स्वरूपांत अवस्थान होणें, हीच आत्मलोकप्राप्ति आहे.[अर्थात् आत्मलोकाला आत्मत्व असल्यामुळें तो नित्य प्राप्त जरी असला तरी अविद्येनें आच्छादित झा-लेला असल्यामुळें त्याच्या प्राप्तीची इच्छा संभवते. 'पण त्याचें साधन काय ?' तें सांगतात–] तस्मात् म्ह० अविद्यावशात्–आत्मप्राप्तीची

1 लोकत्रयार्थी लोकांचा पारिव्राज्यामध्यें अधिकार नसल्यामुळें.

इच्छा संभवत असल्यामुळें जर कोणी आत्मलोकास इच्छीत असेल तर त्याला सर्व क्रियांचा त्याग हेंच मुख्य अन्तरंग आत्मलोकसाधन आहे. जसें पुत्रादिकच बाह्य लोकत्रयाचें साधन [ तसें पारिव्राज्यच आत्मलोकाचें साधन आहे. ] कारण पुत्रादि कर्मांचा अन्यत्र विनियोग केलेला असल्यामुळें त्याला आत्मलोकाचें साधनत्व नाहीं.

('यद्यपि केवल पुत्रादिक कर्म हें आत्मलोक देणारें नाहीं तरी पारिव्राज्यसमुच्चित पुत्रादिक हें आत्मलोकप्रापक होईल,' अशी आशंका घेऊन सांगतात–) पारिव्राज्यामध्यें पुत्रादिकांचा संभव नाहीं, व पुत्रादिप्रसंगीं पारिव्राज्याचा संभव नाहीं, त्यामुळें म्ह० दोघांचा एकत्र संभव नसल्यामुळें पारिव्राज्य व कर्में यांना विरुद्धत्व आहे असें आम्हीं सांगितलें आहे. तस्मात् आत्मा या लोकाची इच्छा करणारे प्रव्रजनच करितात–ज्यांनीं सर्व क्रियांपासून निवृत्तच व्हावें, असा भावार्थ.

यथा च बाह्यलोकत्रयार्थिनः प्रतिनियतानि पुत्रादीनि साधनानि विहितान्येवमात्मलोकार्थिनः सर्वैषणानिवृत्तिः पारिव्राज्यं ब्रह्मविदो विधीयत एव ॥

भाष्यार्थ—( 'अहो पण 'प्रव्रजन्ति' असा येथें वर्तमानकाळीं प्रयोग केलेला असल्यामुळें हा विधि नव्हे,' अशी आशंका घेऊन 'अग्निहोत्रं जुहोति-' याला जसा विधि मानतात तसाच 'प्रव्रजन्ति' हाही विधि आहे, असें सांगतात–) ज्याप्रमाणें बाह्य लोकत्रयार्थी पुरुषांना पुत्रादि हीं त्या त्या लोकाला नियत साधनें विहित आहेत त्याप्रमाणें आत्मलोकार्थी ब्रह्मवेत्त्याला सर्व-एषणानिवृत्ति हें पारिव्राज्य विहितच आहे.

**एतद्ध स्म वै तत्पूर्वे विद्वाꣳसः प्रजां न कामयन्ते किं प्रजया करिष्यामो येषां नोऽयमात्माऽयं लोक इति ॥**

अर्थ—पारिव्राज्याविषयीं हें तें कारण–खरोखर भूतकालीन आत्मज्ञ प्रजा, कर्म व उपासना यांची इच्छा करीत नाहींत. कारण प्रजा या

साधनानें आम्ही कोणतें फळ मिळविणार ? कीं ज्या आमचा आत्मा हाच लोक आहे. आम्हांला आत्मा हेंच प्राप्तव्य फळ अभिप्रेत आहे.

कुतः पुनस्त आत्मलोकार्थिनः प्रव्रजन्त्येवेत्युच्यते । तत्रार्थवादवाक्यरूपेण हेतुं दर्शयति । एतद्ध स्म वै तत् । तदेतत्पारिव्राज्ये कारणमुच्यते । ह स्म वै किल पूर्वेऽतिक्रान्तकालीना विद्वांस आत्मज्ञाः प्रजां कर्मापरब्रह्मविद्यां च । प्रजोपलक्षितं हि त्रयमेतद्बाह्यलोकत्रयसाधनं निर्दिश्यते प्रजामिति । प्रजां किं । न कामयन्ते । पुत्रादिलोकत्रयसाधनं नानुतिष्ठन्तीत्यर्थः ॥

भाष्यार्थ—( पारिव्राज्यविधि सांगून त्याला अपेक्षित असलेला अर्थवाद आकांक्षापूर्वक उत्थापित करितात—) पण ते आत्मलोकार्थी प्रव्रजनच कोणत्या कारणानें करितात तें सांगितलें जातें. त्याविषयीं अर्थवादवाक्यरूपानें श्रुति हेतु प्रदर्शित करते. 'एतद्ध स्म वै तत्-' तें हें पारिव्राज्याविषयीं कारण सांगितलें जातें. 'ह स्म वै-' खरोखर 'पूर्वे-' अतिक्रान्तकालीन—भूतकालचे 'विद्वांसः' आत्मज्ञ 'प्रजां-' प्रजा, कर्म व अपरब्रह्मविद्या; 'प्रजां' या पदानें प्रजोपलक्षित असें हें त्रिविध बाह्य लोकत्रयसाधन सांगितलें जातें. प्रजेचें काय करितात ? प्रजेची कामना करीत नाहींत. ह्मणजे पुत्रादि लोकत्रयाच्या साधनांचें अनुष्ठान करीत नाहींत, असा भावार्थ.

नन्वपरब्रह्मदर्शनमनुतिष्ठन्त्येव । तद्बलाद्धि व्युत्थानम् । नापवादात् । ब्रह्म तं परादाद्योऽन्यत्राऽऽत्मनो ब्रह्म वेद सर्वं तं परादादित्यपरब्रह्मदर्शनमप्यपवदत्येव । अपरब्रह्मणोऽपि सर्वमध्यान्तर्भावात् । यत्र नान्यत्पश्यतीति च । पूर्वापरबाह्यान्तरदर्शनप्रतिषेधाच्चापूर्वमनपरमनन्तरमबाह्यमिति । तत्केन कं पश्येद्विजानीयादिति च । तस्मान्नाऽऽत्मदर्शनव्यतिरेकेणान्यद्व्युत्थानकारणमपेक्षते ॥

भाष्यार्थ—( पूर्वींचे विद्वान् साधनत्रयाचें अनुष्ठान करीत नसत, असें जें म्हटलें आहे, त्याविषयीं आक्षेप घेतात—) अहोपण ते पूर्वींचे

विद्वान्‌ही अपर ब्रह्मदर्शनाचें अनुष्ठान करितातच. ( ' पण एषणांचा त्याग करणारांना त्याच्या अनुष्ठानाचा काय उपयोग ? ' अशी आशंका घेऊन सांगतात— ) त्या अनुष्ठानाच्या बळानेंच एषणांपासून व्युत्थान होतें. ( आत्मवेत्त्यांना अपरविद्येचें अनुष्ठान योग्य नाहीं, असें दूषण देतात— ) तसें नाहीं. कारण त्याचा निषेध केलेला आहे. ' ब्रह्म त्याला पराकृत करतें कीं जो ' ब्रह्म आत्म्याहून अन्य आहे ' असें जाणतो. सर्व त्याला पराकृत करतें ' इत्यादि श्रुति अपर ब्रह्मदर्शनाचाही अपवाद— निषेध—करतेच. कारण सर्वांमध्यें अपर ब्रह्माचाही अन्तर्भाव होतो. ( त्याविषयींच दुसरी श्रुति— ) ' ज्या अवस्थेंत दुसरें पहात नाहीं, ' अशीही श्रुति आहे. ( ' ज्या भूमब्रह्मामध्यें स्थित झालेला पुरुष चक्षुरादि इंद्रियांनीं दुसरें कांहीं पहात, ऐकत वगैरे नाहीं ' इत्यादि अर्थाच्या श्रुतीनें दर्शनादिव्यवहाराचें निवारण केलेलें असल्यामुळें आत्मवेत्त्याचें अपरब्रह्मदर्शनही युक्त नव्हे, असा भावार्थ. ) तसेंच, ' अपूर्वं, अनपरं, अनन्तरं, अबाह्यं ' अशारीतीनें पूर्व, अपर, बाह्य व अन्तर दर्शनाचा प्रतिषेधही केलेला आहे. ' त्यावेळीं कोणत्या साधनानें कोणाला पाहणार, कोणाला जाणणार ' असेंही म्हटलें आहे. तस्मात् आत्मदर्शनाला सोडून दुसरें कोणतेंही एषणांपासून व्युत्थानाचें कारण अपेक्षित नाहीं. ( आत्मदर्शन हेंच व्युत्थानाचें कारण आहे. त्यावाचून दुसऱ्या कारणाची अपेक्षा नाहीं. )

कः पुनस्तेषामभिप्राय इत्युच्यते किं प्रयोजनं फलं साध्यं करिष्यामः प्रजया साधनेन । प्रजा हि बाह्यलोकसाधनं निर्ज्ञाता । स च बाह्यलोको नास्त्यस्माकमात्मव्यतिरिक्तः । सर्वं ह्यस्माकमात्मभूतमेव सर्वस्य च वयमात्मभूताः । आत्मा च न आत्मत्वादेव न केनचित्साधनेनोत्पाद्य आप्यो विकार्यः संस्कार्यो वा । यदप्यात्मयाजिनः संस्कारार्थं कर्मेति तदपि कार्यकरणात्मदर्शनविषयमेव । इदं मेऽनेनाङ्गं संस्क्रियत इत्यङ्गाङ्गित्वादिश्रवणात् । न हि विज्ञानघनैकरसनैरन्तर्यद-

र्शिनोऽङ्गाङ्गिसंस्कारोपधानदर्शनं संभवति। तस्मान्न किंचित्प्रजादिसाधनैः करिष्यामः ॥

भाष्यार्थ—( पुत्रादि साधनत्रयाचें अनुष्ठान न करणाऱ्या त्या लोकांचा अभिप्राय प्रश्नपूर्वक सांगतात–) वरील साधनत्रयाचें अनुष्ठान न करण्यांत त्यांचा काय बरें अभिप्राय असतो ? तेंच 'किं प्रजया करिष्यामः' इत्यादि वाक्यानें सांगितलें जातें–'किं-' कोणतें प्रयोजन–फल–साध्य 'प्रजया-' प्रजा या साधनानें 'करिष्यामः-' आम्ही संपादन करणार ( 'अहो कैवल्य हेंच त्या साधनानें साध्य होणारें फल आहे,' म्हणून म्हणाल तर सांगतों–) प्रजा बाह्य लोकाचें साधन म्हणून वर ज्ञात झालेली आहे; आणि तो बाह्य लोक आम्हांला आत्म्याहून व्यतिरिक्त नाहीं. कारण आम्हांला सर्व आत्मभूतच आहे; व आम्ही सर्वांचे आत्मभूत आहों; आणि आमचा आत्मा तर आत्मत्वामुळेंच कोणत्याही साधनानें उत्पाद्य, आप्य, विकार्य किंवा संस्कार्य नाहीं. 'आतां कर्म आत्मयाजी पुरुषाच्या संस्कारार्थ आहे,' असें जें मानलेलें आहे तेंही शरीरेंद्रियसमूहाला आत्मा समजणें, या प्रत्ययाला अनुलक्षूनच होय. कारण तसें सांगणाऱ्या श्रुतिवचनांत 'हें माझें अंग या कर्मांकडून संस्कृत केलें जातें' असें अंगांगित्व श्रुत आहे. विज्ञानघनैकरसनैरन्तर्य पाहणाऱ्या पुरुषानें अंगांगिसंस्कारोपधान पहाणें संभवत नाहीं. ( आत्मा अखंड विज्ञानैकरस आहे असें जाणणारा पुरुष 'हें माझें अंग, त्याला संस्कृत करणारें हें कर्म,' इत्यादि भावनाच करीत नाहीं.) तस्मात् प्रजादि साधनांनीं आम्ही कांहीं साध्य संपादन करीत नाहीं.

अविदुषां हि तत्प्रजादिसाधनैः कर्तव्यं फलम्। न हि मृगतृष्णिकायामुदकपानाय तदुदकदर्शी प्रवृत्त इति तत्रोषरमात्रमुदकाभावं पश्यतोऽपि प्रवृत्तिर्युक्ता। एवमस्माकमपि परमार्थात्मलोकदर्शिनां प्रजादिसाधनसाध्ये मृगतृष्णिकादिसमेऽविद्वद्दर्शनविषये न प्रवृत्तिर्युक्तेत्यभिप्रायः॥

भाष्यार्थ—( तर प्रजादिकांच्या योगानें साध्य फळ कोणाला असतें ? तें सांगतात–) अविद्वानांनाच प्रजादि साधनांच्या योगानें साध्य

फळ असतें. मृगजळाचे ठिकाणीं हें उदक आहे, असें जाणणारा उदक प्राशन करावयास प्रवृत्त होतो, म्हणून तेथें केवळ माळ जमिन आहे, जलाचा एक बिंदुही नाहीं, असें जाणणाराही जलप्राशनास प्रवृत्त होईल, हें संभवत नाहीं. याचप्रमाणें परमार्थ आत्मलोकदर्शी अशा आमचीही अविद्वानांच्या ज्ञानाचा विषय व त्यामुळेंच मृगजला-सारख्या प्रजादि साधनांच्या साध्यामध्यें प्रवृत्ति होणें युक्त नव्हे, असा अभिप्राय.

तदेतदुच्यते येषामस्माकं परमार्थदर्शिनां नोऽयमात्माऽशनायादिवि-निर्मुक्तः साध्वसाधुभ्यामविकार्योऽयं लोकः फलमभिप्रेतम् । न चा-स्याऽऽत्मनः साध्यसाधनादिसर्वसंसारधर्मविनिर्मुक्तस्य साधनं किंचि-देषितव्यम् । साध्यस्य हि साधनान्वेषणा क्रियते । असाध्यस्य साध-नान्वेषणायां हि जलबुद्ध्या स्थल इव तरणं कृतं स्यात् । खे वा शाकुनपदान्वेषणम्।तस्मादेतमात्मानं विदित्वा प्रव्रजेयुरेव ब्राह्मणा न क-र्माऽऽरभेरन्नित्यर्थः।यस्मात्पूर्वे ब्राह्मणा एवं विद्वांसः प्रजामकामयमानाः॥

भाष्यार्थ—( याच अर्थी ' येषां नोऽयमात्मायं लोकः ' हें श्रुति-वाक्य घेऊन त्याचें व्याख्यान करितात—; तेंच हें सांगितलें जातें—'येषां नः-' ज्या आम्हां परमार्थदर्शी पुरुषांचा ' अयं आत्मा-' हा अशनाया-दिरहित, साधु व असाधु कर्मानें अविकार्य आत्मा ' अयं लोकः-' हा लोक—फल अभिप्रेत आहे. साध्य-साधनादि सर्व संसारधर्मापासून वि-निर्मुक्त असलेल्या आत्म्याचें कांहीं साधन आहे, असें समजणें युक्त नव्हे. जें साध्य असतें त्याच्याच साधनाची अन्वेषणा—शोध—केली जाते. पण असाध्य वस्तूच्याही साधनाची अन्वेषणा करूं लागल्यास स्थला-वरही—येथें जल आहे, अशा भावनेनें—पोहूं लागल्यासारखें होईल. आकाशांत पक्ष्यांचीं पावलें उमटलेलीं आहेत कीं काय, असें पाहण्या-सारखें आहे. 'तस्मात्' या आत्म्याला जाणून ब्राह्मणांनीं प्रव्रजनच क-रावें, कर्मांचा आरंभ करूं नये, असा याचा भावार्थ. ज्याअर्थीं असें

जाणणारे पूर्वीचे ब्राह्मण प्रजेची कामना न करणारे असे होते ( त्याअर्थी हल्लींच्या मुमुक्षु ब्राह्मणांनींही प्रव्रजनच करावें. )

ते ह स्म पुत्रैषणायाश्च वित्तैषणायाश्च लोकै-
षणायाश्च व्युत्थायाथ भिक्षाचर्यं चरन्ति या
ह्येव पुत्रैषणा सा वित्तैषणा या वित्तैषणा
सा लोकैषणोभे ह्येते एषणे एव भवतः ॥

अर्थ—याप्रमाणें साध्य-साधनव्यवहाराची निंदा करणारे ते खरोखर पुत्रैषणा, वित्तैषणा व लोकैषणा यांपासून व्युत्थान करून भिक्षाचर्य करितात. जी पुत्रैषणा ती वित्तैषणा, जी वित्तैषणा तीच लोकैषणा; ह्या दोन्ही एषणाच आहेत.

त एवं साध्यसाधनसंव्यवहारं निन्दन्तोऽविद्वद्विषयोऽयमिति कृत्वा किं कृतवन्त इत्युच्यते । ते ह स्म किल पुत्रैषणायाश्च वित्तैषणायाश्च लोकैषणायाश्च व्युत्थायाथ भिक्षाचर्यं चरन्तीत्यादि व्याख्यातम् । तस्मादात्मानं लोकमिच्छन्तः प्रव्रजन्ति प्रव्रजेयुरित्येष विधिरर्थवादेन संगच्छते ॥

भाष्यार्थ—( 'ते ह स्म-' इत्यादि पुढील वाक्य प्रश्नद्वारा घेऊन त्याच्या पांचव्या अध्यायांतील व्याख्यानाचें स्मरण देतात. कारण हेंच वाक्य पांचव्या म्ह० तिसऱ्या अध्यायांतही आलें आहे.—) 'ते-' हा अविद्वानांचा विषय आहे, असें समजून अशारीतीनें साध्य-साधनसंव्यवहाराची निंदा करणारे ते ब्राह्मण काय करते झाले, तें सांगितलें जातें. 'ते' ब्राह्मण 'ह स्म-' खरोखर 'पुत्रैषणायाश्च वित्तैषणायाश्च लोकैषणायाश्च व्युत्थायाथ भिक्षाचर्यं चरन्ति-' या वाक्याचें व्याख्यान वर केलें आहे. ( बृहदा. अ. ३ पृ. १३५–४० पहा ) तस्मात् आत्मा या लोकाची इच्छा करणारे प्रव्रजन करितात—त्यांनीं प्रव्रजन करावें, हा विधि अर्थवादानें सुसंगत होतो.

न हि सार्थवादस्यास्य लोकस्तुत्याऽऽभिमुख्यमुपपद्यते । प्रव्रजन्तीत्यस्यार्थवादरूपो ह्येतद्ध स्मेत्यादिरुत्तरो ग्रन्थः । अर्थवादश्चेन्नार्थवादान्तरमपेक्षेत । अपेक्षते त्वेतद्ध स्मेत्याद्यर्थवादं प्रव्रजन्तीत्येतत् । यस्मात्पूर्वे विद्वांसः प्रजादिकर्मभ्यो निवृत्ताः प्रव्रजितवन्त एव तस्मादधुनातना अपि प्रव्रजन्ति प्रव्रजेयुरित्येवं संबध्यमानं न लोकस्तुत्यभिमुखं भवितुमर्हति । विज्ञानसमानकर्तृकत्वोपदेशादित्यादिनाऽवोचाम ॥

भाष्यार्थ—( 'हा आत्मलोक महा प्रभावशाली आहे. कारण त्याची इच्छा करणारे साधक दुष्कर असलेलें पारिव्राज्यही करितात-' अशी येथें स्तुति विवक्षित आहे. हा विधि नव्हे, अशी आशंका घेऊन सांगतात–) अर्थवादासह असलेल्या या वाक्याला लोकस्तुतीनें अभिमुखत्व उपपन्न होत नाहीं. कारण ' प्रव्रजन्ति ' याचा ' एतद्ध स्म वै० ' इत्यादि उत्तर ग्रंथ हा अर्थवादरूप आहे. पण ' प्रव्रजन्ति ' हा जर अर्थवाद असता तर त्याला दुसऱ्या अर्थवादाची अपेक्षा नव्हती. पण ' प्रव्रजन्ति ' हें ' एतद्ध स्म वै० ' इत्यादि अर्थवादाची अपेक्षा तर करीत आहे. ज्याअर्थीं पूर्वीचे विद्वान् प्रजादिकर्मांपासून निवृत्त होत्साते प्रव्रजनच करते झाले त्याअर्थीं अलीकडील विद्वान्ही प्रव्रजन करतात–त्यांनीं प्रव्रजन करावें, असें संबद्ध होणारें वाक्य लोकस्तुत्यर्थ असणें संभवत नाहीं. शिवाय 'विदित्वा व्युत्थाय भिक्षाचर्यं चरन्ति-' (अ.३ पृ.१४८) या वाक्याचें व्याख्यान करतांना पूर्वीं विज्ञान व व्युत्थानादि यांचा कर्ता समान–एकच आहे, असा उपदेश केलेला असल्यामुळें विज्ञानाप्रमाणें व्युत्थानही येथें विहित आहे, असें सांगितलें आहे. (त्याच न्यायानें व्युत्थानाचाच दुसरा पर्याय असें येथील हें पारिव्राज्य विधेय आहे, त्याचें विधान आहे. तो विधि आहे, अर्थवाद नव्हे, असें समजावें.)

वेदानुवचनादिसहपाठाच्च । यथाऽऽत्मवेदनसाधनत्वेन विहितानां वेदानुवचनादीनां यथार्थत्वमेव नार्थवादत्वं तथा तैरेव सह पठितस्य पारिव्राज्यस्याऽऽत्मलोकप्राप्तिसाधनत्वेनार्थवादत्वमयुक्तम् ॥

भाष्यार्थ—वेदानुवचन, यज्ञ, दान, तप यांसह प्रव्रजनाचा पाठ असल्यामुळेंही तो विधिच आहे, अर्थवाद नव्हे. ज्याप्रमाणें आत्मज्ञानाच्या साधनत्वानें—साधन या रूपानें—विहित असलेल्या वेदानुवचनादिकांना यथार्थत्वच आहे, अर्थवादत्व नाहीं त्याप्रमाणें त्यांच्या बरोबर पठित असलेल्या पारिव्राज्याला आत्मलोकाच्या प्राप्तीचें साधनत्व आहे;व त्याला साधनत्व असल्यामुळें अर्थवादत्व असणें युक्त नाहीं.

फलविभागोपदेशाच्च । एतमेवाऽऽत्मानं लोकं विदित्वेत्यन्यस्माद्बाह्याल्लोकादात्मानं फलान्तरत्वेन प्रविभजति । यथा पुत्रणैवायं लोको जय्यो नान्येन कर्मणा कर्मणा पितृलोक इति ॥

भाष्यार्थ—( पारिव्राज्य विधेयच आहे, याविषयीं आणखी हेतु सांगतात—) तसाच श्रुतीनें फलाच्या विभागाचा उपदेश केला आहे. [ म्हणजे पुत्रादि साधनांनीं साध्य होणाऱ्या फलाहून पारिव्राज्यानें साध्य होणारें फळ निराळें सांगितलें आहे. त्यामुळें पुत्रादिक जसें विधेय आहे तसें पारिव्राज्यही विधेय आहे, असा भावार्थ. ] ‘ याच आत्मलोकास जाणून ’ असें म्हणून अन्य बाह्य लोकांहून आत्म्याला फलान्तर या रूपानें श्रुति विभक्त करते. ज्याप्रमाणें ‘ पुत्रानेंच हा लोक जय्य—जिंकण्यास शक्य आहे अन्य कर्मानें नाहीं, कर्मानें पितृलोक०’ इत्यादि वाक्यांत पुत्राचें मनुष्यलोक हें फळ, कर्माचें पितृलोक हें फल सांगितलेलें असल्यामुळें पुत्र, कर्म, अपर विद्या हीं विधेय आहेत ( त्याप्रमाणें ‘ या प्रकृत स्वात्म-लोकाला आपाततः जाणून त्यालाच साक्षात् जाणण्याची इच्छा करणारे प्रव्रजन करितात ’ असें वचन असल्यामुळें पुत्रादिकांच्या फलाहून ज्याचें फल अगदीं निराळें आहे असें पारिव्राज्य पुत्रादिकांप्रमाणेंच विधेय आहे. असा भावार्थ. )

न च प्रव्रजन्तीत्येतत्प्राप्तवल्लोकस्तुतिपरम् । प्रधानवच्चार्थवादापेक्षम् । सकृच्छ्रुतं स्यात् । तस्माद्भ्रान्तिरेवैषा लोकस्तुतिपरमिति ॥

भाष्यार्थ—( पारिव्राज्य स्तुतिपर नाहीं, याविषयीं हेतु–) ' वायु ही मोठी वेगवती देवता आहे ' असें एक अर्थवादवाक्य आहे; त्यांत वायूचें वेगवत्त्व प्रत्यक्ष प्रमाणानें प्राप्त–सिद्ध आहे. त्यामुळें त्याच्या योगानें वायुदेवतेची स्तुति होते. म्हणून तो अर्थवाद आहे, असें म्हणतां येतें. पण ' प्रव्रजन्ति ' हें इतर प्रामाणांनीं प्राप्त नाहीं. त्यामुळें तें लोकस्तुतिपर नाहीं. तसेंच तें पारिव्राज्य दर्श-पौर्णमासादि इतर प्रधान कर्मांप्रमाणें अर्थवादाची अपेक्षा करणारें आहे. तसेंच पारिव्राज्याला जर अर्थवादत्व असतें तर त्याचें श्रवण एकदाच झालें असतें; पण तें एकदाच श्रुत नसून ' प्रव्रजन्ति, प्रजां न कामयन्ते, व्युत्थाय भिक्षाचर्यं चरन्ति ' असें वारंवार श्रुत आहे; त्यामुळेंही तें विहित आहे. तस्मात् 'प्रव्रजन्ति 'हें आत्मलोकस्तुतिपर आहे,हें म्हणणें ही शुद्ध भ्रांतिच आहे.

न चानुष्ठेयेन पारिव्राज्येन स्तुतिरुपपद्यते । यदि पारिव्राज्यमनुष्ठेयमपि सदन्यस्तुत्यर्थं स्याद्दर्शपूर्णमासादीनामप्यनुष्ठेयानां स्तुत्यर्थता स्यात् । न चान्यत्र कर्तव्यतैतस्माद्विषयान्निर्ज्ञाता यत इह स्तुत्यर्थो भवेत् । यदि पुनः कचिद्विधिः परिकल्प्येत पारिव्राज्यस्य स इहैव मुख्यो नान्यत्र संभवति ॥

भाष्यार्थ—( तर मग पारिव्राज्य विधेयही असो व स्तावकही असो, म्हणून म्हणाल तर तेंही बरोबर नाहीं, असें सांगतात–) अनुष्ठेय असलेल्या पारिव्राज्यानें स्तुति होणें अनुपपन्न आहे. कारण पारिव्राज्य अनुष्ठेय असून जर अन्य स्तुतिपरही असेल तर दर्श-पूर्णमासादि इतर अनुष्ठेय कर्मांनाही स्तुत्यर्थत्व आहे असें म्हणावें लागेल. ( ' यज्ञादिकांप्रमाणें पारिव्राज्याचें विधान अन्यत्र असो; पण येथें स्तुतिच आहे, ' म्हणून म्हणाल तर सांगतों–) या आत्मज्ञानाख्य विषयाला सोडून दुसऱ्या कोठेंही पारिव्राज्याची कर्तव्यता चांगलीशी ज्ञात झालेली नाहीं कीं ज्यामुळें येथें त्याला स्तुत्यर्थ म्हणतां येईल.. पारिव्राज्याचा विधि जर कोठें परिकल्पावयाचा असेल तर तो येथेंच मुख्य होय. दुसऱ्या प्रक्रि-

येत तो संभवत नाहीं. (कारण कर्माधिकारामध्येंच त्याच्या त्यागाचा विधि असणें विरुद्ध आहे, असा भावार्थ. )

यदप्यनधिकृतविषये पारिव्राज्यं परिकल्प्यते तत्र वृक्षाद्यारोहणाद्यपि पारिव्राज्यवत्कल्प्येत । कर्तव्यत्वेनानिर्ज्ञातत्वाविशेषात् । तस्मात्स्तुतित्वगन्धोऽप्यत्र न शक्यः कल्पयितुम् ॥

भाष्यार्थ—(अहोपण पारिव्राज्याविषयीं विधि जरी असला तरी ज्यांना कोणत्याच कर्माचा अधिकार नाहीं त्यांना उद्देशून तो आहे, अशी आशंका घेऊन सांगतात–) आतां पारिव्राज्य हें अनधिकृत पुरुषांना उद्देशून आहे, असें जें कल्पिलें जातें [तेंही बरोबर नाहीं. कारण तसें मानल्यास] त्या कर्माचा अधिकारी नसलेल्या पुरुषाचे ठिकाणीं पारिव्राज्याप्रमाणें वृक्षादिकांवर आरोहण करणें–चढणें इत्यादिकांचीही कल्पना केली जाईल. कारण कर्तव्य या रूपानें चांगलें ज्ञात झालेलें नसणें हें दोन्ही ठिकाणीं समान आहे. [म्ह० कर्माचा ज्यांना अधिकार नाहीं, अशा अंध, पंगु इत्यादिकांनीं वृक्षांवर आरोहण करावें इत्यादि जसें अवश्य कर्तव्य म्हणून ज्ञात झालेलें नसतें त्याप्रमाणें त्यांनीं पारिव्राज्यही करावें, असें ज्ञात झालेलें नसतें. त्यामुळें श्रुतिविहित पारिव्राज्य अनधिकृतविषय आहे, असें मानल्यास त्यांना उद्देशून वृक्षारोहणादिकही कल्पिलें जाईल. कारण मग अधिकार, योग्यता, शक्याशक्यता इत्यादि पाहण्याची आवश्यकताच नाहीं.] तस्मात् या ठिकाणीं स्तुतित्वाच्या गंधाचीही कल्पना करतां येणें शक्य नाहीं.

स एष नेति नेत्यात्माऽगृह्यो न हि गृह्यतेऽशीर्यो न हि शीर्यतेऽसङ्गो न हि सज्यतेऽसितो न व्यथते न रिष्यत्येतमु हैवैते न तरत इत्यतः पापमकरवमित्यतः कल्याणमकरवमित्युभे उ हैवैष एते तरति नैनं कृताकृते तपतः॥२२॥

अर्थ--तो हा 'नेति नेति' अशा रीतीनें निर्देश केला गेलेला आत्मा अगृह्य आहे, त्याचें ग्रहण केलें जात नाहीं; अशीर्य आहे, त्याचा नाश होत नाहीं; असंग आहे, तो आसक्त होत नाहीं. तो अबद्ध आहे; व्यथा पावत नाहीं; हिंसा पावत नाहीं. असें जाणणाऱ्या ब्रह्मज्ञालाच हीं दोन्ही प्राप्त होत नाहींत, हें योग्यच आहे. शरीरधारणेच्या निमित्तानें मीं पाप केलें, असा पश्चात्ताप व त्यासाठींच पुण्य केलें, असा हर्ष त्याला होत नाहीं. तो ब्रह्मज्ञ पुण्य व पाप या दोघांचेंही उल्लंघन करून जातो. केलेलें व न केलेलें नित्यानुष्ठान त्याला फलदानानें व प्रत्यवायोत्पादनानें ताप देत नाहीं. २२

यद्ययमात्मा लोक इष्यते किमर्थं तत्प्राप्तिसाधनत्वेन कर्माण्येव नाऽऽरभेरन्किं पारिव्राज्येनेति । अत्रोच्यते अस्याऽऽत्मलोकस्य कर्मभिरसंबन्धात् । यमात्मानमिच्छन्तः प्रव्रजेयुः स आत्मा साधनत्वेन फलत्वेन चोत्पाद्यत्वादिप्रकाराणामन्यतमत्वेनापि कर्मभिर्न संबध्यते । तस्मात्स एष नेति नेत्यात्माऽगृह्यो न हि गृह्यत इत्यादिलक्षणः ॥

भाष्यार्थ—(याप्रमाणें अर्थवादासह पारिव्राज्याचें व्याख्यान करून 'स एष नेति नेति०' इत्यादि भागाचें व्याख्यान करण्यासाठीं शंका घेतात—) 'अहो पण हा आत्मा हाच लोक जर इच्छिला जात आहे तर त्याच्या प्राप्तीचें साधन म्हणून कर्मेंच कां आरंभूं नयेत, पारिव्राज्यच काय करावयाचें आहे?' याचें उत्तर असें सांगितलें जातें—कारण या आत्मलोकाचा कर्मांशीं संबंध नाहीं. म्हणून कर्मांचा साधन या रूपानें आरंभ करतां येत नाहीं. ज्या आत्म्याची इच्छा करणारे संन्यास करितात तो आत्मा साधनत्वानें व फलत्वानें उत्पाद्यत्वादि चार प्रकारांतील एकाही प्रकारानें कर्मांशीं संबद्ध होत नाहीं. त्यामुळें तो आत्मा 'स एष नेति नेति आत्मा अगृह्यो न गृह्यते' इत्यादिलक्षण आहे. [म्ह० तो निष्प्रपंच आहे.]

यस्मादेवंलक्षण आत्मा कर्मफलसाधनासंबन्धी सर्वसंसारधर्मविलक्षणोऽशनायाद्यतीतोऽस्थूलादिधर्मवान् अजोऽजरोऽमरोऽमृतोऽभयः

सैन्धवघनवद्विज्ञानैकरसस्वभावः स्वयंज्योतिरेक एवाद्वयोऽपूर्वोऽनपरोऽनन्तरोऽबाह्य इत्येतदागमतस्तर्कतश्च स्थापितं विशेषतश्चेह जनक-याज्ञवल्क्यसंवादेऽस्मिंस्तस्मादेवंलक्षण आत्मनि विदित आत्मत्वेन नैव कर्मारम्भ उपपद्यते । तस्मादात्मा निर्विशेषः ॥

भाष्यार्थ--('अहोपण तो जरी असा निष्प्रपंच असला तरी त्याची इच्छा करणाऱ्या साधकाच्या पारिव्राज्याची सिद्धि कशी होते,' अशी आशंका घेऊन सांगतात--) ज्याअर्थी अशा लक्षणाचा आत्मा कर्में,फल व साधनें यांशीं संबंध न ठेवणारा, सर्व संसारधर्मांहून विलक्षण, अशनायादिकांहून अतीत, अस्थूलादि धर्मवान्, अज, अजर, अमर, अमृत, अभय, सैंधवाच्या खड्याप्रमाणें विज्ञान-एकरसस्वभाव, स्वयंज्योति,एकच, अद्वय, अपूर्व, अनपर, अनन्तर, अबाह्य आहे, असें पूर्वीं ठिकठिकाणीं आगमतः व तर्कतः स्थापित केलें व विशेषतः या जनक-याज्ञवल्क्य-संवादांत त्याचाच निश्चय केला आहे त्याअर्थीं अशा स्वरूपाचा आत्मा आत्मत्वानें आपाततः ज्ञात झाला असतांही कर्मांचा आरंभ उपपन्न होत नाहीं. तस्मात् आत्मा निर्विशेष आहे.

न हि चक्षुष्मान्पथि प्रवृत्तोऽहनि कूपे कण्टके वा पतति । कृत्स्नस्य च कर्मफलस्य विद्याफलेऽन्तर्भावात् । न चायत्नप्राप्ये वस्तुनि विद्वान्यत्नमातिष्ठति । "अर्के चेन्मधु विन्देत किमर्थं पर्वतं व्रजेत् । इष्टस्यार्थस्य संप्राप्तौ को विद्वान्यत्नमाचरेत् ॥" "सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते" इति गीतासु । इहापि चैतस्यैव परमानन्दस्य ब्रह्मवित्प्राप्यस्यान्यानि भूतानि मात्रामुपजीवन्तीत्युक्तम् । अतो ब्रह्मविदां न कर्मारम्भः ॥

भाष्यार्थ—(उक्त आत्मविषयक विवेकज्ञानवानाला कर्मानुष्ठान नाहीं, याविषयीं दृष्टान्त--) मार्गानें जात असलेला धड डोळ्याचा मनुष्य दिवसाढवळ्या कूपांत किंवा कांट्यांत पडत नाहीं, हें प्रसिद्ध आहे. (त्याच न्यायानें ज्ञानी कर्मांत पडत नाहीं.) ब्रह्मज्ञानाच्या फळामध्यें सर्व कर्मांच्या

फळाचा अन्तर्भाव होत असल्यामुळें मुमुक्षूला कर्म करण्याची आवश्यकता नाहीं. यत्नावाचूनच प्राप्त होणाऱ्या वस्तूविषयीं कोणताही ज्ञाता–विचारी यत्न करीत नाहीं. कारण 'रुईच्या झाडावरच जर मध मिळाला तर त्यासाठीं पर्वतावर कोण जाईल ? इष्ट वस्तूची प्राप्ति झाल्यावर कोणता विचारी पुरुष त्यासाठीं यत्न करील ?' असें म्हटलें आहे. 'हे अर्जुना, फलासह सर्व कर्म ज्ञानामध्यें अन्तर्भूत होतें.' असें गीतेमध्येंही म्हटलें आहे. येथें—या उपनिषदांतही 'ब्रह्मवेत्त्याला प्राप्त करून घेण्यास योग्य असलेल्या याच ब्रह्मानन्दाच्या लेशावर अन्य भूतें उपजीविका करितात,' असें म्हटलें आहे. यास्तव ब्रह्मवेत्त्याला कर्मारंभ नाहीं.

यस्मात्सर्वैषणाविनिवृत्तः स एष नेति नेत्यात्मानमात्मत्वेनोपगम्य तद्रूपेणैव वर्तते तस्मादेतमेवंविदं नेति नेत्यात्मभूतमु हैवैते वक्ष्यमाणे न तरतो न प्राप्नुत इति युक्तमेवेति वाक्यशेषः । के ते इत्युच्यते । अतोऽस्मान्निमित्ताच्छरीरधारणादिहेतोः पापमपुण्यं कर्माकरवं कृतवानस्मि कष्टं खलु मम वृत्तमनेन पापेन कर्मणाऽहं नरकं प्रतिपत्स्य इति योऽयं पश्चात्तापः कर्म कृतवतः परितापः स एनं नेति नेत्यात्मभूतं न तरति ॥

भाष्यार्थ—('एतमु०' इत्यादि वाक्याची योजना करितात—) ज्याअर्थी सर्व एषणांपासून विशेषतः निवृत्त झालेला तो हा 'नेति नेति' अशा रीतीनें आत्म्याला आत्मत्वानें जाणून तद्रूपानेंच राहतो त्याअर्थी 'एतं-' या असें जाणणाराला 'नेति नेति' अशा आत्मभूत झालेल्याला 'उ ह एव एते-' पुढें सांगितलीं जाणारीं (पुण्य व पाप) हीं दोन्ही 'न तरतः' प्राप्त होत नाहींत, 'इति-' हें युक्तच आहे, असा 'तरतः' यापुढें वाक्यशेष लावावा. तीं दोन कोणतीं ? तें सांगितलें जातें—'अतः-' या निमित्तामुळें—शरीरधारणादि कारणानें मी 'पापं अकरवं-' पाप केलें; खरोखर माझ्या हातून वाईट गोष्ट घडली, या पापकर्मानें मी नरकास जाईन, असा जो हा पाप करणाराला मागाहून होणारा परिताप तो हा या 'नेति नेति-' अशा रीतीनें आत्मभूत झालेल्या पुरुषाला प्राप्त होत नाहीं.

तथाऽतः कल्याणं फलविषयकामान्निमित्ताद्यज्ञदानादिलक्षणं पुण्यं शोभनं कर्म कृतवानस्मि । अतोऽहमस्य फलं सुखमुपभोक्ष्ये देहान्तर इत्येषोऽपि हर्षस्तं न तरति । उभे उ हैवैष ब्रह्मविदेते कर्मणी तरति पुण्यपापलक्षणे । एवं ब्रह्मविदः संन्यासिन उभे अपि कर्मणी क्षीयेते पूर्वजन्मनि कृते ये ते इह जन्मनि कृते ये ते चापूर्वे च नाऽऽरभ्येते॥

भाष्यार्थ--त्याचप्रमाणें 'अतः-' फलविषयक कामना या निमित्तामुळें 'कल्याणं अकरवं-' यज्ञ-दानादिलक्षण पुण्य--शोभन कर्म मीं केलें आहे, त्यामुळें मी याचें फल--सुख देहान्तरीं--पुढच्या जन्मीं भोगीन अशा प्रकारचा हा हर्षही त्याला प्राप्त होत नाहीं. कारण 'उभे उ हैवैषः-' हा ब्रह्मविद् 'एते उभे उ' हीं दोन्ही पुण्य-पापलक्षण कर्में 'तरति-' तरतो--त्यांचें उल्लंघन करतो. ('अहोपण पुण्य-पापांना तरून जातो असें म्हटल्यास पुण्य व पाप त्याहून पृथक् राहतात असें होतें, कारण नदीला तरून गेल्यावर नदी त्या तरून जाणाराहून पृथक् असते,' अशी आशंका घेऊन सांगतात--) अशा रीतीनें संन्यासी ब्रह्मवेत्त्याचीं पूर्वजन्मीं जीं केलीं होतीं तीं व या जन्मीं जीं केलीं तीं अशीं दोन्ही--पुण्य-पापाख्य कर्में क्षीण होतात व दुसऱ्या अपूर्व--नवीन पुण्य-पापांचा आरंभ होत नाहीं.

किंच नैनं कृताकृते कृतं नित्यानुष्ठानमकृतं तस्यैवाक्रिया ते अपि कृताकृते एनं न तपतः । अनात्मज्ञं हि कृतं फलदानेनाकृतं प्रत्यवायोत्पादनेन तपतः । अयं तु ब्रह्मविदात्मविद्याग्निना सर्वाणि कर्माणि भस्मीकरोति "यथैधांसि समिद्धोऽग्निः" इत्यादिस्मृतेः । शरीरारम्भकयोस्तूपभोगेनैव क्षयः । अतो ब्रह्मविदकर्मसंबन्धी ॥२२॥

भाष्यार्थ--(याहि कारणास्तव ब्रह्मवेत्त्याचा धर्मादिकांशीं संबंध नाहीं, असें सांगतात--) तसेंच 'नैनं कृताकृते तपतः-' याला कृत--केलेलें नित्यानुष्ठान अकृत--त्यांचेंच अकरण--अननुष्ठान अशीं तीं कृताकृत कर्मेंही त्याला ताप देत नाहींत. अनात्मज्ञ पुरुषालाच केलेलें नित्यानुष्ठान फलदानानें व न केलेलें नित्यानुष्ठान प्रत्यवायाच्या उत्पत्तीनें ताप

देतात. पण हा ब्रह्मवेत्ता आत्मविद्यारूप अग्नीनें सर्व कर्मांचें भस्म करतो; कारण त्याविषयीं 'यथैधांसि समिद्धोऽग्निः०-' इत्यादि स्मृति प्रमाण आहे. पण शरीराचीं आरंभक अशीं जीं पुण्य-पापें त्यांचा उपभोगानेंच क्षय होतो. यास्तव ब्रह्मवेत्ता कर्मसंबंधी नाहीं. २२.

तदेतदृचाऽभ्युक्तम्। एष नित्यो महिमा ब्राह्मणस्य न वर्धते कर्मणा नो कनीयान्। तस्यैव स्यात्पदवित्तं विदित्वा न लिप्यते कर्मणा पापकेनेति ॥

अर्थ—हेंच तत्त्व ऋचेनें सांगितलें आहे. हा ब्राह्मणाचा नित्य महिमा आहे. तो पुण्यकर्मानें वृद्धि पावत नाहीं व पापानें क्षीण होत नाहीं. त्याच महिम्याचें पद—स्वरूप जाणणारा व्हावें, कारण त्याला जाणून पाप कर्मानें लिप्त होत नाहीं.

तदेतद्वस्तु ब्राह्मणेनोक्तमृचा मन्त्रेणाभ्युक्तं प्रकाशितम्। एष नेति नेत्यादिलक्षणो नित्यो महिमा। अन्ये तु महिमानः कर्मकृता इत्यनित्याः। अयं तु तद्विलक्षणो महिमा स्वाभाविकत्वान्नित्यो ब्रह्मविदो ब्राह्मणस्य त्यक्तसर्वैषणस्य। कुतोऽस्य नित्यत्वमिति हेतुमाह। कर्मणा न वर्धते शुभलक्षणेन कृतेन वृद्धिलक्षणां विक्रियां न प्राप्नोति। तथाऽशुभेन कर्मणा नो कनीयान्नाप्यपक्षयलक्षणां विक्रियां प्राप्नोति। उपचयापचयहेतुभूता एव हि सर्वा विक्रिया इत्येताभ्यां प्रतिषिध्यन्ते। अतोऽविक्रियत्वान्नित्य एष महिमा ॥

भाष्यार्थ—(वर सांगितलेल्या ब्रह्मविद्येच्या फळाला मंत्राचेंही आनुकूल्य दाखवितात-) 'तदेतत्' तेंच हें ब्राह्मणानें सांगितलेलें तत्त्व 'ऋचा-' मंत्रानें 'अभ्युक्तं-' प्रकाशित केलें आहे. 'एषः-' हा 'नेति

---

१ ज्याप्रमाणें चांगला पेटलेला अग्नि काष्ठांना भस्मसात् करतो तसा ज्ञानाग्नि संचित व क्रियमाण कर्मांना भस्मसात् करतो, असा त्या स्मृतीचा भावार्थ.

नेति' इत्यादिलक्षण 'नित्यो महिमा-' नित्य महिमा, इतर महिमे कर्मकृत असल्यामुळें अनित्य आहेत. पण हा त्याहून विलक्षण–अकर्मकृत–असलेला महिमा स्वाभाविक असल्यामुळें नित्य आहे. (कोणाचा ?) 'ब्राह्मणस्य-' ज्यानें सर्व एषणांचा त्याग केला आहे अशा ब्रह्मवेत्त्याचा. पण त्या ब्राह्मणाच्या महिम्याला नित्यत्व कोणत्या कारणानें ? असें कोणी विचारील म्हणून त्याचा हेतु सांगतात–'कर्मणा न वर्धते-' शुभलक्षण कृत कर्मानें वृद्धिलक्षण विक्रियेस प्राप्त होत नाहीं. 'नो कनीयान्-' तसाच अशुभ कर्मानें तो कनिष्ठ होत नाहीं–अपक्षयलक्षण विक्रियेला प्राप्त होत नाहीं. वृद्धि व अपक्षय या दोन विक्रियांमुळें होणाऱ्याच इतर सर्व विक्रिया आहेत. त्यामुळें त्यांच्या या दोन निषेधांनीं बाकीच्या सर्व विक्रियाही प्रतिषिद्ध होतात. तस्मात् आत्मा अविक्रिय असल्यामुळें ब्रह्मवेत्त्याचा हा नित्य महिमा आहे.

तस्मात्तस्यैव महिम्नः स्यात्पदवित्पदस्य वेत्ता पद्यते गम्यते ज्ञायत इति महिम्नः स्वरूपमेव पदं तस्य पदस्य वेदिता । किं तत्पदवेदनेन स्यादित्युच्यते । तं विदित्वा महिमानं न लिप्यते न संबध्यते कर्मणा पापकेन धर्माधर्मलक्षणेनोभयमपि पापकमेव विदुषः ॥

भाष्यार्थ—तस्मात् तो महिमा नित्य असल्यामुळें 'तस्यैव-' त्याच महिम्याचा 'पदवित्-' पदाला–स्वरूपाला जाणणारा व्हावें. 'पद्यते–गम्यते–ज्ञायते इति पदं-' जाणलें जातें म्हणून पद, महिम्याचें स्वरूपच पद आहे. त्या पदाचा वेत्ता–जाणणारा व्हावें. त्या पदाच्या ज्ञानानें काय होतें ? तें सांगितलें जातें. 'तं विदित्वा-' त्या महिम्यास जाणून 'न लिप्यते-' संबंध केला जात नाहीं (कोणाकडून ?) 'कर्मणा पापकेन-' धर्माधर्मलक्षण पापकर्माकडून (लिप्त केला जात नाहीं.) आत्मज्ञाला धर्म व अधर्म हीं दोन्ही पापेंच आहेत. (कारण पापाप्रमाणें पुण्यही बंधक असतें. पुण्यही संसाराला कारण होतें. म्हणून तेंही पाप आहे.

तस्मादेवंविच्छान्तो दान्त उपरतस्तितिक्षुः समाहितो भूत्वाऽऽत्मन्येवाऽऽत्मानं पश्यति सर्वमात्मानं पश्यति नैनं पाप्मा तरति सर्वं पाप्मानं तरति नैनं पाप्मा तपति सर्वं पाप्मानं तपति विपापो विरजोऽविचिकित्सो ब्राह्मणो भवत्येष ब्रह्मलोकः सम्राडेनं प्रापितोऽसीति होवाच याज्ञवल्क्यः सोऽहं भगवते विदेहान्ददामि मां चापि सह दास्यायेति ॥ २३ ॥

अर्थ---ज्याअर्थी आत्मा कर्मसंबंधी नाहीं त्याअर्थी आत्मा कर्म व त्याचें फळ यांशीं संबंध न ठेवणारा आहे, असें आपाततः जाणणारा शान्त, दान्त, उपरत, तितिक्षु, समाहित, होऊन स्वशरीरांतच प्रत्यक्—चैतन्यस्वरूपास पाहतो. तो सर्व आत्मा आहे, असें पाहतो. असें पाहणाराला पुण्य पापलक्षण पाप प्राप्त होत नाहीं. सर्व पापाला उल्लंघितो. त्याला कृताकृतलक्षण पाप ताप देत नाहीं. तोच सर्व पापाला भस्मसात् करतो. तो धर्माधर्मरहित, निष्काम, निःसंशय ब्राह्मण होतो. हे सम्राट्, हा ब्रह्मलोक आहे. या ब्रह्मलोकाला तूं पोंचविला गेला आहेस, असें याज्ञवल्क्य म्हणाला. तेव्हां जनक म्हणतो—“ तो मी कृतार्थ केला गेलेला तुम्हांला विदेह देशांस देतों. त्यांच्या सहवर्तमान मी आपल्यालाहि दास्यासाठीं देतों. ” २३

यस्मादेवमकर्मसंबन्ध्येष ब्राह्मणस्य महिमा नेति नेत्यादिलक्षणस्तस्मादेवंविच्छान्तो बाह्येन्द्रियव्यापारत उपशान्तस्तथा दान्तोऽन्तःकरणतृष्णातो निवृत्त उपरतः सर्वैषणाविनिर्मुक्तः संन्यासी तितिक्षुर्द्वंद्वसहिष्णुः समाहित इन्द्रियान्तःकरणचलनरूपाद्यावृत्त्यैकाग्र्यरूपेण समा-

हितो भूत्वा । तदेतदुक्तं पुरस्ताद्बाल्यं च पाण्डित्यं च निर्विद्येति । आत्मन्येव स्वे कार्यकरणसंघात आत्मानं प्रत्यक्चेतयितारं पश्यति ॥

भाष्यार्थ—ज्याअर्थी अशारीतीनें हा 'नेति नेति' इत्यादिलक्षण ब्राह्मणाचा महिमा अकर्मसंबंधी आहे त्याअर्थी असें जाणणारा 'शांतः-' बाह्येंद्रिय व्यापारापासून उपशांत, तसाच 'दान्तः-'अन्तःकरण तृष्णेपासून निवृत्त, 'उपरतः' सर्व एषणांपासून विनिर्मुक्त संन्यासी, 'तितिक्षुः-' द्वंद्वसहिष्णु, 'समाहितः-' इंद्रियें व अन्तःकरण यांच्या चलनरूपापासून व्यावृत्त होऊन—ऐकाग्र्यरूपानें समाहित होऊन, हेंच पूर्वी 'बाल्यं च पांडित्यं च निर्विद्य'(अ.३पृ.१५५) या वाक्यानें सांगितलें आहे. 'आत्मनि एव-' स्वतःच्या शरीरेंद्रियसंघातांतच 'आत्मानं-' प्रत्यक् चेतयिता जो आत्मा त्यास पाहतो.

तत्र किं तावन्मात्रं परिच्छिन्नं नेत्युच्यते । सर्वं समस्तमात्मानमेव पश्यति नान्यदात्मव्यतिरिक्तं वालाग्रमात्रमप्यस्तीत्येवं पश्यति । मननान्मुनिर्भवति जाग्रत्स्वप्नसुषुप्ताख्यं स्थानत्रयं हित्वा । एवं पश्यन्तं ब्राह्मणं नैनं पाप्मा पुण्यपापलक्षणस्तरति न प्राप्नोति । अयं तु ब्रह्मवित्सर्वं पाप्मानं तरत्यात्मभावेनैव व्याप्नोत्यतिक्रामति ॥

भाष्यार्थ—त्या शरीरांत काय तेवढ्याच परिमाणाचा—परिच्छिन्न आत्मा पाहतो ? याचें 'नाहीं' असें उत्तर सांगितलें जातें. 'सर्वं आत्मानं पश्यति-' सर्वाला—समस्ताला आत्माच पाहतो, आत्मव्यतिरिक्त अन्य बालाग्रप्रमाणही नाहीं असें पाहतो. जाग्रत्, स्वप्न व सुषुप्त या नांवाचें स्थानत्रय सोडून मननामुळें मुनि होतो. 'नैनं पाप्मा तरति-' असें पाहणाऱ्या ब्राह्मणाला पुण्य पापलक्षण पाप्मा प्राप्त होत नाहीं. पण हा ब्रह्मवेत्ता 'सर्वं पाप्मानं तरति-' सर्व पापास तरतो—आत्मत्वानेंच व्यापतो—त्याचें अतिक्रमण करतो.

नैनं पाप्मा कृताकृतलक्षणस्तपतीष्टफलप्रत्यवायोत्पादनाभ्याम् । सर्वं पाप्मानमयं तपति ब्रह्मवित्सर्वात्मदर्शनवह्निना भस्मीकरोति । स

एष एवंविद्विपापो विगतधर्माधर्मो विरजो विगतरजो रजः कामो विगतकामोऽविचिकित्स श्छिन्नसंशयोऽहमस्मि सर्वात्मा परं ब्रह्मेति निश्चितमतिर्ब्राह्मणो भवति । अयं त्वेवंभूत एतस्यामवस्थायां मुख्यो ब्राह्मणः प्रागेतस्माद्ब्रह्मस्वरूपावस्थानाद्गौणमस्य ब्राह्मण्यम् ॥

भाष्यार्थ—‘ नैनं पाप्मा तपति-’ याला कृताकृतलक्षण पाप इष्ट फल व प्रत्यवाय यांच्या द्वारा ताप देत नाहीं. ‘ सर्वं पाप्मानं तपति-’हा ब्रह्मवेत्ता सर्वात्मदर्शनरूप अग्नीनें सर्व पापास भस्म करतो. तो हा असें जाणणारा ‘विपापः-’ धर्म व अधर्म यांपासून विशेषतः दूर गेलेला—धर्माधर्मशून्य, ‘विरजः-’ ज्याचें रज नाहींसें झालें आहे. रज म्ह० काम, जो निष्काम आहे, ‘अविचिकित्सः०-’ ज्याचा संशय तुटला आहे तो मी सर्वात्मा परं ब्रह्म आहें, असा निश्चितमति ब्राह्मण होतो.या अवस्थेंत हा अशा प्रकारचा झालेला मुख्य ब्राह्मण होय. या ब्रह्मस्वरूपावस्थानापूर्वी याचें ब्राह्मण्य गौण असतें.

एष ब्रह्मलोको ब्रह्मैव लोको ब्रह्मलोको मुख्यो निरुपचरितः सर्वात्मभावलक्षणो हे सम्राट् । एनं ब्रह्मलोकं परिप्रापितोऽस्यभयं नेति नेत्यादिलक्षणमिति होवाच याज्ञवल्क्यः ॥

भाष्यार्थ—( याप्रमाणें सफल ब्रह्मविद्येचा मंत्र व ब्राह्मण यांच्या योगानें उपदेश करून उपसंहार करतो—) ‘ एष ब्रह्मलोकः-’ हा ब्रह्मलोक आहे. ब्रह्म हाच लोक ब्रह्मलोक. हे सम्राट्, हा मुख्य, निरुपचरित, सर्वात्मभावलक्षण, ब्रह्मलोक आहे. ‘ एनं प्रापितोऽसि-’ या अभय ‘ नेति नेति ’ इत्यादिलक्षण ब्रह्मलोकास तूं सर्व प्रकारें प्राप्त केला गेला आहेस.‘इति होवाच याज्ञवल्क्यः-’असें याज्ञवल्क्य जनकाला म्हणाला.

एवं ब्रह्मभूतो जनको याज्ञवल्क्येन ब्रह्मभावमापादितः प्रत्याह । सोऽहं त्वया ब्रह्मभावमापादितः सन्भगवते तुभ्यं विदेहान्देशान्मम राज्यं समस्तं ददामि मां च सह विदेहैर्दास्याय दासकर्मणे ददामीति चशब्दात्संबध्यते । परिसमापिता ब्रह्मविद्या सह संन्यासेन साङ्गा

सेतिकर्तव्यताका । परिसमाप्तः परमपुरुषार्थः । एतावत्पुरुषेण कर्तव्यमेषा निष्ठैषा परागतिरेतन्निःश्रेयसमेतत्प्राप्य कृतकृत्यो ब्राह्मणो भवत्येतत्सर्ववेदानुशासनमिति ॥ २३ ॥

भाष्यार्थ—याप्रमाणें ब्रह्मीभूत झालेला—याज्ञवल्क्याकडून ब्रह्मभावास प्राप्त केला गेलेला जनक उलट बोलला–' सोऽहं भगवते विदेहान्ददामि-' तो मी तुजकडून ब्रह्मभावास पोंचविला गेलेला असा होत्साता तुम्हांस विदेह देश—माझें समस्त राज्य देतों 'मां चापि सह दास्यायेति-' आणि विदेह देशांसह मी आपल्यालाही दासाचें कार्य करण्यासाठीं देतों, असा 'च-'शब्दानें संबंध लागतो. ( आतां आणखीं कांहीं सांगावयाचें राहिलें नाहीं, असें सांगतात–) ब्रह्मविद्या संन्यासासह, अंगांसह, व इतिकर्तव्यतेसह सर्वतः समाप्त झाली. परम पुरुषार्थ परिसमाप्त झाला. पुरुषानें एवढेंच करावें. ही परा निष्ठा, ही परा गति, हेंच निःश्रेयस—निश्चित श्रेय होय. यास प्राप्त होऊन कृतकृत्य ब्राह्मण होतो. हें सर्व वेदाचें अनुशासन आहे. २३.

स वा एष महानज आत्माऽन्नादो वसुदानो
विन्दते वसु य एवं वेद ॥ २४ ॥

अर्थ—तोच हा महान् अज आत्मा सर्वभूतस्थ होऊन अन्न भक्षण करणारा सर्व प्राण्यांच्या कर्मांचें फळ देणारा आहे. जो असें जाणतो त्याला सर्व कर्मांचें फळ मिळतें. २४.

योऽयं जनकयाज्ञवल्क्याख्यायिकायां व्याख्यात आत्मा स वा एष महानज आत्माऽन्नादः सर्वभूतस्थः सर्वान्नानामत्ता वसुदानो वसु धनं सर्वप्राणिकर्मफलं तस्य दाता प्राणिनां यथाकर्म फलेन योजयितेत्यर्थः । तमेतमजमन्नादं वसुदानमात्मानमन्नादवसुदानगुणाभ्यां युक्तं यो वेद स सर्वभूतेष्वात्मभूतोऽन्नमत्ति विन्दते च वसु सर्वं कर्मफलजातं लभते सर्वात्मत्वादेव य एवं यथोक्तं वेद । अथवा दृष्टफलार्थिभिरप्येवंगुण

उपास्यः। तेनान्नादो वसोश्च लब्धा दृष्टेनैव फलेनान्नात्तृत्वेन गोश्वादिना चास्य योगो भवतीत्यर्थः ॥ २४ ॥

भाष्यार्थ—' स वा एषः-' जो हा जनक व याज्ञवल्क्य यांच्या आख्यायिकेंत सांगितलेला आत्मा तोच हा ' महान् अज आत्मा. ' ' अन्नादः-' सर्व भूतांमध्यें स्थित होऊन सर्व अन्नांचा भक्षक आहे. ' वसुदानः-' वसु म्ह० धन—सर्व प्राण्यांच्या कर्मांचें फळ त्याचा दाता. प्राण्यांना ज्यांच्या त्यांच्या कर्माप्रमाणें फलाशीं संयुक्त करणारा असा भावार्थ. ' य एवं वेद-' त्या या अज, अन्नाद, वसुदान आत्म्याला अन्नाद व वसुदान या गुणांनीं युक्त असें जो जाणतो—अशी त्याची उपासना करतो तो सर्व भूतांमध्यें आत्मभूत झालेला पुरुष अन्न खातो व त्याला वसु—धन मिळतें. जो असें—वर सांगितल्याप्रकारें जाणतो तो सर्वात्मत्वामुळेंच सर्व कर्मफलजातास प्राप्त होतो. अथवा ज्यांना अन्न व धन या दृष्ट फलाची इच्छा असते त्यांनींही पूर्वोक्त गुणविशिष्ट आत्म्याची उपासना करावी. त्या उपासनेनें उपासक अन्नाद व धनाला मिळविणारा होतो. अन्नात्तृत्व व गायी, घोडे इत्यादि या दृष्ट फलाशींच याचा योग होतो असा भावार्थ. २४

**स वा एष महानज आत्माऽजरोऽमरोऽमृतोऽभयो ब्रह्माभयं वै ब्रह्माभयꣳ हि वै ब्रह्म भवति य एवं वेद ॥ २५ ॥ इति बृहदारण्यकोपनिषदि चतुर्थाध्यायस्य चतुर्थं ब्राह्मणम् ॥ ४ ॥**

अर्थ—तोच हा महान् अज आत्मा अजर, अमर, अमृत, अभय ब्रह्म आहे. अभयच ब्रह्म आहे. जो असें जाणतो तो अभय ब्रह्मच होतो. २५ ( ४ )

इदानीं समस्तस्यैवाऽऽरण्यकस्य योऽर्थ उक्तः स समुच्चित्यास्यां

कण्डिकायां निर्दिश्यत एतावान्समस्तारण्यकार्थ इति । स वा एष महानज आत्माऽजरो न जीर्यत इति न विपरिणमत इत्यर्थः । अमरो यस्माच्चाजरस्तस्मादमरो न म्रियत इत्यमरः । यो हि जायते जीर्यते च स विनश्यति म्रियते वा । अयं त्वजत्वादजरत्वाच्चाविनाशी यतोऽत एवामृतः ॥

भाष्यार्थ—( निरुपाधिक ब्रह्मज्ञानानें मुक्ति सांगितली व सोपाधिक ब्रह्मज्ञानानें अभ्युदय सांगितला. तेव्हां आतां पुढील कंडिकेचा काय उपयोग ? अशी आशंका घेऊन सांगतात—) आतां सर्वच आरण्यकाचा जो अर्थ सांगितला तो एकत्र समुचित करून 'एवढाच समस्त आरण्यकाचा अर्थ आहे ' असा या कंडिकेंत सांगितला जातो. ' स वा एष महान् अज आत्मा-' तो हा महान् अज आत्मा ' अजरः-' जीर्ण होत नाहीं, विपरिणाम पावत नाहीं, असा भावार्थ. 'अमरः-'ज्याअर्थी अजर आहे त्याअर्थी अमर. मरत नाहीं, म्हणून अमर. जो उत्पन्न होतो व जीर्ण होतो तो विनाश पावतो किंवा मरतो. पण हा ज्याअर्थी अजत्वामुळें व अजरत्वामुळें अविनाशी आहे त्याअर्थींच अमृत आहे.

यस्माज्जनिप्रभृतिभिस्त्रिभिर्भावविकारैर्वर्जितस्तस्मादितरैरपि भावविकारैस्त्रिभिस्तत्कृतैश्च कामकर्ममोहादिभिर्मृत्युरूपैर्वर्जित इत्येतत् । अभयोऽत एव । यस्माच्चैवं पूर्वोक्तविशेषणस्तस्माद्भयवर्जितः । भयं च हि नामाविद्याकार्यं तत्कार्यप्रतिषेधेन भावविकारप्रतिषेधेन चाविद्यायाः प्रतिषेधः सिद्धो वेदितव्यः । अभय आत्मैवंगुणविशिष्टः किमसौ ब्रह्म परिवृढं निरतिशयं महदित्यर्थः ॥

भाष्यार्थ—ज्याअर्थी जन्मप्रभृति तीन भावविकारांनीं हा वर्जित आहे त्याअर्थी बाकीच्या तीन भावविकारांनींही व त्यामुळें होणाऱ्या मृत्युरूप काम-कर्म मोहादिकांनीं तो रहित आहे, असा भावार्थ. म्हणूनच ' अभयः-' ज्याअर्थी अशारीतीनें तो पूर्वोक्त विशेषणांनीं युक्त आहे त्याअर्थी भयरहित. भय हें अविद्येचें कार्य आहे. त्या अविद्या-

कार्याच्या प्रतिषेधानें व भावविकारांच्या प्रतिषेधानें अविद्येचा प्रतिषेध सिद्धच आहे, असें जाणावें. 'अभयः' इत्यादि गुणविशिष्ट हा आत्मा काय आहे? 'ब्रह्म-'सर्वतः वाढलेलें ।निरातिशय महत् आहे,असा भावार्थ.

अभयं वै ब्रह्म । प्रसिद्धमेतल्लोकेऽभयं ब्रह्मेति । तस्माद्युक्तमेवंगुणविशिष्ट आत्मा ब्रह्मेति । य एवं यथोक्तमात्मानमभयं ब्रह्म वेद सोऽभयं हि वै ब्रह्म भवति । एष सर्वस्या उपनिषदः संक्षिप्तोऽर्थ उक्तः । एतस्यैवार्थस्य सम्यक्प्रबोधायोत्पत्तिस्थितिप्रलयादिकल्पना क्रियाकारकफलाध्यारोपणा चाऽऽत्मनि कृता तदपोहेन च नेति नेतीत्यध्यारोपितविशेषापनयद्वारेण पुनस्तत्त्वमावेदितम् ॥

भाष्यार्थ—'अभयं वै ब्रह्म-' अभय ब्रह्म आहे, हें लौकिकांत प्रसिद्ध आहे. तस्मात् एवंगुणविशिष्ट आत्मा ब्रह्म आहे, हें ह्मणणें युक्तच आहे. 'अभयं हि वै ब्रह्म भवति य एवं वेद-' जो अशारीतीनें पूर्वोक्त आत्म्याला अभय ब्रह्म जाणतो तो अभय ब्रह्मच होतो. हा सर्व उपनिषदाचा संक्षिप्त अर्थ सांगितला आहे. याच अर्थाच्या यथार्थ बोधासाठीं आत्म्याच्या ठिकाणीं उत्पत्ति, स्थिति, प्रलय इत्यादिकांची कल्पना केली आहे; व क्रिया-कारक-फलांचा अध्यारोप केला आहे; आणि शेवटीं त्या सर्वांचा अपवाद करून 'नेति नेति' अशा प्रकारें अध्यारोपित विशेषांच्या निरसनाच्या द्वारा पुनः तत्त्वाचें ज्ञान करून दिलें आहे. (अध्यारोपापवादन्यायानें तत्त्वाचें ज्ञान करून दिलेलें असल्यामुळें सृष्ट्यादि सर्व द्वैत आरोपितच आहे, असा भावार्थ.)

यथैकप्रभृत्यापरार्धसंख्यास्वरूपपरिज्ञानाय रेखाध्यारोपणं कृत्वैकेयं रेखा दशेयं शतेयं सहस्रेयमिति ग्राहयत्यवगमयति संख्यास्वरूपं केवलं न तु संख्याया रेखात्मत्वमेव यथा चाकारादीन्यक्षराणि विजिग्राहयिषुः पत्रमषीरेखादिसंयोगोपायमास्थाय वर्णानां सतत्त्वमावेदयति न पत्रमष्याद्यात्मतामक्षराणां ग्राहयति तथा चेहोत्पत्त्याद्यनेकोपायमास्थायैकं ब्रह्मतत्त्वमावेदितम् ॥

भाष्यार्थ—ज्याप्रमाणें एकापासून परार्धापर्यंत संख्येचें स्वरूप चांगल्याप्रकारें कळण्यासाठीं रेखांचा अध्यारोप करून ही रेखा म्ह. एक, ही रेखा म्ह. दहा, ही शंभर, ही सहस्र, अशारीतीनें संख्येचें ग्रहण करविणारी रेखा केवल संख्येचें स्वरूप ज्ञात करून देते, संख्या रेखारूपच आहे, असें कांहीं ती ज्ञान करून देत नाहीं किंवा ज्याप्रमाणें अकारादि अक्षरांचें ग्रहण करविण्याची इच्छा करणारा पुरुष कागद, शाई, रेघोट्या काढणें इत्यादि उपायांचा आश्रय करून अकारादि वर्णांचें स्वरूप ज्ञात करून देतो; अक्षरांना कागद, शाई इत्यादिरूपत्व आहे, असें कांहीं ज्ञान तो करवीत नाहीं; त्याच न्यायानें येथें उत्पत्त्यादि अनेक उपयांचा आश्रय करून एक ब्रह्मतत्त्व ज्ञात करून दिलें आहे.

पुनस्तत्कल्पितोपायजनितविशेषपरिशोधनार्थं नेति नेतीति तत्त्वोपसंहारः कृतः । तदुपसंहृतं पुनः परिशुद्धं केवलमेव सफलं ज्ञानमन्तेऽस्यां कण्डिकायामिति ॥ २५ ॥ इति बृहदारण्यकोपनिषद्भाष्ये चतुर्थाध्यायस्य चतुर्थं ब्राह्मणम् ॥ ४ ॥

भाष्यार्थ—पण पुनः आत्म्यामध्यें–ब्रह्मामध्यें त्या कल्पित उपायांमुळें प्राप्त होणाऱ्या सृष्टिकारणत्वादि विशेषांचें निरसन करण्यासाठीं ' नेति नेति ' असा तत्त्वाचा उपसंहार केला आहे. शेवटीं या कंडिकेंत पुनः त्या परिशुद्ध–अभावानेंही असंसृष्ट केवल–अद्वितीयच सफल ज्ञानाचा उपसंहार केला आहे. २५

इति श्रीबृहदारण्यकोपनिषद्भाष्यार्थाच्या चवथ्या अध्यायाचें चवथें ब्राह्मण समाप्त.

---

अथ ह याज्ञवल्क्यस्य द्वे भार्ये बभूवतुर्मैत्रेयी च कात्यायनी
च तयोर्ह मैत्रेयी ब्रह्मवादिनी बभूव स्त्रीप्रज्ञैव तर्हि कात्याय-
न्यथ ह याज्ञवल्क्योऽन्यद्वृत्तमुपाकरिष्यन् ॥ १ ॥

अर्थ—पूर्वीच्या हेतुप्रधान वाक्यानंतर असें घडलें. याज्ञवल्क्याच्या दोन भार्या होत्या. मैत्रेयी व कात्यायनी. त्यांतील मैत्रेयी ब्रह्मवादिनी होती; व कात्यायनी प्राकृत स्त्रीबुद्धिच होती. तेव्हां पूर्ववृत्ताहून अन्य-

वृत्ताचें अवलंबन करण्याची इच्छा करणारा याज्ञवल्क्य ( म्हणाला असा पुढें संबंध ) १.

आगमप्रधानेन मधुकाण्डेन ब्रह्मतत्त्वं निर्धारितम् । पुनस्तस्यैवोपपत्तिप्रधानेन याज्ञवल्कीयेन काण्डेन पक्षप्रतिपक्षपरिग्रहं कृत्वा विगृह्यवादेन विचारितम् । शिष्याचार्यसंबन्धेन च षष्ठे प्रश्नप्रतिवचनन्यायेन सविस्तरं विचार्योपसंहृतम् । अथेदानीं निगमनस्थानीयं मैत्रेयीब्राह्मणमारभ्यते । अयं च न्यायो वाक्यकोविदैः परिगृहीतो हेत्वपदेशात्प्रतिज्ञायाः पुनर्वचनं निगमनामिति ॥

भाष्यार्थ—(दुसऱ्या अध्यायांत) आगमप्रधान मधुकांडानें ब्रह्मतत्त्वाचें निर्धारण केलें. पुनः ( तिसऱ्या अध्यायांत ) उपपत्तिप्रधान याज्ञवल्कीय कांडानें पक्ष व प्रतिपक्ष यांचा परिग्रह करून जयापजयप्रधान जल्पन्यायानें ब्रह्मतत्त्वाचाच विचार केला आणि या सहाव्या [ म्ह० चवथ्या ] अध्यायांत शिष्य व आचार्य यांच्या संबंधानें प्रश्न-प्रतिवचनें-न्यायानें त्याचाच सविस्तर विचार करून उपसंहार केला. आतां निगमनस्थानीय मैत्रेयी ब्राह्मण आरंभिलें जातें.( ' अहो पण आगम व उपपत्ति यांच्या योगानें निश्चित झालेल्या तत्त्वाविषयीं निगमन व्यर्थ आहे ' असें कोणी म्हणेल म्हणून सांगतात—) हा न्याय वाक्यज्ञांनीं स्वीकारलेला आहे. ' हेत्वपदेशात्प्रतिज्ञायाः पुनर्वचनं निगमनं-' हेतूचें कथन करून त्यासह प्रतिज्ञात अर्थाचें पुनः कथन करणें याला निगमन म्हणतात, असें निगमनाचें लक्षण न्यायदर्शनांत (अध्याय १ आह्निक १ सू. ३९ ) केलें आहे.

अथवाऽऽगमप्रधानेन मधुकाण्डेन यदमृतत्वसाधनं ससंन्यासमात्मज्ञानमभिहितं तदेव तर्केणाप्यमृतत्वसाधनं ससंन्यासमात्मज्ञानमधिगम्यते । तर्कप्रधानं हि याज्ञवल्कीयं काण्डम् । तस्माच्छास्त्रतर्काभ्यां निश्चितमेतद्यदेतदात्मज्ञानं ससंन्यासममृतत्वसाधनमिति । तस्माच्छास्त्रश्रद्धावद्भिरमृतत्वप्रतिपित्सुभिरेतत्प्रतिपत्तव्यमिति । आगमोपप-

१ तत्त्वनिर्णयप्रधान वादाला प्रश्नप्रतिवचनन्याय म्हणतात.

त्तिभ्यां हि निश्चितोऽर्थः श्रद्धेयो भवत्यव्यभिचारादिति ॥

भाष्यार्थ—( दुसऱ्या प्रकारें संगति सांगतात—) किंवा आगम-प्रधान मधुकांडानें संन्यासासह आत्मज्ञान हें जें अमृतत्वाचें साधन सांगितलें आहे तेंच—संन्यासासह आत्मज्ञान हें अमृतत्वाचें साधन तर्कानेंही अवगत होतें. याज्ञवल्कीय कांड तर्कप्रधान आहे. हें प्रसिद्ध आहे. त्यामुळें शास्त्र व तर्क यांच्या योगानें हें जें संन्यासासह आत्मज्ञान तें मोक्षाचें साधन आहे हें निश्चित झालें, हें निष्पन्न होतें. ( 'अहो पण शास्त्र व तर्क यांच्या योगानें तसें जरी निष्पन्न झालें तरी त्यापासून फायदा काय ?' तें सांगतात—) तस्मात् शास्त्रावर श्रद्धा असलेल्या, अमृतत्व मिळविण्याची इच्छा करणाऱ्या लोकांनीं हें ज्ञान प्राप्त करून घ्यावें. कारण आगम व उपपत्ति यांनीं निश्चित झालेला अर्थ अव्यभिचारी—अबाधित असतो म्हणून तो श्रद्धेय—श्रद्धा ठेवण्यास योग्य असतो. ( येथवर पूर्वोत्तर ग्रंथाची संगति सांगितली. )

अक्षरणां तु चतुर्थे यथा व्याख्यातोऽर्थस्तथा प्रतिपत्तव्योऽत्रापि । यान्यक्षराण्यव्याख्यातानि तानि व्याख्यास्यामः । अथेति हेतूपदेशानन्तर्यप्रदर्शनार्थः । हेतुप्रधानानि हि वाक्यान्यतीतानि । तदनन्तरमागमप्रधानेन प्रतिज्ञातोऽर्थो निगम्यते मैत्रेयीब्राह्मणेन । हशब्दो वृत्तावद्योतकः । याज्ञवल्क्यस्यर्षेः किल द्वे भार्ये पत्न्यौ बभूवतुरास्तां मैत्रेयी च नामत एकाऽपरा कात्यायनी नामतः ॥

भाष्यार्थ—(याप्रमाणें तात्पर्यार्थाचें व्याख्यान केल्यावर श्रुतीच्या अक्षरांचें व्याख्यान करण्याची प्राप्ति आली असतां सांगतात--) यांतील अक्षरांचा अर्थ चवथ्या [दुसऱ्या अध्यायांत]जसा सांगितला आहे तसाच तो येथेंही समजावा. त्यांतील ज्या अक्षरांचें व्याख्यान पूर्वीं झालेलें नाहीं त्यांचेंच तेवढें व्याख्यान करूं. 'अथ-' हा शब्द हेतूच्या उपदेशानंतर, असें आनन्तर्य प्रदर्शित करण्यासाठीं आहे. कारण या पूर्वींचीं वाक्यें हेतुप्रधानच होतीं हें प्रसिद्ध आहे. त्यानंतर आतां या आगमप्रधान—

मैत्रेयीब्राह्मणाकडून त्या प्रतिज्ञात अर्थाचें निगमन केलें जात आहे. 'ह' हा शब्द गत वृत्ताचा अवद्योतक–गतार्थाचा प्रकाशक आहे. 'याज्ञवल्क्यस्य द्वे भार्ये बभूवतुः-' याज्ञवल्क्य ऋषीच्या दोन पत्नी होत्या. 'मैत्रेयी च कात्यायनी च-' एक मैत्रेयी व दुसरी कात्यायनी.

तयोर्भार्ययोर्मैत्रेयी ह किल ब्रह्मवादिनी ब्रह्मवदनशीला बभूवाऽऽसीत् । स्त्रीप्रज्ञा स्त्रियां योचिता सा स्त्रीप्रज्ञा सैव यस्याः प्रज्ञा गृहप्रयोजनान्वेषणालक्षणा सा स्त्रीप्रज्ञैव तर्हि तस्मिन्काल आसीत्कात्यायनी । अथैवं सति ह किल याज्ञवल्क्योऽन्यत्पूर्वस्माद्गार्हस्थ्यलक्षणाद्वृत्तात्पारिव्राज्यलक्षणं वृत्तमुपाकरिष्यन्नुपाचिकीर्षुः सन् ॥ १ ॥

भाष्यार्थ—'तयोः-' त्या दोघी भार्यांतील 'मैत्रेयी ह-' खरोखर मैत्रेयी 'ब्रह्मवादिनी-' ब्रह्मवदनशीला–ब्रह्मसंबंधी भाषण करण्याचें जिचें शील आहे अशी 'बभूव-' होती. 'स्त्रीप्रज्ञैव तर्हि कात्यायनी-' जी बुद्धि स्त्रीच्या ठिकाणीं उचित आहे ती स्त्रीप्रज्ञा, तीच–गृहप्रयोजन पाहणें एतद्रूप-प्रज्ञा जिला होती ती स्त्रीप्रज्ञा (व्यवहारदक्ष), कात्यायनी 'तर्हि-' त्यासमयीं तशी स्त्रीप्रज्ञाच होती. 'अथ-' अशी स्थिति असतां–म्ह० दोन भार्या व वैराग्यातिशय अशा परस्पर विरुद्ध गोष्टी असतांना–'ह-' खरोखर 'याज्ञवल्क्यः-' याज्ञवल्क्य 'अन्यत्' पूर्वीच्या–त्यावेळच्या गार्हस्थ्यरूप वृत्ताहून निराळें पारिव्राज्यलक्षण वृत्त 'उपाकरिष्यन्-' स्वीकारण्याची इच्छा करणारा असा होत्साता ( मैत्रेयि, असें म्हणाला, असा पुढें संबंध. ) १.

> मैत्रेयीति होवाच याज्ञवल्क्यः प्रव्रजिष्यन्वा अरेऽहमस्मात्स्थानादस्मि हन्त तेऽनया कात्यायन्याऽन्तं करवाणीति ॥२॥

अर्थ—याज्ञवल्क्य म्हणाला, "हे मैत्रेयि, मी या स्थानापासून प्रव्रजन करण्याची–दुसऱ्या आश्रमांत जाण्याची इच्छा करीत आहें. यास्तव मी तुझी अनुमति विचारतों, या कात्यायनीसह तुझा विच्छेद करतों–विभाग करून देतों." १.

१ पूर्वीच्या पाठांत 'प्रव्रजिष्यन्-'च्या जागीं 'उद्यास्यन्' असा पाठ आहे.

हे मैत्रेयीति ज्येष्ठां भार्यामामन्त्रयामास। आमन्त्र्य चोवाच ह प्रव्र-जिष्यन्पारिव्राज्यं करिष्यन्वा अरे मैत्रेय्यस्मात्स्थानाद्गार्हस्थ्यादहमस्मि भवामि। मैत्रेय्यनुजानीहि मां हन्तेच्छासि यदि तेऽनया कात्याय-न्याऽन्तं करवाणीत्यादि व्याख्यातम् ॥ २ ॥

भाष्यार्थ—'हे मैत्रेयि'[1], असें म्हणून ज्येष्ठ भार्येला याज्ञवल्क्य हाक मारता झाला व हाक मारून म्हणाला—'प्रव्रजिष्यन् वा०.' हे मैत्रेयि, मी या गार्हस्थ्यस्थानापासून पारिव्राज्य करण्याची इच्छा करीत आहें. तूं आपलें ब्रह्मवादित्व प्रकट करण्यास जर इच्छीत असशील तर हे मैत्रेयि, मला प्रव्रजन करण्यास अनुज्ञा दे. 'ते अनया कात्यायन्या अन्तं करवाणि' या वाक्याचें व्याख्यान पूर्वीं केलें आहे. ( बृहदा. अ. २ पृ. १७१ पहा. ) २.

सा होवाच मैत्रेयी यन्नु म इयं भगोः सर्वा पृथिवी वित्तेन पूर्णा स्यात्स्यां[2] न्वहं तेनामृताऽऽहो नेति, नेति होवाच याज्ञव-ल्क्यो यथैवोपकरणवतां जीवितं तथैव ते जीवितꣳ स्याद-मृतत्वस्य तु नाऽऽशाऽस्ति वित्तेनेति ॥ ३ ॥ सा होवाच मैत्रेयी येनाहं नामृता स्यां किमहं तेन कुर्यां यदेव भगवान्वेद तदेव मे ब्रूहीति ॥ ४ ॥

अर्थ—ती मैत्रेयी म्हणाली, " भगवन्, बरें ही सर्व पृथ्वी वि-त्तानें पूर्ण अशी जर मला मिळाली तर त्या वित्तानें मी अमृत होईन का, कीं नाहीं ? " त्यावर याज्ञवल्क्य म्हणाला, " नाहीं. जसें अनेक सुखसाधनांनीं संपन्न असलेल्या लोकांचें जीवित असतें तसेंच तुझें जीवित सुखोपाय व भोग यांनीं संपन्न होईल. वित्तानें अमृतत्वाची तर कांहीं आशाच नाहीं. " ३.

अर्थ—ती मैत्रेयी म्हणाली, " ज्यानें मी अमृत होणार नाहीं त्यानें मी काय करूं ? यास्तव आपण जें अमृतत्वसाधन जाणतां तेंच मला सांगा. " ४.

---

१ मैत्रेयी ब्रह्मवादिनी असल्यामुळे तिलाच हाक मारून तिच्याशींच संवाद केला, प्राकृतबुद्धि कात्यायनीशीं संवाद केला नाहीं. २ येथें थोडा पाठभेद आहे.

सैवमुक्तोवाच मैत्रेयी सर्वेयं पृथिवी वित्तेन पूर्णा स्यान्नु किं स्यां किमहं वित्तसाध्येन कर्मणाऽमृताऽऽहो न स्यामिति । नेति होवाच याज्ञवल्क्य इत्यादि समानमन्यत् ॥ ३ ॥ ४ ॥

भाष्यार्थ--( मैत्रेयी आपल्याला केवल अमृतत्वाची इच्छा आहे, असें दाखविते-) ती याप्रमाणें बोलली गेलेली मैत्रेयी म्हणाली "ही सर्व पृथिवी वित्तानें पूर्ण अशी असली 'स्यां नु अहं तेनामृता-' तर त्या वित्तानें-वित्तसाध्य कर्मानें अमृता-मुक्त होईन का, कीं नाहीं ?" 'नेति होवाच याज्ञवल्क्यः' इत्यादि वाक्याचा अर्थ पूर्वीप्रमाणेंच समजावा. (बृ. अ. २ पृ. १८३ पहा) ३,४.

स होवाच याज्ञवल्क्यः प्रिया वै खलु नो भवंती सती प्रियम- वृधद्धन्त तर्हि भवत्येतद्व्याख्यास्यामि ते, व्याचक्षाणस्य तु मे निदिध्यासस्वेति ॥ ५ ॥

अर्थ--तो याज्ञवल्क्य म्हणाला, " खरोखर तूं पूर्वीही आम्हांला प्रिय असून आतांही प्रियच वाढविलें आहेस. त्यामुळें संतुष्ट होऊन आतां हे स्त्रिये, मी तुला मोक्षाचें साधन सांगेन. सांगत असलेल्या माझ्या भाषणाचें तूं लक्ष लावून श्रवण कर व त्याचेंच चिंतन कर." ५.

स होवाच प्रियैव पूर्वं खलु नोऽस्मभ्यं भवन्ती सती प्रियमेवावृधद्वर्धितवती निर्धारितवत्यासि । अतस्तुष्टोऽहं हन्तेच्छसि चेदमृतत्व- साधनं ज्ञातुं हे भवति ते तुभ्यं तदमृतत्वसाधनं व्याख्यास्यामि ॥५॥

भाष्यार्थ--(ब्रह्मविद्येची प्राप्ति गुरुप्रसादाधीन आहे, हें व्यक्त करण्यासाठीं श्रुति म्हणते-) तो याज्ञवल्क्य म्हणाला-'प्रिया वै खलु०-' खरोखर तूं पूर्वीं आम्हांला प्रियच असून आतां प्रियच 'अवृधत्-' वाढविती झालीस, प्रियताच निर्धारित केली आहेस; त्यामुळें मी संतुष्ट झालों आहें. 'हन्त-' तूं अमृतत्वाचें साधन जाणण्यास जर इच्छीत असशील तर हे स्त्रिये, तुला मी तें मोक्षाचें साधन सांगेन. (ज्ञानाची

१ पूर्वीपेक्षां येथें थोडा पाठभेद आहे.

इच्छा दुर्लभ आहे, हें व्यक्त करण्यासाठीं भाष्यांत 'चेत्-' जर, असें म्हटलें आहे. ) ५.

स होवाच न वा अरे पत्युः कामाय पतिः प्रियो भवत्यात्मनस्तु कामाय पतिः प्रियो भवति । न वा अरे जायायै कामाय जया प्रिया भवत्यात्मनस्तु कामाय जाया प्रिया भवति । न वा अरे पुत्राणां कामाय पुत्राः प्रिया भवन्त्यात्मनस्तु कामाय पुत्राः प्रिया भवन्ति । न वा अरे वित्तस्य कामाय वित्तं प्रियं भवत्यात्मनस्तु कामाय वित्तं प्रियं भवति । न वा अरे पशूनां कामाय पशवः प्रिया भवन्त्यात्मनस्तु कामाय पशवः प्रिया भवन्ति । न वा अरे ब्रह्मणः कामाय ब्रह्म प्रियं भवत्यात्मनस्तु कामाय ब्रह्म प्रियं भवति । न वा अरे क्षत्रस्य कामाय क्षत्रं प्रियं भवत्यात्मनस्तु कामाय क्षत्रं प्रियं भवति । न वा अरे लोकानां कामाय लोकाः प्रिया भवन्त्यात्मनस्तु कामाय लोकाः प्रिया भवन्ति । न वा अरे देवानां कामाय देवाः प्रिया भवन्त्यात्मनस्तु कामाय देवाः प्रिया भवन्ति । न वा अरे वेदानां कामाय वेदाः प्रिया भवन्त्यात्मनस्तु कामाय वेदाः प्रिया भवन्ति । न अरे भूतानां कामाय भूतानि प्रियाणि भवन्त्यात्मनस्तु कामाय भूतानि प्रियाणि भवन्ति । न वा अरे सर्वस्य कामाय सर्वं प्रियं भवत्यात्मनस्तु कामाय सर्वं प्रियं भवति । आत्मा वा अरे द्रष्टव्यः श्रोतव्यो मन्तव्यो निदिध्यासितव्यो मैत्रेय्यात्मनि खल्वरे दृष्टे श्रुते मते विज्ञात इद१ सर्वं विदितम् ॥ ६ ॥

अर्थ—तो याज्ञवल्क्य म्हणाला, 'हे मैत्रेयि, ही गोष्ट प्रसिद्ध आहे कीं, पतीच्या प्रयोजनासाठीं पत्नीला पति प्रिय होत नाहीं; तर स्वतः-च्याच प्रयोजनाकरितां तिला पति प्रिय होतो. त्याच न्यायानें जाये-च्या प्रयोजनासाठीं पतीला जाया प्रिय होत नाहीं, तर आपल्या स्वतःच्या प्रयोजनासाठीं त्याला जाया प्रिय होते. पुत्रांच्या प्रयोजनासाठीं पुत्र आई-बापांना प्रिय होत नाहीं, तर तो त्यांच्या स्वतःच्या प्रयोजनासाठीं प्रिय होतो. वित्ताच्या प्रयोजनासाठीं वित्त प्रिय होत नाहीं तर स्वतःच्या प्रयोजनासाठीं तें प्रिय होतें. पशूंच्या प्रयोजनासाठीं

१ हे दोन पर्याय यांत अधिक आहेत. २ येथें थोडा पाठभेद आहे.

पशू प्रिय होत नाहींत तर स्वतःच्या प्रयोजनासाठीं ते प्रिय होतात. ब्राह्मणाच्या प्रयोजनासाठीं ब्राह्मण प्रिय होत नाहीं तर आपल्या प्रयोजनासाठीं तो प्रिय होत असतो. क्षत्रियाच्या प्रयोजनासाठीं क्षत्रिय प्रिय होत नाहीं, तर आपल्या प्रयोजनासाठीं क्षत्रिय प्रिय होतो. स्वर्गादि लोकांच्या प्रयोजनासाठीं ते लोक मनुष्याला प्रिय होत नाहींत, तर स्वतःच्या प्रयोजनासाठीं ते त्याला प्रिय होतात. देवांच्या प्रयोजनासाठीं देव प्रिय होत नाहींत तर स्वतःच्या प्रयोजनासाठीं ते प्रिय होतात. वेदांच्या प्रयोजनासाठीं वेद प्रिय होत नाहींत तर स्वतःच्या प्रयोजनासाठीं वेद प्रिय होतात. भूतांच्या प्रयोजनासाठीं भूतें प्रिय होत नाहींत तर स्वतःच्या प्रयोजनासाठीं तीं प्रिय होतात. अगे मैत्रेयि, सर्वांच्या प्रयोजनाकरितां सर्व प्रिय होत नाहीं तर आपल्या प्रयोजनाकरितां सर्व प्रिय होतें, हें प्रसिद्ध आहे. यास्तव सर्वांत अधिक प्रिय असलेला आत्माच दर्शनार्ह आहे. तोच श्रवणार्ह आहे. तोच मनन करण्यास योग्य आहे व तोच निश्चयानें ध्यान करण्यास योग्य आहे. हे मैत्रेयि, खरोखर आत्म्याला पाहिलें असतां, ऐकलें असतां, त्याचें मनन केलें असतां व त्याला विशेषतः जाणलें असतां हें सर्व विदित होतें. ६.

आत्मनि खल्वरे मैत्रेयि दृष्टे । कथं दृष्ट आत्मनीति उच्यते । पूर्वमाचार्यागमाभ्यां श्रुते पुनस्तर्केणोपपत्त्या मते विचारिते । श्रवणं त्वागममात्रेण मत उपपत्त्या पश्चाद्विज्ञात एवमेतन्नान्यथेति निर्धारिते किं भवतीत्युच्यत इदं सर्वं विदितं भवति । इदं सर्वमिति यदात्मनोऽन्यत् । आत्मव्यतिरेकेणाभावात् ।। ६ ॥

भाष्यार्थ—हे मैत्रेयि, खरोखर हा आत्मा पाहिला असतां ( हें सर्व विदित होतें, असा पुढें संबंध.) 'आत्म्याला कसें पाहिलें असतां?' म्हणून आत्मदर्शनोपाय विचाराल तर सांगितलें जातें—पूर्वी 'श्रुते-' आचार्य व आगम यांच्या द्वारा त्याविषयीं श्रवण केलें असतां मागाहून तर्कानें—उपपत्तीनें 'मते' त्याचा विचार केला असतां, श्रवण केवल

आगमाच्या योगानें व मनन उपपत्तीनें केल्यावर पश्चात् 'विज्ञाते-' हें असेंच आहे, याहून विपरीत नाहीं, असें निर्धारण केलें असतां काय होतें तें सांगितलें जातें.—'इदं सर्वं विदितं-' हें सर्व विदित होतें. हें सर्व म्हणजे आत्म्याहून अन्य असलेलें सर्व अनात्मजात विदित होतें. कारण आत्म्याहून भिन्नत्वानें त्याचा अभाव असतो. ( त्यामुळें आत्मज्ञानानें तें सर्व ज्ञात होतें.) ६.

ब्रह्म तं परादाद्योऽन्यत्राऽऽत्मनो ब्रह्म वेद क्षत्रं तं परादाद्योऽन्यत्राऽऽत्मनः क्षत्रं वेद लोकास्तं परादुर्योऽन्यत्राऽऽत्मनो लोकान्वेद देवास्तं परादुर्योऽन्यत्राऽऽत्मनो देवान्वेद वेदास्तं परादुर्योऽन्यत्राऽऽत्मनो वेदान्वेद भूतानि तं परादुर्योऽन्यत्राऽऽत्मनो भूतानि वेद सर्वं तं परादाद्योऽन्यत्राऽऽत्मनः सर्वं वेदेदं ब्रह्मेदं क्षत्रमिमे लोका इमे देवा इमे वेदा इमानि भूतानीदꣳ सर्वं यदयमात्मा ॥ ७ ॥

अर्थ—ब्राह्मणजाति त्या पुरुषाला दूर करते जो ब्राह्मणजातीला आत्म्याहून पृथक्त्वानें जाणतो; क्षत्रियजाती त्याला दूर करते जो तिला आत्म्याहून पृथक् जाणतो; लोक त्याला दूर करतात जो लोकांना आत्म्याहून पृथक् जाणतो; देव त्याला दूर करितात जो देवांना आत्म्याहून पृथक् जाणतो; वेद त्याला दूर करितात जो वेदांना आत्म्याहून पृथक् जाणतो; भूतें त्याला दूर करतात जो भूतांना आत्म्याहून पृथक् जाणतो; सर्व त्याला दूर ठेवतें जो सर्वाला आत्म्याहून पृथक् जाणतो. हें ब्रह्म, हें क्षत्र, हे लोक, हे देव, हे वेद, ही भूतें व हें सर्व हा प्रकृत आत्मा आहे ७.

तमयथार्थदर्शिनं परादात्पराकुर्यात्कैवल्यासंबन्धिनं कुर्यादयमनात्मस्वरूपेण मां पश्यतीत्यपराधादिति भावः ॥ ७ ॥

भाष्यार्थ—त्या अयथार्थदर्शी—ब्राह्मणादि जाति वगैरे सर्व आत्म्याहून पृथक् आहे असें समजणाऱ्या मिथ्यादर्शी पुरुषाला ती जातिच 'परादात्-' दूर करते—कैवल्याचा असंबंधी करते, हा मला अनात्मस्वरू-

१ हा पर्याय यात अधिक आहे.

पानें पाहतो याच अपराधामुळें कैवल्यापासून दूर सारते, असा भावार्थ ७.

स यथा दुन्दुभेर्हन्यमानस्य न बाह्याञ्छब्दाञ्छक्नुयाद्ग्रहणाय
दुन्दुभेस्तु ग्रहणेन दुन्दुभ्याघातस्य वा शब्दो गृहीतः ॥ ८ ॥

अर्थ--तो दृष्टान्त जसा–लौकिकांत ताडन केल्या जाणाऱ्या ( काठीनें वाजविल्या जाणाऱ्या ) दुंदुभीचे बाह्य–दूरवर पसरणारे–विशेष ध्वनि जाणण्यास ( हे दुंदुभीचे ध्वनी आहेत असें ओळखण्यास ) कोणी समर्थ होत नाहीं, पण ( हे शब्द कशाचे आहेत असें ह्मणून त्यांच्या उत्पत्तिस्थानापाशीं जाऊन किंवा पुष्कळ परिचयामुळें ते दुंदुभीचेच आहेत असें ओळखून ) दुंदुभीच्या ज्ञानानें किंवा दुंदुभीच्या आघाताच्या–वादनाच्या ज्ञानानें हा शब्द दुंदुभीचा आहे, असें ज्ञान होतें. [ नगाऱ्याच्या विशेष ध्वनींचें ज्ञान नगाऱ्याच्या सामान्य ध्वनीच्या ज्ञानावांचून होऊं शकत नाहीं. यास्तव ते त्याहून भिन्न नाहींत ] ८.

स यथा शङ्खस्य ध्मायमानस्य न बाह्याञ्छब्दाञ्छक्नुयाद्ग्रहणाय शङ्खस्य तु ग्रहणेन शङ्खध्मस्य वा शब्दो गृहीतः ॥ ९ ॥

अर्थ--दुसरा दृष्टान्त असा–ज्याप्रमाणें व्यवहारांत शब्दानें संयुक्त केल्या जाणाऱ्या शंखाचे बाह्य शब्द ग्रहण करण्यास मनुष्य समर्थ होत नाहीं, पण शंखाच्या ग्रहणानें किंवा शंखवादनाच्या ग्रहणानें हा शंखाचा शब्द आहे, असें ज्ञान होतें. ९

स यथा वीणायै वाद्यमानायै न बाह्याञ्छब्दाञ्छक्नुयाद्ग्रहणाय
वीणायै तु ग्रहणेन वीणावादस्य वा शब्दो गृहीतः ॥ १० ॥

अर्थ--तिसरा दृष्टान्त–ज्याप्रमाणें वीणा वाजविली जाऊं लागली असतां तिचे बाह्य शब्द ग्रहण करण्यास कोणी समर्थ होत नाहीं पण वीणेच्या किंवा विणावादनाच्या ग्रहणानें तो शब्द गृहीत होतो. १०.

स यथाऽऽर्द्रैधाग्नेरभ्याहितस्य पृथग्धूमा विनिश्चरन्त्येवं वा अरेऽस्य महतो भूतस्य निःश्वसितमेतद्यदृग्वेदो यजर्वेदः सामवेदोऽथर्वाङ्गिरस इतिहासः पुराणं विद्या उपनिषदः श्लोकाः सूत्राण्यनुव्याख्यानानि व्याख्यानानीष्टꣳहुतमाशितं पायितमयं च लोकः परश्च लोकः सर्वाणि च भूतान्यस्यैवैतानि सर्वाणि निःश्वसितानि ॥ ११ ॥

अर्थ—ज्याचें इंधन आर्द्र आहे अशा अभ्याहित अग्नीपासून ज्याप्रमाणें धूम पृथक् निघतात त्याप्रमाणें हे मैत्रेयि, या महद्भूताचें हें निःश्वसित आहे. ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्वणवेद, इतिहास, पुराण, विद्या, उपनिषद्, श्लोक, सूत्रें, मंत्रांचीं विवरणें, अर्थवाद, इष्ट, हुत, आशित, पायित, हा लोक, परलोक, सर्व भूतें हीं सर्व या महद्भूताचींच निःश्वसितें आहेत. ११

चतुर्थे शब्दनिश्वासेनैव लोकाद्यर्थनिश्वासः सामर्थ्यादुक्तो भवतीति पृथङ्नोक्तः। इह तु सर्वशास्त्रार्थोपसंहार इति कृत्वाऽर्थप्राप्तोऽप्यर्थः स्पष्टीकर्तव्य इति पृथगुच्यते ॥ ११ ॥

भाष्यार्थ—( या कंडिकेंत चवथ्या अध्यायांतील याच कंडिकेपेक्षां 'इष्टं हुतं०' इत्यादि अधिक भाग आहे त्याचा अर्थ सांगतात–) चवथ्या अध्यायांत शब्दनिश्वासानेंच, अर्थशून्य शब्दाची अनुपपत्ति असणें या सामर्थ्यावरूनच, लोकादिक अर्थनिश्वास सांगितलेला आहे असें होतें. त्यामुळें त्याचा तेथें पृथक् निर्देश केला नाहीं. पण येथें सर्व शास्त्राचा उपसंहार करावयाचा आहे, म्हणून अर्थतः प्राप्त होणाराही अर्थ स्पष्ट करणें अवश्य आहे, असें समजून 'इष्टं, हुतं०' इत्यादि पृथक् सांगितलें आहे ११.

स यथा सर्वासामपाᳪसमुद्र एकायनमेवᳪसर्वेषाᳪस्पर्शानां त्वगेकायनमेवᳪसर्वेषां गन्धानां नासिके एकायनमेवᳪसर्वेषांᳪरसानां जिह्वैकायनमेवᳪसर्वेषाᳪरूपाणां चक्षुरेकायनमेवᳪसर्वेषाᳪशब्दानाᳪश्रोत्रमेकायनमेवᳪसर्वेषाᳪसंकल्पानां मन एकायनमेवᳪसर्वासां विद्यानाᳪहृदयमेकायनमेवᳪसर्वेषां कर्मणाᳪहस्तावेकायनमेवᳪसर्वेषामानन्दानामुपस्थ एकायनमेवᳪसर्वेषां विसर्गाणां पायुरेकायनमेवᳪसर्वेषामध्वनां पादावेकायनमेवᳪसर्वेषां वेदानां वागेकायनम् ॥ १२ ॥

अर्थ—तो दृष्टान्त—ज्याप्रमाणें सर्व जलांचें समुद्र हें एक अयन—एक गमन—एक प्रलयस्थान आहे त्याप्रमाणें सर्व स्पर्शांचें त्वक् हें एक अयन आहे, तसेंच सर्व गंधांचें नासिका हें एक अयन आहे, तसेंच

सर्व रसांचें जिह्वा हें एक अयन आहे; सर्व रूपांचें चक्षु हें एक अयन आहे; सर्व शब्दांचें श्रोत्र हें एक अयन आहे; सर्व संकल्पांचें मन हें एक अयन आहे. तसेंच सर्व विद्यांचें हृदय हें एक अयन आहे, तसेंच सर्व कर्मांचें हात हें एक अयन आहे; तसेंच सर्व आनंदांचें उपस्थ हें एक अयन आहे. तसेंच सर्व विसर्गांचें पायु हें एक अयन आहे; तसेंच सर्व मार्गांचें पाय हें एकायन आहे; त्याचप्रमाणें सर्व वेदांचें वाक् हें एक अयन आहे. १२

स यथा सैन्धवघनोऽनन्तरोऽबाह्यः कृत्स्नो रसघन एवैवं वा अरेऽयमात्माऽनन्तरोऽबाह्यः कृत्स्नः प्रज्ञानघन एवैतेभ्यो भूतेभ्यः समुत्थाय तान्येवानुविनश्यति न प्रेत्य संज्ञाऽस्तीत्यरे ब्रवीमीति होवाच याज्ञवल्क्यः ॥ १३ ॥

अर्थ—त्याविषयीं दृष्टान्त—ज्याप्रमाणें सैंधवाचा खडा अनन्तर, अबाह्य, संपूर्ण, रसघनच त्याप्रमाणेंच हे मैत्रेयि, हा आत्मा अनन्तर, अबाह्य, कृत्स्न, प्रज्ञानघनच या भूतांपासून चांगल्याप्रकारें उत्थित होऊन त्यांच्याच मागोमाग तो विनाश पावतो. याप्रमाणें विनाश पावल्यावर 'मी अमक्याचा अमुक' ही विशेष संज्ञा रहात नाहीं, असें हे मैत्रेयि, मी तुला सांगतों, असें याज्ञवल्क्य म्हणाला १३.

सर्वकार्यप्रलये विद्यानिमित्ते सैन्धवघनवदनन्तरोऽबाह्यः कृत्स्नः प्रज्ञानघन एक आत्माऽवतिष्ठते पूर्वं तु भूतमात्रासंसर्गविशेषाल्लब्धविशेषविज्ञानः सन् । तस्मिन्प्रविलापिते विद्यया विशेषविज्ञाने तन्निमित्ते च भूतसंसर्गे न प्रेत्य संज्ञाऽस्तीत्येवं याज्ञवल्क्येनोक्ता ॥१३॥

भाष्यार्थ—('स यथा सैंधवघनः' इत्यादि वाक्याचें तात्पर्य सांगतात—) विद्यानिमित्त सर्व कार्यांचा प्रलय झाला असतां सैंधवाच्या खड्याप्रमाणें अनन्तर, अबाह्य, कृत्स्न, प्रज्ञानघन, एक आत्मा अवस्थित होतो. ('एतेभ्यो भूतेभ्यः०-' इत्यादि वाक्याचा अर्थ—) पण ज्ञान उत्पन्न होण्याच्या पूर्वी भूतमात्रांच्या विशेष संसर्गामुळें ज्याला विशेष विज्ञान प्राप्त झालें आहे असा होत्साता व्यवहार करतो. विद्येच्या योगानें

विशेष विज्ञानाचें निमित्त असा भूतसंसर्ग व तें विशेष विज्ञान यांचा प्रविलाप–विलय झाला असतां ' न प्रेत्य संज्ञास्ति-' मरणोत्तर विशेष भान नसतें, असें मैत्रेयी याज्ञवल्क्याकडून बोलली गेली. १३.

सा होवाच मैत्रेय्यत्रैव मा भगवान्मोहान्तमापीपिपन्न वा अह-
मिमं विजानामीति स होवाच न वा अरेऽहं मोहं ब्रवीम्य-
विनाशी वा अरेऽयमात्माऽनुच्छित्तिधर्मा ॥ १४ ॥

अर्थ––ती मैत्रेयी म्हणाली–"याच प्रज्ञानघनाविषयीं आपण मला मोहांत पाडलें आहे. मला संमूढ केलें आहे. त्यामुळें मी आत्म्याला जाणत नाहीं." याज्ञवल्क्य म्हणाला, " हे मैत्रेयि, मी मोह पडण्यासारखें सांगत नाहीं. हा आत्मा अविनाशीच आहे. हा अविनाश या धर्मानें युक्त आहे." १४.

सा होवाचात्रैव मा भगवानेतस्मिन्नेव वस्तुनि प्रज्ञानघन एव न प्रेत्य संज्ञाऽस्तीति मोहान्तं मोहमध्यमापीपिपदापीपदद्वगमितवानासि संमोहितवानसीत्यर्थः । अतो न वा अहमिममात्मानमुक्तलक्षणं विजानामि विवेकत इति ॥

भाष्यार्थ––( पूर्वोत्तर विरोधाविषयीं शंका घेऊन परिहार करितात–) ' सा होवाच-' ती मैत्रेयी म्हणाली–' अत्रैव-' याच वस्तूविषयीं–प्रज्ञानघनाविषयींच ' न प्रेत्य संज्ञास्तीति-' मरणोत्तर विशेष भान नसतें, असें म्हणून ' भगवान् ' ' मोहान्तं-' मोहांत ' आपीपिपद्-' पाडविता झाला आहे–मोहास प्राप्त करविता झाला. संमोहित करिता झाला आहे, ( तुम्हीं मला वरील वाक्यानें संमोहित केलें आहे, ) असा भावार्थ. 'न वा अहमिमं विजानामीति-' त्यामुळें मी या उक्तलक्षण आत्म्याला विवेकतः जाणत नाहीं.

स होवाच नाहं मोहं ब्रवीम्यविनाशी वा अरेऽयमात्मा । यतो विनष्टुं शीलमस्येति विनाशी न विनाश्यविनाशी विनाशशब्देन विक्रियाऽविनाशीत्यविक्रिय आत्मेत्यर्थः । अरे मैत्रेय्ययमात्मा प्रकृतोऽनुच्छि-

त्तिधर्मा । उच्छित्तिरुच्छेद उच्छेदोऽन्तो विनाश उच्छित्तिर्धर्मोऽस्येत्युच्छित्तिधर्मा नोच्छित्तिधर्माऽनुच्छित्तिधर्मा नापि विक्रियालक्षणो नाप्युच्छेदलक्षणो विनाशोऽस्य विद्यत इत्यर्थः ॥ १४ ॥

भाष्यार्थ—' स होवाच० ' त्यावर याज्ञवल्क्य म्हणाला—" मी मोह बोलत नाहीं. हे मैत्रेयि, हा आत्मा अविनाशी आहे. कारण ज्याचें विनाश पावण्याचें शील असतें तो विनाशी, जो विनाश न पावणारा तो अविनाशी, येथें विनाशशब्दानें विक्रिया घ्यावी. अविनाशी म्ह० अविक्रिय आत्मा असा भावार्थ. हे मैत्रेयि, हा प्रकृत आत्मा ' अनुच्छित्तिधर्मा ' आहे उच्छित्ति म्ह० उच्छेद, उच्छेद म्ह० अन्त, विनाश. उच्छेद हा ज्याचा धर्म आहे तो उच्छित्तिधर्मा. जो तसा नाहीं तो अनुच्छित्तिधर्मा." याला विक्रियालक्षण विनाश नाहीं व उच्छेदलक्षण विनाशही नाहीं, असा भावार्थ १४.

यत्र हि द्वैतमिव भवति तदितर इतरं पश्यति तदितर इतरं जिघ्रति तदितर इतरꣳरसयते तदितर इतरमभिवदति तदितर इतरꣳशृणोति तदितर इतरं मनुते तदितर इतरꣳस्पृशति तदितर इतरं विजानाति यत्र त्वस्य सर्वमात्मैवाभूत्तत्केन कं पश्येत्तत्केन कं जिघ्रेत्तत्केन कꣳरसयेत्तत्केन कमभिवदेत्तत्केन कꣳशृणुयात्तत्केन कं मन्वीत तत्केन कꣳस्पृशेत्तत्केन कं विजानीयाद्येनेदꣳ सर्वं विजानाति तं केन विजानीयात्स एष नेति नेत्यात्माऽगृह्यो न हि गृह्यतेऽशीर्यो न हि शीर्यतेऽसङ्गो न हि सज्यतेऽसितो न व्यथते न रिष्यति विज्ञातारमरे केन विजानीयादित्युक्तानुशासनाऽसि मैत्रेय्येतावदरे खल्वमृतत्वमिति होक्त्वा याज्ञवल्क्यो विजहार ॥ १५ ॥ इति बृहदारण्यकोपनिषदि चतुर्थाध्यायस्य पञ्चमं ब्राह्मणम् ॥ ५ ॥

अर्थ—ज्या अविद्यावस्थेंत द्वैतसें होतें तेव्हां इतर—द्रष्टा इतर—रूपास पाहतो, इतर इतरास हुंगतो, इतर इतरास चाखतो, इतर इतरास बोलतो, इतर इतरास ऐकतो, इतर इतराचें मनन करतो, इतर इतरास स्पर्श करतो, इतर इतराला जाणतो, जेव्हां याला सर्व आत्माच झालें

तेव्हां कोणत्या साधनानें कशाला पाहणार ? कोणत्या साधनानें कशाचा वास घेणार ? कशानें कशाला चाखणर ? कशानें कोणाला बोलणार ? कशानें काय ऐकणार ? कशानें कसलें मनन करणार ? कशानें कोणाला स्पर्श करणार ? कशानें कोणाला जाणणार ? तो हा 'नेति नेति' असा निषेधमुखानें जाणण्यास योग्य आत्मा अगृह्य आहे, त्याचें ग्रहण केलें जात नाहीं, अशीर्य आहे, त्याचा विनाश होत नाहीं, तो असंग आहे, तो आसक्त केला जात नाहीं, तो अबद्ध आहे, व्यथा पावत नाहीं, हिंसा पावत नाहीं, विज्ञात्याला कोणत्या साधनानें जाणावें ? हे मैत्रेयि, याप्रमाणें तूं मजकडून अनुशासन सांगितली गेली आहेस. अमृतत्वसाधन खरोखर एवढेंच आहे, असें बोलून याज्ञवल्क्य प्रव्रजन करता झाला. १५ (५).

चतुर्ष्वपि प्रपाठकेष्वेक आत्मा तुल्यो निर्धारितः परं ब्रह्म । उपायविशेषस्तु तस्याधिगमेऽन्यश्चान्यश्च । उपेयस्तु स एवाऽऽत्मा यश्चतुर्थेऽथात आदेशो नेति नेतीति निर्दिष्टः । स एव पञ्चमे प्राणपणोपन्यासेन शाकल्ययाज्ञवल्क्यसंवादे निर्धारितः । पुनः पञ्चमसमाप्तौ । पुनर्जनकयाज्ञवल्क्यसंवादे । पुनरिहोपनिषत्समाप्तौ । चतुर्णामपि प्रपाठकानामेतदात्मनिष्ठता नान्योऽन्तराले कश्चिदपि विवक्षितोऽर्थ इत्येतत्प्रदर्शनायान्त उपसंहारः स एष नेति नेत्यादिः ॥

भाष्यार्थ—(येथवर होऊन गेलेल्या चार अध्यायांतील प्रत्येक अध्यायांत निरनिराळें प्रतिपादन केलेलें असल्यामुळें आत्मा सविशेष आहे, अशी आशंका घेऊन या १५ व्या कंडिकेंतील 'स एष नेति नेत्यात्मा०' इत्यादि भागाचें तात्पर्य सांगतात—) चारही प्रपाठकांत एक आत्मा तुल्य निश्चित केला आहे. (त्याचें तुल्यत्व कोणत्या प्रकारानें आहे तें सांगतात—) तो परब्रह्म आहे, असेंच सर्वत्र सांगितलें आहे, (मग अध्याय चार कां केले ?) त्याच्या ज्ञानाचा विशेष उपाय मात्र निरानिराळा सांगितला आहे. (त्यासाठीं अध्यायभेद.) पण उपेय तर तोच आत्मा आहे; की

जो चवथ्या [ ह्म० दुसऱ्या ] अध्यायांत 'अथात आदेशो नेति नेति' इत्यादि शब्दांनीं निर्दिष्ट आहे. पांचव्या [तिसऱ्या] अध्यायांतही 'मूर्धा ते विपतिष्यति' अशा वाक्यानें प्राणाच्या पणाचा उपन्यास करून शाकल्य-याज्ञवल्क्यसंवादांत त्याचाच निर्धार केला आहे. पुनः पांचव्या अध्यायाच्या समाप्तीचे वेळीं 'विज्ञानं आनन्दं ब्रह्म०' इत्यादि प्रसंगानें त्याचाच निश्चय केला आहे. पुनः सहाव्या [ चवथ्या ] अध्यायांतील कूर्चब्राह्मणांत जनक-याज्ञवल्क्यसंवादांत त्याचेंच कथन केलें. पुनः या ब्राह्मणांत उपनिषत्समाप्तीच्या वेळीं त्याचाच निर्देश केला आहे. सारांश चारही प्रपाठकांची एतदात्मनिष्ठता आहे. [ ह्म० याप्रमाणें मागील चारी प्रपाठक या आत्मप्रतिपादनांतच परिनिष्ठित आहेत. ] त्यांमध्यें दुसरा कोणताही विवक्षित अर्थ नाहीं, हें दाखविण्यासाठीं शेवटीं 'स एष नेति नेति' इत्यादि उपसंहार केला आहे.

यस्मात्प्रकारशतेनापि निरूप्यमाणे तत्त्वे नेति नेत्यात्मैव निष्ठा नान्योपलभ्यते तर्केण वाऽऽगमेन वा तस्मादेतदेवामृतत्वसाधनं यदेतन्नेति नेत्यात्मपरिज्ञानं सर्वसंन्यासश्चेत्येतमर्थमुपसंजिहीर्षन्नाह । एतावदेतावन्मात्रं यदेतन्नेति नेत्यद्वैतात्मदर्शनमिदं चान्यसहकारिकारणनिरपेक्षमेवारे मैत्रेय्यमृतत्वसाधनम् । यत्पृष्टवत्यसि यदेव भगवान्वेद तदेव मे ब्रूह्यमृतत्वसाधनमिति तदेतावदेवेति विज्ञेयं त्वयेति ॥ हैवं किलामृतत्वसाधनमात्मज्ञानं प्रियायै भार्याया उक्त्वा याज्ञवल्क्यः किं कृतवान्यत्पूर्वं प्रतिज्ञातं प्रव्रजिष्यन्नस्मीति तच्चकार विजहार प्रव्रजितवानित्यर्थः ॥

भाष्यार्थ—( पौर्वापर्याचें पर्यालोचन केलें असतां निर्विशेष आत्मतत्त्व हाच उपनिषदांचा अर्थ आहे असें उपपादन करून 'एतावदरे खलु अमृतत्वं' हें वाक्य घेऊन त्याचें व्याख्यान करितात—) ज्याअर्थीं शेकडों प्रकारांनीं जरी तत्त्वाचें निरूपण केलें तरी शेवटीं 'नेति नेति' अशाप्रकारें आत्मा हीच निष्ठा उपलब्ध होते, तर्कानें किंवा आगमानें दुसरी निष्ठा उपलब्ध होत नाहीं; त्याअर्थीं 'नेति नेति' अशा प्रकारें

जें आत्म्याचें परिज्ञान व सर्वसंन्यास तेंच अमृतत्वाचें साधन आहे, ह्या अर्थाचा उपसंहार करण्याची इच्छा करणारा याज्ञवल्क्य सांगतो— 'एतावद्-' हें जें 'नेति नेति' असें अद्वैत आत्मदर्शन—दुसऱ्या सहकारी कारणाची अपेक्षा न करणारें—आत्मदर्शन तेंच—फक्त तेवढेंच हे मैत्रेयि, अमृतत्वाचें साधन आहे. 'जें आपण (भगवान्) अमृतत्वसाधन जाणत असाल तेंच मला सांगा,' असें जें तूं विचारलें होतेंस तें हें एवढेंच आहे, असें तूं जाणावेंस.

'इति ह उक्त्वा-' खरोखर याप्रमाणें अमृतत्वसाधन आत्मज्ञान प्रिय भार्येला सांगून याज्ञवल्क्यानें काय केलें? 'मी प्रव्रजन करण्याची इच्छा करीत आहें' असें जें आरंभीं म्हटलें होतें त्याप्रमाणें केलें. 'विजहार-' याज्ञवल्क्य संन्यास करता झाला, असा भावार्थ.

परिसमाप्ता ब्रह्मविद्या संन्यासपर्यवसाना। एतावानुपदेश एतद्वेदानुशासनमेषा परमनिष्ठैष पुरुषार्थकर्तव्यतान्त इति। इदानीं विचार्यते शास्त्रार्थविवेकप्रतिपत्तये। यत आकुलानि हि वाक्यानि दृश्यन्ते "यावज्जीवमग्निहोत्रं जुहुयात्" "यावज्जीवं दर्शपूर्णमासाभ्यां यजेत" "कुर्वन्नेवेह कर्माणि जिजीविषेच्छतं समाः" "एतद्वै जरामर्यं सत्रं यदग्निहोत्रम्" इत्यादीन्यैकाश्रम्यज्ञापकानि ॥

भाष्यार्थ—संन्यासांत जिचें पर्यवसान आहे, अशी ब्रह्मविद्या परिसमाप्त झाली. उपदेश काय तो एवढाच. हेंच वेदाचें अनुशासन, ही परम निष्ठा व हा पुरुषार्थाच्या कर्तव्यतेचा अन्त आहे. आतां शास्त्रार्थाचें विवेकज्ञान होण्यासाठीं विचार केला जातो. ('अहो पण विरक्ताचा संन्यास ज्ञानाचें अन्तरंगसाधन आहे व केवळ ज्ञान अमृतत्वाचें साधन आहे, या शास्त्रार्थाविषयीं विवेकरूपज्ञान पूर्वींच सिद्ध झालें आहे. तेव्हां आतां पुनः त्याच संबंधानें विचार करण्याचें काय कारण?' अशी आशंका घेऊन सांगतात—) कारण शास्त्रवाक्यें आकुल—परस्पर विरुद्धार्थ दिसतात. (त्यामुळें विचार करणें भाग आहे. विचारावाचून

शास्त्रार्थविवेक होणें शक्य नाहीं. वाक्यांचें आकुलत्वच दाखवितात–) 'यावज्जीव अग्निहोत्राचें हवन करावें;' 'यावज्जीव दर्श व पूर्णमास यांनीं यजन करावें' 'कर्मे करीतच या लोकीं शंभर वर्षे जगण्याची इच्छा करावी.' 'अग्निहोत्र हें जरा व मरण येईपर्यंत चालणारें सत्र आहे' इत्यादि गार्हस्थ्य या एकाच आश्रमाचीं ज्ञापक वचनें आहेत.

अन्यानि चाश्रमान्तरप्रतिपादकानि वाक्यानि "विदित्वा व्युत्थाय प्रव्रजन्ति" "ब्रह्मचर्यं समाप्य गृही भवेद्गृहाद्वनी भूत्वा प्रव्रजेत्" "यदि वेतरथा ब्रह्मचर्यादेव प्रव्रजेद्गृहाद्वा वनाद्वा" इति "द्वावेव पन्थानावनुनिष्क्रान्ततरौ भवतः क्रियापथश्चैव पुरस्तात्संन्यासश्च तयोः संन्यास एवातिरेचयति" इति "न कर्मणा न प्रजया धनेन त्यागेनैकेऽमृतत्वमानशुः" इत्यादीनि ॥

भाष्यार्थ—तशींच दुसरींही दुसऱ्या आश्रमाचीं प्रतिपादक वचनें आहेत. 'आत्म्याला शास्त्र व आचार्य यांच्या द्वारा आपाततः जाणून व गृहस्थाश्रमांतून विपरीतपणें व्युत्थान करून प्रव्रजन करितात.' (क्रमसंन्यासपर श्रुतीचा निर्देश–) 'ब्रह्मचर्य संपवून गृहस्थ व्हावें, गृहस्थाश्रमापासून वानप्रस्थ होऊन प्रव्रजन करावें' (आतां क्रम सोडून संन्यासाचें विधान करणाऱ्या श्रुतिवाक्याचा निर्देश–) 'अथवा याच्या उलट ब्रह्मचर्यापासूनच प्रव्रजन करावें. किंवा गृहाश्रमांतून किंवा वनांतून तें करावें' (कर्म व संन्यास यांतील संन्यासालाच आधिक्य दाखविणारी श्रुति दाखवितात–) 'दोनच मार्ग शास्त्रांत क्रमानें अभ्युदय व निःश्रेयस यांचे उपाय म्हणून पुनः पुनः सांगितलेले आहेत. प्रथम क्रियामार्ग व संन्यास. त्यांतील संन्यासालाच श्रुति अधिक ठरविते.'

---

१ 'विदित्वा व्युत्थाय भिक्षाचर्यं चरन्ति' हें वाक्य पाठक्रमानें विद्वत्संन्यासपर आहे व अर्थक्रमानें विविदिषासंन्यासपर आहे; पण 'आत्मानमेव लोकमिच्छन्तः प्रव्रजन्ति' हें वाक्य तर विविदिषासंन्यासपरच आहे, असा विभाग जाणावा.

( ज्ञानद्वारा संन्यासाला मोक्षोपायत्व आहे याविषयीं श्रुति–) ' कर्मानें नाहीं, प्रजेनें नाहीं, व धनानेंही नाहीं तर त्यागानेंच मुख्य विद्वान् अमृतत्वास प्राप्त झाले.' इत्यादि वाक्यें ( दुसऱ्या–संन्यासाश्रमाचीं प्रतिपादक आहेत. येथील आदिशब्दानें ' तानि वा एतान्यवराणि तपांसि न्यास एवात्यरेचयत् ' इत्यादि वाक्यें घ्यावीं.)

तथा स्मृतयश्च " ब्रह्मचर्यवान्प्रव्रजति " " अविशीर्णब्रह्मचर्यो यमिच्छेत्तमावसेत् " " तस्याऽऽश्रमविकल्पमेके ब्रुवते " तथा– " वेदानधीत्य ब्रह्मचर्येण पुत्रपौत्रानिच्छेत्पावनार्थं पितॄणाम् । अग्नीनाधाय विधिवच्चेष्टयज्ञो वनं प्रविश्याथ मुनिर्बुभूषेत् " " प्राजापत्यां निरूप्येष्टिं सर्ववेदसदक्षिणाम् । आत्मन्यग्नीन्समारोप्य ब्राह्मणः प्रव्रजेद्गृहात्" इत्याद्याः । एवं व्युत्थानविकल्पक्रमयथेष्टाश्रमप्रतिपत्तिप्रतिपादकानि हि श्रुतिस्मृतिवाक्यानि शतश उपलभ्यन्त इतरेतरविरुद्धानि । आचारश्च तद्विदाम् । विप्रतिपत्तिश्च शास्त्रार्थप्रतिपत्तॄणां बहुविदामपि । अतो न शक्यते शास्त्रार्थो मन्दबुद्धिभिर्विवेकेन प्रतिपत्तुम् । परिनिष्ठितशास्त्रन्यायबुद्धिभिरेव ह्येषां वाक्यानां विषयविभागः शक्यतेऽवधारयितुम् । तस्मादेषां विषयविभागज्ञापनाय यथाबुद्धिसामर्थ्यं विचारयिष्यामः ॥

भाष्यार्थ––तशाच–' ब्रह्मचर्यवान् प्रव्रजन करतो ' '[1] ज्याचें ब्रह्मचर्य नष्ट झालें नाहीं त्यानें वाटेल त्या आश्रमांत रहावें ' ( आश्रमविकल्पाविषयीं प्रमाण–) ' कित्येक ब्रह्मचाऱ्याला आश्रमविकल्प सांगतात. ' इत्यादि स्मृति आकुल झालेल्या दिसतात. त्याचप्रमाणें–(क्रमसंन्यासाविषयीं–) 'ब्रह्मचर्यानें वेदांचें अध्ययन करून, पितरांना पावन करण्यासाठीं पुत्र व पौत्र यांची इच्छा करावी. अग्नींचें आधान करून ज्यानें यथाविधि यज्ञ केले आहेत त्यानें वनांत प्रवेश करून मुनि होण्याची इच्छा करावी.' 'ज्यांत सर्वस्व ही दक्षिणा दिली जाते ती प्राजा-

---

१ हें अक्रमसंन्यासाविषयीं स्मृतिप्रमाण आहे. २ यथेष्ट आश्रम स्वीकारण्याविषयीं हें वचन आहे.

पत्य इष्टि करून व आत्म्यामध्यें अग्नीचा समारोप करून ब्राह्मणानें गृहांतून प्रव्रजन करावें,' इत्यादि स्मृतिवचनें आहेत. ( याप्रमाणें दाखविलेल्या विरोधी वाक्यांचा उपसंहार करितात-) याप्रमाणें व्युत्थानाचा विकल्प, क्रम व यथेष्ट आश्रम घेणें यांचें प्रतिपादन करणारीं परस्पर विरुद्ध अशीं शेकडों श्रुति-स्मृतिवाक्यें उपलब्ध होतात. श्रुति-स्मृतिवेत्त्यांचा आचारही असाच परस्पर विरुद्ध दिसतो. ( कोणी ब्रह्मचर्यापासूनच प्रव्रजन करितात; तर कोणी ब्रह्मचर्य संपवून गार्हस्थ्याचा आश्रय करितात. कित्येक चारी आश्रमांचा क्रमानें आश्रय करितात. त्यामुळें त्याविषयीं विचार केल्यावाचून निर्णयाची सिद्धि होत नाहीं. ) शिवाय जैमिनिप्रभृति शास्त्रार्थवेत्ते जरी बहुवेत्ते होते तरी त्यांची ही विपरीत मति उपलब्ध होते. ( कोणी ऊर्ध्वरेतसांचे आश्रम आहेत असें म्हणतात कोणी नाहींत असें म्हणतात-) यास्तव-श्रुति, स्मृति व आचार यांमध्यें परस्पर विरोध दिसत असल्यामुळें मन्दबुद्धि पुरुषांना विवेकानें शास्त्रार्थ कळणें शक्य नाहीं. तर ज्यांची शास्त्रबुद्धि व न्यायबुद्धि विशाल अवलोकनानें सर्व प्रकारें निश्चित झालेली असते त्यांना या विरुद्ध वाक्यांचा विषयविभाग निश्चित करतां येणें शक्य आहे. तस्मात् या वाक्यांचा विषयविभाग ज्ञापित करण्याकरितां आपल्या बुद्धिसामर्थ्यानुसार आम्ही विचार करूं.

यावज्जीवश्रुत्यादिवाक्यानामन्यार्थासंभवात्क्रियावसान एव वेदार्थः। तं यज्ञपात्रैर्दहन्तीत्यन्त्यकर्मश्रवणाज्जरामर्यश्रवणाच्च लिङ्गाच्च भस्मान्तं शरीरमिति। न हि पारिव्राज्यपक्षे भस्मान्तता शरीरस्य स्यात्। स्मृतिश्च—“ निषेकादिश्मशानान्तो मन्त्रैर्यस्योदितो विधिः। तस्य शास्त्रेऽधिकारोऽस्मिञ्ज्ञेयो नान्यस्य कस्यचित् ” इति। समन्त्रकं हि यत्कर्म वेदेनेह विधीयते तस्य श्मशानान्ततां दर्शयति स्मृतिः॥

भाष्यार्थ—( विचार करणें अवश्य आहे, असें ठरलें असतां पूर्वपक्ष करितात-) 'यावज्जीव अग्निहोत्र करावें' इत्यादि वाक्यांचा

दुसरा अर्थ संभवत नसल्यामुळें वेदार्थ क्रियावसानच आहे. [ वेदार्थाचें पर्यवसान कर्मांतच होतें. ] ' त्याला यज्ञपात्रांसहवर्तमान जाळतात ' असें अन्त्यकर्म सांगितलेलें आहे. ' एतद्वै जरामर्यं सत्रं ' असें जरा-मरणपर्यंत अग्निहोत्राचें विधान केलेलें आहे. ' हें शरीर भस्मान्त होतें,' त्याचा भस्मामध्यें अन्त-पर्यवसान-होतो, असें लिंगही आहे. कारण पारिव्राज्य-संन्यास-पक्ष घेतल्यास शरीराची भस्मान्तता सिद्ध होत नाहीं; ( संन्याशाच्या शवाला जाळीत नाहींत तर समाधि देतात हें प्रसिद्ध आहे ) ' गर्भाधानापासून श्मशानापर्यंत ज्याचा विधि मंत्रांनीं सांगितलेला आहे त्याचाच या शास्त्रामध्यें अधिकार आहे, असें जाणावें दुसऱ्या कोणाचाही नाहीं. ' अशी स्मृति आहे. ही स्मृति वेदानें येथें जें कर्म समंत्रक सांगितलें आहे त्याची श्मशानान्तता दाखविते. ( श्मशानांत होणारी अंत्येष्टि हें कर्मही समंत्रक सांगितलें आहे. )

अधिकाराभावप्रदर्शनाच्चात्यन्तमेव श्रुत्यधिकाराभावोऽकर्मिणो गम्यते । अग्न्युद्वासनापवादाच्च " वीरहा वा एष देवानां योऽग्निमुद्वासयते " इति ॥

भाष्यार्थ---( वरील स्मृतिवचनांत ' नान्यस्य कस्यचित् ' दुसऱ्या कोणाचाही नाहीं, या शब्दांनीं सुचावलेला अर्थ सांगतात- ) अधिकाराचा अभाव प्रदर्शित केलेला असल्यामुळें अकर्मी पुरुषाचा श्रुतीमध्यें मुळींच अधिकार नाहीं, असें सूचित होतें. शिवाय ' जो अग्नीचा उच्छेद करतो-परित्याग करतो तो देवांचा वीरहा होतो ' अशा अर्थाच्या वाक्यानें अग्नीच्या उद्वासनाची-त्यागाची निंदा केलेली आहे.

ननु व्युत्थानादिविधानाद्वैकल्पिकक्रियावसानत्वं वेदार्थस्य । नान्यार्थत्वाद्व्युत्थानादिश्रुतीनाम् । "यावज्जीवमग्निहोत्रं जुहोति" "यावज्जीवं दर्शपूर्णमासाभ्यां यजेत " इत्येवमादीनां श्रुतीनां जीवनमात्रनिमित्तत्वाद्यदा न शक्यतेऽन्यार्थता कल्पयितुं तदा व्युत्थानादिवाक्यानां कर्मानधिकृतविषयत्वसंभवात् ॥

---

१ ईशोपनिषद्भाष्यार्थ पृ. ३८–३९ पहा.

भाष्यार्थ—( या पूर्वपक्षावर आक्षेप–) ' अहो पण व्युत्थानादि· कांचेंही दर्शन असल्यामुळें वेदार्थाचें क्रियावसानत्व वैकल्पिक होईल· [ म्ह० ' यावज्जीव कर्में करावीं व त्यांचा संन्यास करावा' असे दोन्ही प्रकारचे विधि उपलब्ध होत असल्यामुळें त्यांचा अधिकारिभेदानें विकल्प मानणेंच युक्त आहे; वेदाचा अर्थ क्रियापरच आहे, असा पक्षपात करण्यास कांहीं कारण नाहीं, असा भावार्थ. जेथें दोन तुल्य विधि असतील तेथें विकल्प होतो. पण येथें सावकाशत्व व अनवकाशत्व यांच्या योगानें तुल्यत्व नसल्यामुळें विकल्प संभवत नाहीं, असें पूर्वपक्षवादीच म्हणतो–) असें नाहीं. व्युत्थानादि श्रुतींना अन्यार्थत्व आहे. [ त्या श्रुति अनधिकाऱ्यांकारितां आहेत. ] ' यावज्जीव अग्निहोत्र करावें,' ' यावज्जीव दर्शपूर्णमासांनीं यजन करावें ' इत्यादि श्रुतींना जीवनमात्रनिमित्तत्व असल्यामुळें [ म्ह० जिवंत असणें याच निमित्ताला अनुलक्षून त्या प्रवृत्त झालेल्या असल्यामुळें ] त्यांना अन्यार्थत्व आहे–त्यांचा अर्थ अन्य आहे,–अशी जेव्हां कल्पना करतां येत नाहीं तेव्हां व्युत्थानादि वाक्यांचें कर्मानधिकृतविषयत्व संभवतें–[ म्ह० तीं वाक्यें कर्माचे अधिकारी नसलेले जे लोक त्यांना उद्देशून प्रवृत्त झालीं आहेत, असें म्हणतां येतें. त्यामुळें त्यांना वैकल्पिक म्हणतां येत नाहीं. अर्थात् वेदार्थाचें पर्यवसान कर्मांमध्यें आहे. ]

" कुर्वन्नेवेह कर्माणि जिजीविषेच्छतं समाः " इति च मन्त्रवर्णाजरया वा ह्येवास्मान्मुच्यते मृत्युना वेति च जरामृत्युभ्यामन्यत्र कर्मवियोगच्छिद्रासंभवात्कर्मिणां श्मशानान्तत्वं न वैकल्पिकम् । काणकुब्जादयोऽपि कर्मण्यनधिकृता अनुग्राह्या एव श्रुत्येति व्युत्थानाद्याश्रमान्तरविधानं नानुपपन्नम् ॥

भाष्यार्थ—(वरील वेदवाक्यांना वैकल्पिक म्हणतां येत नाहीं.याविषयीं दुसरा हेतु सांगतात–) ' येथें कर्में करीतच शंभर वर्षें जगण्याची इच्छा करावी ' असा मंत्रवर्णही असल्यामुळें कर्मविधि वैकल्पिक नाहीं.

एकतर जरेनें या कर्मविधीपासून मुक्त होतो किंवा मरणानें. अशारीतीनें जरा व मृत्यु यांवाचून दुसऱ्या कोणत्याही निमित्तानें कर्माचा वियोग, या छिद्राचा असंभव असल्यामुळें कर्मठांचें श्मशानान्तत्व वैकल्पिक नाहीं. ( ' अहो पण व्युत्थानादि वाक्यांना अनधिकृतविषयत्व कसें ? म्ह० तीं वाक्यें अनधिकाऱ्यांना उद्देशून प्रवृत्त झालीं आहेत, हें कसें म्हणतां ?' उत्तर–) काणा, कुबडा इत्यादि कर्मामध्यें अनधिकृत असलेल्या पुरुषांवरही अनुग्रह करणें श्रुतीला उचित आहे. त्यामुळें व्युत्थानादि दुसऱ्या आश्रमाचें विधानही अनुपपन्न नाहीं.

पारिव्राज्यक्रमविधानस्यानवकाशत्वमिति चेत् । न । विश्वजित्सर्वमेधयोर्यावज्जीवविध्यपवादत्वात् । यावज्जीवाग्निहोत्रादिविधेर्विश्वजित्सर्वमेधयोरेवापवादस्तत्र च क्रमप्रतिपत्तिसंभवो ब्रह्मचर्यं समाप्य गृही भवेद्गृहाद्वनी भूत्वा प्रव्रजेदिति । विरोधानुपपत्तेः । न ह्येवंविषयत्वे पारिव्राज्यक्रमविधानवाक्यस्य कश्चिद्विरोधः क्रमप्रतिपत्तेः ॥

भाष्यार्थ—(तीं वाक्यें अनधिकृत पुरुषांकरितां आहेत हें म्हणणें संभवत नाहीं. कारण 'ब्रह्मचर्यं समाप्य' इत्यादि वाक्यांत अधिकृत पुरुषांचाच क्रम सांगितला आहे; असा पूर्वपक्षावर आक्षेप घेतात–) 'अहो पण तसें म्हटल्यास म्ह० व्युत्थानादि वाक्यें काणा, कुबडा, आंधळा, इत्यादि अनधिकाऱ्यांना उद्देशून आहेत असें म्हटल्यास ब्रह्मचर्य संपवून गृही व्हावें, गृही होऊन वनी व्हावें व वनी होऊन प्रव्रजन करावें, असें पारिव्राज्याच्या क्रमाचें जें विधान केलें आहे, त्याला अवकाश उरत नाहीं.' म्हणून म्हणाल तर (त्याची दुसरी गति दाखवितात–) तें बरोबर नाहीं. कारण विश्वजित् यज्ञ व सर्वमेध यांना यावज्जीव विधीचें अपवादत्व आहे. ('यावज्जीव अग्निहोत्र करावें' हा उत्सर्ग –सामान्य नियम आहे. विश्वजित् व सर्वमेध हे त्याचे अपवाद आहेत. त्यांतील कोणताही जरी यज्ञ केला तरी त्यांत सर्वस्वाचें दान करावें लागतें. सर्वस्वच दिल्यावर अग्निहोत्राची साधनसंपत्तीच नाहींशी होते. त्या-

मुळें पारिव्राज्य अवश्य करावें लागतें. त्यासाठीं वरील क्रमाचें विधान आहे, असा भावार्थ. हेंच स्पष्ट करितात–) यावज्जीव अग्निहोत्रादिविधीचा विश्वजित् व सर्वमेध हाच अपवाद आहे, व त्यामध्यें 'ब्रह्मचर्य संपवून गृही व्हावें, गृहांतून वनी होऊन प्रव्रजन करावें' या क्रमाच्या प्रतिपत्तीचा संभव आहे. ('पण क्रमविधीची अशीच व्यवस्था लावावी, याविषयीं प्रमाण काय ?' उत्तर–) कारण वरील दोन प्रकारच्या विधिवाक्यांत विरोध येणें योग्य नाहीं. पारिव्राज्यक्रमविधिवाक्यांना एवंविषयत्व आहे म्ह० त्यांचा वरील निष्काञ्चन लोक हा विषय आहे, असें म्हटलें असतां क्रमप्रतिपत्तीला कोणत्याही प्रकारचा विरोध येत नाहीं.

अन्यविषयपरिकल्पनायां तु यावज्जीवविधानश्रुतिः स्वविषयात्संकोचिता स्यात् । क्रमप्रतिपत्तेस्तु विश्वजित्सर्वमेधविषयत्वान्न काश्चिद्बाधः॥

भाष्यार्थ—('गृहस्थही जर विरक्त असेल तर त्याला पारिव्राज्य विहित आहे, अशा रीतीनें क्रमाचा विषय कां मानूं नये ?' उत्तर–) अन्यविषयाची कल्पना केल्यास 'यावज्जीव अग्निहोत्र करावें' असें यावज्जीव विधान करणारी श्रुति आपल्या विषयापासून संकुचित होते. ('पण इकडे यावज्जीव विधीचा संकोच होऊं नये म्हणून अन्य विषयाची कल्पना करूंच नये असें म्हटल्यास तिकडे क्रमविधीचा संकोच होतो' म्हणून म्हणाल तर सांगतों–) क्रमप्रतिपत्तीचा विषय विश्वजित्, सर्वमेध हा आहे. त्यामुळें कांहीं बाध येत नाहीं.

नाऽऽत्मज्ञानस्यामृतत्वहेतुत्वाभ्युपगमात् । यत्तावदात्मेत्येवोपासीतेत्यारभ्य स एष नेति नेत्येतदन्तेन ग्रन्थेन यदुपसंहृतमात्मज्ञानं तदमृतत्वसाधनमित्यभ्युपगतं भवता ॥

भाष्यार्थ—(तुम्ही ज्ञान झाल्यानंतर कर्मांच्या त्यागाचा–विद्वत्संन्यासाचा–निषेध करितां कीं जिज्ञासा झाली असतां जो विविदिषासंन्यास केला जातो त्याचा निषेध करितां ? असा विकल्प करून सिद्धान्ती पहिल्या पक्षीं पूर्वपक्षावर दूषण देतात–) हा पूर्वपक्ष बरोबर नाहीं. कारण

आत्मज्ञान अमृतत्वाचें निमित्त–साधन आहे, असें मानलेलें आहे (विद्वत्संन्यास अवश्यंभावी असल्यामुळें वेदार्थ कर्मावसानच नाहीं. आतां या संक्षिप्त वाक्याचेंच विवरण करितात–) 'आत्मेत्येवोपासीत' (बृ. अ. १. ब्राह्म. ४ कं. ७ पृ. २४१) येथून आरंभ करून 'स एष नेति नेति' (अ. ४ पृ.३५५) येथपर्यंत जो ग्रंथ आहे त्या ग्रंथानें ज्या आत्मज्ञानाचा उपसंहार केला आहे तें अमृतत्वाचें साधन आहे, असें ज्याअर्थीं तुम्हींही स्वीकारलेलें आहे (त्याअर्थीं ज्ञान झाल्यावर कर्मानुष्ठान निरवकाश आहे, असा भावार्थ.)

तत्रैतावदेवामृतत्वसाधनमन्यनिरपेक्षमित्येतन्न मृष्यते। तत्रभवन्तं पृच्छामि किमर्थमात्मज्ञानं मर्षयति भवानिति ॥

भाष्यार्थ—(अहो पण आम्ही कर्मसहित आत्मज्ञान अमृतत्वाचें साधन आहे, असें मानतों. केवल आत्मज्ञान अमृतत्वाचें साधन आहे, असें मानीत नाहीं. त्यामुळें ज्ञानोत्तरही कर्मत्यागाची सिद्धि होत नाहीं अशी शंका घेतो–) आत्मज्ञान अमृतत्वाचें जरी साधन असलें तरी अन्यनिरपेक्ष–कर्मनिरपेक्ष आत्मज्ञानच अमृतत्वाचें साधन आहे, हें म्हणणें आम्हांला सहन होत नाहीं. ('अहो पण कर्मनिरपेक्ष आत्मज्ञान मोक्षाचें साधन आहे, हें जर तुम्हांला सहन होत नाहीं तर ज्ञानाला मोक्षसाधन तरी कशाला मानता ?' असें सिद्धान्ती ज्ञानकर्मसमुच्चयवाद्यास विचारतो–) कर्मनिरपेक्ष ज्ञान मोक्षसाधन आहे, हें जर मान्य नसेल तर आम्ही तुला असें विचारतों कीं, 'आपण आत्मज्ञान तरी कशासाठीं सहन करतां ?'

शृणु तत्र कारणम्। यथा स्वर्गकामस्य स्वर्गप्राप्त्युपायमजानतोऽग्निहोत्रादि स्वर्गप्राप्तिसाधनं ज्ञापयति तथेहाप्यमृतत्वप्रतिपित्सोरमृतत्वप्राप्त्युपायमजानतो यदेव भगवान्वेद तदेव मे ब्रूहीत्येवमाकाङ्क्षितममृतत्वसाधनमेतावदर इत्येवमादौ वेदेन ज्ञाप्यत इति ॥

---

१ 'परांगं चात्मविज्ञानादन्यत्रेत्यवधारणात्' असा न्याय आहे. त्याचा अर्थ—आत्मविज्ञानाला सोडून बाकी सर्व कर्माचें अंग आहे, असा निश्चय केलेला आहे.

भाष्यार्थ—(‘आत्मज्ञान शास्त्रीय असल्यामुळें आम्ही तें मोक्षसाधन आहे असें मानतों,’ असें पूर्वपक्षकार म्हणतो—) त्याचें कारण ऐक—स्वर्गाची इच्छा करणाऱ्या पण स्वर्गप्राप्तीचा उपाय न जाणणाऱ्या पुरुषाला वेद अग्निहोत्रादि हें स्वर्गाच्या प्राप्तीचें साधन आहे असें ज्याप्रमाणें ज्ञापित करतो—ज्ञान करून देतो त्याप्रमाणें येथेंही अमृतत्वाच्या प्राप्तीची इच्छा करणाऱ्या पण अमृतत्वाच्या प्राप्तीचा उपाय न जाणणाऱ्या पुरुषाला ‘भगवान् जें जाणत असेल तेंच मला सांग’ असें म्हणून आकांक्षित असलेलें अमृतत्वाचें साधन ‘एतावदरे अमृतत्वसाधनं नातः परमस्ति-’ अमृतत्वसाधन एवढेंच आहे, या पलीकडे नाहीं इत्यादि वाक्यांत वेदानें ज्ञापित केलें आहे.

एवं तर्हि यथा ज्ञापितमग्निहोत्रादि स्वर्गसाधनमभ्युपगम्यते तथेहाप्यात्मज्ञानम् । यथा ज्ञाप्यते तथाभूतमेवामृतत्वसाधनमात्मज्ञानमभ्युपगन्तुं युक्तम् । तुल्यप्रामाण्यादुभयत्र ॥

भाष्यार्थ—( अहो पण शास्त्रानुसार आत्मज्ञानाचा अंगीकार करावयाचा म्हटल्यास कर्मनिरपेक्ष आत्मज्ञानच मोक्षाचें साधन आहे, असें ठरतें, असें म्हणून परिहार करितात—) असें जर असेल तर वेदानें सांगितलेलें अग्निहोत्रादि हें स्वर्गसाधन आहे, असें ज्याप्रमाणें मानलें जातें तसें येथेंही आत्मज्ञान मानावें. वेदाकडून जसें सांगितलें जातें तसेंच आत्मज्ञान अमृतत्वसाधन मानणें उचित आहे. कारण ज्ञान व कर्म या दोघांविषयीं[1] वेदाचें प्रामाण्य तुल्य आहे.

यद्येवं किं स्यात् । सर्वकर्महेतूपमर्दकत्वादात्मज्ञानस्य विद्योद्भवे कर्मनिवृत्तिः स्यात् । दाराग्निसंबद्धानां तावदग्निहोत्रादिकर्मणां भेदबुद्धिविषयसंप्रदानकारकसाध्यत्वम् । अन्यबुद्धिपरिच्छेद्यां ह्यग्न्यादिदेवतां संप्रदानकारकभूतामन्तरेण न हि तत्कर्म निर्वर्त्यते । यथा हि

१ किंवा ज्ञान अमृतत्वाचें साधन आहे व तें कर्मनिरपेक्षच अमृतत्वसाधन आहे, या दोन्हीविषयीं वेदाचें प्रामाण्य तुल्य आहे.

संप्रदानकारकबुद्ध्या संप्रदानकारकं कर्मसाधनत्वेनोपदिश्यते सेह विद्यया निवर्त्यते "अन्योऽसावन्योऽहमस्मीति न स वेद" "देवास्तं पराद्युर्योऽन्यत्राऽऽत्मनो देवान्वेद" "मृत्योः स मृत्युमाप्नोति य इह नानेव पश्यति" "एकधैवानुद्रष्टव्यं" "सर्वमात्मानं पश्यति" इत्यादिश्रुतिभ्यः ॥

भाष्यार्थ—(अहो पण यथाशास्त्र ज्ञानाचा स्वीकार जरी केला तरी तें केवल–कर्मनिरपेक्ष कैवल्याचें कारण कसें? असें पूर्वपक्षवादी विचारतो–) असें जरी असलें तरी काय झालें? (शास्त्रानुसार ज्ञानाचा स्वीकार करणारास सांगतात–) आत्मज्ञान कर्मांच्या सर्व हेतूंचा उच्छेद करणारें असल्यामुळें विद्येचा उद्भव होतांच कर्मांची निवृत्ति अवश्य होईल. (आत्मज्ञान कर्महेतूंचा नाश करणारें आहे हें दाखविण्यासाठीं अगोदर कर्महेतु दाखवितात–) पत्नी व अग्नि यांशीं संबंध ठेवणाऱ्या अग्निहोत्रादि कर्मांना भेदबुद्धीचा विषय होणारें जें संप्रदान-कारक[1] तत्साध्यत्व आहे. (त्याचें संप्रदानकारकसाध्यत्वच सिद्ध करितात–) हा माझ्याहून अन्य आहे, या बुद्धीनें परिच्छेद पावणाऱ्या संप्रदानकारकभूत अग्न्यादि देवतेवाचून तें अग्निहोत्रादि कर्म केव्हांही केलें जात नाहीं. कारण ज्या संप्रदान या कारकबुद्धीनें संप्रदान हें कारक कर्माचें साधन म्हणून सांगितलें जातें ती बुद्धि येथें–विद्यादर्शंत विद्येकडून निवृत्त केली जाते. 'हा निराळा व मी निराळा असें जो जाणतो तो आत्म्याला जाणत नाहीं.' (बृ. अ. १ ब्रा. ४ पृ. ३३५) 'देव त्याला दूर करितात जो देवांना आत्म्याहून पृथक् जाणतो' (बृ. अ. २ पृ. १८१) 'जो येथें नानासें पाहतो' (तो मरणापासून मरणास प्राप्त होतो बृ. अ. ४ ब्रा. ४ कं. १९ पृ. ३२५) हें तत्त्व एकप्र-

[1] कर्ता, कर्म, करण, संप्रदान, अपादान व अधिकरण अशीं सहा कारकें आहेत. ज्याला उद्देशून कांहीं द्यावयाचें तें संप्रदान. जसें अग्नीला उद्देशून आहुति द्यावयाची झाल्यास अग्नि हें संप्रदान कारक आहे. अग्निहोत्रादि कर्में अशा देवतारूप संप्रदानावाचून होतच नाहींत. म्हणून तीं तत्साध्य आहेत.

कारोंनच शास्त्र व आचार्य यांच्या उपदेशाच्या अनुसार पहावें ( बृ. अ.४ब्रा.४कं.२०पृ.३२६) 'सर्वाला आत्माच पाहतो' (बृ. अ.४ ब्रा.४ कं.२३ पृ.३६२) इत्यादि श्रुतींवरून कारकबुद्धि निवृत्त केली जाते हें सिद्ध होतें.

न च देशकालनिमित्ताद्यपेक्षत्वं व्यवस्थितात्मवस्तुविषयत्वादात्मज्ञानस्य । क्रियायास्तु पुरुषतन्त्रत्वात्स्याद्देशकालनिमित्ताद्यपेक्षत्वम् । ज्ञानं तु वस्तुतन्त्रत्वान्न देशकालनिमित्ताद्यपेक्षते । यथाऽग्निरुष्ण आकाशोऽमूर्त इति तथाऽऽत्मविज्ञानमपि ॥

भाष्यार्थ—( अहो पण 'शुचौ देशे प्रतिष्ठाप्य' इत्यादि स्मृतिवचनें असल्यामुळें शुचि प्रदेशीं, दिवसा, शास्त्र व आचार्य यांच्या साह्यानें उत्पन्न झालेलें ज्ञान पुरुषार्थाचें साधन आहे. तेव्हां तें भेदबुद्धीचा उपमर्द करणारें आहे, असें कसें म्हणतां ? उत्तर–) कूटस्थ नित्य आत्मवस्तु हा आत्मज्ञानाचा विषय असल्यामुळें आत्मज्ञानाला देश, काल, निमित्त इत्यादिकांची अपेक्षा नाहीं. ( यत्रैकाग्रता तत्राविशेषात्—ब्र. सू. अ. ४ पा. १ सू. ११. ध्यान, उपासना इत्यादिकांना पूर्वादि दिशा, प्रातःकालादि काल, शुचि देश इत्यादिकांचा नियम नाहीं. कारण जेथें चित्ताची एकाग्रता होईल तेथें ध्यानादि करावें, कारण दिक्-देश-काल इत्यादिकांविषयीं कांहीं विशेष सांगितलेला नाहीं, असा न्याय आहे. त्यामुळें आत्मज्ञानाचें साधन अशी जी समाधि तिलाही जर देशादिकांची अपेक्षा नाहीं तर कूटस्थवस्तुतंत्र असलेल्या ज्ञानाची गोष्ट तर दूरच राहिली, असा भावार्थ. 'अहो पण हें विमत ज्ञान शुचि देशादिकांची अपेक्षा करणारें आहे, कारण त्याला शास्त्रार्थत्व आहे. धर्माप्रमाणें,' असें अनुमान कोणी करील तर त्यांत पुरुषतंत्रत्व ही उपाधि आहे, असें सांगतात–) कर्म पुरुषतन्त्र असल्यामुळें त्याला देश-काल-निमित्तादिकांची अपेक्षा असणें योग्य आहे; पण ज्ञान वस्तुतन्त्र असल्यामुळें तें देश-काल-निमित्तादिकांची अपेक्षा

करीत नाहीं. ( विमत—ज्ञान शुचि देशादिकांची अपेक्षा करीत नाहीं. कारण त्याला प्रमाणत्व आहे. उष्ण अग्नीच्या ज्ञानाप्रमाणें, असें प्रत्यनु[1]मान सांगतात—) अग्नि उष्ण आहे, आकाश अमूर्त आहे, हें जसें ज्ञान तसेंच आत्मविज्ञानही ज्ञान आहे. ( अग्नि उष्ण आहे, या ज्ञानाला जशी पवित्र स्थान, दिवस इत्यादिकांची अपेक्षा नाहीं त्याप्रमाणें आत्मज्ञानाला वस्तुतः पवित्र प्रदेशादिकांची अपेक्षा नाहीं, असा भावार्थ ).

नन्वेवं सति प्रमाणभूतस्य कर्मविधेर्निरोधः स्यात् । न च तुल्यप्रमाणयोरितरेतरनिरोधो युक्तः ॥

भाष्यार्थ—( आत्मज्ञान सर्व कर्मांच्या हेतूंचा उपमर्द करणारें आहे, या म्हणण्यावर वादी दोष देतो—) अहो पण असें म्हटल्यास कर्मविधीचा निरोध होईल. पण दोन तुल्य प्रमाणांनीं परस्परांचा निरोध करणें योग्य नव्हे. (कारण कर्मविधीचा निरोध इष्टच आहे, असें म्हटल्यास कर्मकांडानें ज्ञानकांडाचाही निरोध होईल, असा भावार्थ. )

न । स्वाभाविकभेदबुद्धिमात्रनिरोधकत्वात् । न हि विध्यन्तरानिरोधकमात्मज्ञानं स्वाभाविकभेदबुद्धिमात्रं निरुणद्धि॥ तथाऽपि हेत्वपहारात्कर्मानुपपत्तेर्विधिनिरोध एव स्यादिति चेत् । न । कामप्रतिषेधात्काम्यप्रवृत्तिनिरोधवददोषात् ॥ यथा स्वर्गकामो यजेतेति स्वर्गसाधने यागे प्रवृत्तस्य कामप्रतिषेधविधेः कामे विहते काम्ययागानुष्ठानप्रवृत्तिर्निरुध्यते । न चैतावता काम्यविधिर्निरुद्धो भवति ॥

भाष्यार्थ—( पण आत्मज्ञान साक्षात् कर्मविधीचा निरोध करणारें आहे, असें तूं समजतोस कीं तें अर्थात् निरोध करणारें आहे, असें म्हणतोस ? असा विकल्प करून त्यांतील पहिल्या पक्षाला दूषित करितात—) असें नाहीं. म्हणजे आत्मज्ञान साक्षात् कर्मविधीला निरोध करीत नाहीं.तर तें केवळ स्वाभाविक भेदबुद्धीचा निरोध करणारें आहे. ( हेंच अधिक विशद करितात—) आत्मज्ञान दुसऱ्या विधीला निरोध करणारें नाहीं. तर तें केवळ स्वाभाविक भेदबुद्धीला निरोध करतें.

---

१ प्रत्यनुमान म्ह॰ पहिल्या अनुमानाच्या उलट अनुमान.

( तें अर्थात् निरोध करतें, हा दुसरा पक्ष घेऊन त्याचें निरसन–) तथापि–तें साक्षात् जरी विधिनिरोधक नसलें तरी–कर्मांच्या हेतूचा अपहार केल्यामुळें कर्माची अनुपपत्ति होते. त्यामुळें अर्थात् विधिनिरोधच होतो, म्हणून म्हणाल, तर तें बरोबर नाहीं. कारण ('कामी होऊं नये' असा कामाचा प्रतिषेध केलेला असल्यामुळें कांहीं लोकांच्या काम्य प्रवृत्तीला जरी निरोध होत असला तरी तेवढ्यानें सर्वांच्याच काम्य प्रवृत्तीचा निरोध जसा होत नाहीं त्याप्रमाणें आत्मज्ञानामुळें कांहीं लोकांच्या कर्मविधीला जरी निरोध होत असला तरी सर्वांच्या कर्मविधीला प्रतिबंध होत नाहीं.) त्यामुळें कामप्रतिषेधानें काम्यवृत्तीच्या निरोधाप्रमाणेंच यांतही कांहीं दोष नाहीं.

(दृष्टान्तच अधिक स्पष्ट करितात–) जसें–'ज्याला स्वर्गाची इच्छा असेल त्यानें याग करावा' या विधीनें स्वर्गसाधनभूत यागांत प्रवृत्त झालेल्या पुरुषाचा काम कामप्रतिषेधविधीमुळें नष्ट झाला असतां काम्य यागाचें अनुष्ठान करण्याविषयींची प्रवृत्ति निरुद्ध होते, पण तेवढ्यानें काम्यविधिच निरुद्ध होत नाहीं. (कारण प्रतिषेधशास्त्राविषयीं अनभिज्ञ पुरुषाच्या तो उपयोगी असतो, असा याचा अभिप्राय).

कामप्रतिषेधविधिना काम्यविधेरनर्थकत्वज्ञानात्प्रवृत्त्यनुपपत्तेर्निरुद्ध एव स्यादिति चेत् । भवत्वेवैवं कर्मविधिनिरोधोऽपि । यथा कामप्रतिषेधे काम्यविधेरेवं प्रामाण्यानुपपत्तिरिति चेत् । अननुष्ठेयत्वेऽनुष्ठातुरभावादनुष्ठानविध्यानर्थक्यादप्रामाण्यमेव कर्मविधीनामिति चेत् । न । प्रागात्मज्ञानात्प्रवृत्त्युपपत्तेः ॥

भाष्यार्थ—(पण हा अभिप्राय न जाणतां वादी शंका करतो–) कामप्रतिषेधविधीनें काम्यविधीला अनर्थकत्व आहे, तो व्यर्थ आहे, असें ज्ञान होत असल्यामुळें पुरुषाची काम्य कर्मांत प्रवृत्तिच होऊं शकत नाहीं. त्यामुळें तो काम्यविधि निरुद्धच होतो, असें म्हणशील तर(सिद्धान्ती आपला अभिप्राय गुप्त ठेवूनच म्हणतो–)मग त्याप्रमाणें कर्मविधिनिरोधही खुशाल होऊं दे. (तरी सुद्धां सिद्धान्त्याचा आशय

न जाणून पूर्ववादी पुनः शंका करतो–) ज्याप्रमाणें कामाचा प्रतिषेध केला असतां काम्यविधि अप्रमाण होतो त्याप्रमाणें ज्ञानानें कर्मविधीचा निरोध केला असतां त्याच्या प्रामाण्याची अनुपपत्ति होते, म्हणून म्हणशील म्हणजे कर्म अनुष्ठान करण्यास योग्य नाहीं असें सिद्ध झालें असतां अनुष्ठान करणाराचा अभाव होतो; त्यामुळें अनुष्ठानविधीला आनर्थक्य येतें आणि अनुष्ठानविधि व्यर्थ ठरल्यामुळें कर्मविधींना अप्रामाण्यच येतें म्हणून म्हणशील तर तें बरोबर नाहीं. कारण आत्मज्ञान होण्यापूर्वीं कर्मविधीमध्यें प्रवृत्ति होऊं शकते.

स्वाभाविकस्य क्रियाकारकफलभेदविज्ञानस्य प्रागात्मज्ञानात्कर्महेतुत्वमुपपद्यत एव । यथा कामविषये दोषविज्ञानोत्पत्तेः प्राक्काम्यकर्मप्रवृत्तिहेतुत्वं स्यादेव स्वर्गादीच्छायाः स्वाभाविक्यास्तद्वत् ॥

भाष्यार्थ—आत्मज्ञान होण्यापूर्वीं स्वाभाविक क्रिया, कारक, फल या भेदज्ञानाला कर्महेतुत्व संभवतेंच [ म्ह॰ तें भेदज्ञान कर्मप्रवृत्तीचें कारण होऊं शकते. ] जसें–कामाविषयींच्या दोषाचें विज्ञान होण्यापूर्वीं स्वाभाविक स्वर्गादि इच्छेला काम्यकर्मप्रवृत्तीचें हेतुत्व असतेंच त्याप्रमाणें आत्मज्ञानाच्या पूर्वीं भेदविज्ञानाला कर्महेतुत्व आहे.

तथा सत्यनर्थार्थो वेद इति चेत् । न । अर्थानर्थयोरभिप्रायतन्त्रत्वात् । मोक्षमेकं वर्जयित्वाऽन्यस्याविद्याविषयत्वात् । पुरुषाभिप्रायतन्त्रौ ह्यर्थानर्थौ । मरणादिकाम्येष्टिदर्शनात् । तस्माद्यावदात्मज्ञानविधेराभिमुख्यं तावदेव कर्मविधयः । तस्मान्नाऽऽत्मज्ञानसहभावित्वं कर्मणामित्यतः सिद्धमात्मज्ञानमेवामृतत्वसाधनमेतावदरे खल्वमृतत्वमिति । कर्मनिरपेक्षत्वाज्ज्ञानस्य ॥

भाष्यार्थ—(अज्ञानावस्थेंतच कर्मविधींची प्रवृत्ति होते, याविषयीं अनिष्ट प्रसंगाची शंका वादी घेतो–) पण तसें मानल्यास वेद अनर्थार्थ आहे, असें होईल, असें म्हणशील तर तें बरोबर नाहीं. कारण अर्थ व

---

१ पुरुषांना अनुष्ठेय असलेलीं जीं अग्निहोत्रादि कर्मे त्यांच्या विधींना.

अनर्थ हे पुरुषाच्या अभिप्रायाच्या अधीन आहेत. (अर्थात् पुरुषाच्या अभिप्रायामुळें कर्मविधिही पुरुषार्थोपयोगी आहे, असें सिद्ध होतें. त्यामुळें तूं समजतोस तशी अनिष्टापत्ति येत नाहीं. 'अहो पण प्रत्येक अर्थ पुरुषाच्या अभिप्रायाधीन आहे, असें म्हटल्यास मोक्षालाही वास्तविक पुरुषार्थत्व नाहीं, असें होईल, अशी आशंका घेऊन सांगतात--) एक मोक्ष सोडून दुसऱ्या सर्वाला अविद्याविषयत्व आहे. (आतां अर्थ व अनर्थ पुरुषाच्या अभिप्रायाधीन आहेत. कारण महाप्रस्थानरूप मरणाची इच्छा करून--त्याला काम्य करून--जिवंत स्थितींतच त्यासंबंधी इष्टीचें विधान महाभारतादिकांत आढळतें. तस्मात् पुरुष जोंवर आत्मज्ञानविधीच्या अभिमुख--सन्मुख झाला नाहीं तोंवरच कर्मविधि आहेत; आणि त्यामुळेंच कर्मांना आत्मज्ञानसहभावित्व नाहीं, (--कर्मं व ज्ञान यांचा समुच्चय नाहीं.) म्हणून 'एतावदरे खलु अमृतत्वं-' हे मैत्रेयि, अमृतत्वसाधन काय तें एवढेंच असें प्रमाण असल्यामुळें आत्मज्ञानच अमृतत्वसाधन आहे ही गोष्ट सिद्ध झाली. कारण ज्ञानाला कर्मनिरपेक्षत्व आहे.

अतो विदुषस्तावत्पारिव्राज्यं सिद्धं संप्रदानादिकर्मकारकजात्यादिशून्याविक्रियब्रह्मात्मदृढप्रतिपत्तिमात्रेण वचनमन्तरेणाप्युक्तन्यायतः । तथा च व्याख्यातमेतद्येषां नोऽयमात्माऽयं लोक इति हेतुवचनेन पूर्वे विद्वांसः प्रजामकामयमाना व्युत्तिष्ठन्तीति पारिव्राज्यं विदुषामात्मलोकाववोधादेव ॥

भाष्यार्थ---(याप्रमाणें ज्ञानाला कर्मविरोधित्व व कर्मनिरपेक्षत्व आहे, असें सिद्ध झालें असतां फलित सांगतात--) आत्मज्ञान अमृतत्वाचें साधन आहे, असा सिद्धान्त आहे, इत्यादि वर सांगितलेल्या न्यायानें विद्वानाचें पारिव्राज्य--संन्यास--तर प्रमाणभूत वचनावाचूनही संप्रदानादि कर्माचें कारक, ब्राह्मणादि जाति इत्यादिकांनीं रहित अविक्रिय ब्रह्मच आत्मा आहे, अशा केवळ दृढ आत्मज्ञानानेंच सिद्ध झालें. (अर्थात् वरील न्यायानें केवळ आत्मज्ञानच कैवल्याचें कारण आहे, असें ठरतें.

त्यानंतर विद्वानाच्या कर्मानुष्ठानाला अवकाश नसतो.)आणि तसेंच 'येषां नोऽयं आत्मायं लोकः' या हेतुवचनानें पूर्वींचे विद्वान् प्रजेची इच्छा न करणारे असे होत्साते व्युत्थान करितात अशाप्रकारें आत्मलोकाच्या अवबोधामुळेंच विद्वानांचें हें पारिव्राज्य होतें, असें व्याख्यान केलें आहे;(येथील विद्वान् म्ह० आत्मसाक्षात्काराची इच्छा करणारे—आत्म्याचा परोक्ष निश्चय केलेले.आत्मलोकाचा अवबोध म्ह० परोक्ष निश्चय, तो व्युत्थानाचा हेतु होतो.)

तथा च विविदिषोरपि सिद्धं पारिव्राज्यम् । "एतमेवाऽऽत्मानं लोकमिच्छन्तः प्रव्रजन्ति" इति वचनात् । कर्मणां चाविद्वद्विषयत्वमवोचाम । अविद्याविषये चोत्पत्त्याप्तिविकारसंस्कारार्थानि कर्माणीत्यतः । आत्मसंस्कारद्वारेणाऽऽत्मज्ञानसाधनत्वमपि कर्मणामवोचाम यज्ञादिभिर्विविदिषन्तीति ॥

भाष्यार्थ—( ' शान्तो दान्त उपरतः०' इत्यादि वाक्यांत शमादिकांप्रमाणें उपरतीलाही तत्त्वसाक्षात्काराचें नियतसाधनत्व सांगितलें आहे म्हणून म्हणतात—) तसेंच विविदिषूचेंही पारिव्राज्य सिद्ध झालें. (ज्यानें वेदाचें अध्ययन केलें आहे, ज्याला विचाराला प्रवृत्त करणारें आपातिक—सामान्य- ज्ञान आहे असा जो मुमुक्षु—मोक्षाचें साधन अशा तत्त्वसाक्षात्काराची अपेक्षा करणारा—ज्याला आत्म्याचें परोक्ष ज्ञानही नसतें, असा विविदिषु येथें विवक्षित आहे. ) कारण ' याच आत्मलोकाची इच्छा करणारे प्रव्रजन करितात ' असें त्याविषयीं वचन आहे. शिवाय कर्मांना अविद्वद्विषयत्व आहे, असें आम्हीं सांगितलें आहे. ( त्यामुळें अविद्येच्या विरुद्ध असलेल्या विद्येची इच्छा करणारानें म्हणजेच विविदिषूनें केवल शरीरधारणासाठीं अवश्य असलेल्या कर्मांहून इतर सर्व कर्मांचा त्याग करावा ) तसेंच उत्पत्ति, आप्ति, विकार व संस्कार यांसाठीं असलेलीं कर्में अविद्याविषयांत संभवतात, ( तीं असाध्य आत्मवस्तूमध्यें संभवत नाहींत. यास्तव त्या असाध्य आत्मवस्तुविषयीं जिज्ञासा झाली असतां

तीं त्याच्यच होत, असा भावार्थ. 'मग असें जर आहे तर कर्मांचा मोक्षाख्य उत्तम फलाशीं संबंध कसा?' तें सांगतात–) चित्तसंस्काराच्या द्वारा कर्मांना आत्मज्ञानसाधनत्वही आहे, हें आम्हीं 'यज्ञादिकांनीं जाणण्याची इच्छा करितात' या वाक्याच्या व्याख्यानाचे वेळीं (पृ.३४०-३४१अ.४) सांगितलें आहे. (कर्में साक्षात् जरी नाहींत तरी चित्तशुद्धीच्या द्वारा आत्मज्ञानाला हेतु होतात म्हणजे त्यांचा मोक्षाख्य परम पुरुषार्थाशीं परंपरेनें संबंध आहे.)

अथैवं सत्यविद्वद्विषयाणामाश्रमकर्मणां बलाबलविचारणायामात्मज्ञानोत्पादनं प्रति यमप्रधानानाममानित्वादीनां मानसानां च ध्यानज्ञानवैराग्यादीनां संनिपत्योपकारकत्वम् । हिंसारागद्वेषादिबाहुल्याद्बहुक्लिष्टकर्मविमिश्रिता इतर इत्यतः पारिव्राज्यं मुमुक्षूणां प्रशंसन्ति— "त्याग एव हि सर्वेषामुक्तानामपि कर्मणाम् । वैराग्यं पुनरेतस्य मोक्षस्य परमोऽवधिः ॥"

भाष्यार्थ—(‘अहो पण भगवद्गीतेंत संन्यास व कर्मयोग हे दोन्ही निःश्रेयसकर आहेत, असें सांगितलेलें असल्यामुळें विविदिषु मुमुक्षूंना पारिव्राज्यच कर्तव्य आहे असें कसें म्हणतां?’ उत्तर–) वर सांगितलेल्या प्रकारानें जसा विद्वत्संन्यास तसाच विविदिषा संन्यास सिद्ध झाला असतां अविद्वद्विषय–अविद्वानांनाच अवश्य कर्तव्य असलेलीं जीं आश्रम कर्में त्यांचें आत्मज्ञानोत्पादनासाठीं बलाबल पाहूं लागलें असतां म्ह० त्यांतील अन्तरंग साधनें कोणतीं व बहिरंग साधनें कोणतीं याविषयीं विचार केला असतां यमप्रधान–अहिंसा, अस्तेय, ब्रह्मचर्य इत्यादि यम ज्यांत प्रधान आहेत अशा–अमानित्व, अदंभित्व इत्यादिकांना व ध्यान-ज्ञान-वैराग्य-दमादि मानसधर्मांना संनिपत्योपकारकत्व आहे. (म्हणजे तीं ज्ञानोत्पादनाच्या साक्षात् उपयोगीं आहेत.) पण दुसरे नियमप्रधान आश्रमधर्म हिंसा, राग, द्वेष इत्यादिकांच्या बाहुल्यामुळें पुष्कळशा पापकर्मानें अतिशय मिश्रित झालेले असतात. त्यासाठीं मुमुक्षूंच्या पारिव्राज्याची

प्रशंसा करितात. ( कर्मयोगाच्या अपेक्षेनें विशेष प्रकारच्या अधिकाऱ्यांसाठीं संन्यास कसा प्रशस्त मानला आहे तेंच सांगतात–) 'आश्रमांनीं अवश्य अनुष्ठान करावें, म्हणून सांगितलेल्याही सर्व कर्मांचा त्यागच करावा. वैराग्य हा या कर्मपरित्यागाचा श्रेष्ठ अवधि आहे.'

"किं ते धनेन किमु बन्धुभिस्ते, किं ते दारैर्ब्राह्मण यो मरिष्यसि ।
आत्मानमन्विच्छ गुहां प्रविष्टं पितामहास्ते क्व गताः पिता च ॥"

भाष्यार्थ—( मुमुक्षूनें संन्यासद्वारा श्रवणादिक करावें, याविषयीं दुसऱ्या एका वाक्याचा उल्लेख करितात–) 'हे ब्राह्मणा, जो तूं मरणार आहेस त्या तुला धनानें काय, बंधूंनीं काय व स्त्रीनें तरी काय होणार? अरे वेड्या, बुद्धिरूप गुहेंत प्रविष्ट झालेल्या आत्म्याचा शोध कर ( 'मी पिता, पितामह इत्यादिकांच्या मार्गानेंच जाईन, आत्म्याचा शोध करणार नाहीं,' म्हणून म्हणशील तर ) तुझा पितामह व त्याचे पूर्वज कोठें गेले व पिता कोठें गेला? याचा तुला कांहीं पत्ता आहे का?' ( नाहीं. मग अशा अज्ञात मार्गानें जाण्यापेक्षां साक्षात् मोक्ष देणाऱ्या आत्मज्ञानाला संपादन करणें उचित नव्हे का? असा भावार्थ. )

एवं सांख्ययोगशास्त्रेषु च संन्यासो ज्ञानं प्रति प्रत्यासन्न उच्यते ॥

भाष्यार्थ—( विविदिषा संन्यासाविषयीं सांख्यादि दर्शनकारांची संमति दाखवितात–) याचप्रमाणें सांख्य व योगशास्त्रामध्येंही संन्यास ज्ञानाचें प्रत्यासन्न–अंतरंग साधन आहे, असें सांगितलेलें आहे. ( 'ज्ञानानें अपवर्ग–मोक्ष व तद्विपरीत कर्मांनीं बंध होतो' असें सांगणारीं सांख्यकारिकादिकांतून अनेक प्रमाणें आहेत. त्याचप्रमाणें 'अभ्यास व वैराग्य यांच्या योगानें चित्ताचा निरोध होतो, त्यांतील वैराग्यानें विषयप्रवाह कुंठित होतो व विवेकदर्शनाभ्यासानें कल्याणप्रवाह उत्पन्न होतो' इत्यादि योगशास्त्रांत सांगितलें आहे. )

कामप्रवृत्त्यभावाच्च । कामप्रवृत्तेर्हि ज्ञानप्रतिकूलता सर्वशास्त्रेषु प्रसिद्धा । तस्माद्विरक्तस्य मुमुक्षोर्विनाऽपि ज्ञानेन ब्रह्मचर्यादेव प्रव्रजेदित्याद्युपपन्नम् ॥

भाष्यार्थ---तसेंच संन्यासानें कामाच्या प्रवृत्तीचा अभाव होत असल्यामुळें संन्यास ज्ञानाचें अंतरंग साधन आहे. कामप्रवृत्तीला ज्ञानप्रतिकूलता आहे [ म्ह० कामप्रवृत्ति ज्ञानाला प्रतिकूल आहे ] हें सर्व शास्त्र मध्यें प्रसिद्ध आहे. विविदिषासंन्यासाचा उपसंहार करितात--) तस्मात् विरक्त मुमुक्षूला वर सांगितलेल्या प्रकारें ज्ञानावाचूनही संन्यास प्राप्त असल्यामुळें 'ब्रह्मचर्यापासूनच संन्यास करावा' इत्यादि विधिवाक्य उपपन्न होतें.

ननु सावकाशत्वादनधिकृतविषयमेतदित्युक्तं यावज्जीवश्रुत्युपरोधात्। नैष दोषः। नितरां सावकाशत्वाद्यावज्जीवश्रुतीनाम्। अविद्वत्कामिकर्तव्यतां ह्यवोचाम सर्वकर्मणाम्। न तु निरपेक्षमेव जीवननिमित्तमेव कर्तव्यं कर्म। प्रायेण हि पुरुषाः कामबहुलाः। कामश्चानेकविषयोऽनेककर्मसाधनसाध्यश्च ॥

भाष्यार्थ--('अहो पण पारिव्राज्याचें विधान अनधिकृत पुरुषाला उद्देशून असणेंच उचित आहे. कारण तसें मानलें म्हणजे त्याला अविरोधानें अवकाश मिळतो. तें कर्मांचा ज्यांना अधिकार आहे त्यांना उद्देशून नाहीं. कारण तसें मानल्यास 'यावज्जीव अग्निहोत्र करावें,' या श्रुतीशीं विरोध येतो व त्यामुळें ती श्रुति निरवकाश होते. पण सावकाश व निरवकाश यांतील निरवकाश बलाढ्य असतें,' अशी मागचीच शंका घेतात--) 'अहो पण हें पारिव्राज्यविधान सावकाशत्वामुळें अनधिकृतविषयच आहे, हें आम्हीं सांगितलें आहे. कारण तशी विषयव्यवस्था न केल्यास यावज्जीवश्रुतीचा उपरोध होतो. (ती निरवकाश होते.' सिद्धान्ती तिच्या निरवकाशत्वाला दूषित करितात--) यांत कांहीं दोष नाहीं. कारण यावज्जीवश्रुतींना अतिशय सावकाशत्व आहे. ('तें कसें?' उत्तर--) सर्व कर्मांची कर्तव्यता अविद्वान् कामी पुरुषाला आहे हें

---

१ 'इति नु कामयमानः' (अ.४ पृ.२७५) 'काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः' गीता--अ. ३ श्लो.३७ इत्यादि सर्वशास्त्रांमध्यें.

आम्हीं मागें सांगितलें आहे. ('केवल जीवनाला निमित्त करून सांगितलेलें कर्म कामी पुरुषाचेंच कर्तव्य कसें होईळ?' या शंकेचें उत्तर–) कोणत्याही प्रकारची अपेक्षा न ठेवतां जीवन या निमित्तानेंच कर्म करावें, असें नाहीं. (कारण प्रत्यवायपरिहारादि फल इष्ट असतेंच. अनुष्ठानकर्त्याच्या स्वरूपाचें जरी निरूपण केलें तरी केवल जीवनाला निमित्त करूनच कर्म कर्तव्य आहे, असें ठरत नाहीं, असें सांगतात–) प्रायः पुरुष कामबहुल असतात हें प्रसिद्ध आहे. (असें जरी असलें तरी नित्य कर्मांतील प्रवृत्ति कामनिमित्त नाहीं. कारण त्या कर्मांचें काम्यमान असें फल नाहीं, अशी आशंका घेऊन सांगतात–) काम अनेकविषय आहे. [म्ह० त्याचा स्वर्ग किंवा पुत्रादि हा एकच विषय आहे, असें नाहीं; तर प्रत्यवायपरिहारादिक हाही कामविषय आहे व असे त्याचे अनेक विषय संभवतात. 'तथापि नित्य कर्मांचें जेथें विधान केलें आहे तेथें–त्या विध्युदेशामध्यें–त्यांचें कांहीं काम्यमान फळ श्रुत नाहीं,' अशी आशंका घेऊन सांगतात–] आणि तो अनेकविषय काम अनेक प्रकारचीं कर्में या साधनांनीं साध्य आहे. (अनेक कर्मांनीं सिद्ध होणारें जें पापक्षयादि साध्य तें जरी विधिप्रदेशामध्यें श्रुत नसलें तरी साध्य आहेच. कारण 'प्राणी जें जें करतो तें तें कामाचें चेष्टित आहे' अशी स्मृति असून त्यावाचून प्रवृत्ति संभवत नाहीं. यास्तव नित्य कर्मांचेंही कामित फळ आहेच; असा भावार्थ.)

अनेकफलसाधनानि च वैदिकानि कर्माणि दाराग्निसंबन्धपुरुषकर्तव्यानि पुनः पुनश्चानुष्ठीयमानानि बहुफलानि कृष्यादिवद्वर्षशतसमाप्तीनि च गार्हस्थ्ये वाऽरण्ये वाऽतस्तदपेक्षया यावज्जीवश्रुतयः "कुर्वन्नेवेह कर्माणि" इति च मन्त्रवर्णः। तस्मिंश्च पक्षे विश्वजित्सर्वमेधयोः कर्मपरित्यागः। यस्मिंश्च पक्षे यावज्जीवानुष्ठानं तदा श्मशानान्तत्वं भस्मान्तता च शरीरस्य ॥

भाष्यार्थ—('अहो पण वैदिक कर्मांचीं फळें पुत्र, पशु, स्वर्ग

इत्यादि नियत आहेत. त्यामुळें त्यांविषयींचा कामही नियतफलच असणें युक्त आहे. त्यामुळें नित्य कर्मांचें काम्यमान फळ संभवत नाहीं,' अशी आशंका घेऊन सांगतात–) वैदिक कर्मं अनेक फलांचीं साधनें आहेत. ( हें खरें, पण तीं प्रत्येक पुरुषाला कर्तव्य आहेत. त्यामुळें तुह्मांला विवक्षित असलेल्या संन्यासाची सिद्धि होत नाहीं, अशी आशंका घेऊन सांगतात–) पत्नी व अग्निसंबंध या संपत्तीनें संपन्न असलेल्या पुरुषालाच तीं कर्तव्य असतात. ( इतराला नाहीं. ' अहो पण अविरक्त पुरुषानेंही तीं एकेकदाच करावींत. वारंवार करावयास नकोत. कारण एकेकदा केल्यानेंच विधीला चारितार्थत्व येतें; तेव्हां कर्मांना फलबाहुल्य कसें ?' अशी आशंका घेऊन सांगतात–) त्यांचें अनुष्ठान पुनः पुनः केलें जातें. ( कारण तीं यावज्जीव करावींत, अशी श्रुति असल्यामुळें त्यांच्या आवृत्तीची सिद्धि होते, असा भावार्थ. ) कृष्यादिकांप्रमाणें त्यांचीं फळेंही अनेक आहेत ( ' अहो पण यावज्जीवश्रुतिवशात् अग्निहोत्रादि कर्में सर्व आश्रमांना सतत अनुष्ठेय आहेत. तेव्हां पूर्वोक्त संन्यासाची उपपत्ति कशी लागते ?' अशी आशंका घेऊन सांगतात–) तीं कर्में गृहस्थाश्रमांत किंवा अरण्यांत शतवर्षांनीं संपणारीं आहेत. ( अर्थात् वरील श्रुति व मंत्र यांचा अविरक्त गृहस्थ हा विषय आहे, या सिद्धान्ताचा उपसंहार करितात–) यास्तव त्यांच्या अपेक्षेनें यावज्जीव श्रुति आहेत. ' कुर्वन्नेवेह कर्माणि ' इत्यादि मंत्रवर्णही त्यांच्या अपेक्षेनेंच आहे. ( आतां ' विश्वजित् व सर्वमेध हा यावज्जीवश्रुतींचा अपवाद आहे ' असें जें वाद्याचें म्हणणें आहे तेंही कामी–अविरक्त गृहस्थविषयक असल्यामुळें ब्रह्मचर्यापासूनच प्रव्रजन करावें, या विधीचा तो अपवाद नव्हे, असें सांगतात–) आणि त्या पक्षीं विश्वजित् व सर्वमेध यांमध्यें कर्मांचा परित्याग आहे. ज्यापक्षीं यावज्जीव कर्मानुष्ठान विहित आहे त्यापक्षीं श्मशानान्तत्व व शरीराचें भस्मान्तत्व सावकाश आहे.

इतरवर्णापेक्षया वा यावज्जीवश्रुतिः। न हि क्षत्रियवैश्ययोः पारिव्राज्यप्रतिपत्तिरस्ति। तथा मन्त्रैर्यस्योदितो विधिः। ऐकाश्रम्यं त्वाचार्या इत्येवमादीनां क्षत्रियवैश्यापेक्षत्वम्। तस्मात्पुरुषसामर्थ्यज्ञानवैराग्यकामाद्यपेक्षया व्युत्थानविकल्पक्रमपारिव्राज्यप्रतिपत्तिप्रकारा न विरुध्यन्ते। अनधिकृतानां च पृथग्विधानात्पारिव्राज्यस्य स्नातको वाऽस्नातको वोत्सन्नाग्निरनग्निको वेत्यादिना। तस्मात्सिद्धान्याश्रमान्तराण्यधिकृतानामेव ॥ १५ ॥ इति श्रीबृहदारण्यकोपनिद्भाष्ये चतुर्थाध्यायस्य पञ्चमं ब्राह्मणम् ॥ ५ ॥

भाष्यार्थ—(यावज्जीवश्रुतीची दुसरी गति सांगतात—) किंवा यावज्जीवश्रुति इतर वर्णांच्या अपेक्षेनें आहे. क्षत्रिय व वैश्य यांना पारिव्राज्याची प्राप्ति नाहीं. (यावज्जीवश्रुतीप्रमाणें ऐकाश्रम्यप्रतिपादक स्मृतींनाही क्षत्रियादिविषयत्व आहे, असें सांगतात—) त्याच प्रमाणें 'गर्भाधानापासून श्मशानापर्यंत ज्यांचा विधि मंत्रांनीं सांगितला आहे,' 'आचार्यांनीं ऐकाश्रम्य सांगितलें आहे' इत्यादि स्मार्त विधींना क्षत्रिय व वैश्य यांची अपेक्षा आहे. (त्यांच्या अपेक्षेनें वरील विधि आहेत. याप्रमाणें कर्म व त्यांचा संन्यास यांचें विधान करणाऱ्या श्रुति-स्मृतींचा विषय भिन्न आहे, असें ठरलें असतां फलिताचा उपसंहार करितात—) तस्मात् पुरुषाचें सामर्थ्य, ज्ञान, वैराग्य, काम इत्यादिकांच्या अपेक्षेनें व्युत्थानाचा विकल्प, क्रमानें पारिव्राज्याची प्राप्ति इत्यादि प्रकार परस्पर विरुद्ध नाहींत. (आतां कर्माचे अधिकारी नसलेले—काणा, कुबडा इत्यादि पुरुषही श्रुतीच्या अनुग्रहास पात्र आहेत, असें जें वर वाद्यानें म्हटलें होतें त्याचें निराकरण—) 'स्नातक किंवा अस्नातक, उत्सन्नाग्नि किंवा अनग्निक' इत्यादि वाक्यानें अनधिकाऱ्यांचें पारिव्राज्य पृथक् सांगितलेलें आहे. (याप्रमाणें आश्रमान्तरविषयक श्रुति-स्मृतींना

---

१ भार्या असतांना ज्यानें अग्नि सोडला आहे तो उत्सन्नाग्नि व २ ती नसल्यामुळें ज्यानें अग्नि सोडला आहे तो अनग्नि.

अनधिकृतविषयत्व नाहीं, असें ठरलें असतां निगमन करितात—)तस्मात् अधिकाऱ्यांनाच उद्देशून दुसरे आश्रम आहेत हें सिद्ध झालें १५.

इति श्रीबृहदारण्यकभाष्यार्थाच्या चवथ्या अध्यायाचें
पांचवें ब्राह्मण समाप्त.

---

अथ वꣳशः पौतिमाष्यो गौपवनाद्गौपवनः पौतिमाष्यात्पौतिमाष्यो गौपवनाद्गौपवनः कौशिकात्कौशिकः कौण्डिन्यात्कौण्डिन्यः शाण्डिल्याच्छाण्डिल्यः कौशिकाच्च गौतमाच्च गौतमः ॥ १ ॥

अर्थ—आतां ( याज्ञवल्कीय कांडाचा ) वंश-गौपवनापासून पौतिमाष्य, पौतिमाष्यापासून गौपवन, गौपवनापासून पौतिमाष्य, कौशिकापासून गौपवन, कौण्डिन्यापासून कौशिक, शाण्डिल्यापासून कौण्डिन्य, गौतम व कौशिकापासून शाण्डिल्य, गौतम १

आग्निवेश्यादाग्निवेश्यो गार्ग्याद्गार्ग्यो गार्ग्याद्गार्ग्यो गौतमाद्गौतमः सैतवात्सैतवः पाराशर्यायणात्पाराशर्यायणो गार्ग्यायणाद्गार्ग्यायण उद्दालकायनादुद्दालकायनो जाबालायनाज्जाबालायनो माध्यंदिनायनान्माध्यंदिनायनः सौकरायणात्सौकरायणः काषायणात्काषायणः सायकायनात्सायकायनः कौशिकायनेः कौशिकायनिः ॥ २ ॥

अर्थ—आग्निवेश्यापासून, आग्निवेश्य गार्ग्यापासून, गार्ग्य गार्ग्यापासून, गार्ग्य गौतमापासून, गौतम सैतवापासून, सैतव पाराशर्यायणापासून, पाराशर्यायण गार्ग्यायणापासून, गार्ग्यायण उद्दालकायनापासून, उद्दालकायन जाबालायनापासून, जाबालायन माध्यंदिनायनापासून, माध्यंदिनायन सौकरायणापासून, सौकरायण काषायणापासून, काषायण सायकायनापासून, सायकायन कौशिकायनीपासून, कौशिकायनि २

घृतकौशिकाद्घृतकौशिकः पाराशर्यायणात्पाराशर्यायणः पाराशर्यात्पाराशर्यो जातूकर्ण्याज्जातूकर्ण्य आसुरायणाच्च यास्काच्चाऽऽसुरायणस्त्रैवणेस्त्रैवणिरौपजन्धनेरौपजन्धनिरासुरेरासुरिर्भारद्वाजाद्भारद्वाज आत्रेयादात्रेयो माण्टेर्माण्टिर्गौतमाद्गौतमो गौतमाद्गौतमो वात्स्याद्वात्स्यः शाण्डिल्याच्छाण्डिल्यः कैशोर्यात्काप्यात्कैशोर्यः काप्यः कुमारहारितात्कुमारहारितो गालवाद्गालवो विदर्भीकौण्डिन्याद्विदर्भीकौण्डिन्यो

वत्सनपातो बाभ्रवाद्वत्सनपाद्बाभ्रवः पथः सौभरात्पन्थाः सौभरोऽयास्यादाङ्गिरसादयास्य आङ्गिरस आभूतेस्त्वाष्ट्रादाभूतिस्त्वाष्ट्रो विश्वरूपात्त्वाष्ट्राद्विश्वरूपस्त्वाष्ट्रोऽश्विभ्यामश्विनौ दधीच आथर्वणाद्दध्यङ्ङाथर्वणोऽथर्वणो दैवादथर्वा दैवो मृत्योः प्राध्वंसनान्मृत्युः प्राध्वंसनः प्रध्वंसनात्प्रध्वंसन एकर्षेरेकर्षिर्विप्रचित्तेर्विप्रचित्तिर्व्यष्टेर्व्यष्टिः सनारोः सनारुः सनातनात्सनातनः सनगात्सनगः परमेष्ठिनः परमेष्ठी ब्रह्मणो ब्रह्म स्वयंभु ब्रह्मणे नमः ॥ ३ ॥

इति बृहदारण्यकोपनिषदि चतुर्थाध्याये षष्ठं ब्राह्मणम् ॥ ६ ॥

इति श्रीबृहदारण्यकोपनिषदि चतुर्थोऽध्यायः ॥ ४ ॥

बृहदारण्यकक्रमेण षष्ठोऽध्यायः ॥ ६ ॥

अर्थ—घृतकौशिकापासून, घृतकौशिक पाराशर्यायणापासून, पाराशर्यायण पाराशर्यापासून, पाराशर्य जातूकर्ण्यापासून, जातूकर्ण्य आसुरायणापासून व यास्कापासून, आसुरायण त्रैवणीपासून, त्रैवणि औपजंघनीपासून, औपजंघनि आसुरीपासून, आसुरि भारद्वाजापासून, भारद्वाज आत्रेयापासून, आत्रेय मांटीपासून, मांटि गौतमापासून, गौतम गौतमापासून, गौतम वात्स्यापासून, वात्स्य शांडिल्यापासून, शांडिल्य कैशोर्य काप्यापासून, कैशोर्य काप्य कुमार हारितापासून, कुमार हारित गालवापासून, गालव विदर्भी कौंडिन्यापासून, विदर्भी कौंडिन्य वत्सनपात् बाभ्रवापासून, वत्सनपात् बाभ्रव पथ सौभरापासून, पन्थ सौभर अयास्य आंगिरसापासून, अयास्य आङ्गिरस आभूति त्वाष्ट्रापासून, आभूति त्वाष्ट्र विश्वरूप त्वाष्ट्रापासून, विश्वरूप त्वाष्ट्र अश्वीपासून, अश्वी दधीच आथर्वणापासून, दध्यङ् आथर्वण अथर्व दैवापासून, अथर्वा दैव प्राध्वंसन मृत्यूपासून, प्राध्वंसन मृत्यु प्रध्वंसनापासून, प्रध्वंसन एकर्षीपासून, एकर्षि विप्रचित्तीपासून, विप्रचित्ति व्यष्टीपासून, व्यष्टि सनारूपासून, सनारु सनातनापासून, सनातन सनगापासून, सनग परमेष्ठीपासून, परमेष्ठी ब्रह्मापासून, ब्रह्म स्वयंभू आहे. त्या ब्रह्माला नमस्कार असो ३. (६)

अथानन्तरं याज्ञवल्कीयस्य काण्डस्य वंश आरभ्यते यथा मधुकाण्डस्य वंशः । व्याख्यानं तु पूर्ववत् । ब्रह्म स्वयंभु ब्रह्मणे नम ॐमिति ॥ १ ॥ २ ॥ ३ ॥

इति श्रीबृहदारण्यकोपनिषद्भाष्ये चतुर्थाध्यायस्य षष्ठं वंशब्राह्मणम् ॥६॥

इति श्रीमद्गोविन्दभगवत्पूज्यपादशिष्यस्य परमहंसपरिव्राजकाचार्यस्य श्रीशंकरभगवतः कृतौ बृहदारण्यकोपनिषद्भाष्ये चतुर्थोऽध्यायः ॥ ४ ॥

भाष्यार्थ—(याप्रमाणें विचारद्वारा आपाततः विरुद्ध भासणाऱ्या श्रुति-स्मृतींच्या अविरोधाचें प्रतिपादन करून 'अथ वंशः' याचा अर्थ सांगतात—) 'अथ-' सांगोपांग सफल आत्मविज्ञानाच्या प्रवचनानंतर याज्ञवल्कीय कांडाचा वंश आरंभिला जातो. जसा मधुकांडाचा वंश. याचें व्याख्यान तर पूर्वींच्या व्याख्यानाप्रमाणेंच समजावें. ब्रह्म स्वयंभु आहे. ब्रह्माला नमस्कार असो. (याप्रमाणें आगम व उपपत्ति यांच्या योगानें संन्यासासह व इतिकर्तव्यतेसह आत्मज्ञान हें अमृतत्वाचें साधन आहे, असा उपसंहार करण्यासाठीं भाष्यांत शेवटीं इतिशब्द आहे. अध्यायभाष्याच्या समाप्तीचे वेळीं 'ब्रह्म स्वयंभु ब्रह्मणे नमः ॐमिति' असें भाष्यकारांनीं मंगलाचरण केलें आहे.) १–३.

इति श्रीशंकराचार्यभक्त विष्णुशर्मकृत बृहदारण्यकभाष्यार्थाच्या चवथ्या अध्यायाचें सहावें ब्राह्मण समाप्त झालें. येथें हा चवथा अध्यायही समाप्त.

---

१ पूर्वींच्या वंशब्राह्मणाच्या भाषांतरांत थोडीशी चूक झाली आहे. तिची अशी शुद्धि करावी–अ. ३ पृ. २५९ ओळ ९. शांडिल्य कौशिकापासून आणि गौतमापासून, गौतम ( पृ. २६० ओळ १८ ) आग्निवेश्यापासून, आग्निवेश्य शांडिल्यापासून व आनभिम्लातापासून, आनभिम्लात आनभिम्लातापासून, आनभिम्लात आनभिम्लातापासून आनभिम्लात गौतमापासून, गौतम सैतव–प्राचीनयोग्यांपासून, सैतवप्राचीन-योग्य पाराशर्यापासून, पाराशर्य भारद्वाजापासून, भारद्वाज भारद्वाज व गौतम यांपासून, गौतम भारद्वाजापासून, भारद्वाज पाराशर्यापासून, पराशर्य बैजवापायनापासून, बैजवापायन कौशिकायनीपासून, कौशिकायनि ( पृ. २६२ ओ. ५ ) घृतकौशिक पाराशर्यायणापासून; ( पुढें सर्व बरोबर आहे. )

# बृहदारण्यकोपनिषद्भाष्यार्थ.

[ मूल, अर्थ, व भाष्य यांसह ]

## अध्याय ५ वा

ॐ तत्सद्ब्रह्मणे नमः ।

ॐ पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात्पूर्णमुदच्यते । पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते ॥

अर्थ—हें परब्रह्म पूर्ण—व्यापी आहे. हें सोपाधिक रूपही स्वरूपानें पूर्ण आहे. तें कार्यात्मक ब्रह्म पूर्ण कारणात्मकापासून पूर्णरूपानेंच उद्भवतें. विद्येनें पूर्ण—कार्यात्मक ब्रह्माचें पूर्णत्व घेऊन व अविद्याकृत अन्यत्वावभासाचा तिरस्कार करून पूर्णच अवशिष्ट राहतें.

पूर्णमद इत्यादि खिलकाण्डमारभ्यते । अध्यायचतुष्टयेन यदेवं साक्षादपरोक्षाद्ब्रह्म य आत्मा सर्वान्तरो निरुपाधिकोऽशनायाद्यतीतो नेति नेतीति व्यपदेश्यो निर्धारितो यद्विज्ञानं केवलममृतत्वसाधनम् । अधुना तस्यैवाऽऽत्मनः सोपाधिकस्य शब्दार्थादिव्यवहारविषयापन्नस्य पुरस्तादनुक्तान्युपासनानि कर्मभिरविरुद्धानि प्रकृष्टाभ्युदयसाधनानि क्रममुक्तिभाञ्जि च तानि वक्तव्यानीति परः संदर्भः। सर्वोपासनशेषत्वेनोंकारो दमं दानं दयामित्येतानि च विधित्सितानि ॥

भाष्यार्थ—(पूर्व अध्यायांत वादन्यायानें सफल व सांगोपांग ब्रह्मात्मज्ञान सांगितलें. आतां दुसऱ्या कांडाला अवतरण देतात—) 'पूर्णमदः०' इत्यादि खिलकांडाचा आरंभ केला जातो. ('अहोपण पूर्वाध्यायांमध्यें सर्व

वक्तव्य सांगून झालेलें असल्यामुळें पुढील खिलकांड आरंभण्याचें कांहीं कारण दिसत नाहीं,' अशी आशंका घेऊन 'पूर्वी न सांगितलेल्या परिशिष्ट वस्तूला 'खिल' असें म्हणतात व तें सांगावयाचें आहे,' असें उत्तर देतात-) गेल्या अध्यायचतुष्टयानें जें साक्षात् अपरोक्ष ब्रह्म, जो सर्वान्तर आत्मा, निरुपाधिक, अशनायादि धर्मांनीं रहित, 'नेति नेति' असा व्यपदेश करण्यास योग्य असलेला त्याचा निर्धार–निश्चय केला. केवल त्याचें विज्ञान हेंच अमृतत्वाचें साधन आहे, असाही निर्धार केला. आतां त्याच सोपाधिक, शब्दार्थादिव्यवहाराच्या विषयत्वास प्राप्त झालेल्या आत्म्याचीं मागें न सांगितलेलीं, कर्मांशीं विरुद्ध नसलेलीं, अत्यंत अभ्युदयाचीं साधनें व क्रममुक्ति देण्यास समर्थ असलेलीं जीं उपासनें तीं सांगावीं म्हणून या पुढील ग्रंथ आहे. सर्व उपासनांच्या शेषत्वानें–अंगत्वानें ओंकार, दम, दान, दया हींही साधनें येथें विधित्सित–विधान करण्यास इष्ट–आहेत.

पूर्णमदः पूर्णं न कुतश्चिद्व्यावृत्तं व्यापीत्येतत् । निष्ठा च कर्तरि द्रष्टव्या । अद इति परोक्षाभिधायि सर्वनाम तत्परं ब्रह्मेत्यर्थः । तत्संपूर्णमाकाशवद्व्यापि निरन्तरं निरुपाधिकं च तदेवेदं सोपाधिकं नामरूपस्थं व्यवहारापन्नं पूर्णं स्वेन रूपेण परमात्मना व्याप्येव नोपाधिपरिच्छिन्नेन विशेषात्मना ॥

भाष्यार्थ—(ओंकारादिक ज्याच्या साधनत्वानें विधित्सित आहे त्या पूर्वोक्त ऐक्य ज्ञानाचा श्रुति अनुवाद करते–) 'पूर्णं' पूर्ण–कोठूनही–कोणापासूनही व्यावृत्त न झालेलें–व्यापी असा भावार्थ; 'पूर्ण' हा शब्द क्त ( त ) या निष्ठासंज्ञक प्रत्ययान्त आहे क्त ( त ) हा प्रत्यय प्रायः कर्मणि भूतकाळीं होत असतो; पण येथील 'पूर्ण' या शब्दांतील तो निष्ठा प्रत्यय कर्तरि आहे, असें समजावें. 'अदः' हें परोक्ष अर्थ कथन करणारें सर्वनाम आहे. त्यामुळें 'अदः' म्ह० तें परब्रह्म असा त्याचा अर्थ आहे. (याप्रमाणें 'पूर्णं अदः' यांतील प्रत्येक अवयवाचा अर्थ

सांगून आतां सर्व वाक्याचा अर्थ सांगतात–) तें परब्रह्म संपूर्ण, आकाशाप्रमाणें व्यापी, निरन्तर व निरुपाधिक आहे. ('अदः पूर्णं' या वाक्यानें लक्ष्य तत्पदार्थ प्रदर्शित करून त्वंपदार्थ प्रदर्शित करितात–) तेंच हें सोपाधिक, नामरूपस्थ, व्यवहारापन्न, पूर्ण आहे. ( पण सोपाधिकाला पूर्णत्व कसें ? उत्तर–) स्वतःच्या–स्वाभाविक–परमात्मरूपानें तें सोपाधिक रूपांनीं व्यापीच आहे, अर्थात् उपाधीनें परिच्छिन्न झालेल्या विशेष रूपानें तें पूर्ण–व्यापी नाहीं. (आम्ही उपहित–सोपाधिक विशिष्टरूपानें पूर्णत्वाचें वर्णन करीत नाहीं तर केवल–निरुपाधिक स्वरूपानें पूर्णत्वाचें वर्णन करतों).

तदिदं विशेषापन्नं कार्यात्मकं ब्रह्म पूर्णात्कारणात्मन उदच्यत उद्रिच्यत उद्गच्छतीत्येतत् । यद्यपि कार्यात्मनोद्रिच्यते तथाऽपि यत्स्वरूपं पूर्णत्वं परमात्मभावं तन्न जहाति पूर्णमेवोद्रिच्यते । पूर्णस्य कार्यात्मनो ब्रह्मणः पूर्णं पूर्णत्वमादाय गृहीत्वाऽऽत्मस्वरूपैकरसत्वमापद्य विद्ययाऽविद्याकृतं भूतमात्रोपाधिसंसर्गजमन्यत्वावभासं तिरस्कृत्य पूर्णमेवानन्तरमबाह्यं प्रज्ञानघनैकरसस्वभावं केवलं ब्रह्मावशिष्यते ॥

भाष्यार्थ—( लक्ष्य तत्पदार्थ व त्वंपदार्थ सांगून तेच वाच्य अर्थ सांगतात–) तें हें विशेषापन्न कार्यात्मक ब्रह्म ' पूर्णात् ' कारणात्मक ब्रह्मापासून ' उदच्यते ' उद्रिक्त होतें, उद्भवतें, असा भावार्थ. जरी तें कार्यरूपानें उद्रिक्त होत असलें–उद्भवत असलें तरी पूर्णत्व परमात्मत्व हें जें त्याचें स्वरूप त्याला तें सोडीत नाहीं;तर'पूर्णं'पूर्णच उद्भवतें. 'पूर्णस्य' कार्यात्मक पूर्ण ब्रह्माचें ' पूर्णं' पूर्णत्व ' आदाय 'घेऊन–आत्मस्वरूपैकरसत्व घेऊन विद्येनें अविद्याकृत भूतमात्रारूप उपाधीच्या संसर्गामुळें झालेल्या अन्यत्वावभासाचा तिरस्कार करून ' पूर्णमेव ' अनन्तर, अबाह्य, प्रज्ञानघनैकरसस्वभाव केवल ब्रह्म अवशिष्ट राहतें.

यदुक्तं ब्रह्म वा इदमग्र आसीत्तदात्मानमेवावेत्तस्मात्तत्सर्वमभवदित्येषोऽस्य मन्त्रस्यार्थः । तत्र ब्रह्मेत्यस्यार्थः पूर्णमद इति । इदं पूर्णमिति

ब्रह्म वा इदमग्र आसीदित्यस्यार्थः । तथा च श्रुत्यन्तरम् "यदेवेह तदमुत्र यदमुत्र तदन्विह" इति । अतोऽदःशब्दवाच्यं पूर्णं ब्रह्म तदेवेदं पूर्णं कार्यस्थं नामरूपोपाधिसंयुक्तमविद्ययोद्रिक्तम् । तस्मादेव परमार्थस्वरूपादन्यदिव प्रत्यवभासमानम् । तद्यदात्मानमेव परं पूर्णं ब्रह्म विदित्वाऽहमदः पूर्णं ब्रह्मास्मीत्येवं पूर्णमादाय तिरस्कृत्यापूर्णस्वरूपतामविद्याकृतां नामरूपोपाधिसंपर्कजामेतया ब्रह्मविद्यया पूर्णमेव केवलमवशिष्यते ॥

भाष्यार्थ---( उपक्रम व उपसंहार यांचें एकरूपत्व हें–ब्रह्मात्मैक्यामध्यें श्रुतीचें तात्पर्य आहे, याविषयीं–लिंग आहे, असें सांगतात–) 'ब्रह्म वा इदं अग्र आसीत्–तदात्मानमेवावेत्–तस्मात्तत्सर्वमभवत्-'म्ह० पूर्वी हें सर्व ब्रह्मच होतें; तें आपल्यालाच जाणतें झालें; त्यामुळें तें सर्व झालें.(बृ.अ.१ पृ.२८८व३१४पहा.)असें जें वर म्हटलें आहे तोच या मंत्राचा अर्थ आहे. ( तो कसा तेंच सांगतात–) त्यांतील 'ब्रह्म' या शब्दाचा अर्थ 'पूर्णं अदः' हा आहे. 'इदं पूर्णं' हा'ब्रह्म वै इदं अग्रे आसीत्-' या वाक्याचा अर्थ आहे. ( उपक्रम व उपसंहार यांवरून सिद्ध झालेल्या ब्रह्मात्मैक्याविषयीं कठश्रुतीचें आनुकूल्य दाखवितात–)'जें या शरीरांत भासणारें शरीरेंद्रियोपाधियुक्त तत्त्व तेंच परत्र व जें परत्र तेंच या समूहांत आहे.'(बृ. ग्रं.र.मा.रत्न१३पृ.१०७–८) अशीही आणखीं श्रुति आहे. यास्तव 'अदः-' तें, या शब्दाचें वाच्य असें जें पूर्ण ब्रह्म तेंच हें कार्यस्थ नामरूपोपाधिसंयुक्त पूर्ण ब्रह्म अविद्येमुळें उद्भवलेलें आहे. त्याच परमार्थस्वरूपाहून निराळेंसें प्रतीत होणारें, भासणारें, असें तें आहे. तें ज्यावेळीं आपल्यालाच पर पूर्ण ब्रह्म जाणून 'मीच तें पूर्ण पर ब्रह्म आहें,' अशारीतीनें पूर्णाचें ग्रहण करून अविद्याकृत, नामरूपोपाधिसंपर्कजन्य अपूर्णस्वरूपतेचा या ब्रह्मविद्येच्या योगानें तिरस्कार करून केवल पूर्णच अवशिष्ट राहतें.

तथा चोक्तम् "तस्मात्तत्सर्वमभवत्" इति । यः सर्वोपनिषदर्थो

ब्रह्म स एषोऽनेन मन्त्रेणानूद्यत उत्तरसंबन्धार्थम् । ब्रह्मविद्यासाधनत्वेन हि वक्ष्यमाणानि साधनान्योंकारदमदानदयाख्यानि विधित्सितानि खिलप्रकरणसंबन्धात्सर्वोपासनाङ्गभूतानि च ॥

भाष्यार्थ—( या पूर्वोक्त विद्याफलाविषयीं वाक्याचा उपक्रम अनुकूल आहे, असें दाखवितात--) 'तस्मात्तत्सर्वमभवत्–' त्यामुळें तें सर्व तो झाला, असें आरंभीं सांगितलेंच आहे. ( केवळ ब्रह्मकंडिकेशींच या मंत्राचें एकवाक्यत्व आहे, असें नाहीं तर सर्व उपनिषदांशीं त्याची एकवाक्यता आहे, असें सांगतात–) जो सर्व उपनिषदांचा अर्थ–ब्रह्म त्याचाच पुढील ग्रंथाशीं संबंध दाखविण्यासाठीं या मंत्राकडून अनुवाद केला जातो. ब्रह्मविद्येचीं साधनें म्हणून पुढें सांगितलीं जाणारीं ओंकार, दम, दान, दया या नांवांचीं साधनें येथें विधित्सित आहेत. तशींच तीं खिलप्रकरणाच्या संबंधामुळें सर्व उपासनांच्या अंगभूत आहेत.

अत्रैके वर्णयन्ति पूर्णात्कारणात्पूर्णं कार्यमुद्रिच्यते । उद्रिक्तं कार्यं वर्तमानकालेऽपि पूर्णमेव परमार्थवस्तुभूतं द्वैतरूपेण । पुनः प्रलयकाले पूर्णस्य कार्यस्य पूर्णतामादायाऽऽत्मनि धित्वा पूर्णमेवावशिष्यते कारणरूपम् । एवमुत्पत्तिस्थितिप्रलयेषु त्रिष्वपि कालेषु कार्यकारणयोः पूर्णतैव । सा चैकैव पूर्णता । कार्यकारणयोर्भेदेन व्यपदिश्यते । एवं च द्वैताद्वैतात्मकमेकं ब्रह्म ॥

भाष्यार्थ—( ब्रह्म अद्वितीय आहे, हें उत्सर्गतः प्रवृत्त झालेलें शास्त्र प्रलयावस्थ ब्रह्मविषय आहे. पण विशेषतः प्रवृत्त झालेलें सृष्टिशास्त्र त्याचा अपवाद आहे. त्यामुळें द्वैताद्वैतरूप ब्रह्म हा सर्व उपनिषदांचा अर्थ आहे; आणि तेंच द्विरूप ब्रह्म या मंत्राकडून संक्षेपतः सांगितलें जातें, हा भर्तृप्रपंचाचा पक्ष उत्थापित करितात–) या मंत्राचें व्याख्यान कित्येक असें करितात–पूर्ण कारणापासून पूर्ण कार्य उद्रिक्त–उद्भूत होतें, आणि उद्रिक्त झालेलें तें कार्य वर्तमानकाळींही पूर्णच म्ह० द्वैतरूपानें परमार्थवस्तुभूत असतें; [म्ह० उत्पत्तिकाळीं कार्य व कारण यांना जसें पूर्णत्व

असतें तसेंच तें स्थितिकालींही असतें,असा भावार्थ.प्रलयकालींही त्यांचें पूर्णत्व दाखवितात—] पुनः प्रलयकालीं पूर्ण कार्याचें पूर्णत्व घेऊन—आत्म्यामध्यें पूर्णतेचें आधान करून कारणरूप पूर्णच अवशिष्ट राहतें.(याप्रमाणें कालभेदानें सांगितलेल्या कार्य-कारणांच्या पूर्णत्वाचें निगमन करितात—) अशारीतीनें उत्पत्ति, स्थिति व प्रलय या तिन्ही कालीं कार्य व कारण यांची पूर्णताच आहे; ( ' अहो पण कार्य व कारण अशीं दोन जर पूर्ण आहेत तर अद्वैतसिद्धि कशी ? ' तें सांगतात—) आणि ती पूर्णता एकच आहे. ( ' तर मग दोघांचें पूर्णत्व कसें सांगितलें आहे ? ' उत्तर—)तथापि कार्य व कारण यांच्या ठिकाणीं तें भेदानें सांगितलें जातें. याप्रमाणें द्वैताद्वैतात्मक एक ब्रह्म आहे.

यथा किल समुद्रो जलतरङ्गफेनबुद्बुदाद्यात्मक एव । यथा च जलं सत्यं तदुद्भवाश्च तरङ्गफेनबुद्बुदादयः समुद्रात्मभूता एवाऽऽविर्भावतिरोभावधर्मिणः परमार्थसत्या एव । एवं सर्वमिदं द्वैतं परमार्थसत्यमेव जलतरङ्गादिस्थानीयं समुद्रजलस्थानीयं तु परं ब्रह्म ॥

भाष्यार्थ—( ' अहो पण एक ब्रह्म अनेकात्मक असणें विरुद्ध आहे' अशी आशंका घेऊन तिचें दृष्टान्तानें निरसन करितात—) ज्याप्रमाणें खरोखर समुद्र—जल, तरंग, फेंस, बुडबुडे, इत्यादि रूपच ( असतो त्याप्रमाणें एक ब्रह्म अनेकात्मक आहे, असा या वाक्याला शेष लावावा. ' अहो पण ब्रह्म द्वैताद्वैतरूप जरी असलें तरी अद्वैत सत्य असून द्वैत असत्य आहे,' अशी आशंका घेऊन सांगतात—) आणि जसें जल सत्य व त्यापासून उद्भवणारे समुद्रात्मभूतच आविर्भाव-तिरोभावधर्मी तरंग, फेन, बुद्बुद इत्यादिकही परमार्थसत्यच त्याप्रमाणें जलतरंगादिकांच्या स्थानीं असलेलें हें सर्व द्वैत परमार्थसत्यच आहे; पण पर ब्रह्म समुद्रजलाच्या स्थानीं आहे.

एवं च किल द्वैतस्य सत्यत्वे कर्मकाण्डस्य प्रामाण्यं यदा पुनर्द्वैतं द्वैतमिवाविद्याकृतं मृगतृष्णिकावदनृतमद्वैतमेव परमार्थस्तदा किल

कर्मकाण्डं विषयाभावादप्रमाणं भवति । तथा च विरोध एव स्यात् । वेदैकदेशभूतोपनिषत्प्रमाणं परमार्थाद्वैतवस्तुप्रतिपादकत्वादप्रमाणं कर्मकाण्डमसद्द्वैतविषयत्वात् । तद्विरोधपरिजिहीर्षया श्रुत्यैतदुक्तं कार्यकारणयोः सत्यत्वं समुद्रवत्पूर्णमद इत्यादिनेति ॥

भाष्यार्थ—( द्वैत परमार्थ सत्य आहे, याविषयीं कर्मकांडश्रुतीचें आनुकूल्य दाखवितात—) आणि अशारीतीनें द्वैताला सत्यत्व असलें तरच खरोखर कर्मकांडाला प्रामाण्य आहे, असें होतें. पण जेव्हां द्वैत हें जणुं काय द्वैतसें आहे, तें अविद्याकृत आहे, मृगजळाप्रमाणें मिथ्याच आहे व अद्वैतच परमार्थ—सत्य आहे, असें आपण म्हणतों तेव्हां खरोखर कर्मकांडाला विषयच नाहींसा होऊन कर्मकांड अप्रमाण होतें; आणि तें अप्रमाण झाल्यास ( अध्ययनविधीशीं ) विरोधच येतो. वेदाचा एक देश असा उपनिषद्भाग प्रमाण आहे, कारण तो परमार्थ अद्वैत वस्तुप्रतिपादक आहे, तसेंच कर्मकांड अप्रमाण आहे; कारण असत्—मिथ्या द्वैत हा त्याचा विषय आहे, ( असा कर्मकांडाच्या प्रामाण्याशीं विरोध येतो. ) त्या विरोधाचा परिहार करण्याच्या इच्छेनें श्रुतीनें ‘ पूर्णमदः पूर्णमिदं०’ या मंत्रानें कार्य व कारण यांचें समुद्राप्रमाणें हें सत्यत्व सांगितलें आहे.

तदसत् । विशिष्टविषयापवादविकल्पयोरसंभवात् । न हीयं सुविवक्षिता कल्पना । कस्मात् । यथा क्रियाविषय उत्सर्गप्राप्तस्यैकदेशेऽपवादः क्रियते । यथाऽहिंसन्सर्वभूतान्यन्यत्र तीर्थेभ्य इति हिंसा सर्वभूतविषयोत्सर्गेण निवारिता तीर्थे विशिष्टविषये ज्योतिष्टोमादावनुज्ञायते । न च तथा वस्तुविषय इहाद्वैतं ब्रह्मोत्सर्गेण प्रतिपाद्य पुनस्तदेकदेशेऽपवदितुं शक्यते । ब्रह्मणोऽद्वैतत्वादेवैकदेशानुपपत्तेः ॥

भाष्यार्थ—( या भर्तृप्रपंचाच्या मताचा परिहार करितात—) हें म्हणणें बाधित होणारें आहे. कारण विशिष्ट--अद्वितीय ब्रह्म विषयाचा उत्सर्ग व अपवाद आणि विकल्प व समुच्चय यांचा असंभव आहे. ही

कल्पना सुविवाक्षित नाहीं. कोणत्या कारणानें ? ज्याप्रमाणें क्रियाविषयामध्यें उत्सर्गतः प्राप्त झालेल्याच्या एकदेशामध्यें अपवाद केला जातो (त्याप्रमाणें वस्तुविषयामध्यें केला जात नाहीं, असा पुढें संबंध ) जसें—तीर्थांना सोडून अन्यत्र कोणत्याही भूताची हिंसा करूं नये, या वाक्यानें सर्व भूतांविषयीं उत्सर्गतः निवारण केलेल्या हिंसेची तीर्थामध्यें—ज्योतिष्टोमादि विशिष्ट विषयामध्यें अनुज्ञा दिली जाते (याच न्यायानें इतर क्रियांमध्येंही उत्सर्ग व अपवाद जाणावे ) पण तसा वस्तूविषयीं उत्सर्गापवाद संभवत नाहीं. येथें उत्सर्गतः अद्वैत ब्रह्माचें प्रतिपादन करून पुनः त्याच्या एकदेशामध्यें अपवाद करितां येणें शक्य नाहीं. कारण ब्रह्म अद्वैत असल्यामुळेंच त्याच्या एकदेशाची अनुपपत्ति आहे. ( अद्वय ब्रह्म उत्पन्न होतें व लीन होतें, हें म्हणणें संभवतही नाहीं असा भावार्थ.)

तथा विकल्पानुपपत्तेश्च । यथाऽतिरात्रे षोडशिनं गृह्णातीति नातिरात्रे षोडशिनं गृह्णातीति ग्रहणाग्रहणयोः पुरुषाधीनत्वाद्विकल्पो भवति । न त्विह तथा वस्तुविषये द्वैतं वा स्यादद्वैतं वेति विकल्पः संभवत्यपुरुषतन्त्रत्वादात्मवस्तुनः । विरोधाच्च द्वैताद्वैतत्वयोरेकस्य । तस्मान्न सुविवक्षितेयं कल्पना ॥

भाष्यार्थ—त्याचप्रमाणें ब्रह्मामध्यें विकल्पाचीही अनुपपत्ति आहे. जसें अतिरात्रामध्यें षोडशीचें ग्रहण करतो, व अतिरात्रांत षोडशीग्रहण करीत नाहीं, याप्रमाणें षोडशीचें ग्रहण करणें अथवा न करणें हें पुरुषाच्या अधीन असल्यामुळें विकल्प होतो; पण त्याप्रमाणें या ब्रह्मवस्तूविषयीं द्वैत असावें किंवा अद्वैत असावें, असा विकल्प संभवत नाहीं. कारण आत्मवस्तु पुरुषाच्या अधीन नाहीं. शिवाय एकाच वस्तूचें द्वैताद्वैतत्व विरुद्ध [1]आहे. यास्तव ही कल्पना सुविवाक्षित नाहीं. [ म्ह० उत्सर्ग, अपवाद, विकल्प, समुच्चय यांचा असंभव असल्यामुळें ब्रह्म नानारस आहे, ही कल्पना युक्त नाहीं. ]

---

१ या वाक्यानें ब्रह्माच्या द्वैताद्वैतसमुच्चितरूपाचा असंभव दाखविला आहे.

श्रुतिन्यायविरोधाच्च । सैन्धवघनवत्प्रज्ञानैकरसघनं निरन्तरं पूर्वापरबाह्याभ्यन्तरभेदविवर्जितं सबाह्याभ्यन्तरमजं नेति नेत्यस्थूलमनण्वजमजरमभयममृतमित्येवमाद्याः श्रुतयो निश्चितार्थाः संशयविपर्यासाशङ्कारहिताः सर्वाः समुद्रे प्रक्षिप्ताः स्युरकिंचित्करत्वात् ॥

भाष्यार्थ—शिवाय वरील कल्पना श्रुति व न्याय यांच्याशीं विरुद्ध आहे. ( त्यांतील श्रुतिविरोधच प्रथम दाखवितात—) सैंधव मिठाच्या खड्यांप्रमाणें प्रज्ञान—एकरसघन, निरंतर, पूर्व—अपर—बाह्य—अभ्यन्तर या भेदांनीं रहित, सबाह्याभ्यन्तर, अज, मूर्तही व अमूर्तही नव्हे तर त्या मूर्तामूर्ताहून विलक्षण, अस्थूल, अनणु, अज, अजर, अभय, अमृत, इत्यादि सर्व निश्चितार्थ व संशय-विपर्यास-आशंकाशून्य श्रुति वरील द्वैताद्वैतकल्पना केल्यास आकिंचित्कर—व्यर्थ—ठरत असल्यामुळें [ त्या सर्व ] समुद्रांत टाकून दिल्या सारख्या होतील.

तथा न्यायविरोधोऽपि सावयवस्यानेकात्मकस्य क्रियावतो नित्यत्वानुपपत्तेः । नित्यत्वं चाऽऽत्मनः स्मृत्यादिदर्शनादनुमीयते । तद्विरोधश्च प्राप्नोत्यनित्यत्वे । भवत्कल्पनानर्थक्यं च । स्फुटमेव चास्मिन्पक्षे कर्मकाण्डानर्थक्यम् । अकृताभ्यागमकृतविप्रणाशप्रसङ्गात् ॥

भाष्यार्थ—( याप्रमाणें श्रुतिविरोध दाखवून न्यायविरोधही दाखवितात ) तसाच वरील द्वैताद्वैतकल्पनेशीं न्यायविरोधही येतो. सावयव, अनेकात्मक व क्रियावान् अशा पदार्थाच्या नित्यत्वाची अनुपपत्ति होते. ( ' पण त्याच्या नित्यत्वाविषयींच प्रमाण काय आहे ?' उत्तर—)आत्म्याचें नित्यत्व स्मरणादिकांची प्रतीति येत असल्यामुळें त्यावरून मानलें जातें. ( स्मरणादि येथील आदिशब्दानें आज अर्धें केलेलें कार्य उद्यां संपविणें, फार दिवसांनीं पाहिलेल्या वस्तूलाही ओळखणें, इत्यादिकांचें ग्रहण करावें. ) आत्म्याला अनित्य मानल्यास त्या न्यायप्राप्त नित्यत्वाशीं विरोध येतो. शिवाय आत्म्याला अनित्य मानल्यास कर्मकांड सत्यार्थ आहे, प्रमाण आहे, या तुमच्या कल्पनेला आनर्थक्य येतें. कारण

आत्मा अनित्य आहे या पक्षीं कर्मकांडाचें व्यर्थत्व स्पष्टच आहे. कारण त्याला अनित्य मानल्यास अकृत-अभ्यागम व कृ- विप्रणाश हा अप्रसंग येतो

ननु ब्रह्मणो द्वैताद्वैतात्मकत्वे समुद्रादिदृष्टान्ता विद्यन्ते कथमुच्यते भवतैकस्य द्वैताद्वैतत्वं विरुद्धमिति । न । अन्यविषयत्वात् । नित्यनिरवयववस्तुविषयं हि विरुद्धत्वमवोचाम द्वैताद्वैतत्वस्य न कार्यविषये सावयवे । तस्माच्छ्रुतिस्मृतिन्यायविरोधादनुपपन्नेयं कल्पना ॥

भाष्यार्थ—( वाद्याचें स्वपक्ष-समर्थन–) 'अहो पण ब्रह्माच्या द्वैताद्वैतरूपत्वाविषयीं समुद्रादिकांचे दृष्टान्त आहेत. तेव्हां तुम्ही एकाचें द्वैताद्वैतत्व विरुद्ध आहे, असें कसें म्हणतां ?' ( याचें निरसन- असें नाहीं. (समुद्रादिकांना कार्यत्व व सावयवत्व असल्यामुळें अनेकात्मकत्व असणें यांत कांहीं विरुद्ध नाहीं. पण ब्रह्म नित्य व निरवयव असल्यामुळें त्याचें अनेकात्मकत्व युक्त नाहीं, अशा आशयानें म्हणतात–) आमच्या विरोधाला अन्यविषयत्व आहे. आम्ही वर जें द्वैताद्वैतत्वाचें विरुद्धत्व दाखविलें आहे तें नित्य-निरवयव वस्तूविषयीं आहे. सावयव कार्याविषयीं तें विरुद्धत्व सांगितलेलें नाहीं. ( ब्रह्माच्या नानारसत्वकल्पनेच्या अनुपपत्तीचा उपसंहार–) तस्मात् श्रुति, स्मृति व न्याय यांच्याशीं विरोध येत असल्यामुळें ही कल्पना अयोग्य आहे. ( येथें 'अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो-' इत्यादि स्मृति जाणाव्या. )

अस्याः कल्पनाया वरमुपनिषत्परित्याग एव । अध्येयत्वाच्च न शास्त्रार्थेयं कल्पना । न हि जननमरणाद्यनर्थशतसहस्रभेदसमाकुलं समुद्रवनादिवत्सावयवमनेकरसं ब्रह्म ध्येयत्वेन विज्ञेयत्वेन वा श्रुत्योपदिश्यते । प्रज्ञानघनतां चोपदिशति । "एकधैवानुद्रष्टव्यम्" इति च । अनेकधादर्शनापवादाच्च " मृत्योः स मृत्युमाप्नोति य इह नानेव पश्यति " इति ॥

भाष्यार्थ—( 'अहो पण प्रत्यक्षादि प्रमाणांशीं विरोध न येईल अशारीतीनें उपनिषदांच्या अर्थाची सिद्धि होण्यासाठीं ही कल्पना केली

आहे, तेव्हां तिला अयोग्य कसें म्हणतां येईल ? ' उत्तर—) अशा कल्पनेपेक्षां उपनिषदांचा परित्याग करणेंच चांगलें. शिवाय हें नानारसत्व ध्येयत्वानें किंवा ज्ञेयत्वानें [ म्ह० आत्म्याच्या नानारसत्वाचें ध्यान करावें, अथवा तें जाणावें, असें] शास्त्रानें सांगितलेलें नाहीं. त्यामुळें ही कल्पना शास्त्रार्थभूत नाहीं.( याचेंच विवरण—)जनन-मरणादि अनेक शतं-सहस्र अनर्थभेदांनीं अतिशय व्याकुळ झालेलें,समुद्र,वन यांप्रमाणें सावयव अनेकरस ब्रह्म ध्येयत्वानें किंवा विज्ञेयत्वानें श्रुतीनें उपदेशिलेलें नाहीं.[म्ह० समुद्र, वन इत्यादिकांप्रमाणें अनेकात्मक असलेल्या व जन्म-मरणादि अनेक अनर्थांनीं व्याकुळ झालेल्या ब्रह्माचें ध्यान करावें, किंवा त्याला जाणावें, असें श्रुतीनें विधान केलेलें नाहीं. उलट श्रुति—ब्रह्माच्या प्रज्ञानघनतेचा उपदेश करते. ' शास्त्र व आचार्य यांच्या उपदेशानुसार ब्रह्म एका प्रकारचेंच आहे, असें जाणावें,'असें श्रुति सांगते. 'तो मृत्यूपासून मृत्यूस प्राप्त होतो, कीं जो ब्रह्मामध्यें नानारूपसें पाहतो. ' असा अनेकधादर्शनाचा निषेधही केला आहे. ( त्यामुळें नानारस ब्रह्म हा शास्त्रार्थ नव्हे.)

यच्च श्रुत्या निन्दितं तन्न कर्तव्यम् । यच्च न क्रियते न स शास्त्रार्थः। ब्रह्मणोऽनेकरसत्वमनेकधात्वं च द्वैतरूपं निन्दितत्वान्न द्रष्टव्यम् । अतो न शास्त्रार्थः । यत्त्वेकरसत्वं ब्रह्मणस्तद्द्रष्टव्यत्वात्प्रशस्तं प्रशस्तत्वाच्च शास्त्रार्थो भवितुमर्हति ॥

भाष्यार्थ—श्रुतीनें ज्याची निंदा केलेली असते तें कर्तव्य नसतें आणि जें केलें जात नाहीं तो शास्त्रार्थ नव्हे. ब्रह्माचें द्वैतरूप अनेकरसत्व व अनेकधात्व निंदित असल्यामुळें-श्रुतीनें त्याची निंदा केलेली असल्यामुळें ब्रह्मामध्यें तें पाहूं नये. त्यामुळें अनेकरसत्वदर्शन हा शास्त्रार्थ नव्हे. पण ब्रह्माचें जें एकरसत्व तें द्रष्टव्य असल्यामुळें प्रशस्त आहे व प्रशस्त असल्यामुळें एकरसत्व हा शास्त्रार्थ होणें योग्य आहे.

यत्तूक्तं वेदैकदेशस्याप्रामाण्यं कर्मविषये द्वैताभावादद्वैते च प्रामाण्यमिति । तन्न । यथाप्राप्तोपदेशार्थत्वात् । न हि द्वैतमद्वैतं वा वस्तु जातमात्रमेव पुरुषं ज्ञापयित्वा पश्चात्कर्म वा ब्रह्मविद्यां वोपदिशति शास्त्रम् ॥

भाष्यार्थ--आतां ' द्वैताचा अभाव असल्यामुळें कर्मविषयांत वेदाच्या एकदेशाला अप्रामाण्य येतें व अद्वैतविषयांत प्रामाण्य येतें, ' असें जें वर म्हटलें आहे. [ म्ह० असा ब्रह्माद्वैतावर दोष दिला आहे ] तें बरोबर नाहीं. कारण शास्त्राला यथाप्राप्तोपदेशार्थत्व आहे. [ म्ह० शास्त्र जसें प्राप्त असेल तसाच उपदेश करण्यासाठीं आहे. ] केवल जन्मास आलेल्याच पुरुषाला द्वैत किंवा अद्वैत वस्तूचें ज्ञापन करून नंतर शास्त्र कर्म किंवा ब्रह्मविद्या यांचा उपदेश करीत नाहीं. ( त्यामुळें शास्त्रच प्रथम भेदाचा बोध करवून मागून अभ्युदयाचें साधन असें कर्म सांगतें, त्यामुळें भेदाची अन्यतः प्राप्तिच नाहीं, असें म्हणतां येत नाहीं. ज्याप्रमाणें शास्त्र जातमात्र—फक्त जन्मास आलेल्या—पुरुषाला अद्वैत वस्तूचा बोध करून मागाहून ब्रह्मविद्येचा उपदेश करतें, असें मानलें जात नाहीं, त्याचप्रमाणें प्रथमच पुरुषाला द्वैताचा बोध करून मागून कर्म सांगतें, असें मानतां येत नाहीं. कारण भेदप्रत्ययदशत पुरुषाला शास्त्राचा आधिकार नसतो. )

न चोपदेशार्हं द्वैतं जातमात्रप्राणिबुद्धिगम्यत्वात् । न च द्वैतस्यानृतत्वबुद्धिः प्रथममेव कस्यचित्स्यात् । येन द्वैतस्य सत्यत्वमुपदिश्य पश्चादात्मनः प्रामाण्यं प्रतिपादयेच्छास्त्रम् । नापि पाषण्डिभिरपि प्रस्थापिताः शास्त्रस्य प्रामाण्यं न गृह्णीयुः ॥

भाष्यार्थ—पण वस्तुतः द्वैत शास्त्राच्या उपदेशालाच योग्य नाहीं. कारण तें नुकत्या जन्माला आलेल्या प्राण्याच्या बुद्धीचाही विषय होऊं शकतें. द्वैत मिथ्या आहे, ही बुद्धि प्रथमच कांहीं कोणाला होत नाहीं, कीं ज्यामुळें शास्त्र अगोदर द्वैताच्या सत्यत्वाचा उपदेश करून मागाहून स्वतःच्या प्रामाण्याचें प्रतिपादन करील. फार काय पण बौद्धादि पाखंड्यांनींही श्रेयोमार्गांत प्रस्थापित केलेले त्यांचे शिष्य शास्त्राचें प्रामाण्य मानीत नाहींत, असें होत नाहीं.

---

१ प्रसिद्ध भेदाचा अंगीकार करून त्या भेदावस्थेंतच शास्त्र विधि व निषेध यांचा उपदेश करतें; व ते विधि-निषेध प्रवृत्तिद्वारा सार्थ होतात. त्यामुळें कर्मकांडाला व्यर्थत्व नाहीं, असा भावार्थ.

तस्माद्यथाप्राप्तमेव द्वैतमविद्याकृतं स्वाभाविकमुपादाय स्वाभाविक्यैवाविद्यया युक्ताय रागद्वेषादिदोषवते यथाभिमतपुरुषार्थसाधनं कर्मोपदिशत्यग्रे पश्चात्प्रसिद्धक्रियाकारकफलस्वरूपदोषदर्शनवते तद्विपरीतौदासीन्यस्वरूपावस्थानफलार्थिने तदुपायभूतामात्मैकत्वदर्शनात्मिकां ब्रह्मविद्यामुपदिशति ॥

भाष्यार्थ—( कर्मकांड व ज्ञानकांड यांच्या प्रामाण्याच्या उपपत्तीचा उपसंहार करितात–) तस्मात् यथाप्राप्तच–स्वभावतः जसें प्राप्त आहे तशाच–अविद्याकृत स्वाभाविक द्वैताचें ग्रहण करून स्वाभाविक अविद्येनेंच युक्त असलेल्या राग-द्वैषादि दोषवान् पुरुषाला शास्त्र अगोदर यथाभिमत पुरुषार्थाचें साधन–कर्म सांगतें, त्याला अभिमत–इष्ट असलेल्या पुरुषार्थाच्या साधनाचा उपदेश करतें. त्यानंतर प्रसिद्ध असलेला जो क्रिया-कारक-फलस्वरूपांतील सातिशयत्वादि दोष त्यास जाणणाऱ्या व त्या द्वैताच्या विपरीत असलेलें जें औदासीन्योपलक्षित स्वरूप त्यांत अवस्थान म्ह० कैवल्य, याच फलाची इच्छा करणाऱ्या पुरुषाला[1] त्या स्वरूपावस्थानरूप फलाच्या उपायभूत आत्मैकत्वदर्शनरूप ब्रह्मविद्येचा उपदेश करतें.

अथैवं सति तदौदासीन्यस्वरूपावस्थाने फले प्राप्ते शास्त्रस्य प्रामाण्यं प्रत्यर्थित्वं निवर्तते। तदभावाच्छास्त्रस्यापि शास्त्रत्वं तं प्रति निवर्तत एव। तथा प्रतिपुरुषं परिसमाप्तं शास्त्रमिति न शास्त्रविरोधगन्धोऽप्यस्ति। अद्वैतज्ञानावसानत्वाच्छास्त्रशिष्यशासनादिद्वैतभेदस्य। अन्यतमावस्थाने हि विरोधः स्यादवस्थितस्येतरेतरापेक्षत्वात्। शास्त्रशिष्यशासनानां नान्यतमोऽप्यवतिष्ठते। सर्वसमाप्तौ तु कस्य विरोध आशङ्क्येताद्वैते केवले शिवे सिद्धे। नाप्यविरोधताऽत एव ॥

भाष्यार्थ—( शिवाय कर्मकांड व ज्ञानकांड यांचा विरोध तत्त्वज्ञान झाल्यानंतर होतो कीं त्या पूर्वी ? तत्त्वज्ञानानंतर म्हणाल तर तो शक्य

1 म्हणजेच साधनचतुष्टयसंपन्न मुमुक्षूला.

नाहीं. कारण ) आतां अवस्थाभेदानें एका पुरुषाचे ठिकाणींही दोन्ही कांडांचें प्रामाण्य अविरुद्ध आहे असें ठरलें असतां औदासीन्यस्वरूपावस्थानरूप फल प्राप्त होतांच—कैवल्य मिळतांच शास्त्राच्या प्रामाण्याविषयींची इच्छा निवृत्त होते; आणि शास्त्रप्रामाण्याविषयींचें अर्थित्व-इच्छा नसल्यानें—शास्त्रप्रामाण्येच्छेचा अभाव झाल्यामुळें त्या पुरुषाप्रत शास्त्राचें शास्त्रत्वही निवृत्त होतेंच. याच न्यायानें प्रत्येक पुरुषाप्रत शास्त्र परिसमाप्त झालेलें आहे. त्यामुळें शास्त्रविरोधाचा गंधही नाहीं. शास्त्र, शिष्य, शासन इत्यादि द्वैतभेदाचें अद्वैत ज्ञानामध्यें पर्यवसान होतें. शास्त्र, शिष्य, शासन यांतील एकादेंही जर अवस्थित असेल तर विरोध होईल. कारण अवस्थित असलेल्याला परस्परापेक्षा असते. पण शास्त्र, शिष्य व शासन यांतील एकही अवस्थित होत नाहीं. मग सर्वांचीच समाप्ति झाल्यावर अद्वैत, केवल, शिव सिद्ध झालें असतां कोणाच्या विरोधाची शंका घ्यावयाची ? म्हणूनच अविरोधिताही नाहीं.

अथाप्यभ्युपगम्य ब्रूमः । द्वैताद्वैतात्मकत्वेऽपि शास्त्रविरोधस्य तुल्यत्वात् । यदाऽपि समुद्रादिवद्द्वैताद्वैतात्मकमेकं ब्रह्माभ्युपगच्छामो नान्यद्वस्त्वन्तरं तदाऽपि भवदुक्ताच्छास्त्रविरोधान्न मुच्यामहे । कथम् । एकं हि परं ब्रह्म द्वैताद्वैतात्मकं तच्छोकमोहाद्यतीतत्वादुपदेशं न काङ्क्षति । न चोपदेष्टाऽन्यो ब्रह्मणो द्वैताद्वैतरूपस्य ब्रह्मण एकस्यैवाभ्युपगमात् ॥

भाष्यार्थ—( ब्रह्म अद्वितीयच आहे, द्वैताद्वैतात्मक नाहीं, असें उपपादन केलें. आतां ब्रह्म द्वैताद्वैतात्मक आहे, असें जरी मानलें तरी विरोधाचा परिहार करितां येणें शक्य नाहीं, असें सांगतात—) आतां यानंतर आम्ही ब्रह्म द्वैताद्वैतात्मक आहे, असें मानून बोलतों—ब्रह्माला द्वैताद्वैतात्मकत्व जरी असलें तरी शास्त्रविरोधाला तुल्यत्वच आहे. [ म्ह० शास्त्रविरोध सारखाच येतो. ] समुद्रादिकांप्रमाणें द्वैताद्वैतात्मक एक ब्रह्म आहे, दुसरें वस्त्वन्तर नाहीं, असें जरी मानलें तरीही तुम्ही सांगितले-

त्या शास्त्रविरोधापासून आम्ही सुटत नाहीं. तें कसें ? कारण द्वैताद्वैतात्मक पर ब्रह्म एक आहे, तें शोक-मोहादिकांनीं विरहित [ नित्यमुक्त ] असल्यामुळें उपदेशाची आकांक्षा करीत नाहीं. शिवाय उपदेश करणारा ब्रह्माहून निराळा नाहीं. कारण द्वैताद्वैतरूप ब्रह्म एकच मानलेलें आहे.

अथ द्वैतविषयस्यानेकत्वादन्योन्योपदेशो न ब्रह्मविषय उपदेश इति चेत् । तदा द्वैताद्वैतात्मकमेकमेव ब्रह्म नान्यदस्तीति विरुध्यते । यस्मिन्द्वैतविषयेऽन्योन्योपदेशः सोऽन्यो द्वैतं चान्यदेवेति समुद्रदृष्टान्तो विरुद्धः । न च समुद्रोदकैकत्ववद्विज्ञानैकत्वे ब्रह्मणोऽन्यत्रोपदेशग्रहणादिकल्पना संभवति ॥

भाष्यार्थ—आतां द्वैतविषयाला अनेकत्व असल्यामुळें त्यांत परस्पर उपदेश संभवतो. उपदेश ब्रह्मविषय नाहीं, म्हणून म्हणाल तर द्वैताद्वैतात्मक ब्रह्म एकच आहे, तें अन्य नाहीं, त्याहून अन्य कांहीं नाहीं, असा तुमचा सिद्धान्त असल्यामुळें त्याच्याशीं विरोध येतो. (शिवाय सर्व जर ब्रह्मरूप आहे तर समुद्राचा दृष्टान्तही योग्य नाहीं. कारण ) ज्या द्वैतविषयामध्यें अन्योन्योपदेश होतो तो निराळा व द्वैतही निराळेंच, त्यामुळें समुद्राचा दृष्टान्त विरुद्धच आहे. ( ' फेंसादि विकार भिन्न असले तरी त्यांना जसें समुद्रोदकरूपत्व असतें तसें जीवादिकांना भिन्नत्व जरी असलें तरी ब्रह्मस्वभाव विज्ञानाला एकत्व असल्यामुळें ' ब्रह्म सर्व आहे ' या म्हणण्याशीं कांहीं विरोध येत नाहीं,' असें कोणी म्हणेल तर त्याचें उत्तर—) समुद्राच्या उदकाचें जसें एकत्व असतें त्याप्रमाणें विज्ञानाचें जर एकत्व असेल तर ब्रह्माहून अन्य स्थानीं उपदेशग्रहणादिकांची कल्पना संभवत नाहीं. ( कारण सर्वांचें ब्रह्मत्व जर स्वीकारलें तर उपदेशही ब्रह्मविषयकच होईल. कारण जोंवर विचार केला नाहीं तोंवरच भेद रमणीय वाटणारा आहे, असा भावार्थ. )

---

१ कारण द्वैताला उद्देशून कर्मकांडाला प्रामाण्य व अद्वैताला उद्देशून ज्ञानकांडाला प्रामाण्य आहे, असें म्हणतां येतें.

न हि हस्तादिद्वैताद्वैतात्मके देवदत्ते वाक्कर्णयोर्देवदत्तैकदेशभूतयोर्वागुपदेष्ट्री कर्णः केवल उपदेशस्य ग्रहीता। देवदत्तस्तु नोपदेष्टा नाप्युपदेशस्य ग्रहीतेति कल्पयितुं शक्यते। समुद्रैकोदकात्मत्ववदेकविज्ञानवत्त्वाद्देवदत्तस्य। तस्माच्छ्रुतिन्यायविरोधश्चाभिप्रेतार्थासिद्धिश्चैवंकल्पनायां स्यात्। तस्माद्यथाव्याख्यात एवास्माभिः पूर्णमद इत्यस्य मन्त्रस्यार्थः॥

भाष्यार्थ—( ' अहो पण ब्रह्म म्हणजे नानारूप वस्तूंचा समुदाय. त्यांत प्रदेशभेद असल्यामुळें म्ह० भिन्न भिन्न अनेक प्रदेश असल्यामुळें त्यांच्यामध्यें परस्पर उपदेश्य-उपदेशकभाव संभवतो. पण स्वतः ब्रह्म उपदेश्यही नाहीं व उपदेशकही नाहीं. ' असें म्हणाल तर सांगतों—) हात, पाय इत्यादि अनेक अवयवांच्या दृष्टीनें द्वैतरूप व एक देही—अवयवी या दृष्टीनें अद्वैतरूप अशा देवदत्ताख्य पुरुषामध्यें—देवदत्ताचे एकदेशभूत अशा—वाक् व कर्ण यांतील वाक् उपदेश करणारी व केवल कर्ण—कान उपदेशाचें ग्रहण करणारा; पण स्वतः देही—देवदत्त उपदेष्टा नाहीं व उपदेशाचें ग्रहण करणाराही नाहीं, अशी कल्पना करतां येणें शक्य आहे. कारण समुद्राच्या उदक याच एका रूपाप्रमाणें देवदत्ताचें विज्ञान हेंच एक रूप आहे. [ म्हणजे जसें समुद्राचें फेंसादिकांमध्यें उदकरूपानें एकत्व असतें त्याप्रमाणें देवदत्त या क्षेत्रज्ञाचें वागादि इंद्रियांमध्यें एकत्वानें विज्ञानवत्त्व आहे. त्यामुळें वरच्या सारखी व्यवस्था संभवत नाहीं. ब्रह्मविषयींही असेंच जाणावें. आतां या मतान्तराच्या निराकरणाचा उपसंहार करितात—] तस्मात् ब्रह्म एकात्मक व अनेकात्मक आहे, अशी कल्पना केली असतां आत्म्याचें एकत्व प्रतिपादणारी श्रुति व सावयव अनेकात्म वस्तु अनित्य असते, हा पूर्वोक्त न्याय यांच्याशीं विरोध येतो व तुमच्या अभिप्रेत अर्थाचीही असिद्धि होते. तस्मात् ' पूर्णमदः० ' इत्यादि मंत्राचा अर्थ आम्ही जसा वर सांगितला आहे, तसाच आहे.

ॐ खं ब्रह्म । खं पुराणं वायुरं खमिति ह स्माऽऽह कौरव्यायणीपुत्रो वेदोऽयं ब्राह्मणा विदुर्वेदैनेन यद्वेदितव्यम् ॥ इति बृहदारण्यकोपनिषदि पञ्चमाध्यायस्य प्रथमं ब्राह्मणम् ॥ १ ॥

अर्थ--ॐ खं ब्रह्म-ओंशब्दवाच्य आकाश ब्रह्म आहे. (हा मंत्र आहे. ब्राह्मण त्याचें व्याख्यान करतें--) हें ख--आकाश पुराण--सनातन आहे. म्हणजे तें परमात्माकाश आहे. पण कौरव्यायणीपुत्र 'खं' या शब्दानें वायु ज्यांत असतो तें वायुर ख--आकाश घ्यावें असें म्हणाला आहे. जें ज्ञातव्य ब्रह्म तें ओंकारानें साधक जाणतो. म्हणून ओंकार हा वेद आहे, असें ब्राह्मण समजतात. (१).

ॐ खं ब्रह्मेति मन्त्रोऽयं चान्यत्राविनियुक्त इह ब्राह्मणेन ध्यानकर्मणि विनियुज्यते ॥ अत्र च ब्रह्मेति विशेष्याभिधानं खमिति विशेषणम् । विशेषणविशेष्ययोश्च सामानाधिकरण्येन निर्देशो नीलोत्पलवत्खं ब्रह्मेति । ब्रह्मशब्दो बृहद्वस्तुमात्रास्पदोऽविशेषितोऽतो विशेष्यते खं ब्रह्मेति ॥

भाष्यार्थ—(ध्यानाचें अंग या रूपानें उपनिषदांचा अर्थ असें जें ब्रह्म त्याचा अनुवाद करून ध्यानाच्या विधानार्थ ध्यानांत ज्याचा विनियोग केला आहे असा मंत्र उत्थापित करितात--) 'ॐ खं ब्रह्म-' हा मंत्र आहे. 'इषे त्वा०' इत्यादि मंत्रांप्रमाणें दुसऱ्या कोणत्याही कर्मांत याचा विनियोग केलेला नाहीं. पण येथें ब्राह्मणाकडून ध्यानकर्मामध्यें त्याचा विनियोग केला जातो. (त्या मंत्रापुढील 'खं पुराणं०' इत्यादि हें ब्राह्मण आहे. त्या ब्राह्मणाला ध्यानाशीं संबद्ध असलेल्या पदार्थांचें प्रकाशन करणें, या सामर्थ्यावरून विनियोजकत्व आहे. वस्तुतः मंत्रांतील सामर्थ्यच विनियोजक असतें. पण मंत्र व ब्राह्मण यांना एकार्थत्व असल्यामुळें--यांचा अर्थ एक असल्यामुळें--ब्राह्मणालाही सामर्थ्यद्वारा विनियोजकत्व असणें अविरुद्ध आहे, असा भावार्थ.)

या मंत्रांत 'ब्रह्म' या शब्दानें विशेष्याचें कथन केलें व 'खं' हें विशेषणाचें कथन आहे. 'निळें कमळ' याप्रमाणें 'खं ब्रह्म' हा विशेषण व विशेष्य यांचा सामानाधिकरण्यानें--एका प्रथमान्त विभक्तीनें--निर्देश

केला आहे. (त्या सामानाधिकरण्यावरूनच त्यांचा विशेषणविशेष्यभाव निश्चित होतो.) अविशेषित [म्ह० ज्याला विशेषण लावलेलें नाहीं असा] ब्रह्मशब्द केवळ मोठी वस्तु याअर्थी प्रवृत्त होतो. म्हणूनच 'खं ब्रह्म' असें म्हणून तो ब्रह्मशब्द विशेषित केला जातो [केवळ मोठी वस्तु या सामान्य अर्थापासून व्यावृत्त केला जातो.]

यत्तत्खं ब्रह्म तदोंशब्दवाच्यमोंशब्दस्वरूपमेव वोभयथाऽपि सामानाधिकरण्यमविरुद्धम् । इह च ब्रह्मोपासनसाधनत्वार्थमोंशब्दः प्रयुक्तः। तथा च श्रुत्यन्तरात् "एतदालम्बनं श्रेष्ठमेतदालम्बनं परम्" "ओमित्यात्मानं युञ्जीत" "ओमित्येतेनैवाक्षरेण परं पुरुषमभिध्यायीत" "ओमित्येवं ध्यायथ आत्मानम्" इत्यादेः ॥

भाष्यार्थ—(अहोपण निरुपाधिक किंवा सोपाधिक ब्रह्माला विशेषणवत्त्व जरी असलें तरी त्याच्या ठिकाणीं 'ॐ' शब्दाची प्रवृत्ति कशी होते? तें सांगतात—) तें जें खं ब्रह्म तें ॐशब्दवाच्य[1] किंवा ॐशब्दस्वरूपच आहे. पण दोन्ही अर्थीं [म्ह० या दोन अर्थांतील कोणताही अर्थ जरी घेतला तरी] सामानाधिकरण्य—एकविभक्तित्व अविरुद्ध आहे. या मंत्रांत ॐ हा शब्द ब्रह्मोपासनेचें साधन आहे, हें सांगण्यासाठीं योजला आहे. (त्याविषयीं प्रमाण—) 'ॐ हें श्रेष्ठ आलंबन—उपासनाधार आहे, हें पर आलंबन आहे' (काठको० पृ. ५८) 'ॐ असा उच्चार करून चित्ताला आत्म्यामध्यें योजावें' 'ॐ अशा याच अक्षरानें परम पुरुषाचें ध्यान करावें' ( प्रश्नो० पृ. ८० ) ' ॐ या रीतीनें आत्म्याचें ध्यान करा. ( मुण्डको० पृ. ७५ ) इत्यादि याच अर्थीं दुसऱ्या श्रुति आहेत.

अन्यार्थासंभवाच्चोपदेशस्य । यथाऽन्यत्रोमिति शंसत्योमित्युद्गायतीत्येवमादौ स्वाध्यायारम्भापवर्गयोश्चोंकारप्रयोगो विनियोगादवगम्यते न च तथाऽर्थान्तरमिहावगम्यते । तस्माद्ध्यानसाधनत्वेनैवेहोंकारशब्दस्योपदेशः ॥

---

१ ॐ या शब्दानें वाच्य, ॐ हें त्याचें नांव आहे.

भाष्यार्थ—'ॐ' हें ब्रह्मोपासनेचें साधन आहे, या अर्थाहून 'ॐ खं ब्रह्म' या उपदेशाचा दुसरा अर्थ संभवत नाहीं. (यास्तव ॐ हें ब्रह्मोपासनेचें साधन आहे, असें मानावें. याचाच विस्तार–) ज्याप्रमाणें दुसऱ्या ठिकाणीं 'ॐ इति शंसति-' ॐ असें म्हणून शंसन–शस्त्रपठन करतो, 'ॐ इति उद्गायति-' ॐ असें म्हणून मोठ्यानें सामगान करतो, इत्यादि प्रसंगीं त्याचप्रमाणें स्वाध्यायाच्या आरंभीं व अंतीं ओंकाराचा प्रयोग करावा, असें विनियोगावरून ज्ञात होतें, त्याप्रमाणें येथील 'ॐ'-काराचें दुसरें प्रयोजन येथें अवगत होत नाहीं. तस्मात् 'ॐ खं ब्रह्म' या मंत्रांत ध्यानसाधनत्वानेंच ॐकारशब्दाचा उपदेश केला आहे.

यद्यपि ब्रह्मात्मादिशब्दा ब्रह्मणो वाचकास्तथाऽपि श्रुतिप्रामाण्या-द्ब्रह्मणो नेदिष्ठमभिधानमोंकारः । अत एव ब्रह्मप्रतिपत्ताविदं परं साधनम् । तच्च द्विप्रकारेण प्रतीकत्वेनाभिधानत्वेन च । प्रतीकत्वेन यथा विष्ण्वादिप्रतिमाऽभेदेनैवमोंकारो ब्रह्मेति प्रतिपत्तव्यः । तथा ह्योंकारालम्बनस्य ब्रह्म प्रसीदति—"एतदालम्बनं श्रेष्ठमेतदालम्बनं परम् । एतदालम्बनं ज्ञात्वा ब्रह्मलोके महीयते ॥[1]" इति श्रुतेः ॥

भाष्यार्थ—आतां ब्रह्म, आत्मा इत्यादि शब्द जरी ब्रह्माचे वाचक असले तरी श्रुतिप्रामाण्यावरून 'ओं'कार हें ब्रह्माचें अतिशय निकट–अतिशय प्रिय असें अभिधान–नाम आहे. म्हणूनच ब्रह्मज्ञानाविषयीं हें परम साधन आहे. तें प्रतीकत्वानें व अभिधानत्वानें असें दोन प्रकारें साधन होतें. प्रतीकत्वानें साधनत्व कसें ? ज्याप्रमाणें विष्णु, शिव इत्या-दिकांची प्रतिमा, 'हीच विष्णु आहे,' अशा अभेदानें विष्ण्वादिकांच्या ज्ञानाचें साधन होते त्याप्रमाणें 'ओंकारच ब्रह्म आहे' असें अभेदानें जाणावें; तसें जाणलें असतां ओंकाराला ब्रह्माचें आलंबन करणाराला ब्रह्मप्रसाद होतो. [ओंकाराला प्रतीक–उपासनाधार करून ब्रह्मोपासना करणाराचें ब्रह्म–अन्तर्यामी–चित्स्वरूप प्रसन्न होतें. ] कारण 'हें श्रेष्ठ आलंबन आहे, हें सर्व श्रेष्ठ आलंबन आहे. या आलंबनाला जाणून

---

१ तैत्तिरीय व छान्दोग्य श्रुतींत.

उपासक ब्रह्मलोकीं पूज्य होतो.' अशी काठक श्रुति आहे (पृ. ५८).

तत्र खमिति भौतिके खे प्रतीतिर्मा भूदित्याह । खं पुराणं चिरंतनं खं परमात्माकाशमित्यर्थः । यत्तत्परमात्माकाशं पुराणं खं तच्चक्षुराद्यविषयत्वान्निरालम्बनमशक्यं ग्रहीतुमिति श्रद्धाभक्तिभ्यां भावविशेषेण चोंकार आवेशयति । यथा विष्ण्वङ्गाङ्कितायां शिलादिप्रतिमायां विष्णुं लोक एवम् ॥

भाष्यार्थ—(याप्रमाणें मंत्राचें व्याख्यान करून ब्राह्मणाचें व्याख्यान करितात–)'खं पुराणं-''ॐ खं ब्रह्म'या मंत्रांतील 'खं'या शब्दानें भौतिक आकाश या अर्थाची प्रतीति होऊं नये,म्हणून ब्राह्मण म्हणतें'खं पुराणं-' चिरंतन–सनातन आकाश–परमात्माकाश असा याचा अर्थ. ('अहोपण तें तत्त्व स्वतःच्या स्वरूपानेंच जाणतां येणें शक्य आहे. मग प्रतीकोपदेशाचा उपयोग काय ?' अशी आशंका घेऊन सांगतात–) तें जें परमात्माकाश 'पुराणं खं' तें चक्षुरादिकांचा विषय होणारें नसल्यामुळें निरालंबन–निराधार आहे. त्याचें ग्रहण करतां येणें अशक्य आहे. यास्तव श्रद्धा व भक्ति आणि विशेष[1] भावना यांच्या योगानें श्रुति ब्रह्माला ओंकारामध्यें आविष्ट करीत आहे. (ओंकारांतील ब्रह्मावेशन उदाहरणानें दृढ करितात–) ज्याप्रमाणें विष्णूच्या अंगांनीं चिह्नित असलेल्या शालग्राम शिलादि प्रतिमेमध्यें लोक विष्णूचें आवेशन करितात त्याप्रमाणें (श्रुति ओंकारांत ब्रह्मावेशन करीत आहे.)

वायुरं खं वायुरस्मिन्विद्यत इति वायुरं खं खमात्रं खमित्युच्यते न पुराणं खमित्येवमाह स्म । कोऽसौ । कौरव्यायणीपुत्रः । वायुरे हि खे मुख्यः खशब्दव्यवहारस्तस्मान्मुख्ये संप्रत्ययो युक्त इति मन्यते । तत्र यदि पुराणं खं ब्रह्म निरुपाधिस्वरूपं यदि वा वायुरं खं सोपाधिकं ब्रह्म सर्वथाऽप्योंकारः प्रतीकत्वेनैव प्रतिमावत्साधनत्वं प्रतिपद्यते ।

१ बुद्धीच्या विषयपारतंत्र्याचा परिहार करून तिला प्रत्यग्ब्रह्मज्ञानाच्या अभिमुख करणें.

"एतद्वै सत्यकाम परं चापरं च ब्रह्म यदोंकारः" इति श्रुत्यन्तरात् केवलं खशब्दार्थे विप्रतिपत्तिः ॥

भाष्यार्थ---'वायुरं खं-' यांत वायु असतो म्हणून तें ख वायुरं आहे. येथील 'ख-'शब्दानें केवळ आकाश सांगितलें जातें. पुराण आकाश नव्हे. 'इति ह स्माह-' असें सांगता झाला. तो कोण ? 'कौरव्यायणीपुत्रः' कौरव्यायणीपुत्र असें सांगता झाला. वायुर आकाशांत म्ह० ज्यांत वायु असतो त्या भूताकाशांत–तें भूताकाश या अर्थी 'ख' या शब्दाचा मुख्य व्यवहार होतो. त्यामुळें शब्दाचा मुख्य अर्थी संप्रत्यय येणें युक्त आहे, असें कौरव्यायणीपुत्र मानतो. त्यांतील जरी पुराण ख–निरुपाधिस्वरूप ब्रह्म अथवा वायुर ख–सोपाधिक ब्रह्म मानलें तरी म्ह० कोणतेंही ब्रह्म जरी मानलें तरी ओंकार प्रतिमेप्रमाणें 'प्रतीक' या रूपानेंच ब्रह्मोपासनेच्या साधनत्वास प्राप्त होतो. 'हे सत्यकामा, जो ओंकार तेंच हें पर व अपर ब्रह्म आहे' अशी याअर्थी दुसरी श्रुति आहे ( प्रश्नोप. पृ.७५-७६ पहा)अर्थात् येथें जी विप्रतिपत्ति आहे ती केवळ खशब्दाच्या अर्थाविषयीं आहे.

वेदोऽयमोंकारो वेद विजानात्यनेन यद्वेदितव्यम् । तस्माद्वेद ॐकारो वाचकोऽभिधानम् । तेनाभिधानेन यद्वेदितव्यं ब्रह्म प्रकाश्यमानमभिधीयमानं वेद साधको विजानात्युपलभते । तस्माद्वेदोऽयमिति ब्राह्मणा विदुः । तस्माद्ब्राह्मणानामभिधानत्वेन साधनत्वमभिप्रेतमोंकारस्य॥

भाष्यार्थ---(याप्रमाणें प्रतीकपक्षाचें उपपादन करून अभिधान–नाम–पक्षाचें उपपादन करितात–)'वेदोऽयं-'हा ओंकार वेद आहे. 'वेद-' जाणतो 'एनेन-' यानें 'यद्वेदितव्यं 'जें जाणण्यास उचित आहे तें यानें जाणतो. तस्मात् वेद–ओंकार हें वाचक नांव आहे. त्या अभिधानानें –नांवानें जें वेदितव्य–प्रकाशित होणारें–सांगितलें जाणारें ब्रह्म तें साधक जाणतो, त्याला तें उपलब्ध होतें. म्हणून हा वेद आहे, असें ब्राह्मण जाणतात. तस्मात् ओंकाराला अभिधानत्वानें साधनत्व आहे,

म्ह० ओंकार हें ब्रह्माचें अभिधान–वाचक–नांव असल्यामुळें तें त्याच्या उपासनेचें साधन आहे, असें ब्राह्मणांना अभिप्रेत आहे.

अथवा वेदोऽयमित्याद्यर्थवादः । कथम् । ओंकारो ब्रह्मणः प्रतीकत्वेन विहितः । ॐ खं ब्रह्मेति सामानाधिकरण्यात्तस्य स्तुतिरिदानीं वेदत्वेन । सर्वो ह्ययं वेद ॐकार एव । एतत्प्रभव एतदात्मक सर्व ऋग्यजुःसामादिभेदभिन्न एष ओंकारः "तद्यथा शङ्कुना सर्वाणि पर्णानि०" इत्यादिश्रुत्यन्तरात् ॥

भाष्यार्थ—(वरील अभिधानपक्षाप्रमाणेंच प्रतीकपक्षींही 'वेदोऽयं' इत्यादि ग्रंथाचा निर्वाह लागतो, असें सांगतात–) अथवा 'वेदोऽयं०' इत्यादि हा अर्थवाद आहे. (अहो पण विधीच्या अभावीं) अर्थवाद कसा संभवतो ? ओंकार ब्रह्माच्या प्रतीकत्वानें विहित आहे. कारण 'ॐ खं ब्रह्म' असें 'ॐ' व 'ब्रह्म' यांचें सामानाधिकरण्य आहे. आतां त्याची वेदत्वानें स्तुति केली जाते. हा सर्व वेद ओंकारच. यापासून उद्भवणारा, एतद्रूप असा हा ओंकार सर्व ऋग्यजुःसामादिभेदानें भिन्न आहे. 'ज्याप्रमाणें देंठानें सर्व पानें व्यापलेलीं असतात त्याप्रमाणें ॐकारानें सर्व वेद व्याप्त आहेत' अशा अर्थाची छान्दोग्य श्रुति आहे.

इतश्चायं वेद ॐकारो यद्वेदितव्यं तत्सर्वं वेदितव्यमोंकारेणैव वेदैनेनातोऽयमोंकारो वेदः । इतरस्यापि वेदस्य वेदत्वमत एव । तस्माद्विशिष्टोऽयमोंकारः साधनत्वेन प्रतिपत्तव्य इति । अथवा वेदः सः । कोऽसौ । यं ब्राह्मणा विदुरोंकारम् । ब्राह्मणानां ह्यसौ प्रणवोद्गीथादिविल्कपैर्विज्ञेयः । तस्मिन्हि प्रयुज्यमाने साधनत्वेन सर्वो वेदः प्रयुक्तो भवतीति ॥ १ ॥ इति बृहदारण्यकोपनिषद्भाष्ये पञ्चमाध्यायस्य प्रथमं ब्राह्मणम् ॥ १ ॥

भाष्यार्थ—याही कारणानें हा ओंकार वेद आहे. जें कांहीं पर किंवा अपर ब्रह्म जाणण्यास योग्य आहे तें सर्व ज्ञातव्य या ओंकारानेंच साधक जाणतो म्हणून हा ओंकार वेद आहे. इतर वेदालाही

त्यामुळेंच[१] वेदत्व आहे. तस्मात् विशिष्ट असा हा ओंकार साधनत्वानें जाणावा. (याप्रमाणें अभिधानपक्षीं व प्रतीकपक्षीं वरील एकच वाक्य योजून दोन्ही पक्षीं साधारण्यानें त्याची योजना करितात–) अथवा ते, वेद. तो कोण? ज्याला ब्राह्मण ओंकार समजतात तो. कारण ब्राह्मणांना हा प्रणव उद्गीथादि विकल्पांनीं विज्ञेय–उपास्य आहे. यास्तव त्या प्रणवाचा साधन या रूपानें प्रयोग केला असतां सर्व वेदाचा प्रयोग केला आहे, असें होतें. १.

इति बृहदारण्यकभाष्यार्थाच्या पांचव्या अध्यायाचें प्रथम ब्राह्मण समाप्त झालें.

---

त्रयाः प्राजापत्याः प्रजापतौ पितरि ब्रह्मचर्यमूषुर्देवा मनुष्या असुरा उषित्वा ब्रह्मचर्यं देवा ऊचुर्ब्रवीतु नो भवानिति तेभ्यो हैतदक्षरमुवाच द इति व्यज्ञासिष्टा३ इति व्यज्ञासिष्मेति होचुर्दाम्यतेति न आत्थेत्योमिति होवाच व्यज्ञासिष्टेति ॥ १ ॥

अर्थ--देव, मनुष्य व असुर अशीं तीन प्रजापतीचीं अपत्यें प्रजापति पित्यापाशीं शिष्यवृत्तीनें राहून ब्रह्मचर्यव्रत पाळतीं झालीं. ब्रह्मचर्यवास करून देव प्रजापतीला म्हणाले, "आपण आम्हांला उपदेश करा." तेव्हां त्यांना प्रजापति 'द' असें हें अक्षर सांगता झाला; आणि केवळ 'द' हेंच अक्षर सांगून 'मीं काय सांगितलें तें कळलें का?' असें तो म्हणाला. त्यावर 'आम्ही समजलों, आम्हांला कळलें,' असें देव म्हणाले. 'तुम्ही दान्त व्हा– बाह्य इंद्रियांचें दमन करा,' असें तुम्हीं सांगितलें. तेव्हां 'होय तुम्हांला बरोबर कळलें, तुम्हीं जाणलेंत,' असें प्रजापति बोलला १.

अधुना दमादिसाधनत्रयविधानार्थोऽयमारम्भः । त्रयास्त्रिसंख्याकाः प्राजापत्याः प्रजापतेरपत्यानि प्राजापत्यास्ते किं प्रजापतौ पितरि ब्रह्मचर्यं शिष्यत्ववृत्तेर्ब्रह्मचर्यस्य प्राधान्याच्छिष्याः सन्तो ब्रह्मचर्यमूषुरुषितवन्त इत्यर्थः । के ते । विशेषतो देवा मनुष्या असुराश्च । ते चोषि-

---

१ ज्ञातव्य जें पर व अपर ब्रह्म त्याच्या ज्ञानाला कारण होत असल्यामुळेंच.

त्वा ब्रह्मचर्यं किमकुर्वन्नित्युच्यते । तेषां देवा ऊचुः पितरं प्रजापतिम्। किमिति । ब्रवीतु कथयतु नोऽस्मभ्यं यदनुशासनं भवानिति ॥

भाष्यार्थ—( दुसऱ्या ब्राह्मणाचें तात्पर्य—) अतां दमादि साधनत्रयाच्या विधानार्थ हा आरंभ—ही आख्यायिकेची प्रवृति आहे. (सर्व उपासनेच्या अंगत्वानें हें दमादिकांचें विधान आहे.) 'त्रयाः-' त्रिसंख्याक—तीन 'प्राजापत्याः-' प्रजापतीचीं अपत्यें—प्राजापत्य, ते काय करते झाले ? 'प्रजापतौ पितरि-' प्रजापति जो आपला पिता—उत्पादक त्याच्या ठिकाणीं—त्याच्यापाशीं [ ब्रह्मचर्यवास करते झाले, असा संबंध ] 'ब्रह्मचर्यं-' शिष्यभावानें जी वृत्ति तिच्या संबंधी जे धर्म त्यांत ब्रह्मचर्याला प्राधान्य असल्यामुळें शिष्य होऊन 'ऊषुः-' ब्रह्मचर्यवास करते झाले, असा भावार्थ. कोण ते ? विशेषतः 'देव, मनुष्य व असुर.' ते 'ब्रह्मचर्यं उषित्वा-' ब्रह्मचर्यवास करून काय करते झाले तें सांगितलें जातें. 'देवा ऊचुः-' त्यांतील देव प्रजापति पित्याला म्हणाले, 'ब्रवीतु नो भवान् इति-' आपण आम्हांला जें अनुशासन करावयाचें तें करा, असें बोलले.

तेभ्य एवमर्थिभ्यो हैतदक्षरं वर्णमात्रमुवाच द इति । उक्त्वा च तान्पप्रच्छ पिता किं व्यज्ञासिष्टा३ इति । मयोपदेशार्थमभिहितस्याक्षरस्यार्थं विज्ञातवन्त आहोस्विन्नेति । देवा ऊचुर्व्यज्ञासिष्मेति विज्ञातवन्तो वयम् । यद्येवमुच्यतां किं मयोक्तमिति । देवा ऊचुर्दाम्यतादान्ता यूयं स्वभावतोऽतो दान्ता भवतेति नोऽस्मानात्थ कथयसि । इतर आहोमिति सम्यग्व्यज्ञासिष्टेति ॥ १ ॥

भाष्यार्थ—'तेभ्यः ह-' याप्रमाणें प्रार्थना करणाऱ्या त्यांस( येथील हशब्द ऊहापोह करण्यास समर्थ असलेल्यांना शिष्यत्व प्राप्त होतें, हें द्योतित करण्यासाठीं आहे ) 'एतदक्षरं उवाच ह इति-' 'द' हें अक्षर—नुस्ता 'द' हा वर्ण सांगता झाला; आणि तें अक्षर सांगून 'काय तुम्हीं समजलांत का?' असें पिता त्यांस विचारता झाला. ('व्यज्ञा-

विष्टा३ ' अशी येथें असलेली प्लुति स्वीकारून प्रश्नाचेंच व्याख्यान करितात–) मी उपदेशार्थ सांगितलेल्या अक्षराचा अर्थ तुम्ही जाणलात काय ? कीं नाहीं. ? ' विज्ञासिष्मेति होचुः-' देव म्हणाले, " आम्ही त्याचा अर्थ समजलों." ( प्रजापति–) असें जर असेल तर मीं काय सांगितलें तें बोला पाहूं. देव म्हणाले, ' दाम्यतेति न आत्थ-' ' तुम्ही स्वभावतः अदान्त आहां; यास्तव दान्त व्हा असें आम्हांला तूं सांगत आहेस.' 'ॐ इति होवाच व्यज्ञासिष्टेति-' त्यावर प्रजापति म्हणाला, "होय, चांगलें–बरोबर जाणलेंत." १.

अथ हैनं मनुष्या ऊचुर्ब्रवीतु नो भवानिति तेभ्यो हैतदेवाक्षरमुवाच द इति व्यज्ञासिष्टा३ इति व्यज्ञासिष्मेति होचुर्दत्तेति न आत्थेत्योमिति होवाच व्यज्ञासिष्टेति ॥ २ ॥

अर्थ––नंतर प्रजापतीला मनुष्य बोलले–' आम्हांला आपण उपदेश सांगा.' तेव्हां त्यांनाही ' द ' असें हेंच अक्षर प्रजापति सांगता झाला; आणि ' या अक्षराचा अर्थ समजलात का ? ' असें विचारूं लागला. तेव्हां ' होय आम्ही त्याचा अर्थ समजलों. आम्हाला ' द्या ' असें तूं सांगत आहेस,' असें ते बोलले. त्यावर प्रजापति म्हणाला " होय, चांगलें जाणलेंत " २.

समानमन्यत् । स्वभावतो लुब्धा यूयमतो यथाशक्ति संविभजत दत्तेति नोऽस्मानात्थ किमन्यद्ब्रूयान्नो हितमिति मनुष्याः ॥ २ ॥

भाष्यार्थ—या कंडिकेचें बाकीचें सर्व व्याख्यान पूर्वीच्या कंडिकेच्या व्याख्यानासारखेंच जाणावें. ( तथापि ' दत्त ' यांतील तात्पर्य सांगतात–) ' तुम्ही मनुष्य स्वभावतः लुब्ध आहां. यास्तव यथाशक्ति संविभाग करा–'दान द्या,' असें तूं आम्हांला सांगत आहेस. आम्हांला दुसरें हित काय सांगणार ? ' असें मनुष्य म्हणाले. २.

अथ हैनमसुरा ऊचुर्ब्रवीतु नो भवानिति तेभ्यो हैतदेवाक्षरमुवाच द इति व्यज्ञासिष्टा३ इति व्यज्ञासिष्मेति होचुर्दयध्वमिति न आत्थेत्योमिति होवाच व्यज्ञासिष्टेति ॥

अर्थ---त्यानंतर प्रजापतीला असुर म्हणाले, " आपण आम्हांला उपदेश सांगा. " तेव्हां प्रजापति त्यांनाही 'द' हेंच अक्षर सांगता झाला; आणि 'या अक्षराचा अर्थ जाणलात का?' असें विचारूं लागला. तेव्हां असुर 'आम्हांला अर्थ कळला. दया करा असें तूं आम्हांला सांगत आहेस' असें बोलले. त्यावर प्रजापति 'होय, चांगलें-बरोबर जाणलेंत' असें म्हणाला.

तदेतदेवैषा दैवी वागनुवदति स्तनयित्नुर्द द द इति दाम्यत दत्त दयध्वमिति तदेतत्त्रयꣳ शिक्षेद्दमं दानं दयामिति ॥ ३ ॥ इति बृहदारण्यकोपनिषदि पञ्चमाध्यायस्य द्वितीयं ब्राह्मणम् ॥ २ ॥

अर्थ--तें हें प्रजापतीचें अनुशासन अद्यापि अनुवृत्त होतेंच. मेघगर्जनारूप दैवी वाक् 'द द द' असा त्याचा अनुवाद करिते. दान्त व्हा, दान करा व दया करा, असा त्या तीन दकारांचा अर्थ आहे; यास्तव दम, दान व दया हें प्रजापतीचें त्रिविध अनुशासन आपण स्वीकारावें. ३ ( २ )

तथाऽसुरा दयध्वमिति । क्रूरा यूयं हिंसादिपरा[1] अतो दयध्वं प्राणिषु दयां कुरुतेति ॥

भाष्यार्थ---त्याचप्रमाणें असुरही आपल्या अभिप्रायानुसार दकाराचा 'दया करा' असा अर्थ समजते झाले. तुम्ही क्रूर हिंसादिपर[1] आहां, यास्तव 'दयध्वं-' प्राण्यावर दया करा, असें ते समजले.

तदेतत्प्रजापतेरनुशासनमद्याप्यनुवर्तत एव । यः पूर्वं प्रजापतिर्देवादीननुशशास सोऽद्याप्यनुशास्त्येव दैव्या स्तनयित्नुलक्षणया वाचा । कथमेषा श्रूयते दैवी वाक्काऽसौ स्तनयित्नुर्द द द इति दाम्यत दत्त दयध्वमित्येषां वाक्यानामुपलक्षणाय त्रिर्दकार उच्चार्यतेऽनुकृतिर्न तु स्तनयित्नुशब्दस्त्रिरेव संख्यानियमस्य लोकेऽप्रसिद्धत्वात् ॥

भाष्यार्थ---( प्रजापतीचें अनुशासन पूर्वीं होतें, याविषयीं लिंग सांगतात-) 'तदेतदेव' तें हें प्रजापतीचें अनुशासन अद्यापि अनुवृत्त

[1] येथील आदिशब्दानें परधनापहारादिकांचें ग्रहण करावें.

होतेंच. ( अनुशासनाची अनुवृत्तिच व्यक्त करितात–) 'एषा दैवी वाक्०.' जो प्रजापति पूर्वी देवादिकांस अनुशासन करता झाला तो अद्यापि स्तनयित्नुरूप--मेघगर्जनारूप दैवी वाणीनें अनुशासन करतोच. तें कसें ? ही दैवी वाक् एकूं येते. कोणती ती ? 'द द द' अशी मेघगर्जना. 'दम करा, दान करा व दया करा' या तीन वाक्यांच्या उपलक्षणार्थ तीन वेळ दकार उच्चारला जातो. येथें 'द-'या शब्दाचें नुस्तें अनुकरण विवक्षित आहे. कारण मेघगर्जनेचा शब्द तीनदाच कांहीं होत नाहीं. कारण मेघगर्जनेंत हा शब्द नियमानें तीनदाच होतो, अशी लोकांत प्रसिद्धि नाहीं.

यस्माद्यापि प्रजापतिर्दाम्यत दत्त दयध्वमित्यनुशास्त्येव तस्मात्कारणादेतत्त्रयम्। किं तत्त्रयमित्युच्यते दमं दानं दयामिति शिक्षेदुपादद्यात्प्रजापतेरनुशासनमस्माभिः कर्तव्यमित्येवं मतिं कुर्यात्। तथा च स्मृतिः—"त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः। कामः क्रोधस्तथा लोभस्तस्मादेतत्त्रयं त्यजेत्" इति ॥

भाष्यार्थ--( या प्रस्तुत अर्थवादाचें पर्यवसान विधीमध्यें होतें, असें सांगतात--) ज्याअर्थी अद्यापि प्रजापति 'दमन करा, दान करा व दया करा' असें अनुशासन करीतच आहे, त्या कारणास्तव 'तदेतत्त्रयं.' तें हें त्रय, तें त्रय काय, तें सांगितलें जातें–'दमं दानं दयामिति.' दम, दान व दया हें त्रय 'शिक्षेत्.' शिकावें, त्याचें ग्रहण करावें. म्ह० प्रजापतीचें अनुशासन आम्हीं करावें, अशी मति करावी. ( या श्रुतिसिद्ध विधीच्या अनुसार भगवद्वाक्याची प्रवृत्ति दाखवितात–) त्या अर्थी 'त्रिविधं नरकस्येदं०' अशी स्मृति आहे. 'आत्म्याचा नाश करणारें हें तीन प्रकारचें नरकद्वार आहे. काम, क्रोध व त्याचप्रमाणें लोभ. यास्तव या त्रयाचा त्याग करावा.' असा त्या स्मृतीचा अर्थ आहे.

अस्य हि विधेः शेषः पूर्वः। तथाऽपि देवादीनुद्दिश्य किमर्थं दकारत्रयमुच्चारितवान्प्रजापतिः पृथगनुशासनार्थिभ्यः। ते वा कथं

विवेकेन प्रतिपन्नाः प्रजापतेर्मनोगतं समानेनैव दकारवर्णमात्रेणेति पराभिप्रायज्ञा विकल्पयन्ति ॥

भाष्यार्थ—'तदेतत्त्रयं शिक्षेत्-' या विधीचा 'त्रयाः प्राजापत्याः०-' हा पूर्व ग्रंथ शेष आहे. दमादि त्रयाचें सर्वांनीं अनुष्ठान करावें, असें जरी असलें तरी देवादिकांना उद्देशून प्रजापतीनें दकारत्रय कशासाठीं उच्चारलें ? कारण ते देवादिक पृथक् अनुशासनाची इच्छा करीत होते; किंवा ते देवादिक केवळ दकार या समानच वर्णानें प्रजापतीचें मनोगत पृथक्त्वानें कसे जाणते झाले ? असा सिद्धान्त्याचा अभिप्राय जाणणारे विकल्प करितात. ('दमादित्रयाचें अनुष्ठान सर्वांनीं करावें' हा सिद्धान्त्याचा अभिप्राय जाणणारे वादी विकल्प करितात).

अत्रैक आहुरदान्तत्वादानत्वादयालुत्वैरपराधित्वमात्मनो मन्यमानाः शङ्किता एव प्रजापतावूषुः किं नो वक्ष्यतीति । तेषां च दकारश्रवणमात्रादेवाऽऽत्माशङ्कावशेन तदर्थप्रतिपत्तिरभूत् । लोकेऽपि हि प्रसिद्धं पुत्राः शिष्याश्चानुशास्याः सन्तो दोषान्निवर्तयितव्या इति । अतो युक्तं प्रजापतेर्दकारमात्रोच्चारणम् । दमादित्रये च दकारान्वयादात्मनो दोषानुरूप्येण देवादीनां विवेकेन प्रतिपत्तुं चेति । फलं त्वेतदात्मदोषज्ञाने सति दोषान्निवर्तयितुं शक्यतेऽल्पेनाप्युपदेशेन यथा देवादयो दकारमात्रेणेति ॥

भाष्यार्थ—(एकदेशी वेदान्ती वरील विकल्पाचा परिहार असा करितात—) याविषयीं कित्येक असें म्हणतात—अदान्तत्व, अदानत्व व अदयालुत्व या दोषांनीं आपल्याला अपराधी मानणारे देवादिक 'हा आतां आपल्याला काय बरें बोलेल' असे साशंक होत्सातेच प्रजापतीच्या समीप ब्रह्मचर्यवास करते झाले. त्यामुळें त्यांना केवळ दकार या अक्षराचें श्रवण होतांच स्वतःच्या शंकेमुळें त्या त्या अर्थांचें ज्ञान झालें. व्यवहारांतही शिष्य किंवा पुत्र अनुशासन करण्यास योग्य होत्साते दोषांपासून निवृत्त करण्यास योग्य होतात हें प्रसिद्ध आहे. त्यामुळें प्रजापतीचें दकारमात्रोच्चारण युक्तच आहे. त्याचप्रमाणें दमादित्रयामध्यें

दकाराची अनुवृत्ति होत असल्यामुळें आपल्या दोषाच्या अनुसार देवादिकांना दमादिकांचें पृथक् पृथक् ज्ञान होणेंही योग्य आहे. (हा एकदेशी वेदान्त्यानें सांगितलेला परिहार स्वीकारून सिद्धान्ती आख्यायिकेचें तात्पर्य सांगतात–) याचें फल हें–आपल्या दोषाचें ज्ञान झालें असतां अल्प उपदेशानेंही शिष्यादिकांना निवृत्त करितां येतें. आपले दोष जाणणारे देवादिक ज्याप्रमाणें नुस्त्या दकारमात्रानें कामादिकांपासून निवृत्त केले गेले त्याप्रमाणें.

नन्वेतत्त्रयाणां देवादीनामनुशासनं देवादिभिरप्येकैकमेवोपादेयमद्यत्वेऽपि न तु त्रयं मनुष्यैः शिक्षितव्यमिति । अत्रोच्यते । पूर्वैर्देवादिभिर्विशिष्टैरनुष्ठितमेतत्त्रयं तस्मान्मनुष्यैरेव शिक्षितव्यमिति ॥

भाष्यार्थ—'अहोपण हें दमादिकांचें अनुशासन देवादिकांसारख्या विशिष्ट जीवांना उद्देशून आहे; आणि देवादिकांनींही पूर्वीं दमादिकांतील एकेकाचेंच ग्रहण केलें होतें, दमादित्रयाचें नाहीं. त्याच न्यायानें हल्लींही मनुष्यांनीं पूर्व आचारानुसार एकेकच करावें. त्या तिघांचें अनुष्ठान करूं नये' म्हणून कोणी म्हणेल तर त्याविषयीं सांगतों–पूर्वींच्या देवादि विशिष्ट जीवांनीं या त्रयाचें अनुष्ठान केलें. यास्तव मनुष्यांनींच तें त्रय शिकावें. त्यांतील एकेकाचें ग्रहण करूं नये.

तत्र दयालुत्वस्याननुष्ठेयत्वं स्यात्कथमसुरैरप्रशस्तैरनुष्ठितत्वादिति चेत्। न तुल्यत्वात्त्रयाणामतोऽन्योऽत्राभिप्रायः प्रजापतेः पुत्रा देवादयस्त्रयः। पुत्रेभ्यश्च हितमेव पित्रोपदेष्टव्यम् । प्रजापतिश्च हितज्ञो नान्यथोपदिशति । तस्मात्पुत्रानुशानं प्रजापतेः परममेतद्धितम् । अतो मनुष्यैरेवैतत्त्रयं शिक्षितव्यमिति ॥

भाष्यार्थ—त्यांपैकीं दयालुत्वाला अननुष्ठेयत्व आहे. तें कसें ? अप्रशस्त असुरांनीं त्याचें अनुष्ठान केलें आहे, म्हणून तें दयालुत्व अनुष्ठेय नाहीं, म्हणून म्हणाल तर तें बरोबर नाहीं. (असुरांनीं जरी दयालुत्वाचें अनुष्ठान केलें असलें तरी तें हिताचें साधन असल्यामुळें दाना-

दिकांप्रमाणेंच सर्वांना अनुष्ठेय आहे.) कारण प्रजापति देवादि तिघांना तुल्य आहे. यास्तव यांतील अभिप्राय निराळा आहे. देवादिक हे प्रजापतीचे तीन पुत्र होत; आणि पित्यानें पुत्रांना हितच सांगणें उचित आहे. प्रजापति हित जाणणारा असल्यामुळें तो अन्यथा उपदेश करणार नाहीं. तस्मात् प्रजापतीचें पुत्रानुशासन हें परम हित आहे. यास्तव मनुष्यांनींच हें साधनत्रय शिकावें, ('शिक्षितव्यं इति' असा जो इतिशब्द आहे तो देवादिक शरीरवान् आहेत या अर्थवादाचें यथाश्रुत अर्थी प्रामाण्य मानून दकारत्रयाचें तात्पर्य सिद्ध झालें, हें सांगण्यासाठीं आहे.)

अथवा न देवा असुरा वाऽन्ये केचन विद्यन्ते मनुष्येभ्यः। मनुष्याणामेवादान्ता येऽन्यैरुत्तमैर्गुणैः संपन्नास्ते देवा लोभप्रधाना मनुष्यास्तथा हिंसापराः क्रूरा असुरास्त एव। मनुष्या अदान्तत्वादिदोषत्रयमपेक्ष्य देवादिशब्दभाजो भवन्तीतरांश्च गुणान्सत्त्वरजस्तमांस्यपेक्ष्य । अतो मनुष्यैरेव शिक्षितव्यमेतत्त्रयमिति । तदपेक्षयैव प्रजापतिनोपदिष्टत्वात् । तथा हि मनुष्या अदान्ता लुब्धाः क्रूराश्च दृश्यन्ते । तथाच स्मृतिः-- "कामः क्रोधस्तथा लोभस्तस्मादेतत्त्रयं त्यजेत् ।" इति ॥ ३ ॥ इति बृहदारण्यकोपनिषद्भाष्ये पञ्चमाध्यायस्य द्वितीयं ब्राह्मणम् ॥ २ ॥

भाष्यार्थ—(आतां कर्ममीमांसकांच्या मताला अनुसरून सांगतात—) अथवा देव किंवा असुर मनुष्यांहून कोणी निराळे नाहींत. मनुष्यांतीलच जे अदान्त पण दुसऱ्या उत्तम गुणांनीं संपन्न ते देव; जे लोभप्रधान असतात ते मनुष्य व तेच मनुष्य हिंसापर व क्रूर असले तर ते असुर होत. मनुष्यच अदान्तत्वादि दोषत्रयाच्या अपेक्षेनें देवादिशब्दांस पात्र होतात. त्याचप्रमाणें सत्त्व, रज व तम या इतर गुणांच्या अपेक्षेनेंही ते देवादिशब्दांस पात्र होतात. यास्तव म्हणजे मनुष्यांमध्येंच देवादिशब्दांची प्रवृत्ति होत असल्यामुळें दम, दान व दया हें साधनत्रय मनुष्यांनींच शिकावें. कारण त्यांच्या अपेक्षेनेंच प्रजापतीनें त्यांचा उपदेश केला आहे (याला प्रमाण—) म्हणूनच मनुष्य

अदान्त, लुब्ध व क्रूर दिसतात. याविषयीं ' काम, क्रोध व तसाच लोभ हें त्रिविध नरकद्वार आहे. यास्तव या त्रयाचा त्याग करावा. ' अशी स्मृति आहे. ३.

इति बृहदारण्यकभाष्यार्थीच्या पांचव्या अध्यायाचें
दुसरें ब्राह्मण समाप्त.

---

एष प्रजापतिर्यद्धृदयमेतद्ब्रह्मैतत्सर्वं तदेतत्त्र्यक्षर हृदयमिति हृ इत्येकमक्षरमभिहरन्त्यस्मै स्वाश्चान्ये च य एवं वेद द इत्येकमक्षरं ददत्यस्मै स्वाश्चान्ये च य एवं वेद यमित्येकमक्षरमेति स्वर्गं लोकं य एवं वेद ॥ १ ॥ इति बृहदारण्यकोनिषदि पंचमाध्यायस्य तृतीयं ब्राह्मणम् ॥ ३ ॥

अर्थ——जें हृदय हा प्रजापति, हें ब्रह्म, हें सर्व. तें हें 'हृदय' असें नांव त्र्यक्षर आहे. 'हृ-' हें एक अक्षर; जो असें जाणतो त्याला स्वज्ञातीचे व इतर–असंबद्ध पुरुष सन्मुख बलि आणून अर्पण करितात. 'द-' हें एक अक्षर आहे.जो असें जाणतो त्याला स्वकीय व इतर वीर्य देतात. 'यं' हें एक अक्षर आहे. असें जो जाणतो तो स्वर्गलोकास जातो १ (३)

दमादिसाधनत्रयं सर्वोपासनशेषं विहितम् । दान्तोऽलुब्धो दयालुः सन्सर्वोपासनेष्वधिक्रियते । तत्र निरुपाधिकस्य ब्रह्मणो दर्शनमतिक्रान्तमथाधुना सोपाधिकस्य तस्यैवाभ्युदयफलानि वक्तव्यानीत्येवमर्थोऽयमारम्भः ॥

भाष्यार्थ—सर्व उपासनेचें अंगभूत अशा दमादि साधनत्रयाचें विधान केलें. दान्त, अलुब्ध व दयालु होत्साता साधक सर्व उपासनांमध्यें अधिकृत होतो. त्यांपैकीं निरुपाधिक ब्रह्माचें दर्शन–उपासन वर होऊन गेलें. आतां सोपाधिक ब्रह्माचींच अभ्युदय हें फल देणारीं उपासनें सांगावीं, यास्तव हा आरंभ आहे.

एष प्रजापतिर्यद्धृदयं प्रजापतिरनुशास्तीत्यनन्तरमेवाभिहितम् । कः पुनरसावनुशास्ता प्रजापतिरिति । उच्यते । एष प्रजापतिः । कोऽसौ यद्धृदयं हृदयमिति हृदयस्था बुद्धिरुच्यते । यस्मिञ्शाकल्य-

ब्राह्मणान्ते नामरूपकर्मणामुपसंहार उक्तो दिग्विभागद्वारेण तदेतत्सर्वभूतप्रतिष्ठं सर्वभूतात्मभूतं हृदयं प्रजापतिः प्रजानां स्रष्टा ॥

भाष्यार्थ—'एष प्रजापतिर्यद्धृदयं-' प्रजापति अनुशासन करतो, असें नुकतेंच वर सांगितलें. पण हा अनुशासन करणारा प्रजापति कोण? तें श्रुतीकडून सांगितलें जातें. हा प्रजापति. हा कोण? 'यत् हृदयं-' जें हें हृदय. हृदयशब्दानें हृदयस्थ बुद्धि सांगितली जाते. शाकल्य ब्राह्मणाच्या शेवटीं (अ. ३ पृ.२५३) ज्यामध्यें नाम-रूप कर्मांचा उपसंहार दिग्विभागद्वारा सांगितला तें हें सर्वभूतांचें प्रतिष्ठाभूत व सर्व भूतांचें आत्मभूत हृदय प्रजापति—प्रजांचा स्रष्टा—उत्पादक आहे.

एतद्ब्रह्म बृहत्त्वात्सर्वात्मत्वाच्च ब्रह्म । एतत्सर्वम् । उक्तं पञ्चमाध्याये हृदयस्य सर्वत्वम् । तत्सर्वं यस्मात्तस्मादुपास्यं हृदयं ब्रह्म । तत्र हृदयनामाक्षरविषयमेव तावदुपासनमुच्यते । तदेतद्धृदयमिति नाम त्र्यक्षरं त्रीण्यक्षराण्यस्येति त्र्यक्षरम् ॥

भाष्यार्थ—'एतद्ब्रह्म-' हें ब्रह्म आहे. कारण ह्याला बृहत्त्व आहे व सर्वात्मत्व आहे म्हणून हें ब्रह्म. 'एतत्सर्वं-' हें सर्व आहे. हृदयाचें सर्वत्व पंचमाध्यायांत [ म्ह० या उपनिषदाच्या तिसऱ्या अध्यायांत ] सांगितलें आहे. ज्याअर्थी तें सर्व आहे त्याअर्थी हृदय ब्रह्म आहे, अशी त्याची उपासना करावी. पण आतां अगोदर 'हृदय' या नांवाच्या अक्षरसंबंधी उपासनच सांगितलें जातें. 'तदेतत्त्र्यक्षरं हृदयमिति-' तें हें 'हृदय' असें नांव त्र्यक्षर आहे. ज्याचीं तीन अक्षरें आहेत तें त्र्यक्षर.

कानि पुनस्तानि त्रीण्यक्षराण्युच्यन्ते । हृ इत्येकमक्षरम् । अभिहरन्ति हृतेराहृतिकर्मणो हृ इत्येतद्रूपमिति यो वेद यस्माद्धृदयाय ब्रह्मणे स्वाश्चेन्द्रियाण्यन्ये च विषयाः शब्दादयः स्वं स्वं कार्यमभिहरन्ति हृदयं च भोक्त्रर्थमभिहरति । अतो हृदयनाम्नो हृ इत्येतदक्षरमिति यो वेदास्मै विदुषेऽभिहरन्ति स्वाश्च ज्ञातयोऽन्ये चासंबद्धाः । बलिमिति वाक्यशेषः। विज्ञानानुरूप्येणैतत्फलम् ॥

भाष्यार्थ—पण तीं तीन अक्षरें कोणतीं, तें सांगितलें जातें. 'हृ इत्येकमक्षरं-' 'हृ' हें एक अक्षर आहे. 'अभिहरन्ति-' आहरण हें ज्याचें कर्म आहे, अशा 'हृति' धातूचें 'हृ' हें रूप आहे, असें जो जाणतो (त्या विद्वानाकडे अभिहरण करितात असा पुढें संबंध.) ज्या-अर्थीं हृदय ब्रह्माला 'स्वाः-' इंद्रियें, 'अन्ये च' व शब्दादि विषय आपापलें रूपदर्शनादि कार्य अभिहरतात—त्याचें अभितः हरण करि-तात—आपापलें कार्य सन्मुख आणून देतात, आणि हृदय आपलें सुखादि कार्य भोक्त्याकरितां अभिहरण करतें, 'य एव वेद-' यास्तव 'हृदय' या नांवाचें 'हृ' हें अक्षर आहे, असें जो जाणतो 'अस्मै-' त्या विद्वानाला 'अभि-हरन्ति-' अभिहरण करितात- सन्मुख आणून पोंचवितात 'स्वाश्च-' त्याच्या स्वजातीचे 'अन्येच-' व त्याच्याशीं ज्ञातितः संबद्ध नसलेले (त्या विद्वा-नाला बली आणून देतात.) या वाक्याला 'बलिं' असा शेष लावावा. हें विज्ञानाच्या—उपासनेच्या—भावनेच्या अनुसार—तदनुरूप फल आहे.

तथा द इत्येतदप्येकमक्षरमेतदपि दानार्थस्य ददातेर्द इत्येतद्रूपं हृदयनामाक्षरत्वेन निबद्धम्। अत्रापि। हृदयाय ब्रह्मणे स्वाश्च करणान्य-न्ये च विषयाः स्वं स्वं वीर्यं ददति हृदयं च भोक्त्रे ददाति स्वं वीर्य-मतो दकार इत्येवं यो वेदास्मै ददति स्वाश्चान्ये च॥

भाष्यार्थ—तसेंच 'द' हेंही एक अक्षर आहे. हेंही 'दान' हा ज्याचा अर्थ आहे, अशा 'ददति' धातूचें 'द' हें रूप 'हृदय' या नांवाच्या अक्षरत्वानें निबद्ध आहे. 'दकार' अक्षरोपासनेंतील फल सांगितलें जातें. ('अत्रापि' याच्या पुढें 'फलमुच्यते' असा शेष लावावा.) हृदय ब्रह्माला 'स्वाश्च-' इंद्रियें, 'अन्ये च-' दुसरे विषय आपापलें वीर्य देतात; आणि हृदय भोक्त्याला आपलें वीर्य देतें. यास्तव 'दकार' अशा रीतीनें जो जाणतो—दकाराची उपासना करतो त्याला त्याच्या जातीचे व अन्य बलि आणून देतात.

तथा यमित्येतदप्येकमक्षरम्। इणो गत्यर्थस्य यमित्येतद्रूपमस्मिन्ना-

न्मि निबद्धमिति यो वेद स स्वर्गं लोकमेति । एवं नामाक्षरादपीदृशं विशिष्टं फलं प्राप्नोति किमु वक्तव्यं हृदयस्वरूपोपासनादिति हृदयस्तुतये नामाक्षरोपन्यासः ॥१॥ इति बृहदारण्यकोपनिषद्भाष्ये पञ्चमाध्यायस्य तृतीयं ब्राह्मणम् ॥ ३ ॥

भाष्यार्थ—तसेंच ' यं ' असें हेंही एक अक्षर आहे. गति या अर्थीं असलेल्या ' इण् ' या धातूचें ' यं ' हें रूप या नांवांत निबद्ध आहे, असें जो जाणतो तो स्वर्ग लोकास जातो. ( अशीं नामाक्षरोपासनें तीन व हृदयस्वरूपोपासन एक मिळून चार उपासनें येथें विवक्षित आहेत, असें कोणी म्हणेल म्हणून सांगतात—) अशाप्रकारें नामाच्या अक्षरापासूनही जर असें विशिष्ट फळ प्राप्त होतें तर हृदयस्वरूपोपासनेपासून याहीपेक्षां विशिष्ट फळ मिळेल हें काय सांगावें, अशी हृदयाची स्तुति करण्याकरितां त्या नांवांतील अक्षरांचा उपन्यास केला आहे. १.

इति बृहदारण्यकोपनिषद्भाष्यार्थांच्या पांचव्या अध्यायाचें तिसरें ब्राह्मण.

---

तद्वै तदेतदेव तदास सत्यमेव स यो हैतं महद्यक्षं प्रथमजं वेद सत्यं ब्रह्मेति जयतीमाँल्लोकाञ्जित इन्न्वसावसद्य एवमेतन्महद्यक्षं प्रथमजं वेद सत्यं ब्रह्मेति सत्यꣳह्येव ब्रह्म ॥१ ॥ इति बृहदारण्यकोपनिषदि पञ्चमाध्यायस्य चतुर्थं ब्राह्मणम् ॥ ४ ॥

अर्थ—तें जें हृदय ब्रह्म तेंच हें होतें. तें सत्यच-पंचभूतात्मक ब्रह्म. जो कोणी या महत्, पूज्य प्रथमजाला सत्य ब्रह्म असें जाणतो तो या लोकांना जिंकतो. त्याचा शत्रु त्याच्या अधीन—वश राहतो. त्याचा अभाव होतो. जो याप्रमाणें या महत्, पूज्य, प्रथमजाला सत्य ब्रह्म असें जाणतो त्याला वरील फळ मिळतें—कारण ब्रह्म सत्यच आहे १ ( ४ )

तस्यैव हृदयाख्यस्य ब्रह्मणः सत्यमित्युपासनं विधित्सन्नाह तत्तदिति हृदयं ब्रह्म परामृष्टम् । वा इति स्मरणार्थम् । तद्यद्धृदयं ब्रह्म स्मर्यत इत्येकस्तच्छब्दः । तदेतदुच्यते प्रकारान्तरेणेति द्वितीयस्तच्छब्दः । किं पुनस्तत्प्रकारान्तरम् । एतदेव तदित्येतच्छब्देन संबध्यते तृतीयस्त-

च्छब्दः । एतदिति वक्ष्यमाणं बुद्धौ संनिधीकृत्याऽऽह । आस बभूव । किं पुनरेतदेवाऽऽस यदुक्तं हृदयं ब्रह्मेति तदिति तृतीयस्तच्छब्दो विनियुक्तः । किं तदिति विशेषतो निर्दिशति सत्यमेव सच्च त्यच्च मूर्तं चामूर्तं च सत्यं ब्रह्म पञ्चभूतात्मकमित्येतत् ॥

भाष्यार्थ——त्याच हृदयाख्य ब्रह्माच्या ' सत्य ' या उपासनेचें विधान करण्याची इच्छा करणारा वेद म्हणतो—' तत् ' ' तें ' याशब्दानें हृदय ब्रह्माचा परामर्श केला आहे. ' वै ' हा शब्द स्मरणार्थ आहे. ' तत्-' जें हृदय ब्रह्म स्मरलें जातें तें, असा एक तच्छब्द आहे. 'तत्-' तें हें दुसऱ्या प्रकारें सांगितलें जातें, असा दुसरा तत्–शब्द आहे. तो दुसरा प्रकार कोणता ? ' एतदेव तत्-' असा तिसरा तत्–शब्द एतत्-शब्दाशीं संबद्ध होतो. पुढें सांगितलें जाणारें ब्रह्म बुद्धीमध्यें संनिध करून–चित्तांत आणून 'एतत्-' हें, असें श्रुति म्हणते. ' आस ' होतें. हेंच होतें, म्हणून जें म्हणतां तें काय ? तर जें ' हृदयं ब्रह्म ' असें म्हटलें तें, असा तिसऱ्या तत्-शब्दाचा विनियोग केला आहे. हें काय? असें कोणी म्हणेल म्हणून श्रुति त्याचा विशेषतः निर्देश करिते ' सत्यमेव ' सत्, त्यत्, मूर्त व अमूर्त सत्य ब्रह्म. पंचभूतात्मक असा याचा इत्यर्थ. ( या व्याख्यानानें 'सत्यं ज्ञानं अनन्तं०' यांतील सत्यशब्दाच्या अर्थाची व्यावृत्ति केली आहे. )

स यः कश्चित्सत्यात्मानमेतं महन्महत्त्वाद्यक्षं पूज्यं प्रथमजं प्रथमजातं सर्वस्मात्संसारिण एतदेवाग्रे जातं ब्रह्मातः प्रथमजं वेद विजानाति सत्यं ब्रह्मेति । तस्येदं फलमुच्यते । यथा सत्येन ब्रह्मणेमे लोका आत्मसात्कृता जिता एवं सत्यात्मानं ब्रह्म महद्यक्षं प्रथमजं वेद स जयतीमाँल्लोकान् । किंच जितो वशीकृत इन्न्वित्थं यथा ब्रह्मणाऽसौ शत्रुरिति वाक्यशेषः । असच्चासद्भवेदसौ शत्रुर्जितो भवेदित्यर्थः । कस्यैतत्फलमिति पुनर्निगमयति । य एवमेतन्महद्यक्षं प्रथमजं वेद सत्यं ब्रह्मेति । अतो विद्यानुरूपं फलं युक्तम् । सत्यं ह्येव यस्माद्ब्रह्म ॥ १॥

इति बृहदारण्यकोपनिषद्भाष्ये पञ्चमाध्यायस्य चतुर्थं ब्राह्मणम् ॥ ४ ॥

भाष्यार्थ—' स यः-' तो जो कोणी ' ह एतं-' या सत्यात्म्यास ' महत्-' महत्त्वामुळें मोठ्या ' यक्षं-' पूज्य, ' प्रथमजं-' प्रथम झालेल्या, सर्व संसाऱ्यांच्या पूर्वी हेंच ब्रह्म झालें, म्हणून प्रथमज ब्रह्माला 'वेद-' जाणतो—जो 'सत्यं ब्रह्म' असें जाणतो, त्याचें हें फळ सांगितलें जातें. ज्याप्रमाणें सत्य ब्रह्माकडून हे लोक आत्मसात् केले गेले आहेत—जिंकलेले आहेत त्याप्रमाणें जो सत्यात्म्याला,ब्रह्माला, प्रथमज महत् यक्षाला जाणतो तो ' जयति इमान् लोकान् ' या लोकांस जिंकतो. शिवाय ' जित इन्नु असौ-' ज्याप्रमाणें ब्रह्माकडून सर्व वश केलें गेलेलें आहे त्याप्रमाणें हा शत्रु त्याच्याकडून जिंकला गेला आहे—अधीन करून ठेवला गेला आहे. या वाक्याला ' असौ ' या शब्दापुढें ' शत्रुः ' असा शेष लावावा. ' असत्-' तो अभावरूप होतो. हा शत्रु जिंकलेला असा होतो, असा भावार्थ. ( पुनरुक्तिदोषाचें निवारण करण्यासाठीं भाष्यकार म्हणतात—) हें फळ कोणाला मिळतें, तें सांगण्यासाठीं पुनः निगमन करितात— जो याप्रमाणें या महत्, पूज्य, प्रथमजाला ' सत्यं ब्रह्म' असें जाणतो त्याला हें फळ मिळतें. ब्रह्म सत्य असल्यामुळें विद्येच्या अनुरूप फळ मिळणें युक्तच आहे, कारण ज्याअर्थी सत्यच ब्रह्म आहे.१.

इति श्रीबृहदारण्यकोपनिषद्भाष्यार्थाच्या पांचव्या अध्यायाचें चवथें ब्राह्मण.

---

आप एवेदमग्र आसुस्ता आपः सत्यमसृजन्त सत्यं ब्रह्म ब्रह्म प्रजापतिं प्रजापतिर्देवाꣳस्ते देवाः सत्यमेवोपासते तदेतत्त्र्यक्षरꣳ सत्यमिति स इत्येकमक्षरं तीत्येकमक्षरं यमित्येकमक्षरं प्रथमोत्तमे अक्षरे सत्यं मध्यतोऽनृतं तदेतदनृतमुभयतः सत्येन परिगृहीतꣳ सत्यभूयमेव भवति नैवं विद्वाꣳसमनृतꣳ हिनस्ति ॥ १ ॥

अर्थ—हें व्यक्त जगत् त्याच्या उत्पत्तीच्या पूर्वी आपच होतें. त्या आप सत्याला उत्पन्न करत्या झाल्या. म्हणून तें सत्य ब्रह्म ( प्रथमज होय. ) तें ब्रह्म प्रजापतीला—विराटाला उत्पन्न करतें झालें. प्रजापति देवांस उत्पन्न करिता झाला. ते देव सत्याचीच उपासना करितात. तें

' सत्य ' असें हें नाम त्र्यक्षर आहे. ' स ' असें हें एक अक्षर ' ति ' [ त् ] असें एक अक्षर, व ' यं ' असें एक अक्षर. त्यांतील पहिलें व शेवटचें अक्षर सत्य व मधलें अनृत—खोटें. तें हें अनृत दोन्ही बाजूंनीं सत्यानें परिगृहीत आहे. त्यामुळें तें सत्यभूयच—सत्यबहुलच होतें. असें जाणणाऱ्या विद्वानाला प्रमादानें कदाचित् बोललेलें अनृत मारीत नाहीं. १

सत्यस्य ब्रह्मणः स्तुत्यर्थमिदमाह । महद्यक्षं प्रथमजामित्युक्तं तत्कथं प्रथमजत्वमिति । उच्यते । आप एवेदमग्र आसुः । आप इति कर्मसमवायिन्योऽग्निहोत्राद्याहुतयः । अग्निहोत्राद्याहुतेर्द्रवात्मकत्वादप्त्वम् । ताश्चाऽऽपोऽग्निहोत्रादिकर्मापवर्गोत्तरकालं केनचिददृष्टेन सूक्ष्मेणाऽऽत्मना कर्मसमवायित्वमपरित्यजन्त्य इतरभूतसहिता एव न केवलाः । कर्मसमवायित्वात्तु प्राधान्यमपामिति । सर्वाण्येव भूतानि प्रागुत्पत्तेरव्याकृतावस्थानि कर्तृसहितानि निर्दिश्यन्त आप इति । ता आपो बीजभूता जगतोऽव्याकृतात्मनाऽवस्थितास्ता एवेदं सर्वं नामरूपविकृतं जगदग्र आसुर्नान्यत्किंचिद्विकारजातमासीत् ॥

भाष्यार्थ—सत्य ब्रह्माच्या स्तुत्यर्थ हें ब्राह्मण म्हणतें—' महत्, यक्ष, प्रथमज ' असें वर म्हटलें. पण तें प्रथमजत्व कसें ? तें सांगितलें जातें. ' आप एव इदं अग्र आसुः-' आपशब्दानें कर्मसंबंधी अग्निहोत्रादि आहुत्या घ्याव्या. अग्निहोत्रादि—सोमादि—आहुतींना द्रवात्मकत्व असल्यामुळें ' अप्त्व-' जलत्व आहे. त्या आप अग्निहोत्रादि कर्मांच्या नाशानंतर कांहीं अदृष्ट सूक्ष्म रूपानें कर्मांचा संबंध न सोडणाऱ्या अशाच, पण केवल आपरूपानेंच नव्हेत तर इतर भूतांसहवर्तमानच असतात. ( आप केवल न राहतां इतर भूतांसहवर्तमानच जर राहतात तर श्रुतींत नुसत्या आपांचेंच ग्रहण कां केलें आहे ? उत्तर–) कर्मांशीं समवायित्व—संबंधित्व असल्यामुळें आपांनाच प्राधान्य आहे. (त्यामुळें येथें त्यांचेंच ग्रहण केलें आहे, असा शेष लावावा. ) ' आपः ' अशा रीतीनें उत्पत्तीच्या पूर्वी अव्याकृतावस्थेंत असलेल्या कर्तृसहित सर्वच भूतांचा निर्देश केला जातो.

अव्याकृतरूपानें अवस्थित असलेल्या त्या आप [ जल ] जगाच्या बीजभूत आहेत. त्या आपच पूर्वीं, आतां हें सर्व नाम रूपानें व्याकृत—व्यक्त झालेलें जगत् होत्या. त्यांवाचून दुसरें कोणतेंही विकारजात नव्हतें.

ताः पुनरापः सत्यमसृजन्त । तस्मात्सत्यं ब्रह्म प्रथमजम् । तदेतद्धिरण्यगर्भस्य सूत्रात्मनो जन्म यदव्याकृतस्य जगतो व्याकरणम् । तत्सत्यं ब्रह्म कुतः । महत्त्वात् । कथं महत्त्वमित्याह । यस्मात्सर्वस्य स्रष्टृ । कथम् । यत्सत्यं ब्रह्म तत्प्रजापतिं प्रजानां पतिं विराजं सूर्यादिकरणमसृजतेत्यनुषङ्गः । प्रजापतिर्देवान्स विराट् प्रजापतिर्देवानसृजत।यस्मात्सर्वमेवं क्रमेण सत्याद्ब्रह्मणो जातं तस्मान्महत्सत्यं ब्रह्म ॥

भाष्यार्थ—पुनः त्या आप सत्याला उत्पन्न करत्या झाल्या. ह्मणून ' सत्य ब्रह्म ' प्रथमज आहे. ( अहो पण ' सत्यं ज्ञानं अनन्तं ब्रह्म ' असें श्रुत असलेलें सत्य ब्रह्म दुसऱ्या भूतांसहवर्तमान असलेल्या आपांपासून कसें होतें ? म्हणून कोणी विचारील तर सांगतात—) जें अव्याकृत —अव्यक्त जगाचें व्याकरण—व्यक्त करणें तें हें हिरण्यगर्भाचें—सूत्रात्म्याचें जन्म होय. तर मग तें सत्य ब्रह्म कां ? (उत्तर--) कारण त्याला महत्त्व आहे. 'त्याला महत्त्व कसें ? ' असें कोणी विचारील म्हणून सांगतात—ज्याअर्थी तें सर्वांचें स्रष्टृ—उत्पन्न करणारें आहे ( त्याअर्थी त्याला महत्त्व आहे. ) सर्वांचें स्रष्टृ कसें ? ' ब्रह्म प्रजापतिं-'जें सत्य ब्रह्म तें प्रजापतीस—प्रजांच्या पतीस--विराटास, सूर्यादिक हीं ज्याचीं करणें आहेत त्या विराट्पुरुषास उत्पन्न करतें झालें, असा संबंध. ' प्रजापतिर्देवान्-' तो प्रजापति—विराट् देवांस उत्पन्न करता झाला. ज्याअर्थी सर्व अशा क्रमानें सत्य ब्रह्मापासून उत्पन्न झालें त्याअर्थी तें सत्य ब्रह्म महत् आहे.

कथं पुनर्यक्षमिति। उच्यते । त एवं सृष्टा देवाः पितरमपि विराजमतीत्य तदेव सत्यं ब्रह्मोपासते । अत एतत्प्रथमजं महद्यक्षम् । तस्मात्सर्वात्मनोपास्यं तत् । तस्यापि सत्यस्य ब्रह्मणो नाम सत्यमिति तदेतत्त्र्यक्षरम् । कानि तान्यक्षराणीत्याह । स इत्येकमक्षरम् । तीत्येकमक्षरम् । तीतीकारानुबन्धो निर्देशार्थः । यमित्येकमक्षरम् । तत्र

तेषां प्रथमोत्तमे अक्षरे सकारयकारौ सत्यम् । मृत्युरूपाभावात् । मध्यतो मध्येऽनृतम् । अनृतं हि मृत्युः। मृत्य्वनृतयोस्तकारसामान्यात्॥

भाष्यार्थ—पण तें 'यक्ष' कसें ? तेंच सांगितलें जातें-'ते सत्यमेवोपासते-' ते याप्रमाणें उत्पन्न झालेले देव स्वतःचा पिता--जनक असा जो विराट् त्याचेंही उल्लंघन करून त्याच सत्य ब्रह्माची उपासना करितात. म्हणून हें 'प्रथमज महत् यक्ष' होय. यास्तव तें सर्वभावानें उपासना करण्यास योग्य आहे. हृदय ब्रह्माप्रमाणें. त्याही सत्य ब्रह्माचें 'सत्य' असेंच नाम आहे. 'तदेतत्त्र्यक्षरम्' तें नांव त्र्यक्षर आहे. तीं तीन अक्षरें कोणतीं ? तें श्रुति सांगते—'स' असें एक अक्षर आहे. 'ति' असें एक अक्षर आहे. वस्तुतः 'त्' असें अक्षर असतांना 'ति' असा इकार जो त्याला जोडला आहे तो अनुबंध निर्देशार्थ आहे. ( संस्कृतांत धातु वगैरेचा असा इकारानुबंधानें निर्देश करण्याचा परिपाठ आहे. ) 'यम्' असें एक अक्षर आहे. त्या तीन अक्षरांतील पहिलें व शेवटचें सकार व यकार हीं दोन अक्षरें सत्य आहेत. कारण त्यांना मृत्युरूपाभाव आहे 'मध्यतो अनृतं-' मध्यें अनृत आहे. अनृत हाच मृत्यु आहे. कारण मृत्यु व अनृत यांमध्यें तकार हें सामान्य-साधर्म्य आहे.

तदेतदनृतं तकाराक्षरं मृत्युरूपमुभयतः सत्येन सकारयकारलक्षणेन परिगृहीतं व्याप्तमन्तर्भावितं सत्यरूपाभ्यामतोऽकिंचित्करं तत्सत्यभूयमेव सत्यबाहुल्यमेव भवति । एवं सत्यबाहुल्यं सर्वस्य मृत्योरनृतस्याकिंचित्करत्वं च यो विद्वांस्तमेवं विद्वांसमनृतं कदाचित्प्रमादोक्तं न हिनस्ति ॥ १ ॥

भाष्यार्थ—'तदेतदनृतं०-' तें हें अनृत तकाराक्षर मृत्युरूप आहे. तें सकार-यकारलक्षण सत्यानें दोन्ही बाजूंनीं परिगृहीत—व्याप्त—दोन सत्यरूप अक्षरांनीं अन्तर्भावित आहे. यास्तव तें अकिंचित्कर आहे. त्यामुळें 'सत्य' हें नांव 'सत्यभूय-' सत्यबाहुल्यच आहे. त्यांत सत्याचेंच

बाहुल्य आहे व सर्व अनृत मृत्यूला अकिंचित्करत्व आहे, असें जो जाणतो ' एवं विद्वांसं-' त्या असें जाणणाऱ्या विद्वानाला ' अनृतं न हिनस्ति-' अनृत—एकादे वेळीं प्रमादानें बोललेलें अनृत-असत्य मारीत नाहीं. ( अर्थात् बुद्धिपूर्वक बोललेलें अनृत विद्वानालाही बाधक होतें.) १

तद्यत्तत्सत्यमसौ स आदित्यो य एष एतस्मिन्मण्डले पुरुषो यश्चायं दक्षिणेऽक्षन्पुरुषस्तावेतावन्योन्यस्मिन्प्रतिष्ठितौ रश्मिभिरेषोऽस्मिन्प्रतिष्ठितः प्राणैरयममुष्मिन्स यदोत्क्रमिष्यन्भवति शुद्धमेवैतन्मण्डलं पश्यति नैनमेते रश्मयः प्रत्यायन्ति ॥ २ ॥

अर्थ—तें जें सत्य तो हा आदित्य. हा जो या मंडलांत पुरुष आहे व हा जो दक्षिण नेत्रांत पुरुष आहे ते दोघे एकमेकांत प्रतिष्ठित आहेत. आदित्य प्रकाशानें चाक्षुषांत प्रतिष्ठित आहे व चाक्षुष प्राणांच्या योगानें आदित्यांत प्रतिष्ठित आहे. तो विज्ञानमय जेव्हां शरीर सोडून जाणारा असा होतो तेव्हां ( आदित्य पुरुष आपल्या किरणांचा उपसंहार करून औदासीन्य रूपानें राहतो. तेव्हां ) तो विज्ञानमय शुद्धच हें मंडल पाहतो. मरणानंतर हे रश्मी त्याच्याकडे परत येत नाहींत. २

अस्याधुना सत्यस्य ब्रह्मणः संस्थानविशेष उपासनमुच्यते । तद्यत् । किं तत्सत्यं ब्रह्म प्रथमजं किमसौ सः । कोऽसावादित्यः । कः पुनरसावादित्यो य एष क एष य एतस्मिन्नादित्यमण्डले पुरुषोऽभिमानी सोऽसौ सत्यं ब्रह्म । यश्चायमध्यात्मं योऽयं दक्षिणेऽक्षन्नक्षणि पुरुषः । चशब्दात्स च सत्यं ब्रह्मेति संबन्धः ॥

भाष्यार्थ—आतां या सत्य ब्रह्माचें एका विशेष आकारांत उपासन सांगितलें जातें. ' तत् यत्-' तें जें, काय ? ' तत्सत्यं-' तें सत्य ब्रह्म प्रथमज, तें काय झालें ? ' असौ सः-' तें हाच तो, हा कोण ? ' आदित्यः-' सूर्य. पण हा आदित्य कोण ? ' य एषः-' जो हा, हा कोण ? ' एतस्मिन्मण्डले पुरुषः-' जो या आदित्यमंडलांत पुरुष अभिमानी तो हा ' सत्यं ब्रह्म ' आहे. ' यश्चायं दक्षिणेऽक्षन्पुरुषः ' जो हा

या शरीरांत--अध्यात्म जो हा दक्षिण अक्षींतील--नेत्रांतील पुरुष, 'यश्च' येथील चशब्दामुळें 'तोही सत्य ब्रह्म आहे' असा संबंध लागतो.

तावेतावादित्याक्षिस्थौ पुरुषावेकस्य सत्यस्य ब्रह्मणः संस्थानविशेषौ यस्मात्तस्मादन्योन्यस्मिन्नितरेतरस्मिन्नादित्यश्चाक्षुषे चाक्षुषश्चाऽऽदित्ये प्रतिष्ठितौ । अध्यात्माधिदैवतयोरन्योन्योपकार्योपकारकत्वात् ॥

भाष्यार्थ---'तौ एतौ अन्योन्यस्मिन्प्रतिष्ठितौ-' ते हे आदित्य व अक्षि-नेत्र यांत स्थित असलेले दोन पुरुष एका सत्य ब्रह्माचे ज्याअर्थी संस्थानविशेष--आकारविशेष आहेत तस्मात् ते परस्परांमध्यें म्ह० आदित्य पुरुष चाक्षुष पुरुषामध्यें व चाक्षुष पुरुष आदित्य पुरुषामध्यें प्रतिष्ठित आहेत. कारण अध्यात्म पुरुष व अधिदैव पुरुष यांना अन्योन्य उपकार्य-उपकारकत्व आहे.

कथं प्रतिष्ठिताविर्त्युच्यते । रश्मिभिः प्रकाशेनानुग्रहं कुर्वन्नेष आदित्योऽस्मिंश्चाक्षुषेऽध्यात्मे प्रतिष्ठितः । अयं च चाक्षुषः प्राणैरादित्यमनुगृह्णन्नमुष्मिन्नादित्येऽधिदैवे प्रतिष्ठितः ॥

भाष्यार्थ---(त्यांना अन्योन्य-उपकार्योपकारकत्व असल्यामुळें अन्योन्यामध्यें प्रतिष्ठितत्व आहे, असें जें वर म्हटलें आहे तें प्रश्नपूर्वक प्रकट करितात--) ते दोघे परस्परांत प्रतिष्ठित कसे आहेत तें सांगितलें जातें-- 'रश्मिभिः-' प्रकाशानें अनुग्रह करणारा 'एषः-'हा आदित्य 'अस्मिन्' या अध्यात्म चाक्षुषांत 'प्रतिष्ठित' आहे. 'अयं-' आणि हा चाक्षुष पुरुष 'प्राणैः-'प्राणांच्या योगानें--चक्षुरादि इंद्रियांनीं आदित्यावर अनुग्रह करणारा--आदित्यमंडलस्थास प्रकाशित करणारा असा होत्साता 'अमुष्मिन्-' अधिदैव आदित्यांत प्रतिष्ठित आहे.

सोऽस्मिञ्छरीरे विज्ञानमयो भोक्ता यदा यस्मिन्काल उत्क्रमिष्यन्भवति तदाऽसौ चाक्षुष आदित्यपुरुषो रश्मीनुपसंहृत्य केवलेनौदासीन्येन रूपेण व्यवतिष्ठते । तदाऽयं विज्ञानमयः पश्यति शुद्धमेव

केवलं विरश्म्येतन्मण्डलं चन्द्रमण्डलमिव । तदेतदरिष्टदर्शनं प्रासङ्गिकं प्रदर्श्यते । कथं नाम पुरुषः करणीये यत्नवान्स्यादिति ॥

भाष्यार्थ —' सः ' तो या शरीरांतील विज्ञानमय भोक्ता ' यदा-' ज्यावेळीं ' उत्क्रमिष्यन् भवति ' उत्क्रमण करणारा असा होतो तेव्हां हा चाक्षुष आदित्य पुरुष आपल्या रश्मींचा--प्रकाशाचा उपसंहार करून केवल औदासीन्य रूपानें अवस्थित होतो. त्यावेळीं हा विज्ञानमय 'शुद्धमेव एतन्मण्डलं पश्यति ' शुद्ध--केवल रश्मिरहितच चंद्रमंडलाप्रमाणें हें मंडल पाहतो. तें हें अरिष्टदर्शन प्रासंगिक ( उपासनाप्रसंगानें ) प्रदर्शित केलें जातें. ( पण त्या प्रदर्शनानें फल काय ? तें सांगतात—) पुरुष आपल्याला जें कर्तव्य आहे त्या विषयीं यत्नवान् असा बरें होईल, अशा चिंतेनें हें अरिष्टदर्शन प्रदर्शित केलें आहे.

नैनं चाक्षुषं पुरुषमुररीकृत्य तं प्रत्यनुग्रहायैते रश्मयः स्वामिकर्तव्यवशात्पूर्वमागच्छन्तोऽपि पुनस्तत्कर्मक्षयमनुरुध्यमाना इव नोपयन्ति न प्रत्यागच्छन्त्येनम् । अतोऽवगम्यते परस्परोपकार्योपकारकभावात्सत्यस्यैवैकस्याऽऽत्मनोंऽशावेताविति ॥ २ ॥

भाष्यार्थ —( याप्रमाणें आदित्य व चाक्षुष पुरुषाचा अन्योन्य उपकार्योपकारकभाव सांगून श्रुति त्याचें निगमन करिते— 'नैनं चाक्षुषं पुरुषं प्रत्यायन्ति-' या चाक्षुष पुरुषाचा स्वीकार करून त्याच्यावर अनुग्रह करण्यासाठीं हे रश्मी--किरण -प्रकाश स्वामिकर्तव्यवशात्- स्वामीचें कार्य केलें पाहिजे म्हणून--जरी पूर्वीं येत असले तरी पुनः—मरणानंतर त्याच्या कर्माच्या क्षयाच्या अनुरोधानें--तत्कर्मक्षयाच्या अनुरोधानें वागणारेसे[1] त्याच्यापाशीं परत येत नाहींत. यास्तव परस्पर उपकार्योपकारकत्वामुळें एक सत्य आत्म्याचेच हे दोन अंश आहेत, असें अवगत होतें २.

य एष एतस्मिन्मण्डले पुरुषस्तस्य भूरिति शिर एकᳪ शिर एकमेतदक्षरं भुव इति बाहू द्वौ बाहू द्वे एते अक्षरे स्वरिति प्रतिष्ठा द्वे प्रतिष्ठे

१ किरण जड असल्यामुळें वस्तुतः कर्मक्षयानुरोधानें त्यांना वागतां येणें शक्य नाहीं. म्हणून ' वागणारेसे ' असें म्हटलें आहे.

द्वे एते अक्षरे तस्योपनिषदहरिति हन्ति पाप्मानं जहाति च य एवं वेद ॥ ३ ॥

अर्थ—हा जो या मंडलांत पुरुष त्याचें ' भूः ' हें शिर आहे. शिर एक आहे, हें अक्षर एक आहे. ' भुवः ' हे बाहू आहेत. बाहू दोन असतात. हीं अक्षरेंही दोन आहेत. 'स्वर् ' ही प्रतिष्ठा—पाय—आहेत. प्रतिष्ठा म्ह० पाय दोन आहेत व हीं अक्षरेंही दोन आहेत. त्याचें उपनिषद्—गुप्त नांव ' अहर् ' असें आहे. ' अहर् ' असें रूप ' हन्-' धातु व ' हा-' धातु यांपासून झालें आहे, असें जो जाणतो—'अहर् ' या नांवाची उपासना करतो तो पापाला मारतो व त्याचा त्याग करतो ३.

तत्र योऽसौ को य एष एतस्मिन्मण्डले पुरुषः सत्यनामा तस्य व्याहृतयोऽवयवाः । कथम् । भूरिति येयं व्याहृतिः सा तस्य शिरः । प्राथम्यात् । तत्र सामान्यं स्वयमेवाऽऽह श्रुतिः । एकमेकसंख्यायुक्तं शिरस्तथैतदक्षरमेकं भूरिति । भुव इति बाहू द्वित्वसामान्याद्द्वौ बाहू द्वे एते अक्षरे ॥

भाष्यार्थ—स्थानद्वयसंबंधी सत्य ब्रह्माचें ध्यान प्रस्तुत असतां ' यः-' जो हा, कोण ' एष एतस्मिन्मण्डले पुरुषः-' हा या मंडळांत ' सत्य ' या नांवाचा पुरुष ' तस्य ' त्याचे व्याहृति हे अवयव आहेत. ते कसे ? ' भूरिति शिरः ' भूः अशी जी ही व्याहृति ती त्याचें शिर-मस्तक आहे. कारण व्याहृतीमध्यें ' भूः-' हिला प्रथमत्व आहे व अवयवांत शिराला प्राथम्य आहे. त्या प्रथम व्याहृतीमध्यें शिरोदृष्ट्या आरोप विवक्षित असतां त्या दोघांतील सामान्य—साधर्म्य स्वतः श्रुति सांगते— ' एकं शिरः-' शिर एक म्ह० एक या संख्येनें युक्त आहे. ' एकमेतदक्षरं-' तसेंच ' भूः ' हें अक्षर एक आहे. ' भुव इति बाहू-' ' भुवः ' हे बाहू आहेत. कारण त्या दोघांमध्यें द्वित्व हें सामान्य आहे. बाहू दोन व हीं अक्षरें दोन.

तथा स्वरिति प्रतिष्ठा द्वे प्रतिष्ठे द्वे एते अक्षरे । प्रतिष्ठे पादौ प्रतितिष्ठत्याभ्यामिति । तस्यास्य व्याहृत्यवयवस्य सत्यस्य ब्रह्मण उप-

निषद्रहस्यमभिधानम् । येनाभिधानेनाभिधीयमानं तद्ब्रह्माभिमुखीभवति लोकवत् । काऽसावित्याह । अहरिति । अहरिति चैतद्रूपं हन्तेर्जहातेश्चेति यो वेद स हन्ति जहाति च पाप्मानं य एवं वेद ॥ ३ ॥

भाष्यार्थ--त्याचप्रमाणें 'स्वर्' ही प्रतिष्ठा आहे. प्रतिष्ठा दोन असतात व हीं अक्षरें दोन आहेत. 'प्रतिष्ठे' म्ह० दोन पाय. ज्यांच्या योगानें हा पुरुष प्रतिष्ठित होतो--उभा राहतो त्या प्रतिष्ठा. (अशी याची व्युत्पत्ति आहे.) 'तस्योपनिषद्-' व्याहृति हे ज्याचे अवयव आहेत अशा त्या या सत्य ब्रह्माचें हें उपनिषद्--रहस्य नांव, ज्या अभिधानानें--नांवानें बोललें जाणारें तें ब्रह्म अभिमुख--संमुख होतें. (कशाप्रमाणें? ) व्यवहाराप्रमाणें--व्यवहारांत गाय, बैल इत्यादि पशु त्याच्या नांवानें हांक मारूं लागलें असतां जसा सन्मुख होतो त्याप्रमाणें. तें उपनिषद् कोणतें ? तें श्रुति सांगते--'अहरिति-' 'अहर्' हें रूप 'हन्-' धातु व 'जहाति' असें ज्याचें रूप होतें तो 'हा' धातु यांचें आहे, 'य एवं वेद-' असें जो जाणतो--'अहर्' या नांवाची जो उपासना करतो तो'हन्ति जहाति च० -'पापाला मारतो व त्याग करतो. ३.

योऽयं दक्षिणेऽक्षन्पुरुषस्तस्य भूरिति शिर एकं शिर एकमेतदक्षरं भुव इति बाहू द्वौ बाहू द्वे एते अक्षरे स्वरिति प्रतिष्ठा द्वे प्रतिष्ठे द्वे एते अक्षरे तस्योपनिषदहमिति हन्ति पाप्मानं जहाति च य एवं वेद ॥ ४ ॥ इति बृहदारण्यकोपनिषदि पंचमाध्यायस्य पंचमं ब्राह्मणम् ॥५॥

अर्थ--हा जो दक्षिण नेत्रांतील पुरुष त्याचें'भूः'हें शिर आहे. शिर एक व हें अक्षरही एक.'भुवः'असे बाहू आहेत. बाहू दोन व हीं अक्षरेंही दोन. 'स्वर्' ही प्रतिष्ठा आहे.प्रतिष्ठा दोन व हीं अक्षरें दोन.त्याचें उपनिषद् 'अहम्' असें आहे. जो त्या नांवाची उपासना करतो तो पापाला मारतो व त्याचा त्याग करतो. ४ (५)

एवं योऽयं दक्षिणेऽक्षन्पुरुषस्तस्य भूरिति शिर इत्यादि सर्वं समानम् । तस्योपनिषदहमिति । प्रत्यगात्मभूतत्वात् । पूर्ववद्धन्तेर्जहाते-

श्चेति ॥ ४ ॥ इति बृहदारण्यकोपनिषद्भाष्ये पञ्चमाध्यायस्य पञ्चमं ब्राह्मणम् ॥ ५ ॥

भाष्यार्थ---(मंडलपुरुषाचें जसें अधिदैव उपासन सांगितलें त्याप्रमाणें चाक्षुष पुरुषाचें अध्यात्म उपासन सांगतात--) त्याप्रमाणेंच 'योऽयं०-' जो हा दक्षिण नेत्रांतील पुरुष त्याचें 'भूः' हें शिर आहे, इत्यादि सर्व व्याख्यान पूर्वींच्या व्याख्यानासारखेंच जाणावें. त्याचें उपनिषद्-रहस्य नांव 'अहं' असें आहे. कारण तो चाक्षुष पुरुष प्रत्यगात्मभूत आहे. तें नांव ' हन् ' व ' हा ' या धातूंपासून झालें आहे, असें जो जाणतो तो पापाचा नाश व त्याग करतो, इत्यादि पूर्वीप्रमाणेंच जाणावें. ४.

इति श्रीबृहदारण्यकभाष्यार्थाच्या पांचव्या अध्यायाचें पांचवें ब्राह्मण.

---

मनोमयोऽयं पुरुषो भाःसत्यस्तस्मिन्नन्तर्हृदये यथा व्रीहिर्वा यवो वा स एष सर्वस्येशानः सर्वस्याधिपतिः सर्वमिदं प्रशास्ति यदिदं किंच ॥ १ ॥ इति बृहदारण्यकोपनिषदि पंचमाध्यायस्य षष्ठं ब्राह्मणम् ॥ ६ ॥

अर्थ---हा पुरुष मनोमय आहे. 'भाः' म्ह० प्रकाश हेंच ज्याचें स्वरूप आहे तो 'भाःसत्यः-' भास्वर-प्रकाशमान होणारा तो त्या अन्तर्हृदयांत जसा व्रीहि किंवा यव असतो तेवढ्या परिमाणाचा. तो हा सर्वांचा स्वामी, सर्वांचा अधिष्ठाता, हें जें कांहीं सर्व जगत् आहे त्याचा प्रशास्ता --सर्वथा शासन करणारा आहे. १ (६)

उपाधीनामनेकत्वादनेकविशेषणत्वाच्च तस्यैव प्रकृतस्य ब्रह्मणो मनउपाधिविशिष्टस्योपासनं विधित्सन्नाह । मनोमयो मनःप्रायो मनस्युपलभ्यमानत्वात् । मनसा चोपलभत इति मनोमयोऽयं पुरुषो भाःसत्यो भा एव सत्यं सद्भावः स्वरूपं यस्य सोऽयं भाःसत्यो भास्वर इत्येतत् । मनसः सर्वार्थावभासकत्वान्मनोमयत्वाच्चास्य भास्वरत्वम् ॥

भाष्यार्थ---उपाधि अनेक असल्यामुळें व त्यांतील प्रत्येकाचीं अनेक विशेषणें असल्यामुळें त्याच प्रकृत मन-उपाधिविशिष्ट अशा ब्रह्माच्या

उपासनेचें विधान करण्याची इच्छा करणारा वेद सांगतो—'मनोमयः-' मनःप्राय, कारण तो मनामध्यें उपलब्ध होतो व मनानें उपलब्ध होतो, म्हणून हा पुरुष मनोमय आहे. 'भाःसत्यः-' भा हेंच सत्य–सद्भाव--स्वरूप ज्याचें आहे तो हा 'भाःसत्यः' म्हणजे भास्वर- तेजस्वी असा याचा अर्थ. मन सर्व विषयांना प्रकाशित करणारें आहे व ब्रह्म--आत्मा मनोमय आहे, त्यामुळें याला भास्वरत्व आहे.

तस्मिन्नन्तर्हृदये हृदयस्यान्तस्तस्मिन्निति तत् । यथा व्रीहिर्वा यवो वा परिमाणत एवंपरिमाणस्तस्मिन्नन्तर्हृदये योगिभिर्दृश्यत इत्यर्थः । स एष सर्वस्येशान सर्वस्य स्वभेदजातस्येशानः स्वामी । स्वामित्वेऽपि सति कश्चिदमात्यादितन्त्रोऽयं तु न तथा किं तर्ह्यधिपतिरधिष्ठाय पालयिता । सर्वमिदं प्रशास्ति यदिदं किंच यत्किंचित्सर्वं जगत्तत्सर्वं प्रशास्ति । एवं मनोमयस्योपासनात्तथारूपापत्तिरेव फलम् । तं यथा यथोपासते तदेव भवतीति ब्राह्मणम् ॥ १ ॥ इति बृहदारण्यकोपनिषद्भाष्ये पञ्चमाध्यायस्य षष्ठं ब्राह्मणम् ॥ ६ ॥

भाष्यार्थ—(ध्यानासाठीं त्याचें स्थान दाखवितात--) 'तस्मिन् अन्तर्हृदये-' हृदयाचा अन्तर्भाग त्यांत, असें तात्पर्य, 'यथा व्रीहिर्वा०-' जसा व्रीहि किंवा यव परिमाणानें असतो तशा परिमाणाचा तो मनोमय आत्मा त्या हृदयान्तर्भागांत योग्यांकडून पाहिला जातो, असा भावार्थ. 'स एषः०-' तो हा सर्व स्वभेदजाताचा[1] 'ईशानः' स्वामी, स्वामित्व जरी असलें तरी कोणी अमात्यादिकांच्या तंत्रानें वागणारा असतो; पण हा तसा नाहीं. तर काय 'अधिपतिः-' अधिष्ठाता होऊन पालन करणारा, 'सर्वमिदं प्रशास्ति-' हें सर्व नियमित करतो, या सर्वांचें प्रशासन करतो. 'यदिदं किंच-' जें कांहीं सर्व जगत् त्या सर्वांचें प्रशासन करतो. याप्रमाणें मनोमयाची उपासना केल्यानें तशा रूपाची प्राप्ति होणें हेंच फळ मिळतें. कारण 'त्याची जशी जशी उपासना करतो तसाच होतो,' असें ब्राह्मण आहे. १.

इति बृहदारण्यकभाष्यार्थाच्या पंचमाध्यायाचें सहावें ब्राह्मण समाप्त.

---

१ काल्पनिक आत्मभेदाचा जेवढा आब्रह्मस्तंबपर्यंत समूह आहे त्या सर्वांचा.

विद्युद्ब्रह्मेत्याहुर्विदानाद्विद्युद्विद्यत्येनं पाप्मनो य एवं वेद विद्युद्ब्रह्मेति विद्युद्ध्येव ब्रह्म ॥ १ ॥ इति बृहदारण्यकोपनिषदि पंचमाध्यायस्य सप्तमं ब्राह्मणम् ॥ ७ ॥

अर्थ—विद्युत् ब्रह्म असें म्हणतात. विदानामुळें—विनाश करीत असल्यामुळें विद्युत्. जो विद्युद्ब्रह्म असें जाणतो, अशी उपासना करतो तो आत्म्याला प्रतिकूल असलेल्या पापांचा विनाश करतो. कारण विद्युत्च ब्रह्म आहे १ (७)

तथैवोपासनान्तरं सत्यस्य ब्रह्मणो विशिष्टफलमारभ्यते। विद्युद्ब्रह्मेत्याहुः। विद्युतो ब्रह्मणो निर्वचनमुच्यते। विदानादवखण्डनात्तमसो मेघान्धकारं विदार्य ह्यवभासतेऽतो विद्युत्। एवंगुणं विद्युद्ब्रह्मेति यो वेदासौ विद्यत्यवखण्डयति विनाशयति पाप्मन एनमात्मानं प्रति प्रतिकूलभूताः पाप्मानो ये तान्सर्वान्पाप्मनोऽवखण्डयतीत्यर्थः। य एवं वेद विद्युद्ब्रह्मेति तस्यानुरूपं फलम्। विद्युद्धि यस्माद्ब्रह्म ॥ १ ॥ इति बृहदारण्यकोपनिषद्भाष्ये पञ्चमाध्यायस्य सप्तमं ब्राह्मणम् ॥७॥

भाष्यार्थ—तसेंच सत्य ब्रह्माचें विशिष्ट फल देणारें दुसरें उपासन आरंभिलें जातें. 'विद्युत् ब्रह्म' असें म्हणतात. विद्युत् ब्रह्माचें निर्वचन श्रुति सांगते. 'विदानात् विद्युत्' विदान- तमाचें अवखंडन केल्यामुळें, वीज मेघान्धकाराला विदीर्ण करून प्रकाशमान होते. म्हणून 'विद्युत्' होय. 'य एवं वेद-' अशा गुणानें विशिष्ट 'विद्युद्ब्रह्म' आहे, असें जो जाणतो, एवंगुणविशिष्ट विद्युद्ब्रह्माची जो उपासना करतो तो 'विद्यति-' अवखंडित करतो, विनाश करून सोडतो (कोणाचा?) 'पाप्मन एनं' या आत्म्याला प्रतिकूल असणारीं जीं पापें त्या सर्व पापांचा विनाश करतो, असा भावार्थ. जो विद्युद्ब्रह्म असें जाणतो—अशी उपासना करतो त्याला अनुरूप फळ मिळतें. कारण विद्युत्च ब्रह्म आहे १.

इति श्रीबृहदारण्यकभाष्यार्थाच्या पंचमाध्यायाचें सप्तम ब्राह्मण समाप्त.

---

वाचं धेनुमुपासीत तस्याश्चत्वारः स्तनाः स्वाहाकारो वषट्कारो हन्तकारः स्वधाकारस्तस्यै द्वौ स्तनौ देवा उपजीवन्ति स्वाहाकारं च वषट्कारं च हन्तकारं मनुष्याः स्वधाकारं पितरस्तस्याः प्राण ऋषभो मनो वत्सः ॥ १ ॥ इति बृहदारण्यकोपनिषदि पञ्चमाध्यायस्याष्टमं ब्राह्मणम् ॥ ८ ॥

अर्थ--त्रयीलक्षण 'वाक्' याच धेनूचें उपासन करावें. तिचे चार स्तन आहेत. स्वाहाकार, वषट्कार, हन्तकार, व स्वधाकार. तिच्या दोन स्तनांवर देव उपजीविका करितात. स्वाहाकार व वषट्कार, या दोन्हींवर देवांची उपजीविका होते. हन्तकारावर मनुष्य उपजीविका करितात व स्वधाकारावर पितर उपजीविका करितात. त्या धेनूचा प्राण हाच वृषभ आहे व मन वत्स आहे १ (८)

पुनरुपासनान्तरं तस्यैव ब्रह्मणो वाग्वै ब्रह्मेति। वागिति शब्दस्त्रयी तां वाचं धेनुं धेनुरिव धेनुर्यथा धेनुश्चतुर्भिस्तनैः स्तन्यं पयः क्षरति वत्सायैवं वाग्धेनुर्वक्ष्यमाणैः स्तनैः पय इवान्नं क्षरति देवादिभ्यः। के पुनस्ते स्तनाः के वा ते येभ्यः क्षरति। तस्या एतस्या वाचो धेन्वा द्वौ स्तनौ देवा उपजीवन्ति वत्सस्थानीयाः। कौ तौ। स्वाहाकारं च वषट्कारं च। आभ्यां हि हविर्दीयते देवेभ्यः। हन्तकारं मनुष्याः। हन्तेति मनुष्येभ्योऽन्नं प्रयच्छन्ति। स्वधाकारं पितरः। स्वधाकारेण हि पितृभ्यः स्वधां प्रयच्छन्ति ॥

भाष्यार्थ---पुनः त्याच ब्रह्माच्या दुसऱ्या उपासनेंचें 'वाक् हेंच ब्रह्म आहे,' असें विधान करितात. 'वाक्' ह्या० शब्द वेदत्रयी. 'वाचं धेनुमुपासीत-' त्या वाक्चें 'धनु' या रूपानें उपासन करावें. धेनूसारखी धेनु (वस्तुतः धेनु नव्हे. तर वाक्चें धेनु या भावनेनें उपासन करावें). जशी धेनु चार स्तनांनीं स्तनगत दुग्ध वत्साला देते त्याप्रमाणें ही वाग्धेनु पुढें सांगितलेल्या स्तनांनीं देवादिकांना दुग्धाप्रमाणें अन्न देते. ते स्तन कोणते? किंवा ज्यांना वाग्धेनु दूध देते ते कोण? 'तस्यै०-' त्या या वाग्धेनूच्या दोन स्तनांवर वत्सस्थानीय देव

उपजीविका करितात. ते स्तन कोणते ? स्वाहाकार व वषट्कार. यांच्या योगानेंच देवांस हवि दिला जातो. 'हन्तकारं मनुष्याः-' हन्तकारावर मनुष्य उपजीविका करितात. 'हन्त' असें म्हणून मनुष्यांना अन्न देतात. 'स्वधाकारं पितरः-' स्वधाकारानेंच पितरांस स्वधा देतात.

तस्या धेन्वा वाचः प्राण ऋषभः । प्राणेन हि वाक्प्रसूयते । मनो वत्सः । मनसा हि प्रस्राव्यते । मनसा ह्यालोचिते विषये वाक्प्रवर्तते । तस्मान्मनो वत्सस्थानीयम् । एवं वाग्धेनूपासकस्ताद्भाव्यमेव प्रतिपद्यते ॥ १ ॥ इति बृहदारण्यकोपनिषद्भाष्ये पञ्चमाध्यायस्याष्टमं ब्राह्मणम् ॥ ८ ॥

भाष्यार्थ--'तस्याः प्राण ऋषभः-' त्या वाग्रूप धेनूचा प्राण हा ऋषभ-खोंड आहे. कारण प्राणाकडूनच वाक् प्रसविली जाते. 'मनो वत्सः-' मनच वत्स आहे. कारण मनाकडूनच तिचा प्रस्राव होतो. [ तिला पान्हा फुटतो. ] मनानें ज्याचें आलोचन केलें आहे, अशा विषयांच्या ठिकाणीं वाक् प्रवृत्त होते. तस्मात् मन वत्सस्थानीय आहे. याप्रमाणें वाग्धेनूची उपासना करणारास तदुपाधिक ब्रह्मरूपाची प्राप्ति हें फळ प्राप्त होतें १.

इति श्रीबृहदारण्यकभाष्यार्थाच्या पांचव्या अध्यायाचें आठवें ब्राह्मण समाप्त.

---

अयमग्निर्वैश्वानरो योऽयमन्तः पुरुषे येनेदमन्नं पच्यते यदिदमद्यते तस्यैष घोषो भवति यमेतत्कर्णावपिधाय शृणोति स यदोत्क्रमिष्यन्भवति नैनं घोषꣳ शृणोति ॥ १ ॥ इति बृहदारण्यकोपनिषदि पञ्चमाध्यायस्य नवमं ब्राह्मणम् ॥ ९ ॥

अर्थ—हा अग्नि वैश्वानर आहे, हा कोण ? जो हा या शरीरास्थ पुरुषाच्या आंत आहे.. ज्याच्याकडून हें अन्न पक्व केलें जातें. जें हें अन्न खाल्लें जातें तें जो परिपक्व करतो. त्याचा हा घोष होतो. ज्या घोषाला कान झांकून साक्षात् ऐकतो. पण पुरुष जेव्हां शरीर सोडण्यास तयार होतो तेव्हां या घोषास ऐकत नाहीं. १ ( ९ )

अयमग्निर्वैश्वानरः पूर्ववदुपासनान्तरमयमग्निर्वैश्वानरः । कोऽयमग्निरित्याह । योऽयमन्तः पुरुषे । किं शरीरारम्भको नेत्युच्यते । येनाग्निना वैश्वानराख्येनेदमन्नं पच्यते । किं तदन्नम् । यदिदमद्यते भुज्यतेऽन्नं प्रजाभिर्जाठरोऽग्निरित्यर्थः । तस्य साक्षादुपलक्षणार्थमिदमाह । तस्याग्नेरन्नं पचतो जाठरस्यैष घोषो भवति ॥

भाष्यार्थ—'अयमग्निर्वैश्वानरः-' पूर्वीप्रमाणेंच 'हा अग्नि वैश्वानर आहे' ही ब्रह्माची दुसरी उपासना आहे. हा अग्नि कोण ? तें श्रुति सांगते. 'योऽयमन्तः पुरुषे-' जो हा या पुरुषाच्या आंत आहे. शरीराचा आरंभक अग्निच कीं काय ? नाहीं. कोण, तें सांगितलें जातें. 'येनेदं अन्नं पच्यते-'ज्या वैश्वानराख्य अग्नीकडून हें अन्न पक्व केलें जातें. तें अन्न कोणतें ? 'यदिदमद्यते-' जें हें अन्न लोकांकडून खाल्लें जातें. जाठर अग्नि हा याचा अर्थ. त्याच्या साक्षात् उपलक्षणार्थ हें सांगितलें जातें--'तस्यैष घोषो भवति' त्या अन्न-पानाचा परिपाक करणाऱ्या जाठर अग्नीचा हा घोष होतो.

कोऽसौ । यं घोषमेतदिति क्रियाविशेषणं कर्णावपिधायाङ्गुलीभ्यामपिधानं कृत्वा शृणोति तं प्रजापतिमुपासीत वैश्वानरमग्निम् ।अत्रापि ताद्भाव्यं फलम् । तत्र प्रासङ्गिकमिदमरिष्टलक्षणमुच्यते । सोऽत्र शरीरे भोक्ता यदोत्क्रमिष्यन्भवति नैनं घोषं शृणोति ॥ १ ॥ इति बृहदारण्यकोपनिषद्भाष्ये पञ्चमाध्यायस्य नवमं ब्राह्मणम् ॥ ९ ॥

भाष्यार्थ—तो कोणता ? 'यमेतत्कर्णावपिधाय शृणोति-' ज्या घोषाला 'एतत्' हें क्रियाविशेषण आहे. कानांत बोटें घालून कान झांकले असतां मनुष्य ऐकतो त्या घोषाला- वैश्वानर अग्नीला प्रजापति म्हणून उपासावें. येथेंही तद्रूपत्वप्राप्ति हें फळ आहे. येथें हें उपासनाप्रसंगप्राप्त अरिष्टलक्षण सांगितलें जातें. या शरीरांतील तो भोक्ता ज्यावेळीं उत्क्रमण करणारा होतो तेव्हां या घोषाला ऐकत नाहीं. १.

इति श्रीबृहदारण्यकभाष्यार्थीच्या पांचव्या अध्यायाचें नववें ब्राह्मण समाप्त.

---

यदा वै पुरुषोऽस्माल्लोकात्प्रैति स वायुमागच्छति तस्मै स तत्र विजिहीते यथा रथचक्रस्य खं तेन स ऊर्ध्व आक्रमते स आदित्यमागच्छति तस्मै स तत्र विजिहीते यथा लम्बरस्य खं तेन स ऊर्ध्व आक्रमते स चन्द्रमसमागच्छति तस्मै स तत्र विजिहीते यथा दुन्दुभेः खं तेन स ऊर्ध्व आक्रमते स लोकमागच्छत्यशोकमहिमं तस्मिन्वसति शाश्वतीः समाः ॥१॥ इति बृहदारण्यकोपनिषदि पञ्चमाध्यायस्य दशमं ब्राह्मणम् ॥ १० ॥

अर्थ—ज्यावेळीं पुरुष या शरीराला सोडून जातो तेव्हां तो वायूस प्राप्त होतो. तो वायु आपल्यामध्यें आलेल्या त्याला आपल्यामधून मार्ग देतो. आपल्यामध्यें छिद्र करतो. जसें रथचक्राचें छिद्र असतें तेवढें छिद्र करतो. त्यांतून तो वर जातो. तो आदित्यास प्राप्त होतो. आदित्यही आपले अवयव दूर करून त्याला मार्ग देतो. जसें ' लंबर ' या नांवाच्या वाद्याचें छिद्र त्याप्रमाणें तें छिद्र असतें. त्यांतून तो वर जातो; व चंद्रास प्राप्त होतो. आपल्यामध्यें आलेल्या त्याला चंद्रही आपल्याला छिद्रयुक्त करून मार्ग देतो. जसें दुंदुभीचें छिद्र असतें त्याप्रमाणाचें तें द्वार असतें. त्यांतून तो वर जातो. तो शारीर व मानसिक दुःखशून्य प्रजापतिलोकास प्राप्त होतो त्यांत तो नित्य—शाश्वत वर्षें—अनेक कल्पपर्यंत राहतो. १ (१०)

सर्वेषामस्मिन्प्रकरण उपासनानां गतिरियं फलं चोच्यते । यदा वै पुरुषो विद्वानस्माल्लोकात्प्रैति शरीरं परित्यजति स तदा वायुमागच्छत्यन्तरिक्षे तिर्यग्भूतो वायुः स्तिमितोऽभेद्यस्तिष्ठति । स वायुस्तत्र स्वात्मनि तस्मै संप्राप्ताय विजिहीते स्वात्मावयवान्विगमयति च्छिद्रीकरोत्यात्मानमित्यर्थः । किंपरिमाणं छिद्रमिति । उच्यते । यथा रथचक्रस्य खं छिद्रं प्रसिद्धपरिमाणम् । तेन च्छिद्रेण स विद्वानूर्ध्व आक्रमत ऊर्ध्वः सन्गच्छति स आदित्यमागच्छति । आदित्यो ब्रह्मलोकं जिगमिषोर्मार्गनिरोधं कृत्वा स्थितः सोऽप्येवंविद उपासकाय द्वारं प्रयच्छति । तस्मै स तत्र विजिहीते । यथा लम्बरस्य खं वादित्रविशेषस्य च्छिद्रपरिमाणं तेन स ऊर्ध्व आक्रमते स चन्द्रमसमागच्छति ॥

भाष्यार्थ—या प्रकरणांत सांगितलेल्या सर्व उपासनांची ही गति व फळ सांगितलें जातें. 'यदा वै०-' ज्यावेळीं हा उपासक पुरुष या लोकांतून निघून जातो—शरीराचा त्याग करतो त्यावेळीं तो वायूस प्राप्त होतो. कारण अन्तरिक्षांत तिर्यक्-भूत वायु स्तिमित—अभेद्य होऊन राहतो. 'स वायुः-' तो वायु 'तत्र' स्वतःच्या स्वरूपांत संप्राप्त झालेल्या त्याला 'विजिहीते-' आपल्या अवयवांस दूर करतो, आपल्याला छिद्रयुक्त करतो, असा भावार्थ. तें छिद्र कोणत्या प्रमाणाचें असतें ? म्हणून विचाराल तर श्रुति सांगते—'यथा रथचक्रस्य खं-' जसें रथचक्राचें आकाश; रथचक्राच्या छिद्राचें परिमाण प्रसिद्ध आहे, त्या परिमाणाचें छिद्र वायु आपल्यामध्यें करतो. 'तेन स ऊर्ध्व आक्रमते-' त्या छिद्रानें तो विद्वान्—उपासक ऊर्ध्व होऊन जातो. 'स आदित्यमागच्छति·' तो आदित्यास प्राप्त होतो. ब्रह्मलोकास जाण्याची इच्छा करणाऱ्या साधकाच्या मार्गाचा निरोध करून आदित्य राहिलेला आहे. तोही असें जाणणाऱ्या उपासकाला द्वार करून देतो. 'तस्मै स तत्र विजिहीते-' तो आदित्य आपल्या स्वरूपांत आलेल्या त्याला स्वतःमध्यें छिद्र करून मार्ग देतो. जसें—'लंबर' या नांवाच्या वाद्याचें छिद्र. ज्या परिमाणाचें तें असतें तेवढें छिद्र तो आपल्यामध्यें करतो. 'तेन स०-' त्या मार्गानें तो वर निघून जातो. 'स चन्द्रमसं आगच्छति-' तो चंद्रमास प्राप्त होतो.

सोऽपि तस्मै तत्र विजिहीते।यथा दुन्दुभेः खं प्रसिद्धं तेन स ऊर्ध्व आक्रमते स लोकं प्रजापतिलोकमागच्छति । किंविशिष्टम् । अशोकं मानसेन दुःखेन विवर्जितमित्येतत् । अहिमं हिमवर्जितं शारीरदुःखवर्जितमित्यर्थः । तं प्राप्य तस्मिन्वसति शाश्वतीर्नित्याः समाः संवत्सरानित्यर्थः । ब्रह्मणो बहून्कल्पान्वसतीत्येतत् ॥ १ ॥ इति बृहदारण्यकोपनिषद्भाष्ये पञ्चमाध्यायस्य दशमं ब्राह्मणम् ॥ १० ॥

भाष्यार्थ—'तस्मै स तत्र०-' तो चंद्रमाही आपल्या स्वरूपांत

आलेल्या त्याला स्वतःमध्यें छिद्र करून मार्ग देतो. जसें प्रसिद्ध नगाऱ्याचें छिद्र असतें तेवढ्या छिद्रानें तो वर निघून जातो. ' स लोकमागच्छति- ' तो प्रजापतिलोकास येतो. कोणत्या विशेषणानें विशिष्ट अशा प्रजापतिलोकास ? ' अशोकं ' मानस दुःखानें विवर्जित लोकास असा भावार्थ. ' अहिमं- ' हिमवर्जित–शारीर दुःखवर्जित असा भावार्थ. त्या लोकास प्राप्त होऊन ' तस्मिन्वसति०- ' त्यांत शाश्वत–नित्य अनेक संवत्सर, असा भावार्थ. ब्रह्माचे अनेक कल्प होत तों राहतो, असा भावार्थ. १

इति श्रीबृहदारण्यकोपनिषद्भाष्यार्थाच्या पांचव्या अध्यायाचें दहावें ब्राह्मण.

---

एतद्वै परमं तपो यद्व्याहितस्तप्यते परमꣳ हैव लोके जयति य एवं वेदैतद्वै परमं तपो यं प्रेतमरण्यꣳ हरन्ति परमꣳ हैव लोकं जयति य एवं वेदैतद्वै परमं तपो यं प्रेतमग्नावभ्यादधाति परमꣳ हैव लोकं जयति य एवं वेद ॥ १॥ इति बृहदारण्यकोपनिषदि पञ्चमाध्यायस्यैकादशं ब्राह्मणम् ॥ ११ ॥

अर्थ—हें परम तप आहे कीं जो हा व्याधियुक्त होऊन संतप्त होतो. व्याधिजन्य दुःख हें परम तप आहे, असें जो चिंतन करतो तो परम लोकासच जिंकतो. ज्या मृत मनुष्याला अरण्यास नेतात हेंच परम तप आहे. मरणापूर्वी मला मेल्यावर ग्रामांतून अरण्यांत नेतील हें माझें परम तप आहे, असें जो चिंतन करतो तो परम लोकासच जिंकतो. मेलेल्या मनुष्याला अग्नींत सर्वप्रकारें घालितात हें परम तप आहे, जो असें जाणतो तो परम लोकासच जिंकतो १ ( ११ )

एतद्वै परमं तपः । किं तत् । यद्व्याहितो व्याधितो ज्वरादिपरिगृहीतः सन्यत्तप्यते तदेतत्परमं तप इत्येवं चिन्तयेत् । दुःखसामान्यात् । तस्यैवं चिन्तयतो विदुषः कर्मक्षयहेतुस्तदेव तपो भवत्यनिन्दतोऽविषीदतः। स एव च तेन विज्ञानतपसा दग्धकिल्बिषः परमं हैव लोकं जयति य एवं वेद ॥

भाष्यार्थ—'एतद्वै परमं तपः-' हेंच परम तप आहे. तें कोणतें? 'यद्व्याहितस्त-

प्यते-' कीं जें व्याधित—ज्वरादिकांकडून परिगृहीत असा होत्साता मनुष्य संतप्त होतो तें हें परम तप आहे, असें चिंतन करावें. कारण ज्वरादिपीडा व तप यांमध्यें दुःख हें सामान्य—साधर्म्य आहे. असें चिन्तन करणाऱ्या विद्वानाच्या कर्मांचा क्षय करण्यास तेंच तप कारण होतें. त्या ज्वरादिकांची निंदा न करणाऱ्या व विषाद न पावणाऱ्या पुरुषाच्या कर्मक्षयाला तें कारण होतें आणि तोच त्या विज्ञानतपानें पापाला दग्ध करून—दग्धपाप होऊन—'परमं हैव लोकं जयति-' परम लोकासच जिंकतो, कीं जो असें जाणतो—अशी उपासना करतो.

तथा मुमूर्षुरादावेव कल्पयति किमेतद्वै परमं तपो यं प्रेतं मां ग्रामादरण्यं हरन्ति ऋत्विजोऽन्त्यकर्मणे तद्ग्रामादरण्यगमनसामान्यात्परमं मम तत्तपो भविष्यति । ग्रामादरण्यगमनं परमं तप इति हि प्रसिद्धम् । परमं हैव लोकं जयति य एवं वेद ॥ तथैतद्वै परमं तपो यं प्रेतमग्नावभ्यादधति । अग्निप्रवेशसामान्यात् । परमं हैव लोकं जयति य एवं वेद ॥ १ ॥ इति बृहदारण्यकोपनिषद्भाष्ये पंचमाध्यायस्यैकादशं ब्राह्मणम् ॥ ११ ॥

भाष्यार्थ—त्याचप्रमाणें मरणोन्मुख झालेला मरणापूर्वींच अशी कल्पना करतो—कशी ? 'एतद्वै परमं०-' हें परम तप आहे (कोणतें ?) 'यं प्रेतं०-' ज्या मेलेल्या मला ऋत्विज अन्त्य कर्मासाठीं गांवांतून अरण्यास नेतात, त्यांत ग्रामापासून अरण्यास जाणें हें सामान्य असल्यामुळें तें माझें परम तप होईल. ग्रामापासून अरण्यास जाणें हें परम तप आहे, हें प्रसिद्ध आहे. जो असें जाणतो तो परम लोकासच जिंकतो.

तसेंच 'एतद्वै परमं तपो-' हेंच परम तप आहे. (कोणतें?) 'यं प्रेतं०-' ज्या प्रेताला—मृताला—अग्नीमध्यें घालतात. कारण अग्निप्रवेश हें त्यांत साधर्म्य आहे. जो असें जाणतो—अशी उपासना करतो तो परम लोकासच जिंकतो. १.

इति श्रीबृहदारण्यक-भाष्यार्थाच्या पांचव्या अध्यायाचें अकरावें ब्राह्मण समाप्त.

अन्नं ब्रह्मेत्येक आहुस्तन्न तथा पूयति वा अन्नमृते प्राणात्प्राणो ब्रह्मेत्येक आहुस्तन्न तथा शुष्यति वै प्राण ऋतेऽन्नादेते ह त्वेव देवते एकधाभूयं भूत्वा परमतां गच्छतस्तद्ध स्माऽऽह प्रातृदः पितरं किꣳस्विदेवैवं विदुषे साधु कुर्यां किमेवास्मा असाधु कुर्यामिति स ह स्माऽऽह पाणिना मा प्रातृद कस्त्वेनयोरेकधाभूयं भूत्वा परमतां गच्छतीति तस्मा उ हैतदुवाच वीत्यन्नं वै व्यन्ने हीमानि सर्वाणि भूतानि विष्टानि रमिति प्राणो वै रं प्राणे हीमानि सर्वाणि भूतानि रमन्ते सर्वाणि ह वा अस्मिन्भूतानि विशन्ति सर्वाणि भूतानि रमन्ते य एवं वेद ॥१॥ इति बृहदारण्यकोपनिषदि पंचमाध्यायस्य द्वादशं ब्राह्मणम् ॥ १२ ॥

अर्थ—अन्न ब्रह्म आहे, असें कित्येक म्हणतात. पण तें तसें नाहीं. कारण प्राणावाचून अन्न नासतें. त्याचप्रमाणें प्राण ब्रह्म आहे, असें कित्येक म्हणतात पण तेंही तसें नाहीं. कारण अन्नावाचून प्राण सुकतो. पण ह्या दोन देवता एकभावास प्राप्त होऊन परमत्वास—जातात, असा निश्चय करून प्रातृद ऋषि आपल्या पित्यास म्हणाला—"असें जाणणाराला मी काय बरें साधु—अनुकूल करीन किंवा त्याला मी असाधु—प्रतिकूल तरी काय करणार ? (कारण तो कृतकृत्य होत असल्यामुळें मी त्याला कांहीं करूं शकणार नाहीं. )" पण त्याचें हातानें निवारण करून पिता म्हणाला, "हे प्रातृदा, या दोघांच्या एकत्वरूपास प्राप्त होऊन परब्रह्मत्वास कोण जाणार? (कोणी नाहीं,)" त्यावर प्रातृद त्यास 'वि' असें म्हणाला. 'अन्नं' हेंच ' वि ' आहे. अन्नांतच हीं सर्व भूतें प्रविष्ट आहेत. तसेंच ' रं ' असें तो म्हणाला. प्राणच ' रं ' आहे. कारण प्राणांत हीं सर्व भूतें रममाण होतात. जो असें जाणतो त्यांत सर्व भूतें प्रवेश करितात; व सर्व भूतें रममाण होतात. १ (१२)

अन्नं ब्रह्मेति । तथैतदुपासनान्तरं विधित्सन्नाह । अन्नं ब्रह्मान्नमद्यते यत्तद्ब्रह्मेत्येक आचार्या आहुस्तन्न तथा ग्रहीतव्यमन्नं ब्रह्मेति । अन्ये चाऽऽहुः प्राणो ब्रह्मेति तच्च तथा न ग्रहीतव्यम् । किमर्थं पुनरन्नं ब्रह्मेति न ग्राह्यम् । यस्मात्पूयति क्लिद्यते पूतिभावमापद्यत ऋते प्राणात्तत्कथं ब्रह्म भवितुमर्हति । ब्रह्म हि नाम तद्यदविनाशि ॥

५९

भाष्यार्थ—'अन्नं ब्रह्म-' असें वरच्या सारखेंच निराळें उपासन सांगण्याची इच्छा करणारा वेद म्हणतो—'अन्नं ब्रह्म-' जें खाल्लें जातें तें अन्नच ब्रह्म आहे, असें कांहीं आचार्य म्हणतात. पण तें तसें म्ह० अन्न ब्रह्म आहे, असें ग्रहण करूं नये. तसेंच दुसरे आचार्य 'प्राण ब्रह्म आहे,' असें म्हणतात. पण तेंही तसें समजूं नये. 'अन्नं ब्रह्म' असें कां बरें ग्रहण करूं नये ? कारण 'पूयति वा अन्नं-' अन्न नासतें, पूतिभावास प्राप्त होतें, कुजतें, आंबतें. 'ऋते प्राणात्-' प्राणावाचून तें नासतें. तेव्हां तें ब्रह्म होण्यास कसें युक्त आहे ? कारण ब्रह्म म्हणजे काय ? तर जें अविनाशी तें ब्रह्म.

अस्तु तर्हि प्राणो ब्रह्म नैवम् । यस्माच्छुष्यति वै प्राणः शोषमुपैति ऋतेऽन्नात् । अत्ता हि प्राणः । अतोऽन्नेनाऽऽद्येन विना न शक्नोत्यात्मानं धारयितुम् । तस्माच्छुष्यति वै प्राण ऋतेऽन्नात् । अत एकैकस्य ब्रह्मता नोपपद्यते यस्मात्तस्मादेते ह त्वेवान्नप्राणदेवते एकधाभूयमेकधाभावं भूत्वा गत्वा परमतां परमत्वं गच्छतो ब्रह्मत्वं प्राप्नुतः ॥

भाष्यार्थ—तर मग प्राण ब्रह्म असूं दे 'तन्न तथा-' असेंही नाहीं. 'शुष्यति वै प्राणः ऋतेऽन्नात्-' अन्नावाचून प्राण सुकतो—शोषास प्राप्त होतो. प्राण अत्ता आहे, हें प्रसिद्ध आहे. त्यामुळें भक्षणास उचित अशा अन्नावाचून प्राण आपल्याला धारण करण्यास समर्थ होत नाहीं. त्यामुळें अन्नावाचून प्राण सुकतो. यास्तव म्ह० अन्न व प्राण यांतील एकेकाला विनाशित्व असल्यामुळें ज्याअर्थीं त्यांतील एकेकाला ब्रह्मता उपपन्न होत नाहीं त्याअर्थीं 'एते ह त्वेव देवते-' ह्याच अन्न-प्राणदेवता 'एकधाभूयं भूत्वा-' एकधाभावास प्राप्त होऊन 'परमतां गच्छतः-' परमत्वास जातात—ब्रह्मत्वास प्राप्त होतात.

तदेतदेवमध्यवस्य ह स्माऽऽह स्म प्रातृदो नाम पितरमात्मानः किंस्वित्स्विदिति वितर्के । यथा मया ब्रह्म परिकल्पितमेवं विदुषे किंस्वित्साधु कुर्यां साधु शोभनं पूजां कां त्वस्मै पूजां कुर्यामित्यभिप्रायः ।

किमेवास्मै विदुषेऽसाधु कुर्यां कृतकृत्योऽसावित्यभिप्रायः । अन्नप्राणौ सहभूतौ ब्रह्मेति विद्वान्नासावसाधुकरणेन खण्डितो भवति । नापि साधुकरणेन महीकृतः ॥

भाष्यार्थ—'तत्-' याचा असा निश्चय करून 'ह स्माह प्रातृदः पितरं-' प्रातृद या नांवाचा कोणी ऋषि आपल्या पित्यास म्हणाला-' किं स्विद्-' काय बरें ? ' स्विद् ' हें वितर्क या अर्थी आहे. 'एवं विदुषे साधु कुर्याम्-' मीं जसें ब्रह्म परिकल्पिलें आहे, तसें जाणणाराला काय बरें मीं साधु करावें ? साधु म्हणजे शोभन—पूजा. त्याची मीं काय बरें पूजा करावी, असा अभिप्राय. 'किमेवास्मै असाधु कुर्याम्-' त्याचप्रमाणें मीं त्याला काय बरें असाधु करावें ? कारण तो कृतकृत्य आहे, असा अभिप्राय. (' किं स्विद्०' इत्यादि वाक्याच्या अर्थाचें विवरण-) सहभूत—समुच्चित अन्न व प्राण हें ब्रह्म आहे, असें जाणणारा हा असाधु करण्यानें खंडित होईल, असें नाहीं. त्याचप्रमाणें माझ्या साधुकरणानें तो मोठा केल्यासारखा होईल, असेंही नाहीं.

तमेवंवादिनं स पिता ह स्माऽऽह पाणिना हस्तेन निवारयन्मा प्रातृद मैवं वोचः । कस्त्वेनयोरन्नप्राणयोरेकधाभूयं भूत्वा परमतां कस्तु गच्छति न कश्चिदपि विद्वाननेन ब्रह्मदर्शनेन परमतां गच्छति । तस्मान्नैवं वक्तुमर्हसि कृतकृत्योऽसाविति यद्येवं ब्रवीतु भवान्कथं परमतां गच्छतीति ॥

भाष्यार्थ—'स ह स्माह पाणिना०-' असें बोलणाऱ्या पुत्राला तो पिता हातानें निवारण करून म्हणाला, 'मा प्रातृद-' हे प्रातृदा, असें बोलूं नको. 'कस्त्वेनयोः०-' अन्न व प्राण यांच्या एकधाभावास प्राप्त होऊन परमत्वास कोण प्राप्त होतो ? कोणीही विद्वान् या ब्रह्मदर्शनानें परमत्वास प्राप्त होत नाहीं. यास्तव 'तो कृतकृत्य आहे ' असें म्हणण्यास तूं योग्य नाहींस, असें बोलणें तुला शोभत नाहीं; आणि जर वस्तुस्थिति अशी आहे तर तो परमत्वास—ब्रह्मत्वास कसा प्राप्त होतो तें तूं सांग.

तस्मा उ हैतद्वक्ष्यमाणं वच उवाच । किं तत् । वीति । किं तद्वीति । उच्यते । अन्नं वै वि । अन्ने हि यस्मादिमानि सर्वाणि भूतानि विष्टान्याश्रितान्यतोऽन्नं वीत्युच्यते । किंच रमिति । रमिति चोक्तवान्पिता । किं पुनस्तद्रम् । प्राणो वै रम् । कुत इत्याह । प्राणे हिं यस्माद्बलाश्रये सति सर्वाणि भूतानि रमन्तेऽतो रं प्राणः । सर्वभूताश्रयगुणमन्नं सर्वभूतरतिगुणश्च प्राणः । न हि कश्चिदनायतनो निराश्रयो रमते । नापि सत्यप्यायतनेऽप्राणो दुर्बलो रमते । यदा त्वायतनवान्प्राणी बलवांश्च तदा कृतार्थमात्मानं मन्यमानो रमते लोकः "युवा स्यात्साधुयुवाऽध्यायकः" इत्यादिश्रुतेः ॥

भाष्यार्थ---'तस्मै उ ह०-' त्या पित्याला हें पुढें सांगितलें जाणारें वचन प्रातृद बोलला. तें काय ?'वि' असें 'वि' म्हणजे काय? तेंच सांगितलें जातें--' अन्नं वै वि-' अन्न हेंच वि आहे. ' अन्ने हि इमानि सर्वाणि भूतानि विष्टानि-' ज्याअर्थी हीं सर्व भूतें अन्नामध्येंच आश्रित आहेत त्याअर्थी अन्नाला ' वि ' असें म्हटलें आहे. ' रं इति-' तसेंच तो ' रं ' असें म्हणाला. तें ' रं ' काय बरें आहे? ' प्राणो वै रं- ' प्राणच ' रं ' आहे. कशावरून तें श्रुति सांगते--' प्राणे हि इमानि सर्वाणि भूतानि रमन्ते-' ज्याअर्थी बलाचा आश्रय अशा प्राणाचें अस्तित्व असलें तरच सर्व भूतें रमतात--रममाण होतात; म्हणून प्राण ' रं ' आहे. अन्न सर्वभूतांचा आश्रय या गुणाचें आहे व प्राण सर्व भूतांची रति या गुणाचा आहे. कारण कोणीही आयतनशून्य--निराश्रय असा रममाण होत नाहीं. तसेंच आयतन जरी असलें तरी अप्राण--दुर्बल पुरुष रममाण होत नाहीं. पण जेव्हां सर्व लोक आयतनवान् व प्राणी --बलवान् असतो तेव्हां आपल्याला कृतार्थ मानणारा असा होत्साता रममाण होतो. यांविषयीं ' युवा स्यात्साधु युवाऽध्यायकः-' तरुण, चांग-

१ आयतनवान् व बलवान् अशा विद्वानालाच कृतार्थता असते, अशाविषयीं ही श्रुति येथें घेतली आहे. 'इत्यादिश्रुतेः' यांतील आदिशब्दानें 'आशिष्ठो दृढिष्ठो बलिष्ठः ' इत्यादि पुढील श्रुतिभाग घ्यावा.

ला–सुंदर व सशक्त तरुण, विद्यावान् मनुष्य असावा ( सार्थ तैत्तिरीयोपनिषद् पृ. ७९ पहा ) इत्यादि श्रुति आहे.

इदानीमेवंविदः फलमाह । सर्वाणि ह वा अस्मिन्भूतानि विशन्त्यन्नगुणज्ञानात्सर्वाणि भूतानि रमन्ते प्राणगुणज्ञानाद्य एवं वेद ॥ १ ॥
इति बृहदारण्यकोपनिषद्भाष्ये पञ्चमाध्यायस्य द्वादशं ब्राह्मणम् ॥१२॥

भाष्यार्थ—आतां असें उपासन करणाऱ्या साधकाला श्रुति फळ सांगते–' सर्वाणि ह वा०' जो असें जाणतो, अशी उपासना करतो त्याच्या मध्यें अन्नगुणज्ञानामुळें सर्व भूतें प्रवेश करितात व प्राणगुणज्ञानामुळें सर्व भूतें याच्या ठिकाणीं रममाण होतात. १

इति श्रीबृहदारण्यकोपनिषद्भाष्यार्थाच्या पांचव्या अध्यायाचें बारावें ब्राह्मण समाप्त.

---

उक्थं प्राणो वा उक्थं प्राणो हीदꣳ सर्वमुत्थापयत्युद्धास्मादुक्थविद्वीरस्तिष्ठत्युक्थस्य सायुज्यꣳ सलोकतां जयति य एवं वेद ॥ १ ॥

अर्थ—प्राणाची उक्थदृष्टया उपासना करावी. प्राणच उक्थ आहे. कारण प्राणच हें सर्व उत्थापित करतो. या उपासकापासून उक्थवेत्ता –प्राणवेत्ता पुत्र उत्पन्न होतो. ( हें दृष्ट फळ, आतां अदृष्ट फळ–) जो असें जाणतो–उपासना करतो तो प्राणाच्या सायुज्यास व सलोकतेस प्राप्त होतो १.

उक्थं तथोपासनान्तरमुक्थं शस्त्रम् । तद्धि प्रधानं महाव्रते क्रतौ । किं पुनस्तदुक्थम् । प्राणो वा उक्थम् । प्राणश्च प्रधान इन्द्रियाणामुक्थं च शस्त्राणामत उक्थमित्युपासीत । कथं प्राण उक्थमित्याह । प्राणो हि यस्मादिदं सर्वमुत्थापयति । उत्थापनादुक्थं प्राणः । न ह्यप्राणः कश्चिदुत्तिष्ठति । तदुपासनफलमाह । उद्धास्मादेवंविद उक्थवित्प्राणविद्वीरः पुत्र उत्तिष्ठति ह दृष्टमेतत्फलमदृष्टं तूक्थस्य सायुज्यं सलोकतां जयति य एवं वेद ॥ १ ॥

भाष्यार्थ—' उक्थं' तसेंच दुसरें उपासन. उक्थ हें शस्त्र. (त्याची

उपासना करावी. 'अहो पण दुसरीं अनेक शस्त्रें असतांना उक्थच उपास्यत्वानें कां सांगितलें आहे ?' उत्तर-) कारण तेंच महाव्रत क्रतूमध्यें प्रधान आहे. तें उक्थ काय बरें आहे ? 'प्राणो वा उक्थं-'प्राणच उक्थ आहे. प्राण सर्व इंद्रियांमध्यें प्रधान आहे व उक्थ सर्व शस्त्रांमध्यें प्रधान आहे. यास्तव 'उक्थ' अशा दृष्टीनें प्राणाची उपासना करावी. प्राण उक्थ कसा म्हणून कोणी विचारील तर श्रुति सांगते-'प्राणो हीदं सर्वं उत्थापयति' प्राण ज्याअर्थी हें सर्व उत्थापित करतो. उत्थापनामुळें प्राण उक्थ. प्राणरहित असा कोणी उठत नाहीं. श्रुति त्याच्या उपासनेचें फळ सांगते-'उद्धास्मात्०-' या असें जाणणाऱ्या उपासकापासून उक्थविद्-प्राणविद् वीर-पुत्र 'उत्तिष्ठति-' उत्पन्न होतो. हें दृष्ट फल आहे. पण अदृष्ट फल-जो अशी उपासना करतो तो उक्थाच्या-प्राणाच्या सायुज्यतेस व सलोकतेस जिंकतो. ( उपासनेच्या तारतम्याप्रमाणें हें सायुज्य व सालोक्य फळ आहे.) १.

यजुः प्राणो वै यजुः प्राणे हीमानि सर्वाणि भूतानि युज्यन्ते युज्यन्ते ह्यस्मै सर्वाणि भूतानि श्रैष्ठ्याय यजुषः सायुज्यꣳ सलोकतां जयति य एवं वेद ॥ २ ॥

अर्थ--'यजुः' अशी प्राणाची उपासना करावी. प्राणच यजु आहे. कारण प्राणांतच हीं सर्व भूतें संयुक्त होतात. सर्व भूतें याच्या श्रेष्ठत्वासाठीं याच्याशीं संयुक्त होतात. जो असें जाणतो तो यजूच्या सायुज्यास व सलोकतेस प्राप्त होतो. २.

यजुरिति चोपासीत प्राणम् । प्राणो वै यजुः । कथं यजुः प्राणः । प्राणे हि यस्मात्सर्वाणि भूतानि युज्यन्ते । न ह्यसति प्राणे केनचित्कस्यचिद्योगसामर्थ्यम् । अतो युनक्तीति प्राणो यजुः । एवंविदः फलमाह । युज्यन्त उद्यच्छन्त इत्यर्थः । ह्यस्मा एवंविदे सर्वाणि भूतानि श्रैष्ठ्यं श्रेष्ठभावस्तस्मै श्रैष्ठ्याय श्रेष्ठभावायायं नः श्रेष्ठो भवेदिति । यजुषः प्राणस्य सायुज्यमित्यादि सर्वं समानम् ॥ २ ॥

भाष्यार्थ—'यजुः-' 'यजु' असेंही प्राणाचें उपासन करावें.

' प्राणो वै यजुः-' प्राणच यजु आहे. ' यजु ' प्राण कसा? 'प्राणे हि इमानि सर्वाणि भूतानि युज्यन्ते-' कारण प्राण असला तरच हीं सर्व भूतें युक्त होतात.('अहो पण प्राण नसला तरी योग संभवेल,'अशी आशंका घेऊन सांगतात–) प्राण नसतांना कोणाशींही कोणाचें योग पावण्याचें सामर्थ्य नसतें. यास्तव जोडतो म्हणून प्राण—यजु. श्रुति असें जाणणाराला फल सांगते--'युज्यन्ते-' उच्चप्रकारें देतात, असा भावार्थ. 'हास्मै-' असें जाणणाराला ' सर्वाणि भूतानि-' सर्व भूतें ' श्रैष्ठ्याय-' श्रैष्ठ्य म्हणजे श्रेष्ठभाव. त्यास--श्रेष्ठत्वास--श्रेष्ठभावास, हा आम्हांमध्यें श्रेष्ठ होवो, असें म्हणून त्यास श्रेष्ठत्व उच्चप्रकारें देतात. ' यजुषः सायुज्यं-' यजूचें म्ह० प्राणाचें सायुज्य इत्यादि पुढील सर्व अर्थ वरच्या सारखाच समजावा.२.

साम प्राणो वै साम प्राणे हीमानि सर्वाणि भूतानि सम्यञ्चि सम्यञ्चि हास्मै सर्वाणि भूतानि श्रैष्ठ्याय कल्पन्ते साम्नः सायुज्यꣳ सलोकतां जयति य एवं वेद ॥ ३ ॥

अर्थ—'साम' असें प्राणाचें उपासन करावें. प्राणच साम आहे. प्राणांतच—प्राण असला तरच हीं सर्व भूतें सुसंगत होतात.सर्वभूतें यास सुसंगत होतात. इतकेंच नव्हे तर याच्या श्रेष्ठत्वास समर्थ होतात. जो असें जाणतो तो सामाच्या—प्राणाच्या सायुज्यास व सलोकतेस जिंकतो.३

सामेति चोपासीत प्राणम् । प्राणो वै साम । कथं प्राणः साम । प्राणे हि यस्मात्सर्वाणि भूतानि सम्यञ्चि संगच्छन्ते संगमनात्साम्या-पत्तिहेतुत्वात्साम प्राणः । सम्यञ्चि संगच्छन्ते हास्मै सर्वाणि भूतानि । न केवलं संगच्छन्त एव श्रेष्ठभावाय चास्मै कल्पन्ते समर्थ्यन्ते । साम्नः सायुज्यमित्यादि पूर्ववत् ॥ ३ ॥

भाष्यार्थ—'साम-' साम असें प्राणाचें उपासन करावें. 'प्राणो वै साम-' प्राणच साम आहे. प्राणच साम कसा ? 'प्राणे हि इमानि०-' कारण प्राणांतच हीं सर्वभूतें सुसंगत होतात.याप्रमाणें सुसंगमनामुळें -साम्य प्राप्तीला कारण झाल्यामुळें साम प्राण आहे. 'सम्याञ्चि हा स्मै०-' याला

सर्वभूतें सुसंगत होतात. केवळ सुसंगत होतात, एवढेंच नव्हे तर 'श्रैष्ठ्याय कल्पन्ते-' याच्या श्रेष्ठभावास तीं समर्थ होतात. 'सायुज्यं०' इत्यादि पुढील वाक्याचा अर्थ वर केल्याप्रमाणें जाणावा. ३.

क्षत्रं प्राणो वै क्षत्रं प्राणो हि वै क्षत्रं त्रायते हैनं प्राणः क्षणितोः प्र क्षत्रमत्रमाप्नोति क्षत्रस्य सायुज्यꣳसलोकतां जयति य एवं वेद ।।४।।
इति बृहदारण्यकोपनिषदि पंचमाध्यायस्य त्रयोदशं ब्राह्मणम् ।।१३।।

अर्थ—त्या प्राणाची क्षत्र अशी उपासना करावी. प्राणच क्षत्र आहे. प्राण हेंच क्षत्र आहे, हें प्रसिद्ध आहे. प्राण या देहास शस्त्रादिजन्य क्षतापासून रक्षितो दुसऱ्या कोणाकडूनही त्राण केल्या न जाणाऱ्या क्षत्रास—प्राणास प्राप्त होतो. जो असें जाणतो तो क्षत्राच्या—प्राणाच्या सायुज्यतेस व सलोकतेस जिंकतो ४. (१३)

तं प्राणं क्षत्रमित्युपासीत । प्राणो वै क्षत्रं प्रसिद्धमेतत्प्राणो हि वै क्षत्रम् । कथं प्रसिद्धतेत्याह । त्रायते पालयत्येनं पिण्डं देहं प्राणः क्षणितोः शस्त्रादिहिंसितात्पुनर्मांसेनाऽऽपूरयति यस्मात्तस्मात्क्षतत्राणात्प्रसिद्धं क्षत्रत्वं प्राणस्य । विद्वत्फलमाह । प्र क्षत्रमत्रं न त्रायतेऽन्येन केनचिदित्यत्रं क्षत्रं प्राणस्तमत्रं प्राणं प्राप्नोतीत्यर्थः । शाखान्तरे वा पाठात्क्षत्रमात्रं प्राप्नोति प्राणो भवतीत्यर्थः । क्षत्रस्य सायुज्यं सलोकतां जयति य एवं वेद ।। ४ ।। इति बृहदारण्यकोपनिषद्भाष्ये पंचमाध्यायस्य त्रयोदशं ब्राह्मणम् ।। १३ ।।

भाष्यार्थ—'क्षत्रं-' त्या प्राणास 'क्षत्र' असें उपासावें. 'प्राणो वै क्षत्रं-' हें प्रसिद्ध आहे कीं प्राणच क्षत्र आहे. त्याची प्रसिद्धता कशी ? तें श्रुति सांगते—'त्रायते हैनं प्राणः क्षणितोः-' या पिंडाला—देहाला प्राण शस्त्रादिकांच्या हिंसितापासून—क्षतापासून रक्षितो—याचें पालन करतो, ज्याअर्थी पुनः मांसानें भरून काढतो त्याअर्थी क्षतत्राणामुळें प्राणाचें क्षत्रत्व प्रसिद्ध आहे. विद्वानाचें फळ श्रुति सांगते—'प्र क्षत्रं अत्रं आप्नोति-' दुसऱ्या कोणाकडूनही पाळलें—रक्षिलें जात नाहीं, म्हणून

'अत्रं-' असा अत्र क्षत्र म्हणजे प्राण. त्या अत्र क्षत्रास–प्राणास 'प्र+आप्नोति-' प्राप्त होतो, असा भावार्थ. अथवा माध्यंदिन शाखेंत 'प्र क्षत्रं आप्नोति-' असा पाठ असल्यामुळें केवल क्षत्रास प्राप्त होतो. प्राण होतो, असा भावार्थ. जो असें जाणतो, अशी उपासना करतो तो क्षत्राच्या–प्राणाच्या सायुज्यास व सलोकतेस जिंकतो–संपादन करतो४.

इति बृहदारण्यकभाष्यार्थाच्या पांचव्या अध्यायाचें तेरावें ब्राह्मण समाप्त.

---

ब्रह्मणो हृदयाद्यनेकोपाधिविशिष्टस्योपासनमुक्तमथेदानीं गायत्र्युपाधिविशिष्टस्योपासनं वक्तव्यमित्यारभ्यते। सर्वच्छन्दसां हि गायत्री छन्दः प्रधानभूतम्। तत्प्रयोक्तृगयत्राणाद्गायत्रीति वक्ष्यति। न चान्येषां छन्दसां प्रयोक्तृप्राणत्राणसामर्थ्यम्। प्राणात्मभूता च सा सर्वच्छदसां चाऽऽत्मा प्राणः। प्राणश्च क्षतत्राणात्क्षत्रमित्युक्तम्। प्राणश्च गायत्री तस्मात्तदुपासनमेव विधित्स्यते॥

भाष्यार्थ—हृदयादि अनेक उपाधिविशिष्ट ब्रह्माचें उपासन सांगितलें. आतां गायत्री, या उपाधीनें विशिष्ट अशा ब्रह्माचें उपासन सांगावें, म्हणून आरंभ केला जातो. सर्व छन्दांमध्यें गायत्री हा छन्द प्रधानभूत आहे. त्या छंदाचा प्रयोग करणाराच्या गयाचें त्राण केल्यामुळें गायत्री असें पुढें ही श्रुति सांगेल. इतर छंदांना प्रयोक्त्याच्या प्राणाचें त्राण करण्याचें सामर्थ्य नसतें. ती गायत्री प्राणाच्या आत्मभूत आहे. सर्व छंदांचा आत्मा प्राण आणि प्राण क्षतापासून त्राण करीत असल्यामुळें क्षत्र असें नुकतेंच वर सांगितलें आहे आणि प्राण गायत्री आहे. म्हणून तिच्या उपासनेचेंच विधान केलें जातें.

द्विजोत्तमजन्महेतुत्वाच्च। गायत्र्या ब्राह्मणमसृजत त्रिष्टुभा राजन्यं जगत्या वैश्यमिति। द्विजोत्तमस्य द्वितीयं जन्म गायत्रीनिमित्तम्। तस्मात्प्रधाना गायत्री॥

भाष्यार्थ—(गायत्रीच्या प्राधान्याविषयीं आणखी हेतु–) शिवाय

गायत्री ब्राह्मणाच्या जन्माचें कारण आहे. गायत्रीनें ब्राह्मणाला उत्पन्न करता झाला. त्रिष्टुभ-छंदानें क्षत्रियाला व जगतीनें वैश्याला असें वेंद-वचन आहे. ब्राह्मणाचें दुसरें जन्म गायत्रीच्या निमित्तानें आहे. तस्मात् गायत्री प्रधान आहे.

ब्राह्मणा व्युत्थाय ब्राह्मणा अभिवदन्ति स ब्राह्मणो विपापो विरजोऽविचिकित्सो ब्राह्मणो भवतीत्युत्तमपुरुषार्थसंबन्धं ब्राह्मणस्य दर्शयति । तच्च ब्राह्मणत्वं गायत्रीजन्ममूलमतो वक्तव्यं गायत्र्याः सतत्त्वम् । गायत्र्या हि यः सृष्टो द्विजोत्तमो निरङ्कुश एवोत्तमपुरुषार्थसाधनेऽधिक्रियतेऽतस्तन्मूलः परमपुरुषार्थसंबन्धः । तस्मात्तदुपासनविधानायाऽऽह ॥

भाष्यार्थ—(गायत्रीच्या प्राधान्याविषयीं आणखी हेतु—) 'ब्राह्मण व्युत्थान करून, ब्राह्मण अभिवदन करितात, तो ब्राह्मण, पापरहित दोषरहित व निःशंक ब्राह्मण होतो,' अशा रीतीनें श्रुति ब्राह्मणाचा उत्तम पुरुषार्थाशीं संबंध दाखविते आणि तें ब्राह्मणत्व गायत्रीजन्ममूलक आहे. यास्तव गायत्रीचें स्वरूप सांगणें उचित आहे. कारण गायत्रीनें उत्पन्न केलेला जो द्विजोत्तम—ब्राह्मण तो उत्तम पुरुषार्थसाधनामध्यें निरंकुश—निष्प्रतिबंधच अधिकारी होतो. यास्तव परम पुरुषार्थसंबंध गायत्रीमूलक आहे. म्हणून श्रुति त्या गायत्रीच्या उपासनेचें विधान करण्यासाठीं सांगते—

> भूमिरन्तरिक्षं द्यौरित्यष्टावक्षराण्यष्टाक्षरꣳ ह वा एकं गायत्र्यै पदमेतदु हैवास्या एतत्स यावदेषु त्रिषु लोकेषु तावद्ध जयति योऽस्या एतदेवं पदं वेद ॥ १ ॥

अर्थ—भूमि, अन्तरिक्ष, द्यौः, हीं आठ अक्षरें. गायत्रीचें प्रथम पदही अष्टाक्षर असतें. हेंच भूम्यादिरूप गायत्रीचें पद—प्रथम पाद आहे. जो हिचें हें असें प्रथम पद जाणतो तो या तीन लोकांत जेवढें म्हणून कांहीं जेतव्य आहे त्या सर्वास जिंकतो १.

भूमिरन्तरिक्षं द्यौरित्येतान्यष्टावक्षराणि । अष्टाक्षरमष्टावक्षराणि यस्य तदिदमष्टाक्षरम् । ह वै प्रसिद्धावद्योतकौ । एकं प्रथमं गायत्र्यै गायत्र्याः पदम् । यकारेणैवाष्टत्वपूरणम् । एतदु हैवैतदेवास्या गायत्र्याः पदं पादः प्रथमो भूम्यादिलक्षणस्त्रैलोक्यात्मा । अष्टाक्षरत्वसामान्यात् । एवमेतत्त्रैलोक्यात्मकं गायत्र्याः प्रथमं पदं यो वेद तस्यैतत्फलम् । स विद्वान्यावत्किंचिदेषु त्रिषु लोकेषु जेतव्यं तावत्सर्वं ह जयति योऽस्या एतदेवं पदं वेद ॥ १ ॥

भाष्यार्थ—'भूमि०-' भूमि, अन्तरिक्ष व द्यौः, अशीं हीं आठ अक्षरें आहेत. 'अष्टाक्षरं-' ज्याचीं आठ अक्षरें आहेत तें हें अष्टाक्षर. 'ह वै' हे प्रसिद्धता अवद्योतक निपात आहेत. 'एकं' म्ह० पहिलें 'गायत्र्यै-' गायत्रीचें 'पद' आहे. 'द्यौः' यांतील यकारानेंच आठ या संख्येची पूर्ति होते. 'एतदु हैव-' हेंच 'अस्याः-' या गायत्रीचें 'एतत्-' पद—त्रैलोक्यरूप भूम्यादिलक्षण प्रथम पाद आहे. कारण आठ अक्षरें असणें हें गायत्रीचा पाद व 'भूमि०' इत्यादि वाक्य यांत सामान्य आहे. 'अस्या एतदेवं पदं वेद-' याप्रमाणें हें त्रैलोक्यात्मक गायत्रीचें प्रथम पद जो जाणतो त्याला हें फळ मिळतें. 'सः-' तो विद्वान् 'यावत् त्रिषु लोकेषु०-' जेवढें म्हणून काहीं या तीन लोकांत जिंकण्यास योग्य असें आहे तेवढें सर्व तो जिंकतो. (कोण?) जो हिचें हें असें पद जाणतो तो. १

ऋचो यजूꣳषि सामानीत्यष्टावक्षराण्यष्टाक्षरꣳ ह वा एकं गायत्र्यै पदमेतदु हैवास्या एतत्स यावतीयं त्रयी विद्या तावद्ध जयति योऽस्या एतदेवं पदं वेद ॥ २ ॥

अर्थ—'ऋचः, यजूंषि, सामानि' अशीं आठ अक्षरें आहेत व गायत्रीचें दुसरें पदही अष्टाक्षर आहे. हेंच गायत्रीचें दुसरें पद—दुसरा पाद आहे. जो हिचें हें असें पद जाणतो तो जेवढी ही त्रयीविद्या आहे—त्रयीविद्येचें जेवढें फळ आहे तेवढें सर्व जिंकतो २.

तथर्चो यजूंषि सामानीति त्रयीविद्यानामाक्षराण्येतान्यप्यष्टावेव तथैवाष्टाक्षरं ह वा एकं गायत्र्यै पदं द्वितीयमेतदु हैवास्या एतदृग्यजुः-

सामलक्षणमष्टाक्षरत्वसामान्यादेव। स यावतीयं त्रयी विद्या त्रय्या विद्यया यावत्फलजातमाप्यते तावद्ध जयति योऽस्या एतद्गायत्र्यास्त्रैविद्यलक्षणं पदं वेद ॥ २ ॥

भाष्यार्थ—( गायत्रीच्या पहिल्या पादाच्या ठिकाणीं त्रैलोक्यदृष्टि करावयास जशी वर सांगितली आहे तशी येथें तिच्या दुसऱ्या पादाच्या ठिकाणीं त्रैविद्यदृष्टि करावी असें श्रुति सांगते–) त्याचप्रमाणें 'ऋचः, यजूंषि, सामानि,' अशीं त्रयीविद्येचीं नामाक्षरें आहेत. तींही आठच. तसेंच 'अष्टाक्षरं०.' गायत्रीचें दुसरें पद–दुसरा पाद अष्टाक्षर आहे हें प्रसिद्ध आहे. 'एतदु हैव०.' अष्टाक्षरत्व या सामान्यावरूनच, हें ऋग्यजुःसामलक्षणच गायत्रीचें दुसरें पद आहे. 'स यावती०.' तो जेवढी ही त्रयीविद्या–त्रयी विद्येनें जेवढें फळ प्राप्त केलें जातें–तेवढें सर्व जिंकतो–संपादन करतो. ( तो कोण ? ) 'योऽस्याः०.' जो या गायत्रीचें हें त्रैविद्यलक्षण पद जाणतो तो. २.

प्राणोऽपानो व्यान इत्यष्टावक्षराण्यष्टाक्षरꣳ ह वा एकं गायत्र्यै पदमेतदु हैवास्या एतत्स यावदिदं प्राणि तावद्ध जयति योऽस्या एतदेवं पदं वेदाथास्या एतदेव तुरीयं दर्शतं पदं परोरजा य एष तपति यद्वै चतुर्थं तत्तुरीयं दर्शतं पदमिति ददृश इव ह्येष परोरजा इति सर्वमु ह्येवैष रज उपर्युपरि तपत्येवꣳ हैव श्रिया यशसा तपति योऽस्या एतदेवं पदं वेद॥ ३

अर्थ—'प्राणः अपानः व्यानः' अशीं आठ अक्षरें व गायत्रीचें तिसरें पदही अष्टाक्षर आहे. हेंच तिचें तिसरें पद आहे. जो गायत्रीचें हें असें तिसरें पद जाणतो तो जेवढें हें प्राणिजात आहे तेवढें सर्व जिंकतो. आतां यानंतर जो हा तापतो–प्रकाशमान होतो तेंच या गायत्रीचें तुरीय, दर्शत, परोरजा पद आहे. जें चतुर्थ तेंच तुरीय. 'दर्शतं पदं' याचा अर्थ–हा आदित्यमंडलस्थ पुरुष जणु काय दिसतो 'परोरजा' याचा अर्थ–हा सर्व रजाच्या–समस्त लोकांच्या वर वर–आधिपत्यानें प्रकाशमान होतो. [ सर्व लोकांस अधिपति या नात्यानें प्रकाशित करतो. ] जो या गायत्रीचें हें असें तुरीय दर्शत परोरजा पद जाणतो तो सूर्यप्रमाणेंच शोभा व कीर्ति यांनीं प्रकाशमान होतो ३.

तथा प्राणोऽपानो व्यान एतान्यपि प्राणाद्यभिधानाक्षराण्यष्टौ। तच्च गायत्र्यास्तृतीयं पदं यावदिदं प्राणिजातं तावद्ध जयति योऽस्या एतदेवं गायत्र्यास्तृतीयं पदं वेद ॥

भाष्यार्थ--( तिसऱ्या पादाचे ठिकाणीं प्राणादि-दृष्टीचें विधान-) त्याचप्रमाणें 'प्राणोऽपानो व्यानो' हीं सुद्धां प्राणादिकांचीं अभिधानाक्षरें-नामाक्षरें आठ आहेत. तें गायत्रीचें तिसरें पद. जेवढें हें प्राणिजात आहे तेवढें सर्व तो जिंकतो (कोण?) 'योऽस्या एतदेवं पदं वेद-' जो या गायत्रीचें हें असें तिसरें पद जाणतो.

अथानन्तरं गायत्र्यास्त्रिपदायाः शब्दात्मिकायास्तुरीयं पदमुच्यतेऽभिधेयभूतमस्याः प्रकृताया गायत्र्या एतदेव वक्ष्यमाणं तुरीयं दर्शतं पदं परोरजा य एष तपति। तुरीयमित्यादिवाक्यपदार्थं स्वयमेव व्याचष्टे श्रुतिः। यद्वै चतुर्थं प्रसिद्धं लोके तदिह तुरीयशब्देनाभिधीयते। दर्शतं पदमित्यस्य कोऽर्थ इत्युच्यते। ददृश इव दृश्यत इव ह्येष मण्डलान्तर्गतः पुरुषोऽतो दर्शतं पदमुच्यते ॥

भाष्यार्थ—'अथ-'[1] यानंतर त्रिपदा शब्दात्मिका गायत्रीचें अभिधेयभून तुरीय-चतुर्थ-पद सांगितलें जातें.'अस्याः-' या प्रकृत गायत्रीचें 'एतदेव-' हें पुढें सांगितलें जाणारेंच 'तुरीयं दर्शतं पदं परोरजा य एष तपति-'तुरीय दर्शत परोरजा पद आहे, जो हा तापतो. 'तुरीयं०-' इत्यादि वाक्यांतील पदांचा अर्थ स्वतः श्रुतिच स्पष्टपणें सांगते-'यद्वै चतुर्थं त रीयं-' जें व्यवहारांत चतुर्थ म्हणून प्रसिद्ध आहे तें या प्रकृतवाक्यांत तुरीयशब्दानें सांगितलें जातें. 'दर्शतं पदं इति-' याचा काय अर्थ तें सांगितलें जातें. 'ददृश इव ह्येषः-' जणु काय हा मंडलान्तर्गत पुरुष पाहिला जातो म्हणून त्याला 'दर्शतं पदं' असें म्हटलें जातें.

परोरजा इत्यस्य पदस्य कोऽर्थ इत्युच्यते। सर्वं समस्तमु ह्येवैष मण्डलस्थः पुरुषो रजो रजोजातं समस्तं लोकमित्यर्थः। उपर्युपर्या-

१ शब्दात्मक गायत्रीच्या प्रकरणाचा व्यवच्छेद करण्यासाठीं हा अथशब्द आहे.

धिपत्यभावेन सर्वं लोकं रजोजातं तपति । उपर्युपरीति वीप्सा सर्व-लोकाधिपत्यख्यापनार्था ॥

भाष्यार्थ—'परोरजा इति-' परोरजा या पदाचा काय अर्थ तें सांगितलें जातें. 'सर्वमु-' समस्तही 'रजः' रजोजात ('लोका रजांसि उच्यन्ते' या दुसऱ्या श्रुतीचा आश्रय करून सांगतात—) समस्त लोक, असा याचा भावार्थ, 'ह्येवैषः' हा मंडलस्थ पुरुषच आहे 'उपर्युपरि-' आधिपत्यभावानें—सर्वांचा अधिपति या भावानें, या नात्यानें, सर्व लोकांस रजोजातास 'तपति' तापतो—तापवितो. 'उपरि उपरि' अशी ही वीप्सा सर्व लोकांचें आधिपत्य प्रकट करण्यासाठीं आहे.

ननु सर्वशब्देनैव सिद्धत्वाद्वीप्साऽनर्थिका । नैष दोषः । येषामुपरिष्टात्सविता दृश्यते तद्विषय एव सर्वशब्दः स्यादित्याशङ्कानिवृत्त्यर्था वीप्सा "ये चामुष्मात्पराञ्चो लोकास्तेषां चेष्टे देवकामानां च" इति श्रुत्यन्तरात् । तस्मात्सर्वावरोधार्था वीप्सा ॥

भाष्यार्थ—(शंका—) अहो पण 'सर्वं रजः तपति' इतकें म्हटल्यानेंच म्ह० नुसत्या सर्वशब्दानेंच सर्वाधिपत्य सिद्ध होत असल्यामुळें 'उपरि-उपरि' ही द्विरुक्ति व्यर्थ आहे. (समाधान—) हा कांहीं दोष नाहीं. सविता ज्यांच्या वर दिसतो त्यांना उद्देशूनच हा सर्व शब्द असेल या आशंकेची निवृत्ति करण्यासाठीं 'उपर्युपरि' ही वीप्सा आहे. कारण याविषयीं 'ये चामुष्मात्पराञ्चो लोकाः०-' इत्यादि छान्दोग्य (अ. १ खं. ६ कं. ८ पहा) श्रुति आहे. तिचा अर्थ—'तो हा 'उत्' या नांवाचा मंडलस्थ देव जे या आदित्याहून ऊर्ध्व लोक त्यांचें ईशन करतो व त्यांतील अधिष्ठात्या देवांचीं जीं कामना केलीं जाणारीं फळें त्यांचेंही ईशन करतो' असा आहे. तस्मात् 'उपरि-उपरि' अशी जी ही येथें वीप्सा आहे ती सर्वांचा अवरोध—अन्तर्भाव करण्यासाठीं आहे.

यथाऽसौ सविता सर्वाधिपत्यलक्षणया [1]श्रिया यशसा च ख्यात्या

[1] म्हणजे त्याचें आधिपत्य निरंकुश आहे.

तपत्येवं हैव श्रिया यशसा च तपति योऽस्या एतदेवं तुरीयं दर्शतं पदं वेद ॥ ३ ॥

भाष्यार्थ—( या चतुर्थपादाच्या ज्ञानालाही फलवत्त्व आहे, असें सांगतात—) ज्याप्रमाणें हा सविता सर्वाधिपत्य, एतद्रूप श्रीनें व यशानें—कीर्तीनें तापतो 'एवं हैव श्रिया०' त्याचप्रमाणें श्री व यश यांच्या योगानें तो तापतो. ( तो कोण ? ) जो गायत्रीचें हें असें तुरीय दर्शत पद जाणतो. ३.

सैषा गायत्र्येतस्मिꣳस्तुरीये दर्शते पदे परोरजसि प्रतिष्ठिता तद्वै तत्सत्ये प्रतिष्ठितं चक्षुर्वै सत्यं चक्षुर्हि वै सत्यं तस्माद्यदिदानीं द्वौ विवदमानावेयातामहमदर्शमहमश्रौषमिति य एवं ब्रूयादहमदर्शमिति तस्मा एव श्रद्दध्याम तद्वै तत्सत्यं बले प्रतिष्ठितं प्राणो वै बलं तत्प्राणे प्रतिष्ठितं तस्मादाहुर्बलꣳ सत्यादोगीय इत्येवम्वेषा गायत्र्यध्यात्मं प्रतिष्ठिता सा हैषा गयाꣳस्तत्रे प्राणा वै गयास्तत्प्राणाꣳस्तत्रे तद्यद्गयाꣳस्तत्रे तस्माद्गायत्री नाम स यामेवामूꣳ सावित्रीमन्वाहैषैव सा स यस्मा अन्वाह तस्य प्राणाꣳस्त्रायते ॥ ४ ॥

अर्थ—ती ही गायत्री या तुरीय, दर्शत, परोरज पदामध्यें प्रतिष्ठित आहे. तें तुरीय पद सत्यामध्यें प्रतिष्ठित आहे. चक्षु हेंच सत्य आहे. चक्षु हेंच सत्य आहे, हें प्रसिद्ध आहे. म्हणूनच आतां दोघे 'मीं पाहिलें,' व 'मीं ऐकलें' असें म्हणून परस्पर विरुद्ध भाषण करीत जर आपल्या पाशीं न्यायासाठीं आले तर 'मीं पाहिलें' असें जो म्हणतो त्याच्यावरच आम्ही विश्वास ठेवतों. तेंच तुरीय पदाचा आश्रय करून राहिलेलें सत्य बलामध्यें प्रतिष्ठित आहे. प्राणच बल आहे. त्या प्राणांत सत्य प्रतिष्ठित आहे. बलांत सत्य प्रतिष्ठित असल्यामुळेंच बल सत्याहून अधिक ओजस्वी आहे असें म्हणतात. या न्यायानेंच ही गायत्री अध्यात्म—शरीरस्थ प्राणांत प्रतिष्ठित आहे. तीच ही गयांना रक्षिती झाली. वागादिक प्राण हेच गय आहेत. ती प्राणांस रक्षिती झाली. ज्याअर्थीं ती गयांचें त्राण करती झाली त्याअर्थीं गायत्री होय. म्हणून गायत्री हें तिचें नाम आहे. तो आचार्य अष्टवर्ष बटूला उपनयनसमयीं ज्या या

सावित्रीचाच उपदेश करता झाला ती हीच होय. तो आचार्य ज्या ब-टूला तिचा उपदेश करतो त्याच्या प्राणांचें रक्षण करतो ४.

सैषा त्रिपदोक्ता या त्रैलोक्यत्रैविद्यप्राणलक्षणा गायत्र्येतस्मिंश्चतुर्थे तुरीये दर्शते पदे परोरजसि प्रतिष्ठिता। मूर्तामूर्तरसत्वादादित्यस्य। रसापाये हि वस्तु नीरसमप्रतिष्ठितं भवति। यथा काष्ठादि दग्धसारं तद्वत्। तथा मूर्तामूर्तात्मकं जगत्त्रिपदा गायत्र्यादित्ये प्रतिष्ठिता तद्रस-त्वात्सह त्रिभिः पादैः॥

भाष्यार्थ—( अभिधान अभिधेयरूप गायत्रीचें व्याख्यान करून अभिधान—नांव अभिधेयाच्या—नामी पदार्थाच्या अधीन असतें, असें सांगतात—) जी त्रैलोक्यरूप, त्रैविद्यरूप व प्राणरूप गायत्री 'सैषा-' ती ही त्रिपदा म्हणून सांगितलेली गायत्री 'एतस्मिन् तुरीये०-' या चतुर्थ, दर्शत, परोरज पदामध्यें—आदि यांत प्रतिष्ठित आहे. ( मूर्तामूर्त-रूप गायत्री आदित्यांत प्रतिष्ठित आहे, याविषयीं हेतु सांगतात—) का-रण आदित्याला मूर्तामूर्तरसत्व आहे. ( मूर्तामूर्तब्राह्मणाच्या अनुसार आदित्य हें त्याचें सार असो, पण गायत्री त्यांत प्रतिष्ठित आहे असें कसें म्हणतां ?ती मूर्तरूप गायत्री पृथक्च राहील, अशी आशंका घेऊन सांगता-त—) रसाला अपाय झाला असतां वस्तु नीरस व अप्रतिष्ठित होते.ज्यांतील सार दग्ध झालें आहे, असें काष्ठादिक जसें नीरस व अप्रतिष्ठित होतें त्याप्रमाणें [ आदित्याचा संबंध नाहींसा झाला असतां मूर्तादिरूप गायत्री अप्रतिष्ठित होईल, असा या वाक्याला शेष लावावा. सारावाचून मूर्ता-दिकांची स्थिति स्वातंत्र्यानें होत नाहीं, असें सिद्ध झालें असतां फलित सांगतात—] तसेंच मूर्तामूर्तात्मक जगत्—त्रिपदा गायत्री तीन पादांसह आदित्यांत प्रतिष्ठित आहे. कारण आदित्य हें तिचें सार आहे.

तद्वै तुरीयं पदं सत्ये प्रतिष्ठितम्। किं पुनस्तत्सत्यमित्युच्यते। च-क्षुर्वै सत्यम्। कथं चक्षुः सत्यमित्याह। प्रसिद्धमेतच्चक्षुर्हि वै सत्यम्। कथं प्रसिद्धतेत्याह। तस्माद्यद्यदिदानीमेव द्वौ विवदमानौ विरुद्धं वद-

मानावेयातामागच्छेयातामहमदर्शं दृष्टवानस्मीत्यन्य आह हमश्रौषं त्वया दृष्टं न तथा तद्वस्त्विति तयोर्य एवं ब्रूयादहमद्राक्षमिति तस्मा एव श्रद्दध्याम न पुनर्यो ब्रूयादहमश्रौषमिति । श्रोतुर्मृषा श्रवणमपि संभवति न तु चक्षुषो मृषा दर्शनम् । तस्मान्नाश्रौषमित्युक्तवते श्रद्दध्याम ॥

भाष्यार्थ—' तद्वै-' तें तुरीय पद ' तत्सत्ये प्रतिष्ठितं-' सत्यांत प्रतिष्ठित आहे. आतां तें सत्य काय तें सांगितलें जातें. ' चक्षुर्वै सत्यं-' चक्षुच सत्य आहे. चक्षु सत्य कसें ? तें श्रुति सांगते. ' चक्षुर्हि वै सत्यं-' चक्षुच सत्य आहे हें प्रसिद्ध आहे.त्याला प्रसिद्धता कशी तें श्रुति सांगतें—' तस्माद्यदिदानीं०-' म्हणूनच जर आतांच दोघे विवाद करणारे विरुद्ध बोलणारे आले व त्यांतील एक ' मीं पाहिलें आहे, ' असें म्हणतो व दुसरा म्हणतो—' मीं ऐकलें आहे. तूं जसें पाहिलेंस तसें तें नाहीं. ' तर असें बोलणाऱ्या त्या दोघांपैकीं 'य एवं०-'जो मीं पाहिलें असें म्हणतो ' तस्मै एव० ' त्यावरच आम्ही विश्वास ठेवतों. ' मीं ऐकलें ' असें म्हणणारावर विश्वास ठेवीत नाहीं. कारण ऐकणाराचें मिथ्या श्रवणही संभवतें, पण पाहणाराचें मिथ्या दर्शन संभवत नाहीं. यास्तव मीं ऐकलें आहे, असें म्हणणारावर आम्ही श्रद्धा ठेवीत नाहीं.

तस्मात्सत्यप्रतिपत्तिहेतुत्वात्सत्यं चक्षुस्तस्मिन्सत्ये चक्षुषि सह त्रिभिरितरैः पादैस्तुरीयं पदं प्रतिष्ठितमित्यर्थः । उक्तं च स आदित्यः कस्मिन्प्रतिष्ठित इति चक्षुषीति ॥

भाष्यार्थ—( अधिक विश्वासाचें फळ--) तस्मात् सत्यज्ञानाचें कारण असल्यामुळें चक्षु सत्य आहे. त्या सत्य चक्षूमध्यें इतर तीन पादांसह तुरीय पद प्रतिष्ठित आहे, असा भावार्थ. ' तो आदित्य कशामध्यें प्रतिष्ठित आहे ? चक्षूमध्यें ' असें वर ( बृ. अ. ३ पृ. २४५ ) सांगितलेंच आहे.

तद्वै तुरीयपदाश्रयं सत्यं बले प्रतिष्ठितम् । किं पुनस्तद्बलमित्याह । प्राणो वै बलं तस्मिन्प्राणे बले प्रतिष्ठितं सत्यम् । तथा चोक्तं सूत्रे स-

दोतं च प्रोतं चेति । यस्माद्बले सत्यं प्रतिष्ठितं तस्मादाहुर्बलं सत्यादोगीय ओजीय ओजस्तरामित्यर्थः । लोकेऽपि यस्मिन्हि यदाश्रितं भवति तस्मादाश्रितादाश्रयस्य बलवत्तरत्वं प्रसिद्धम् । न हि दुर्बलं बलवतः क्वचिदाश्रयभूतं दृष्टम् ॥

भाष्यार्थ—' तद्वै तत्सत्यं-' तुरीय पदाचा आश्रय असें तें सत्य ' बले प्रतिष्ठितं-' बलामध्यें प्रतिष्ठित आहे. 'पण तें बल काय आहे;' तें श्रुति सांगते--' प्राणो वै बलं-' प्राणच बल आहे. ' तत्प्राणे प्रतिष्ठितं-' त्या प्राणामध्यें—बलामध्यें सत्य प्रतिष्ठित आहे. तिसऱ्या अध्यायांत ( पृ. १६२ ) ' सूत्रामध्यें—प्राणांत—वायूंत तें सत्यसंज्ञक सर्वभूतजात ओत-प्रोत आहे ' असें सांगितलें आहे. ज्याअर्थी बलांत सत्य प्रतिष्ठित आहे ' तस्मादाहुर्बलं सत्यादोगीयः-' त्याअर्थी बल सत्याहून अधिक ओजस्वी आहे, असें म्हणतात. ' ओगीयः ' म्हणजे अधिक ओजोयुक्त, असा भावार्थ. व्यवहारांतही ज्यामध्यें जें आश्रित असतें त्या आश्रिताहून आश्रयाचें बलवत्तरत्व प्रसिद्ध आहे कारण दुर्बल वस्तु केव्हांही बलवान् पदार्थाची आश्रयभूत झाली आहे असें कोठेंही दृष्ट नाहीं. ( दुर्बल पदार्थ बलाढ्य पदार्थांचा आश्रय झाला आहे, असें कोठेंही अनुभवास येत नाहीं. )

एवमुक्तन्यायेन उ एषा गायत्र्यध्यात्ममध्यात्मे प्राणे प्रतिष्ठिता । सैषा गायत्रा प्राणः । अतो गायत्र्यां जगत्प्रतिष्ठितम् । यस्मिन्प्राणे सर्वे देवा एकं भवन्ति । सर्वे वेदाः कर्माणि फलं च । सैवं गायत्री प्राणरूपा सती जगत आत्मा ॥

भाष्यार्थ—' एवं-' या पूर्वोक्त न्यायानें ' उ एषा गायत्री-' ही गायत्री ' अध्यात्मं प्रतिष्ठिता-' शरीरस्थ प्राणांत प्रतिष्ठित आहे. ती ही गायत्री प्राण आहे. त्यामुळें गायत्रीमध्यें जगत् प्रतिष्ठित आहे. ज्या प्राणामध्यें सर्व देव एक होतात, सर्व वेद, कर्में व फळ एक होतात, ती अशाप्रकारची गायत्री प्राणरूप होत्साती जगाचा आत्मा आहे.

सा हैषा गयांस्तत्रे त्रातवती । के पुनर्गयाः । प्राणा वागादयो वै गयाः । शब्दकरणात् । तांस्तत्रे सैषा गायत्री । तत्त्र यद्यस्माद्गयांस्तत्रे तस्माद्गायत्री नाम । गयत्राणाद्गायत्रीति प्रथिता ॥

भाष्यार्थ—ती ही गयांची त्राती झाली. गयांचें त्राण–रक्षण करिती झाली. पण गय कोण ? 'प्राणा वै गयाः-' वागादिक प्राणच गय आहेत. कारण शब्द करणें, ही क्रिया त्यांच्या ठिकाणीं आहे. 'तत्प्राणांस्तत्रे-' त्या गयांना ती ही गायत्री त्राती झाली, गयांचें त्राण करती झाली. 'तद्यद्गयांस्तत्रे तस्मात् गायत्री नाम-' त्या शरीरांत ज्याअर्थीं गयांचें त्राण करती झाली तस्मात् गायत्री असें तिचें नांव. गयत्राणामुळें 'गायत्री' अशी ती प्रख्यात झाली.

स आचार्य उपनीय माणवकमष्टवर्षं यामेवामूं गायत्रीं सावित्रीं सवितृदेवताकामन्वाह पच्छोऽर्धर्चशः समस्तां च । एषैव सा साक्षात्प्राणो जगत आत्मा माणवकाय समर्पितेहेदानीं व्याख्याता नान्या । स आचार्यो यस्मै माणवकायान्वाहानुवक्ति तस्य माणवकस्य गयान्प्राणांस्त्रायते नरकादिपतनात् ॥ ४ ॥

भाष्यार्थ—(ब्राह्मण्याचें मूळ या रूपानें स्तुति करण्याकरितां गायत्रीलाच श्रुति सावित्रीत्व सांगते–) 'सः-' तो आचार्य अष्टवर्ष–आठ वर्षांच्या बटूचें उपनयन करून 'यामेव अमूं सावित्रीमन्वाह एषा एव सा-' ज्याच या गायत्रीस–सवितृदेवताक सावित्रीस पदशः, अर्धर्चशः व समस्त सांगता झाला ती हीच. साक्षात् प्राण जगाचा आत्मा माणवकाला समर्पिला; व आतां तिचेंच येथें व्याख्यान केलें. येथें जिचें व्याख्यान केलें ती दुसरी नव्हे. 'स यस्मा अन्वाह०-' तो आचार्य ज्या बटूला अनुवचन–उपदेश करतो त्या माणवकाच्या–मुलाच्या प्राणांचें नरकादिपतनापासून त्राण–रक्षण करतो (यास्तव सावित्री गायत्री होय.) ४.

तां हैतामेके सावित्रीमनुष्टुभमन्वाहुर्वागनुष्टुबेतद्वाचमनुब्रूम इति न

तथा कुर्याद्गायत्रीमेव सावित्रीमनुब्रूयाद्यदि ह वा अप्येवंविद्बह्विव प्रतिगृह्णाति न हैव तद्गायत्र्या एकंचन पदं प्रति ॥ ५ ॥

अर्थ—एका शाखेचे लोक ती ही सावित्री अनुष्टुभ् उपदेशितात. (गायत्रीछंदाच्या सवितृदेवताक ऋचेचा उपनीत बटूला उपदेश न करितां अनुष्टुभ्-छंदाच्या सावित्रीचा पदेश करितात.) कारण ते म्हणतात—वाक् अनुष्टुप् आहे. म्हणून वाक्-चाच उपदेश करतों. पण तसें करूं नये. तर गायत्री सावित्रीचाच बटूला उपदेश करावा. असें जाणणारा पुष्कळसा जरी प्रतिग्रह करीत असला तरी तो गायत्रीच्या एका पदाच्या बरोबरही होत नाहीं. ५

तामेतां सावित्रीं हैके शाखिनोऽनुष्टुभमनुष्टुप्प्रभवामनुष्टुप्छन्दस्काम-न्वाहुरुपनीताय । तदभिप्रायमाह । वागनुष्टुप् । वाक्च शरीरे सरस्वती तामेव हि वाचं सरस्वतीं माणवकायानुब्रूम इत्येतद्वदन्तः । न तथा कुर्यान्न तथा विद्याद्यत्त आहुर्मृषैव यत् । किं तर्हि गायत्रीमेव सावित्री-मनुब्रूयात् ॥

भाष्यार्थ—( याविषयींचें दुसरें मत उत्थापित करितात—) 'तां एतां सावित्रीम्' त्या या सावित्रीस 'ह एके' एका शाखेचे लोक 'अनुष्टभं' अनुष्टुप् पासून झालेली अनुष्टुभ् या छंदाची अनुष्टुभ् हा जिचा छंद आहे अशी उपनीत बटूला उपदेशितात. [ म्हणजे 'तत्सवितुर्वृणीमहे वयं देवस्य भोजनम् । श्रेष्ठं सर्वधातमं तुरं भगस्य धीमहि' ही अनुष्टुभ् सावित्री सांगतात—कारण हिची देवता सविता आहे. ] श्रुति त्यांचा अभिप्राय सांगते—वाक् अनुष्टुप् आहे व वाक् शरीरांत सरस्वती आहे. उपनीत बटूला तीच वाक्—सरस्वती आम्ही उपदेशितों, ( कारण त्याला प्रथम वर्णात्मक सरस्वतीविषयींच सापेक्षत्व असतें ) असें बोलणारे ते त्याला गायत्री सावित्री न सांगतां अनुष्टुभ् सावित्री सांगतात. पण 'न तथा कुर्यात्' तसें करूं नये. तसें समजूं नये. ते जें सांगतात तें मृषाच-खोटेंच आहे. तर काय 'गायत्रीं एव सावित्रीं अनुब्रूयात्' गायत्रीच सावित्री उपदेशावी.

कस्मात् । यस्मात्प्राणो गायत्रीत्युक्तम् । प्राण उक्ते वाक्च सरस्वती चान्ये च प्राणाः सर्वं माणवकाय समर्पितं भवति । किंचेदं प्रासङ्गिकमुक्त्वा गायत्रीविदं स्तौति । यदि ह वा अप्येवंविद्बह्विव न हि तस्य सर्वात्मनो बहु नामास्ति किंचित्सर्वात्मकत्वाद्विदुषः प्रतिगृह्णाति न हैव तत्प्रतिग्रहजातं गायत्र्या एकंचनैकमपि पदं प्रति पर्याप्तम्॥५॥

भाष्यार्थ—( ' अपेक्षित वागात्मक सरस्वतीचें समर्पण केल्यावाचून गायत्रीचें समर्पण अयोग्य आहे,' अशी शंका घेऊन तिचा परिहार करितात—) तें कशाकरितां ? कारण ' प्राण गायत्री आहे ' असें सांगितलें आहे. प्राण सांगितला असतां वाक्, सरस्वती व अन्य प्राण हें सर्व माणवकाला समर्पण केल्यासारखें होतें. ( अहो पण ' यदि ह० ' इत्यादि पुढील ग्रंथाची मागच्या ग्रंथाशीं संगति लागत नाहीं, अशी आशंका घेऊन सांगतात—) हें सावित्रीचें गायत्रीत्व प्रासंगिक सांगून श्रुति गायत्रीवेत्त्याची स्तुति करिते. ' यदि ह वै अप्येवंविद्०-' जरी असें जाणणारानें जणु काय 'बहु ' अशाही धनादिकांचा प्रतिग्रह केला ( ' जणु काय बहु ' असें म्हणण्याचें कारण—) कारण त्या सर्वात्मरूप विद्वानाला ' बहु ' म्हणून कांहीं नाहीं, कारण विद्वानाला सर्वात्मकत्व असतें, यास्तव त्यानें या पुष्कळ धनादिकांचा प्रतिग्रह जरी केला तरी ' न हैव तत्०-' तो सर्व प्रतिग्रह गायत्रीच्या एकाही पदाप्रत पुरेसा नाहीं. [म्ह० गायत्रीच्या एका पदाच्या विज्ञानाचें जें फळ मिळतें त्याची तो पुष्कळ प्रतिग्रह सुद्धां बरोबरी करूं शकत नाहीं, असा भावार्थ ]५.

स य इमाꣳस्त्रीँल्लोकान्पूर्णान्प्रतिगृह्णीयात्सोऽस्या एतत्प्रथमं पदमाप्नुयादथ यावतीयं त्रयी विद्या यस्तावत्प्रतिगृह्णीयात्सोऽस्या एतद्द्वितीयं पदमाप्नुयादथ यावदिदं प्राणि यस्तावत्प्रतिगृह्णीयात्सोऽस्या एतत्तृतीयं पदमाप्नुयादथास्या एतदेव तुरीयं दर्शतं पदं परोरजा य एष तपति नैव केनचनाऽऽप्यं कुत उ एतावत्प्रतिगृह्णीयात् ॥ ६ ॥

अर्थ—तो जो या पूर्ण तीन लोकांचा प्रतिग्रह करील तो या गायत्रीच्या प्रथम पदास व्यापील. आतां जेवढी ही त्रयी विद्या आहे तेवढी

जर कोणीं प्रतिग्रह केला तर तो गायत्रीच्या दुसऱ्या पदाच्या विज्ञानाचें जें फळ त्यास प्राप्त होईल. जेवढें म्हणून हें सर्व प्राणिजात आहे तेवढा जर कोणी प्रतिग्रह केला तर तो प्रतिग्रह गायत्रीच्या तिसऱ्या पदास प्राप्त होईल. (प्रतिग्रह करणारानें तृतीय पदविज्ञानाचें फळ भोगलें आहे, असें होईल.) आतां यानंतर या गायत्रीचें हेंच तुरीय दर्शत परोरजा पद आहे कीं जो हा तापतो-प्रकाशमान होतो. हें पद कोणत्याही प्रतिग्रहानें आप्य-प्राप्य नाहीं. कारण एवढा मोठा त्रैलोक्यादि परिमाणाचा प्रतिग्रह कोठून घेणार ? (तो शक्य नाहीं.) ६

स य इमांस्त्रीन्स यो गायत्रीविदिमान्भूरादींस्त्रीन्गोश्वादिधनपूर्णाँल्ँ-लोकान्प्रतिगृह्णीयात्स प्रतिग्रहोऽस्या गायत्र्या एतत्प्रथमं पदं यद्व्याख्या-तमाप्नुयात्प्रथमपदविज्ञानफलं तेन भुक्तं स्यान्न त्वधिकदोषोत्पादकः स प्रतिग्रहः ॥

भाष्यार्थ—(वर गायत्रीचा उपासक जरी प्रतिग्रह घेत असला तरी त्याला सामान्यतः दोष लागत नाहीं असें सांगून विशेषतः दोष लागत नाहीं, असें आतां येथें सांगतात--) 'स य इमान् त्रीन् लोकान्०-' तो जो गायत्रीवेत्ता-उपासक भूः, भुवः व सुवः या तीन-गायी, घोडे इत्यादि धनांनीं परिपूर्ण लोकांचा जो प्रतिग्रह करतो 'सः-' तो प्रतिग्रह 'अस्या एतत्प्रथमं पदं आप्नुयात्-' या गायत्रीचें हें प्रथम पद, ज्याचें वर व्याख्यान केलें आहे त्यास व्यापील.म्हणजे त्या प्रतिग्रह करणारानें प्रथम पदाच्या विज्ञानाचें फळ भोगलें आहे, असें होईल. याहून अधिक दोष उत्पन्न करणारा तो प्रतिग्रह होणार नाहीं.

अथ पुनर्यावतीयं त्रयी विद्या यस्तावत्प्रतिगृह्णीयात्सोऽस्या एतद्द्वि-तीयं पदमाप्नुयात् । द्वितीयपदविज्ञानफलं तेन भुक्तं स्यात् । तथा यावदिदं प्राणि यस्तावत्प्रतिगृह्णीयात्सोऽस्या एतत्तृतीयं पदमाप्नुयात् । तेन तृतीयपदविज्ञानफलं भुक्तं स्यात् ॥

भाष्यार्थ—'अथ यावतीयं०-' आतां जेवढी ही त्रयी विद्या आहे

तेवढाही जो प्रतिग्रह करतो त्याचा तो प्रतिग्रह या गायत्रीच्या दुसऱ्या पदास प्राप्त होतो. त्यानें गायत्रीच्या दुसऱ्या पदाच्या विज्ञानाचें फळ भोगलें आहे, असें होतें.(त्याहून अधिक दोष त्याला लागत नाहीं) त्याच प्रमाणें जेवढें हें प्राणिजात आहे तेवढा जरी कोणीं प्रतिग्रह केला तरी तो प्रतिग्रह गायत्रीच्या तृतीय पदास प्राप्त होईल. त्या प्रतिग्रह करणारानें गायत्रीच्या तृतीय पदाच्या विज्ञानाचें फळ भोगलें असें होईल.

कल्पयित्वेदमुच्यते । पादत्रयसममपि यदि कश्चित्प्रतिगृह्णीयात्तत्पादत्रयविज्ञानफलस्यैव क्षयकारणं न त्वन्यस्य दोषस्य कर्तृत्वे क्षमम्। न चैवं दाता प्रतिग्रहीता वा । गायत्रीविज्ञानस्तुतये कल्प्यते । दाता प्रतिग्रहीता च यद्यप्येवं संभाव्यते नासौ प्रतिग्रहोऽपराधक्षमः । कस्माद्यतोऽभ्यधिकमपि पुरुषार्थविज्ञानमवशिष्टमेव चतुर्थपादविषयं गायत्र्यास्तद्दर्शयति ॥

भाष्यार्थ--(अशा प्रकारचा दाता व प्रतिग्रहीताही संभवत नाहीं, पण श्रुतीनें स्तुतीसाठीं ही कल्पना केली आहे, असें सांगतात–) हें कल्पना करून सांगितलें जातें. म्हणजे कोणीं एकाद्यानें गायत्रीच्या पदत्रयाइतका–तत्सम जरी प्रतिग्रह केला तरी तो प्रतिग्रह गायत्रीच्या पादत्रयविज्ञानफळाच्याच क्षयाला कारण होईल. याहून निराळा दोष करण्यास तो समर्थ होणार नाहीं. पण असा दाता किंवा प्रतिग्रहीता नाहीं. (मग त्याची कल्पना कशाला ? उत्तर–) गायत्रीविज्ञानाच्या स्तुतीकरितां त्यांची कल्पना केली जाते. कारण दाता व प्रतिग्रह करणारा जरी याप्रमाणें संभवत असला तरी हा प्रतिग्रह अपराधाला समर्थ नाहीं. कोणत्या कारणानें ? कारण याहून सर्व प्रकारें अधिक असेंही गायत्रीच्या चतुर्थपादविषयक पुरुषार्थविज्ञान अवशिष्ट राहिलेलेंच आहे. तें श्रुति दाखविते.

अथास्या एतदेव तुरीयं दर्शतं पदं परोरजा य एष तपति । यच्चैतन्नैव केनचन केनचिदपि प्रतिग्रहेणाऽऽप्यं नैव प्राप्यमित्यर्थः । यथा

पूर्वोक्तानि त्रीणि पदानि । एतान्यपि नैवाऽऽप्यानि केनचित्कल्पयित्वैवमुक्तं परमार्थतः कुत उ एतावत्प्रतिगृह्णीयात्त्रैलोक्यादिसमम् । तस्माद्गायत्र्येवंप्रकारोपास्येत्यर्थः ॥ ६ ॥

भाष्यार्थ---'अथ-' वागात्मक पदत्रयविज्ञानाच्या फलाच्या भोगाचें कथन केल्यानंतर आतां 'अस्याः-' या गायत्रीचें 'एतदेव०-' हेंच तुरीय दर्शत परोरजा पद कीं जो हा तापतो–प्रकाशमान होतो. 'नैव केनचन आप्यं-' तें हें पद कोणत्याही प्रतिग्रहानें 'आप्य' म्हणजे प्राप्त होण्यासारखें नाहींच. जशीं पूर्वोक्त तीन पदें प्रतिग्रहानें प्राप्य आहेत, असें सांगितलें तसें हें प्राप्य नाहीं. ('कुत उ०' इत्यादि श्रुतिवाक्याचें तात्पर्य–) हीं पूर्वोक्त पदेंही कोणत्याच प्रतिग्रहानें वस्तुतः प्राप्य नाहींत. कारण वर केवल कल्पना करून तसें सांगितलें आहे. कारण परमार्थतः 'कुत उ एतावत्प्रतिगृह्णीयात्-' त्रैलोक्यादिकांच्या सारखें -तेवढ्या प्रमाणाचें धनादिक कोठून प्रतिग्रहरूपानें घेणार ? तस्मात् अशा प्रकारच्या–पादचतुष्टयरूप सर्वात्मक गायत्रीची उपासना करावी, हा याचा भावार्थ. ६.

तस्या उपस्थानं गायत्र्यस्येकपदी द्विपदी त्रिपदी चतुष्पद्यपदसि न हि पद्यसे । नमस्ते तुरीयाय दर्शताय पदाय परोरजसेऽसावदो मा प्रापदिति यं द्विष्यादसावस्मै कामो मा समृद्धीति वा न हैवास्मै स कामः समृध्यते यस्मा एवमुपतिष्ठतेऽहमदः प्रापमिति वा ॥ ७ ॥

अर्थ—त्या गायत्रीचें उपस्थान. हे गायत्रि, तूं एकपदी आहेस, द्विपदी आहेस, त्रिपदी आहेस, चतुष्पदी आहेस. अपद् आहेस. तूं जाणली जात नाहींस. तुझ्या तुरीय दर्शत, परोरज पदाला नमस्कार असो. हा शत्रु आपलें कार्य करण्यास प्राप्त न होवो. हा विद्वान् ज्याचा द्वेष करीत असेल त्याचें नांव घेऊन त्याचें अभिप्रेत प्राप्त न होवो, किंवा याला काम समृद्ध न होवो, असें उपस्थान करावें. म्हणजे ज्याला उद्देशून असें उपस्थान करतो त्याला तो काम समृद्ध होत नाहीं किंवा मीं या इष्ट अर्थाला प्राप्त व्हावें, असें उपस्थान करावें. ७.

तस्या उपस्थानं तस्या गायत्र्या उपस्थानमुपेत्य स्थानं नमस्करणमनेन मन्त्रेण । कोऽसौ मन्त्र इत्याह । हे गायत्र्यसि भवसि त्रैलोक्यपादेनैकपदी । त्रयीविद्यारूपेण द्वितीयेन द्विपदी । प्राणादिना तृतीयेन त्रिपद्यसि । चतुर्थेन तुरीयेण चतुष्पद्यसि । एवं चतुर्भिः पादैरुपासकैः पद्यसे ज्ञायसेऽतःपरं परेण निरुपाधिकेन स्वेनाऽऽत्मनाऽपदसि । अविद्यमानं पदं यस्यास्तव येन पद्यसे सा त्वमपदसि यस्मान्नहि पद्यसे नेति नेत्यात्मत्वात् । अतो व्यवहारविषयाय नमस्ते तुरीयाय दर्शताय पदाय परोरजसे ॥

भाष्यार्थ—(प्रकृत उपासनेचाच मंत्रानें संग्रह करितात–) 'तस्या उपस्थानं-' त्या गायत्रीचें उपस्थान. 'उपेत्यस्थानं' या मंत्रानें जवळ जाऊन राहणें–नमस्कार करणें. तो मंत्र कोणता ? तें श्रुति सांगते. 'गायत्रि, असि एकपदी' हे गायत्रि, तूं त्रैलोक्यपादानें एकपदी आहेस. 'द्विपदी-' त्रयीविद्यारूप दुसऱ्या पादानें द्विपदी आहेस. 'त्रिपदी-' प्राणादिरूप तिसऱ्या पादानें त्रिपदी आहेस. 'चतुष्पदी-' चवथ्या तुरीय पादानें चतुष्पदी आहेस. याप्रमाणें चार पादांनीं उपासकांकडून तूं जाणली जातेस. यापुढें सर्वोत्तम निरुपाधिक स्वाभाविक रूपानें तूं 'अपदसि-' ज्यानें जाणली जातेस असें पद ज्या तुझें विद्यमान नाहीं ती तूं अपद् आहेस. ज्यामुळेंच तूं जाणली जात नाहींस. कारण 'नेति नेति' अशा प्रकारें निर्देश केलेला जो आत्मा तेंच तुझें स्वरूप आहे. यास्तव 'नमस्ते तुरीयाय०-' व्यवहाराचा विषय होणाऱ्या अशा तुझ्या तुरीय, दर्शत, परोरज पदाला नमस्कार असो.

असौ शत्रुः पाप्मा त्वत्प्राप्तिविघ्नकरोऽदस्तदात्मनः कार्यं यत्त्वत्प्राप्तिविघ्नकर्तृत्वं मा प्रापन्मैव प्राप्नोतु । इतिशब्दो मन्त्रपरिसमाप्त्यर्थः ॥

भाष्यार्थ—(पूर्वोक्त नमस्काराचें प्रयोजन श्रुति सांगते–) 'असौ-' हा शत्रु–तुझ्या प्राप्तीला विघ्न करणारा पाप्मा–पाप 'अदः-' तुझ्या प्राप्तीला विघ्नकर्तृत्व, हें जें आपलें कार्य त्यास 'मा प्रापदिति-' प्राप्त न होवो. 'प्रापदिति-' असा जो 'इति'शब्द आहे तो मंत्रपरिसमाप्त्यर्थ आहे.

यं द्विष्याद्यं प्रति द्वेषं कुर्यात्स्वयं विद्वांस्तं प्रत्यनेनोपस्थानमसौ शत्रुरमुकनामेति नाम गृह्णीयादस्मै यज्ञदत्तायाभिप्रेतः कामो मा समृद्धि समृद्धिं मा प्राप्नोत्विति वोपतिष्ठते। न हैवास्मै देवदत्ताय स कामः समृध्यते। कस्मै। यस्मा एवमुपतिष्ठते। अहमदो देवदत्ताभिप्रेतं प्रापमिति वोपतिष्ठते।असावदो मा प्रापदित्यादित्रयाणां मन्त्रपदानां यथाकामं विकल्पः॥ ७॥

भाष्यार्थ—( हें उपस्थान आभिचारिक व आभ्युदयिक असें दोन प्रकारचें आहे. त्यांतील पहिल्या आभिचारिक उपस्थानाचें हें ब्राह्मण दोन प्रकारें व्युत्पादन करितें–) 'यं द्विष्यात्-' स्वतः विद्वान्—उपासक ज्याचा द्वेष करीत असेल त्याप्रत या मंत्रानें उपस्थान करावें. 'असौ-' हा शत्रु अमुक नांवाचा असें त्याचें नांव घ्यावें. किंवा 'अस्मै' या यज्ञदत्ताला 'कामः' अभिप्रेत—इष्ट असलेला काम 'मा समृद्धि' समृद्ध न होवो, समृद्धीस प्राप्त न होवो, असें उपस्थान करावें. 'न हैवास्मै०-' या देवदत्ताला तो काम समृद्ध होत नाहींच. कोणाला ? 'यस्मै उपतिष्ठते-' ज्याला उद्देशून असें उपस्थान करते.. ( आतां आभ्युदयिक उपस्थान श्रुति दाखवितें–)'अहमदः प्रापमिति वा-' किंवा मी या देवदत्ताला अभिप्रेत असलेल्या पदार्थास प्राप्त व्हावें, असें उपस्थान करतो. 'असौ, अदः,' व 'मा प्रापत्' इत्यादि तीन मंत्रपदांचा उपासकाच्या इच्छेप्रमाणें विकल्प करावा. ७.

एतद्ध वै तज्जनको वैदेहो बुडिलमाश्वतराश्विमुवाच यन्नु हो तद्गायत्रीविद्ब्रूथा अथ कथꣳहस्तीभूतो वहसीति मुखꣳह्यस्याः सम्राण्न विदांचकारेति होवाच तस्या अग्निरेव मुखं यदि ह वा अपि बह्विवाग्नावभ्यादधति सर्वमेव तत्संदहत्येवꣳ हैवैवंविद्यद्यपि बह्विव पापं कुरुते सर्वमेव तत्संप्साय शुद्धः पूतोऽजरोऽमृतः संभवति॥ ८॥ इति बृहदारण्यकोपनिषदि पञ्चमाध्यायस्य चतुर्दशं ब्राह्मणम् १४॥

अर्थ—हेंच तो जनक वैदेह बुडिल अश्वतराश्वीला म्हणाला, "काय हो तुम्ही आपल्याला गायत्रीविद् असें म्हणतां; पण गायत्री-

विद् असतांना तूं हत्ती होऊन भार कसा वहात आहेस ? " त्यावर तो बुडिल उलट म्हणाला " हे राजा, मी या गायत्रीचें मुख जाणलें नाहीं, " असें तो बोलला. तेव्हां राजा जनक म्हणाला, " त्या गायत्रीचें अग्नि हेंच मुख आहे. अग्नीमध्यें लोकांनीं पुष्कळसें इंधन जरी घातलें तरी तो तें सर्व चांगल्याप्रकारें जाळतो. त्याचप्रमाणें गायत्री अग्निमुख आहे असें जाणणारा जरी पुष्कळ पाप करीत असला तरी तें सर्वच भक्षण करून तो शुद्ध, पूत, अजर, अमर होतो." ८ ( १४ )

गायत्र्या मुखविधानायार्थवाद उच्यते । एतद्ध किल वै स्मर्यते । तत्तत्र गायत्रीविज्ञानविषये जनको वैदेहो बुडिलो नामतोऽश्वतराश्वस्यापत्यमाश्वतराश्विस्तं किलोक्तवान् । यन्नु इति वितर्के हो अहो इत्येतत्तद्यत्त्वं गायत्रीविदब्रूथा गायत्रीविदस्मीति यदब्रूथाः किमिदं तस्य वचसोऽननुरूपम् । अथ कथं यदि गायत्रीवित्प्रतिग्रहदोषेण हस्तीभूतो वहसीति ॥

भाष्यार्थ—गायत्रीच्या मुखविधानार्थ अर्थवाद सांगितला जातो. ' एतद्ध वै-' खरोखर असें स्मरण आहे—' तत्-' त्या गायत्रीविज्ञानविषयामध्यें ' वैदेह जनक ' ' बुडिल ' या नांवाच्या ' अश्वतराश्विम्-' अश्वतराश्वाचें अपत्य—अश्वतराश्वि, त्यास खरोखर ' उवाच-' म्हणाला. ' यन्नु-' हें वितर्क या अर्थी आहे. ' हो-' अहो, असा भावार्थ. ' तत् गायत्रीविद् अब्रूथाः-' तें जें तूं मी गायत्रीविद् आहें, असें म्हटलेंस पण हें त्या वचनाच्या अननुरूप काय आहे? ( त्यांत गायत्रीविज्ञानाच्या प्रतिकूल काय उपलब्ध होतें तें सांगतात—) ' अथ कथं हस्तीभूतो वहसि-' तूं जर गायत्रीविद् आहेस तर प्रतिग्रहदोषानें हस्ती झालेला असा तूं भार कसा वहात आहेस ?

स प्रत्याह राज्ञा स्मारितो मुखं गायत्र्या हि यस्मादस्या हे सम्राण्न विदांचकार न विज्ञातवानस्मीति होवाच । एकाङ्गविकलत्वाद्गायत्रीविज्ञानं ममाफलं जातम् । शृणु तर्हि तस्या गायत्र्या अग्निरेव मुख-

म् । यदि ह वा अपि बह्विवेन्धनमग्नावभ्यादधाति लौकिकाः सर्वमेव तत्संदहत्येवेन्धनमग्निरेवं हैवैवंविद्गायत्र्या अग्निर्मुखमित्येवं वेत्तीत्येवंवित्स्यात्स्वयं गायत्र्यात्माऽग्निमुखः सन् । यद्यपि बह्विव पापं कुरुते प्रतिग्रहादिदोषं तत्सर्वं पापजातं संप्साय भक्षयित्वा शुद्धोऽग्निवत्पूतश्च तस्मात्प्रतिग्रहदोषाद्गायत्र्यात्माऽजरोऽमृतश्च संभवति ॥ ८ ॥ इति बृहदारण्यकोपनिषद्भाष्ये पञ्चमाध्यायस्य चतुर्दशं ब्राह्मणम् ॥ १४ ॥

भाष्यार्थ—राजाकडून याप्रमाणें स्मरण करून दिलेला तो बुडिल त्यास उलट म्हणाला, ' मुखं ह्यस्याः सम्राण्न विदांचकार-' हे सम्राट्, ज्याअर्थीं या गायत्रीचें मुख मीं जाणलेलें नाहीं, असें तो म्हणाला. एकांग विकल असल्यामुळें माझें गायत्रीविज्ञान निष्फळ झालें. ( तेव्हां राजा म्हणतो.-) मग असें असेल तर ऐक. ' तस्या अग्निरेव मुखं-' त्या गायत्रीचें अग्नि हेंच मुख आहे. ' यदि ह वा०-' लौकिक जनांनीं जरी पुष्कळसें इंधन—जळण अग्नीमध्यें ठेवलें तरी तो तें सर्वच उत्तमप्रकारें जाळतो. ' एवं हैवैवंविद्-' त्याच न्यायानें गायत्रीचें अग्नि हें मुख आहे असें जाणणारा—एवंविद् होतो, स्वतः गायत्रीरूप अग्निमुख होत्साता ' यद्यपि बहु इव पापं कुरुते-' जरी तो पुष्कळसें पाप—प्रतिग्रहादि दोष करतो तरी ' सर्वमेव तत्संप्साय-' तें सर्वच पापजात भक्षण करून 'शुद्ध' व अग्नीप्रमाणें ' पूत-' प्रतिग्रहदोषापासून पवित्र होतो. त्यामुळें गायत्र्यात्मा अजर व अमृत संभवतो. ८.

इति बृहदारण्यकभाष्यार्थींच्या पांचव्या अध्यायाचें चवदावें ब्राह्मण समाप्त.

---

हिरण्मयेन पात्रेण सत्यस्यापिहितं मुखम् । तत्त्वं पूषन्नपावृणु सत्यधर्माय दृष्टये ॥

अर्थ—ज्योतिर्मय पात्रानें सत्याख्य ब्रह्माचें मुख—स्वरूप आच्छादित केलेलें आहे. तें आच्छादन हे पोषका, तूं उघड. ( कशासाठीं ? ) सत्य हाच ज्याचा धर्म आहे त्या मज सत्यधर्माला दिसण्यासाठीं. (तें तूं उघड.)

पूषन्नेकर्षे यम सूर्य प्राजापत्य व्यूह रश्मीन् । समूह तेजो यत्ते रूपं कल्याणतमं तत्ते पश्यामि । योऽसावसौ पुरुषः सोऽहमस्मि ॥

अर्थ—हे ' पूषन् ' जगत्पोषका, ' एकर्षे-' एकाकी गमन करणाऱ्या अथवा एकच सर्वद्रष्ट्या, ' यम-' सर्व जगाच्या नियामका, 'सूर्य-' जगाच्या चांगल्या प्रेरका, ' प्राजापत्य-' ईश्वराच्या किंवा हिरण्यगर्भाच्या पुत्रा, आपल्या रश्मींना-किरणांना घालीव, तेज एकत्र संक्षिप्त कर, त्याचा उपसंहार कर. जें तुझें कल्याणतम—अतिशय कल्याणरूप तें मी पाहतों. हा जो मंडलस्थ पुरुष तोच मी आहें.

वायुरनिलममृतमथेदं भस्मान्तꣳ शरीरम् ॥ ॐ क्रतो स्मर कृतꣳ स्मर क्रतो स्मर कृतꣳ स्मर ॥

अर्थ—मज अमृत सत्याचा वायु—प्राण ( शरीरपातानंतर ) बाह्य वायूप्र प्राप्त होवो. तसेंच हें शरीरही भस्मान्त होऊन पृथ्वीस प्राप्त होवो. हे ॐ, हे क्रतो, माझ्या विषयीं जें स्मर्तव्य असेल तें स्मर. मीं जें केलें आहे तें आठव. ( आदर दाखविण्यासाठीं याच प्रार्थनेची मंत्रांत द्विरुक्ति केली आहे. )

अग्ने नय सुपथा राये अस्मान्विश्वानि देव वयुनानि विद्वान् । युयोध्यस्मज्जुहुराणमेनो भूयिष्ठां ते नमउक्तिं विधेम ॥ १ ॥ इति बृहदारण्यकोपनिषदि पञ्चमाध्यायस्य पञ्चदशं ब्राह्मणम् ॥ १५ ॥
इति बृहदारण्यकोपनिषदि पञ्चमोऽध्यायः ॥ ५ ॥ बृहदारण्यकक्रमेण सप्तमोऽध्यायः ॥ ७ ॥

अर्थ—हे अग्ने, आम्हांला तूं कर्मफलप्राप्त्यर्थ शोभन मार्गानें—उत्तरायण—देवयान-मार्गानें ने. हे देव, सर्व प्राण्यांच्या सर्व प्रज्ञानांस जाणणाऱ्या हे विद्वाना, ( आम्हांस शुभ मार्गानें ने ) तसेंच आमचें कुटिल पाप घालीव. आम्ही तुला पुष्कळ नमस्कारवचन करतों. नमस्कारवचनानें परिचर्या करतों. १ ( १५ )

यो ज्ञानकर्मसमुच्चयकारी सोऽन्तकाल आदित्यं प्रार्थयति । अस्ति च प्रसङ्गो गायत्र्यास्तुरीयः पादो हि सः । तदुपस्थानं प्रकृतमतः स एव प्रार्थ्यते । हिरण्मयेन ज्योतिर्मयेन पात्रेण यथा पात्रेणेष्टं वस्त्वपिधीयत एवमिदं सत्याख्यं ब्रह्म ज्योतिर्मयेन मण्डलेनापिहितमिवासमाहितचेतसामदृश्यत्वात्तदुच्यते ॥

भाष्यार्थ—जो ज्ञानकर्मसमुच्चय करणारा तो अन्तकालीं आदित्याची प्रार्थना करतो. आदित्याचा येथें प्रसंगही आहे. गायत्रीचा तुरीय पादच तो आदित्य आहे. त्याचें उपस्थान येथें प्रकृत आहे. यास्तव तोच प्रार्थिला जातो.—'हिरण्मयेन पात्रेण-' हिरण्मय-ज्योतिर्मय पात्रानें, व्यवहारांत जशी इष्ट वस्तु पात्रानें झांकून ठेवली जाते त्याप्रमाणें हें सत्यसंज्ञक ब्रह्म ज्योतिर्मय मंडलानें जणुं काय झांकलेलेंच आहे, असें असमाहितचित्त—अशांतचित्त पुरुषांना तें अदृश्य असल्यामुळें म्हटलें जातें.

सत्यस्यापिहितं मुखं मुख्यं स्वरूपं तदपिधानं पात्रमपिधानमिव दर्शनप्रतिबन्धकारणं तत्त्वं हे पूषञ्जगतः पोषणात्पूषा सविताऽपावृण्वन्नपावृतं कुरु दर्शनप्रतिबन्धकारणमपनयेत्यर्थः।सत्यधर्माय सत्यं धर्मोऽस्य मम सोऽहं सत्यधर्मा तस्मै त्वदात्मभूतायेत्यर्थः। दृष्टये दर्शनाय ॥

भाष्यार्थ—'सत्यस्यापिहितं मुखं-' सत्य ब्रह्माचें तें मुख्य स्वरूप आच्छादित आहे. तें अपिधान पात्र लौकिक अपिधानासारखें दर्शनाच्या प्रतिबंधाचें कारण आहे. (लौकिक झांकणाप्रमाणें सत्याच्या दर्शनास प्रतिबंध करतें.) 'तत्त्वं-' तें तूं हे 'पूषन्-' जगाच्या पोषणामुळें सविता पूषा आहे. (उष्णता, दंव, वृष्टि इत्यादि देऊन सविता जगाचें पोषण करतो, हें प्रसिद्ध आहे.) 'अपावृणु-' अपावृत कर—उघड. दर्शनाच्या प्रतिबंधाचें कारण दूर कर असा भावार्थ. 'सत्यधर्माय-' सत्य—परमार्थस्वरूप ब्रह्म ज्या माझा धर्म—स्वभाव आहे तो मी सत्यधर्मा त्या मला—तुझ्या आत्मभूताला, असा भावार्थ. 'दृष्टये-' दर्शनासाठीं (आत्मभूत अशा माझ्या दर्शनासाठीं तें आच्छादन दूर कर. तें तूं उघड. ईशावास्योपनिषदांत हेच मंत्र क्रमानें आले आहेत. पृ. ३५–४० पहा.)

पूषन्नित्यादीनि नामान्यामन्त्रणार्थानि सवितुः। एकर्ष एकश्चासावृषिश्चैकर्षिर्दर्शनादृषिः। स हि सर्वस्य जगत आत्मा चक्षुश्च सन्सर्वं पश्यत्येको वा गच्छतीत्येकर्षिः "सूर्य एकाकी चरति" इति मन्त्रव-

णीत् । यम सर्वं हि जगतः संयमनं त्वत्कृतम् । सूर्य सुष्ठीरयते रसान्रश्मीन्प्राणान्धियो वा जगत इति । प्राजापत्य प्रजापतेरीश्वरस्यापत्यं हिरण्यगर्भस्य वा हे प्राजापत्य व्यूह विगमय रश्मीन् ॥

भाष्यार्थ—'पुषन्-' इत्यादि नांवें सूर्याच्या संबोधनार्थ आहेत. 'एकर्षे-' एक असा ऋषि–एकर्षि, दर्शनामुळें ऋषि; कारण तो जगाचा आत्मा[1] व चक्षु होऊन सर्व पाहतो. अथवा 'एकच जातो' म्हणून एकर्षि. 'सूर्य एकाकी गमन करतो' असा मंत्रवर्ण आहे. 'यम-' सर्व जगाचें संयमन तुझ्यामुळेंच होतें. 'सूर्य-' जगाचे रस, रश्मी, प्राण किंवा बुद्धि यांस चांगल्या रीतीनें प्रेरणा करतो–गमन करावयास लावतो. 'प्राजापत्य-' प्रजापति जो ईश्वर त्याचें अपत्य किंवा हिरण्यगर्भाचें अपत्य, अशा हे प्राजापत्य 'व्यूह रश्मीन्' किरणांना दूर कर.

समूह संक्षिपाऽऽत्मनस्तेजो येनाहं शक्नुयां द्रष्टुम् । तेजसा ह्यपहतदृष्टिर्न शक्नुयां त्वत्स्वरूपमञ्जसा द्रष्टुम् । विद्योतन इव रूपाणामत उपसंहर तेजः । यत्ते तव रूपं सर्वकल्याणानामतिशयेन कल्याणं कल्याणतमं तत्ते पश्यामि । पश्यामो वयं वचनव्यत्ययेन । योऽसौ भूर्भुवःस्वर्व्याहृत्यवयवः पुरुषः पुरुषाकृतित्वात्पुरुषः सोऽहमस्मि भवामि । अहरहमिति चोपनिषद उक्तत्वादादित्यचाक्षुषयोस्तदेवेदं परामृश्यते सोऽहमस्म्यमृतमिति संबन्धः ॥

भाष्यार्थ—(अहो पण स्वाभाविक किरण दूर करतां येणें शक्य नाहीं, अशी आशंका घेऊन श्रुति सांगते–) 'समूह-' आपल्या तेजाला संक्षिप्त कर. म्हणजे त्यामुळें मी सत्य ब्रह्माला पाहूं शकेन. तुझ्या तेजानें माझी दृष्टि अपहत–नष्ट झाल्यामुळें–दीपल्यामुळें तुझें स्वरूप साक्षात् पाहण्यास मी समर्थ होत नाहीं. ज्याप्रमाणें वीज चमकली असतां डोळे दीपतात व पदार्थांचें स्वरूप पाहूं शकत नाहींत त्याप्रमाणें तुझ्या तेजामुळें

---

१ 'सूर्य आत्मा जगतस्तस्थुषश्च' व 'चक्षुर्मित्रस्य वरुणयाग्नेः' या श्रुतींच्या आश्रयानें हें म्हटलें आहे.

मी सत्य पाहूं शकत नाहीं. यास्तव आपल्या तेजाचा उपसंहार कर. 'यत्ते रूपं कल्याणतमं-' जें तुझें सर्व कल्याणांचें अतिशय कल्याण—कल्याणतम रूप तें तुझें रूप मी पाहतों. श्रुतींत 'पश्यामि' असें एकवचन जरी असलें तरी 'पश्यामो वयं' आम्ही पाहतों असें बहुवचन करून अर्थ करावा. 'योऽसावसौ पुरुषः०-' हा जो 'भूर्भुवःस्वर्व्याहृत्यवयवः'—'भूः भुवः सुवः' ह्या व्याहृति हेच ज्याचे अवयव आहेत तो व्याहृत्यवयव 'पुरुष-' त्याला पुरुषाकृति असल्यामुळें पुरुष 'सोऽहस्मि-' तो मी आहें. (व्याहृतिशरीरामध्यें 'अहं' असा प्रयोग कसा ? उत्तर—) 'अहर्' व 'अहं' असें आदित्य व चक्षु यांतील पुरुषाचें रहस्य नांव वर पृ ४४) सांगितलेलें असल्यामुळें त्याचाच हा 'सोऽहस्मि अमृतं-' असा परामर्श केला जातो, असा संबंध लावावा.

ममामृतस्य सत्यस्य शरीरपाते शरीरस्थो यः प्राणो वायुः सोऽनिलं बाह्यं वायुमेव प्रतिगच्छतु । तथाऽन्या देवताः स्वां स्वां प्रकृतिं गच्छन्तु । अथेदमपि भस्मान्तं सत्पृथिवीं यातु शरीरम् । अथेदानीमात्मनः संकल्पभूतां मनसि व्यवस्थितामग्निदेवतां प्रार्थयते । ॐ क्रतो । ॐमिति क्रतो इति च संबोधनार्थावेव । ॐकारप्रतीकत्वादोम् । मनोमयत्वाच्च क्रतुः । हे ॐ हे क्रतो स्मरं स्मर्तव्यमन्तकाले हि त्वत्स्मरणवशादिष्टा गतिः प्राप्यतेऽतः प्रार्थ्यते यन्मया कृतं तत्स्मर पुनरुक्तिरादरार्था ॥

भाष्यार्थ—(तुझा शरीरपात जरी झाला तरी अमृतत्व संभवत नाहीं. कारण आध्यात्मिक वायु, इंद्रियें इत्यादिकांचा त्या अमृतत्वाला प्रतिबंध होणें साहजिक आहे, अशी आशंका घेऊन श्रुति सांगते—) मज अमृत सत्याच्या शरीराचा पात झाला असतां शरीरस्थ जो प्राण 'वायुः' तो 'अनिलं-' बाह्य वायूप्रतच जावो. त्याचप्रमाणें दुसऱ्या देवता आपापल्या प्रकृतीस जावोत. 'अथेदं०-' व हें शरीरही भस्मान्त होऊन पृथिवीस प्राप्त होवो. आतां आपल्या संकल्पभूत व मनामध्यें व्यवस्थित असलेल्या अग्निदेवतेस प्रार्थितो. 'ॐ क्रतो-' ॐ असा व

'क्रतो' असा हे दोन्ही शब्द संबोधनार्थच आहेत. (जो रक्षितो तो ओं–ईश्वर–सर्वांचा रक्षक. त्याचें जाठराग्नीच्या प्रतीकत्वानें–जाठराग्नीला शालग्रामादिकांप्रमाणें त्याचें प्रतीक करून ध्यान केलेलें असल्यामुळें ईश्वराचा अग्निशब्दानें निर्देश केला आहे, अशा आशयानें सांगतात–) अग्नि ॐप्रतीकत्वामुळें ॐ व मनोमयत्वामुळें क्रतु; हे ॐ, हे क्रतो, 'स्मर' जें स्मर्तव्य असेल तें स्मर–आठव अन्तकालीं तुझ्या स्मरणाच्या बळानें इष्ट गति प्राप्त होते म्हणून येथें प्रार्थना केली जात आहे. 'कृतं स्मर' जें मीं केलें आहे तें स्मर–आठव. 'क्रतो स्मर कृतं स्मर' ही पुनरुक्ति आदरार्थ आहे.

किंच हेऽग्ने नय प्रापय सुपथा शोभनेन मार्गेण राये धनाय कर्मफलप्राप्तय इत्यर्थः। न दक्षिणेन कृष्णेन पुनरावृत्तियुक्तेन किं तर्हि शुक्लेनैव सुपथाऽस्मान्विश्वानि सर्वाणि हे देव वयुनानि प्रज्ञानानि सर्वप्राणिनां विद्वान्॥

भाष्यार्थ— दुसऱ्या प्रार्थनेचा हिष्याशीं समुच्चय करितात–) तसेंच 'अग्ने' हे अग्ने, 'नय' ने, पोंचीव; 'सुपथा' शोभन मार्गानें 'राये' धनाला–कर्मफलप्राप्त्यर्थ, असा भावार्थ. पुनरावृत्तियुक्त दक्षिण–कृष्ण मार्गानें नको, तर काय? शुक्लच सुमार्गानें 'अस्मान्' आम्हांला कर्मफलप्राप्त्यर्थ ने. 'विश्वानि' सर्व हे 'देव' 'वयुनानि' सर्व प्राण्यांचीं प्रज्ञानें जाणणाऱ्या हे देवा, आम्हांला सुमार्गानें ने. येथील 'प्रज्ञानानि' हा शब्द कर्म व उपासना यांच्या उपलक्षणार्थ आहे.)

किंच युयोध्यपनय वियोजयास्मदस्मत्तो जुहुराणं कुटिलमेनः पापं पापजातं सर्वम्। तेन पापेन वियुक्ता वयमेष्याम उत्तरेण पथा त्वत्प्रसादात्। किंतु वयं तुभ्यं परिचर्यां कर्तुं न शक्नुमो भूयिष्ठां बहुतमां ते तुभ्यं नमउक्तिं नमस्कारवचनं विधेम नमस्कारेण त्वा परिचरेमेत्यर्थः। अन्यत्कर्तुमशक्ताः सन्त इति॥ १॥ इति बृहदारण्यकोपनिषद्भाष्ये पञ्चमाध्यायस्य पञ्चदशं ब्राह्मणम्॥ १५॥ इति श्रीगोविन्द-

भगवत्पूज्यपादशिष्यस्य परमहंसपरिव्राजकाचार्यस्य श्रीशंकरभगवतः कृतौ बृहदारण्यकोपनिषद्भाष्ये पञ्चमोऽध्यायः ॥ ५ ॥

भाष्यार्थ--शिवाय, ' युयोधि-' दूर कर, वियुक्त कर ' अस्मत्-' आम्हांपासून ' जुहुराणं-' कुटिल, ' एनः-' पाप—सर्व पापजात ( सर्व कुटिल पाप आम्हांपासून दूर—वियुक्त कर. ) त्या पापाशीं वियुक्त झालेले आम्ही तुझ्या प्रसादानें उत्तर मार्गानें जाऊं.पण आम्ही तुझी परिचर्या करण्यास समर्थ नाहीं. यास्तव ' भूयिष्ठां ते नमउक्तिं विधेम-' आम्ही तुला बहुतम—पुष्कळच नमस्कारवचन करतों. नमस्कारोक्तीनें परिचर्या करतों, असा भावार्थ. यावेळीं दुसरें करण्यास असमर्थ होत्साते पुष्कळ नमस्कारोक्तीनें आम्ही तुझी सेवा करतों. ( भाष्यांतील शेवटचा ' इति ' शब्द अध्यायसमाप्त्यर्थ आहे. ) १.

इति श्रीबृहदारण्यकभाष्यार्थाच्या पांचव्या अध्यायाचें पंधरावें ब्राह्मण समाप्त.

बृहदारण्यकोपनिषदाचा पांचवा व बृहदारण्यकाचा सातवा अध्याय समाप्त झाला.

# बृहदारण्यकोपनिषद्भाष्यार्थ.

[ मूळ, अर्थ, व भाष्य यांसह ]

## अध्याय ६ वा

ॐ तत्सद्ब्रह्मणे नमः ।

ॐ प्राणो गायत्रीत्युक्तम् । कस्मात्पुनः कारणात्प्राणभावो गायत्र्या न पुनर्वागादिभाव इति । यस्माज्ज्येष्ठश्च श्रेष्ठश्च प्राणो न वागादयो ज्यैष्ठ्यश्रैष्ठ्यभाजः । कथं ज्येष्ठत्वं श्रेष्ठत्वं च प्राणस्येति तन्निर्दिधारयिषयेदमारभ्यते ॥

भाष्यार्थ—( ॐकार, दमादित्रय, ब्रह्माब्रह्म-उपासनें, त्यांचें फळ, त्या फलासाठीं गति, व आदित्यादि-उपस्थान हा अर्थ सातव्या-गेल्या पांचव्या अध्यायांत झाला. आतां मुख्यतः अब्रह्मोपासन व फलासह श्रीमन्थादिकर्म सांगावें, म्हणून या पुढील अध्यायास आरंभ करणारे आचार्य ब्राह्मणसंगति सांगतात )ॐ प्राण गायत्री आहे, असें सांगितलें.गायत्रीला प्राणभाव कोणत्या बरें कारणानें आहे व वागादिभाव कां नाहीं ? ज्याअर्थीं प्राण ज्येष्ठ व श्रेष्ठ आहे वागादिक ज्येष्ठत्व व श्रेष्ठत्व यांस पात्र नाहींत त्याअर्थीं प्राण गायत्री आहे,हें योग्यच सांगितलें आहे. पण प्राणाला ज्येष्ठत्व व श्रेष्ठत्व कसें, असें कोणी विचारील म्हणून त्याचा निर्धार करण्याच्या इच्छेनें हें ब्राह्मण आरंभिलें जातें.

अथवोक्थयजुःसामक्षत्रादिभावैः प्राणस्यैवोपासनमभिहितं सत्स्वप्यन्येषु चक्षुरादिषु । तत्र हेतुमात्रमिहाऽऽनन्तर्येण संबध्यते । न पुनः

पूर्वशेषता । विवक्षितं तु खिलत्वादस्य काण्डस्य पूर्वत्र यदनुक्तं विशिष्टफलं प्राणविषयमुपासनं तद्वक्तव्यमिति ॥

भाष्यार्थ –( दुसऱ्याप्रकारें पूर्वोत्तर ग्रंथाची संगति सांगतात–) अथवा उक्थ, यजुः, साम, क्षत्र इत्यादि भावांनीं, चक्षुरादि अन्य करणें असतांनाही प्राणाचेंच उपासन सांगितलें. विशिष्ट गुणयुक्त प्राणालाच जें उपास्यत्व सांगितलें आहे त्याचा केवल ज्येष्ठत्वादि हेतु येथें सांगितला जात आहे. याप्रमाणें पूर्वग्रंथाला हेतुमत्त्व व या उत्तर ग्रंथाला हेतुत्व असल्यामुळें, हा पुढील ग्रंथ पूर्वग्रंथाशीं आनन्तर्यानें संबद्ध होतो. पुढील प्राणोपासना पूर्वोक्त उक्थादि उपासनांचा शेष नाहीं. ( कारण त्याचे गुणही भिन्न आहेत व फलही भिन्न आहे पण येथें स्वतंत्र प्राणोपासन कां सांगितलें आहे ? तें सांगतात–) पण या कांडाला खिलत्व असल्यामुळें पूर्वीच्या उपासनेंत जें सांगितलेलें नाहीं तें विशिष्ट फल देणारें प्राणविषयक उपासन येथें विवक्षित आहे तें सांगावें, म्हणून या ब्राह्मणाचा आरंभ केला जात आहे.

ॐ यो ह वै ज्येष्ठं च श्रेष्ठं च वेद ज्येष्ठश्च श्रेष्ठश्च स्वानां भवति प्राणो वै ज्येष्ठश्च श्रेष्ठश्च ज्येष्ठश्च श्रेष्ठश्च स्वानां भवत्यपि च येषां बुभूषति य एवं वेद ॥ १ ॥

अर्थ –जो कोणी ज्येष्ठ व श्रेष्ठ जाणतो तो स्वकीयांमध्यें ज्येष्ठ व श्रेष्ठ होतो. प्राणच ज्येष्ठ व श्रेष्ठ आहे. जो अशी उपासना करतो तो स्वजातीयांमध्यें ज्येष्ठ व श्रेष्ठ होतो. तसाच तो दुसऱ्याही ज्यांमध्यें ज्येष्ठ व श्रेष्ठ होण्याची इच्छा करतो त्यांतही ज्येष्ठ व श्रेष्ठ होतो १.

यः कश्चिद्ध वा इत्यवधारणार्थौ । यो ज्येष्ठश्रेष्ठगुणं वक्ष्यमाणं यो वेदासौ भवत्येव ज्येष्ठश्च श्रेष्ठश्च । एवं फलेन प्रलोभितः सन्प्रश्नायाभिमुखीभूतस्तस्मै चाऽऽह । प्राणो वै ज्येष्ठश्च श्रेष्ठश्च । कथं पुनरवगम्यते प्राणो ज्येष्ठश्च श्रेष्ठश्चेति । यस्मान्निषेककाल एव शुक्रशोणितसंबन्धः प्राणादिकलापस्याविशिष्टः । तथाऽपि नाप्राणं शुक्रं विरोहतीति

प्रथमो वृत्तिलाभः प्राणस्य चक्षुरादिभ्यः । अतो ज्येष्ठो वयसा प्राणः । निषेककालादारभ्य गर्भं पुष्यति प्राणः । प्राणे हि लब्धवृत्तौ पश्चाच्चक्षुरादीनां वृत्तिलाभः । अतो युक्तं प्राणस्य ज्येष्ठत्वं चक्षुरादिषु ॥

भाष्यार्थ—'यो ह-' जो कोणी 'ह वै' हे दोन अवधारणार्थ निपात आहेत. जो 'ज्येष्ठं च श्रेष्ठं च,-' पुढें सांगितल्या जाणाऱ्या ज्येष्ठ-श्रेष्ठ-गुणयुक्त प्राणाला जाणतो तो ज्येष्ठ व श्रेष्ठ होतोच. याप्रमाणें फलानें प्रलोभित होत्साता 'तो ज्येष्ठ व श्रेष्ठ कोण?' असा प्रश्न करण्यास साधक उद्युक्त झालेला आहे, यास्तव श्रुति म्हणते—'प्राणो वै ज्येष्ठश्च श्रेष्ठश्च' प्राणच ज्येष्ठ व श्रेष्ठ आहे. प्राणच ज्येष्ठ व श्रेष्ठ आहे, हें कसें अवगत होतें? कारण निषेककालीन होणारा शुक्र व शोणित यांचा संबंध प्राणादिसमूहाला समान आहे. (त्यामुळें प्राणादि सर्वांचेंच ज्येष्ठत्व समान आहे.) पण शुक्र शोणितसंबंध जरी समान असला तरी प्राणावाचून शुक्राची वाढ होत नाहीं. यास्तव चक्षुरादि इतर गौण प्राणांहून प्रथम प्राणाचाच वृत्तिलाभ होतो म्हणून प्राण वयानें ज्येष्ठ आहे. निषेककालापासून प्राण गर्भाचें पोषण करतो. प्राणाला त्याची वृत्ति प्राप्त झाली म्हणजे मग चक्षुरादिकांना वृत्तिलाभ होतो. यास्तव चक्षुरादिकांमध्यें प्राणाला ज्येष्ठत्व युक्तच आहे.

भवति तु कश्चित्कुले ज्येष्ठो गुणहीनत्वात्तु न श्रेष्ठः । मध्यमः कनिष्ठो वा गुणाढ्यत्वाद्भवेच्छ्रेष्ठो न ज्येष्ठः । न तु तथेहेत्याह प्राण एव तु ज्येष्ठश्च श्रेष्ठश्च । कथं पुनः श्रैष्ठ्यमवगम्यते प्राणस्य तदिह संवादेन दर्शयिष्यामः ॥

भाष्यार्थ—कुलामध्यें कोणी ज्येष्ठ होतो, पण गुणहीनत्वामुळें तो श्रेष्ठ होऊं शकत नाहीं. तसेंच, मध्यम किंवा कनिष्ठ गुणाढ्यतेमुळें-गुण संपन्न असल्यामुळें श्रेष्ठ होतो पण ज्येष्ठ नसतो. पण येथें-या प्राणामध्यें तसें नाहीं. तर 'प्राण एव ज्येष्ठश्च श्रेष्ठश्च' प्राणच ज्येष्ठ व श्रेष्ठ आहे. प्राणाचें श्रेष्ठत्व कसें अवगत होतें तें येथें संवादाच्या योगानें आम्ही दाखवूं.

सर्वथाऽपि तु प्राणं ज्येष्ठश्रेष्ठगुणं यो वेदोपास्ते स स्वानां ज्ञातीनां ज्येष्ठश्च श्रेष्ठश्च भवति। ज्येष्ठश्रेष्ठगुणोपासनसामर्थ्यात्स्वव्यतिरेकेणापि च येषां मध्ये ज्येष्ठश्च श्रेष्ठश्च भविष्यामीति बुभूषति भवितुमिच्छति तेषामपि ज्येष्ठश्रेष्ठप्राणदर्शी ज्येष्ठश्च श्रेष्ठश्च भवति। ननु वयोनिमित्तं ज्येष्ठत्वं तदिच्छातः कथं भवतीत्युच्यते। नैष दोषः। प्राणवद्वृत्तिलाभस्यैव ज्येष्ठत्वस्य विवक्षितत्वात् ॥ १ ॥

भाष्यार्थ—'ज्येष्ठश्च श्रेष्ठश्च०-' आरोप केल्यानें अथवा तो न केल्यानेंही [ म्ह० प्राणामध्यें ज्येष्ठत्व व श्रेष्ठत्व आरोपित असलें अथवा तें आरोपित नसून स्वाभाविक असलें तरी] जो ज्येष्ठ-श्रेष्ठगुण प्राणाची उपासना करतो तो 'स्वानां-' आपल्या ज्ञातीच्या लोकांमध्यें ज्येष्ठ व श्रेष्ठ होतो. ज्येष्ठ-श्रेष्ठगुणोपासनेच्या सामर्थ्यानें आपल्या ज्ञातीला सोडून ज्या इतर लोकांमध्येंही 'मी ज्येष्ठ व श्रेष्ठ होईन' अशी तो ज्येष्ठ-श्रेष्ठ होण्याची इच्छा करतो त्या लोकांमध्येंही तो ज्येष्ठ-श्रेष्ठप्राणदर्शी ज्येष्ठ व श्रेष्ठ होतो. 'अहो पण ज्येष्ठत्व वयाच्या निमित्तानें प्राप्त होतें. तेव्हां तें नुसत्या इच्छेनें कसें होणार?' म्हणून कोणी विचारील तर त्याचें उत्तर सांगितलें जातें—हा दोष येत नाहीं. कारण प्राणाप्रमाणें वृत्तिलाभाच्याच ज्येष्ठत्वाची येथें विवक्षा आहे. (ज्याप्रमाणें प्राणाच्या अन्नभक्षणादिकांमुळें चक्षुरादिकांच्या वृत्तीचा लाभ होतो त्याप्रमाणें त्याच्या जातीच्या व इतर लोकांचें जीवन प्राणोपासकाच्या अधीन होतें. त्यामुळें प्राणोपासकाचें ज्येष्ठत्व वय या निमित्तामुळें नाहीं, असा भावार्थ) १.

> यो ह वै वसिष्ठां वेद वसिष्ठः स्वानां भवति वाग्वै वसिष्ठा वसिष्ठः स्वानां भवत्यपि च येषां बुभूषति य एवं वेद ॥ २ ॥

अर्थ—जो वसिष्ठेला जाणतो तो स्वजातीमध्यें वसिष्ठ होतो. वाक्हीच वसिष्ठा आहे. जो अशी उपासना करतो तो स्वजातीयांमध्यें वसिष्ठ होतो. त्याचप्रमाणें ज्यांच्यामध्यें वसिष्ठ होण्याची इच्छा करतो त्यांमध्येंही वसिष्ठ होतो. २.

यो ह वै वसिष्ठां वेद वसिष्ठः स्वानां भवति । तद्दर्शनानुरूप्येण फलम् । येषां च ज्ञातिव्यतिरेकेण वसिष्ठो भवितुमिच्छति तेषां च वसिष्ठो भवति । उच्यतां तर्हि काऽसौ वसिष्ठेति । वाग्वै वसिष्ठा । वासयत्यतिशयेन वस्ते वेति वसिष्ठा । वाग्मिनो हि धनवन्तो वसन्त्यतिशयेन । आच्छादनार्थस्य वा वसेर्वसिष्ठा । अभिभवन्ति हि वाचा वाग्मिनोऽन्यान् । तेन वसिष्ठगुणवत्परिज्ञानाद्वसिष्ठगुणो भवतीति दर्शनानुरूपं फलम् ॥ २ ॥

भाष्यार्थ—'यो ह वै०' जो वसिष्ठेला जाणतो तो स्वकीयांमध्यें वसिष्ठ होतो. त्याच्या दर्शनानुरूपच फळ मिळतें. ज्ञातीला सोडून बाकीच्या ज्या लोकांमध्यें तो वसिष्ठ होण्याची इच्छा करतो त्यांचाही वसिष्ठ होतो. तर मग ती वसिष्ठा कोण तें सांगा. (असें कोणी म्हणेल म्हणून श्रुति सांगते–) 'वाक् वै वसिष्ठा-' वाक्च वसिष्ठा आहे. अतिशयेंकरून म्ह० आधिक्यानें वसविते म्हणून किंवा आच्छादित करते म्हणून वसिष्ठा. कारण प्रशस्त वक्ते धनवान् होऊन अतिशयानें राहतात. किंवा आच्छादन हा ज्याचा अर्थ आहे अशा 'वस्–आच्छादने-' या धातूचें वसिष्ठा हें रूप आहे. वक्ते इतरांना आपल्या वाणीनें पराभूत करितात–झांकून टाकतात. यास्तव वसिष्ठगुणयुक्त पदार्थाच्या परिज्ञानामुळें उपासक वसिष्ठगुणयुक्त होतो, हें दर्शनानुरूप फळ आहे. २.

यो ह वै प्रतिष्ठां वेद प्रतितिष्ठति समे प्रतितिष्ठति दुर्गे चक्षुर्वै प्रतिष्ठा चक्षुषा हि समे च दुर्गे च प्रतितिष्ठति प्रतितिष्ठति समे प्रतितिष्ठति दुर्गे य एवं वेद ॥ ३ ॥

अर्थ—जो प्रतिष्ठेला जाणतो तो सम देश व काल यांत प्रतिष्ठित होतो. तसाच दुर्गम काल व देश यांतही प्रतिष्ठित होतो. चक्षु हीच प्रतिष्ठा आहे. चक्षूनेंच सम व दुर्गम यांत प्रतिष्ठित होतो. जो अशी उपासना करतो तो समामध्यें प्रतिष्ठित होतो व दुर्गामध्यें प्रतिष्ठित होतो. ३.

यो ह वै प्रतिष्ठां वेद प्रतितिष्ठत्यनयेति प्रतिष्ठा तां प्रतिष्ठां प्रतिष्ठागुणवतीं यो वेद तस्यैतत्फलं प्रतितिष्ठति समे देशे काले च। तथा दुर्गे विषमे च दुर्गमने च देशे दुर्भिक्षादौ वा काले विषमे। यद्येवमुच्यतां काऽसौ प्रतिष्ठा। चक्षुर्वै प्रतिष्ठा। कथं चक्षुषः प्रतिष्ठात्वमित्याह। चक्षुषा हि समे च दुर्गे च दृष्ट्वा प्रतितिष्ठति। अतोऽनुरूपं फलं प्रतितिष्ठति समे प्रतितिष्ठति दुर्गे य एवं वेदेति ॥ ३ ॥

भाष्यार्थ—'यो ह वै प्रतिष्ठां वेद' जो प्रतिष्ठेला जाणतो, जिच्या योगानें साधक प्रतिष्ठित होतो ती प्रतिष्ठा. त्या प्रतिष्ठेला-प्रतिष्ठा गुणवतीला जो जाणतो त्याचें हें फल—'समे' तो सम देश व काल यांत प्रतिष्ठित होतो. त्याचप्रमाणें 'दुर्गे' विषम-दुर्गम देश व दुर्भिक्षादि विषम काळ यांमध्यें प्रतिष्ठित होतो. असें जर आहे तर ती प्रतिष्ठा कोणती तें सांगावें. 'चक्षुर्वै प्रतिष्ठा-' चक्षु हीच प्रतिष्ठा आहे चक्षूचा प्रतिष्ठात्व कसें? तर श्रुति सांगते—'चक्षुषा हि०' कारण प्राणी चक्षूनेंच सम व विषम प्रदेशीं पाहून प्रतिष्ठित होतो. यास्तव अनुरूप फळ सांगतात—जो असें जाणतो तो समामध्यें प्रतिष्ठित होतो व विषमामध्यें प्रतिष्ठित होतो. ३.

यो ह वै संपदं वेद सꣳहास्मै पद्यते यं कामं कामयते श्रोत्रं वै संपच्छ्रोत्रे हीमे सर्वे वेदा अभिसंपन्नाः सꣳहास्मै पद्यते यं कामं कामयते य एवं वेद ॥ ४ ॥

अर्थ—जो संपद् ला जाणतो, संपद्गुणयुक्त जो उपासना करतो, तो ज्या कामाची इच्छा करतो त्यास संपन्न–प्राप्त होतो. श्रोत्र हीच संपद् आहे. श्रोत्रांतच हे सर्व वेद अभिसंपन्न आहेत. जो अशी उपासना करतो तो ज्या कामाची कामना करतो तो त्यास प्राप्त होतो. ४.

यो ह वै संपदं वेद संपद्गुणयुक्तं यो वेद तस्यैतत्फलमस्मै विदुषे संपद्यते ह। किम्। यं कामं कामयते स कामः। किं पुनः संपद्गुणकम्। श्रोत्रं वै संपत्। कथं पुनः श्रोत्रस्य संपद्गुणत्वमिति। उच्यते। श्रोत्रे सति हि यस्मात्सर्वे वेदा अभिसंपन्नाः श्रोत्रेन्द्रियवत्ताऽध्येयत्वात्।

वेदविहितकर्मायत्ताश्च कामास्तस्माच्छ्रोत्रं संपत्। अतो विज्ञानानुरूपं फलम्। सं हास्मै पद्यते यं कामं कामयते य एवं वेद ॥ ४ ॥

भाष्यार्थ—' यो ह०.' जो संपद्-ला–संपद्गुणयुक्त श्रोत्राला जाणते त्याचें हें फळ–' अस्मै.' या विद्वानाला ' संपद्यते ह-' प्राप्त होतें. काय? ' यं कामं०-' तो ज्या कामाची कामना करतो तो काम प्राप्त होतो. पण तें संपद्गुणविशिष्ट काय आहे. ? ' श्रोत्रं०-' श्रोत्र हेंच संपद् आहे. श्रोत्राला संपद्गुणत्व कसें ? म्हणून विचाराल तर श्रुतीकडून सांगितलें जातें–' श्रोत्रे हि०-' श्रोत्र असलें तर ज्याअर्थीं सर्व वेद अभिसंपन्न होतात. कारण श्रोत्रेंद्रियानें जो युक्त असतो तोच अध्ययन करण्यास योग्य असतो; आणि सर्व काम वेदविहित कर्मांच्या अधीन असतात. म्हणून श्रोत्र हीच संपद् आहे. त्यामुळें विज्ञानानुरूप--उपासना--भावना जशी असेल तसें फल श्रुति सांगते–जो अशी उपासना करतो तो ज्या कामाची कामना करतो त्यास संप्राप्त होतो. ४.

यो ह वा आयतनं वेदाऽऽयतनꣳ स्वानां भवत्यायतनं जनानां मनो वा आयतनमायतनꣳ स्वानां भवत्यायतनं जानानां य एवं वेद ॥५॥

अर्थ—जो आयतनाला जाणतो तो स्वकीयांचें आयतन होतो. व इतर जनांचेंही आयतन होतो. मन हेंच आयतन आहे. जो अशी उपासना करतो तो आपल्या ज्ञातींचें व इतर जनांचें आयतन होतो ५.

यो ह वा आयतनं वेद । आयतनमाश्रयस्तद्यो वेदाऽऽयतनं स्वानां भवत्यायतनं जनानामन्येषामपि । किं पुनस्तदायतनमिति । उच्यते । मनो वा आयतनमाश्रय इन्द्रियाणां विषयाणां च । मनआश्रिता हि विषया आत्मनो भोग्यत्वं प्रतिपद्यन्ते । मनःसंकल्पवशानि चेन्द्रियाणि प्रवर्तन्ते निवर्तन्ते च । अतो मन आयतनमिन्द्रियाणाम् । अतो दर्शनानुरूप्येण फलमायतनं स्वानां भवत्यायतनं जनानां य एवं वेद ॥५॥

भाष्यार्थ—'यो ह वा आयतनं वेद०-' जो आयतन जाणतो. आयतन म्ह० आश्रय, तें जो जाणतो तो आपल्या ज्ञातीच्या लोकांचें आय-

तन होतो व अन्य जनांचेंही आयतन होतो. 'तें आयतन काय आहे?' तर श्रुतीकडून सांगितलें जातें. 'मनो वा आयतनं०-' मन आयतन-आश्रय आहे. ( कोणाचें आयतन ? ) इंद्रियांचें व विषयांचें. मनाचा आश्रय केलेलेच विषय आत्म्याच्या भोग्यत्वास प्राप्त होतात. मनःसंकल्पाधीन असणारीं इंद्रियें मनःसंकल्पवशात् प्रवृत्त व निवृत्त होतात. यास्तव मन इंद्रियांचें आयतन आहे. यास्तव भावनेच्या आनुरूप्यानेंच फल मिळतें-जो असें जाणतो,अशी उपासना करतो तो स्वजातीयांचें व इतर जनांचें आयतन होतो. ५.

यो ह वै प्रजातिं वेद प्रजायते ह प्रजया पशुभी रेतो वै प्रजातिः
प्रजायते ह प्रजया पशुभिर्य एवं वेद ॥ ६ ॥

अर्थ—जो प्रजातीला जाणतो तो प्रजेनें प्रजात होतो व पशूंनीं संपन्न होतो. रेतच प्रजाति आहे. जो असें जाणतो तो प्रजा व पशु यांनीं संपन्न होतो. ६.

यो ह वै प्रजातिं वेद प्रजायते ह प्रजया पशुभिश्च संपन्नो भवति । रेतो वै प्रजातिः । रेतसा प्रजननेन्द्रियमुपलक्ष्यते । तद्विज्ञानानुरूपं फलं प्रजायते ह प्रजया पशुभिर्य एवं वेद ॥ ६ ॥

भाष्यार्थ—' यो ह०-' जो प्रजातीला जाणतो तो प्रजारूपानें उत्पन्न होतो व पशूंनीं संपन्न होतो. 'रेतो०-' रेतच प्रजाति आहे. येथें ' रेत ' या शब्दानें जननेंद्रिय उपलक्षित होतें. त्याच्या विज्ञानानुरूप फल—जो अशी उपासना करतो तो प्रजा व पशु यांनीं संपन्न होतो ६.

ते हेमे प्राणा अह॑ श्रेयसे विवदमाना ब्रह्म जग्मुस्तद्धोचुः को नो
वसिष्ठ इति तद्धोवाच यस्मिन्व उत्क्रान्त इद॑ शरीरं पापीयो मन्यते स
वो वसिष्ठ इति ॥ ७ ॥

अर्थ—ते हे वागादिक सर्व प्राण ' मी श्रेष्ठ ' हें ठरविण्यासाठीं विवाद करणारे असे होत्साते ब्रह्माकडे-प्रजापतीकडे गेले; व त्याला म्हणाले " आम्हांमध्यें वसिष्ठ कोण ? " ब्रह्म म्हणालें-" तुम्हांपैकीं जो हें शरीर सोडून गेला असतां हें शरीर पहिल्यापेक्षां अधिक पापी होतें, असें जनसमूह मानतो तो तुम्हांमध्यें वसिष्ठ." ७.

ते हेमे प्राणा वागादयोऽहंश्रेयसेऽहं श्रेयानित्येतस्मै प्रयोजनाय विवदमाना विरुद्धं वदमाना ब्रह्म जग्मुर्ब्रह्म गतवन्तो ब्रह्मशब्दवाच्यं प्रजापतिं गत्वा च तद्ब्रह्म होचुरुक्तवन्तः । को नोऽस्माकं मध्ये वसिष्ठः कोऽस्माकं मध्ये वसति च वासयति च । तद्ब्रह्म तैः पृष्टं सद्धोवाचोक्तवद्यस्मिन्वो युष्माकं मध्ये उत्क्रान्ते निर्गते शरीरादिदं शरीरं पूर्वस्मादतिशयेन पापीयः पापतरं मन्यते लोकः । शरीरं हि नामानेकाशुचिसंघातत्वाज्जीवतोऽपि पापमेव ततोऽपि कष्टतरं यस्मिन्नुत्क्रान्ते भवति । वैराग्यार्थमिदमुच्यते पापीय इति । स वो युष्माकं मध्ये वसिष्ठो भविष्यति । जानन्नपि वसिष्ठं प्रजापतिर्नोवाचायं वसिष्ठ इतीतरेषामप्रियपरिहाराय ॥ ७ ॥

भाष्यार्थ—' ते हेमे०-' हे ते वागादिक प्राण ' अहं श्रेयसे-' मी श्रेष्ठ या प्रयोजनासाठीं ' विवदमानाः ' विरुद्ध बोलणारे ' ब्रह्म जग्मुः-' ब्रह्माकडे—ब्रह्मशब्दवाच्य प्रजापतीकडे गेले; आणि जाऊन ' तद्धोचुः-' त्या ब्रह्माला म्हणाले—' को नो वसिष्ठ इति-' आम्हांमध्यें वसिष्ठ कोण ? आम्हांतील जो राहतो व जो इतरांस रहावयास लावतो तो कोण ? ' तद्धोवाच-' तें ब्रह्म त्यांच्याकडून विचारलेलें असें होत्सातें त्यांस म्हणालें ' यस्मिन्व उत्क्रान्ते०-' तुम्हांपैकीं जो शरीरांतून निघून गेला असतां हें शरीर पूर्वीपेक्षां अतिशय पापी आहे असें लोक मानतो, कारण शरीर हा अनेक अशुचि पदार्थांचा समुदाय असल्यामुळें जिवंत पुरुषाचें शरीरही पापच आहे, पण जो शरीराला सोडून गेला असतां तें त्याहूनही कष्टतर—अधिक पाप होतें, 'पापीयः ' हें वैराग्यार्थ सांगितलें आहे [म्ह० शरीराविषयीं वैराग्य उत्पन्न करून त्याच्या द्वारा शरीरावरील अहंममाभिमान घालविण्यासाठीं त्याला ' अतिशय पापी ' असें म्हटलें आहे. असा भावार्थ. ] तो तुम्हांमध्यें वसिष्ठ होईल असें ब्रह्मा म्हणाला. (अहो पण सर्वज्ञ प्रजापतीनें साक्षात् मुख्य प्राणच वसिष्ठ आहे, असें कां सांगितलें नाहीं ? तें सांगतात-) प्रजापति त्यांतील वसिष्ठ कोण तें जाणत

होता तरी इतरांना अप्रिय वाटूं नये म्हणून—त्यांच्या अप्रीतीचा परिहार करण्यासाठीं ' हा प्राण वसिष्ठ आहे ' असें म्हणला नाहीं. ७

वाग्घोच्चक्राम सा संवत्सरं प्रोष्याऽऽगत्योवाच कथमशकत मदृते जीवितुमिति ते होचुर्यथा कला अवदन्तो वाचा प्राणन्तः प्राणेन पश्यन्तश्चक्षुषा शृण्वन्तः श्रोत्रेण विद्वाꣳसो मनसा प्रजायमाना रेतसै-वमजीविष्मेति प्रविवेश ह वाक् ॥ ८ ॥

अर्थ—प्रथम वाक् शरीर सोडून गेली व ती एक वर्षभर बाहेर राहून परत आली आणि म्हणाली, " तुम्ही मजवाचून जिवंत राहण्यास कसे समर्थ झालां ?" तेव्हां ते इतर प्राण म्हणाले—"जसे मुके वाणीनें न बोलणारे पण प्राणानें प्राणन क्रिया करीत, नेत्रानें पहात, श्रोत्रानें श्रवण करीत, मनानें जाणत व रेतानें उत्पन्न करीत जिवंत राहतात त्याप्रमाणें आम्ही जिवंत राहिलों. " तें ऐकून वाक् शरीरांत प्रविष्ट झाली ८.

त एवमुक्ता ब्रह्मणा प्राणा आत्मनो वीर्यपरीक्षणाय क्रमेणोच्चक्रमुः। तत्र वागेव प्रथमं ह्यस्माच्छरीरादुच्चक्रामोत्क्रान्तवती । सा चोत्क्रम्य संवत्सरं प्रोष्य प्रोषिता भूत्वा पुनरागत्योवाच । कथमशकत शक्तवन्तो यूयं मदृते मां विना जीवितुमिति । त एवमुक्ता ऊचुर्यथा लोके कला मूका अवदन्तो वाचा प्राणन्तः प्राणनव्यापारं कुर्वन्तः प्राणेन पश्यन्तो दर्शनव्यापारं चक्षुषा कुर्वन्तस्तथा शृण्वन्तः श्रोत्रेण विद्वांसो मनसा कार्याकार्यादिविषयं प्रजायमाना रेतसा पुत्रानुत्पादयन्त एवमजीविष्म वयमित्येवं प्राणैर्दत्तोत्तरा वागात्मनोऽस्मिन्नवसिष्ठत्वं बुद्ध्वा प्रविवेश ह वाक् ॥ ८ ॥

भाष्यार्थ—ब्रह्मदेवाकडून असें सांगितले गेलेले ते प्राण आपल्या वीर्याचें परीक्षण करण्यासाठीं क्रमानें शरीर सोडून गेले. त्यांतील 'वाग्घोच्चक्राम-' वाक्-च प्रथम या शरीरांतून निघून गेली. ' सा संवत्सरं०-' ती शरीरांतून निघून व एक वर्षभर बाहेर राहून पुनः येऊन म्हणाली ' कथमशकत०-' तुम्ही मजवाचून जिवंत राहण्यास कसें शकलां ? ' ते

होचुः०-' ते याप्रमाणें बोलले गेलेले इतर प्राण म्हणाले—ज्याप्रमाणें व्यवहारांत मुके त्याप्रमाणें वाणीनें—वागिंद्रियानें न बोलणारे असे ह्म० वाणीनें बोलत मात्र नव्हतों. पण 'प्राणन्तः०-' प्राणानें प्राणनक्रिया करणारे, चक्षूनें दर्शनक्रिया करणारे, त्याचप्रमाणें श्रोत्रेंद्रियानें श्रवण करणारे, मनानें कार्याकार्यादि विषयास जाणणारे, व रेतानें पुत्रांस उत्पन्न करणारे असे आम्ही जिवंत राहिलों. याप्रमाणें चक्षुरादि इतर प्राणांनीं जिला उत्तर दिलें आहे, अशी वाक् आपल्याला या शरीरांत वसिष्ठत्व नाहीं, असें जाणून शरीरांत प्रवेश करिती झाली ८.

> चक्षुर्होच्चक्राम तत्संवत्सरं प्रोष्याऽऽगत्योवाच कथमशकत मदृते जीवितुमिति ते होचुर्यथाऽन्धा अपश्यन्तश्चक्षुषा प्राणन्तः प्राणेन वदन्तो वाचा शृण्वन्तः श्रोत्रेण विद्वाꣳसो मनसा प्रजायमाना रेतसैवमजीविष्मेति प्रविवेश ह चक्षुः ॥ ९ ॥

अर्थ—चक्षुरिंद्रिय उत्क्रान्त झालें. तें एक वर्ष बाहेर राहून व परत येऊन म्हणालें—"माझ्यावांचून तुम्ही जिवंत राहण्यास कसे समर्थ झालां ?" तेव्हां ते इतर प्राण म्हणाले—"जसे आंधळे चक्षूनें न पाहणारे, पण प्राणानें प्राणन क्रिया करणारे, वाक्-नें बोलणारे, श्रोत्रानें ऐकणारे, मनानें जाणणारे, व रेतानें प्रजोत्पत्ति करणारे असे जिवंत राहतात त्याप्रमाणें आम्ही जिवंत राहिलों." तें ऐकून चक्षु शरीरांत प्रविष्ट झालें ९.

> श्रोत्रꣳ होच्चक्राम तत्संवत्सरं प्रोष्याऽऽगत्योवाच कथमशकत मदृते जीवितुमिति ते होचुर्यथा बधिरा अशृण्वन्तः श्रोत्रेण प्राणन्तः प्राणेन वदन्तो वाचा पश्यन्तश्चक्षुषा विद्वाꣳसो मनसा प्रजायमाना रेतसैवमजीविष्मेति प्रविवेश ह श्रोत्रम् ॥ १० ॥

अर्थ—श्रोत्रेंद्रिय शरीर सोडून गेलें. तें एक संवत्सर प्रवास करून व परत येऊन म्हणालें, "मजवाचून तुम्ही जिवंत कसे राहूं शकलां?" ते प्राण म्हणाले, "जसे बहिरे श्रोत्रानें न ऐकणारे पण प्राणानें प्राणन क्रिया करणारे, वाक्-नें बोलणारे, चक्षूनें पाहणारे, मनानें जाण-

णारे व रेतानें प्रजोत्पत्ति करणारे असे जिवंत राहतात त्याप्रमाणें आम्ही जिवंत राहिलों." तें ऐकून श्रोत्र शरीरांत शिरलें १०.

मनो होच्चक्राम तत्संवत्सरं प्रोष्याऽऽगत्योवाच कथमशकत मदृते जीवितुमिति ते होचुर्यथा मुग्धा अविद्वाꣳसो मनसा प्राणन्तः प्राणेन वदन्तो वाचा पश्यन्तश्चक्षुषा शृण्वन्तः श्रोत्रेण प्रजायमाना रेतसैवमजीविष्मेति प्रविवेश ह मनः ॥ ११ ॥

अर्थ--मन उत्क्रमण करतें झालें. तें एक वर्षभर प्रवासांत राहून व परत येऊन म्हणालें-" तुम्ही मजवाचून जिवंत राहूं कसे शकलां ?" तेव्हां ते इतर प्राण म्हणाले-" जसे मुग्ध-मूढ-वेडे मनानें न जाणणारे पण प्राणानें प्राणनक्रिया करीत, वाक् नें बोलत, चक्षूनें पहात, श्रोत्रानें ऐकत, व रेतानें प्रजोत्पादन करीत जिवंत राहतात तसे आम्ही जिवंत राहिलों." तें ऐकून ( व आपण कांहीं श्रेष्ठ नव्हे असें समजून ) मन शरीरांत शिरलें. ११

रेतो होच्चक्राम तत्संवत्सरं प्रोष्याऽऽगत्योवाच कथमशकत मदृते जीवितुमिति ते होचुर्यथा क्लीबा अप्रजायमाना रेतसा प्राणन्तः प्राणेन वदन्तो वाचा पश्यन्तश्चक्षुषा शृण्वन्तः श्रोत्रेण विद्वाꣳसो मनसैवमजीविष्मेति प्रविवेश ह रेतः ॥ १२ ॥

अर्थ--रेत उत्क्रान्त झालें. तें वर्षभर प्रवास करून व परत येऊन म्हणालें " मजवाचून तुम्ही जिवंत कसे राहूं शकलां ?" तेव्हां इतर प्राण म्हणाले, " जसे नपुंसक रेतानें प्रजोत्पादन करीत नाहींत पण प्राणानें प्राणनक्रिया करीत, वाणीनें बोलत, चक्षूनें पहात, श्रोत्रानें ऐकत व मनानें जाणत राहतात त्याप्रमाणें आम्ही जिवंत राहिलों. " तें ऐकून रेत शरीरांत प्रविष्ट झालें १२.

तथा चक्षुर्होच्चक्रामेत्यादि पूर्ववत् । श्रोत्रं मनःप्रजातिरिति ॥९-१२॥

भाष्यार्थ--त्याचप्रमाणें चक्षु शरीर सोडून गेलें इत्यादि सर्व पूर्वीप्रमाणेंच समजावें. श्रोत्र, मन, प्रजाति, हीं क्रमानें उत्क्रमण करतीं झालीं ९-१२.

अथ ह प्राण उत्क्रमिष्यन्यथा महासुहयः सैन्धवः पड्वीशशङ्कून्संवृहेदे-

वश्‍ हैवेमान्प्राणान्संववर्ह ते होचुर्मा भगव उत्क्रमीर्न वै शक्ष्यामस्त्व-
दृते जीवितुमिति तस्यो मे बलिं कुरुतेति तथेति ॥ १३ ॥

अर्थ——नंतर प्राण उत्क्रमण करूं लागला. त्याबरोबर जसा मोठा लक्षणसंपन्न सिंधुदेशांतील घोडा पायबंधाच्या मेखांना एकदम उपटतो त्याप्रमाणें तो या सर्व प्राणांस आपापल्या स्थानापासून भ्रष्ट करता झाला. तेव्हां ते प्राण म्हणाले, "हे भगवन्, शरीराला सोडून जाऊं नकोस. तुजवाचून आम्ही जिवंत राहण्यास समर्थ नाहीं." प्राण ह्मणतो—"तर मग मला कर द्या?" ते प्राण ह्मणाले "बरें आहे" १३.

अथ ह प्राण उत्क्रमिष्यन्नुत्क्रमणं करिष्यंस्तदानीमेव स्वस्थानात्प्रचलिता वागादयः । किमिवेत्याह । यथा लोके महांश्चासौ सुहयश्च महासुहयः शोभनो हयो लक्षणोपेतो महान्परिमाणतः सिन्धुदेशे भवः सैन्धवोऽभिजनतः पड्वीशशङ्कून्पादबन्धनशङ्कून्पड्वीशाश्च ते शङ्कवश्च तान्संवृहेदुद्यच्छेद्युगपदुत्खनेदश्वारोह आरूढे परीक्षणाय । एवं हैवेमान्वागादीन्प्राणान्संववर्होद्यतवान्स्वस्थानाद्भ्रंशितवान् ॥

भाष्यार्थ——'अथ ह०-' नंतर प्राण उत्क्रमण करूं लागला. त्याबरोबरच वागादिक इतर प्राण आपल्या स्थानापासून अत्यंत चलित झाले. ते कोणाप्रमाणें तें श्रुति सांगते—'यथा महासुहयः-' ज्याप्रमाणें व्यवहारांत मोठा सुहय—चांगला लक्षणसंपन्न घोडा व परिमाणतः मोठा 'सैन्धवः-' सिंधुदेशांत झालेला—जातितः उत्तम असा अश्व 'पड्वीशशंकून्-' पायबंधांच्या मेखांना 'पड्वीशाश्च ते शंकवश्च' असा विग्रह, त्या शंकूंस 'संवृहेद्-' उपटतो—परीक्षणासाठीं स्वार वर आरूढ होतांचें एकदम उपटतो 'एवं हैवेमान्प्राणान्संववर्ह-' त्याप्रमाणेंच या वागादि प्राणांस वर उपटता झाला. आपल्या स्थानापासून भ्रष्ट करता झाला.

ते वागादयो होचुर्हे भगवो भगवन्मोत्क्रमीर्यस्मान्न वै शक्ष्यामस्त्वदृते त्वां विना जीवितुमिति । यद्येवं मम श्रेष्ठता विज्ञाता भवद्भिरहमत्र श्रेष्ठस्तस्य उ मे मम बलिं करं कुरुत प्रयच्छतेति ॥

भाष्यार्थ—'ते होचुः-' ते वागादिक म्हणाले 'भगव मा उत्क्रमीः-' हे भगवन्, शरीर सोडून जाऊं नकोस, कारण 'न वै०-' तुजवाचून आम्ही जिवंत राहूं शकत नाहीं. 'तस्य उ मे०-' जर याप्रमाणें माझी श्रेष्ठता तुम्हांला कळली आहे, तुम्हीं जाणली आहे, जर मी या शरीरांत श्रेष्ठ आहें तर मला बलि करा, मला कर द्या. ( असें प्राण म्हणाला. )

अयं च प्राणसंवादः कल्पितो विदुषः श्रेष्ठपरीक्षणप्रकारोपदेशः । अनेन हि प्रकारेण विद्वान्को नु खल्वत्र श्रेष्ठ इति परीक्षणं करोति । स एष परीक्षणप्रकारः संवादभूतः कथ्यते । न ह्यन्यथा संहत्यकारिणां सतामेषामञ्जसैव संवत्सरमात्रमेवैकैकस्य निर्गमनाद्युपपद्यते । तस्माद्विद्वानेवानेन प्रकारेण विचारयति वागादीनां प्रधानबुभुत्सुरुपासनाय बलिं प्रार्थिताः सन्तः प्राणास्तथेति प्रतिज्ञातवन्तः ॥ १३. ॥

भाष्यार्थ—हा प्राणांचा संवाद कल्पित आहे. या संवादानें विद्वानाच्या श्रेष्ठ-परीक्षणप्रकाराचा उपदेश केला आहे. कारण याच प्रकारानें विद्वान् 'यांत कोण बरें श्रेष्ठ आहे,' असें परीक्षण करतो. तोच हा परीक्षणाचा प्रकार संवादभूत असा सांगितला जातो. कारण या संवादानें उपास्याच्या परीक्षणाचा प्रकारच जर विवक्षित नसता तर सर्व मिळून देह-व्यवहाररूप कार्य करणाऱ्या अशा या वागादि प्राणांतील एकेकाचें एक वर्षभर साक्षात्च शरीरांतून बाहेर निघून जाणें उपपन्न होत नाहीं. तस्मात् वागादिकांतील प्रधान कोण हें जाणण्याची इच्छा करणारा विद्वान्च उपासनेसाठीं या प्रकारें विचार करतो. असो; येणेंप्रमाणें मुख्य प्राणाकडून कर मागितले गेलेले वागादि प्राण 'तथेति-' ठीक आहे, अशी प्रतिज्ञा करते झाले. १३.

सा ह वागुवाच यद्वा अहं वसिष्ठाऽस्मि त्वं तद्वसिष्ठोऽसीति यद्वा अहं प्रतिष्ठाऽस्मि त्वं तत्प्रतिष्ठोऽसीति चक्षुर्यद्वा अहꣳ संपदस्मि त्वं तत्संपदसीति श्रोत्रं यद्वा अहमायतनमास्मि त्वं तदायतनमसीति मनो यद्वा अहं प्रजातिरस्मि त्वं तत्प्रजातिरसीति रेतस्तस्यो मे किमन्नं किं वास इति यदिदं किंचाऽऽश्वभ्य आ कृमिभ्य आ कीटपतङ्गेभ्य,

स्तत्तेऽन्नमापो वास इति न ह वा अस्यानन्नं जग्धं भवति नानन्नं प्रतिगृहीतं य एवमेतदनस्यान्नं वेद तद्विद्वांसः श्रोत्रिया अशिष्यन्त आचामन्त्यशित्वाऽऽचामन्त्येतमेव तदनमनग्नं कुर्वन्तो मन्यन्ते ॥१४॥
इति बृहदारण्यकोपनिषदि षष्ठाध्यायस्य प्रथमं ब्राह्मणम् ॥ १ ॥

अर्थ—ती वाक् म्हणाली "जी मी वसिष्ठा आहें तो तूंच वसिष्ठ आहेस." "मी जी प्रतिष्ठा आहें ता तूंच प्रतिष्ठ आहेस," असें चक्षु म्हणाला. "मी जी संपद् आहें ती तूंच संपद् आहेस" असें श्रोत्र म्हणालें "मी जें आयतन आहें तें तूंच आयतन आहेस" असें मन म्हणालें. "मी जी प्रजाति आहें ती तूंच प्रजाति आहेस" असें रेत म्हणालें [ म्ह० आम्हांतील तो तो गुण तुझ्या निमित्तानें आहे. यास्तव आमचें वसिष्ठत्वादि सर्व माहात्म्य हाच बलि—कर आम्ही तुला देतों, असा भावार्थ.] त्यावर प्राण म्हणाला, "तर त्या माझें अन्न काय आहे व वस्त्र काय आहे ?" तेव्हां वागादि इतर प्राण म्हणाले, "कुत्र्यांपर्यंत, कृमींपर्यंत कीट-पतंगांपर्यंत जेवढें म्हणून अन्न आहे तें तुझें अन्न आहे. आप—जल—हें वस्त्र आहे. जो असें हें प्राणाचें अन्न जाणतो त्यानें अभक्ष्य भक्षण केलें आहे असें होत नाहीं व अप्रतिग्राह्याचा प्रतिग्रह केला आहे, असें होत नाहीं. म्हणून वेदाध्ययन केलेले ब्राह्मण भोजन करतांना आपोशन घेतात व भोजन करून आचमन करितात. याच प्राणाला आम्ही अनग्न करणारे आहों, असें मानतात.

सा ह वाक्प्रथमं बलिदानाय प्रवृत्ता ह किलोवाचोक्तवती यद्वा अहं वसिष्ठाऽस्मि यन्मम वसिष्ठत्वं तत्तवैव तेन वसिष्ठगुणेन त्वं तद्वसिष्ठोऽसीति । यद्वा अहं प्रतिष्ठाऽस्मि त्वं तत्प्रतिष्ठोऽसि या मम प्रतिष्ठा सा त्वमसीति चक्षुः । समानमन्यत् । संपदायतनप्रजातित्वगुणान्क्रमेण समर्पितवन्तः ॥

भाष्यार्थ—'स ह वाक्-' ती वाक्, प्रथम बलिदानाला प्रवृत्त झालेली ती वाक् 'ह' खरोखर 'उवाच-' बोलली. 'यद्वा अहं वसिष्ठास्मि त्वं०-' जी मी वसिष्ठा आहें, जें माझें वसिष्ठत्व आहे तें तुझेंच, त्या वसिष्ठगुणानें

तूंच तो वसिष्ठ आहेस, असें बोलला. 'यद्वा अहं प्रतिष्ठा०-' जो मी प्रतिष्ठा आहें तूं ती प्रतिष्ठा आहेस. जी माझी प्रतिष्ठा ती तूं आहेस, असें चक्षु म्हणाला. 'यद्वा अहं संपदस्मि०-' इत्यादि पुढील सर्व अर्थ यासारखाच आहे. श्रोत्र, मन व रेत हीं क्रमानें संपद्, आयतन व प्रजातित्व हे गुण प्राणास समर्पण करतीं झालीं.

यद्येवं साधु बलिं दत्तवन्तो भवन्तो ब्रूत तस्य उ म एवंगुणविशिष्टस्य किमन्नं किं वास इति । आहुरितरे । यदिदं लोके किंच किंचिदन्नं नामाप्या श्वभ्य आ कृमिभ्य आ कीटपतङ्गेभ्यः । यच्च श्वान्नं कृम्यन्नं कीटपतङ्गान्नं च तेन सह सर्वमेव यत्किंचित्प्राणिभिरद्यमानमन्नं तत्सर्वं तवान्नं सर्वं प्राणस्यान्नमिति दृष्टिरत्र विधीयते ॥

भाष्यार्थ—(प्राण या त्यांच्या बलिदानाचा स्वीकार करून अन्न-वस्त्र विचारता झाला–) असें जर असेल तर तुम्ही मला चांगलें बलिदान केलेंत. 'तस्य उ मे किमन्नं-' पण असें सांगा कीं, त्या एवंगुण-विशिष्ट अशा माझें अन्न काय व वस्त्र काय ? तें ऐकून वागादि इतर प्राण म्हणाले–'यदिदं किंच आ श्वभ्यः०-' या लोकांत–सृष्टींत जें कांहीं अन्न म्हणून आहे, श्वान, कृमी, कीट व पक्षी यांच्यापर्यंत जेवढें अन्न आहे, जें कुत्र्याचें अन्न, कृमींचें अन्न, कीट व पतंग यांचें अन्न त्या अन्नासह जें कांहीं सर्वच प्राण्यांकडून खाल्लें जाणारें अन्न आहे तें सर्व तुझें अन्न आहे. सर्व प्राणाचें अन्न आहे, अशा दृष्टीचें–अशा उपासनेचें येथें विधान केलें जातें.

केचित्तु सर्वभक्षणे दोषाभावं वदन्ति प्राणान्नविदः । तदसत् । शास्त्रान्तरेण प्रतिषिद्धत्वात् । तेनास्य विकल्प इति चेत् । न । अविधायकत्वात् ॥

भाष्यार्थ—(याच वाक्यार्थाविषयीं दुसरा पक्ष उत्थापित करितात–) प्राणान्नोपासकाला सर्वान्न भक्षण केलें तरी दोष नाहीं, असें कित्येक म्हणतात. (कारण 'न ह वा अस्य अनन्नं भवति' या पुढील वाक्याचा

१ ज्येष्ठत्व, श्रेष्ठत्व, वसिष्ठत्व इत्यादि गुणयुक्त.

ते आधार दाखवितात–) पण तें बरोबर नाहीं. कारण दुसऱ्या शास्त्रानें त्याचा प्रतिषेध केलेला आहे. [अभक्ष्यभक्षण करणारे कृमी होतात, इत्यादि दुसऱ्या शास्त्रानें, असा भावार्थ. 'अहो पण तें दुसरें शास्त्र जे प्राणोपासक नाहींत त्यांच्यासाठीं आहे. प्राणोपासकांना सर्वभक्षण विहित आहे. यास्तव वरील शास्त्राची व्यवस्था व्यवस्थित विकल्पानें लावावी,' अशी आशंका घेऊन समाधान करितात–] त्या शास्त्रान्तराशीं याचा विकल्प आहे, म्हणून म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण 'सर्वं प्राणस्यान्नं' या वाक्याला विधायकत्व नाहीं. (कारण कुत्रीं, कृमी इत्यादिकांपर्यंत जेवढें अन्न आहे तें सर्व प्राणाचें अन्न आहे, असें नुस्तें ज्ञानच येथें विहित आहे. प्राणोपासकानें कुत्रीं, कृमी इत्यादिकांपर्यंत सर्व क्षुद्र जीवांचेंही अन्न खावें, असें कांहीं त्यांत सांगितलेलें नाहीं. त्यामुळें प्राणोपासकानें सर्वान्न खावें व इतरांनीं भक्ष्याभक्ष्याचे नियम पाळावे, असा व्यवस्थित विकल्प संभवत नाहीं.)

न ह वा अस्यानन्नं जग्धं भवतीति सर्वं प्राणस्यान्नमित्येतस्य विज्ञानस्य विहितस्य स्तुत्यर्थमेतत् । तेनैकवाक्यतापत्तेः । न तु शास्त्रान्तरविहितस्य बाधने सामर्थ्यमन्यपरत्वादस्य । प्राणमात्रस्य सर्वमन्नमित्येतद्दर्शनमिह विधित्सितं न तु सर्वं भक्षयेदिति ॥

भाष्यार्थ—( बरें प्राणोपासकाचें सर्वान्नभक्षण ' न ह वा अस्यानन्नं ' इत्यादि पुढील वाक्यानें विहित आहे,म्हणून, म्हणाल तर)'न ह वा अस्य अनन्नं जग्धं भवति ' हें पुढील वाक्य 'सर्व प्राणाचें अन्न आहे,' या विहित विज्ञानाच्या स्तुत्यर्थ आहे. ( कारण ' अस्य ' या शब्दानें वरील सर्वान्नदर्शी उपासकाचा परामर्श केला आहे ' ह वै ' हे अर्थवादत्व दाखविणारे निपातही त्यांत आहेत. त्यामुळें ) त्या वाक्याशीं याची एकवाक्यता संभवते. ( आणि एकवाक्यतापत्ति असतांना वाक्यभेद करणें हा अन्याय आहे. ) ' न ह० ' इत्यादि या वाक्यामध्यें शास्त्रान्तर विहित कलंजादिकांच्या अभक्षणाचा बाध करण्याचें सामर्थ्य नाहीं. का-

रण तें वाक्य अन्यपर आहे. ( दुसऱ्या प्रमाणांशीं विरोध न आल्यास अर्थवादांना स्वार्थीं प्रामाण्य असतें. ) ' न ह वै० ' इत्यादि वाक्यांत केवळ प्राणाचें सर्व अन्न आहे, हें दर्शन—ही भावना विधित्सित[1] आहे. सर्व भक्षण करावें, हें त्यांत विधित्सित नाहीं.

यत्तु सर्वभक्षणे दोषाभावज्ञानं तन्मिथ्यैव प्रमाणाभावात् । विदुषः प्राणत्वात्सर्वान्नोपपत्तेः सामर्थ्याददोष एवेति चेत् । न । अशेषान्नत्वानुपपत्तेः । सत्यं यद्यपि विद्वान्प्राणो येन कार्यकरणसंघातेन विशिष्टस्य विद्वत्ता तेन कार्यकरणसंघातेन कृमिकीटदेवाद्यशेषान्नभक्षणं नोपपद्यते । तेन तत्राशेषान्नभक्षणे दोषाभावज्ञापनमनर्थकम् । अप्राप्तत्वादशेषान्नभक्षणदोषस्य ॥

भाष्यार्थ—( ' अहो पण सर्वभक्षणांत कांहीं दोष नाहीं असें त्या वाक्यांत सुचविलेलें असल्यामुळें सर्वान्नभक्षण विधित्सितच आहे, ' अशी आशंका घेऊन सांगतात—) आतां सर्वान्नभक्षणामध्यें कांहीं दोष नाहीं, असें ज्ञान त्यावरून होतें, असें जें कित्येकांचें म्हणणें आहे तें मिथ्याच आहे. कारण त्याविषयीं कांहीं प्रमाण नाहीं. ' अहो पण विद्वानाला प्राणत्व असल्यामुळें त्याचें सर्व अन्न आहे, हें उपपन्नच आहे. अर्थात् सामर्थ्यानेंच म्ह० प्राप्त स्वरूपबलानें सर्वभक्षणांत कांहीं दोष नाहीं, ' म्हणून म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण प्राणच मी आहें, अशी उपासना करणाराला सर्वान्नत्वाची उपपत्ति नाहीं. ( हेंच अधिक स्पष्ट करितात—) मी प्राण आहें, अशी उपासना करणारा उपासक—विद्वान् हा प्राण आहे, हें जरी खरें आहे तरी ज्या शरीरेंद्रियसंघातानें विशिष्ट असलेल्या त्याला विद्वत्ता असते त्या कार्य-करणसंघातानें कृमि-कीट-देवादि या सर्वांचें अन्न भक्षण करतां येणें शक्य नाहीं. त्यामुळें त्या विद्वानानें सर्वांचें अन्न जरी खाल्लें तरी त्यांत कांहीं दोष नाहीं, असें या वाक्यानें ज्ञापन करणें व्यर्थ आहे. कारण त्या विद्वानाचे ठिकाणीं सर्वान्नभक्षणाचा दोष प्राप्तच नाहीं.

१ विधित्सित—विधान करावयास इष्ट—विवक्षित.

ननु प्राणः सन्भक्षयत्येव कृमिकीटाद्यन्नमपि । बाढम् । किंतु न तद्विषयः प्रतिषेधोऽस्ति । तस्माद्दैवरक्तं किंशुकं तत्र दोषाभावः । अतस्तद्रूपेण दोषाभावज्ञापनमनर्थकम् । अप्राप्तत्वादशेषान्नभक्षणदोषस्य ॥

भाष्यार्थ—( ' अहो पण प्राणस्वरूपाच्या सामर्थ्यानें वरील अनुपपत्तिही शांत होईल,' अशी आशंका घेऊन सांगतात—) ' अहो पण प्राणोपासक प्राणचिंतनाच्या दृढतेमुळें प्राण होत्साता कृमि-कीटादिकांचें अन्नही भक्षण करलच ' म्हणून म्हणाल तर तें खरें आहे. पण सर्वान्नभक्षणाचा निषेध प्राणरूपानें सर्वान्नभक्षणाला उद्देशून—तद्विषयक नाहीं. तस्मात् किंशुकपुष्प दैवानेंच लाल असल्यामुळें त्याचा जसा प्रतिषेध संभवत नाहीं त्याप्रमाणें प्राणाचें सर्वभक्षण स्वारसिक—स्वाभाविक असल्यामुळें त्याचा प्रतिषेध करितां येत नाहीं व त्यामुळें त्यांत कांहीं दोष नाहीं, असा शेष लावावा, यास्तव प्राणरूपानें दोषाच्या अभावाचें ज्ञापन करणें व्यर्थ आहे. कारण सर्वभक्षणदोष प्राणाचे ठिकाणीं प्राप्त नाहीं.

येन तु कार्यकरणसंघातसंबन्धेन प्रतिषेधः क्रियते तत्संबन्धेन त्विह नैव प्रतिप्रसवोऽस्ति । तस्मात्तत्प्रतिषेधातिक्रमे दोष एव स्यादन्यविषयत्वान्न ह वा इत्यादेः ॥

भाष्यार्थ—( आतां प्राणोपासकाचें साधक या रूपानें सर्वान्नभक्षण या वाक्यानें साधलें जातें, हा पक्ष घेऊन त्याचें प्रत्याख्यान करितात—) परंतु ज्या कार्य-करणसंघातसंबंधानें सर्वान्नभक्षणाचा निषेध केला जातो त्या संबंधानें तर येथें प्राणवेत्त्याच्या सर्वान्नभक्षण-निषेधाचा प्रतिप्रसव नाहींच आहे. ( दुसऱ्या कांहीं निमित्तामुळें अत्यंत अप्राप्त गोष्टींचेंही विधान करणें हा प्रतिप्रसव आहे. जसें—ज्याला ज्वर आला आहे त्याला अन्नाचा जरी प्रतिषेध केलेला असला तरी औषध पिण्याविषयीं विधान करितात. त्याप्रमाणें शास्त्राधिकारी पुरुषाला सर्वभक्षणाचा निषेध जरी असला तरी प्राणवेत्त्याला उद्देशून विशेष विधि उपलब्ध होत नाहीं. त्यामुळें त्याचें सर्वान्नभक्षण दुःसाध्य आहे, असा भावार्थ. ) तस्मात्

सर्वान्नभक्षणनिषेधाचा अतिक्रम केल्यास दोषच लागेल. कारण 'न ह वा०' इत्यादि पुढील वाक्याचा विषय निराळा आहे. [ तें अर्थवाद वाक्य केवल स्तुत्यर्थ आहे. ]

न च ब्राह्मणादिशरीरस्य सर्वान्नत्वदर्शनमिह विधीयते किंतु प्राणमात्रस्यैव । यथा च सामान्येन सर्वान्नस्य प्राणस्य किंचिदन्नजातं कस्यचिज्जीवनहेतुः । यथा विषं विषजस्य कृमेस्तदेवान्यस्य प्राणान्नमपि सद्दृष्टमेव दोषमुत्पादयति मरणादिलक्षणम् । तथा सर्वान्नस्यापि प्राणस्य प्रतिषिद्धान्नभक्षणे ब्राह्मणत्वादिदेहसंबन्धाद्दोष एव स्यात् । तस्मान्मिथ्याज्ञानमेवाभक्ष्यभक्षणे दोषाभावज्ञानम् ॥

भाष्यार्थ—( 'अहो पण विशिष्ट प्राणाचें सर्व अन्न आहे, या भावनेचें येथें विधान आहे, त्यामुळें प्राणरूप प्राणोपासकाला सर्वान्नभक्षणाचा दोष लागणार नाहीं. कारण जशी भावना—उपासना करावी तसें फळ मिळतें, असा तुमचा सिद्धान्त आहे,' अशी आशंका घेऊन सांगतात—) ब्राह्मणादि शरीराचें सर्व अन्न आहे, असें दर्शन—अशी उपासना येथें विहित नाहीं. तर केवल प्राणाचेंच सर्व अन्न आहे, असें दर्शन येथें विहित आहे. जसें—सामान्यतः प्राणाचें सर्व अन्न आहे, असें जरी मानलें तरी कांहीं विशिष्ट अन्नजात कांहीं विशिष्ट प्राण्यांच्याच जीवनाचें निमित्त होतें. जसें—विषांतील—विषजन्य-कृमीचें विष हें अन्न—जीवनहेतु आहे. पण तेंच प्राणाचें अन्न जरी असलें तरी दुसऱ्या प्राण्याच्या ठिकाणीं मरणादिरूप दृष्ट दोषच उत्पन्न करतें, त्याप्रमाणें प्राण जरी सर्वान्न असला, त्याचें सर्व अन्न असलें तरी त्यानें प्रतिषिद्ध अन्न भक्षण केल्यास ब्राह्मणत्वादि देहसंबंधामुळें दोषच होईल. तस्मात् प्राणोपासकानें अभक्ष्यभक्षण जरी केलें तरी त्याला दोष लागत नाहीं, असें ज्ञान हें मिथ्या ज्ञानच आहे.

आपो वास इत्यापो भक्ष्यमाणा वासःस्थानीयास्तव ।अत्र च प्राणस्याऽऽपो वास इत्येतद्दर्शनं विधीयते । न तु वासःकार्य आपो विनियोक्तुं शक्याः । तस्माद्यथाप्राप्तेऽभक्षणे दर्शनमात्रं कर्तव्यम् ॥

भाष्यार्थ--( पुढील वाक्य घेऊन त्याचें व्याख्यान-) ' आपोवास इति-' भक्षण केलें जाणारें आप-उदक हें तुझ्या वस्त्रस्थानीं आहे. ( स्मार्त आचमनाहून श्रौत आचमन निराळेंच आहे. पण तें अन्यप्रमाणानें प्राप्त झालेलें नसल्यामुळें त्याचें विधान करणें उचित आहे, त्यासाठीं हें वाक्य आहे, असें कित्येक म्हणतात,त्यांचें निराकरण करितात-) येथें प्राणाचें आप वस्त्र आहे, ह्या दर्शनाचें-या दृष्टीचें विधान केलें जातें. पण आपाचा-जलाचा वस्त्राच्या परिधान या कार्यामध्यें विनियोग करतां येणें शक्य नाहीं. तस्मात् यथाप्राप्त जलभक्षणामध्यें--आचमनामध्यें केवळ वस्त्रदृष्टि करावी.

न ह वा अस्य सर्वं प्राणस्यान्नमित्येवंविदोऽनन्नमनदनीयं जग्धं भुक्तं न भवति ह । यद्यप्यनेनानदनीयमेव भुक्तं स्यान्न तु तत्कृतदोषेण लिप्यत इत्येतद्विद्यास्तुतिरित्यवोचाम ॥

भाष्यार्थ—( आतां ' न ह वा०' इत्यादि अर्थवादवाक्याचें व्याख्यान करितात-) ' अस्य-' सर्व प्राणाचें अन्न आहे, असें जाणणाऱ्या पुरुषाला ' अनन्नं न जग्धं भवति-' अभक्ष्य भक्षण केल्याचा दोष लागत नाहीं.जरी त्यानें अभक्ष्य अन्नच खाल्लें तरी भक्ष्य अन्नच खाल्लें असें होतें. तज्जन्य दोषानें तो लिप्त होत नाहीं, अशी ही विद्यास्तुति आहे, असें आम्हीं वर सांगितलेंच आहे.

तथा नानन्नं प्रतिगृहीतं यद्यप्यप्रतिग्राह्यं हस्त्यादि प्रतिगृहीतं स्यात्तदप्यन्नमेव प्रतिग्राह्यं प्रतिगृहीतं स्यात्तत्राप्यप्रतिग्राह्यप्रतिग्रहदोषेण न लिप्यत इति स्तुत्यर्थमेव य एवमेतदनस्य प्राणस्यान्नं वेद । फलं तु प्राणात्मभाव एव न त्वेतत्फलाभिप्रायेण किं तर्हि स्तुत्यभिप्रायेणेति ॥

भाष्यार्थ—( ज्याप्रमाणें प्राणोपासकानें अभक्ष्य भक्षण केलें असें होत नाहीं ) त्याप्रमाणें ' नानन्नं प्रतिगृहीतं-' अनन्नाचा त्यानें प्रतिग्रह केला आहे, असें होत नाहीं. यद्यपि हस्त्यादि अप्रतिग्राह्य पदार्थांचा त्यानें प्रतिग्रह केला तरी अन्नाचाच प्रतिग्राह्य-प्रतिग्रह करण्यास योग्य

अशा वस्तूचाच प्रतिग्रह केला आहे असें होतें. ( तर मग प्राणोपासकाला असत्प्रतिग्रह घेण्यास हरकत नाहीं, असें कोणी म्हणेल तर सांगतात–) असत्प्रतिग्रह जरी प्राप्त झाला तरी तो–प्राणोपासक अप्रतिग्राह्याच्या प्रतिग्रहदोषानें लिप्त होत नाहीं, हेंही स्तुत्यर्थच आहे. ( कोण दोषानें लिप्त होत नाहीं ? ) ' य एवमेतदनस्यान्नं वेद-' जो याप्रमाणें हें प्राणाचें अन्न आहे, असें जाणतो ( तो दोषानें लिप्त होत नाहीं. ) या प्राणोपासनेचें फल तर प्राणात्मभाव–प्राणात्मत्व हेंच आहे. पण वरील अभक्ष्यभक्षणानें व असत्प्रतिग्रहानें दोषी न होणें हें फल नव्हे. तें फलाच्या अभिप्रायानें सांगितलेलें नाहीं; तर काय ? स्तुतीच्या अभिप्रायानें आहे. (भाष्यांतील शेवटचा इतिशब्द सर्व प्राणाचें अन्न' या दृष्टिविधीच्या उपसंहारार्थ आहे. )

नन्वेतदेव फलं कस्मान्न भवति । न । प्राणात्मदर्शिनः प्राणात्मभाव एव फलम् । तत्र च प्राणात्मभूतस्य सर्वात्मनोऽनदनीयमप्याद्यमेव । तथाऽप्रतिग्राह्यमपि प्रतिग्राह्यमेवेति यथाप्राप्तमेवोपादाय विद्या स्तूयते । अतो नैव फलविधिसरूपता वाक्यस्य ॥

भाष्यार्थ—अहो पण हेंच फल कां होणार नाहीं ? नाहीं, तें फल नव्हे. प्राणच मी आहें, अशी उपासना करणाऱ्या प्राणात्मदर्शी पुरुषाला प्राणात्मभाव प्राप्त होणें हेंच फल आहे. तें फल प्राप्त झालें असतां प्राणात्मभूत सर्वात्म्याला अभक्ष्यही भक्ष्यच आहे व तसेंच अप्रतिग्राह्यही प्रतिग्राह्यच आहे, अशी–यथाप्राप्तच स्वीकारून, प्रकृत वाक्यवशात् प्राप्त रूपाचें अतिक्रमण न करतां–विद्येची स्तुति केली जाते. यास्तव या वाक्याला फलविधिसरूपता नाहींच.

यस्मादापो वासः प्राणस्य तस्माद्विद्वांसो ब्राह्मणाः श्रोत्रिया अधीतवेदा अशिष्यन्तो भोक्ष्यमाणा आचामन्त्यपोऽशित्वाऽऽचामन्ति भुक्त्वा चोत्तरकालमपो भक्षयन्ति । तत्र तेषामाचामतां कोऽभिप्राय इत्याह । एतमेवानं प्राणमनग्नं कुर्वन्तो मन्यन्ते । अस्ति चैतद्यो यस्मै वासो द-

दाति स तमनग्नं करोमीति हि मन्यते। प्राणस्य चाऽऽपो वास इति ह्युक्तम्। यदपः पिबामि तत्प्राणस्य वासो ददामीति विज्ञानं कर्तव्यमित्येवमर्थमेतत्॥

भाष्यार्थ—( ' आपो वासः ' असें जें म्हटलें आहे त्याचा शेषभूत–उपसंहारात्मक उत्तर ग्रंथ उत्थापित करून व्याख्यान करितात–) ज्याअर्थी आप प्राणाचें वस्त्र आहे ' तत्-' त्याअर्थी ' विद्वासः-' विद्वान् ब्राह्मण ' श्रोत्रियाः-' वेदाध्ययन केलेले ' अशिष्यन्तः-' भोजन करण्याच्या वेळीं–भोजन करण्यास आरंभ करण्यापूर्वीं ' आचामन्ति-' जलाचें आचमन घेतात. ' अशित्वा-' भोजन करून ' आचामन्ति-' भोजनोत्तर आपोशन घेतात. पण भोजनापूर्वीं व नंतर आचमन घेणाऱ्या त्यांचा कोणता अभिप्राय असतो, तें श्रुति सांगते.–' एतमेव तदनमनग्नं कुर्वन्तो मन्यन्ते-'ते याच प्राणास आम्ही या आपोशनानें अनग्न करीत आहों असें मानतात. जो ज्याला वस्त्र देतो तो त्याला मी अनग्न करतों असेंच मानतो, अशी लोकप्रसिद्धि आहे; आणि प्राणाचें आप हें वस्त्र आहे, हें वर सांगितलेंच आहे.मी जें पाणी पीत आहें–आपोशन घेत आहें तें प्राणाला वस्त्र देत आहें, अशी उपासना करावी, यासाठीं हें वाक्य आहे.

ननु भोक्ष्यमाणो भुक्तवांश्च प्रयतो भविष्यामीत्याचामति । तत्र च प्राणस्यानग्नताकरणार्थत्वे च द्विकार्यताऽऽचमनस्य स्यात् । न च कार्यद्वयमाचमनस्यैकस्य युक्तम्। यदि प्रायत्यार्थं नानग्नतार्थमथानग्नतार्थं न प्रायत्यार्थम् । यस्मादेवं तस्माद्द्वितीयमाचमनान्तरं प्राणस्यानग्नताकरणाय भवतु ॥

भाष्यार्थ—अहो पण भोजन करावयास आरंभ करणारा व भोजन केलेला ब्राह्मण मी शुद्ध होईन, म्हणून आचमन करतो. पण शुद्धीसाठीं आचमन आहे व प्राणाची अनग्नता करण्यासाठीं तें आहे असें म्हटल्यास

आचमनाचीं दोन कार्यें आहेत, असें होईल, पण एका आचमनाचीं दो[1]न कार्यें असणें युक्त नव्हे. आचमन जर पवित्रतेसाठीं असेल तर तें अनग्नतेसाठीं असणें योग्य नाहीं. बरें तें अनग्नतेसाठीं असेल तर पवित्रतेसाठीं असणें युक्त नव्हे, (अहो पण स्मार्त आचमन पवित्रतेसाठीं आहे. तसेंच तें अनग्नतेसाठीं आहे, हेंही प्रस्तुत वाक्यावरून अवगत होतें. तेव्हां आचमनाचें द्विकार्यत्व प्रमाणसिद्ध नाहीं असें कसें म्हणतां येईल ? अशी आशंका घेऊन वादी वाक्याचा दुसरा विषय दाखवितो–) ज्याअर्थीं अशी स्थिति आहे, त्याअर्थीं प्राणाला अनग्न करण्यासाठीं पवित्रतेकरितां केलेल्या आचमनाहून दुसरें पृथक् आचमन असो.

न क्रियाद्वित्वोपपत्तेः । द्वे ह्येते क्रिये भोक्ष्यमाणस्य भुक्तवतश्च यदाचमनं स्मृतिविहितं तत्प्रायत्यार्थं भवति क्रियामात्रमेव न तु तत्र प्रायत्यं दर्शनाद्यपेक्षते । तत्र चाऽऽचमनाङ्गभूतास्वप्सु वासोविज्ञानं प्राणस्येतिकर्तव्यतया चोद्यते । न तु तस्मिन्क्रियमाण आचमनस्य प्रायत्यार्थता बाध्येत क्रियान्तरत्वादाचमनस्य । तस्माद्भोक्ष्यमाणस्य भुक्तवतश्च यदाचमनं तत्राऽऽपो वासः प्राणस्येति दर्शनमात्रं विधीयते । अप्राप्तत्वादन्यतः ॥१४॥ इति बृहदारण्यकोपनिषद्भाष्ये षष्ठाध्यायस्य प्रथमं ब्राह्मणम् ॥ १ ॥

भाष्यार्थ—(द्विकार्यत्व ह्या उक्त दोषाला सिद्धान्ती दूषित करितात–) हें म्हणणें बरोबर नाहीं. कारण क्रियाद्वित्वाची उपपत्ति लागणें अवश्य आहे. ह्या दोन क्रिया आहेत. जेवणारा व जेवलेला यांचें जें स्मृतिविहित आचमन तें केवळ क्रियामात्रच पवित्रतेला कारण होतें. केवल आचमन करणें या क्रियेमुळेंच होणारें पवित्रत्व दर्शनादिकांची

---

1 नदीचा कालवा काढून नेल्यास त्याचें पाणी शेतांनाही देतां येतें व मनुष्याच्या स्नान-संध्यादि कर्मांच्याही उपयोगी पडतें, त्याच न्यायानें एका आचमनाचीं दोन कार्यें होऊं शकतील म्हणून म्हणाल तर कालव्याचीं कार्यें प्रत्यक्ष आहेत, त्यामुळें विरोध नाहीं. पण आचमनाच्या द्विकार्यत्वाविषयीं कांहीं प्रमाण नाहीं.

अपेक्षा करीत नाहीं; (कारण त्या क्रियेंतच पावित्र्य देण्याचें सामर्थ्य आहे ) आणि शुद्धीकरितां आचमन ही क्रिया आहे, असें ठरलें असतां त्या आचमनाच्या अंगभूत जलाचे ठिकाणीं प्राणाच्या वस्त्राची दृष्टि इतिकर्तव्यतारूपानें सांगितली जाते. ती दृष्टि केल्यानें आचमनाचें शुद्ध्यर्थत्व बाधित होत नाहीं. कारण आचमनाला क्रियान्तरत्व आहे. [ म्हणजे आचमनांगभूत जलाच्या ठिकाणीं प्राणवस्त्रदृष्टि करणें याहून साक्षात् आचमन ही निराळी क्रिया आहे. ] तस्मात् भोजन करणारा व भोजन केलेला यांच्याकडून [ अर्थात् भोजनापूर्वी व भोजनानंतर ] केलें जाणारें जें आचमन त्यामध्यें 'हें जल प्राणाचें वस्त्र आहे,' अशा दृष्टीचेंच केवल विधान केलें जातें. कारण त्या दृष्टीची दुसऱ्या कोणत्याही प्रमाणानें प्राप्ति नाहीं. [अर्थात् प्राणाला अनग्न करण्यासाठीं निराळें आचमन करण्याचें कारण नाहीं.]

इति श्रीबृहदारण्यकभाष्यार्थाच्या सहाव्या अध्यायाचें पहिलें ब्राह्मण समाप्त.

---

श्वेतकेतुर्ह वा आरुणेय इत्यस्य संबन्धः। खिलाधिकारोऽयं तत्र यदनुक्तं तदुच्यते। सप्तमाध्यायान्ते ज्ञानकर्मसमुच्चयकारिणाऽग्नेर्मार्गयाचनं कृतम्। अग्ने नय सुपथेति। तत्रानेकेषां पथां सद्भावो मन्त्रेण सामर्थ्यात्प्रदर्शितः। सुपथेति विशेषणात्। पन्थानश्च कृतविपाकप्रतिपत्तिमार्गाः। वक्ष्यति च यत्कृत्वेत्यादि। तत्र च कति कर्मविपाकप्रतिपत्तिमार्गा इति सर्वसंसारगत्युपसंहारार्थोऽयमारम्भः। एतावती हि संसारगतिः। एतावान्कर्मणो विपाकः स्वाभाविकस्य शास्त्रीयस्य च सविज्ञानस्येति ॥

भाष्यार्थ—(दुसऱ्या ब्राह्मणाचा पहिल्या ब्राह्मणाशीं संबंध—) 'श्वेतकेतुर्ह०-' या ब्राह्मणाचा संबंध. हा खिलाधिकार आहे. त्यामुळें कर्मकांड किंवा ज्ञानकांड यांत जें प्राधान्यानें सांगितलेलें नाहीं तें यांत सांगणें भाग आहे. त्यासाठीं हें ब्राह्मण आहे. सातव्या [ पांचव्या ] अध्यायाच्या शेवटीं उपासना व कर्म यांचा समुच्चय करणाऱ्या पुरुषानें 'अग्ने नय सुपथा०' या मंत्रानें अग्नीची मार्ग देण्याविषयीं याचना

केली. तेथें—सातव्या अध्यायाच्या शेवटीं—मंत्रानें सामर्थ्यावरूनच अनेक मार्गांचें अस्तित्व प्रदर्शित केलें. (तें सामर्थ्यच दाखवितात—) कारण त्या याचना केलेल्या मार्गाला ' सुपथा ' असें विशेषण दिलें आहे. (विशेषणवशात् अनेक मार्ग भासोत. पण त्यांचें स्वरूप काय आहे ? तें सांगतात—) पन्थ—मार्ग म्हणजे केलेल्या अनुष्ठानाचा विपाक—फल—भोगण्याचे मार्ग. 'यत्कृत्वा०' इत्यादि पुढें सांगावयाचेंच आहे. त्यांत कर्मविपाकप्राप्तिमार्ग किती आहेत, तें सांगून सर्व संसारगतीचा उपसंहार करण्यासाठीं हा ब्राह्मणारंभ आहे. संसारगति ही एवढीच आहे. स्वाभाविक कर्माचा, विज्ञानासह कर्माचा व केवळ कर्माचा हा एवढाच विपाक आहे.(संसारगतीहून कर्मविपाक निराळा नाहीं.यास्तव संसारगतीचा म्हणजेच कर्मविपाकाचा उपसंहार करण्यासाठींच हा ब्रह्माणारंभ आहे. )

यद्यपि द्वया ह प्राजापत्या इत्यत्र स्वाभाविकः पाप्मा सूचितः । न च तस्येदं कार्यमिति विपाकः प्रदर्शितः । शास्त्रीयस्यैव तु विपाकः प्रदर्शितस्त्र्यन्नात्मप्रतिपत्त्यन्तेन । ब्रह्मविद्यारम्भे तद्वैराग्यस्य विवक्षितत्वात् । तत्रापि केवलेन कर्मणा पितृलोको विद्यया विद्यासंयुक्तेन च कर्मणा देवलोक इत्युक्तम् । तत्र केन मार्गेण पितृलोकं प्रतिपद्यते केन वा देवलोकमिति नोक्तम् । तदिह खिलप्रकरणेऽशेषतो वक्तव्यमित्यत आरभ्यते । अन्ते च सर्वोपसंहारः शास्त्रस्येष्टः ॥

भाष्यार्थ—('अहो पण उद्गीथाधिकारामध्यें सर्वही कर्मविपाक अनर्थच आहे असें सांगितलें असल्यामुळें परिशिष्ट संसारगतीचाच अभाव आहे. तेव्हां खिलकांडांत त्याच्या निर्देशाची सिद्धि कशी होते ?' तें सांगतात—) जरी 'द्वया ह प्राजापत्याः०' (अ. १ पृ. ८१) येथें स्वाभाविक पाप्मा सुचविलेला आहे तरी त्याचें हें कार्य, असें म्हणून त्याचा विपाक प्रदर्शित केला नाहीं. त्र्यन्नरूपत्वप्राप्ति होणें येथपर्यंतच्या भागानें शास्त्रीय कर्माचाच विपाक प्रदर्शित केला आहे. कारण ब्रह्मविद्येच्या

१ 'यत्कृत्वा देवयानं वा पन्थानं प्रतिपद्यन्ते०' असा प्रश्न याच ब्राह्मणाच्या दुसऱ्या कंडिकेंत आहे, २ दक्षिणागति, उत्तरागति व अधोगति एवढीच.

आरंभीं पुण्यकर्मांच्या विपाकाविषयींचें वैराग्यच विवक्षित आहे. (कारण पुण्याचरणास तयार झाल्यानेंच पापाच्या विपाकाविषयींचें वैराग्य सिद्ध होतें, म्हणून ब्रह्मविद्येच्या आरंभीं पापविपाकाचें वैराग्य विवक्षित नाहीं.) त्या शास्त्रीय विपाकप्रसंगींही केवळ कर्मानें पितृलोक, विद्येनें म्ह० उपासनेनें व विद्यासंयुक्त कर्मानें देवलोक हें फळ मिळतें, असें सांगितलें आहे. पण त्या दोन लोकांतील पितृलोकास कोणत्या मार्गानें जातो व देवलोकास कोणत्या मार्गानें जातो हें सांगितलेलें नाहीं. तें येथें या खिलप्रकरणांत संपूर्णपणें सांगावें, म्हणून हें ब्राह्मण आरंभिलें जात आहे. (असें जर आहे तर पूर्वीं न सांगितलेलें देवयानादि सांगणेंच युक्त आहे. पूर्वोक्त ब्रह्मलोकादिकांचें कथन युक्त नव्हे, अशी आशंका घेऊन सांगतात--) आणि शास्त्राच्या शेवटीं सर्वांचा उपसंहार करणें इष्ट आहे.

अपि चैतावदमृतत्वमित्युक्तं न कर्मणोऽमृतत्वाशाऽस्तीति च तत्र हेतुर्नोक्तस्तदर्थश्चायमारम्भः। यस्मादियं कर्मणो गतिर्न नित्येऽमृतत्वे व्यापारोऽस्ति तस्मादेतावदेवामृतत्वसाधनमिति सामर्थ्याद्धेतुत्वं संपद्यते ॥

भाष्यार्थ---शिवाय ' एतावदमृतत्वं ' ( अ. ४ पृ. ३८२) मोक्षाचें साधन एवढेंच, असें सांगितलें. तसेंच ' कर्मानें अमृतत्वाची आशा नाहीं,' असेंही सांगितलें. पण त्याविषयीं--ज्ञानच मोक्षसाधन आहे याविषयीं--हेतु सांगितला नाहीं. तो सांगण्यासाठीं हा आरंभ आहे. ('अहो पण पुढें सांगितली जाणारी कर्मांची गति ज्ञानच मोक्षसाधन आहे, याविषयीं हेतु कशी होणार ?' तें सांगतात--) ज्याअर्थीं ही कर्मांची गति आहे नित्य मोक्षामध्यें कर्मांचा व्यापार नाहीं, त्याअर्थीं हेंच--ज्ञानच--मोक्षाचें साधन आहे, असें सामर्थ्यावरूनच हेतुत्व[1] सिद्ध होतें.

अपि चोक्तमग्निहोत्रे न त्वेवैतयोस्त्वमुत्क्रान्तिं न गतिं न प्रतिष्ठां न तृप्तिं न पुनरावृत्तिं न लोकं प्रत्युत्थायिनं वेत्थेति । तत्र प्रतिवचने

१ ज्ञानातिरिक्त उपाय संसारालाच कारण होतो, हा नियम हेंच सामर्थ्य; त्यावरून ज्ञानच मोक्षसाधन आहे, याविषयीं कर्मगति हेतु होते.

ते वा एते आहुती हुते उत्क्रामत इत्यादिना आहुतेः कार्यमुक्तम् । तच्चैतत्कर्तुराहुतिलक्षणस्य कर्मणः फलम् । न हि कर्तारमनाश्रित्याऽऽहुतिलक्षणस्य कर्मणः स्वातन्त्र्येणोत्क्रान्त्यादिकार्यारम्भ उपपद्यते । कर्त्रर्थत्वात्कर्मणः कार्यारम्भस्य । साधनाश्रयत्वाच्च कर्मणः । तत्राग्निहोत्रस्तुत्यर्थत्वादग्निहोत्रस्यैव कार्यमित्युक्तं षट्प्रकारमपि ॥

भाष्यार्थ--(आतां निराळ्या प्रकारें ब्राह्मणाचें तात्पर्य सांगण्यासाठीं अग्निहोत्राविषयीं जनक व याज्ञवल्क्य यांच्या संवादावरून सिद्ध झालेल्या अर्थाचा अनुवाद करितात-) शिवाय अग्निहोत्रांत असें सांगितलें आहे-सायंकाळीं व प्रातःकाळीं अनुष्ठिलेल्या अग्निहोत्राच्या दोन आहुत्यांची तूं उत्क्रान्ति जाणत नाहींस, गति जाणत नाहींस, प्रतिष्ठा जाणत नाहींस, तृप्ति जाणत नाहींस, पुनरावृत्ति जाणत नाहींस व लोकास प्रत्युत्थान करणाऱ्या यजमानाला जाणत नाहींस, असे सहा प्रश्न जनकानें याज्ञवल्क्यास सांगितले. त्यांच्या प्रतिवचनांत 'त्या ह्या अग्नींत होमिलेल्या दोन आहुत्या उत्क्रमण करितात,' इत्यादि अर्थाच्या वाक्यानें आहुतीचें कार्य सांगितलें. तें हें कर्त्याच्या आहुतिलक्षण कर्माचें फळ आहे. कर्त्याचा आश्रय केल्यावाचून आहुतिरूप कर्माचा स्वातंत्र्यानें उत्क्रान्त्यादि कार्यारंभ उपपन्न होत नाहीं. कारण कर्माच्या कार्यारंभाला कर्त्रर्थत्व आहे. [ ह्म० तो कर्त्यासाठीं आहे. ] आणि कर्माला साधनाश्रयत्व आहे. पण अग्निहोत्र प्रकरणांतील प्रश्नप्रतिवचनरूप संदर्भ अग्निहोत्राच्या स्तुत्यर्थ असल्यामुळें सहा प्रकारचेंही कार्य अग्निहोत्राचेंच आहे, असें सांगितलें आहे.

इह तु तदेव कर्तुः फलमित्युपदिश्यते षट्प्रकारमपि कर्मफलविज्ञानस्य विवक्षितत्वात् । तद्द्वारेण च पश्चाग्निदर्शनमिहोत्तरमार्गप्रतिपत्तिसाधनं विधित्सितम् । एवमशेषसंसारगत्युपसंहारः । कर्मकाण्डस्यैषा निष्ठेत्येतद्द्वयं दिदर्शयिषुराख्यायिकां प्रणयति ॥

भाष्यार्थ---पण येथें तेंच सहाप्रकारचेंही फळ कर्त्याचें आहे, असें

सांगितलें जातें. कारण येथें कर्मफलदर्शन विवक्षित आहे आणि त्या कर्मफलदर्शनाच्या द्वारा पंचाग्निदर्शन–पंचाग्नीची उपासना–उत्तर मार्गप्राप्तीचें साधन येथें विधित्सित–विधान करण्यास इष्ट आहे. याप्रमाणें सर्व संसारगतींचा उपसंहार व कर्मकांडाची ही निष्ठा हें द्वय दाखविण्याची इच्छा करणारा वेद आख्यायिका सांगतो.

श्वेतकेतुर्ह वा आरुणेयः पञ्चालानां परिषदमाजगाम स आजगाम जैवलिं प्रवाहणं परिचारयमाणं तमुदीक्ष्याभ्युवाद कुमारा३ इति स भो३ इति प्रतिशुश्रावानुशिष्टोऽन्वसि पित्रेत्योमिति होवाच ॥ १ ॥

अर्थ—मागें असें घडलें–श्वेतकेतु या नांवाचा अरुणाचें अपत्य जो आरुणि त्याचें अपत्य–अरुणाचा नातु श्वेतकेतु खरोखर पंचालांच्या परिषदेत आला. त्या परिषदेला जिंकून भृत्यांकडून परिचर्या करविणाऱ्या प्रवाहण नांवाच्या जैवलि पंचालराजाकडे आला. त्याच्याकडे पाहून राजा 'कायरे मुला' असें म्हणाला. तेव्हां 'ओ महाराज' असें श्वेतकेतूही बोलला. 'बापानें तुला शिकविलें आहे का?' असें राजा म्हणाला. त्यावर 'होय' असें श्वेतकेतु बोलला. १

श्वेतकेतुर्नामतोऽरुणस्यापत्यमारुणिस्तस्यापत्यमारुणेयः । हशब्द ऐतिह्यार्थः । वै निश्चयार्थः । पित्राऽनुशिष्टः सन्नात्मनो यशःप्रथनाय पञ्चालानां परिषदमाजगाम । पञ्चालाः प्रसिद्धास्तेषां परिषदमागत्य जित्वा राज्ञोऽपि परिषदं जेष्यामीति गर्वेण स आजगाम । जीवलस्यापत्यं जैवलिं पञ्चालराजं प्रवाहणनामानं स्वभृत्यैः परिचारयमाणमात्मनः परिचरणं कारयन्तमित्येतत् ॥

भाष्यार्थ—'श्वेतकेतुः-' श्वेतकेतुनांवाचा 'आरुणेयः-' अरुणाचें अपत्य आरुणि, त्याचें अपत्य आरुणेय. 'ह-' शब्द ऐतिह्य–असें घडलें, या अर्थी आहे. 'वै-' हा निपात निश्चय या अर्थी आहे. पित्याकडून अनुशासन केला गेलेला–शिकविलेला–असा होत्साता आपलें यश प्रसिद्ध व्हावें म्हणून विद्वानांमध्यें आपल्या विद्येचें सामर्थ्य प्रख्या-

पित करण्याकरितां ' पञ्चालानां परिषदं० ' पंचालांच्या परिषदेस आला. पंचाल देश प्रसिद्ध आहेत. त्यांतील विद्वत्परिषदेस येऊन व त्या सभेस जिंकून ' मी राजाच्याही परिषदेला जिंकीन ' म्हणून ' स आजगाम- ' तो गर्वानें आला. ( कोठें ? ) ' जैवलिं प्रवाहणं परिचारयमाणं- ' जीवलाचें अपत्य जैवलि, प्रवाहणनामक पंचालराज आपल्या भृत्यांकडून आपलें परिचरण करविणारा, असा भावार्थ, त्याच्याकडे आला.

स राजा पूर्वमेव तस्य विद्याभिमानगर्वं श्रुत्वा विनेतव्योऽयमिति मत्वा तमुदीक्ष्योत्प्रेक्ष्याऽऽगतमात्रमेवाभ्युवादाभ्युक्तवान्कुमारा३ इति । संबोध्य । भर्त्सनार्था प्लुतिः । एवमुक्तः स प्रतिशुश्राव भो३ इति । भो३ इत्यप्रतिरूपमपि क्षत्रियं प्रत्युक्तवान्क्रुद्धः सन् । अनुशिष्टोऽनुशासितोऽसि भवसि किं पित्रेत्युवाच राजा । प्रत्याहेतर ॐमिति बाढमनुशिष्टोऽस्मि पृच्छ यदि संशयस्ते ॥ १ ॥

भाष्यार्थ—तो राजा पूर्वीच त्याचा विद्याभिमान व गर्व ऐकून व याला शिकविलें पाहिजे—याचा गर्व उतरला पाहिजे, असें समजून ' तं उदीक्ष्य ' त्याच्याकडे पाहून आल्याबरोबर त्याला ' अभ्युवाद- ' बोलला ' कुमारा३ इति- ' अरे मुला, असें संबोधून त्याची निर्भर्त्सना करता झाला. ' कुमारा३ ' यांतील शेवटचा प्लुतस्वर त्याची निर्भर्त्सना करण्यासाठीं आहे. ' स भो३ इति प्रतिशुश्राव- ' याप्रमाणें तिरस्कारानें बोलला गेलेला तो ' भो३ इति- ' अहो महाराज, असें प्रत्युत्तर देता झाला. 'भो३' हें प्रतिवचन आचार्यांनाच उचित आहे. त्यामुळें क्षत्रियाला तें जरी अननुरूप असलें तरी क्रुद्ध होऊन तो तसें बोलला. ' अनुशिष्टोन्वसि पित्रा- ' पित्याकडून तूं अनुशासन दिला गेला आहेस काय ? पित्यानें तुला शिकविलें आहे का ? असें राजा म्हणाला तेव्हां श्वेतकेतु बोलला ' ॐमिति- ' होय, मी अनुशिष्ट आहें. तुला जर संशय असेल तर विचार १.

वेत्थ यथेमाः प्रजाः प्रयत्यो विप्रतिपद्यन्ता३ इति नेति होवाच वेत्थो यथेमं लोकं पुनरापद्यन्ता३ इति नेति हैवोवाच वेत्थो यथाऽ-

सौ लोक एवं बहुभिः पुनः पुनः प्रयद्भिर्न संपूर्यता३ इति नेति हैवोवाच वेत्थो यतिथ्यामाहुत्याᳶ हुतायामापः पुरुषवाचो भूत्वा समुत्थाय वदन्ती३ इति नेति हैवोवाच वेत्थो देवयानस्य वा पथः प्रतिपदं पितृयाणस्य वा यत्कृत्वा देवयानं वा पन्थानं प्रतिपद्यन्ते पितृयाणं वाऽपि हि न ऋषेर्वचः श्रुतं द्वे सृती अशृणवं पितृणामहं देवानामुत मर्त्यानां ताभ्यामिदं विश्वमेजत्समेति यदन्तरा पितरं मातरं चेति. नाहमत एकंचन वेदेति होवाच ॥ २ ॥

अर्थ—( राजा–) " ज्या प्रकारें या मरणाऱ्या प्रजा निरनिराळ्या मार्गानें जातात तो प्रकार तूं जाणतोस का ? " ' नाहीं ! ' असें तो बोलला. " त्या पुनः या लोकास कशा येतात तें जाणतोस का ? " " नाहीं. " असें तो म्हणाला. " याप्रमाणें मरून पुनः पुनः जाणाऱ्या असंख्य लोकांकडून तो लोक ज्याप्रकारें संपूर्ण होत–भरत नाहीं तें जाणतोस का ? " 'नाहीं' असेंच श्वेतकेतु ह्मणाला. " कोणती आहुति हुत केली असतां आप पुरुषशब्दवाच्य होऊन चांगल्यारीतीनें उत्पन्न होऊन बोलतात हें तूं जाणतोस का ? " त्यावर ' नाहीं ' असें तो बोलला. "देवयान मार्गाचें प्रतिपद्–कर्मरूप साधन व पितृयाणमार्गाचें प्रतिपद् तूं जाणतोस का ? कीं जें प्रतिपद्–कर्म करून देवयानमार्गाला प्राप्त होतात. किंवा जें करून पितृयाणमार्गाला प्राप्त होतात, या अर्थाचें प्रकाशक असें मंत्राचें हें वचन आम्हीं एकलें आहे. ( मंत्रवचनाचा अर्थ–) मी दोन मार्ग ऐकले आहेत. एक पितरांचा व दुसरा देवांचा. हे मार्ग मनुष्यांचे आहेत.त्या दोन मार्गांनीं जाणारें हें जगत् चांगल्याप्रकारें जातें. ते दोन मार्ग ज्या माता-पित्यांच्या मध्यें आहेत ते जाणतोस का ? " ' यांतील एकही गोष्ट मी जाणत नाहीं ' असें श्वेतकेतु म्हणाला. २.

यद्येवं वेत्थ विजानासि किं यथा येन प्रकारेणेमाः प्रजाः प्रसिद्धाः प्रयत्यो म्रियमाणा विप्रतिपद्यन्ता३ इति विप्रतिपद्यन्ते विचारणार्था प्लुतिः । समानेन मार्गेण गच्छन्तीनां मार्गद्वैविध्यं यत्र भवति तत्र

काश्चित्प्रजा अन्येन मार्गेण गच्छन्ति काश्चिदन्येनेति विप्रतिपत्तिः । यथा ताः प्रजा विप्रतिपद्यन्ते तत्किं वेत्थेत्यर्थः ॥

भाष्यार्थ—असें जर आहे तर 'वेत्थ-' जाणतोस का? 'यथा-' ज्याप्रकारानें 'इमाः प्रजाः-' या प्रसिद्ध मनुष्यादि प्रजा 'प्रयत्यः-' मरणाऱ्या प्रजा 'विप्रतिपद्यन्ता३ इति-' निरनिराळ्या मार्गानें जातात. 'विप्रतिपद्यन्ता३' ही प्लुति विचारणार्थ आहे, [प्रश्न व्यक्त करण्यासाठीं आहे. नाडीरूप सर्व साधारण मार्गानें शरीरांतून बाहेर जाणाऱ्या —अभ्युदयास प्राप्त होणाऱ्या प्रजांचा मार्ग कोठें बदलतो—निरनिराळा होतो तें तूं जाणतोस का? हा या प्रश्नाचा अर्थ आहे. तोच विशद करितात—] समान मार्गानें जाणाऱ्या त्यांचें मार्गद्वैविध्य जेथें होतें, त्यांतील कांहीं प्रजा एका मार्गानें जातात व कांहीं दुसऱ्या मार्गानें जातात, अशी मार्गविप्रतिपत्ति—मार्गभेद होतो; त्या प्रजा ज्याप्रकारें विप्रतिपन्न होतात तें तूं जाणतोस काय? असा भावार्थ.

नेति होवाचेतरः । तर्हि वेत्थ उ यथेमं लोकं पुनरापद्यन्ता३ इति पुनरापद्यन्ते यथा पुनरागच्छन्तीमं लोकम् । नेति हैवोवाच श्वेतकेतुः। वेत्थो यथाऽसौ लोक एवं प्रसिद्धेन न्यायेन पुनः पुनरसकृत्प्रयद्भिर्म्रियमाणैर्यथा येन प्रकारेण न संपूर्यता३ इति न संपूर्यतेऽसौ लोकस्तत्किं वेत्थ । नेति हैवोवाच । वेत्थो यतिथ्यां यत्संख्याकायामाहुत्यामाहुतौ हुतायामापः पुरुषवाचः पुरुषस्य या वाक्सैव यासां वाक्ताः पुरुषवाचो भूत्वा पुरुषशब्दवाच्या वा भूत्वा । यदा पुरुषाकारपरिणतास्तदा पुरुषवाचो भवन्ति । समुत्थाय सम्यगुत्थायोद्भूताः सत्यो वदन्ती३ इति । नेति हैवोवाच ॥

भाष्यार्थ—'नेति होवाच-' 'नाहीं' असें इतर—श्वेतकेतु म्हणाला. 'वेत्थ उ०-' तर मग ज्याप्रकारें त्या प्रजा या लोकास पुनः परत येतात, तें जाणतोस का? 'नेति हैव-' 'नाहीं,' असेंच श्वेतकेतु म्हणाला. 'वेत्थ यथासौ०-' ज्याप्रकारें तो लोक या प्रसिद्ध न्यायानें—

जरा-ज्वरादि मरण-निमित्तानें वारंवार मरून जाणाऱ्या प्रजेकडून अगदीं भरून टाकला जात नाहीं, तो प्रकार तूं जाणतोस का ? 'नेति०-' 'नाहीं' असेंच तो म्हणाला. 'वेत्थ उ यतिथ्यां-' जितक्या संख्येच्या आहुतींचें हवन केलें असतां [ कोणती आहुति दिली असतां ] आप पुरुषवाच होऊन ( चांगल्याप्रकारें उद्भूत होत्सात्या बोलतात तें जाणतोस का, असा संबंध. ) पुरुषाची जी वाक् तीच ज्यांची वाक् आहे त्या 'पुरुषवाचः आपः' तशा होऊन किंवा पुरुषशब्दवाच्य होऊन, जेव्हां आप पुरुषाकारानें परिणाम पावतात तेव्हां 'पुरुषवाचः-' होतात. 'समुत्थाय-' चांगल्याप्रकारें उत्थित होऊन, उद्भूत होत्सात्या 'वदन्ती३ इति-' बोलतात ( कोणत्या आहुतींत होमिलेल्या आप-जल पुरुष या नांवाला पात्र होऊन उद्भवतात व बोलतात तें तूं जाणतोस का ? ) 'नेति०-' 'नाहीं' असेंच श्वेतकेतु म्हणाला.

यद्येवं वेत्थ उ देवयानस्य पथो मार्गस्य प्रतिपदं प्रतिपद्यते येन सा प्रतिपत्तां प्रतिपदं पितृयाणस्य वा प्रतिपदं प्रतिपच्छब्दवाच्यमर्थमाह । यत्कर्म कृत्वा यथाविशिष्टं कर्म कृत्वेत्यर्थः । देवयानं वा पन्थानं मार्गं प्रतिपद्यन्ते पितृयाणं वा यत्कर्म कृत्वा प्रतिपद्यन्ते तत्कर्म प्रतिपदुच्यते तां प्रतिपदं किं वेत्थ देवलोकपितृलोकप्रतिपत्तिसाधनं किं वेत्थेत्यर्थः ॥

भाष्यार्थ—असें जर आहे तर 'वेत्थ उ०-' देवयान मार्गाची प्रतिपद्, ज्यानें प्राप्त होतो ती प्रतिपद्, त्या प्रतिपदेस किंवा पितृयाणमार्गाच्या प्रतिपदेस, प्रतिपद् या शब्दाचा वाच्य अर्थ श्रुति सांगते—'यत्कृत्वा०-' जें कर्म करून—यथाविशिष्ट कर्म करून, असा भावार्थ—देवयान मार्गास प्राप्त होतात अथवा पितृयाण मार्गास जें कर्म करून प्राप्त होतात तें कर्म प्रतिपद् असें म्हटलें जातें. त्या प्रतिपदेला तूं जाणतोस का ? देवलोक-पितृलोकप्राप्तीचें साधन तूं जाणतोस का? असा भावार्थ.

अप्यत्रास्यार्थस्य प्रकाशकमृषेर्मन्त्रस्य वचो वाक्यं नः श्रुतमस्ति ।

मन्त्रोऽप्यस्यार्थस्य प्रकाशको विद्यत इत्यर्थः। कोऽसौ मन्त्र इति। उच्यते। द्वे सृती द्वौ मार्गावशृणवं श्रुतवानस्मि तयोरेका पितृणां प्रापिका पितृलोकसंबद्धा तया सृत्या पितृलोकं प्राप्नोतीत्यर्थः। अहमशृणवमिति व्यवहितेन संबन्धः। देवानामुतापि देवानां संबन्धिन्यन्या देवान्प्रापयति सा ॥

भाष्यार्थ—( 'अहो पण दोन मार्गच नाहींत. तुम्ही हें नुस्तें कल्पनेनें विचारीत आहां,' असें श्वेतकेतु राजाला म्हणेल म्हणून राजा म्हणतो–) 'अपि हि' या कर्मविपाकप्रक्रियेंत या मार्गद्वयाचें प्रकाशक असें 'ऋषेर्वचः नः श्रुतं' मंत्राचें वचन आम्हीं ऐकलें आहे. या अर्थाचा प्रकाशक असा मंत्रही आहे, असा भावार्थ. कोणता तो मंत्र म्हणून म्हणाल तर सांगितलें जातें–'द्वे सृती अशृणवं०-' मी दोन मार्ग ऐकले आहेत. त्यांतील एक मार्ग पितरांची प्राप्ति करून देणारा–पितृलोकाशीं संबद्ध असलेला, त्या मार्गानें पितृलोकास प्राप्त होतो, असा भावार्थ. मंत्रांतील 'पितृणामहं' यांतील अहंशब्दाचा 'अशृणवं' या दूरच्या शब्दाशीं संबंध. 'देवानामुत·' देवांचीही संबंधिनी दुसरी सृती देवांना जी प्राप्त करविते ती.

के पुनरुभाभ्यां सृतिभ्यां पितॄन्देवांश्च गच्छन्तीति। उच्यते। उतापि मर्त्यानां मनुष्याणां संबन्धिन्यौ। मनुष्या एव हि सृतिभ्यां गच्छन्तीत्यर्थः। ताभ्यां सृतिभ्यामिदं विश्वं समस्तमेजद्गच्छत्समेति संगच्छते। ते च द्वे सृती यदन्तरा ययोरन्तरा यदन्तरा पितरं मातरं च मातापित्रोरन्तरा मध्य इत्यर्थः। कौ तौ मातापितरौ द्यावापृथिव्यावण्डकपाले। इयं वै माताऽसौ पितेति हि व्याख्यातं ब्राह्मणेन। अण्डकपालयोर्मध्ये संसारविषये एवैते सृती नाऽऽत्यन्तिकामृतत्वगमनाय। इतर आह नाहमतोऽस्मात्प्रश्नसमुदायादेकंचनैकमपि प्रश्नं न वेद नाहं वेदेति होवाच श्वेतकेतुः ॥ २ ॥

भाष्यार्थ—दोन्ही मार्गांनीं देवांस व पितरांस कोण बरें जातात?

म्हणून म्हणाल तर श्रुति सांगते—' उत मर्त्यानां ' त्याचप्रमाणें मनुष्यांच्या संबंधिनी ह्या सृती आहेत. या दोन मार्गांनीं मनुष्यच जातात, असा भावार्थ. ' ताभ्यां इदं विश्वं एजत्समेति-' त्या दोन सृतींनींच हें समस्त साध्य-साधनात्मक जाणारें असें होत्सातें [ गन्तव्य प्रदेश या रूपानें व गमन करणारें या रूपानें ] संगत होतें. ' यदन्तरा पितरं मातरं च-' ते दोन मार्ग ज्यांच्यामध्यें, पिता व माता यांच्यामध्यें आहेत, असा भावार्थ. ते माता—पिता कोण ? द्यावापृथिवी—ब्रह्मांडाचीं दोन कपाळें. प्रकृतमंत्राचें व्याख्यान करणाऱ्या ब्राह्मणग्रंथानें ही पृथ्वी माता व हा द्युलोक पिता असें व्याख्यान केलें आहे. (' यदन्तरा ' या पदानें विवक्षित असलेला अर्थ सांगतात—) दोन अंडकपाळांच्यामध्यें संसारविषय अशाच या दोन सृती आहेत. त्या आत्यन्तिक--मोक्षगमनासाठीं नाहींत. दुसरा म्हणतो—' नाहमत एकंचन०-' मी या प्रश्नसमुदायांतील एकाही प्रश्नास जाणत नाहीं, असें श्वेतकेतु ह्मणाला २.

अथैनं वसत्योपमन्त्रयांचक्रेऽनादृत्य वसतिं कुमारः प्रदुद्राव स आजगाम पितरं तꣳ होवाचेति वाव किल नो भवान्पुराऽनुशिष्टानवोच इति कथꣳ सुमेध इति पञ्च मा प्रश्नान्राजन्यबन्धुरप्राक्षीत्ततो नैकंचन वेदेति कतमे त इतीम इति ह प्रतीकान्युदाजहार ॥ ३ ॥

अर्थ—नंतर त्या प्रकृतश्वेतकेतूला राजानें राहण्यासाठीं प्रार्थना केली. पण तो कुमार त्याच्या येथील वसतीचा अनादर करून निघून गेला. तो पित्याकडे आला व त्याला ह्मणाला, "असेंचना तुह्मी मला पूर्वी सर्व विद्या शिकविलेला म्हणून म्हटलेंत तें ?" (पिता—) "हे धारणाशक्तिमाना, काय झालें ?" (पुत्र—) "मला तो क्षत्रियबंधु पांच प्रश्न विचारता झाला. पण त्यांतील एकालाही मी जाणत नाहीं." (पिता—) ते कोणते ? ' हे ते ' असें म्हणून त्यानें प्रश्नांचीं मुखें उच्चारलीं ३.

अथानन्तरमपनीय विद्याभिमानगर्वमेनं प्रकृतं श्वेतकेतुं वसत्या वसतिप्रयोजनेनोपमन्त्रयां चक्रे । इह वसन्तु भवन्तः पाद्यमर्घ्यं चाऽऽनीयतामित्युपमन्त्रणं कृतवान्राजा । अनादृत्य तां वसतिं कुमारः श्वेत-

केतुः प्रदुद्राव प्रतिगतवान्पितरं प्रति । स चाऽऽजगाम पितरमागत्य चोवाच तं कथमिति वाव किलैवं किल नोऽस्मान्भवान्पुरा समावर्त-नकालेऽनुशिष्टान्सर्वाभिर्विद्याभिरवोचोऽवोचादिति । सोपालम्भं पुत्रस्य वचःश्रुत्वाऽऽह पिता । कथं केन प्रकारेण तव दुःखमुपजातं हे सुमेधः शोभना मेधा यस्येति सुमेधाः ॥

भाष्यार्थ—' अथ-' नंतर विद्याभिमानगर्व घालवून ' एनं-' त्या-प्रकृत श्वेतकेतूला राजा 'वसत्या-' वसति या प्रयोजनानें 'उपमंत्रयांचक्रे-' उपमंत्रण करता झाला. ' आपण येथें रहा. अरे पाद्य—अर्घ्य आणवा ' असें राजा विनयानें म्हणाला. पण ' अनादृत्य वसतिं०-' तो कुमार[1] श्वेतकेतु त्या वसतीचा अनादर करून पित्याकडे परत गेला ' स आज-गाम०-' तो पित्यापाशीं आला व येऊन त्याला ह्मणाला, तें कसें ह्मणाला तें श्रुति सांगते—' वाव किल नो भवान्पुराऽनुशिष्टानवोच इति-' असेंच ना आह्मांला आपण पूर्वी—समावर्तनकालीं सर्व विद्यांनीं अनु-शिष्ट म्हटलें होतेंत तें ? पुत्राचें हें उपालंभयुक्त—निंदायुक्त भाषण ऐकून पिता ह्मणाला—' कथं सुमेधः इति-' ज्याची मेधा—धारणाशक्ति उत्तम आहे अशा हे पुत्रा, तुला कोणत्या प्रकारें दुःख झालें ? (' सुमेधः' हें संबोधन तुला अज्ञानवशात् दुःख होणें शक्य नाहीं, असें सुचवितें. )

शृणु मम यथा वृत्तं पञ्च पञ्चसंख्याकान्प्रश्नान्मा मां राजन्यबन्धू राजन्या बन्धवो यस्येति । परिभववचनमेतद्राजन्यबन्धुरिति । अप्रा-क्षित्पृष्टवांस्ततस्तस्मान्नैकंचनैकमपि न वेद न विज्ञातवानस्मि । कतमे ते राज्ञा पृष्टाः प्रश्ना इति पित्रोक्तः पुत्र इमे त इति ह प्रतीकानि मुखानि प्रश्नानामुदाजहारोदाहृतवान् ॥ ३ ॥

भाष्यार्थ—माझें काय वर्तमान झालें तें ऐक. 'पञ्च मा प्रश्नान्०-' पांच—पंचसंख्याक प्रश्न मला क्षत्रियबंधु विचारता झाला. राजन्य म्ह० क्षत्रिय आहेत बंधु ज्याचे तो राजन्यबंधु. 'राजन्यबंधु' हें तिरस्कार

१ कुमार, या शब्दानें राजाच्या वसतीचा अनादर करण्याचें कारण सुचविलें.

दाखविणारें वचन आहे. 'ततो नैकंचन०-' त्यांतील एकाही प्रश्नाला मी जाणत नाहीं. 'कतमे ते·' राजानें विचारलेले ते प्रश्न कोणते ? असें पित्यानें विचारलें असतां पुत्र 'इमे ते-' हे ते, असें म्हणून 'प्रतीकानि-'प्रश्नांचीं मुखें'उदाजहार-'उदाहृत करता झाला.उच्चारता झाला३.

स होवाच तथा नस्त्वं तात जानीथा यथा यदहं किंच वेद सर्वमहं तत्तुभ्यमवोचं प्रेहि तु तत्र प्रतीत्य ब्रह्मचर्यं वत्स्याव इति भवानेव गच्छत्विति स आजगाम गौतमो यत्र प्रवाहणस्य जैवलेरास तस्मा आसनमाहृत्योदकमाहारयांचकाराथ हास्मा अर्घ्यं चकार तꣳ होवाच वरं भगवते गौतमाय दद्म इति ॥४॥

अर्थ—तो पिता म्हणाला—"हे वत्सा, मी जें कांहीं जाणतों तें सर्व तुला सांगितलें आहे, असेंच तूं समज. चल आपण त्या राजाकडे जाऊं व तेथें जाऊन ब्रह्मचर्य पाळूं." त्यावर पुत्र म्हणाला, "आपणच जा." तो गौतम जेथें प्रवाहण जैवलीचें श्रोतृस्थान होतें तेथें आला.राजा त्याला आसन देववून उदक आणविता झाला. पुरोहिताकडून अर्घ्य देवविलें. नंतर राजा त्यास म्हणाला " पूज्य गौतमाला आम्ही वर देतों." (काय पाहिजे तें मागा. ) ४.

स होवाच पिता पुत्रं क्रुद्धमुपशमयंस्तथा तेन प्रकारेण नोऽस्मांस्त्वं हे तात वत्स जानीथा गृह्णीथा यथा यदहं किंच विज्ञानजातं वेद सर्वं तत्तुभ्यमवोचमित्येव जानीथाः । कोऽन्यो मम प्रियतरोऽस्ति त्वत्तो यदर्थं रक्षिष्ये । अहमप्येतन्न जानामि यद्राज्ञा पृष्टम् । तस्मात्प्रेह्यागच्छ तत्र प्रतीत्य गत्वा राज्ञि ब्रह्मचर्यं वत्स्यावो विद्यार्थमिति । स आह भवानेव गच्छत्विति नाहं तस्य मुखं निरीक्षितुमुत्सहे ॥

भाष्यार्थ—'स होवाच०-' तो पिता क्रुद्ध झालेल्या पुत्राला उपशांत करीत होत्साता म्हणाला, 'तथा नः त्वं०-' हे बाळा—वत्सा, तूं आम्हाला त्या प्रकारानें जाण कीं ज्या प्रकारें [तूं असें समज कीं] मी जें कांहीं विज्ञानजात जाणतों तें सर्व मीं तुला सांगितलें आहे, असेंच जाण. दुसरा आणखीं मला तुझ्यापेक्षां अधिक प्रिय कोण आहे कीं

ज्याच्यासाठीं मी तें राखून ठेवीन. राजानें जें विचारलें तें मीही जाणत नाहीं. यास्तव 'प्रेहि-' ये; आपण दोघे तेथेंच जाऊन त्या राजापाशीं ब्रह्मचर्य ठेवूं, विद्येसाठीं शिष्य होऊन राहूं. त्यावर तो श्वेतुकेतु म्हणाला 'भवानेव गच्छतु-' आपणच जा. मी त्याचें मुख पाहण्याचीही इच्छा करीत नाहीं.

स आजगाम गौतमो गोत्रतो गौतम आरुणिर्यत्र प्रवाहणस्य जैवलेरासाऽऽसनमास्थायिका षष्ठीद्वयं प्रथमास्थाने तस्मै गौतमायाऽऽगतायाऽऽसनमनुरूपमाहृत्योदकं भृत्यैराहारयांचकार। अथ हास्मा अर्घ्यं पुरोधसा कृतवान्मन्त्रवन्मधुपर्कं च। कृत्वा चैवं पूजां तं होवाच वरं भगवते गौतमाय तुभ्यं दद्म इति गोश्वादिलक्षणम् ॥ ४ ॥

भाष्यार्थ—'स आजगाम गौतमः०-' तो गौतम—गोत्रतः गौतम आरुणि जेथें प्रवाहण जैवलीचें आसन—आस्थायिका—श्रोतृसमूह होता तेथें आला. 'प्रवाहणस्य जैवलेः' ह्या दोन्ही षष्ठी प्रथमेच्या स्थानीं आहेत. 'तस्मै आसनं०-' त्या आलेल्या गौतमाला उचित आसन आणवून भृत्यांकडून उदक आणविलें. 'अथ हास्मै०-' नंतर पुरोहिताकडून त्याला अर्घ्य देवविलें व समंत्रक मधुपर्क करविला. 'तं होवाच०-' याप्रमाणें पूजा करवून त्यास म्हणाला, "आपल्याला—गौतमाला-तुम्हांला गायी, घोडे इत्यादिरूप वर देतों." ४.

स होवाच प्रतिज्ञातो म एष वरो यां तु कुमारस्यान्ते वाचमभाषथास्तां मे ब्रूहीति ॥ ५ ॥

अर्थ—तो म्हणाला, "मला तूं हा वर देण्याचें वचन दिलें आहेस. जी वाणी तूं कुमाराच्या समीप बोललास ती मला सांग" ५

स होवाच गौतमः प्रतिज्ञातो मे ममैष वरस्त्वयाऽस्यां प्रतिज्ञायां दृढीकुर्वात्मानं यां तु वाचं कुमारस्य मम पुत्रस्यान्ते समीपे वाचमभाषथाः प्रश्नरूपां तामेव मे ब्रूहि स एव नो वर इति ॥५॥

भाष्यार्थ—'स होवाच-' तो गौतम म्हणाला 'प्रतिज्ञातो म एष

वरः-' तूं मला हा वर देण्याची प्रतिज्ञा केली आहेस. त्या प्रतिज्ञेमध्यें आपल्याला दृढ कर. [ म्ह० प्रतिज्ञा खरी कर. ] 'यां तु वाचं कुमारस्यान्ते अभाषथाः०-' जी वाणी तूं माझ्या कुमाराच्या—पुत्राच्या समीप बोललास तीच प्रश्नरूप वाणी मला सांग. तोच माझा इष्ट वर आहे.५.

स होवाच दैवेषु वै गौतम तद्वरेषु मानुषाणां ब्रूहीति ॥ ६ ॥

अर्थ—तो राजा म्हणाला—"हे गौतमा तो देवांच्या वरांतील एक वर आहे. मनुष्यांच्या वरांतील एकादा वर माग" ६

स होवाच राजा दैवेषु वरेषु तद्वै गौतम यं त्वं प्रार्थयसे मानुषाणामन्यतमं प्रार्थय वरम् ॥ ६ ॥

भाष्यार्थ—'स होवाच०-' राजा म्हणाला,—'दैवेषु वै०-' हे गौतमा, ज्याविषयीं तूं प्रार्थना करीत आहेस तो दैव वरांतील एक वर आहे. यास्तव मनुष्यांच्या वरांतील एकादा वर माग. ६

स होवाच विज्ञायते ह्यास्ति हिरण्यस्यापात्तं गोअश्वानां दासीनां प्रवाराणां परिधानस्य मा नो भवान्बहोरनन्तस्यापर्यन्तस्याभ्यवदान्यो भूदिति स वै गौतम तीर्थेनेच्छासा इत्युपैम्यहं भवन्तमिति वाचा ह स्मैव पूर्व उपयन्ति स होपायनकीर्त्योवास ॥७॥

अर्थ—गौतम म्हणाला—आपण जाणतांच कीं मजपाशीं माणूस वर आहे. सुवर्णाची प्राप्ति आहे, गायी व घोडे यांची प्राप्ति आहे, दासी, परिवार व परिधान यांची प्राप्ति आहे. आपण इतरांप्रत विपुल, अक्षय फलद व निःसीम धनादिकांचे दाते असून केवळ मजप्रतच अदाते होऊं नका. (राजा म्हणतो—) हे गौतमा, तो तूं शास्त्रविहित न्यायानें मजपासून विद्या मिळविण्याची इच्छा कर. (गौतम—) मी तुजपाशीं शिष्यभावानें येतों. पूर्वीचे ब्राह्मणादिक आपत्तींत केवळ शब्दानेंच उपगमन करीत असत. गौतम केवळ 'उपगमन करतों,' असें बोलूनच त्याच्यापाशीं विद्येसाठीं राहिला. ७

स होवाच गौतमो भवताऽपि विज्ञायते ह ममास्ति सः । न तेन प्रार्थितेन कृत्यं मम यं त्वं दित्ससि मानुषं वरम् । यस्मान्ममाप्यस्ति

हिरण्यस्य प्रभूतस्यापात्तं प्राप्तं गोअश्वानामपात्तमस्तीति सर्वत्रानुषङ्गो दासीनां प्रवाराणां परिवाराणां परिधानस्य च न च यन्मम विद्यमानं तत्त्वत्तः प्रार्थनीयं त्वया वा देयम् । प्रतिज्ञातश्च वरस्त्वया त्वमेव जानीषे यदत्र युक्तं प्रतिज्ञा रक्षणीया तवेति ॥

भाष्यार्थ—'स होवाच०.' गौतम राजास म्हणाला, 'विज्ञायते ह-' मजपाशीं मानुष वर आहे, हें आपणही जाणतां. जो मानुष वर तूं देण्याची इच्छा करीत आहेस तो मागण्याचें मला कांहीं प्रयोजन नाहीं. 'अस्ति हिरण्यस्य अपात्तं-' कारण मलाही पुष्कळ सुवर्ण प्राप्त झालेलें आहे. 'गोअश्वनां-' गायी व घोडे पुष्कळ प्राप्त आहेत, असा 'अस्ति' या क्रियापदाचा सर्वत्र संबंध लावावा. 'दासीनां प्रवाराणां परिधानस्य-' दासी, परिवार व परिधानही प्राप्त आहे. जें मजपाशीं विद्यमान आहे तें तुजपासून मागावयाचें नाहीं व तुलाही तें देणें उचित नाहीं. तूं तर वर देण्याची प्रतिज्ञा केली आहेस. तेव्हां आतां या प्रसंगीं जें युक्त आहे तें तूंच जाणतोस. तुला आपली प्रतिज्ञा पाळणें युक्त आहे.

मम पुनरयमभिप्रायो मा भून्नोऽस्मानभ्यस्मानेव केवलान्प्रति भवान्सर्वत्र वदान्यो भूत्वाऽवदान्यो मा भूत्कदर्यो मा भूदित्यर्थः । बहोः प्रभूतस्यानन्तस्यानन्तफलस्येत्येतत् । अपर्यन्तस्यापरिसमाप्तिकस्य पुत्रपौत्रादिगामिकस्येत्येतत् । ईदृशस्य वित्तस्य मां प्रत्येव केवलमदाता मा भूद्भवान् । न चान्यत्रादेयमस्ति भवतः ॥

भाष्यार्थ—माझा तर असा अभिप्राय आहे. 'मा भूत् नः अभि भवान् बहोः अनन्तस्य अपर्यन्तस्य अवदान्यः-' आपण सर्वत्र दाते असून केवल आम्हांप्रतच अवदान्य—कदर्य[1] होऊं नका, असा भावार्थ. ( कशाचें अदाते ? ) पुष्कळ, अनन्तफळ देणाऱ्या, असा 'अनन्तस्य' याचा भावार्थ, ज्याची परिसमाप्ति होत नाहीं, अशा पुत्र-पौत्रादिकांकडे जाणाऱ्या—वंशपरंपरेनें चालणाऱ्या असा भावार्थ. अशा प्रकारच्या

१ वैभव असतांना तें इतरांना न देणारा कदर्य होय.

विद्याचा केवळ मजप्रतच तूं अदाता होऊं नकोस. दुसऱ्या कोणालाही अदेय असें तुला कांहीं नाहीं. (मला सोडून दुसऱ्या सर्वांना तूं त्यांचा इष्ट वर देत असतोस.)

एवमुक्त आह । स त्वं वै हे गौतम तीर्थेन न्यायेन शास्त्रविहितेन विद्यां मत्त इच्छासा इच्छान्वाप्तुमित्युक्तो गौतम आह । उपैम्युपगच्छामि शिष्यत्वेनाहं भवन्तमिति । वाचा ह स्मैव किल पूर्वे ब्राह्मणाः क्षत्रियान्विद्यार्थिनः सन्तो वैश्यान्वा क्षत्रिया वा वैश्यानापद्युपयन्ति शिष्यवृत्त्या ह्युपगच्छन्ति नोपायनशुश्रूषादिभिः । अतः स गौतमो होपायनकीर्त्योपगमनकीर्तनमात्रेणैवोवासोषितवान्नोपायनं चकार ॥७॥

भाष्यार्थ—असें बोललेला राजा म्हणाला–'स वै गौतम-' हे गौतमा, तो तूं 'तीर्थेन-' शास्त्रविहित न्यायानें 'इच्छासै-' विद्या मजपासून मिळविण्याची इच्छा कर, राजाकडून असें बोलला गेलेला गौतम म्हणाला, 'उपैम्यहं भवन्तं-' मी आपल्यापाशीं शिष्यभावानें येतों. 'वाचा ह स्मैव पूर्वे उपयन्ति-' पूर्वींचे ब्राह्मण विद्यार्थी होऊन आपत्तीमध्यें क्षत्रियांपाशीं किंवा वैश्यांपाशीं अथवा क्षत्रिय वैश्यांपाशीं शिष्यवृत्तीनें येत असत. पादोपसर्पण, शुश्रूषा, इत्यादिकांनीं नाहीं. यास्तव 'स ह उपायनकीर्त्या उवास-' तो गौतम केवळ उपगमनकीर्तनानें—मी शिष्यत्वानें तुम्हांपाशीं येतों, असें नुसतें बोलूनच राहिला. उपसर्पण—पादोपसर्पण केलें नाहीं. ७.

स होवाच तथा नस्त्वं गौतम माऽपराधास्तव च पितामहा यथेयं विद्येतःपूर्वं न कस्मिंश्चन ब्राह्मण उवास तां त्वहं तुभ्यं वक्ष्यामि को हि त्वैवं ब्रुवन्तमर्हति प्रत्याख्यातुमिति ॥८॥

अर्थ—राजा म्हणाला, हे गौतमा, तुझे पितामह आमच्या पितामहांचे अपराध जसे मानीत नसत त्याप्रमाणें तूं हा माझा अपराध मानूं

१ आपल्या बरोबरीच्या किंवा आपल्याहून अधिक अशा मनुष्यापासून विद्याप्राप्तीचा संभव नसणें हीच आपत्ति.

नकोस. यापूर्वी ही विद्या कोणत्याही ब्राह्मणाचे ठिकाणीं नव्हती, हें तूं जाणतोस. पण ती मी तुला सांगतों. असें बोलणाराचा निषेध करण्यास कोण समर्थ आहे ? ८.

एवं गौतमेनाऽऽपदन्तर उक्ते स होवाच राजा पीडितं मत्वा क्षामयंस्तथा नोऽस्मान्प्रति माऽपराधा अपराधं मा कार्षीरस्मदीयोऽपराधो न ग्रहीतव्य इत्यर्थः । तव च पितामहा अस्मत्पितामहेषु यथाऽपराधं न जगृहुस्तथा पितामहानां वृत्तमस्मास्वपि भवता रक्षणीयमित्यर्थः ॥

भाष्यार्थ—याप्रमाणें गौतमानें आपदन्तर सांगितलें असतां 'स होवाच तथा०-' तो राजा या ब्राह्मणाला पीडा—दुःख झालें आहे, असें जाणून त्याच्याकडून क्षमा करवीत म्हणाला 'तथा नः त्वं गौतम मापराधाः-' हे गौतमा, आम्हांप्रत तसा अपराध करूं नको. आमचा हा अपराध आहे, असें समजूं नको, असा भावार्थ. (तसा म्ह० कसा तें सांगतात—) तुझे पितामह आमच्या पितामहांच्या ठिकाणीं जसे अपराध मानीत नव्हते तसें तूंही पितामहांचें वृत्त आमच्या ठिकाणीं राखावेंस (ते जसे आमच्या पूर्वजांशीं वागत होते तसेंच आपण आमच्याशीं वर्तन करावें, असा भावार्थ.)

यथेयं विद्या त्वया प्रार्थितेतस्त्वत्संप्रदानात्पूर्वं प्राङ्न कस्मिन्नपि ब्राह्मण उवासोषितवती तथा त्वमपि जानीषे सर्वदा क्षत्रियपरंपरयेयं विद्याऽऽगता सा स्थितिर्मयाऽपि रक्षणीया यदि शक्यत इत्युक्तं दैवेषु गौतम तद्वरेषु मानुषाणां ब्रूहीति न पुनस्तवादेयो वर इतीतः परं न शक्यते रक्षितुम् । तामपि विद्यामहं तुभ्यं वक्ष्यामि । को ह्यन्योऽपि हि यस्मादेवं ब्रुवन्तं त्वामर्हति प्रत्याख्यातुं न वक्ष्यामीति । अहं पुनः कथं न वक्ष्ये तुभ्यमिति ॥८॥

भाष्यार्थ—'यथेयं विद्येतः पूर्वं०-' तूं मागितलेली ही विद्या तुला

१ विद्याराहित्याच्या अपेक्षेनें हीन वर्णाच्या मनुष्यापाशीं शिष्यत्वानें गमन करणें हें आपदन्तर.

देण्यापूर्वी कोणत्याही ब्राह्मणामध्यें राहत नव्हती—कोणत्याही ब्राह्मणापाशीं ही नव्हती; हें तुलाही माहीत आहे. ही विद्या सर्वदा क्षत्रियपरंपरेनें आलेली आहे. जर शक्य तर ती मर्यादा मलाही पाळली पाहिजे. म्हणून आरंभीं 'तो वर दैव वरांतील आहे, हे गौतमा, तूं मनुष्यांचा वर माग,' असें मीं म्हटलें होतें. तुला वर अदेय आहे, प्रतिज्ञा केल्याप्रमाणें तो द्यावयाचा नाहीं, म्हणून तसें म्हटलें नाहीं- पण आतां यापुढें तिचें रक्षण करणें शक्य नाहीं. 'तां तु अहं तुभ्यं वक्ष्यामि-' ती विद्या तर मी तुला सांगतों. 'को हि त्वैवं०-' मी तुझा शिष्य आहें, असें बोलणाराला मजहून अन्यही कोणी 'मी सांगणार नाहीं जा,' असें म्हणण्यास ज्याअर्थीं समर्थ नाहीं त्याअर्थीं मी तुला ती विद्या कशी बरें सांगणार नाहीं ? (अवश्य सांगेन.) ८.

असौ वै लोकोऽग्निर्गौतम तस्याऽऽदित्य एव समिद्रश्मयो धूमोऽहरर्चिर्दिशोऽङ्गारा अवान्तरदिशो विस्फुलिङ्गास्तस्मिन्नेतस्मिन्नग्नौ देवाः श्रद्धां जुह्वति तस्या आहुत्यै सोमो राजा संभवति ॥९॥

अर्थ—हे गौतमा, द्युलोक हाच अग्नि आहे. त्याची आदित्य हीच समिध् आहे. किरण हा धूम, दिवस ही ज्वाला आहे. दिशा हे निखारे आहेत, अवांतर दिशा हे विस्फुलिंग आहेत. त्या या अग्नीमध्यें देव श्रद्धेचें हवन करितात. त्या आहुतीपासून सोम राजा होतो ९.

असौ वै लोकोऽग्निर्गौतमेत्यादिचतुर्थः प्रश्नः प्राथम्येन निर्णीयते । क्रमभङ्गस्त्वेतन्निर्णयायत्तत्वादितरप्रश्ननिर्णयस्य । असौ द्यौर्लोकोऽग्निर्हे गौतम द्युलोकेऽग्निदृष्टिरनग्नौ विधीयते यथा योषित्पुरुषयोस्तस्य द्युलोकाग्नेरादित्य एव समित्समिन्धनात् । आदित्येन हि समिध्यतेऽसौ लोकः । रश्मयो धूमः समिध उत्थानसामान्यात् । आदित्याद्धि रश्मयो निर्गताः । समिधश्च धूमो लोक उत्तिष्ठति ॥

भाष्यार्थ—'असौ वै लोकोऽग्निर्गौतम०-' इत्यादि चवथ्या प्रश्नाचा प्रथमत्वानें निर्णय केला जातो. इतर प्रश्नांचा निर्णय या प्रश्नाच्या निर्णयाधीन असल्यामुळें वरील क्रमाचा भंग केला आहे. (मनुष्याचा जन्म,

स्थिति व लय चतुर्थ प्रश्नाच्या निर्णयाधीन असल्यामुळें त्यालाच प्राधान्य आहे. त्यामुळें अर्थक्रमाच्या आश्रयानें पाठक्रमाचा भंग करणें उचित आहे, असा भावार्थ.) 'असौ०-' द्यौः स्वर्ग—हा लोक अग्नि आहे, हे गौतमा, वस्तुतः अग्नि नसलेल्या द्युलोकाचे ठिकाणीं अग्निदृष्टीचें विधान केलें जातें. ज्याप्रमाणें स्त्री व पुरुष यांचे ठिकाणीं अग्निदृष्टि करावयास सांगितलें आहे त्याप्रमाणें स्वर्गलोकामध्यें अग्निदृष्टीचें विधान केलें आहे. 'तस्यादित्यः०-'त्याची आदित्य हीच समिध.कारण तो उत्तम प्रकारें दीप्त करीत असतो.आदित्याकडूनच तो लोक उत्तम प्रकारें प्रकाशित केला जातो. 'रश्मयो धूमः-' किरण हा धूर आहे.समिधेपासून उत्पन्न होणें हें धूमाचें साधर्म्य किरणांमध्यें आहे. आदित्यापासून रश्मी किरण निघालेले असतात, हें प्रसिद्ध आहे, व व्यवहारांत समिधेपासून धूर निघतो हेंही प्रसिद्ध आहे.

अहरर्चिः प्रकाशसामान्यात् । दिशोऽङ्गारा उपशमसामान्यात् । अवान्तरदिशो विस्फुलिङ्गा विस्फुलिङ्गवद्विक्षेपात् । तस्मिन्नेतस्मिन्नेवंगुणविशिष्टे द्युलोकाग्नौ देवा इन्द्रादयः श्रद्धां जुह्वत्याहुतिद्रव्यस्थानीयां प्रक्षिपन्ति । तस्या आहुत्या आहुतेः सोमो राजा पितॄणां ब्राह्मणानां च संभवति ॥

भाष्यार्थ—'अहरर्चिः-' दिवस ही ज्वाला आहे. प्रकाश हा ज्वालेचा धर्म दिवसामध्यें आहे. 'दिशोऽङ्गाराः-'दिशा हे कोळसे—निखारे आहेत. कारण उपशम—शांति हें त्यांचें साधर्म्य दिशांमध्यें असतें. 'अवान्तरदिशः विस्फुलिंगाः-'अवान्तर दिशा हीं किटाळें आहेत. कारण किटाळांप्रमाणें त्या इतस्ततः पसरलेल्या आहेत. 'तस्मिन्ने०-' त्या या एवंगुणविशिष्ट द्युलोकरूप अग्नीमध्यें इंद्रादिक देव आहुतिद्रव्यस्थानीय श्रद्धेचा होम करितात. 'तस्या आहुत्याः०-' त्या आहुतीपासून पितर व ब्राह्मण यांचा राजा सोम संभवतो—होतो.

तत्र के देवाः कथं जुह्वति किंवा श्रद्धाख्यं हविरित्यत उक्तमस्माभिः

संबन्धे न त्वेवैनयोस्त्वमुत्क्रान्तिमित्यादिपदार्थषट्कनिर्णयार्थमाग्निहोत्र उक्तम् । ते वा एते अग्निहोत्राहुती हुते सत्यावुत्क्रामतः । ते अन्तरिक्षमाविशतः । ते अन्तरिक्षमाहवनीयं कुर्वाते वायुं समिधं मरीचीरेव शुक्रामाहुतिम् । ते अन्तरिक्षं तर्पयतः । ते तत उत्क्रामतः । ते दिवमाविशतः दिवमाहवनीयं कुर्वाते आदित्यं समिधमित्येवमाद्युक्तम् ॥

भाष्यार्थ—( इंद्रादिकांना कर्मोचा अधिकार नाहीं. द्युलोकाला आहवनीय–अग्नित्व आहे, अशी प्रसिद्धि नाहीं त्यामुळें तो लोक होमाचा आधार होऊं शकत नाहीं, श्रद्धा हा एक प्रत्यय असल्यामुळें त्याला होमद्रव्यत्व संभवत नाहीं, त्यामुळें ' त्यांत देव श्रद्धा होमितात ' हें वाक्य अयुक्त आहे, अशी शंका घेतात–) त्या होमकर्मामध्यें देव कोण ? ते हवन कसें करितात ? श्रद्धासंज्ञक हवि काय आहे ? म्हणून विचाराल, असें जाणूनच आम्हीं या ब्राह्मणाच्या संबंधग्रंथांत सांगितलें आहे. ' सायंकाळीं व प्रातःकाळीं अनुष्ठिलेल्या अग्निहोत्राच्या दोन आहुत्यांची उत्क्रांति वगैरे तूं जाणत नाहींत' असें उत्क्रांतिप्रभृति सहा पदार्थांच्या निर्णयार्थ अग्निहोत्रप्रकरणांत म्हटलें आहे. ( काय म्हटलें आहे तेंच सांगतात–) ' त्या ह्या दोन अग्निहोत्राहुती अग्नींत हुत केल्या असतां उत्क्रान्त होतात. त्या दोन्ही अंतरिक्षांत प्रवेश करितात. त्या अंतरिक्षाला आहवनीय करितात, वायूला समिधा व किरणांनाच शुक्र आहुति करितात. त्या दोन आहुती अंतरिक्षाला तृप्त करितात. त्या तेथूनही उत्क्रमण करितात. त्या द्युलोकांत प्रवेश करितात. त्या द्युलोकाला आहवनीय करितात, आदित्याला समिधा करितात ' इत्यादि अग्निहोत्रप्रकरणांत सांगितलें आहे.

तत्राग्निहोत्राहुती ससाधने एवोत्क्रामतः । यथेह यैः साधनैर्विशिष्टे ये ज्ञायेते आहवनीयाग्निसमिद्धूमाङ्गारविस्फुलिङ्गाहुतिद्रव्यैस्ते तथैवोत्क्रामतोऽस्माल्लोकादमुं लोकम् । तत्राग्निरग्नित्वेन समित्समित्त्वेन धूमो धूमत्वेनाङ्गारा अङ्गारत्वेन विस्फुलिङ्गा विस्फुलिङ्गत्वेनाऽऽहुतिद्रव्यमपि

पयआद्याहुतिद्रव्यत्वेनैव सर्गादावव्याकृतावस्थायामपि परेण सूक्ष्मेणाऽऽत्मना व्यवतिष्ठते ॥

भाष्यार्थ—( आहुत्यांचें उत्क्रमणादिक कसें होतें तें सांगतात—) यजमानाच्या मरणसमयीं अग्निहोत्राहुती साधनासहवर्तमानच उत्क्रमण करितात. [ म्ह० त्या स्वातंत्र्यानें उत्क्रमण करीत नाहींत तर साधनांसहवर्तमानच उत्क्रमण करितात. याचेंच उपपादन—] ज्याप्रमाणें येथें जिवंतदशेंत आहवनीय अग्नि, समिध, धूम, निखारे, किटाळें व आहुतिद्रव्यें इत्यादि ज्या साधनांनीं विशिष्ट अशा ज्या दोन आहुति जाणल्या जातात तशाच त्या या लोकाहून त्या लोकास उत्क्रान्त होतात. ('अहो पण नष्ट झालेल्या अग्न्यादिकांना अव्यक्त भाव प्राप्त झालेला असल्यामुळें ते सर्व सामान्यभावास प्राप्त झालेले असतात. त्यामुळें त्यांसह आहुत्यांची उत्क्रान्तिवगैरे संभवत नाहीं,' अशी आशंका घेऊन सांगतात—)अग्न्यादिकांच्या नाशानंतरही अग्नि अग्नित्वानें, समिध् समित्त्वानें, धूम धूमत्वानें, अंगार अंगारत्वानें, विस्फुलिंग विस्फुलिंगत्वानें आणि आहुतिद्रव्यही पय-आदि आहुतिद्रव्यत्वानेंच सृष्टीच्या आरंभीं अव्याकृतावस्थेंतही अत्यंत सूक्ष्म रूपानें अवस्थित होतें [ म्ह० अग्न्यादिकांचा जरी नाश झाला तरी ते सर्व पदार्थ आपापल्या शक्तीनें अवस्थित होतात. त्यांचा लौकिक स्थूलभाव जरी नष्ट झाला तरी सूक्ष्मभाव राहतो. त्यामुळें वर शंकेंत म्हटल्याप्रमाणें त्यांना सामान्यभाव प्राप्त होण्याचा प्रसंगच येत नाहीं. त्यामुळें आहुत्यांची साधनांसहवर्तमानच उत्क्रान्ति होऊं शकते, असा भावार्थ ].

तद्विद्यमानमेव ससाधनमग्निहोत्रलक्षणं कर्मापूर्वेणाऽऽत्मना व्यवस्थितं सत्तत्पुनर्व्याकरणकाले तथैवान्तरिक्षादीनामाहवनीयाद्यग्न्यादिभावं कुर्वद्विपरिणमते । तथैवेदानीमप्यग्निहोत्राख्यं कर्म । एवमग्निहोत्राहुत्यपूर्वविपरिणामात्मकं जगत्सर्वमित्याहुत्योरेव स्तुत्यर्थत्वेनोत्क्रान्त्याद्या लोकं प्रत्युत्थायितान्ता षट् पदार्थाः कर्मप्रकरणेऽधस्तान्निर्णीताः ॥

भाष्यार्थ—(वरील आहुत्यांच्या उत्क्रांतीचें समर्थन केल्यानें अग्नि-होत्रादिकांपासून उत्पन्न झालेल्या अपूर्वाला जगदारंभकत्व आहे, असेंही सांगितल्यासारखें होतें, असें सांगतात–) याप्रमाणें तें विद्यमान असले-लेंच ससाधन अग्निहोत्ररूप कर्म अपूर्वरूपानें अवस्थित होऊन पुनः व्याकरणसमयीं तें तसेंच अंतरिक्षादिकांचा आहवनीय अग्न्यादिभाव करीत विपरिणाम पावतें. ('अहो पण या प्रकारें पूर्वकल्पीय कर्म प्रलय-दशेंत अव्याकृतरूपानें स्थित होऊन पुनः जगाचा आरंभ करो; पण वर्तमान कल्पांतील कर्म जगदारंभक कसें होणार ?' तें सांगतात–) तसेंच वर्तमानकालीन अग्निहोत्राख्य कर्म. (जगाचें आरंभक होईल. आतां या अग्निहोत्रप्रकरणार्थाचा उपसंहार करितात–) याप्रमाणें हें सर्व जगत् अग्निहोत्राच्या आहुतीपासून उत्पन्न झालेलें जें अपूर्व त्याच्या परिणामात्मक आहे. यास्तव आहुत्यांच्याच स्तुतीकरितां उत्क्रान्तीपासून पुनः परलोकाप्रत यजमानासह जावयास निघणें, येथपर्यंतचे सहा पदार्थ मागें कर्मप्रकरणांत निर्णीत केले आहेत. [ त्या पदार्थांचा पूर्वी निर्णय केला आहे. ]

इह तु कर्तुः कर्मविपाकविवक्षायां द्युलोकाग्न्याद्यारभ्य पञ्चा-ग्निदर्शनमुत्तरमार्गप्रतिपत्तिसाधनं विशिष्टकर्मफलोपभोगाय विधित्सि-तमिति द्युलोकाग्न्यादिदर्शनं प्रस्तूयते ॥

भाष्यार्थ—(वर सांगितलेल्या सिद्धान्ताच्या आधारानें प्रकृत ब्राह्म-णाची प्रवृत्ति कशी झाली आहे तें दाखवितात–) या ब्राह्मणांत कर्त्याच्या कर्मविपाकाची विवक्षा झाली असतां द्युलोकाग्नीपासून आरंभ करून पंचाग्निदर्शन कीं जें उत्तरमार्गप्राप्तीचें साधन आहे तें विशिष्ट कर्म-फलोपभोगासाठीं विधित्सित–विधान करण्यास इष्ट–आहे. (विशिष्ट कर्मफलाच्या उपभोगासाठीं उत्तम मार्गाची प्राप्ति. तिचें साधन पंचाग्नि-दर्शन, असा संबंध.) म्हणून–पंचाग्निविद्या येथें विधित्सित असल्यामुळें द्युलोकादिकांच्या ठिकाणीं विहित असलेलें जें अग्नीचें दर्शन त्याची स्तुति केली जाते.

तत्र य आध्यात्मिकाः प्राणा इहाग्निहोत्रस्य होतारस्त एवाऽऽधिदैविकत्वेन परिणताः सन्त इन्द्रादयो भवन्ति त एवं तत्र होतारो द्युलोकाग्नौ । ते चेहाग्निहोत्रस्य फलभोगायाग्निहोत्रं हुतवन्तः। त एव फलपरिणामकालेऽपि तत्फलभोक्तृत्वात्तत्र तत्र होतृत्वं प्रतिपद्यन्ते तथा तथा विपरिणममाना देवशब्दवाच्याः सन्तः ॥

भाष्यार्थ—(असें असो; पण वरील 'देव कोण ते कसे हवन करितात,' इत्यादि प्रश्नांचें उत्तर काय आहे ? तें सांगतात–) वर सांगितल्याप्रमाणें पंचाग्निविद्या प्रस्तुत आहे, असें ठरलें असतां या व्यवहारभूमींत जे आध्यात्मिक–शरीरांतील प्राण अग्निहोत्राचें हवन करणारे तेच आधिदैविकत्वानें परिणत झाले असतां इंद्रादिक होतात. तेच त्या द्युलोकाग्नींत होते–हवन करणारे–आहेत. कारण ते येथें अग्निहोत्राच्या फलभोगासाठीं अग्निहोत्राचें हवन करीत होते. तेच फलपरिणामाच्या वेळींही, अग्निहोत्रादि कर्मफलाचे भोक्ते[1] असल्यामुळें, त्या त्या ठिकाणीं तसे तसे –त्या त्या आकारानें विपरिणाम पावणारे ते देवशब्दवाच्य होत्साते होतृत्वास प्राप्त होतात. [होते–हवन कर्ते बनतात.]

अत्र च यत्पयोद्रव्यमग्निहोत्रकर्माश्रयभूतमिहाऽऽहवनीये प्रक्षिप्तमग्निना भक्षितमदृष्टेन सूक्ष्मेण रूपेण विपरिणतं सह कर्त्रा यजमानेनामुं लोकं धूमादिक्रमेणान्तरिक्षमन्तरिक्षाद्द्युलोकमाविशति ॥

भाष्यार्थ—('के देवाः' या प्रश्नाचा निर्णय केला. आतां राहिलेल्या प्रश्नद्वयाचा निर्णय करितात–) जिवदवस्थेंत–जिवंतपणीं आहवनीय अग्नींत अग्निहोत्र कर्माचें आश्रयभूत असें जें पयोद्रव्य–दूध–टाकलें होतें व ज्याला अग्नीनें भक्षण केलें होतें तें अदृष्ट–सूक्ष्म रूपानें परिणत झालेलें द्रव्य कर्त्या यजमानासहवर्तमान त्या लोकांत प्रवेश करतें.

---

१ प्राण जीवाची उपाधि होतात. त्यामुळें त्यांना फलभोक्तृत्व आहे, असें समजावें.

(प्रवेशाचा प्रकार–)धूमादिक्रमानें अन्तरिक्षांत,व अन्तरिक्षांतून द्युलोकांत तें आवेश करतें.

ताः सूक्ष्मा आप आहुतिकार्यभूता अग्निहोत्रसमवायिन्यः कर्तृसहिताः श्रद्धाशब्दवाच्याः सोमलोके कर्तुः शरीरान्तरारम्भाय द्युलोकं प्रविशन्त्यो हूयन्त इत्युच्यन्ते । तास्तत्र द्युलोकं प्रविश्य सोममण्डले कर्तुः शरीरमारभन्ते । तदेतदुच्यते देवाः श्रद्धां जुह्वति तस्या आहुत्यै सोमो राजा संभवतीति । "श्रद्धा वा आपः" इति श्रुतेः ॥

भाष्यार्थ—(अहो पण एवढ्यावरून 'तें श्रद्धाख्य हवि काय आहे ?' या प्रश्नाचा निर्णय कसा होतो ? तें सांगतात–) आहुतिकार्यभूत, अग्निहोत्रसंबंधी, कर्तृसहित व श्रद्धाशब्दवाच्य अशा त्या सूक्ष्म आप सोमलोकांत कर्त्याच्या दुसऱ्या शरीराचा आरंभ करण्यासाठीं द्युलोकांत प्रवेश करूं लागल्या असतां ' हवन केल्या जातात ' असें म्हणतात. त्या द्युलोकांत प्रवेश करून त्या सोममंडलांत कर्त्याच्या शरीराचा आरंभ करितात. तेंच हें म्हटलें जातें.–'देव श्रद्धेचें हवन करितात. त्या आहुतीपासून सोम राजा संभवतो.' ('अहो पण आप श्रद्धाशब्दवाच्य कशा ? कारण व्यवहारांत आप–जल याअर्थीं श्रद्धाशब्दाचा प्रयोग केलेला आढळत नाहीं,'अशी आशंका घेऊन सांगतात–)'श्रद्धाच आप आहेत'अशी श्रुति आहे. [ म्ह० लौकिक व्यवहारांत जरी श्रद्धाशब्द आप याअर्थीं योजलेला नसला तरी वैदिक व्यवहारांत तो त्याअर्थीं योजलेला आहे, असा भावार्थ. ]

वेत्थ यतिथ्यामाहुत्यां हुतायामापः पुरुषवाचो भूत्वा समुत्थाय वदन्तीति प्रश्नस्तस्य च निर्णयविषयेऽसौ वै लोकोऽग्निरिति प्रस्तुतम् । तस्मादापः कर्मसमवायिन्यः कर्तुः शरीरारम्भिकाः श्रद्धाशब्दवाच्या इति निश्चीयते । भूयस्त्वादापः पुरुषवाच इति व्यपदेशो न त्वितराणि भूतानि न सन्तीति ॥

भाष्यार्थ—(उपक्रमावरूनही येथें आप श्रद्धाशब्दवाच्य आहे, श्रद्धा-

शब्दानें येथें आपच विवक्षित आहे, हें ठरतें–) 'कितव्या आहुतीचें हवन केलें असतां आप पुरुषवाच होऊन, उत्पन्न होऊन बोलतात,' असा वर प्रश्न आहे व त्याच्या निर्णयविषयामध्यें 'असौ वै लोक: अग्नि:-' हा द्युलोक अग्नि आहे, असा प्रस्ताव–आरंभ केला आहे. तस्मात् कर्मसंबंधी व कर्त्यांच्या शरीराचा आरंभ करणाऱ्या आप श्रद्धाशब्दवाच्य आहेत, असा निश्चय होतो. (अहो पण पुरुषशब्दवाच्य–पुरुष या शब्दाचा अर्थ अशा–आपच शरीरारंभक असल्यामुळें पंचभूतापासून शरीरारंभ झाला आहे, हें म्हणणें खोटें ठरतें, म्हणून म्हणाल तर सांगतात–) इतर भूतांच्या अपेक्षेनें श्रद्धाशब्दवाच्य आपांचें बाहुल्य असल्यामुळें 'आप: पुरुषवाच:' असा उल्लेख केला आहे. त्यांत इतर भूतें मुळीं नाहींतच म्हणून नव्हे.

कर्मप्रयुक्तश्च शरीरारम्भ: । कर्म चाप्समवायि । ततश्चापां प्राधान्यं शरीरकर्तृत्वे । तेन चाऽऽप: पुरुषवाच इति व्यपदेश: । कर्मकृतो हि जन्मारम्भ: सर्वत्र ॥

भाष्यार्थ—(' आप ' पुरुषशब्दवाच्य आहेत याविषयीं आणखी हेतु–) शरीराचा आरंभ कर्मप्रयुक्त आहे. कर्म जल समवायी–आपांशीं संबंध ठेवणारें आहे. त्यामुळें शरीरकर्तृत्वामध्यें आपांचें प्राधान्य आहे. त्यामुळें 'आप: पुरुषवाच:' असा व्यपदेश–निर्देश संभवतो. सर्वत्र कर्म करणाराच्याच जन्माचा आरंभ होतो. (कारण त्यावाचून प्रत्येक प्राण्याच्या भिन्न भिन्न सुखदु:खोपभोगांची उपपत्ति लागत नाहीं. यास्तव कर्म करणाराच्याच जन्माचा आरंभ होतो.)

तत्र यद्यप्यग्निहोत्राहुतिस्तुतिद्वारेणोत्क्रान्त्यादय: प्रस्तुता षट् पदार्था अग्निहोत्रे तथाऽपि वैदिकानि सर्वाण्येव कर्माण्यग्निहोत्रप्रभृतीनि लक्ष्यन्ते । दाराग्निसंबद्धं हि पाङ्क्तं कर्म प्रस्तुत्योक्तम् । कर्मणा पितृलोक इति । वक्ष्यति च । अथ ये यज्ञेन दानेन तपसा लोकाञ्जयन्तीति ॥ ९ ॥

भाष्यार्थ —(' अपूर्व या नांवाचें कर्मच जर शरीरारंभक आहे तर

पूर्वी अग्निहोत्राच्या दोन आहुत्यांनाच व्यक्त जगाचें आरंभकत्व कसें सांगितलें आहे ?' उत्तर—) त्या अग्निहोत्रप्रकरणांत जरी अग्निहोत्राहुतींच्या स्तुतिद्वारा उत्क्रान्त्यादिक सहा पदार्थ प्रस्तुत आहेत तरी अग्निहोत्राहुतीनें अग्निहोत्रप्रभृति सर्वच वैदिक कर्में लक्षित होतात. दारा व अग्नि यांशीं संबद्ध असलेलें पांक्त कर्म आरंभून—त्याचा उपक्रम करून 'कर्मणा पितृलोकः-' असें म्हटलें आहे. तसेंच, 'जे यज्ञानें दानानें तपानें लोकांस जिंकतात,' असें पुढें श्रुति सांगेल. ९.

पर्जन्यो वा अग्निर्गौतम तस्य संवत्सर एव समिदभ्राणि धूमो विद्युदर्चिरशनिरङ्गारा ह्रादुनयो विस्फुलिङ्गास्तस्मिन्नेतस्मिन्नग्नौ देवाः सोमꣳराजानं जुह्वति तस्या आहुत्यै वृष्टिः संभवति ॥१०॥

अर्थ—हे गौतमा, पर्जन्यच अग्नि आहे. त्याची संवत्सर हीच समिध, अभ्रें हा धूम, विद्युत् ही ज्वाला, अशनि हे निखारे, मेघाचा गडगडाट, हे विस्फुलिंग आहेत,त्या या अग्नींत देव सोम राजाचें हवन करितात. त्या आहुतीपासून वृष्टि संभवते. १०

पर्जन्यो वा अग्निर्गौतम द्वितीय आहुत्याधार आहुत्योरावृत्तिक्रमेण । पर्जन्यो नाम वृष्ट्युपकरणाभिमानी देवतात्मा । तस्य संवत्सर एव समित् । संवत्सरेण हि शरदादिभिर्ग्रीष्मान्तैः स्वावयवैर्विपरिवर्तमानेन पर्जन्योऽग्निर्दीप्यते । अभ्राणि धूमः । धूमप्रभवत्वाद्धूमवदुपलक्ष्यत्वाद्वा । विद्युदर्चिः । प्रकाशसामान्यात् । अशनिरङ्गाराः । उपशान्तकाठिन्यसामान्याभ्याम् ॥

भाष्यार्थ—(पहिला आहुतींचा आधार सांगून दुसऱ्या आहुत्याधारांचें क्रमानें निरूपण करितात—) 'पर्जन्यो वा अग्निर्गौतम-' हे गौतमा, पर्जन्य हा अग्नि आहे. दोन्ही अग्निहोत्राहुतींच्या आवृत्तिक्रमानें दुसरा आहुतीचा आधार. पर्जन्य म्ह० वृष्टीच्या उपकरणांवर 'मी' असा अभिमान धरणारा देवतात्मा. त्याची 'संवत्सर हीच समिधा' आहे. शरद् ऋतूपासून ग्रीष्म ऋतूपर्यंत जे आपले अवयव त्यांच्या योगानें

पुनः पुनः परिवर्तन पावणाऱ्या संवत्सराकडून पर्जन्य हा अग्नि प्रदीप्त केला जातो. 'अभ्रें हाच धूम' आहे. कारण तीं अभ्रें धूमापासून उद्भवणारीं आहेत किंवा धूमाप्रमाणें उपलक्षित होतात, (दिसतात). 'विद्युत् ही ज्वाला' आहे. प्रकाश हें ज्वालेचें साधर्म्य विद्युत्-मध्यें आहे. 'अशनि हे निखारे—कोळसे' आहेत. कारण अशनि व निखारे—कोळसे या दोन्हीमध्यें उपशान्तत्व व काठिन्य अशीं दोन सामान्यें आहेत.

ह्रादुनयो ह्लादुनयस्तनयित्नुशब्दा विस्फुलिङ्गाः । विक्षेपानेकत्वसामान्यात् । तस्मिन्नेतस्मिन्नित्याहुत्यधिकरणनिर्देशः । देवा इति त एव होतारः सोमं राजानं जुह्वति । योऽसौ द्युलोकाग्नौ श्रद्धायां हुतायामभिनिर्वृत्तः सोमः स द्वितीये पर्जन्याग्नौ हूयते । तस्याश्च सोमाहुतेर्वृष्टिः संभवति ॥ १० ॥

भाष्यार्थ—'ह्रादुनयः-' मेघाचे शब्द हे विस्फुलिंग आहेत. कारण इतस्ततः विक्षेप व अनेकत्व हें त्यांत सामान्य आहे. 'तस्मिन्नेतस्मिन्०-' त्या या अग्नींत, असा आहुतीच्या अधिकरणाचा निर्देश केला आहे. 'देवाः' या शब्दानें तेच होम करणारे—देवरूपानें परिणत झालेले प्राण घ्यावे. 'सोमं राजानं जुह्वति-' सोम राजास होमितात. द्युलोकाग्नीमध्यें श्रद्धेचें हवन केलें असतां निष्पन्न झालेला जो हा सोम तो दुसऱ्या पर्जन्याग्नींत होमिला जातो. त्या सोमाहुतीपासून वृष्टि संभवते [होते.] १०

अयं वै लोकोऽग्निर्गौतम तस्य पृथिव्येव समिदग्निर्धूमो रात्रिरर्चिश्चन्द्रमा अङ्गारा नक्षत्राणि विस्फुलिङ्गास्तस्मिन्नेतस्मिन्नग्नौ देवा वृष्टिं जुह्वति तस्या आहुत्या अन्नꣳ संभवति ॥ ११ ॥

अर्थ—हा लोकच अग्नि. त्याची पृथिवी हीच समिधा, अग्नि हा धूम, रात्रि अर्चि, चंद्रमा हे निखारे, नक्षत्रें हे विस्फुलिंग; त्या या अग्नींत देव वृष्टीचें हवन करितात. त्या आहुतीपासून अन्न उद्भवतें. ११

अयं वै लोकोऽग्निर्गौतम । अयं लोक इति प्राणिजन्मोपभोगाश्रयः क्रियाकारकफलविशिष्टः स तृतीयोऽग्निः । तस्याग्नेः पृथिव्येव समित् ।

पृथिव्या ह्ययं लोकोऽनेकप्राण्युपभोगसंपन्नया समिध्यते । अग्निर्धूमः । पृथिव्याश्रयोत्थानसामान्यात् । पार्थिवं हीन्धनद्रव्यमाश्रित्याग्निरुत्तिष्ठति । यथा समिदाश्रयेण धूमः । रात्रिरर्चिः । समित्संबन्धप्रभवसामान्यात् । अग्नेः समित्संबन्धेन ह्यर्चिः संभवति । तथा पृथिवीसमित्संबन्धेन शर्वरी । पृथिवीछायां हि शार्वरं तम आचक्षते । चन्द्रमा अङ्गाराः । तत्प्रभवत्वसामान्यात् । अर्चिषो ह्यङ्गाराः प्रभवन्ति । तथा रात्रौ चन्द्रमा उपशान्तत्वसामान्याद्वा । नक्षत्राणि विस्फुलिङ्गाः । विस्फुलिङ्गवद्विक्षेपसामान्यात् । तस्मिन्नेतस्मिन्नित्यादि पूर्ववत् । वृष्टिं जुह्वति तस्या आहुतेरन्नं संभवति । वृष्टिप्रभवत्वस्य प्रसिद्धत्वाद्व्रीहियवादेरन्नस्य ॥ ११ ॥

भाष्यार्थ—'अयं वै०' हे गौतमा, हा लोकच अग्नि आहे. 'अयं लोकः' या शब्दानें प्राण्यांचा जन्म व उपभोग यांचा आश्रय क्रियाकारक-फलविशिष्ट असा हा लोक घ्यावा. तो तिसरा अग्नि आहे. त्या अग्नीची पृथिवी हीच समिध् आहे. कारण अनेक प्राण्यांच्या उपभोगांनीं संपन्न असलेल्या पृथ्वीकडून हा लोक प्रकाशमान केला जातो. अग्नि हा त्याचा धूम आहे. पृथिवी या आश्रयापासून उत्थान पावणें हें त्यांत सामान्य आहे. जसा समिधेच्या आश्रयानें धूम उद्भवतो त्याप्रमाणें पार्थिव इंधन-द्रव्याचा आश्रय करून अग्नि उत्थित होतो, हें प्रसिद्ध आहे. 'रात्रि ही ज्वाला' आहे. समिधेच्या संबंधानें उद्भवणें हें सामान्य त्यांत आहे. अग्नीपासून समित्संबंधानें ज्वाला उद्भवते, हें प्रसिद्ध आहे. त्याचप्रमाणें पृथिवी या समिधेच्या संबंधानें रात्री होते. पृथिवीच्या छायेलाच रात्रीचें तम—अंधकार म्हणतात. चंद्रमा हे त्या अग्नीचे निखारे आहेत. कारण त्यापासून उद्भवणें हें त्यांत सामान्य आहे. ज्वालेपासून निखारे उद्भवतात. त्याचप्रमाणें रात्री चंद्रमा उद्भवतो. किंवा उपशान्तत्व या साधर्म्यावरून चंद्रमाला या अग्नीचे निखारे म्हटलें आहे. 'नक्षत्रें हे विस्फुलिंग' आहेत. कारण किटाळांप्रमाणें इतस्ततः पसरणें हें नक्ष-

त्रांमध्यें सामान्य आहे. 'तस्मिन्नेतस्मिन्०-'याचा अर्थ पूर्वीप्रमाणें जाणावा. वृष्टीचें हवन करितात. त्या आहुतीपासून अन्न उद्भवतें. व्रीहि-यवादिक अन्नाचें वृष्टिप्रभवत्व-वृष्टीपासून होणें प्रसिद्ध आहे. ११.

पुरुषो वा अग्निर्गौतम तस्य व्यात्तमेव समित्प्राणो धूमो वागर्चिश्चक्षुरङ्गाराः श्रोत्रं विस्फुलिङ्गास्तस्मिन्नेतस्मिन्नग्नौ देवा अन्नं जुह्वति तस्या आहुत्यै रेतः संभवति ॥१२॥

अर्थ—हे गौतमा, पुरुष हा अग्नि आहे त्याचें उघडलेलें मुख हीच समिध, प्राण हा धूम, वाक् ही ज्वाला, चक्षु हे निखारे व श्रोत्र हीं किटाळें; त्या या अग्नीमध्यें देव अन्नाचें हवन करितात. त्या आहुतीपासून रेत उद्भवतें. १२.

पुरुषो वा अग्निर्गौतम प्रसिद्धः शिरःपाण्यादिमान्पुरुषश्चतुर्थोऽग्निस्तस्य व्यात्तं विवृतं मुखं समित् । विवृतेन हि मुखेन दीप्यते पुरुषो वचनस्वाध्यायादौ । यथा समिधाऽग्निः । प्राणो धूमस्तदुत्थानसामान्यात् । मुखाद्धि प्राण उत्तिष्ठति । वाक्शब्दोऽर्चिर्व्यञ्जकत्वसामान्यात् । अर्चिश्च व्यंजकम् । तथा वाक्शब्दोऽभिधेयव्यंजकः । चक्षुरङ्गारा उपशमसामान्यात्प्रकाशाश्रयत्वाद्वा । श्रोत्रं विस्फुलिङ्गा विक्षेपसामान्यात् । तस्मिन्नन्नं जुह्वति ॥

भाष्यार्थ—'पुरुषो वा अग्निर्गौतम०-' हे गौतमा, मस्तक, हात, पाय इत्यादि अवयवसंपन्न असलेला हा प्रसिद्ध पुरुष हाच चवथा अग्नि आहे. त्याचें 'व्यात्तं-' उघडलेलें मुख हीच समिध आहे, कारण विवृत—उघडलेल्या मुखानेंच पुरुष वचन-स्वाध्याय इत्यादिकांमध्यें दीप्त होतो. जसा समिधेनें अग्नि दीप्त होतो त्याप्रमाणें. समिधेपासून उत्पन्न होणें, या सामान्यामुळें प्राण हा धूम आहे. मुखापासून प्राण उद्भवतो हें प्रसिद्ध आहे. वाक्—शब्द ही ज्वाला आहे. कारण व्यक्त करणें, हें त्या दोन्हींमध्यें सामान्य आहे. ज्वाला व्यंजक—पदार्थांना व्यक्त करणारी आहे. तशीच वाक्—शब्द अर्थव्यंजक आहे.

'चक्षु हे अंगार' निखारे आहेत. कारण उपशम हें त्यांत सामान्य आहे. किंवा प्रकाशाश्रयत्व हें सामान्य आहे. 'श्रोत्र हे विस्फुलिंग' आहेत. कारण विक्षेप—इतस्ततः पसरणें हें त्यांत सामान्य आहे. त्यांत अन्नाचा होम करितात.

ननु नैव देवा अन्नमिह जुह्वतो दृश्यन्ते । नैष दोषः । प्राणानां देवत्वोपपत्तेः । अधिदैवमिन्द्रादयो देवास्त एवाध्यात्मं प्राणास्ते चान्नस्य पुरुषे प्रक्षेप्तारः । तस्या आहुते रेतः संभवति । अन्नपरिणामो हि रेतः १२

भाष्यार्थ—'अहो पण देव या पुरुषाग्नींत अन्नाचें हवन करीत असल्याचें दिसत नाहीं.' (उत्तर—) हा दोष येत नाहीं. कारण प्राणांनाच देवत्वाची उपपत्ति आहे. जे देवांमध्यें इंद्रादिक देव तेच शरीरांत वागादिक प्राण. तेच पुरुषामध्यें अन्नाचा प्रक्षेप करणारे आहेत. त्या आहुतीपासून रेत उद्भवतें. रेत हा अन्नाचा परिणाम आहे, हें प्रसिद्ध आहे. १२.

योषा वा अग्निर्गौतम तस्या उपस्थ एव समिल्लोमानि धूमो योनिरर्चिर्यदन्तः करोति तेऽङ्गारा अभिनन्दा विस्फुलिङ्गास्तस्मिन्नेतस्मिन्नग्नौ देवा रेतो जुह्वति तस्या आहुत्यै पुरुषः संभवति स जीवति यावज्जीवत्यथ यदा म्रियते ॥ १३ ॥

अर्थ—हे गौतमा, स्त्री हाच अग्नि आहे. तिचें उपस्थ—जननेंद्रिय हीच समिध्, लोम हा धूम, योनि ही ज्वाला, जें अन्तः करण—मैथुनव्यापार ते अंगार, व जे त्यामुळें होणारे सुखलेश ते विस्फुलिंग होत. त्या या अग्नींत देव रेताचें हवन करितात. त्या आहुतीपासून पुरुष उद्भवतो. याप्रमाणें झालेला तो पुरुष कांहीं काल जिवंत राहतो. कर्मक्षय होईपर्यंत जिवंत राहतो. पण त्या कर्माचा क्षय झाला असतां जेव्हां तो मरतो ( जेव्हां त्याला अन्त्य आहुतीकरितां अग्नींत होमितात असा पुढील कंडिकेशीं संबंध ) १३.

योषा वा अग्निर्गौतम । योषेति स्त्री पञ्चमो होमाधिकरणोऽग्निस्तस्या उपस्थ एव समित् । तेन हि सा समिध्यते । लोमानि धूमस्त-

दुत्थानसामान्यात् । योनिरार्चिर्वर्णसामान्यात् । यदन्तः करोति तेऽङ्गारा अन्तः करणं मैथुनव्यापारस्तेऽङ्गारा वीर्योपशमहेतुत्वसामान्यात्। वीर्याद्युपशमकारणं मैथुनम् । तथाऽङ्गारभावोऽग्नेरुपशमकारणम् । अभिनन्दाः सुखलवाः क्षुद्रत्वसामान्याद्विस्फुलिङ्गाः । तस्मिन्रेतो जुह्वति । तस्या आहुतेः पुरुषः संभवति ॥

भाष्यार्थ—'योषा वा०-' हे गौतमा, योषा हा अग्नि आहे. योषा म्ह० स्त्री, तो पांचवा होमाधिकरण अग्नि आहे. तिचा उपस्थ हीच समिध् आहे. कारण त्याच्या योगानेंच ती दीप्त केली जाते. त्यापासून उठणें या सामान्यामुळें 'लोम हाच धूम' आहे. लाल रंगाच्या सामान्यामुळें 'योनि ही ज्वाला' आहे. 'जें पुरुषाचें अंतः करण ते अंगार—कोळसे किंवा निखारे,' अन्तः करण म्ह० मैथूनव्यापार. ते अंगार होत. कारण वीर्याच्या उपशमाचें हेतुत्व हें त्यांत साधर्म्य आहे. मैथुन हें वीर्यादिकांच्या उपशमाचें कारण आहे. तसाच अंगारभाव अग्नीच्या उपशमाचें कारण आहे. 'अभिनन्दाः०-' सुखाचे लेश हे क्षुद्रत्व या सामान्यामुळें विस्फुलिंग आहेत. त्यांत रेताचें हवन करितात. त्या आहुतीपासून पुरुष संभवतो.

एवं द्युपर्जन्यायंलोकपुरुषयोषाग्निषु क्रमेण हूयमानाः श्रद्धासोमवृष्ट्यन्नरेतोभावेन स्थूलतारतम्यक्रमसापद्यमानाः श्रद्धाशब्दवाच्या आपः पुरुषशरीरमारभन्ते। यः प्रश्नश्चतुर्थो वेत्थ यतिथ्यामाहुत्यां हुतायामापः पुरुषवाचो भूत्वा समुत्थाय वदन्ती३ इति स एष निर्णीतः । पञ्चम्यामाहुतौ योषाग्नौ हुतायां रेतोभूता आपः पुरुषवाचो भवन्तीति । स पुरुष एवं क्रमेण जातो जीवति । कियन्तं कालमिति । उच्यते । यावज्जीवति यावदस्मिञ्छरीरे स्थितिनिमित्तं कर्म विद्यते तावदित्यर्थः। अथ तत्क्षये यदा यस्मिन्काले म्रियते ॥ १३ ॥

भाष्यार्थ--( त्या आहुतीपासून पुरुष संभवतो, या वाक्याचेंच व्याख्यान करितात—) याप्रमाणें द्युलोक, पर्जन्य, हा लोक, पुरुष व स्त्री या पांच अग्नींमध्यें क्रमानें हवन केल्या जाणाऱ्या, श्रद्धा, सोम,

वृष्टि, अन्न व रेत या भावानें स्थूलतारतम्याच्या क्रमास प्राप्त होणाऱ्या श्रद्धाशब्दवाच्य आप पुरुषशरीरास आरंभ करितात. 'वेत्थ यतिथ्यां आहुत्यां हुतायां आपः पुरुषवाचो भूत्वा समुत्थाय वदन्ती३ इति-' कितव्या आहुतीचें हवन केलें असतां आप पुरुषशब्दवाच्य होऊन उत्पन्न होऊन बोलतात,तें तूं जाणतोस का?असा जो राजानें केलेला चवथा प्रश्न त्याचा हा निर्णय झाला आहे. पांचव्या योषाग्नीमध्यें रेतोभूत आपांचें हवन केलें असतां त्या आप पुरुषवाच होतात, हा त्या प्रश्नाचा निर्णय आहे. 'स जीवति-' या क्रमानें झालेला तो पुरुष जिवंत राहतो. किती काल जिवंत राहतो, तें सांगितलें जातें. 'यावज्जीवति-' जोंवर या शरीरांतील त्याच्या स्थितीला कारण होणारें कर्म विद्यमान असतें तोंवर, असा याचा भावार्थ.(याप्रमाणें पंचाग्निक्रमानें झालेला असा हा मी अग्नींत लय पावणारा आहें त्यामुळें अग्निरूप आहें, अशा ध्यानाची सिद्धि होण्यासाठीं सहाव्या अग्नीचा--आहुति-अधिकरणाचा प्रस्ताव श्रुति करते--) 'अथ-' नंतर जीवननिमित्त कर्माचा क्षय झाला असतां 'यदा-' ज्यावेळीं 'म्रियते-' मरतो ( तेव्हां त्यास अग्नीमध्यें नेतात, असा पुढच्या कंडिकेशीं संबंध ) १३.

अथैनमग्नये हरन्ति तस्याग्निरेवाग्निर्भवति समित्समिद्धूमो धूमोऽर्चिरर्चिरङ्गारा अङ्गारा विस्फुलिङ्गा विस्फुलिङ्गास्तस्मिन्नेतस्मिन्नग्नौ देवाः पुरुषं जुह्वति तस्या आहुत्यै पुरुषो भास्वरवर्णः संभवति॥१४॥

अर्थ—तेव्हां त्या मृताला अग्नींत होम करण्याकरितां नेतात. त्या आहुतिभूत मृताचा प्रसिद्ध अग्नि हाच अग्नि होतो. समिधा हीच समिधा,प्रसिद्ध धूम हाच त्याचा धूम,अर्चि हीच आर्चि,अंगार हेच अंगार,व विस्फुलिंग हेच विस्फुलिंग होत. त्या या अग्नीमध्यें देव पुरुषाला होमितात. त्या आहुतीपासून पुरुष अतिशय दीप्तिमान् होतो १४.

अथ तदैनं मृतमग्नयेऽन्त्यर्थमेवान्त्याहुत्यै हरन्ति ऋत्विजस्तस्याऽऽहुतिभूतस्य प्रसिद्धोऽग्निरेव होमाधिकरणं न परिकल्प्योऽग्निः। प्रसिद्धैव समित्समिद्धूमो धूमोऽर्चिरर्चिरङ्गारा अङ्गारा विस्फुलिङ्गा

विस्फुलिङ्गा यथाप्रसिद्धमेव सर्वमित्यर्थः । तस्मिन्पुरुषमन्त्याहुतिं जुह्वति तस्या आहुत्या आहुतेः पुरुषो भास्वरवर्णोऽतिशयदीप्तिमान्निषेकादिभिरन्त्याहुत्यन्तैः कर्मभिः संस्कृतत्वात्संभवति निष्पद्यते ॥ १४ ॥

भाष्यार्थ--'अथ-' त्यावेळीं, 'एनं-' या मृताला 'अग्नये-' अग्नीसाठींच–अन्त्य आहुतीसाठीं ऋत्विज 'हरन्ति-' हरण करितात–नेतात. त्या आहुतिभूत पुरुषाचा प्रसिद्ध अग्नि हाच अग्नि–होमाचें अधिकरण आहे. येथें अग्नीची परिकल्पना करावी लागत नाहीं. प्रसिद्ध 'समिध्' हीच समिध् आहे, धूम हाच धूम आहे, आर्चि हीच अर्चि आहे, अंगार हेच अंगार आहेत, व विस्फुलिंग हेच विस्फुलिंग आहेत. सर्व यथाप्रसिद्धच आहे, असा भावार्थ. त्या अग्नींत पुरुषास–अन्त्याहुतीस होमितात. त्या आहुतीपासून पुरुष भास्वरवर्ण–अतिशय दीप्तिमान् 'संभवति-' निष्पन्न होतो. निषेकापासून या अन्त्य आहुतीपर्यंत जीं कर्में त्या कर्मांनीं तो संस्कृत झालेला असल्यामुळें अतिशय दीप्तिमान् होतो १४.

ते य एवमेतद्विदुर्ये चामी अरण्ये श्रद्धाꣳ सत्यमुपासते तेऽर्चिरभिसंभवन्त्यर्चिषोऽहरह्न आपूर्यमाणपक्षमापूर्यमाणपक्षाद्यान्षण्मासानुदङ्ङादित्य एति मासेभ्यो देवलोकं देवलोकादादित्यमादित्याद्वैद्युतं तान्वैद्युतान्पुरुषो मानस एत्य ब्रह्मलोकान्गमयति ते तेषु ब्रह्मलोकेषु पराः परावतो वसन्ति तेषां न पुनरावृत्तिः ॥ १५ ॥

अर्थ—ते जे गृहस्थ अग्नि, समिध् इत्यादिकांनीं विशिष्ट अशा पंचाग्नींस जाणतात तसेच जे हे अरण्यांतील परिव्राजक व वानप्रस्थ श्रद्धायुक्त होऊन सत्य ब्रह्मास–हिरण्यगर्भात्म्यास जाणतात ते अर्चिरभिमानी देवतेला प्राप्त होतात. या देवतेपासून अहरभिमानी देवतेस, तेथून शुक्लपक्षदेवतेस, शुक्लपक्षापासून ज्या सहा महिन्यांत सूर्य उत्तरेस जातो त्या मासांच्या अभिमानी देवतेस, तेथून देवलोकास, देवलोकापासून आदित्यास, आदित्यापासून वैद्युतास. त्या वैद्युतांस मानस पुरुष येऊन ब्रह्मलोकांस पोचवितो. ते त्या ब्रह्मलोकांमध्यें अनंत संवत्सर राहतात. त्यांची पुनरावृत्ति होत नाहीं १५.

इदानीं प्रथमप्रश्ननिराकरणार्थमाह । ते । के । य एवं यथोक्तं पञ्चाग्निदर्शनमेतद्विदुः । एवंशब्दादग्निसमिद्धूमार्चिरङ्गारविस्फुलिङ्गश्रद्धादिविशिष्टाः पञ्चाग्नयो निर्दिष्टास्तानेवमेतान्पञ्चाग्नीन्विदुरित्यर्थः ॥

भाष्यार्थ—( पंचाग्निवेत्त्याची गति सांगण्याची इच्छा करणारे भाष्यकार उत्तर ग्रंथाला अवतरण देतात–) आतां पहिल्या प्रश्नाच्या निराकरणार्थ श्रुति सांगते–' ते-' ते, कोण ? ' ये एवमेतद्विदुः-' जे वर सांगितलेलें हें पंचाग्निदर्शन जाणतात, ( ते अर्चीला प्राप्त होतात असा संबंध. ) श्रुतींत ' एवं ' असा शब्द असल्यामुळें अग्नि, समिध्, धूम, अर्चि, अंगार, विस्फुलिंग, श्रद्धा इत्यादिकांनीं विशिष्ट अशा ज्या पंचाग्नींचा निर्देश केलेला आहे; त्या अशाप्रकारच्या या पंचाग्नींस जे जाणतात, असा भावार्थ.

नन्वग्निहोत्राहुतिदर्शनविषयमेवैतद्दर्शनम् । तत्र ह्युक्तमुत्क्रान्त्यादिपदार्थषट्कनिर्णये दिवमेवाऽऽहवनीयं कुर्वाते इत्यादि । इहाप्यमुष्य लोकस्याग्नित्वमादित्यस्य च समित्त्वमित्यादि बहु साम्यम् । तस्मात्तच्छेषमेवैतद्दर्शनमिति ॥

भाष्यार्थ—( ' एवं ' शब्द प्रकृत पंचाग्नींचा परामर्श करणारा आहे, हें स्पष्ट करण्यासाठीं आक्षेप घेतात–) अहो पण हें दर्शन अग्निहोत्राहुतिदर्शनविषयकच आहे. त्या दर्शनांतील उत्क्रांत्यादि सहा पदार्थांच्या निर्णयांत ' द्युलोकासच आहवनीय करितात,' इत्यादि सांगितलें आहे. येथेंही त्या परलोकाचें अग्नित्व आदित्याचें समित्त्व इत्यादि पुष्कळ साम्य आहे, तस्मात् हें दर्शन त्याचेंच शेष–अंग आहे.

न यतिथ्यामितिप्रश्नप्रतिवचनपरिग्रहात् । यतिथ्यामित्यस्य प्रश्नस्य प्रतिवचनस्य यावदेव परिग्रहस्तावदेवैवंशब्देन परामृष्टुं युक्तम् । अन्यथा प्रश्नानर्थक्यान्निर्ज्ञातत्वाच्च संख्याया अग्नय एव वक्तव्याः । अथ निर्ज्ञातमप्यनूद्यते । यथाप्राप्तस्यैवानुवदनं युक्तं नत्वसौ लोकोऽग्निरिति ॥ अथोपलक्षणार्थः । तथाऽप्याद्येनान्त्येन चोपलक्षणं युक्तम् ॥

भाष्यार्थ—( प्रकृत प्रश्नप्रतिवचनविषयाचाच एवंशब्दानें परामर्श केलेला असल्यामुळें सहा प्रश्नविषयींच्या दर्शनाचा येथें परामर्श संभवत नाहीं, असा परिहार करितात -) हें म्हणणें बरोबर नाहीं. कारण 'यतिथ्यां०-' इत्यादि या प्रश्नाचा व प्रतिवचनाचा जेवढा परिग्रह केला आहे तेवढ्याचाच एवंशब्दानें परामर्श करणें युक्त आहे. ( दूरच्या सहा प्रश्नांचाच येथील एवंशब्दानें जर परामर्श केला असता तर 'यतिथ्यां' हा प्रश्न व्यर्थ झाला असता. कारण अग्निहोत्रप्रकरणांतील षट्प्रश्नीनें ज्याचा निर्णय केला आहे अशा दर्शनाच्या शेषभूत असलेल्या या दर्शनाचें प्रतिवचन प्रश्नावाचूनही संभवेल, असें सांगतात–) नाहींतर प्रश्नाला व्यर्थत्व असल्यामुळें. व संख्येचें चांगलें ज्ञान झालेलें असल्यामुळें अग्निच सांगणें उचित होतें. बरें, जरी चांगलें ज्ञान झालेलें असलें तरी त्याचाच अनुवाद केला जातो, ह्मणून ह्मणाल तर जसें प्राप्त असेल तशाच त्याचा अनुवाद करणें युक्त आहे, 'हा लोक अग्नि आहे,' असा पूर्वींच्याहून अगदीं—विलक्षण अनुवाद होणें युक्त नाहीं. ( अग्निहोत्रप्रकरणांतील अग्निहोत्रदर्शनाचें अतिक्रमण न करतांच अन्तरिक्षादिकांचाही अनुवाद करणें योग्य आहे, त्याच्या विपरीत अनुवाद करणें योग्य नाहीं. कारण अनुवाद नेहमीं पूर्ववादाची अपेक्षा करतो. पण या दर्शनांत अन्तरिक्षादिकांचा अनुवाद केला जात नाहीं. तस्मात् 'एवं 'शब्द अग्निहोत्राचा परामर्श करणारा नाहीं, असा भावार्थ )

बरें, 'द्युलोकादिवाद अन्तरिक्षादिकांच्या उपलक्षणार्थ आहे, त्यामुळें हा पूर्वीच्या अग्निहोत्रदर्शनाचाच अनुवाद संभवतो,' म्हणून म्हणाल तर तें खरें आहे; पण उपलक्षण आद्य व अन्त्य यांनीं होणें युक्त आहे.

श्रुत्यन्तराच्च । समाने हि प्रकरणे छान्दोग्यश्रुतौ पञ्चाग्नीन्वेदेति पञ्चसंख्याया एवोपादानादनग्निहोत्रशेषमेतत्पञ्चाग्निदर्शनम् । यत्त्वग्निसमिदादिसामान्यं तदग्निहोत्रस्तुत्यर्थमित्यवोचाम । तस्मान्नोत्क्रान्त्यादिपदार्थषट्कपरिज्ञानादर्चिरादिप्रतिपत्तिः । एवमिति प्रकृतोपादानेनार्चिरादिप्रतिपत्तिविधानात् ॥

भाष्यार्थ—शिवाय दुसऱ्या श्रुतीवरूनही येथें 'एवं' शब्दानें ज्याचा परामर्श केला आहे तें स्वतंत्रच पंचाग्निदर्शन आहे, असें सिद्ध होतें. छान्दोग्य श्रुतींत समान प्रकरणांत 'पञ्चाग्नीन् वेद' पंचाग्नीस जाणतो, असें पांच या संख्येचेंच ग्रहण केलेलें असल्यामुळें हें पंचाग्निदर्शन अग्निहोत्रशेषभूत नाहीं. अग्नि, समिध्, इत्यादिकांचें सामान्य—साधर्म्य जें सांगितलें आहे तें अग्निहोत्राच्या स्तुत्यर्थ आहे, असें आम्हीं वर सांगितलें आहेच तस्मात् उत्क्रान्त्यादि सहा पदार्थांच्या परिज्ञानामुळें अर्चिरादि मार्गाची प्रतिपत्ति—प्राप्ति होत नाहीं. कारण 'एवं' अशा प्रकारें प्रकृतग्रहणानें अर्चिरादि मार्गाच्या प्रतिपत्तीचें विधान केलें आहे. (पंचाग्निदर्शन प्रकृत आहे, तें स्वतंत्र आहे, अग्निहोत्राचें अंग नव्हे, असें वर सांगितलें. अर्थात् त्याची उपासना करणारांना अर्चिरादि म्ह० शुक्ल मार्गाची प्राप्ति होते, केवल कर्मठांना नाहीं, असा भावार्थ.)

के पुनस्ते य एवं विदुर्गृहस्था एव । ननु तेषां यज्ञादिसाधनेन धूमादिप्रतिपत्तिर्विधित्सिता । नानेवंविदामपि गृहस्थानां यज्ञादिसाधनोपपत्तेः । भिक्षुवानप्रस्थयोश्चारण्यसंबन्धेन ग्रहणात् । गृहस्थकर्मसंबद्धत्वाच्च पञ्चाग्निदर्शनस्य । अतो नापि ब्रह्मचारिण एवं विदुरिति गृह्यन्ते । तेषां तूत्तरे पथि प्रवेशः स्मृतिप्रामाण्यात्—"अष्टाशीतिसहस्राणामृषीणामूर्ध्वरेतसाम् । उत्तरेणार्यम्णः पन्थास्तेऽमृतत्वं हि भेजिरे" इति ॥

भाष्यार्थ—जे असें जाणतात ते कोण? गृहस्थच. 'अहो पण त्यांना यज्ञादि साधनानें धूमादि मार्गाची प्राप्ति पुढें विधित्सित आहे.' (तेव्हां गृहस्थांचा या देवयान मार्गांत प्रवेश कसा होणार?) हें म्हणणें बरोबर नाहीं. कारण पंचाग्नींची उपासना न करणाऱ्या गृहस्थांनाही यज्ञादि साधनांची उपपत्ति आहे. [अर्थात् जे पंचाग्नि-उपासक गृहस्थ त्यांचा देवयान मार्गांत अधिकार आहे. पण तें विज्ञान—उपासन ज्यांना नाहीं त्यांनाच यज्ञादिकांनीं पितृयाणाची प्राप्ति होते, याप्रमाणें विभागा-

ची उपपत्ति लागत असल्यामुळें पुढील वाक्याशीं या पूर्ववाक्याचा विरोध येत नाहीं, असा भावार्थ. 'अहो पण 'एवं विदुः' असें सामान्य वचन असल्यामुळें पारिव्राजकादिकांचेंही येथें ग्रहण होईल,' अशी आशंका घेऊन सांगतात–] भिक्षु व वानप्रस्थ यांचें अरण्यसंबंधानें ग्रहण केलेलें आहे. ( या दर्शनसंबंधानें ग्रहण केलेलें नाहीं. पंचाग्निवेत्त्या ग्रहस्थांचेंच 'ये एवं विदुः' येथें ग्रहण करण्याचें आणखीं एक कारण सांगतात–) शिवाय पंचाग्निदर्शन गृहस्थकर्मसंबद्ध आहे. त्यामुळें 'एवं विदुः' या वाक्यानें ब्रह्मचाऱ्यांचेंही ग्रहण केलें जात नाहीं. नैष्ठिक ब्रह्मचाऱ्यांचा उत्तर मार्गांत प्रवेश होतो. कारण त्याविषयीं स्मृतिप्रामाण्य आहे. 'नैष्ठिक ब्रह्मचारी अठ्यायशीं सहस्र ऋषींचा सूर्याच्या उत्तरेस मार्ग आहे. ते सूर्यसंबंधी मार्गास प्राप्त होऊन त्याच्या उत्तरेकडील मार्गानें सापेक्ष अमृतत्वास प्राप्त झाले' असा 'अष्टाशीतिसहस्राणां०' इत्यादि स्मृतिवचनाचा अर्थ आहे.

तस्माद्ये गृहस्था एवमग्निजोऽहमग्न्यपत्यमित्येवं क्रमेणाग्निभ्यो जातोऽग्निरूप इत्येवं ये विदुस्ते च ये चामी अरण्ये वानप्रस्थाः परिव्राजकाश्चारण्यनित्याः श्रद्धां श्रद्धायुक्ताः सन्तः सत्यं ब्रह्म हिरण्यगर्भात्मानमुपासते न पुनः श्रद्धां चोपासते ते सर्वेऽर्चिराभिसंभवन्ति। यावद्गृहस्थाः पञ्चाग्निविद्यां सत्यं वा ब्रह्म न विदुस्तावच्छ्रद्धाद्याहुतिक्रमेण पञ्चम्यामाहुतौ हुतायां ततो योषाग्नेर्जाताः पुनर्लोकं प्रत्युत्थायिनोऽग्निहोत्रादिकर्मानुष्ठातारो भवन्ति। तेन कर्मणा धूमादिक्रमेण पुनः पितृलोकं पुनः पर्जन्यादिक्रमेणेममावर्तन्ते। ततः पुनर्योषाग्नेर्जाताः पुनः कर्म कृत्वेत्येवमेव घटीयन्त्रवद्गत्यागतिभ्यां पुनः पुनरावर्तन्ते ॥

भाष्यार्थ —(येथें गृहस्थांवाचून इतर आश्रमांचें ग्रहण करितां येत नाहीं, असें ठरलें असतां त्याचें फलित सांगतात–) तस्मात् जे गृहस्थ-याप्रमाणें मी अग्निज–अग्नीचें अपत्य आहें, क्रमानें अग्नीपासून झालेला अग्निरूप आहें–असें जे जाणतात ते 'ये चामी अरण्ये' व जे हे अर-

ण्यांत—स्त्रीजनविरहित देशांत असणारे वानप्रस्थ व त्रिदंडी परिव्राजक अरण्यनित्य 'श्रद्धां-' श्रद्धायुक्त होत्साते 'सत्यं' ब्रह्माची—हिरण्यगर्भात्म्याची उपासना करितात, येथें 'श्रद्धां सत्यं उपासते-' असें वाक्य असल्यामुळें श्रद्धेची उपासना करितात, असा अर्थ करूं नये; कारण श्रद्धेची उपासना संभवत नाहीं. यास्तव श्रद्धायुक्त होऊन जे सत्याची उपासना करितात 'ते अर्चिरभिसंभवन्ति-' ते सर्व पंचाग्निवेत्ते गृहस्थ व हिरण्यगर्भोपासक वानप्रस्थ व संन्यासी अर्चिरूप होतात. अर्चीला अभिसंपन्न होतात. ('अहो पण विद्याबलावाचूनच अर्चीची प्राप्ति होईल,' म्हणून म्हणाल तर तें मात्र बरोबर नाहीं. कारण) जोंवर गृहस्थ पंचाग्निविद्या किंवा सत्य ब्रह्म यांची उपासना करणार नाहींत तोंवर श्रद्धादि आहुतींच्या क्रमानें पांचव्या(रेताख्य) आहुतीचें हवन केलें असतां त्या आहुतीपासून स्त्रीरूप अग्नींत उत्पन्न झालेले ते पुनः लोकाप्रत उत्थान करणारे असे होत्साते अग्निहोत्रादि कर्मांचें अनुष्ठान करणारे होतात. त्या कर्मानें धूमादि क्रमानें पुनः पितृलोकास व तेथून पुनः पर्जन्यादिक्रमानें या लोकास परत येतात. नंतर पुनः स्त्रीरूप अग्नीपासून उत्पन्न झालेले ते पुनः कर्म करून (पितृलोकाप्रत प्रत्युत्थायी होतात) अशा रीतीनेंच ते घटीयंत्राप्रमाणें—रहाटगाडग्याप्रमाणें गति व आगति [ जा-ये ] यांच्या योगानें पुनः पुनः आवर्तन करितात.

यदा त्वेवं विदुस्ततो घटीयन्त्रभ्रमणाद्विनिर्मुक्ताः सन्तोऽर्चिरभिसंभवन्ति । अर्चिरिति नाग्निज्वालामात्रं किं तर्ह्यर्चिराभिमानिन्यार्चिःशब्दवाच्या देवतोत्तरमार्गलक्षणा व्यवस्थितैव तामभिसंभवन्ति । न हि परिव्राजकानामग्न्यर्चिषैव साक्षात्संबन्धोऽस्ति । तेन देवतैव परिगृह्यतेऽर्चिःशब्दवाच्या ॥

भाष्यार्थ—पण जेव्हां ते असें जाणतात तेव्हां घटीयन्त्राप्रमाणें

१ येथें परिव्राजकशब्दानें त्रिदंडी किंवा केवळ आश्रम घेतलेले यांचें ग्रहणच उचित आहे. कारण पुत्रादि-एषणांपासून व्युत्थित झालेल्या ज्ञानी संन्याशांचा देवयान मार्गांत प्रवेश होणें शक्य नाहीं.

होणारें जें गमनागमनरूप भ्रमण त्यापासून सर्वथा निर्मुक्त होत्साते अर्चीरूप होतात. अर्चीला प्राप्त होतात. येथें 'आर्चि' म्हणजे केवल अग्नीची ज्वाला नव्हे; तर काय ? त्या अर्चीची अभिमानी अर्चिःशब्द-वाच्य देवता येथें विवक्षित आहे. ती उत्तरमार्गलक्षण अर्चिरभिमानिनी देवता व्यवस्थितच—स्थिरच आहे (सामान्य अग्निज्वालेप्रमाणें अस्थिर नाहीं) त्या अर्चिर्देवतेला प्राप्त होतात. कारण परिव्राजकांचा अग्नीच्या अर्चीशीं साक्षात् संबंध नाहीं. (पण त्रिदंडी संन्याशीही त्या अर्चीला प्राप्त होतात, असें याच वाक्यांत म्हटलें आहे.) त्यामुळें येथें साक्षात् अग्नीची ज्वाला हा अर्चिःशब्दाचा अर्थ न घेतां अर्चिःशब्दवाच्य देवताच घेतली जाते.

अतोऽहर्देवताम् । मरणकालनियमानुपपत्तेरहःशब्दोऽपि देवतैव । आयुषः क्षये हि मरणम् । न ह्येवंविदाऽहन्येव मर्तव्यमित्यहर्मरणकालो नियन्तुं शक्यते । न च रात्रौ प्रेताः सन्तोऽहः प्रतीक्षन्ते "स यावत्क्षिप्येन्मनस्तावदादित्यं गच्छति" इति श्रुत्यन्तरात् ॥

भाष्यार्थ——'अर्चिषोऽहर्-' त्या अर्चिर्देवतेपासून अहर्देवतेस[1] प्राप्त होतात. ('अहः-'शब्दानें दिवस हा काल कां घेऊं नये ? तें सांगतात—) मरणकालाचा नियम करतां येणें शक्य नसल्यामुळें येथील 'अहः-'शब्दही देवताच आहे. कारण आयुष्याचा क्षय होतांच मरण येतें. त्यामुळें 'पंचाग्नीची उपासना करणारानें दिवसाच मरावें,' असा दिवस या मरणकालाचा नियम करतां येणें शक्य नाहीं. रात्री मेलेले विद्वान् दिवसाची प्रतीक्षा करीत नाहींत. कारण 'मनाला आदित्यापर्यंत जाण्यास जितका काल लागतो तेवढ्या म्ह० निमेषमात्र कालांत ते मृत आदित्यास जाऊन पोंचतात' अशी दुसरी श्रुति आहे.

अह्न आपूर्यमाणपक्षमहर्देवतयाऽतिवाहिता आपूर्यमाणपक्षदेवतां प्रतिपद्यन्ते शुक्लपक्षदेवतामित्येतत् । आपूर्यमाणपक्षाद्यान्षण्मासानुदङ्ङु-

१ अहर्देवता म्ह० दिवसाची अभिमानी देवता.

त्तरां दिशमादित्यः सवितेति तान्मासान्प्रतिपद्यन्ते शुक्लपक्षदेवतयाऽतिवाहिताःसन्तः। मासानिति बहुवचनात्संघचारिण्यः षडुत्तरायण देवतास्तेभ्यो मासेभ्यः षण्मासदेवताभिरतिवाहिता देवलोकाभिमानिनीं देवतां प्रतिपद्यन्ते । देवलोकादादित्यमादित्याद्वैद्युतं विद्युदभिमानिनीं देवतां प्रतिपद्यन्ते । विद्युद्देवतां प्राप्तान्ब्रह्मलोकवासी पुरुषो ब्रह्मणा मनसा सृष्टो मानसः कश्चिदेत्यागत्य ब्रह्मलोकान्गमयति ॥

भाष्यार्थ—'अह्न आपूर्यमाणपक्षं-' अहर्देवतेकडून उचलून नेलेले ते मृत आपूर्यमाणपक्षदेवतेस–शुक्लपक्ष देवतेस, असा भावार्थ, प्राप्त होतात. 'आपूर्यमाणपक्षात् यान्०-' शुक्लपक्षदेवतेपासून आदित्य ज्या सहा महिन्यांत उत्तर दिशेस जातो त्या मासांस–त्या उत्तरायण मासाभिमानी देवतांस शुक्लपक्ष देवतेकडून अतिवाहित होत्साते, मृत उपासक प्राप्त होतात. 'मासान्' असें बहुवचन असल्यामुळें सहा उत्तरायण देवता संघचारी आहेत. 'मासेभ्यो देवलोकं-' त्या मासांपासून सहा मासदेवतांकडून अतिवाहित[1] होत्साते ते देवलोकाभिमानिनी देवतेस प्राप्त होतात. देवलोकापासून आदित्यास व आदित्यापासून 'वैद्युतं-' विद्युदभिमानी देवतेस प्राप्त होतात. याप्रमाणें 'तान् 'वैद्युतान्-' विद्युद्देवतेस प्राप्त झालेल्या त्यांना 'पुरुषो मानसः-' ब्रह्मदेवानें मनानें निर्माण केलेला कोणी ब्रह्मलोकवासी पुरुष 'एत्य-' येऊन 'ब्रह्मलोकान्गमयति-' ब्रह्मलोकांस पोंचवितो.

ब्रह्मलोकानित्यधरोत्तरभूमिभेदेन भिन्ना इति गम्यन्ते बहुवचनप्रयोगात् । उपासनतारतम्योपपत्तेश्च । ते तेन पुरुषेण गमिताः सन्तस्तेषु ब्रह्मलोकेषु पराः प्रकृष्टाः सन्तः स्वयं परावतः प्रकृष्टाः समाः संवत्सराननेकान्वसन्ति । ब्रह्मणोऽनेकान्कल्पान्वसन्तीत्यर्थः । तेषां ब्रह्मलोकं गतानां नास्ति पुनरावृत्तिरस्मिन्संसारे न पुनरागमनमिहेति शाखान्तरपाठात् ॥

१ पलीकडे पोंचविलेले,

भाष्यार्थ—'ब्रह्मलोकान्-' असा बहुवचनप्रयोग असल्यामुळें अधरभूमि, उत्तरभूमि इत्यादि भेदानें भिन्न भिन्न ब्रह्मलोक आहेत, असें ज्ञात होतें. शिवाय उपासनेच्या तारतम्याप्रमाणें उपासकांस प्राप्त होणारे ब्रह्मलोक भिन्न भिन्न असणेंच युक्त आहे. 'ते'—त्या पुरुषाकडून पोंचविले गेलेले ते 'तेषु ब्रह्मलोकेषु-' त्या ब्रह्मलोकांत 'पराः-' स्वतः प्रकृष्ट मुख्य —श्रेष्ठ होत्साते 'परावतः-' पुष्कळ वर्षें—अनेक संवत्सर 'वसन्ति-' राहतात. ब्रह्मदेवाचे अनेक अवान्तर कल्प तेथें राहतात असा भावार्थ. 'तेषां-'त्या ब्रह्मलोकास गेलेल्या उपासकांची 'न पुनरावृत्तिः-'या संसारांत पुनरागमन होत नाहीं. 'इह न पुनरावृत्तिः' असा दुसऱ्या शाखेंत पाठ आहे. त्यामुळें 'या संसारांत' असें म्हणणें युक्त आहे.

इहेत्याकृतिमात्रग्रहणमिति चेच्छ्वोभूते पौर्णमासीमिति यद्वत् ।नेहेतिविशेषणानर्थक्यात् । यदि हि नाऽऽवर्तन्त एवेहग्रहणमनर्थकमेव स्यात् ।श्वोभूते पौर्णमासीमित्यत्र पौर्णमास्याः श्वोभूतत्वमनुक्तं न ज्ञायत इति युक्तं विशेषयितुम् । न हि तत्र श्वआकृतिः श्वशब्दार्थो विद्यत इति श्वःशब्दो निरर्थक एव प्रयुज्यते । यत्र तु विशेषणशब्दे प्रयुक्तेऽन्विष्यमाणे विशेषणफलं चेन्न गम्यते तत्र युक्तो निरर्थकत्वेनोत्स्रष्टुं विशेषणशब्दो न तु सत्यां विशेषणफलावगतौ । तस्मादस्मात्कल्पादूर्ध्वमावृत्तिर्गम्यते ॥ १५ ॥

भाष्यार्थ—(अहो पण 'तेषां इह न पुनरावृत्तिः' असा पाठ क्वचित्च आढळत असल्यामुळें 'त्यांचें या संसारांत पुनरागमन होत नाहीं' हें व्याख्यान अयुक्त आहे, अशी शंका—) 'इह' या शब्दानें केवल आकृतीचें ग्रहण केलें आहे. जसें—'श्वोभूते पौर्णमासीं यजेत-' या ठिकाणीं आकृती हा पौर्णमासीशब्दाचा अर्थ विवक्षित आहे त्याप्रमाणें'इह'शब्दानें आकृतीचें—लोक या जातीचें ग्रहण करावें, कोणत्याच लोकीं ते परत येत नाहींत, असें समजावें, फक्त याच लोकीं परत येत नाहींत, असें मानूं नये, म्हणून म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण तसें मानल्यास

'इह न पुनरावृत्तिः-' येथील 'इह' या विशेषणाला आनर्थक्य येतें, तें विशेषण व्यर्थ होतें. ते जर मुळींच पुनरावृत्त होतच नसतील तर 'इह' या विशेषणाचें ग्रहण व्यर्थच होतें. आतां आकृतिग्रहणाविषयीं 'श्वोभूते पौर्णमासीं यजेत' असा जो दृष्टान्त दिला आहे त्यांतील'श्वोभूते-'उद्यां,हा शब्द पौर्णमास इष्टीचा संभार ज्या दिवशीं जमविला असेल त्या दिवसाच्या अपेक्षेनें आहे. पौर्णमासी दिवशीं चातुर्मास्य इष्टि केली असतां पौर्णमासी इष्टि केव्हां करावी, तें वचनावाचून—सांगितल्या शिवाय कळत नाहीं. त्यामुळें तेथें 'श्वोभूते' (पौर्णमासीं यजेत–) असें विशेषण देणें युक्तच आहे. (कारण तसें विशेषण नसल्यास पौर्णिमेस चातुर्मास्य इष्टि केल्यावर पौर्णमासी इष्टि दुसऱ्याच दिवशीं—प्रतिपदेस करावी द्वितीया—तृतीया इत्यादि अन्य दिवशीं करूं नये, असा निश्चय होऊं शकत नाहीं, त्यामुळें तेथें 'श्वोभूते' हें विशेषण अन्य दिवसांची व्यावृत्ति करणारेंच आहे. त्याच प्रमाणें येथें—दार्ष्टान्तिकांतही 'इह' शब्द व्यावर्तकच आहे. त्यामुळें 'तेषां न पुनरावृत्तिः' या वचनावरून पंचाग्नि-उपासकाची नित्य अनावृत्ति सिद्ध होत नाहीं. आतां पौर्णमासीशब्दाप्रमाणें 'इह' हा शब्द आकृतिवाची आहे. त्यामुळें तो इतर लोकांचा व्यावर्तक नाहीं, असें जें तुम्ही म्हणत आहां त्याचें उत्तर सांगतों–) वरील दृष्टान्तांत 'श्वः-' उद्यां हा शब्द श्वआकृति या अर्थीं आहे म्हणून तेथें श्वःशब्द निरर्थकच योजिला जात आहे असें म्हणतां येत नाहीं. कारण जेथें विशेषणशब्दाचा प्रयोग केलेला असतो पण शोध करूं लागलें असतां त्याचें फळ कांहींच कळत नाहीं तेथें त्याला निरर्थक मानून सोडणें युक्त होतें. पण विशेषणाच्या फलाचें ज्ञान होत असतांना त्याला सोडणें योग्य होत नाहीं. त्यामुळें या कल्पाच्या नंतर दुसऱ्या कल्पांत त्यांची आवृत्ति होते, असें ('इह' या विशेषणाच्या सामर्थ्यावरून) ठरतें १५.

अथ ये यज्ञेन दानेन तपसा लोकाञ्जयन्ति ते धूममभिसंभवन्ति धूमाद्रात्रि ँ रात्रेरपक्षीयमाणपक्षमपक्षीयमाणपक्षाद्यान्षण्मासान्दक्षिणाऽऽदित्य एति मासेभ्यः पितृलोकं पितृलोकाच्चन्द्रं ते चन्द्रं प्राप्यान्नं

भवन्ति ताꣳस्तत्र देवा यथा सोमꣳ राजानमाप्यायस्वापक्षीयस्वेत्येवमेनाꣳस्तत्र भक्षयन्ति तेषां यदा तत्पर्यवैत्यथेममेवाऽऽकाशमभिनिष्पद्यन्त आकाशाद्वायुं वायोर्वृष्टिं वृष्टेः पृथिवीं ते पृथिवीं प्राप्यान्नं भवन्ति ते पुनः पुरुषाग्नौ हूयन्ते ततो योषाग्नौ जायन्ते लोकान्प्रत्युत्थायिनस्त एवमेवानुपरिवर्तन्तेऽथ य एतौ पन्थानौ न विदुस्ते कीटाः पतङ्गा यदिदं दन्दशूकम् ॥ १६ ॥ इतिबृहदारण्यकोपनिषदि षष्ठाध्यायस्य द्वितीयं ब्राह्मणम् ॥ २ ॥

अर्थ--पण जे यज्ञानें, दानानें, तपानें, लोकांस जिंकतात ते धूमास—धूमाभिमानीदेवतेस अभिसंपन्न होतात. धूमाधिदेवतेपासून रात्रिदेवतेस, रात्रिदेवतेपासून कृष्णपक्षदेवतेस, कृष्णपक्षदेवतेपासून ज्या सहा महिन्यांत आदित्य दक्षिण दिशेस जातो त्या सहा मासांच्या देवतांस, मासदेवतांपासून पितृलोकास, पितृलोकापासून चंद्रास, ते कर्मठ चंद्रास प्राप्त होऊन अन्न होतात, ज्याप्रमाणें ऋत्विज सोमराजास ‘ आप्यायस्व अपक्षीयस्व ’ असें करून म्ह० वारंवार चमसांत भरून पितात त्याप्रमाणें तेथें देव त्यांस भक्षण करितात. ( धनी जसा चाकरांचा उपभोग घेतात त्याप्रमाणें देव त्यांचा उपभोग घेतात–) त्यांचें तें कर्म जेव्हां उपभोगानें क्षीण होतें तेव्हां ते कर्मी याच प्रसिद्ध आकाशास अभिनिष्पन्न होतात. आकाशापासून वायूप, वायूपासून वृष्टीस, वृष्टीपासून पृथ्वीस प्राप्त होतात. पृथिवीस प्राप्त होऊन अन्न होतात. ते पुनः पुरुषाग्नींत होमिले जातात. तेथून लोकाप्रत पुनः उत्थान पावणारे ते योषाग्नींत उत्पन्न होतात. ते याच न्यायानें पुनः पुनः परिवर्तन करितात. पण जे या दोन मार्गांना जाणत नाहींत ते कीट, पतंग, दंश मशक होतात. १६ ( २ ).

अथ पुनर्ये नैवं विदुरुत्क्रान्त्याद्यग्निहोत्रसंबन्धपदार्थषट्कस्यैव वेदितारः केवलकर्मिणो यज्ञेनाग्निहोत्रादिना दानेन बहिर्वेदि भिक्षमाणेषु द्रव्यसंविभागलक्षणेन तपसा बहिर्वेद्येव दीक्षादिव्यतिरिक्तेन कृच्छ्रचान्द्रायणादिना लोकाञ्जयन्ति । लोकानिति बहुवचनात्तत्रापि फलतारत-

स्यमभिप्रेतम् । ते धूममभिसंभवन्ति । उत्तरमार्ग इवेहापि देवता एव धूमादिशब्दवाच्या धूमदेवतां प्रतिपद्यन्त इत्यर्थः । आतिवाहिकत्वं च देवतानां तद्वदेव ॥

भाष्यार्थ—' अथ ये-' पण जे असें जाणत नाहींत, तर उत्क्रान्ति इत्यादि अग्निहोत्रसंबंधी सहा पदार्थांसच जाणणारे केवळ कर्मी ' यज्ञेन' अग्निहोत्रादि यज्ञानें, ' दानेन-' भिक्षा मागणाऱ्या लोकांमध्यें वेदीच्या बाहेर द्रव्याचा योग्य विभाग करून देणें एतद्रूप दानानें, ' तपसा-' व बहिर्वेदीच[1] दीक्षादिकांहून[2] व्यतिरिक्त अशा कृच्छ्रचांद्रायणादि तपानें ' लोकान् जयन्ति-' लोकांस जिंकतात, ' लोकान् ' अशा बहुवचनावरून येथेंही फळाचें तारतम्य—न्यूनाधिक्य अभिप्रेत आहे. ( असो, जे यज्ञ, दान व तप यांच्या योगानें लोकांस जिंकतात ) ' ते धूममभिसंभवन्ति-' ते धूमास प्राप्त होतात. उत्तरमार्गाप्रमाणें येथेंही—पितृयाणमार्गांतही धूमादिशब्दवाच्य देवताच घ्याव्या. अर्थात् धूमदेवतेस प्राप्त होतात, असा भावार्थ. उत्तर मार्गांतील देवतांप्रमाणें या मार्गांतील देवतांनाही आतिवाहिकत्व आहे.

धूमाद्रात्रिं रात्रिदेवतां ततोऽपक्षीयमाणपक्षमपक्षीयमाणपक्षदेवतां ततो यान्षण्मासान्दक्षिणां दिशमादित्य एति तान्मासदेवताविशेषान्प्रतिपद्यन्ते । मासेभ्यः पितृलोकं पितृलोकाच्चन्द्रम् । ते चन्द्रं प्राप्यान्नं भवन्ति तांस्तत्रान्नभूतान्यथा सोमं राजानमिह यज्ञ ऋत्विज आप्यायस्वापक्षीयस्वेति भक्षयन्त्येवमेनांश्चन्द्रं प्राप्तान्कर्मिणो भृत्यानिव स्वामिनो भक्षयन्त्युपभुञ्जते देवाः ॥

भाष्यार्थ—' धूमाद्रात्रिं-' धूमदेवतेपासून रात्रिदेवतेस, त्या देवतेपासून ' अपक्षीयमाणपक्षं-' अपक्षीयमाणपक्ष—कृष्णपक्ष—देवतेस, अपक्षीयमाणपक्षदेवतेपासून 'ज्या सहा महिन्यांत आदित्य दक्षिण दिशेस जातो

---

१ ' यज्ञ 'शब्दानें दान व तप यांचा संग्रह होत नाहीं, हें सुचविण्यासाठीं त्यांना बहिर्वेदी असें विशेषण दिलें आहे. २ दीक्षादि येथील आदिशब्दानें पयोव्रतादि यज्ञांगांचा संग्रह होतो.

त्या मासदेवताविशेषांस' प्राप्त होतात. 'मासेभ्यः०-' मासांपासून पितृलोकास व पितृलोकापासून चंद्रमास प्राप्त होतात. 'ते चन्द्रं०-'ते चंद्रास प्राप्त होऊन अन्न होतात. 'तान् तत्र देवाः०-' ज्याप्रमाणें येथें यज्ञांत ऋत्विज सोमराजाला 'आप्यायस्व अपक्षीयस्व'असें म्हणून भक्षण करितात त्याप्रमाणें चंद्रास प्राप्त झालेल्या त्या तेथें अन्नभूत झालेल्या कर्मठांना स्वामी जसे भृत्यांचा उपभोग घेतात—त्यांच्याकडून सेवा करवून घेतात—तसे देव 'भक्षयन्ति-' भक्षण करितात—उपभोग घेतात.

आप्यायस्वापक्षीयस्वेति न मन्त्रः किं तर्ह्याप्याय्याऽऽप्याय्य चमसस्थं भक्षणेनापक्षयं च कृत्वा पुनः पुनर्भक्षयन्तीत्यर्थः । एवं देवा अपि सोमलोके लब्धशरीरान्कर्मिण उपकरणभूतान्पुनः पुनर्विश्रामयन्तः कर्मानुरूपं फलं प्रयच्छन्तः । तद्धि तेषामाप्यायनं सोमस्याऽऽप्यायनमिवोपभुञ्जत उपकरणभूतान्देवाः ॥

भाष्यार्थ—'आप्यायस्व अपक्षीयस्व' हा मंत्र नव्हे,तर सोमाला चमसपात्रांत पुनःपुनः भरून व त्या चमसस्थ सोमाचा भक्षणानें अपक्षय करून पुनः पुनः भक्षितात, असा त्याचा अर्थ आहे. त्याचप्रमाणें सोमलोकीं ज्यांना शरीर प्राप्त झालें आहे अशा उपकरणरूप कर्मठांना पुनः पुनः विश्रान्ति देणारे ह० कर्मानुरूप फल देणारे देव त्यांचा उपभोग घेतात. सोमाच्या आप्यायनाप्रमाणें कर्मठांना कर्मफल देणें हेंच त्यांचें आप्यायन आहे, उपकरणरूप अशा त्यांचा देव उपभोग घेतात, असा भावार्थ.

तेषां कर्मिणां यदा यस्मिन्काले तद्यज्ञदानादिलक्षणं सोमलोकप्रापकं कर्म पर्यवैति परिगच्छति परिक्षीयत इत्यर्थः । अथ तदेममेव प्रसिद्धमाकाशमभिनिष्पद्यन्ते । यास्ताः श्रद्धाशब्दवाच्या द्युलोकाग्नौ हुता आपः सोमाकारपरिणता याभिः सोमलोके कर्मिणामुपभोगाय शरीरमारब्धमम्मयं ताः कर्मक्षयाद्धिमपिण्ड इवाऽऽतपसंपर्कात्प्रविलीयन्ते । प्रविलीनाः सूक्ष्मा आकाशभूता इव भवन्ति तदिदमुच्यत इममेवाऽऽकाशमभिनिष्पद्यन्त इति ॥

भाष्यार्थ—( याप्रमाणें लोकद्वय प्राप्त करून देणारे दोन मार्ग स्पष्टपणें सांगून पुनः या लोकाच्या प्राप्तीचा प्रकार श्रुति सांगते–) ' तेषां-' त्या कर्मठांचें ' तत्-' तें यज्ञ-दानादिलक्षण सोमलोक प्राप्त करून देणारें कर्म ' यदा-' ज्यावेळीं ' पर्यवैति-' सर्वतः जातें–परिक्षीण होतें, असा भावार्थ; ' अथ-' त्यावेळीं ' इममेव आकाशं अभिनिष्पद्यन्ते-' याच प्रसिद्ध आकाशास अभिनिष्पन्न–प्राप्त होतात. ('अहो पण चंद्रस्थलापासून स्खलित झालेल्या कर्मठांना आकाशाचें तादात्म्य कसें? उत्तर–)ज्या द्युलोकाग्नींत हवन केलेल्या श्रद्धाशब्दवाच्य आप सोमाच्या आकारानें परिणत झाल्या म्ह० ज्या आपांनीं सोमलोकांत कर्मठांच्या उपभोगासाठीं जलमयशरीराचा आरंभ केला त्या आप, उन्हाच्या संपर्कानें जसा बर्फाचा गोळा वितळतो तसा, कर्मक्षयामुळें वितळतात. प्रविलीन झालेल्या त्या आप सूक्ष्म आकाशभूतसा होतात. तेंच हें ' इममेव आकाशं अभिनिष्पद्यन्ते-' याच प्रसिद्ध आकाशास अभिनिष्पन्न होतात, असें सांगितलें आहे.

ते पुनरपि कर्मिणस्तच्छरीराः सन्तः पुरोवातादिना इतश्चामुतश्च नीयन्तेऽन्तरिक्षगास्तदाह । आकाशाद्वायुमिति । वायोर्वृष्टिं प्रतिपद्यन्ते। तदुक्तम् । पर्जन्याग्नौ सोमं राजानं जुह्वतीति । ततो वृष्टिभूता इमां पृथिवीं पतन्ति । ते पृथिवीं प्राप्य व्रीहियवाद्यन्नं भवन्ति। तदुक्तमस्मिँल्लोकेऽग्नौ वृष्टिं जुह्वति तस्या आहुत्या अन्नं संभवतीति ॥

भाष्यार्थ—( आकाशापासून वायुप्राप्तीचा प्रकार सांगतात–) पुनरपि ते कर्मठ आकाशशरीर होत्साते अंतरिक्षांत असलेले ते पुरोवातादिकांच्या योगानें इकडे तिकडे नेले जातात.तेंच श्रुति सांगते-'आकाशाद्वायुं-' आकाशापासून वायूस, ' वायोः वृष्टिं-' वायूपासून वृष्टीस प्राप्त होतात. तेंच ' देव पर्जन्याग्नीमध्यें सोमराजाचें हवन करितात,' असें वर (कंडिका १०वी) सांगितलें आहे. त्यानंतर ' वृष्टेः पृथिवीं-'वृष्टिभूत

१ सोमलोकांतील शरीर अम्मय–जलमय असल्यामुळें झटकन वितळण्याची योग्यता त्याच्यामध्यें असते.

झालेले ते या पृथिवीवर पडतात. 'ते पृथिवीं प्राप्य अन्नं भवन्ति-' ते पृथिवीस प्राप्त होऊन व्रीहि-यवादि अन्न होतात. तेंच 'हा लोक, याच अग्नींत वृष्टीचें हवन करितात, त्या आहुतीपासून अन्न होतें' असें वर (कं. ११) सांगितलें आहे.

ते पुनः पुरुषाग्नौ हूयन्तेऽन्नभूता रेतस्सिचि । ततो रेतोभूता योषाग्नौ हूयन्ते ततो जायन्ते लोकं प्रत्युत्थायिनस्ते लोकं प्रत्युत्तिष्ठन्तोऽग्निहोत्रादिकर्मानुतिष्ठन्ति । ततो धूमादिना पुनःपुनःसोमलोकं पुनरिमं लोकमिति । त एवं कर्मिणोऽनुपरिवर्तन्ते घटीयन्त्रवच्चक्रीभूता बंभ्रमन्तीत्यर्थः । उत्तरमार्गाय सद्योमुक्तये वा यावद्ब्रह्म न विदुः । इति नु कामयमानः संसरतीत्युक्तम् ॥

भाष्यार्थ—'ते पुनः पुरुषाग्नौ०' पुनः अन्नभूत झालेले ते कर्मठ रेतःसेक करणाऱ्या पुरुषाग्नींत देवांकडून होमिले जातात. 'ततो योषाग्नौ जायन्ते-' त्यानंतर स्त्री अग्नीमध्यें रेतोरूप झालेल्या त्यांचें हवन केलें जातें. 'जायन्ते लोकान्प्रत्युत्थायिनः' त्यानंतर परलोकाप्रत जाण्यास तयार होत्साते उत्पन्न होतात. पर लोकाप्रत उत्थान पावणारे ते अग्निहोत्रादि कर्मांचें अनुष्ठान करितात. त्यानंतर धूमादि मार्गानें पुनः पुनः सोमलोकास, पुनः या लोकास याप्रमाणें 'ते एवमेव अनुपरिवर्तन्ते-' ते कर्मी याच क्रमानें घटीयंत्राप्रमाणें चक्रीभूत होत्साते वारंवार भ्रमण करीत असतात, असा भावार्थ. (त्या त्यांच्या वारंवर परिवर्तनाचा अवधि सांगतात-) उत्तरमार्गासाठीं किंवा सद्योमुक्तीसाठीं जोंवर ते ब्रह्माची उपासना करीत नाहींत किंवा त्याला साक्षात् जाणत नाहींत तोंवर असें भ्रमण करीत राहतात.( सहाव्या म्ह० चवथ्या अध्यायांतही ज्ञानापूर्वी हें संसरण स्पष्टपणें सांगितलें आहे, असें सांगतात-) 'इति नु कामयमानः संसरति-' कामी पुरुष याप्रमाणें संसरण करतो, असें पूर्वी (अ. ४ पृ. २७५) सांगितलें आहे.

अथ पुनर्ये उत्तरं दक्षिणं चैतौ पन्थानौ न विदुरुत्तरस्य दक्षिणस्य

वा पथः प्रतिपत्तये ज्ञानं कर्म वा नानुतिष्ठन्तीत्यर्थः । ते किं भवन्तीति । उच्यते । ते कीटाः पतङ्गा यदिदं यच्चेदं दन्दशूकं दंशमशकमित्येतद्भवन्ति । एवं ह्ययं संसारगतिः कष्टाऽस्यां निमग्नस्य पुनरुद्धार एव दुर्लभः । तथा च श्रुत्यन्तरम् । "तानीमानि क्षुद्राण्यसकृदावर्तीनि भूतानि भवन्ति जायस्व म्रियस्व" इति । तस्मात्सर्वोत्साहेन यथाशक्ति स्वाभाविककर्मज्ञानहानेन दक्षिणोत्तरमार्गप्रतिपत्तिसाधनं शास्त्रीयं कर्म ज्ञानं वाऽनुतिष्ठेदिति वाक्यार्थः ॥

भाष्यार्थ—' अथ-' पण 'य एतौ पन्थानौ न विदुः-' जे या उत्तर व दक्षिण अशा या दोन मार्गांस जाणत नाहींत म्ह० उत्तर किंवा दक्षिण मार्गांच्या प्राप्त्यर्थ उपासना किंवा कर्म यांचें अनुष्ठान करीत नाहींत, असा याचा भावार्थ, ते काय होतात ? तेंच सांगितलें जातें—' ते कीटाः पतंगाः यदिदं दंदशूकम्-' ते कीट, पतंग, व हें जें दंश-मशकादिक तें होतात. याप्रमाणें ही संसारगति अतिशय कष्टकर आहे. यांत निमग्न झालेल्या जीवाचा पुनः उद्धार होणेंच अतिशय कठिण आहे. ' तीं हीं क्षुद्र वारंवार आवर्तन करणारीं भूतें होतात. उत्पन्न हो व मर हा त्यांचा व्यापार सतत चाललेला असतो.' अशा अर्थाची याविषयीं दुसरी श्रुतिही आहे. यास्तव सर्वोत्साहानें—कायिक, वाचिक, मानसिक प्रयत्नानें स्वाभाविक कर्म व ज्ञान त्यांचा त्याग करून दक्षिणोत्तर मार्गांच्या प्राप्तीचें साधन शास्त्रीय कर्म किंवा ज्ञान यांचें यथाशक्ति अनुष्ठान करावें, असा वाक्यार्थ.

तथा चोक्तम् " अतो वै खलु दुर्निष्प्रपतरं तस्माज्जुगुप्सेत" इति श्रुत्यन्तरान्मोक्षाय प्रयतेतेत्यर्थः । अत्राप्युत्तरमार्गप्रतिपत्तिसाधन एव महान्यत्नः कर्तव्य इति गम्यते । एवमेवानुपरिवर्तन्त इत्युक्तत्वात् ॥

भाष्यार्थ—( या संसारगतींत निमग्न झालेल्या जीवाचा पुनः उद्धार होणें अतिशय कठिण आहे, याच विषयीं दुसऱ्या श्रुतिवाक्याची अनुकूलता दाखवितात—) तसेंच सांगितलें आहे—' या व्रीहि-यवादिभावापासू-

न सुटणें फारच कठिण आहे. यास्तव त्या अति कष्टकर संसारापासून स्वतःला सोडविण्याची इच्छा करावी.' अशी दुसरी श्रुति असल्यामुळें मोक्षासाठीं यत्न करावा असा भावार्थ. तथापि त्यांतल्या त्यांत उत्तरमार्ग-प्राप्तीच्या साधनाविषयींच अतिशय यत्न करावा, असें सिद्ध होतें.कारण याच कंडिकेंत ' धूमादिमार्गानें जाणारे कर्मी असेच वारंवार परिवर्तन करीत राहतात ' असें म्हटलें आहे.

एवं प्रश्नाः सर्वे निर्णीताः । असौ वै लोक इत्यारभ्य पुरुषः संभवतीति चतुर्थः प्रश्नो यतिथ्यामाहुत्यामित्यादिः प्राथम्येन । पञ्चमस्तु द्वितीयत्वेन देवयानस्य वा पथः प्रतिपदं पितृयाणस्य वेति दक्षिणोत्तरमार्गप्रतिपत्तिसाधनकथनेन । तेनैव च प्रथमोऽप्यग्नेरारभ्य केचिदर्चिः प्रतिपद्यन्ते केचिद्धूमामिति विप्रतिपत्तिः । पुनरावृत्तिश्च द्वितीयः प्रश्न आकाशादिक्रमेणेमं लोकमागच्छन्तीति । तेनैवासौ लोको न संपूर्यते कीटपतङ्गादिप्रतिपत्तेश्च केषांचिदिति तृतीयोऽपि प्रश्नो निर्णीतः ॥ १६ ॥ इति बृहदारण्यकोपनिषद्भाष्ये षष्ठाध्यायस्य द्वितीयं ब्राह्मणम् ॥ २ ॥

भाष्यार्थ—('अहो पण पांच प्रश्नांना आरंभ करून त्यांतील एकाचाच निर्णय कां केला ? त्यांतील प्रत्येकाचा निर्णय कां केला नाहीं ?' उत्तर–) याप्रमाणें सर्व प्रश्नांचा निर्णय केला आहे. ' असौ वै लोको गौतमाग्निः-' येथून आरंभ करून ' पुरुषः संभवति-' येथपर्यंत जो भाग आहे त्यानें ' यतिथ्यां आहुत्यां०-' या चवथ्या प्रश्नाचा प्रथमत्वानें निर्णय केला. ' देवयान मार्गाच्या प्राप्तीचें साधन किंवा पितृयाणमार्गाच्या प्राप्तीचें साधन काय ? ' या पांचव्या प्रश्नाचा दक्षिणोत्तर मार्गांच्या प्राप्तीचें साधन कथन करून दुसरा प्रश्न या रूपानें निर्णय केला.त्या मार्गद्वयप्राप्तीच्या साधनाच्या उपदेशानेंच प्रथम प्रश्नाचाही निर्णय झाला. मृत प्रजा निरनिराळ्या मार्गानें कोठून जाते ? हा पहिला प्रश्न आहे. अग्नीपर्यंत सर्वांची गति सारखीच; पण तेथून पुढें कोणी अर्चिरादि मार्गास

प्राप्त होतात व कोणी धूमादि मार्गास प्राप्त होतात, अशी त्यांची विप्रतिपत्ति--पृथक् गति होते. त्यांची पुनरावृत्ति कशी होते ? हा दुसरा प्रश्न होता. त्याचा--आकाशादि क्रमानें ते या लोकास येतात- असा निर्णय केला आहे. त्यामुळेंच[1] तो लोक भरून जात नाहीं, कित्येकांना कीटपतंगादिभावाची प्राप्ति होत असल्यामुळेंही तो भरून जात नाहीं, अशा उत्तरानें तिसऱ्या प्रश्नाचाही निर्णय झाला आहे. १६.

इति श्रीबृहदारण्यकोपनिषद्भाष्यार्थांच्या सहाव्या अध्यायाचें दुसरें ब्राह्मण समाप्त.

---

स यः कामयेत महत्प्राप्नुयामित्युदगयन आपूर्यमाणपक्षस्य पुण्याहे द्वादशाहमुपसद्व्रती भूत्वौदुम्बरे कꣳसे चमसे वा सर्वौषधं फलानीति संभृत्य परिसमुह्य परिलिप्याग्निमुपसमाधाय परिस्तीर्यावृताऽऽज्यꣳसꣳस्कृत्य पुꣳसा नक्षत्रेण मन्थꣳसंनीय जुहोति। यावन्तो देवास्त्वयि जातवेदस्तिर्यञ्चो घ्नति पुरुषस्य कामान्। तेभ्योऽहं भागधेयं जुहोमि ते मा तृप्ताः सर्वैः कामैस्तर्पयन्तु स्वाहा। या तिरश्ची निपद्यतेऽहं विधरणी इति तां त्वा घृतस्य धारया यजे सꣳराधनीमहꣳस्वाहा ॥१॥

अर्थ—मी महत्त्वास प्राप्त व्हावें, असें जो इच्छितो त्यानें उदगयनांत शुक्लपक्षाच्या शुभ दिवशीं, पूर्वी बारा दिवस उपसद्व्रती—पयोव्रती होऊन कंसाकार अथवा चमसाकार औदुंबराच्या काष्ठाच्या पात्रांत सर्वौषधींचा समूह, फळें व इतर संभार जमवून परिसमूहन, परिलेपन करून, गृह्याग्नीचें उपसमाधान करून परिस्तरणें घालून गृह्योक्त इतिकर्तव्यतेनें आज्याला संस्कार करून पुरुषनांवाच्या नक्षत्रानें मंथाला—सर्वौषधि-फलपिष्टाला अग्नीच्या व आपल्या मध्यें संस्थापित करून 'यावन्तो देवाः०' इत्यादि मंत्रांनीं आज्याचें हवन करतो. (पहिल्या मंत्राचा अर्थ—) हे जातवेदा[2], तुझ्या अधीन असलेले जेवढे देव वक्रमति होऊन माझ्या—

---

१ म्हणजे कर्मफलोपभोग संपलेल्या जीवांची पुनरावृत्ति होत असल्यामुळेंच.

२ 'जातं जातं वेत्ति-' उत्पन्न झालेल्या प्रत्येकास जाणतो तो जातवेद. किंवा 'जाते जाते विद्यते' उत्पन्न झालेल्या प्रत्येकांत असतो तो जातवेद, अशी या शब्दाची व्युत्पत्ति आहे.

पुरुषाच्या—कामांस प्रतिबंध करितात त्यांस उद्देशून मी आज्यभाग तुज- मध्यें होमितों. ते त्यानें तृप्त होऊन सर्व पुरुषार्थांनीं मला तृप्त करोत. मी तुझ्या अधीन अर्पिलेला आहें. ( ' या तिरश्ची०' या दुसऱ्या मंत्रा-चा अर्थ--) जी देवता कुटिलमति होऊन सर्वांना मीच धारण करणारी आहें, असें मानून तुझा आश्रय करून राहते त्या सर्वसाधनी देवतेस उद्देशून मी घृताच्या धारेनें हवन करतों. स्वाहा. १.

स यः कामयेत । ज्ञानकर्मणोर्गतिरुक्ता । तत्र ज्ञानं स्वतत्रं कर्म तु दैवमानुषवित्तद्वयायत्तं तेन कर्मार्थं वित्तमुपार्जनीयम् । तच्चाप्रत्यवायका-रिणोपायेनेति तदर्थं मन्थाख्यं कर्माऽऽरभ्यते महत्त्वप्राप्तये । महत्त्वे च सत्यर्थसिद्धं हि वित्तम् । तदुच्यते । स यः कामयेत स यो वित्तार्थी । कर्मण्यधिकृतो यः कामयेत । किम् । महन्महत्त्वं प्राप्नुयां महान्स्यामि-तीत्यर्थः ॥

भाष्यार्थ—( पूर्वोत्तर ब्राह्मणांची संगति--) 'स यः कामयेत९-'ज्ञान व कर्म यांची गति सांगितली. त्यांतील ज्ञान स्वतंत्र आहे पण कर्म दैव वित्त व मानुष वित्त या दोघांच्या अधीन असतें.यास्तव कर्मासाठीं त्या द्विविध वित्ताचें उपार्जन करणें उचित आहे. पण तें प्रत्यवायप्राप्ति न करील अशा उपायानें संपादन केलें पाहिजे. यास्तव वित्ताच्या सिद्ध्यर्थ मन्थाख्य कर्म महत्त्व प्राप्तीसाठीं आरंभिलें जातें. महत्त्व प्राप्त झालें असतां वित्त अर्थात् सिद्ध होतें. ( याच अर्थी श्रुत्यक्षरांची योजना करि-तात—) तेंच श्रुतीकडून सांगितलें जातें- ' स यः कामयेत-' तो जो वि-त्तार्थी--कर्मामध्यें अधिकृत असलेला कामना करतो, कशाची ? ' मह-त्प्राप्नुयामिति-'महत्त्वास प्राप्त होईन,मी महान् होईन असा याचा भावार्थ, अशी कामना करतो,(त्याच्यासाठीं हें कर्म आहे,असा शेष लावावा. )

तत्र मन्थकर्मणो विधित्सितस्य कालोऽभिधीयते । उदगयन आ-दित्यस्य तत्र सर्वत्र प्राप्तावापूर्यमाणपक्षस्य शुक्लपक्षस्य । तत्रापि सर्वत्र प्राप्तौ पुण्याहेऽनुकूल आत्मनः कर्मसिद्धिकर इत्यर्थः । द्वादशाहं य-

स्मिन्पुण्येऽनुकूले कर्म चिकीर्षति ततः प्राक्पुण्याहमेवाऽऽरभ्य द्वादशाहमुपसद्व्रती उपसत्सु व्रतमुपसदः प्रसिद्धा ज्योतिष्टोमे । तत्र च स्तनोपचयापचयद्वारेण पयोभक्षणं तद्व्रतम् । अत्र च तत्कर्मानुपसंहारात्केवलमितिकर्तव्यताशून्यं पयोभक्षणमात्रमुपादीयते ॥

भाष्यार्थ——आतां अगोदर त्या पुरुषाला उद्देशून विधित्सित असलेल्या मंथकर्माचा काल सांगितला जातो. 'उदगयने-' आदित्याच्या उदगयनांत—उत्तरायणांत, त्या उदगयनांतही सर्वत्र—कोणत्याही पक्षांत -प्राप्ति झाली असतां 'आपूर्यमाणपक्षस्य-' शुक्लपक्षाच्या, शुक्लपक्षांतही सर्वत्र—कोणत्यादि दिवशीं—प्राप्ति झाली असतां 'पुण्याहे-' शुभ—आपल्याला अनुकूल—कर्माची सिद्धि करणाऱ्या-दिवशीं, असा भावार्थ. 'द्वादशाहं-' ज्या पुण्य—अनुकूल दिवशीं कर्म करण्याची इच्छा करतो त्याच्या पूर्वी पुण्यदिवसापासूनच आरंभ करून बारा दिवस 'उपसद्व्रती-' उपसदांतील जें व्रत तें उपसद्व्रत. 'उपसदः' या नांवाच्या इष्टि ज्योतिष्टोमांत प्रवर्ग्याहःमध्यें प्रसिद्ध आहेत. त्या उपसदांमध्यें स्तनोपचय व अपचय यांच्या द्वारा यजमानाचें पयोभक्षण प्रसिद्ध आहे, तें उपसद्व्रत होय. (मग येथेंही तसेंच स्तनोपचय व अपचय या कर्मांच्या द्वारा पयोभक्षण प्राप्त होतें, म्हणून म्हणाल तर सांगतों-) येथें त्या कर्माचा उपसंहार केलेला नसल्यामुळें केवल—इतिकर्तव्यताविरहित नुस्तें पयोभक्षणच घेतलें जातें.

ननूपसदो व्रतमिति यदा विग्रहस्तदा सर्वमितिकर्तव्यतारूपं ग्राह्यं भवति तत्कस्मान्न परिगृह्यत इति । उच्यते । स्मार्तत्वात्कर्मणः ।स्मार्तं हीदं मन्थकर्म । ननु श्रुतिविहितं सत्कथं स्मार्तं भवितुमर्हति । स्मृत्यनुवादिनी हि श्रुतिरियम् । श्रौतत्वे हि प्रकृतिविकारभावस्ततश्च प्राकृतधर्मग्राहित्वं विकारकर्मणो न त्विह श्रौतत्वम् । अत एव चाऽऽवसथ्याग्नावेतत्कर्म विधीयते । सर्वा चाऽऽवृत्स्मार्तैवेति ॥

भाष्यार्थ—'अहो पण 'उपसदः व्रतं' उपसद् इष्टि हेंच व्रत असा जर 'उपसद्व्रती' या समासाचा विग्रह केला तर सर्व इतिकर्त-

व्यतारूप ग्राह्य होतें. तेव्हां त्याचा परिग्रह कां केला जात नाहीं,'? म्हणून म्हणाल तर सांगतों—या कर्माला स्मार्तत्व आहे. हें मन्थकर्म स्मार्त आहे. ' अहो पण तें कर्म जर श्रुतिविहित आहे, तर तें स्मार्त होण्यास कसें योग्य आहे ?' ( परिसमूहन, परिलेपन, अग्न्युपसमाधान, इत्यादि स्मार्त अर्थ येथें सांगितलेले असल्यामुळें ) ही श्रुति स्मृतीचा अनुवाद करणारी आहे. ( अहो पण श्रुतीनें स्मृतीचा अनुवाद करणें विपरीत होय, त्यामुळें याला श्रौत म्हणणेंच उचित आहे, अशी आशंका घेऊन सांगतात—) याला जर श्रौतत्व असेल तर ज्योतिष्टोमाशीं याचा प्रकृतिविकृतिभाव होतो, आणि तो संबंध आला म्हणजे विकृतिकर्माला प्रकृतिधर्मांचें ग्रहण करावें लागतें. पण येथें परिलेपनादि कर्मांचा संबंध असल्यामुळें याला श्रौतत्व नाहीं. ( श्रुतीचा तिन्ही कालांतील धर्मांशीं संबंध असतो. त्यामुळें पहिल्या श्रुतीला मागून झालेल्या स्मृतीचें अनुवादकत्व संभवत नाहीं, असें म्हणतां येत नाहीं. मंथकर्म स्मार्त आहे, याविषयीं लिंग सांगतात—)म्हणूनच आवसथ्य अग्नीमध्यें या कर्मांचें विधान केलें जातें. ( त्याच विषयीं दुसरा हेतु—) मंथकर्मांतील सर्व आवृत्—सर्व इतिकर्तव्यता स्मार्तच आहे. ( वास्तव ' उपसदः एव व्रतं ' असा कर्मधारय समास करतां येत नाहीं. )

उपसद्व्रती भूत्वा पयोव्रती सन्नित्यर्थः । औदुम्बर उदुम्बरवृक्षमये कंसे चमसे वा तस्यैव विशेषणं कंसाकारे चमसाकारे वौदुम्बर एव । आकारे तु विकल्पो नौदुम्बरत्वे । अत्र सर्वौषधं सर्वासामोषधीनां समूहं यथासंभवं यथाशक्ति च सर्वा औषधीः समाहृत्य तत्र ग्राम्याणां तु दश नियमेन ग्राह्या व्रीहियवाद्या वक्ष्यमाणाः । अधिकग्रहणे तु न दोषः । ग्राम्याणां फलानि च यथासंभवं यथाशक्ति च । इतिशब्दः समस्तसंभारोपचयप्रदर्शनार्थः । अन्यदपि यत्संभरणीयं तत्सर्वं संभृत्येत्यर्थः ॥

भाष्यार्थ—' उपसद्व्रती भूत्वा ' पयोव्रती होऊन, ( पुढें सांगितले-

१ प्रकृतिभूत कर्म समग्र अंगांनीं संयुक्त असतें व विकृतिकर्म कांहीं अंगांनीं विकल—हीन असतें.

त्या क्रमानें हवन करतो असा संबंध ) असा भावार्थ. ' औदुंबरे ' [तांब्याच्या किंवा पितळेच्या पात्रांत अशी कोणाला शंका येईल म्हणून -]उ- दुंबरवृक्षमय पात्रांत ' कंसे चमसे वा ' हें त्या प्रकृत पात्राचेंच विशेषण आहे.कंसाकार किंवा चमसाकार औदुंबरपात्रांत,म्ह०त्याच्या आ- काराविषयीं विकल्प आहे, औदुंबरत्वाविषयीं नाहीं. त्या पात्रांत ' सर्वौष- धं ' सर्व ओषधींच्या समूहास, यथासंभव व यथाशक्ति सर्व औषधि आ- णून, त्यांत ग्राम्य औषधींतील व्रीहि यवादि पुढें सांगितलेल्या दहा औष- धि नियमानें घ्याव्या. त्यांहून अधिक घेतल्यास त्यांत दोष नाहीं. तशींच ' फलानि ' ग्राम्य ओषधींचीं फळें यथासंभव व यथाशक्ति आणून 'इति ' फलानि या पुढील इतिशब्द समस्त संभाराचा उपचय प्रदर्शित करण्या- साठीं आहे. ' संभृत्य- ' दुसरेंही जें कांहीं संभृत करण्यासारखें असेल तें सर्व संपादन करून, असा भावार्थ.

क्रमस्तत्र गृह्योक्तो द्रष्टव्यः । परिसमूहनपरिलेपने भूमिसंस्कारः । अग्निमुपसमाधायेति वचनादावसथ्येऽग्नाविति गम्यते । एकवचनादु- पसमाधानश्रवणाच्च । विद्यमानस्यैवोपसमाधानम् । परिस्तीर्य दर्भाना- वृता स्मार्तत्वात्कर्मणः स्थालीपाकावृत्परिगृह्यते तयाऽऽज्यं संस्कृत्य पुंसा नक्षत्रेण पुंनाम्ना नक्षत्रेण पुण्याहसंयुक्तेन मन्थं सर्वौषधफलपिष्टं तत्रौदुम्बरे चमसे दधनि मधुनि घृते चोपसिच्यैकयोपमन्थन्योपसंम- थ्य संनीय मध्ये संस्थाप्यौदुम्बरेण स्रुवेणाऽऽवापस्थान आज्यस्य जुहोत्येतैर्मन्त्रैर्यावन्तो देवा इत्याद्यैः ॥ १ ॥

भाष्यार्थ—( अहो पण औषधी, फळें इत्यादि संभार जमविल्या- नंतर परिसमूहनादि क्रमाविषयीं प्रमाण काय आहे, असें कोणी विचा- रील म्हणून सांगतात—) परिसमूहनादिक्रांविषयींचा क्रम गृह्यसूत्रांत सांगितल्याप्रमाणें जाणावा. ' परिसमुह्य परिलिप्य ' परिसमूहन व परि- लेपन हे भूमिसंस्कार आहेत. ' अग्निमुपसमाधाय ' अग्नीचें उपसमाधा-

१ जमविणें, गोळा करणें, संपादन.

न करून, असें वचन असल्यामुळें ' आवसथ्य ' अग्नीमध्यें होम करा-वा, असें सिद्ध होतें. कारण ' अग्निं ' असें एकवचन आहे व उपसमाधानाचें श्रवण आहे. ( पण उपसमाधानश्रवणानें त्रेताग्नीचें निवारण कसें होतें ? उत्तर–) विद्यमान अग्नीचेंच उपसमाधान होतें. [ आहवनीयादि त्रेताग्नीचें आधान करावें लागतें. त्यामुळें ते पूर्वींच विद्यमान नसतात. ] ' परिस्तीर्य-' दर्भांचीं परिस्तरणें घालून, ' आवृता-'इतिकर्तव्यतेनें–हें कर्म स्मार्त असल्यामुळें स्थालीपाकाची इतिकर्तव्यता येथें घेतली जाते. त्या आवृतेनें–इतिकर्तव्यतेनें ' आज्यं संस्कृत्य-' आज्याला संस्कार करून ' पुंसा नक्षत्रेण-' पुण्याहःसंयुक्त पुरुषनामक नक्षत्रानें ' मन्थं-' सर्व औषधि व फळें यांचें पिष्ट त्या चमसाकार औदुंबर पात्रांतील दह्यांत, मधांत व घृतांत टाकून–पिष्टाचा उपसेक करून–एका उपमन्थनीनें उपसंमथन करून–ढवळण्याच्या–कालवण्याच्या साधनानें तें ढवळून–कालवून ' संनीय-' आपल्या व अग्नीच्या मध्यें त्याचें स्थापन करून औदुंबर काष्ठाच्याच स्रुवेनें आवापस्थानीं ( आहुतिविशेषाच्या प्रक्षेपाच्या स्थानीं)'यावन्तो देवा इत्यादिः०'मंत्रांनीं आज्याचें हवन करतो १.

ज्येष्ठाय स्वाहा श्रेष्ठाय स्वाहेत्यग्नौ हुत्वा मन्थे सꣳस्रवमवनयति प्राणाय स्वाहा वसिष्ठायै स्वाहेत्यग्नौ हुत्वा मन्थे सꣳस्रवमवनयति वाचे स्वाहा प्रतिष्ठायै स्वाहेत्यग्नौ हुत्वा मन्थे सꣳस्रवमवनयति चक्षुषे स्वाहा संपदे स्वाहेत्यग्नौ हुत्वा मन्थे सꣳस्रवमवनयति श्रोत्राय स्वाहाऽऽयतनाय स्वाहेत्यग्नौ हुत्वा मन्थे सꣳस्रवमवनयति मनसे स्वाहा प्रजात्यै स्वाहेत्यग्नौ हुत्वा मन्थे सꣳस्रवमवनयति रेतसे स्वाहेत्यग्नौ हुत्वा मन्थे सꣳस्रवमवनयति ॥२॥

अर्थ—'ज्येष्ठाय स्वाहा' 'श्रेष्ठाय स्वाहा-' या मंत्रांनीं अग्नींत हवन करून मंथामध्यें संस्रव–स्रुवेला राहिलेलें आज्य पाडवितो. 'प्राणाय स्वाहा' 'वसिष्ठायै स्वाहा' या मंत्रांनीं अग्नींत हवन करून मंथांत संस्रव पाडवितो. 'वाचे स्वाहा' 'प्रतिष्ठायै स्वाहा' या मंत्रांनीं अग्नींत हवन करून मंथांत संस्रव पाडवितो. 'चक्षुषे स्वाहा' 'संपदे स्वाहा' या मंत्रांनीं अग्नींत हवन करून मंथामध्यें संस्रव पाडवितो. ' श्रोत्राय

स्वाहा ' 'आयतनाय स्वाहा' या मंत्रांनीं अग्नींत हवन करून मन्थांत संस्रव पाडवितो. 'मनसे स्वाहा' 'प्रजात्यै स्वाहा' या मंत्रांनीं अग्नींत हवन करून मंथामध्यें संस्रव टाकतो. 'रेतसे स्वाहा' या मंत्रानें अग्नींत हवन करून मंथांत संस्रव टाकतो २.

अग्नये स्वाहेत्यग्नौ हुत्वा मन्थे सꣳस्रवमवनयति सोमाय स्वाहेत्यग्नौ हुत्वा मन्थे सꣳस्रवमवनयति भूः स्वाहेत्यग्नौ हुत्वा मन्थे सꣳस्रवमवनयति भुवः स्वाहेत्यग्नौ हुत्वा मन्थे सꣳस्रवमवनयति स्वः स्वाहेत्यग्नौ हुत्वा मन्थे सꣳस्रवमवनयति भुर्भुवःस्वःस्वाहेत्यग्नौ हुत्वा मन्थे सꣳस्रवमवनयति ब्रह्मणे स्वाहेत्यग्नौ हुत्वा मन्थे सꣳस्रवमवनयति क्षत्राय स्वाहेत्यग्नौ हुत्वा मन्थे सꣳस्रवमवनयंति भूताय स्वाहेत्यग्नौ हुत्वा मन्थे सꣳस्रवमवनयति भविष्यते स्वाहेत्यग्नौ हुत्वा मन्थे सꣳस्रवमवनयति विश्वाय स्वाहेत्यग्नौ हुत्वा मन्थे सꣳस्रवमवनयति सर्वाय स्वाहेत्यग्नौ हुत्वा मन्थे सꣳस्रवमवनयति प्रजापतये स्वाहेत्यग्नौ हुत्वा मन्थे सꣳस्रवमवनयति ॥३॥

अर्थ—'अग्नये स्वाहा' 'सोमाय स्वाहा' 'भूः स्वाहा' 'भुवः स्वाहा' 'स्वः स्वाहा' 'भूर्भुवः स्वः स्वाहा' ' ब्रह्मणे स्वाहा ' ' क्षत्राय स्वाहा ' 'भूताय स्वाहा' 'भविष्यते स्वाहा' ' विश्वाय स्वाहा ' ' सर्वाय स्वाहा ' 'प्रजापतये स्वाहा' या मंत्रांनीं क्रमानें अग्नींत हवन करून प्रत्येक वेळीं मंथांमध्यें संस्रव पाडवावा—टाकावा. ३.

ज्येष्ठाय स्वाहा श्रेष्ठाय स्वाहेत्यारभ्य द्वे द्वे आहुती हुत्वा मन्थे संस्रवमवनयति । स्रुवावलेपनमाज्यं मन्थे संस्रावयति । एतस्मादेव ज्येष्ठाय श्रेष्ठायेत्यादिप्राणलिङ्गाज्ज्येष्ठश्रेष्ठादिप्राणविद एवास्मिन्कर्मण्यधिकारः। रेतस इत्यारभ्यैकैकामाहुतीं हुत्वा मन्थे संस्रवमवनयत्यपरयोपमन्थन्या पुनर्मथ्नाति ॥२॥३॥

भाष्यार्थ—'ज्येष्ठाय स्वाहा' 'श्रेष्ठाय स्वाहा' येथून आरंभ करून दोन दोन आहुती देऊन मन्थांत संस्रव अवनत करतो. स्रुवेला लागून राहिलेलें—स्रुवेंत राहिलेलें आज्य मंथांत ओततो-टाकतो—पाडवितो. ('ज्येष्ठाय' इत्यादि मंत्रांतील ध्वनित अर्थ सांगतात—) ज्येष्ठाय, श्रेष्ठाय,

इत्यादि याच प्राणलिंगावरून ज्येष्ठा-श्रेष्ठादि प्राणवेत्त्याचाच या क्रमांत अधिकार आहे, हें ठरतें. 'रेतसः' येथून आरंभ करून पुढें तिसरी कंडिका संपेपर्यंत एकेक आहुति देऊन मंथांत संस्रव टाकतो. होम झाल्या-वर दुसऱ्या उपमंथनीनें पुनः मंथन करतो. २—३.

अथैनमभिमृशति भ्रमदसि ज्वलदसि पूर्णमसि प्रस्तब्धमस्येकसभमसि हिंकृतमसि हिंक्रियमाणमस्युद्गीथमस्युद्गीयमानमसि श्रावितमसि प्रत्याश्रावितमस्यार्द्रे संदीप्तमसि विभूरसि प्रभूरस्यन्नमसि ज्योतिरसि निधनमसि संवर्गोऽसीति ॥ ४ ॥

अर्थ—नंतर त्या मंथाला 'भ्रमदसि०' इत्यादि मंत्रानें स्पर्श करतो. (मंथद्रव्याची प्राण ही देवता असल्यामुळें त्याला प्राणाशीं एकरूप करून सर्वात्मकत्व आहे. त्यामुळें) सर्व देहांमध्यें तूं प्राणरूपानें 'भ्रमद्-' भ्रमण करणारा आहेस (कारण प्राणाला चलनात्मकत्व आहे व मंथ तद्रूप आहे) सर्व देहांत तूं अग्निरूपानें 'ज्वलत्-' दीप्त होणारा आहेस. ब्रह्म-रूपानें 'पूर्ण' आहेस, आकाशरूपानें 'अतिशय स्तब्ध-' निष्कंप आहेस. सर्वांशीं अविरोधित्व असल्यामुळें सर्वही जगत् 'एक सभेप्रमाणें' आत्म्या-मध्यें अन्तर्भूत करून अपरिच्छिन्नत्वानें स्थित असलेली वस्तु तूं आहेस. प्रस्तोत्याकडून यज्ञाच्या आरंभीं तूंच 'हिंकृत' आहेस. त्याच प्रस्तोत्या-कडून यज्ञांत 'हिंक्रियमाण' तूंच आहेस. उद्गात्याकडून यज्ञाच्या आरंभीं व यज्ञामध्यें उच्च स्वरानें गायला जाणारा 'उद्गीथ' तूं आहेस. अध्वर्यू-कडून तूं 'श्रावित' आहेस. आग्निध्राकडून प्रत्याश्रावित आहेस. 'आर्द्रे' मे-घोदरांत 'उत्तमप्रकारें दीप्त' आहेस. 'विभु-' विविध होणारा व 'प्रभु-' समर्थ आहेस. (भोग्यरूपानें—सोमात्मरूपानें स्थित असल्यामुळें) 'अन्न' आहेस. भोक्तृरूपानें—अग्नि-स्वरूपानें 'ज्योति' आहेस. कारणत्वामुळें 'निधन-' लय आहेस. अध्यात्म वागादिक व अधिदैव अग्न्यादिक त्यांच्या संहरणा-मुळें तूं 'संवर्ग' आहेस. (असा अभिमर्शन—स्पर्श-मंत्राचा अर्थ आहे.) ४.

अथैनमभिमृशति भ्रमदसीत्यनेन मन्त्रेन ॥४॥

भाष्यार्थ—'भ्रमदसि०' इत्यादि मंत्रानें त्यानंतर या मंथाला अभिमर्शन–स्पर्श करतो. ४.

अथैनमुद्यच्छत्यामꣳस्यामꣳहि ते महि स हि राजेशानोऽधिपतिः स माꣳ राजेशानोऽधिपतिं करोत्विति ॥५॥

अर्थ—त्यानंतर त्याला 'आमंसि आमंहि०' इत्यादि मंत्रानें वर उचलतो. (त्या मंत्राचा अर्थ–) 'आमंसि-' तूं सर्व जाणतोस व आम्ही 'ते महि' तुझें अतिशय मोठें रूप जाणतों. 'स हि राजा०-' तो प्राण राजा, ईशान[1], अधिपति आहे तो मला राजा, ईशान व अधिपति करो. (हा वर उचलण्याचा मंत्र आहे.) ५.

अथैनमुद्यच्छति सह पात्रेण हस्ते गृह्णात्यामंस्यामंहि ते महीत्यनेन५

भाष्यार्थ—'अथ एनं-' नंतर त्या मंथाला 'उद्यच्छति-' पात्रासहवर्तमान हातांत घेतो. 'आमंस्यामंहि ते महि०' इत्यादि मंत्रानें (हातांत घेतो) ५.

अथैनमाचामति तत्सवितुर्वरेण्यम् । मधु वाता ऋतायते । मधु क्षरन्ति सिन्धवः । माध्वीर्नः सन्त्वोषधीः । भूः स्वाहा । भर्गो देवस्य धीमहि । मधु नक्तमुतोषसो मधुमत्पार्थिवꣳरजः । मधु द्यौरस्तु नः पिता । भुवः स्वाहा । धियो यो नः प्रचोदयात् । मधुमान्नो वनस्पतिर्मधुमाँ अस्तु सूर्यः । माध्वीर्गावो भवन्तु नः । स्वः स्वाहेति । सर्वां च सावित्रीमन्वाह सर्वाश्च मधुमतीरहमेवेदꣳसर्वं भूयासं भूर्भुवः स्वः स्वाहेत्यन्तत आचम्य पाणी प्रक्षाल्य जघनेनाग्निं प्राक्शिराः संविशति प्रातरादित्यमुपतिष्ठते दिशामेकपुण्डरीकमस्यहं मनुष्याणामेकपुण्डरीकं भूयासमिति यथेतमेत्य जघनेनाग्निमासीनो वꣳशं जपति॥६॥

अर्थ—त्यानंतर या मंथाचें 'तत्सवितुः' इत्यादि मंत्रानीं भक्षण करतो. 'तत्सवितु०:-' सूर्याच्या त्या वरेण्य–श्रेष्ठ पदार्थे आम्ही ध्यान करतों 'वाताः मधु ऋतायन्ते-' वायुमेद सुखकर वाहतात, 'सिन्धवः मधु क्षरन्ति-' नद्या मधुर रसांचा स्राव करितात. 'नः ओषधीः माध्वीः सन्तु-' आम्हां प्रत औषधी मधुररस होवोत. 'भूः स्वाहा.' (या अर्थाच्या मंत्रानें मंथाचा

१ ईशान, अधिपति इत्यादिकांचा अर्थ अ. ५ पृ. ४५-४६ वर पहा.

पहिला ग्रास भक्षितो.) 'देवस्य भर्गः धीमहि-' सवित्या देवाचें तेज आम्ही चिंतितों. 'नक्तं उत उषसः मधु-' रात्र व दिवस प्रीतिकर होवोत, 'पार्थिवं रजः मधुमत्-' पृथ्वीचें रज–धूळ अनुद्वेगकर–उद्वेग न करणारें असो. 'द्यौः पिता नः मधु अस्तु-' द्यौ–स्वर्गलोक हा पिता आम्हांप्रत सुखकर असो. 'भुवः स्वाहा' (अशा अर्थाच्या मंत्रानें दुसरा ग्रास खावा) 'यः नः धियः प्रचोदयात्' जो सविता आमच्या बुद्धींस प्रेरणा करतो त्याच्या श्रेष्ठ तेजाचें आम्ही ध्यान करतों. 'नः वनस्पतिः मधुमान् अस्तु-' आम्हांला वनस्पति–सोम मधुमान् असो. 'सूर्यः मधुमान् अस्तु-' सूर्य आम्हांप्रत मधुमान् असो. 'गावः नः माध्वीः भवन्तु-' किरण किंवा दिशा सुखकर असोत. 'स्वः स्वाहा' ( अशा अर्थाच्या मंत्रानें तिसरा ग्रास घ्यावा. ) नंतर ' तत्सवितुर्वरेण्यं० ' इत्यादि सर्व सावित्री, 'मधुवाता ऋतायते०' इत्यादि सर्व मधुमती ऋचा, 'मीच हें सर्व व्हावें,' अशा अर्थाचें 'अहमेवेदं सर्वं भूयासं-' असें वाक्य शेवटीं म्हणून 'भूर्भुवः स्वः स्वाहा' या मंत्रानें शेवटीं सर्व मंथ भक्षण करून दोन्ही हात धुवून अग्नीच्या पश्चाद्भागीं–पश्चिमेस पूर्वेकडे मस्तक करून निजतो. प्रातःकाळीं 'दिशामेकपुण्डरीकमसि०' या मंत्रानें आदित्याचें उपस्थान करतो. (त्या मंत्राचा अर्थ–तूं दिशांचा एक पुंडरीक–अखंड श्रेष्ठ आहेस मी मनुष्यांतील एक पुंडरीक व्हावें.) गेल्या मार्गानें परत येऊन अग्नीच्या पश्चात् भागीं बसणारा तो पुढील वंशाचा जप करतो ६.

अथैनमाचामति भक्षयति गायत्र्याः प्रथमपादेन मधुमत्यैकया व्याहृत्या च प्रथमया प्रथमग्रासमाचामति । तथा गायत्रीद्वितीयपादेन मधुमत्या द्वितीयया द्वितीयया च व्याहृत्या द्वितीयं ग्रासम् । तथा तृतीयेन गायत्रीपादेन तृतीयया मधुमत्या तृतीयया च व्याहृत्या तृतीयं ग्रासम् । सर्वां सावित्रीं सर्वाश्च मधुमतीरुक्त्वाऽहमेवेदं सर्वं भूयासमिति चान्ते भूर्भुवः स्वः स्वाहेति समस्तं भक्षयति । यथा चतुर्भिर्ग्रासैस्तद्द्रव्यं सर्वं परिसमाप्यते तथा पूर्वमेव निरूपयेत् । यत्पात्रावलिप्तं तत्पात्रं सर्वं निर्णिज्य तूष्णीं पिबेत् । पाणी प्रक्षाल्याप आ-

चम्य जघनेनाग्निं पश्चादग्नेः प्राक्शिराः संविशति । प्रातःसंध्यामुपास्याऽऽदित्यमुपतिष्ठते दिशामेकपुण्डरीकमित्यनेन मन्त्रेण । यथेतं यथागतमेत्याऽऽगत्य जघनेनाग्निमासीनो वंशं जपति ॥६॥

भाष्यार्थ—'अथैनमाचामति०-' नंतर या मंथाचें भक्षण करतो. गायत्रीच्या प्रथम पादानें, एका मधुमतीनें, व प्रथम व्याहृतीनें पहिला ग्रास खातो. त्याचप्रमाणें गायत्रीच्या दुसऱ्या पादानें, दुसऱ्या मधुमतीनें व दुसऱ्या व्याहृतीनें दुसरा ग्रास घेतो. तसाच, गायत्रीच्या तिसऱ्या पादानें, तिसऱ्या मधुमतीनें व तिसऱ्या व्याहृतीनें तिसरा ग्रास खातो. सर्व सावित्री, सर्व मधुमती ऋचा, व 'मीच हें सर्व व्हावें' असें म्हणून शेवटीं 'भूर्भुवः स्वः स्वाहा' असें म्हणून समस्त मन्थद्रव्य भक्षण करतो. चार ग्रासांनीं तें सर्व द्रव्य संपेल अशा बेतानेंच तें पूर्वीं त्यांत घालावें. जें पात्राला चिकटून राहिलें असेल तें सर्व पात्र धुऊन मुकाट्यानें प्यावें. दोन्ही हात धुऊन आचमन करून 'जघनेनाग्निं०-' अग्नीच्या पश्चात् पूर्वेकडे शिर करून निजतो. प्रातःसंध्येची उपासना करून 'दिशामेकपुंडरीकं०' या मंत्रानें आदित्याचें उपस्थान करतो. नंतर स्नान, संध्योपासना इत्यादिकांकरितां जसा गेला होता तसाच परत येऊन व अग्नीच्या पश्चात् भागीं बसून पुढील वंशाचा जप करतो. ६.

तꣳ हैतमुद्दालक आरुणिर्वाजसनेयाय याज्ञवल्क्यायान्तेवासिन उक्त्वोवाचापि य एनꣳ शुष्के स्थाणौ निषिञ्चेज्जायेरञ्छाखाः प्ररोहेयुः पलाशानीति ॥ ७ ॥

अर्थ—उद्दालक आरुणि त्याच या मंथाला आपला अन्तेवासी जो वाजसनेय याज्ञवल्क्य त्यास सांगून म्हणाला " जर कोणी या मंथाला शुष्क स्तंभावरही टाकील तर त्या स्तंभालाही शाखा फुटतील व पानें येतील. " ७.

एतमु हैव वाजसनेयो याज्ञवल्क्यो मधुकाय पैङ्ग्यायान्तेवासिन उक्त्वोवाचापि य एनꣳ शुष्के स्थाणौ निषिञ्चेज्जायेरञ्छाखाः प्ररोहेयुः पलाशानीति ॥ ८ ॥

अर्थ—वाजसनेय याज्ञवल्क्य हाच मंथ मधुक पैंग्य शिष्याला सांगून म्हणाला " याला जर कोणी वाळलेल्या लांकडावर टाकील तर त्यालाही शाखा फुटतील व पानें येतील. " ८.

एतमु हैव मधुकः पैङ्ग्यश्चूलाय भागवित्तयेऽन्तेवासिन उक्त्वोवाचापि य एनꣳ शुष्के स्थाणौ निषिञ्चेज्जायेरञ्छाखाः प्ररोहेयुः पलाशानीति ॥ ९ ॥

अर्थ—मधुक पैंग्य हाच मंथ चूल भागवित्ति शिष्याला सांगून म्हणाला, " जर याला कोणीं शुष्क स्थाणूवरही टाकलें तर त्याला शाखा येतील व पानें फुटतील. " ९

एतमु हैव चूलो भागवित्तिर्जानकय आयस्थूणायान्तेवासिन उक्त्वोवाचापि य एनꣳ शुष्के स्थाणौ निषिञ्चेज्जायेरञ्छाखाः प्ररोहेयुः पलाशानीति ॥ १० ॥

अर्थ—चूल भागवित्ति जानकि आयस्थूण शिष्याला हाच मंथ सांगून म्हणाला, " जर कोणी याला वाळलेल्या वृक्षाच्या खोडावर टाकील तर त्यालाही शाखा फुटतील व पानें येतील " १०.

एतमु हैव जानकिरायस्थूणः सत्यकामाय जाबालायान्तेवासिन उक्त्वोवाचापि य एनꣳ शुष्के स्थाणौ निषिञ्चेज्जायेरञ्छाखाः प्ररोहेयुः पलाशानीति ॥ ११ ॥

अर्थ—जानकि आयस्थूण सत्यकाम जाबाल या शिष्याला हाच मंथ सांगून म्हणाला, " जर कोणी हा मंथ निर्जीव लांकडावर टाकील तर त्यालाही डाहळ्या फुटतील व पानें येतील. " ११.

एतमु हैव सत्यकामो जाबालोऽन्तेवासिभ्य उक्त्वोवाचापि य एनꣳ शुष्के स्थाणौ निषिञ्चेज्जायेरञ्छाखाः प्ररोहेयुः पलाशानीति तमेतं नापुत्राय वाऽनन्तेवासिने वा ब्रूयात् ॥ १२ ॥

अर्थ—सत्यकाम जाबाल हाच मंथ अनेक शिष्यांना सांगून म्हणाला " जर कोणी हा मंथ शुष्क स्थाणूवर टाकिला तर त्यालाही अवयव फुटतील व पानें येतील." तो हा मंथ अपुत्र किंवा अशिष्य यांना सांगू नये. १२.

तं हैतमुद्दालक इत्यादि सत्यकामो जाबालोऽन्तेवासिभ्य उक्त्वोवाचापि य एनं शुष्के स्थाणौ निषिञ्चेज्जायेरन्नेवास्मिञ्शाखाः प्ररोहेयुः पलाशानीत्येवमन्तमेनं मन्थमुद्दालकात्प्रभृत्येकैकाचार्यक्रमागतं सत्यकाम आचार्यो बहुभ्योऽन्तेवासिभ्य उक्त्वोवाच । किमन्यदुवाचेत्युच्यते । अपि य एनं शुष्के स्थाणौ गतप्राणेऽप्येनं मन्थं भक्षणाय संस्कृतं निषिञ्चेत्प्रक्षिपेज्जायेरन्नुत्पद्येरन्नेवास्मिन्स्थाणौ शाखा अवयवा वृक्षस्य प्ररोहेयुश्च पलाशानि पर्णानि यथा जीवतः स्थाणोः किमुतानेन कर्मणा कामः सिध्येदिति । ध्रुवफलमिदं कर्मेति कर्मस्तुत्यर्थमेतत् । विद्याधिगमे षट्तीर्थानि तेषामिह सप्राणदर्शनस्य मन्थविज्ञानस्याधिगमे द्वे एव तीर्थे अनुज्ञायेते पुत्रश्चान्तेवासी च ॥ ७–१२ ॥

भाष्यार्थ--‘ तं ह एतमुद्दालक०’ येथून आरंभ करून ‘ सत्यकामो जाबालोऽन्तेवासिभ्य उक्त्वोवाचापि........प्ररोहेयुः पलाशानि ’ येथपर्यंत हा वंश आहे. त्याचा जप करतो, असा सहाव्या कंडिकेच्या शेवटच्या शब्दांशीं याचा संबंध. उद्दालकापासून एकेका आचार्यांच्या क्रमानें आलेल्या या मंथास सत्यकाम आचार्य अनेक अन्तेवासींना सांगून म्हणाला. आणखी काय म्हणाला, तेंच सांगितलें जातें–‘अपि य एनं शुष्के स्थाणौ०-’ गतप्राण- मृत अशाही काष्ठावर भक्षणासाठीं संस्कारयुक्त केलेल्या या मंथाला जर कोणी टाकील तर ‘ जायेरन्०-’ उत्पन्न होतीलच त्या स्थाणूंत शाखा–वृक्षाचे अवयव उगवतील–फुटतील. ज्याप्रमाणें जिवंत वृक्षाला पानें येतात त्याप्रमाणें त्या स्थाणूला शाखा फुटून त्यांस पानें येतील! मग या कर्मानें कर्त्याची कामना पूर्ण होईल, हें काय सांगावें ? हें कर्म ध्रुवफल–नियत फल देणारें आहे, अशी या कर्माची प्रशंसा करण्यासाठीं हें आहे. विद्या देण्यास शिष्य, वेदाध्यायी श्रोत्रिय, धारणाशक्तिमान् पुरुष, धन देणारा, प्रिय पुत्र, व एक विद्या शिकून दुसरी देणारा अशीं सहा तीर्थें–संप्रदानें आहेत. त्यांतील प्राणदर्शनासह मन्थविज्ञानाच्या दानाला दोनच तीर्थांची अनुज्ञा दिलेली आहे. एक पुत्र व दुसरा शिष्य. ७–१२.

चतुरौदुम्बरो भवत्यौदुम्बरः स्रुव औदुम्बरश्चमस औदुम्बर इध्म औदुम्बर्यौ उपमन्थन्यौ दश ग्राम्याणि धान्यानि भवन्ति व्रीहियवास्तिलमाषा अणुप्रियंगवो गोधूमाश्च मसूराश्च खल्वाश्च खलकुलाश्च तान्पिष्टान्दधनि मधुनि घृत उपसिञ्चत्याज्यस्य जुहोति ॥ १३ ॥

इति बृहदारण्यकोपनिपदि पष्ठाध्यायस्य तृतीयं ब्राह्मणम् ॥ ३ ॥

अर्थ—हा मंथ चतुरौदुंबर असतो. म्हणजे यांत औदुंबरकाष्ठाचीच स्रुवा, औदुंबरकाष्ठाचाच चमस, औदुंबरकाष्ठाचाच इध्म व औदुंबराच्याच दोन उपमंथनी. दहा ग्राम्य धान्यें असतात. व्रीहि—भात, यव, तिळ, माष ( उडीद ), अणु ( चीनक ), प्रियंगु ( राळे ), गहूं, मसूर, वाल, व कुळीथ. त्यांचें पीठ करतो व तें दहीं, मध व घृत यांत घालतो व घृताच्या आहुति देतो १३ (३)

चतुरौदुम्बरो भवतीति व्याख्यातम् । दश ग्राम्याणि धान्यानि भवन्ति ग्राम्याणां तु धान्यानां दश नियमेन ग्राह्या इत्यवोचाम । के त इति निर्दिश्यन्ते । व्रीहियवास्तिलमाषा अणुप्रियंगवोऽणवश्चाणुशब्दवाच्याः । क्वचिद्देशे प्रियंगवः प्रसिद्धाः कङ्गुशब्देन । खल्वा निष्पावा वल्लशब्दवाच्या लोके खलकुलाः कुलत्थाः । एतद्व्यतिरेकेण यथाशक्ति सर्वौषधयो ग्राह्याः फलानि चेत्यवोचामायाज्ञिकानि वर्जयित्वा ॥ १३ ॥

इति बृहदारण्यकोपनिपद्भाष्ये षष्ठाध्यायस्य तृतीयं ब्राह्मणम् ॥ ३ ॥

भाष्यार्थ—‘ चतुरौदुंबरो भवति ’ याचें व्याख्यान स्वतः श्रुतीनेंच केलें आहे. ‘ दश ग्राम्याणि धान्यानि भवन्ति-’ ग्राम्य धान्यांतील दहा धान्यें नियमानें घ्यावीं असें आम्हीं आरंभीं ( भाष्यांत ) सांगितलें आहे. ( पृ. ७९ पहा.) पण तीं कोणतीं त्यांचा निर्देश श्रुति करते. व्रीहि—भात, जव, तिळ, उडीद, ‘ अणुप्रियंगवः-’ अणू—‘अणु’ या शब्दानें वाच्य असलेलें ( चीनक नावाचें ) धान्य, प्रियंगु कांहीं देशांत कंगु या नांवानें प्रसिद्ध आहेत ( राळे ), गहूं, मसूर, ‘ खल्वाः-’ निष्पाव व्यवहारांत वल्ल ( वाल ) या शब्दानें वाच्य असलेले, ‘ खलकूलाः-’ कुळीथ. यांवाचून यथाशक्ति सर्व ओषधी व फळें घ्यावीं, असें आम्ही वर

(पृ. ७९ पहा) सांगितलें आहे. पण तीं अयाज्ञिक धान्यें व फळें यांस वर्ज करून घ्यावीं १३.

इति श्रीबृहदारण्यकभाष्यार्थांच्या सहाव्या अध्यायाचें तिसरें ब्राह्मण समाप्त.

---

एषां वै भूतानां पृथिवी रसः पृथिव्या आपोऽपामोषधय ओषधीनां पुष्पाणि पुष्पाणां फलानि फलानां पुरुषः पुरुषस्य रेतः ॥ १ ॥

अर्थ—या चराचर भूतांचा पृथिवी हा रस--सारभूत आहे. पृथिवीचा आप रस आहे. आपांचा ओषधि हा रस आहे. ओषधींचा पुष्पें हा रस आहे. पुष्पांचा रस फळें, फळांचा रस पुरुष व पुरुषाचा रस रेत आहे १.

यादृग्जन्मा यथोत्पादितो यैर्वा गुणैर्विशिष्टः पुत्र आत्मनः पितुश्च लोक्यो भवतीति तत्संपादनाय ब्राह्मणमारभ्यते । प्राणदर्शिनः श्रीमन्थं कर्म कृतवतः पुत्रमन्थेऽधिकारः । यदा पुत्रमन्थं चिकीर्षति तदा श्रीमन्थं कृत्वर्तुकालं पत्न्याः प्रतीक्षत इत्येतद्रेतस ओषध्यादिरसतमत्वस्तुत्याऽवगम्यते ॥

भाष्यार्थ—(वित्ताची इच्छा करणाऱ्या प्राणोपासकाला 'मंथ' या नांवाचें कर्म सांगून पुढील ब्राह्मणाला उत्थापित करितात--) जशाप्रकारच्या जन्मानें युक्त, ज्या प्रकारानें उत्पन्न केलेला व ज्या गुणांनीं विशिष्ट आणि जो आपल्या व पित्याच्या उत्तम लोकाला हितकर होतो असा पुत्र कसा होईल, अशी अपेक्षा झाली असतां त्याला संपादन करण्यासाठीं हें ब्राह्मण आरंभिलें जातें. प्राणोपासक व वरील श्रीमन्थ या नांवाचें कर्म ज्यानें केलें आहे त्याचाच या पुत्र-मंथ कर्मामध्यें अधिकार आहे. जेव्हां प्राणोपासक पुत्रमंथ करण्याची इच्छा करतो तेव्हां वरील श्रीमन्थ करून पत्नीच्या ऋतुकालाची अपेक्षा करीत राहतो, ही गोष्ट रेताची ओषध्यादिकांच्या [1]रसतमत्वानें स्तुति केल्यानें अवगत होत.

एषां वै चराचराणां भूतानां पृथिवी रसः सारभूता । सर्वभूतानां

---

१ रेत ओषध्यादिकांचें अत्यंत सार आहे, अशी जी त्याची स्तुति केली आहे, त्यावरून कळतें.

माध्विति ह्युक्तम् । पृथिव्या आपो रसः । अप्सु हि पृथिव्योता च प्रोता च । आपामोषधयो रसः । कार्यत्वाद्रसत्वमोषध्यादीनाम् । ओषधीनां पुष्पाणि । पुष्पाणां फलानि । फलानां पुरुषः । पुरुषस्य रेतः । "सर्वेभ्योऽङ्गेभ्यस्तेजः संभूतम्" इति श्रुत्यन्तरात् ॥ १ ॥

भाष्यार्थ—' एषां वै०-' या चराचर भूतांची पृथिवी रस–सारभूत आहे. ही पृथिवी सर्व भूतांचें मधु आहे, असें मधुब्राह्मणांत ( अ.२पृ. २१९)सांगितलेंच आहे.पृथिवीचा आप हा रस,आपांमध्यें पृथिवी ओत व प्रोत आहे असें गार्गीब्राह्मणांत( अ.३पृ.१६१)सांगितलें आहे. आपांचा ओषधी रस आहे.(आप पृथ्वीचें कारण असल्यामुळें त्यांना जसें पृथिवीचें रसत्व आहे तसेंच ) औषध्यादिकांना कार्यत्व असल्यामुळें रसत्व आहे. ओषधींचीं पुष्पें, पुष्पांचीं फळें, फळांचा पुरुष व पुरुषाचें रेत; ' रेत हें पुरुषाच्या सर्व अंगांपासून उत्पन्न झालेलें तेज आहे,' अशी दुसरी श्रुति आहे. ( ऐतरेयोपनिषद्भाष्यार्थ पृ. १८६ पहा ) १.

स ह प्रजापतिरीक्षांचक्रे हन्तास्मै प्रतिष्ठां कल्पयानीति स स्त्रियꣳ ससृजे ताꣳ सृष्ट्वाऽध उपास्त तस्मात्स्त्रियमध उपासीत स एतं प्राञ्चं ग्रावाणमात्मन एव समुदपारयत्तेनैनामभ्यसृजत् ॥ २ ॥

अर्थ--तो स्रष्टा प्रजापति आलोचन करता झाला. मी आतां या रेताला प्रतिष्ठा कल्पितों, असें ईक्षण करून तो स्त्रीला उत्पन्न करता झाला. तिला उत्पन्न करून तिचें अधउपासन करता झाला. तस्मात् स्त्रीचें अधउपासन करावें. तो या अतिशय गतियुक्त अशा आपल्या ग्राव्यास–जननेंद्रियास उत्पूरित करता झाला. त्या योगानें या स्त्रीशीं अभिसंसर्ग करता झाला २.

यत एवं सर्वभूतानां सारतममेतद्रेतोऽतः का नु खल्वस्य योग्या प्रतिष्ठेति स ह स्रष्टा प्रजापतिरीक्षांचक्रे । ईक्षां कृत्वा स स्त्रियं ससृजे । तां च सृष्ट्वाऽध उपास्त मैथुनाख्यं कर्माधउपासनं नाम कृतवान् । तस्मात्स्त्रियमध उपासीत । श्रेष्ठानुश्रयणा हि प्रजाः । अत्र वाजपे-

यसामान्यकृतिमाह । स एतं प्राञ्चं प्रकृष्टगतियुक्तमात्मनो ग्रावाणं सोमाभिषवोपलस्थानीयं काठिन्यसामान्यात्प्रजननेन्द्रियमुदपारयदुत्पूरितवान्स्त्रीव्यञ्जनं प्रति तेनैनां स्त्रियमभ्यसृजदभिसंसर्गं कृतवान्॥२॥

भाष्यार्थ—ज्याअर्थी येणेंप्रमाणें हें रत सर्वभूतांचें अतिशय सार आहे; त्याअर्थीं याला योग्य अशी प्रतिष्ठा काय बरें करावी, असें ' स ह प्रजापतिः ईक्षांचक्रे ' तो स्रष्टा प्रजापति ईक्षण—आलोचन करता झाला. ईक्षण करून ' स स्त्रियं ससृजे-' त्यानें स्त्रीला उत्पन्न केलें. ' तां सृष्ट्वा-' तिला उत्पन्न करून ' अध उपास्त-' मैथुनाख्य कर्माला अध उपासन असें नांव आहे. तें तो करता झाला. ' तस्मात्स्त्रियं अध उपासीत-' यास्तव स्त्रीला अधउपासन करावें. कारण प्रजा श्रेष्ठांचें अनुसरण करणाऱ्या आहेत. ( अहो पण या पशुकर्मामध्यें प्रत्येक प्राणी स्वरुचीनेंच—स्वभावतःच प्रवृत्त होत असल्यामुळें त्याविषयीं विधि व्यर्थ आहे. अशी आशंका घेऊन सांगतात—) या अवाच्य कर्मामध्यें श्रुति वाजपेयाच्या साधर्म्याची कल्पना करावयास सांगते—' स एतं प्राञ्चं ' तो या श्रेष्ठ गतियुक्त ' ग्रावाणं-' सोमवल्ली कुटण्याच्या दगडाच्या स्थानीं असलेल्या आपल्या जननेंद्रियास—काठिन्य या साधर्म्यामुळें तें ग्रावस्थानीय आहे— 'उदपारयत्-' स्त्रीचिह्नाप्रत उत्पूरित करिता झाला. ' तेन एनां अभ्यसृजत्-' त्या योगानें तिच्याशीं सर्वतः संसर्ग करता झाला २.

तस्या वेदिरुपस्थो लोमानि बर्हिश्चर्माधिषवणे समिद्धो मध्यतस्तौ मुष्कौ स यावान्ह वै वाजपेयेन यजमानस्य लोको भवति तावानस्य लोको भवति य एवं विद्वानधोपहासं चरत्यासाᳩ स्त्रीणाᳩ सुकृतं वृङ्क्तेऽथ य इदमविद्वानधोपहासं चरत्यास्य स्त्रियः सुकृतं वृञ्जते ॥ ३ ॥

अर्थ—तिचा उपस्थ ही वेदि, लोम हे दर्भ, स्त्रीचिह्नाच्या मध्यें समिद्ध—प्रदीप्त अग्नि, ते दोन मुष्क हे दोन सोमरसकाढण्याचे—अधिषवणफलक आहेत. जें रहस्यदेशांतील चर्म तेंच सोमकुटण्याचें चर्म आहे. यजमानाला वाजपेयानें जेवढें फळ मिळतें तेवढें यानें मिळतें.

जो असें जाणणारा अधोपहास कर्म करतो तो स्त्रियांचें सुकृत संपादन करतो. पण जो असें वाजपेयोपासन न जाणतां अधोपहास करतो त्याचें सुकृत स्त्रिया संपादन करितात ३.

तस्या वेदिरित्यादि सर्वं सामान्यं प्रसिद्धम् । समिद्धोऽग्निर्मध्यतः स्त्रीव्यञ्जनस्य तौ मुष्कावधिषवणफलके इति व्यवहितेन संबध्यते । वाजपेययाजिनो यावाँल्लोकः प्रसिद्धस्तावान्विदुषो मैथुनकर्मणो लोकः फलमिति स्तूयते । तस्माद्बीभत्सा नो कार्येति । य एवं विद्वानधोपहासं चरत्यासां स्त्रीणां सुकृतं वृङ्क्त आवर्जयति । अथ पुनर्यो वाजपेयसंपत्तिं न जानाञ्चविद्वान्रेतसो रसतमत्वं चाधोपहासं चरति । आऽस्य स्त्रियः सुकृतमावृञ्जतेऽविदुषः ॥ ३ ॥

भाष्यार्थ—'तस्या वेदिः-' इत्यादि सर्व सामान्य प्रसिद्ध आहे. 'समिद्धो मध्यतः-' प्रदीप्त अग्नि स्त्रीव्यंजनाच्या मध्यें, ते दोन मुष्क—वृषण—योनीच्या दोन्ही बाजूस असलेले कठिन मांसखंड हे 'अधिषवणे' अधिषवण फलक आहेत, असा दूरच्या शब्दाशीं संबंध आहे. (मुष्कांच्या ठिकाणीं अधिषवणनांवाच्या सोमफलकांची दृष्टि करावी. सोमकण्डनार्थ जें बैलाचें चर्म असतें त्याची दृष्टि स्त्रीच्या गुह्यप्रदेशांतील चर्माचे ठिकाणीं करावी.) वाजपेययाजी पुरुषाला जेवढा लोक प्रसिद्ध आहे तेवढा विद्वानाच्या मैथुन कर्माचा लोक—फळ—होतो, अशी मैथुन कर्माची स्तुति केली जाते. तस्मात् त्याविषयीं बीभत्सा—घृणा—किळस करूं नये. 'य एवं०-' जो असें जाणणारा अधोपहास करतो तो या स्त्रियांचें सुकृत ओढून घेतो.'अथ यः०-'पण जो अविद्वान् या वाजपेयसंपत्तीला जाणत नाहीं, व रेताचें रसतमत्व जाणत नाहीं, आणि अधोपहास मात्र करतो 'अस्य सुकृतं स्त्रियःआवृञ्जते-'त्या अविद्वानाचें पुण्य स्त्रिया आकर्षण करून घेतात ३.

एतद्ध स्म वै तद्विद्वानुद्दालक आरुणिराहैतद्ध स्म वै तद्विद्वान्नाको मौद्गल्य आहैतद्ध स्म वै तद्विद्वान्कुमारहारित आह बहवो मर्या ब्राह्म-

णायना निरिन्द्रिया विसुकृतोऽस्माल्लोकात्प्रयन्ति य इदमविद्वाꣳसोऽधोपहासं चरन्तीति बहु वा इदꣳ सुप्तस्य वा जाग्रतो वा रेतः स्कन्दति ॥ ४ ॥

अर्थ—तें अधोपहासाख्य मैथुनकर्म वाजपेयसंपन्न आहे, असें जाणणारा आरुणि उद्दालक असें म्हणतो, तद्विद्वान् नाको मौद्गल्य असें म्हणतो, तें जाणणारा कुमारहारित असें म्हणतो–(असें तें काय?उत्तर-) पुष्कळ ब्रह्मबंधु मनुष्य कीं ज्यांचीं इंद्रियें शिथिल झालीं आहेत, ज्यांचें पुण्य कर्म नष्ट झालें आहे असे अविद्वान् हें अधोपहास कर्म करितात ते या लोकांतून जातात, परलोकापासून भ्रष्ट होतात. ( श्रीमन्थकर्म करून जो पत्नीच्या ऋतुकालाची प्रतीक्षा करीत रहतो ) त्याचें रेत थोडें किंवा फार तो निजलेला असतांना किंवा जागा असतांना जर स्कंदन पावलें ( तर त्याचें उपमंत्रण करावें, असा पुढें संबंध–)४.

एतद्ध स्म वै तद्विद्वानुद्दालक आरुणिराहाधोपहासाख्यं मैथुनकर्म वाजपेयसंपन्नं विद्वानित्यर्थः । तथा नाको मौद्गल्यः कुमारहारितश्च । किं त आहुरित्युच्यते । बहवो मर्या मरणधर्मिणो मनुष्या ब्राह्मणा अयनं येषां ते ब्राह्मणायना ब्रह्मबन्धवो जातिमात्रोपजीविन इत्येतत् । निरिन्द्रिया विश्लिष्टेन्द्रिया विसुकृतो विगतसुकृतकर्माणोऽविद्वांसो मैथुनकर्मासक्ता इत्यर्थः । ते किमस्माल्लोकात्प्रयन्ति परलोकात्परिभ्रष्टा इति मैथुनकर्मणोऽत्यन्तपापहेतुत्वं दर्शयति य इदमविद्वांसोऽधोपहासं चरन्तीति । श्रीमन्थं कृत्वा पत्न्या ऋतुकालं ब्रह्मचर्येण प्रतीक्षतो यदीदं रेतः स्कन्दति बहु वाऽल्पं वा सुप्तस्य वा जाग्रतो वा रागप्राबल्यात् ॥४॥

भाष्यार्थ—(अविद्वानांचें हें कर्म अतिनिंद्य आहे, याविषयीं अनेक आचार्यांची संमति श्रुति सांगते–) 'एतद्ध स्म०' अधोपहासाख्य मैथुन-कर्म वाजपेयसंपन्न आहे असें जाणणारा, असा 'तद्विद्वान्' याचा अर्थ आहे. तद्विद्वान् आरुणि उद्दालक असें म्हणाला. त्याचप्रमाणें नाको मौद्गल्य व कुमार हारित. ते काय म्हणाले, तें सांगितलें जातें.--'बहवो मर्याः-' बहुत मरणधर्मी मनुष्य 'ब्राह्मणायनाः-' ब्राह्मण हें ज्यांचें अयन

आहे ते ब्राह्मणायन—ब्रह्मबंधु केवल जातीवर निर्वाह करणारे असा भावार्थ. 'निरिंद्रियाः' ज्यांचीं इंद्रियें शिथिल—अनियत—आहेत 'विसुकृतः-' पुण्य कर्मापासून दूर राहिलेले, 'अविद्वांसः-' मैथुनकर्मामध्यें आसक्त असलेले असा भावार्थ. ते काय करितात ? 'अस्माल्लोकात्प्रयन्ति-' या लोकांतून जातात. परलोकापासून परिभ्रष्ट होतात. अशा रीतीनें मैथुनकर्माचें अत्यंत पापहेतुत्व श्रुति 'ये इदं अविद्वांसः अधोपहासं चरन्ति' या वाक्यानें दाखविते. (याप्रमाणें विद्वानाला लाभ व अविद्वानाला दोष दाखवून क्रियाकाळाच्या पूर्वींच जर रेतःस्खलन झालें तर प्रायश्चित्त सांगतात—) श्रीमन्थ कर्म करून पत्नीच्या ऋतुकाळाची प्रतीक्षा करीत असलेल्या पुरुषाचें रेत मैथुनेच्छेच्या प्राबल्यामुळें'बहु वा अल्पं वा०-'थोडें किंवा फार तो निजलेला असतांना किंवा जागा असतांना जर स्खलन पावलें. (तर त्याचें पुढील मंत्रानें अभिमंत्रण करावें)४.

तदभिमृशेदनु वा मन्त्रयेत यन्मेऽद्य रेतः पृथिवीमस्कान्त्सीद्यदोषधीरप्यसरद्यदपः । इदमहं तद्रेत आददे पुनर्मामैत्विन्द्रियं पुनस्तेजः पुनर्भगः । पुनरग्निर्धिष्ण्या यथास्थानं कल्पन्तामित्यनामिकाङ्गुष्ठाभ्यामादायान्तरेण स्तनौ वा भ्रुवौ वा निमृज्यात् ॥५॥

अर्थ—त्याला अभिमर्शन करावें किंवा अनुमंत्रण करावें. 'माझें आज जें रेत पृथिवीवर स्खलन पावलें, जें ओषधींप्रत गेलें, जें जलांप्रत गेलें तें हें रेत मी आतां घेतों.' (अशा अर्थाच्या मंत्रानें त्याचें अभिमर्शन—स्पर्श—समयीं ग्रहण करावें.) 'रेतोरूपानें बाहेर गेलेलें तें इंद्रिय पुनः मजप्रत येवो. पुनः तेज—त्वचेंतील कांति, पुनः भग—सौभाग्य किंवा ज्ञान, इत्यादि रेताबरोबर बाहेर गेलेलें सर्व पुनः मजप्रत येवो. अग्नि हें ज्यांचें स्थान आहे असे देव तें रेत यथास्थानीं जाण्यास समर्थ करोत.'; ( हा मार्जन मंत्राचा अर्थ आहे. ) असें म्हणून व अनामिका आणि आंगठा यांनीं तें रेत घेऊन दोन स्तनांच्या मध्यें किंवा भुवयांच्या मध्यें चोळावें ५.

तदभिमृशेदनुमन्त्रयेत वाऽनुजपेदित्यर्थः । यदाऽभिमृशति तदाऽ-

नामिकाङ्गुष्ठाभ्यां तद्रेत आदत्त आददे इत्येवमन्तेन मन्त्रेण पुनर्मामित्येतेन निमृज्यादन्तरेण मध्ये भ्रुवौ भ्रुवोर्वा स्तनौ स्तनयोर्वा॥५॥

भाष्यार्थ—'तदभिमृशेत्०' त्याचें अभिमर्शन करावें अथवा अनुमंत्रण करावें–अनुजप करावा, असा भावार्थ. जेव्हां अभिमर्शन करतो तेव्हां अनामिका व अंगुष्ठ यांनीं तें रेत 'आददे' येथपर्यंतच्या मंत्रानें घेतो व 'पुनर्मां' येथवरच्या मंत्रानें दोन भुंवयांच्यामध्यें अथवा स्तनांच्या मध्यें तें चोळावें ५.

अथ यद्युदक आत्मानं पश्येत्तदभिमन्त्रयेत मयि तेज इन्द्रियं यशो द्रविणꣳ सुकृतमिति श्रीर्ह वा एषा स्त्रीणां यन्मलोद्वासास्तस्मान्मलोद्वाससं यशस्विनीमभिक्रम्योपमन्त्रयेत ॥६॥

अर्थ—आतां जर त्यानें आपली छाया उदकांत पाहिली तर अभिमंत्रण–उपमंत्रण करावें. (मंत्राचा अर्थ–) 'देव माझ्या ठिकाणीं तेज इंद्रिय, यश, द्रव्य, व पुण्य यांची कल्पना करोत. स्त्रियांमध्यें ही पत्नी श्री आहे. ज्याअर्थीं ही मलोद्वासा आहे त्याअर्थीं त्या मलोद्वासेला यशस्विनी करतों' असें तिच्याजवळ जाऊन उपमंत्रण करावें. ६.

अथ यदि कदाचिदुदक आत्मानमात्मच्छायां पश्येत्तत्राप्यभिमन्त्रयेतानेन मन्त्रेण मयि तेज इति । श्रीर्ह वा एषा पत्नी स्त्रीणां मध्ये यद्यस्मान्मलोद्वासा उद्गतमलवद्वासास्तस्मात्तां मलोद्वाससं यशस्विनीं श्रीमतीमभिक्रम्याभिगत्योपमन्त्रयेतेदमद्याऽऽवाभ्यां कार्यं यत्पुत्रोत्पादनमिति त्रिरात्रान्त आप्लुताम् ॥६॥

भाष्यार्थ—(योनिविरहित प्रदेशीं रेतस्खलन झाल्यास प्रायश्चित्त सांगितलें. आतां रेताची योनि असें जें जल त्यांत रेतःसेक करणाऱ्याची छाया–प्रतिबिंब दिसल्यास श्रुति प्रायश्चित्त सांगते-)'अथ यद्युदकेः०-' आतां जर कदाचित् त्यानें उदकांत आत्मच्छाया पाहिली तर'मयि तेजः०'इत्यादि मंत्रानें तेथेंही अभिमंत्रण करावें. (प्रकृत रेतःसेक करणाऱ्या पुरुषाला जिच्या ठिकाणीं पुत्र उत्पन्न करावयाचा आहे तिची स्तुति करतो–) 'श्रीर्ह वा एषा-' ही पत्नी स्त्रियांमध्यें श्रीच आहे. 'यत्-' ज्याअर्थीं

'मलोद्वासाः-' ज्याला मल लागला आहे असें वस्त्र जिचें आहे, अशी ही आहे-रजस्वला आहे 'तस्मात्०-' त्याअर्थी त्या मलोद्वास यशस्विनी श्रीमतीजवळ जाऊन ' आज आपल्याला पुत्रोत्पादन हें कार्य करावयाचें आहे,' असें उपमंत्रण-संकेत करावा ( पण ती रजस्वला असल्यामुळें ) तीन रात्रीनंतर स्नान केलेल्या तिच्या अभिमुख जाऊन उपमंत्रण करावें ६.

> सा चेदस्मै न दद्यात्काममेनामवक्रीणीयात्सा चेदस्मै नैव दद्यात्काममेनां यष्ट्या वा पाणिना वोपहत्यातिक्रामेदिन्द्रियेण ते यशसा यश आदद इत्ययशा एव भवति ॥७॥

अर्थ—ती जर याला मैथुन करावयास न देईल तर त्यानें तिला आपलें अतिशय प्रेम दाखवावें. तरी ती अनुकूल होत नसेल तर खुशाल तिला काठीनें किंवा हातानें ताडन करून तिचें अतिक्रमण करावें. 'इंद्रियेण तें यशसा यश आददे' या मंत्रानें तिच्याशीं गमन करावें. त्यानें ती अयशाच होते ७.

सा चेदस्मै न दद्यान्मैथुनं कर्तुं काममेनामवक्रीणियादाभरणादिना ज्ञापयेत्। तथाऽपि सा नैव दद्यात्काममेनां यष्ट्या वा पाणिना वोपहत्यातिक्रामेन्मैथुनाय । शप्स्यामि त्वां दुर्भगां करिष्यामीति प्रख्याप्य तामनेन मन्त्रेणोपगच्छेदिन्द्रियेण ते यशसा यश आदद इति । सा तस्मात्तदभिशापाद्वन्ध्या दुर्भगेति ख्याताऽयशा एव भवति ॥ ७ ॥

भाष्यार्थ—' सा चेदस्मै न दद्यात्-' ती जर मैथुन करावयास देत नसेल तर ' कामं एनां अवक्रीणीयात्-' खुशाल तिला आभरणादिकांच्या योगानें आपला प्रेमातिरेक कळवावा. ' सा चेदस्मै नैव दद्यात्०-' तरी सुद्धां ती जर देत नसेल तर 'कामं एनां यष्ट्या वा पाणिना वा उपहत्य०-' खुशाल हिला यष्टीनें किंवा हातानें उपहनन करून मैथुनासाठीं अतिक्रम करावा. ( ' अहो पण बळानेंच अनुकूल करून घेतलेल्या भार्येशीं पशुकर्मासाठीं कसें जावें ? ' उत्तर—) 'मी तुला शापीन, दुर्भगा करीन,' असें स्पष्टपणें सांगून तिच्याशीं ' इंद्रियेण[1] ते यशसा यश आद-

[1] इंद्रियरूप यशानें मी तुझें यश घेतों, असा याचा अर्थ.

दे ' या मंत्रानें उपगमन करावें. ' अयशा एव भवति-' ती त्या शापामुळें वंध्या—वांझ—दुर्भगा अशी प्रख्यात अयशाच होते ७.

सा चेदस्मै दद्यादिन्द्रियेण ते यशसा यश आदधामीति यशस्विनावेव भवतः ॥ ८ ॥

अर्थ—-ती जर याला अनुकूल होईल तर ' इंद्रियेण ते यशसा यश आदधामि-' इंद्रियरूप यशानें मी तुझ्या ठिकाणीं यशाचें आधान करतों, या मंत्रानें उपगमन करावें. त्या योगानें तीं दोघेंही यशस्वीच होतात ८.

सा चेदस्मै दद्यादनुगुणैव स्याद्भर्तुस्तदाऽनेन मन्त्रेणोपगच्छेदिन्द्रियेण ते यशसा यश आदधामीति तदा यशस्विनावेवोभावपि भवतः॥८॥

भाष्यार्थ—' सा चेत् अस्मै-' ती जर याला ' दद्यात्-' भर्त्याला अनुकूलच होईल तर ' इंद्रियेण ते यशसा यश आदधामि ' या मंत्रानें उपगमन करावें. तेव्हां तीं दोघेंही यशस्वीच होतात. ८.

स यामिच्छेत्कामयेत मेति तस्यामर्थं निष्ठाय मुखेन मुखꣳ संधायोपस्थमस्या अभिमृश्य जपेदङ्गादङ्गात्संभवसि हृदयादधिजायसे । स त्वमङ्गकषायोऽसि दिग्धविद्धामिव मादयेमाममूं मयीति ॥ ९ ॥

अर्थ—तो ज्या स्वभार्येनें आपली कामना करावी असें इच्छील तिच्या ठिकाणीं अर्थाचा—इंद्रियाचा निक्षेप करून मुखाशीं मुख लावून तिच्या उपस्थाला स्पर्श करून ' अंगादंगात्संभवसि०' इत्यादि मंत्राचा जप करावा. ( त्या मंत्राचा अर्थ असा—) हे रेता, तूं माझ्या प्रत्येक अंगापासून उत्पन्न होतेंस. विशेषतः हृदयापासून अन्न रसाच्या द्वारा उत्पन्न होतेंस. तें तूं अंगांचा रस होत्सातें विषलिप्त शरानें वेध केलेल्या मृगीप्रमाणें हिला—माझ्या भार्येला ' मादय-' माझ्या वश कर. ९.

स यां स्वभार्यामिच्छेदियं मां कामयेतेति तस्यामर्थं प्रजननेन्द्रियं निष्ठाय निक्षिप्य मुखेन मुखं संधायोपस्थमस्या अभिमृश्य जपेदिमं मन्त्रमङ्गादङ्गादिति ॥ ९ ॥

भाष्यार्थ—( भर्त्यानें भार्येला वश करण्याचा प्रकार सांगून पुरुषाचा द्वेष करणाऱ्या तिची भर्त्याचे ठिकाणीं प्रीति संपादन करण्याची प्रक्रिया श्रुति दाखविते—) ' स यामिच्छेत्०-' तो ज्या स्वभार्येला ' हिनें

माझी कामना करावी ' असें इच्छीत असेल ' तस्यां अर्थं निष्ठाय-' तिच्या ठिकाणीं प्रजननेंद्रियास निक्षिप्त करून मुखाशीं मुख लावून ' अस्या उपस्थ०-' हिच्या उपस्थाचें अभिमर्शन करून -त्यास स्पर्श करून ' अंगादंगात्०' या मंत्राचा जप करावा ९.

अथ यामिच्छेन्न गर्भं दधीतेति तस्यामर्थं निष्ठाय मुखेन मुखꣳसंधायाभिप्राण्यापान्यादिन्द्रियेण ते रेतसा रेत आदद इत्यरेता एव भवति ॥ १० ॥

अर्थ—पण जिनें गर्भ धारण करूं नये, असें तो इच्छीत असेल तिच्या ठिकाणीं इंद्रियाचा निक्षेप करून मुखाशीं मुख लावून प्रथम अभिप्राणन करून मागाहून ' इंद्रियेण ते रेतसा रेत आददे-' इंद्रियरूप रेतानें तुझें रेत मी घेतों, या मंत्रानें वायूचें आकर्षण करून घ्यावें. असें केल्यानें ती अरेताच होते १०.

अथ यामिच्छेन्न गर्भं दधीत न धारयेद्गर्भिणी मा भूदिति तस्यामर्थमिति पूर्ववत् । अभिप्राण्याभिप्राणनं प्रथमं कृत्वा पश्चादपान्यादिन्द्रियेण ते रेतसा रेत आदद इत्यनेन मन्त्रेणारेता एव भवति न गर्भिणी भवतीत्यर्थः ॥ १० ॥

भाष्यार्थ—( तिची आपल्या विषयीं प्रीति उत्पन्न करून अवाच्य कर्माचें अनुष्ठान करीत असतांना विशेष अभिप्रायानुसार विशेष अनुष्ठान श्रुति दाखविते—) ' अथ यामिच्छे०' पण जिनें गर्भ धारण करूं नये, जी गर्भिणी न व्हावी, असें तो इच्छीत असेल तिच्या ठिकाणीं 'अर्थाचा निक्षेप करून०' इत्यादि पूर्वी प्रमाणेंच जाणावें. ' अभिप्राण्य-' पशुकर्मसमयीं प्रथम अभिप्राणन—वायुविसर्ग करून मागन ' अपान्यात्-' तो आंत आकर्षण करून घ्यावा. ' इंद्रियेण ते रेतसा रेत०' इत्यादि मंत्रानें वायूचें आकर्षण करावें. ' अरेता एव भवति-' असें केल्यानें ती अरेताच होते, गर्भिणी होत नाहीं, असा भावार्थ. १०

---

१ आपल्या पुरुषचिन्हाच्या द्वारा तिच्या स्त्रीचिन्हामध्यें वायु सोडून, वायु सोडल्याची भावना करून तो ओढून घेतल्याची कल्पना करावी.

अथ यामिच्छेद्दधीतेति तस्यामर्थं निष्ठाय मुखेन मुखꣳ संधायापान्याभिप्राण्यादिन्द्रियेण ते रेतसा रेत आदधामीति गर्भिण्येव भवति ॥ ११॥

अर्थ—पण जिनें गर्भधारण करावा असें भर्ता इच्छीत असेल तिच्यामध्यें अर्थाचा निक्षेप करून मुखाशीं मुख लावून प्रथम वायूचें आकर्षण करून घेऊन मागाहून त्याचा उत्सर्ग 'इंद्रियेण ते रेतसा रेत आदधामि' इंद्रिरूप रेतानें तुझ्या रेताचें आधान करतों, या मंत्रानें करावा. म्हणजे ती गर्भिणीच होते. ११.

अथ यामिच्छेद्दधीत गर्भमिति तस्यामर्थमित्यादि पूर्ववत् । पूर्वविपर्ययेणापान्याभिप्राण्यादिन्द्रियेण ते रेतसा रेत आदधामीति गर्भिण्येव भवति ॥ ११ ॥

भाष्यार्थ—( भर्त्याच्या दुसऱ्या अभिप्रायानुसार विधि सांगते—) पण हिनें गर्भ धारण करावा, असें जिच्या विषयीं भर्ता इच्छील तिच्यामध्यें इंद्रियनिपेक्ष करून इत्यादि पूर्वीप्रमाणें जाणावें. वरील कंडिकेंत सांगितलेल्याच्या उलट अगोदर स्वकीय पांचव्या इंद्रियानें तिच्या पांचव्या इंद्रियापासून रेताचा स्वीकार करून त्याला पुत्रोत्पत्तिसमर्थ केलें आहे, असें मानून आपल्या रेतासह 'इंद्रियेण ते रेतसा रेत आदधामि' या मंत्रानें त्यांत निक्षेप करावा. तसें केल्यानें गर्भिणीच होते ११.

अथ यस्य जायायै जारः स्यात्तं चेद्द्विष्यादामपात्रेऽग्निमुपसमाधाय प्रतिलोमꣳ शरबर्हिस्तीर्त्वा तस्मिन्नेताः शरभृष्टीः प्रतिलोमाः सर्पिषाऽक्ता जुहुयान्मम समिद्धेऽहौषीः प्राणापानौ त आददेऽसाविति मम समिद्धेऽहौषीः पुत्रपशूꣳस्त आददेऽसाविति मम समिद्धेऽहौषीरिष्टासुकृते त आददेऽसाविति मम समिद्धेऽहौषीराशापराकाशौ त आददेऽसाविति स वा एष निरिन्द्रियो विसुकृतोऽस्माल्लोकात्प्रैति यमेवंविद्ब्राह्मणः शपति तस्मादेवंविच्छ्रोत्रियस्य दारेण नोपहासमिच्छेदुत ह्येवंवित्परो भवति ॥ १२ ॥

अर्थ—पण ज्याच्या जायेला उपपति असेल त्याच्याशीं 'मी याला मारीन' असा जर द्वेष करीत असेल तर आमपात्रांत—अपक्व मृत्पात्रांत अग्नीचें उपसमाधान करून शरबर्हि उलट घालून त्यांत या शराच्या काड्या

घृतानें भिजवून उलट्या होमाव्या. 'माझ्या तारुण्यादिकांमुळें प्रदीप्त झालेल्या स्त्री-अग्नींत तूं रेत होमिलें आहेस. यास्तव तुज अपराध्याचे मी प्राण व अपान घेतो ' ' फट् ' अशा अर्थाचा मंत्र म्हणून होम करावा व शेवटीं हा अमुक असें आपलें किंवा शत्रूचें नांव घ्यावें. त्याचप्रमाणें ' माझ्या प्रदीप्त स्त्री-अग्नींत तूं रेतोहोम केलास मी तुझे पुत्र व पशु घेतों ' ' फट् ' असें म्हणून होम करावा व ' हा अमुक ' असें नांव घ्यावें; ' माझ्या प्रदीप्त स्त्री-अग्नींत वीर्याचा होम केलास यास्तव मी तुझें इष्ट व सुकृत—श्रौत-स्मार्त कर्म घेतों,' 'फट्' असा होम करावा व ' अमुक ' असें नांव घ्यावें. ' माझ्या प्रदीप्त योषाग्नींत तूं हवन केलेंस यास्तव मी तुझी आशा व पराकाश यांचें ' ग्रहण करतों. ' फट् ' असा होम करून ' अमुक ' असें नांव घ्यावें. ज्याला असें जाणणारा ब्राह्मण शापतो तो निरिंद्रिय व पुण्यकर्मरहित होऊन मरतो. तस्मात् हा दोष जाणणारानें श्रोत्रियाच्या भार्येशीं थट्टाही करूं नये. कारण असें जाणणाराही शत्रु होतो. १२.

अथ पुनर्यस्य जायायै जार उपपतिः स्यात्तं चेद्द्विष्यादभिचरिष्याम्येनमिति मन्येत तस्येदं कर्म । आमपात्रेऽग्निमुपसमाधाय सर्वं प्रतिलोमं कुर्यात्तस्मिन्नग्नावेताः शरभृष्टीः शरेषीकाः प्रतिलोमाः सर्पिषाऽक्ता घृताभ्यक्ता जुहुयान्मम समिद्धेऽहौषीरित्याद्या आहुतीरन्ते सर्वासामसाविति नामग्रहणं प्रत्येकम् । स एष एवंविधं ब्राह्मणः शपति स विसुकृतो विगतपुण्यकर्मा प्रैति । तस्मादेवंविच्छ्रोत्रियस्य दारेण नोपहासमिच्छेन्नर्मापि न कुर्यात्किमुताधोपहासं हि यस्मादेवंविदपि तावत्परो भवति शत्रुर्भवतीत्यर्थः ॥ १२ ॥

भाष्यार्थ—( आतां श्रुति प्रासंगिक आभिचारिक कर्म सांगते—) ' अथ यस्य०-' आतां ज्याच्या जायेला जार म्ह. उपपति असतो त्याचा जर पति द्वेष करीत असेल—'मी याला अभिचार कर्मानें मारीन'

---

१ आशा—इच्छा व वाणीनें ज्याचें अभिवचनमात्र मिळालें आहे पण कर्मानें जें आणून दिलेलें नाहीं त्याची प्रतीक्षा करणें हें पराकाश.

असें त्याला वाटत असेल तर त्याचें हें कर्म--आमपात्रांत अग्नीचें उपसमाधान करून सर्व कर्म उलट करावें. त्या अग्नींत या ' शरभृष्टीः-' शराच्या काड्या उलट्या घृतानें भिजविलेल्या होमाव्या. ' मम समिद्धेऽहौषीः०-' इत्यादि मंत्रांनीं आहुती देऊन ' असौ-' अमुक असें सर्व आहुतींच्या शेवटीं म्हणावें. प्रत्येकवेळीं आपलें किंवा शत्रूचें नांव घ्यावें. 'स एष एवंविद्०-' असें जाणणारा--मंथनकर्मद्वारा प्राणविद्यावेत्ता ब्राह्मण ज्यास शापतो तो पुण्यकर्मविरहित होऊन येथून जातो. 'तस्मादेवंविद्०-' तस्मात् परस्त्रीगमनांत असा मोठा दोष आहे, असें जाणणारानें श्रोत्रियाच्या स्त्रीशीं उपहास करण्याची इच्छा करूं नये. थट्टाही करूं नये, मग अधोपहास--मैथुनकर्म करूं नये, हें निराळें कशाला सांगावयास पाहिजे ? ' हि-' कारण ' एवंविद्-' असें जाणणाराही अगोदर 'परः-' शत्रु होतो, असा भावार्थ १२.

अथ यस्य जायामार्तवं विन्देत् त्र्यहं कंसेन पिबेदहतवासा नैनां वृषलो न वृषल्युपहन्यात्त्रिरात्रान्त आप्लुत्य व्रीहीनवघातयेत् ॥ १३ ॥

अर्थ--आतां ज्याच्या भार्येला ऋतुप्राप्त होईल, तिनें तीन दिवस कंसपात्रानें जल प्राशन करावें. अहतवस्त्रयुक्त रहावें. तिला शूद्र किंवा शूद्री यांनीं स्पर्श करूं नये. तीन रात्रीं याप्रमाणें व्रतस्थ राहून चवथ्या दिवशीं स्नान करून अहतवस्त्रयुक्त व्हावें. तिच्याकडून व्रीहींना कुटवावें १३

अथ यस्य जायामार्तवं विन्देदृतुभावं प्राप्नुयादित्येवमादिग्रन्थः श्रीर्ह वा एषा स्त्रीणामित्यतः पूर्वं द्रष्टव्यः सामर्थ्यात् । त्र्यहं कंसेन पिबेदहतवासाश्च स्यात् । नैनां स्नातामस्नातां च वृषलो वृषली वा नोपहन्यान्नोपस्पृशेत् । त्रिरात्रान्ते त्रिरात्रव्रतसमाप्तावाप्लुत्य स्नात्वाऽहतवासाः स्यादिति व्यवहितेन संबन्धः । तामाप्लुतां व्रीहीनवघातयेद्व्रीह्यवघाताय तामेव विनियुञ्ज्यात् ॥ १३ ॥

भाष्यार्थ--( प्रासंगिक आभिचारिक कर्म सांगून पूर्वोक्त ऋतुकाल सुचवितात--) 'अथ यस्य०-' ' आतां ज्याच्या भार्येला आर्तव--ऋतुभाव प्राप्त होईल,' इत्यादि हा ग्रंथ 'श्रीर्ह वा एषा स्त्रीणां ' ( कं. ६ )याच्या

पूर्वी आहे, असें सामर्थ्यावरून म्ह० अर्थवशात् पहावें–जाणावें. (कारण पाठक्रमापेक्षां अर्थक्रम बलवान् आहे.) तीन दिवस कंसानें-काशाच्या पात्रानें प्राशन करावें व अहतवस्त्र[1] नेसून असावें 'नैनां वृषलः०' स्नान केलेल्यां अथवा अस्नातं अशा हिला शूद्र किंवा शूद्री यांनीं स्पर्श करूं नये. 'त्रिरात्रान्ते'. त्रिरात्रव्रतसमाप्ति झाली असतां 'आप्लुत्य-' स्नान करून अहतवस्त्रयुक्त व्हावें, असा मागें संबंध.त्या स्नान केलेल्या स्त्रीकडून 'व्रीहीन् अवघातयेत्-' भात कुटवावें. व्रीहींच्या अवघातामध्यें तिलाच विनियुक्त करावें १३.

स य इच्छेत्पुत्रो मे शुक्लो जायेत वेदमनुब्रुवीत सर्वमायुरियादिति क्षीरौदनं पाचयित्वा सर्पिष्मन्तमश्नीयातामीश्वरौ जनयितवै ॥ १४ ॥

अर्थ—मला शुक्ल पुत्र व्हावा, त्यानें एका वेदाचें अध्ययन करावें, त्याला सर्व म्ह० शतवर्ष आयुष्य असावें असें जो इच्छीत असेल त्यानें घृतयुक्त क्षीरौदन शिजवून तें दोघांनीं खावें. म्हणजे पुत्र उत्पन्न करण्यास तीं दोघें समर्थ होतात. १४

स य इच्छेत्पुत्रो मे शुक्लो वर्णतो जायेत वेदमेकमनुब्रुवीत सर्वमायुरियाद्वर्षशतं क्षीरौदनं पाचयित्वा सर्पिष्मन्तमश्नीयातामीश्वरौ समर्थौ जनयितवै जनयितुम् ॥ १४ ॥

भाष्यार्थ—(अवघातानें-कुटून तयार केलेल्यां तांदुळांचें काय करावें तें सांगतात-) 'अथ यः०-' जो मला वर्णानें शुक्ल–अत्यंत सदृश किंवा शुद्ध पुत्र व्हावा,त्यानें एका वेदाचें अनुवचन करावें त्याला सर्व आयुष्य-वर्षशत–असावें, असें इच्छीत असेल त्यानें घृतयुक्त क्षीरौदन[2] शिजवून दोघांनीं भक्षण करावें. ह्मणजे 'ईश्वरौ जनयितवै-' तीं दोघें पुत्र उत्पन्न करण्यास समर्थ होतात १४.

अथ य इच्छेत्पुत्रो मे कपिलः पिङ्गलो जायेत द्वौ वेदावनुब्रुवीत सर्वमायुरियादिति दध्योदनं पाचयित्वा सर्पिष्मन्तमश्नीयातामीश्वरौ जनयितवै ॥ १५ ॥

---

१ नवें एकदा धुतलेलें वस्त्र. २ दुधभात–पायसान्न–भाताची खीर.

अर्थ—माझा पुत्र कपिल-पिंगल व्हावा, त्यानें दोन वेदांचें अध्ययन करावें, सर्व आयुष्याचा उपभोग घ्यावा, असें जो इच्छीत असेल त्यानें घृतयुक्त दध्योदन शिजवून तें दोघांनीं खावें, म्हणजे तीं तसला पुत्र उपन्न करण्यास समर्थ होतात १५.

दध्योदनं दध्ना चरुं पाचयित्वा द्विवेदं चेदिच्छीत पुत्रं तदैवमशनानियमः ॥ १५ ॥

भाष्यार्थ—'दध्यौदनं-' दह्यानें चरु शिजवून, पुत्राला द्विवेदी जर इच्छीत असेल तर भक्षणाचा असा नियम आहे १५.

अथ य इच्छेत्पुत्रो मे श्यामो लोहिताक्षो जायेत त्रीन्वेदाननुब्रुवीत सर्वमायुरियादित्युदौदनं पाचयित्वा सर्पिष्मन्तमश्नीयातामीश्वरौ जनयितवै ॥१६ ॥

अर्थ—माझा पुत्र श्यामवर्ण, आरक्तनेत्र व्हावा, त्यानें तीन वेदांचें अध्ययन करावें, सर्व आयुष्यास प्राप्त व्हावें, असें जो इच्छीत असेल त्यानें जलांत घृतयुक्त भात शिजवून तो दोघांनीं भक्षण करावा. म्हणजे तीं दोघें तसा पुत्र उत्पन्न करण्यास समर्थ होतात १६.

केवलमेव स्वाभाविकमोदनम् उदग्रहणमन्यप्रसङ्गनिवृत्त्यर्थम् ॥१६॥

भाष्यार्थ—केवलच स्वाभाविक ओदन; (मग उद म्ह० जलाचें ग्रहण कां केलें आहे? त्या वाचून भात शिजणेंच शक्य नाहीं. उत्तर—) उदकग्रहण अन्य पदार्थांच्या प्रसंगाची निवृत्ति करण्यासाठीं केलें आहे. १६.

अथ य इच्छेद्दुहिता मे पण्डिता जायेत सर्वमायुरियादिति तिलौदनं पाचयित्वा सर्पिष्मन्तमश्नीयातामीश्वरौ जनयितवै ॥१७॥

अर्थ—मला पण्डिता कन्या व्हावी, तिला सर्व आयुष्य प्राप्त व्हावें असें जो इच्छीत असेल त्यानें तिलौदन घृतयुक्त शिजवून तें दोघांनीं खावें. म्हणजे तशीच कन्या उत्पन्न करण्यास तीं दोघें समर्थ होतात १७.

दुहितुः पाण्डित्यं गृहतन्त्रविषयमेव वेदेऽनधिकारात् । तिलौदनं कृशरम् ॥ १७ ॥

१ दोन वेदांचें अध्ययन करणारा.

७६

भाष्यार्थ — कन्येचें पांडित्य गृहतंत्राविषयींचेंच येथें विवक्षित आहे. कारण वेदामध्यें तिचा अधिकार नाहीं. तिलौदन म्ह० कृशर–खिचडी १७.

अथ य इच्छेत्पुत्रो मे पण्डितो विगीतः समितिंगमः शुश्रूषितां वाचं भाषिता जायेत सर्वान्वेदाननुब्रुवीत सर्वमायुरियादिति मांसौदनं पाचयित्वा सर्पिष्मन्तमश्नीयातामीश्वरौ जनयितवा औक्षेण वाऽऽर्षभेण वा ॥ १८ ॥

अर्थ—माझा पुत्र प्रख्यात, प्रगल्भ, रमणीय भाषा बोलणारा असा व्हावा, त्यानें सर्व वेदांचें अनुव्याख्यान करावें, सर्व आयुष्याचा उपभोग घ्यावा, असें जो इच्छीत असेल त्यानें घृतयुक्त मांसौदन शिजवून तें दोघांनीं खावें. 'औक्षेण वा' अगदीं तरुण खोंडाचें मांस किंवा 'आर्षभेण वा.' त्याहून अधिक वयाच्या वृषभाचें मांस. यांसह ओदन शिजवून तें मांसौदन खावें. म्हणजे तीं दोघें तसा पुत्र उत्पन्न करण्यास समर्थ होतात. १८.

विविधं गीतो विगीतः प्रख्यात इत्यर्थः । समितिंगमः सभां गच्छतीति प्रगल्भ इत्यर्थः । पाण्डित्यस्य पृथग्ग्रहणात् । शुश्रूषितां श्रोतुमिष्टां रमणीयां वाचं भाषिता संस्कृताया अर्थवत्या वाचो भाषितत्यर्थः । मांसमिश्रमोदनं मांसौदनम् । तन्मांसनियमार्थमाह । औक्षेण वा मांसेन । उक्षा सेचनसमर्थः पुंगवस्तदीयं मांसम् । ऋषभस्ततोऽप्यधिकवयास्तदीयमार्षभं मांसम् ॥ १८ ॥

भाष्यार्थ—'विगीतः-' विविध गायलेला, प्रख्यात, असा भावार्थ. 'समितिंगमः-' सभेस जातो, म्हणजे समितिंगम, प्रगल्भ-धीट असा इत्यर्थ. कारण पांडित्याचें पृथक् ग्रहण केलेलें असल्यामुळें 'समितिंगमः-' म्ह० विद्वान् असा अर्थ करतां येत नाहीं. (नाहीं तर समिति म्ह० विद्वत्सभा, तिच्यामध्यें जाणारा विद्वान्च असला पाहिजे, या दृष्टीनें 'समितिंगम' म्ह० विद्वान् असा अर्थ करतां आला असता.) 'शुश्रूषितां वाचं-' ऐकावयास इष्ट—रमणीय अशा वाणीस 'भाषिता-' बोलणारा. संस्कृत–संस्कार केलेली व अर्थवती—अर्थयुक्त अशा वाणीस

बोलणारा, असा भावार्थ. मांसमिश्र जें ओदन–भात तें मांसौदन. त्या मांसाच्या नियमार्थ श्रुति सांगते–'औक्षेण वा आर्षभेण वा-' उक्षा म्ह० रेतःसेक करण्यास समर्थ असा बैल त्याचें मांस, 'ऋषभ' म्ह० उक्षाहून अधिक वयाचा बैल, त्याचें मांस ( ' औक्षेण आर्षभेण ' ही तृतीया सह याअर्थीं आहे. म्हणून त्या मांसासह–मांसमिश्र ओदन असा अर्थ येथें जाणावा. हा मांसाविषयींचा नियम विशेष देश, काल व पुरुष यांच्या अपेक्षेनें आहे. ) १८.

अथाभिप्रातरेव स्थालीपाकावृताऽऽज्यं चेष्टित्वा स्थालीपाकस्योपघातं जुहोत्यग्नये स्वाहाऽनुमतये स्वाहा देवाय सवित्रे सत्यप्रसवाय स्वाहेति हुत्वोद्धृत्य प्राश्नाति प्राश्येतरस्याः प्रयच्छति प्रक्षाल्य पाणी उदपात्रं पूरयित्वा तेनैनां त्रिरभ्युक्षत्युत्तिष्ठातो विश्वावसोऽन्यामिच्छ प्रपूर्व्यां सं जायां पत्या सहेति ॥१९॥

अर्थ—आतां अगदीं प्रातःकाळीं स्थालीपाकाच्या आवृतेनें–इतिकर्तव्यतेने आज्यसंस्कार करून चरु शिजवून स्थालीपाकाच्या आहुति ' अग्नये स्वाहा, ' ' अनुमतये स्वाहा ' ' देवाय सवित्रे सत्यप्रसवाय स्वाहा ' अशा थोड थोड्या घेऊन पुनः पुनः द्याव्या. याप्रमाणें हवन करून चरुशेष वर उचलून घेऊन स्वतः यजमान तो खातो, व राहिलेला पत्नीला देतो. दोन्ही हात धुऊन, जलपात्र पाण्यानें भरून त्या पाण्यानें पत्नीचें तीनदा 'उत्तिष्ठातो०' या मंत्रानें अभ्युक्षण करतो. ( पाणी तीनदां शिंपडतो. ) मंत्राचा अर्थ— 'अतः-' या माझ्या भार्येपासून हे विश्वावसो, तूं 'उत्तिष्ठ-' ऊठ. 'अन्यां प्रपूर्व्यां पत्या सह सं जायां इच्छ-' ' दुसऱ्या तरुण आपल्या पतीशीं क्रीडा करणाऱ्या जायेची इच्छा कर. ' ( मी आपल्या भार्येशीं संगत होतों. ) १९.

अथाभिप्रातरेव कालेऽवघातनिर्वृतांस्तण्डुलानादाय स्थालीपाकावृता स्थालीपाकविधिनाऽऽज्यं चेष्टित्वाऽऽज्यसंस्कारं कृत्वा चरुं श्रपयित्वा स्थालीपाकस्याऽऽहुतीर्जुहोत्युपघातमुपहत्योपहत्याग्नये स्वाहेत्याद्याः । गार्ह्यः सर्वो विधिर्द्रष्टव्योऽत्र । हुत्वोद्धृत्य चरुशेषं प्राश्नाति स्वयं

प्राश्येतरस्याः पत्न्यै प्रयच्छत्युच्छिष्टम् । प्रक्षाल्य पाणी आचम्योदपात्रं पूरयित्वा तेनोदकेनैनां त्रिरभ्युक्षत्यनेन मन्त्रेणोत्तिष्ठात इति सकृन्मन्त्रोच्चारणम् ॥ १९ ॥

भाष्यार्थ—(हें चरुपाकादि केव्हां करावें, तें सांगतात–) 'अथाभिप्रातरेव-' नंतर अगदीं प्रातःकालींच अवघातानें केलेल्या तंदुलांस घेऊन 'स्थालीपाकावृता-' स्थालीपाकविधीनें 'आज्यं चेष्टित्वा-' आज्याला संस्कार करून चरु शिजवून 'स्थालीपाकाच्या' आहुती होमितो. 'उपाघातं-' अल्प अल्प पुनः पुनः 'अग्नये स्वाहा' इत्यादि मंत्रांनीं देतो. या पुत्रमंथकर्मामध्यें गृह्यामध्यें प्रसिद्ध असलेला सर्व विधि पहावा. 'हुत्वा उद्धृत्य प्राश्नाति-' हवन करून वर उचलून अवशिष्ट राहिलेला चरु स्वतः खातो; व उच्छिष्ट चरु 'इतरस्याः प्रयच्छति-' भार्येला देतो. 'प्रक्षाल्य पाणी-' दोन्ही हात धुवून आचमन करून 'उदपात्रं पूरयित्वा-' उदकपात्र पाण्यानें भरून 'तेन-' त्या जलानें 'एनां त्रिः अभ्युक्षति-' हिला तीन वेळ 'उत्तिष्ठातः' या मंत्रानें भिजवितो.तिच्यावर जलाचें अभ्युक्षण करतो. पण मंत्राचें उच्चारण एकदाच करावें. १९.

अथैनामभिपद्यतेऽमोऽहमस्मि सा त्वꣳ सा त्वमस्यमोऽहं सामाहमस्मि ऋक्त्वं द्यौरहं पृथिवी त्वं तावेहि सꣳरभावहै सह रेतो दधावहै पुꣳसे पुत्राय वित्तय इति ॥२०॥

अर्थ——नंतर तिला आलिंगन देतो. मी 'अमः' प्राण आहें, तूं वाक् आहेस.(तुला प्राणत्व व मला वाक्त्व कसें ? अशी भार्येची आशंका घेऊन वाक् जशी प्राणाधीन असते त्याप्रमाणें तूं माझ्या अधीन आहेस, अशा अभिप्रायानें 'सा त्वं' इत्यादि पुनः वचन आहे.) ती वाक् तूं आहेस व मीं प्राण आहें. मी साम आहें तूं ऋक् आहेस. (साम ऋक्-च्या आधारानें व तूं माझ्या आधारानें.) मी द्यौः आहे व तूं पृथिवी आहेस. (कारण त्यांचें माता-पितृत्व प्रसिद्ध आहे.) ये, आपण दोघें उद्यम करूं या. पुरुषत्वयुक्त पुत्राच्या लाभासाठीं रेतोधारण आपण करावें. २०.

अथैनामभिमन्त्र्य क्षीरौदनादि यथापत्यकामं भुक्त्वेति क्रमो द्रष्टव्यः। संवेशनकालेऽमोऽहमस्मीत्यादिमन्त्रेणाभिपद्यते ॥ २० ॥






भाष्यार्थ——नंतर तिला वर सांगितल्याप्रमाणें अभिमंत्रित करून वर सांगितल्याप्रमाणें जशा पुत्राची इच्छा असेल तशा प्रकारचें क्षीरौदनादि भक्षण करून, असा क्रम जाणावा. नंतर शयनसमयीं 'अमोऽहमस्मि॰' इत्यादि मंत्रानें तिला 'अभिपद्यते-' आलिंगन देतो २०.

अथास्या ऊरू विहापयति विजिहीथां द्यावापृथिवी इति तस्यामर्थं निष्ठाय मुखेन मुखꣳ संधाय त्रिरेनामनुलोमामनुमार्ष्टि विष्णुर्योनिं कल्पयतु त्वष्टा रूपाणि पिꣳशतु । आसिञ्चतु प्रजापतिर्धाता गर्भं दधातु ते । गर्भं धेहि सिनीवालि गर्भं धेहि पृथुष्टुके । गर्भं ते अश्विनौ देवावाधत्तां पुष्करस्रजौ ॥ २१ ॥

अर्थ——नंतर 'विजिहीथां द्यावापृथिवी' या मंत्रानें हिच्या ऊरू दूर दूर करवितो. 'हे द्यावापृथिवी, तुम्ही विश्लिष्ट व्हा' असा त्या मंत्राचा अर्थ आहे. नंतर तिच्या ठिकाणीं अर्थाचा निक्षेप करून मुखाशीं मुख नेऊन 'विष्णुर्योनिं कल्पयतु॰' इत्यादि मंत्रांनीं तीन वेळां अनुलोम म्ह॰ मस्तकापासून खालीं पायांपर्यंत अनुमर्षण—स्पर्श करतो. वरील मंत्रांचा अर्थ—व्यापनशील भगवान्, तुझ्या योनीला पुत्रोत्पत्तिसमर्थ करो. त्वष्टा—सविता तुझ्या रूपांना अगदीं पृथक्-पणें दर्शनयोग्य करो विराडात्मा प्रजापति मद्रूपानें स्थित होऊन तुझ्या ठिकाणीं रेताचा प्रक्षेप करो. धाता—सूत्रात्मा तुझ्या रूपानें स्थित होऊन तुझ्या गर्भाचें धारण व पोषण करो. १. हे सिनीवालि, गर्भाचें धारण कर व हे पृथुष्टुके—हे विस्तीर्णस्तुति, गर्भाचें धारण कर. अश्विनीकुमार देव-स्वकीय किरणांचीच ज्यांना माला आहे असे सूर्य-चंद्र तुझ्या रूपानें स्थित होऊन गर्भाचें धारण करोत. २१.

अथास्या ऊरू विहापयति विजिहीथां द्यावापृथिवी इत्यनेन । तस्यामर्थमित्यादि पूर्ववत् । त्रिरेनां शिरःप्रभृत्यनुलोमामनुमार्ष्टि विष्णुर्योनिमित्यादि प्रतिमन्त्रम् ॥ २१ ॥

भाष्यार्थ——नंतर 'विजिहीथां द्यावापृथिवी-' या मंत्रानें तिच्या ऊरु—मांड्या विश्लिष्ट—दूर दूर करवितो. 'तस्या अर्थं॰' इत्यादिकांचा

१ दर्शाची अद्दैवता.

अर्थ वर सांगितल्याप्रमाणें करावा. 'विष्णुर्योनिं०-' इत्यादि प्रत्येक मंत्र म्हणत तिला मस्तकापासून खालीं पायापर्यंत तीनदा स्पर्श करतो. २१.

हिरण्मयी अरणी याभ्यां निर्मन्थतामश्विनौ । तं ते गर्भं हवामहे दशमे मासि सूतये । यथाऽग्निगर्भा पृथिवी यथा द्यौरिन्द्रेण गर्भिणी । वायुर्दिशां यथा गर्भ एवं गर्भं दधामि तेऽसाविति ॥ २२ ॥

अर्थ—पूर्वी दोन ज्योतिर्मय अरणी होत्या. त्यांपासून गर्भाला अश्विनीकुमार निर्मथित करते झाले—मंथन करून काढते झाले. त्या तशा प्रकारच्या गर्भाला आपण दोघें दहाव्या महिन्यांत प्रसव होण्यासाठीं तुझ्या जठरांत धारण करूं. ( आतां त्या आधान केल्या जाणाऱ्या गर्भाला दृष्टान्तानें प्रदर्शित करितात—) जशी पृथिवी अग्निगर्भा असते, द्यौः सूर्यानें गर्भिणी असते, वायु हा जसा दिशांचा गर्भ आहे, त्याप्रमाणें मी तुझ्या ठिकाणीं गर्भाला धारण करतों. शेवटीं 'अमुक' असें म्हणून तिचें नांव घेतो. २२.

अन्ते नाम गृह्णात्यसाविति तस्याः ॥ २२ ॥

भाष्यार्थ—'असौ इति-'ही अमुक असें शेवटीं तिचें नांव घेतो २२.

सोष्यन्तीमद्भिरभ्युक्षति । यथा वायुः पुष्करिणीᳪसमिङ्गयति सर्वतः। एवा ते गर्भ एजतु सहावैतु जरायुणा । इन्द्रस्यायं व्रजः कृतः सार्गलः सपरिश्रयः । तमिन्द्र निर्जहि गर्भेण सावराᳪसहेति ॥ २३ ॥

अर्थ--प्रसूत होणाऱ्या तिला जलानें 'यथा वायुः' या मंत्रानें सुखप्रसवार्थ अभ्युक्षण करतो. मंत्रार्थ—जसा वायु पुष्करिणीला सर्वतः चांगल्या प्रकारें--तिच्या स्वरूपाचा उपघात न करितां--हालवितो त्याप्रमाणें तुझ्या स्वरूपाचा उपघात न करितांच गर्भ चलन पावो. तो वारेसहवर्तमान बाहेर निघो. इंद्राचा—प्राणाचा हा 'व्रज-' मार्ग ( उत्पत्तिकालीं किंवा गर्भाधानकालीं ) केलेला आहे. तो सार्गल म्ह० सपरिग्रह, म्ह० त्याचें परिवेष्टन असें जें जरायु चर्म त्यासह तो मार्ग आहे. त्या मार्गास प्राप्त होऊन हे इंद्रा, तूं गर्भासहवर्तमान बाहेर निघ. गर्भनिघाल्यानंतर जी मांसाची पिशवी निघते तिला सावरा म्हणतात. तिच्या सहवर्तमानही बाहेर पड २३.



सोष्यन्तीमद्भिरभ्युक्षति प्रसवकाले सुखप्रसवनार्थमनेन मन्त्रेण । यथा वायुः पुष्करिणीं समिङ्गयति सर्वतः । एवा ते गर्भ एजत्विति ॥ २३ ॥

भाष्यार्थ—प्रसवसमयीं प्रसूत होणाऱ्या तिला सुखप्रसवार्थ या मंत्रानें उभ्युक्षण करतो. तिच्यावर जल शिंपडतो. जसा वायु कमलिनीला सर्वबाजूंनीं चांगल्याप्रकारें हालवितो त्याप्रमाणें तुझा गर्भ चळो—हालो. २३

जातेऽग्निमुपसमाधायाङ्क आधाय कꣳसे पृषदाज्यꣳ संनीय पृषदाज्यस्योपघातं जुहोत्यस्मिन्सहस्रं पुष्यासमेधमानः स्वे गृहे । अस्योपसन्द्यां मा च्छैत्सीत्प्रजया च पशुभिश्च स्वाहा । मयि प्राणाꣳस्त्वयि मनसा जुहोमि स्वाहा । यत्कर्मणाऽत्यरीरिचं यद्वा न्यूनमिहाकरम् । अग्निष्टत्स्विष्टकृद्विद्वान्स्विष्टꣳ सुहुतं करोतु नः स्वाहेति ॥ २४ ॥

अर्थ—पुत्रजन्म झाला असतां अग्नीचें उपसमाधान करून पुत्राला मांडीवर घेऊन कांस्यपात्रांत घृतमिश्रित दहीं संयुक्त करून तें पृषदाज्य 'अस्मिन्सहस्रं०'इत्यादि मंत्रांनीं स्वल्प स्वल्प घेऊन पुनः पुनः होमितो. मंत्राचा अर्थ–' अस्मिन् स्वे गृहे-' या आपल्या घरांत पुत्ररूपानें ' एधमानः ' वृद्धि पावणारा मी ' सहस्रं पुष्यासं ' अनेक मनुष्यांचा पोषक व्हावें. ' अस्य-' या माझ्या पुत्राच्या ' उपसन्द्यां-' संततींत ' प्रजया च पशुभिश्च सह-' प्रजा व पशु यांसह श्री ' मा च्छैत्सीत्-' विच्छिन्न न होवो. १. ' मयि प्राणाः-' मज पित्याच्या ठायीं जे प्राण आहेत ते मी तुज पुत्राच्या ठायीं मनानें समर्पितों २. ' यत्कर्मणा०-' मीं कर्मानें—कर्मामध्यें जें अतिरिक्त कर्म केलें किंवा मीं त्यांत जें न्यून केलें तें आमचें सर्व विद्वान् अग्नि स्विष्टकृत् होऊन ' स्विष्टं-' अनधिक—अधिक नाहीं असें, व ' सुहुतं-' अन्यून करो. ३. २४.

अथ जातकर्म । जातेऽग्निमुपसमाधायाङ्क आधाय पुत्रं कंसे पृषदाज्यं संनीय संयोज्य दधि घृते पृषदाज्यस्योपघातं जुहोत्यस्मिन्सहस्रमित्याद्यावापस्थाने ॥ २४ ॥

भाष्यार्थ—प्रसवानंतर जातकर्म. पुत्रजन्म झाला असतां अग्नीचें

उपसमाधान करून पुत्राला मांडीवर ठेवून कांस्यपात्रांत ' पृषदाज्यं संनीय-'दहीं घृतांत संयुक्त करून त्या पृषदाज्याचा स्वल्प स्वल्प भाग पुनः पुनः' अस्मिन्सहस्रं०' इत्यादि मंत्रांनीं आवापस्थानीं होमितो. २४.

अथास्य दक्षिणं कर्णमभिनिधाय वाग्वागिति त्रिरथ दधि मधु घृतꣳ संनीयानन्तर्हितेन जातरूपेण प्राशयति भूस्ते दधामि भुवस्ते दधामि स्वस्ते दधामि भूर्भुवः स्वः सर्वं त्वयि दधामीति ॥२५॥

अर्थ--नंतर उत्पन्न झालेल्या पुत्राच्या उजव्या कानाशीं आपलें मुख नेऊन ' वाग्वाग् ' असें तीनदा जपावें. नंतर दहीं, मध व घृत यांना संयुक्त करून साक्षात् सुवर्णानें या मंत्रांनीं प्रत्येक मंत्राचे शेवटीं तें त्याच्याकडून प्राशन करवितो. 'भूस्ते दधामि, भुवस्ते दधामि, स्वस्ते दधामि, भूर्भुवः स्वः सर्वं त्वयि दधामि ' म्ह० तुझ्या ठिकाणीं सर्व धारण करतों, या मंत्रांनीं प्राशन करवावें. २५.

अथास्या दक्षिणं कर्णमभिनिधाय स्वं मुखं वाग्वागिति त्रिर्जपेत् । अथ दधि मधु घृतं संनीयानन्तर्हितेनाव्यवहितेन जातरूपेण हिरण्येन प्राशयत्येतैर्मन्त्रैः प्रत्येकम् ॥ २५ ॥

भाष्यार्थ--नंतर 'अस्य-' या उत्पन्न झालेल्या पुत्राच्या 'दक्षिणं कर्णं-' उजव्या कानापाशीं 'अभिनिधाय-' आपल्या मुखाला नेऊन ' वाक् वाक् ' असें तीनदा जपावें. ( त्रयीरूप-वेदरूप वाक् तुझ्या ठिकाणीं प्रवेश करो, असा जप करणाऱ्या पित्याचा अभिप्राय. ) नंतर दधि, मध व घृत यांना संयुक्त करून 'अनन्तर्हितेन जातरूपेण-' अव्यवहित-साक्षात् सुवर्णानें 'भूस्ते दधामि' इत्यादि मंत्रांनीं तें प्रत्येक मंत्राच्या शेवटीं त्यास पाजवावें. २५.

अथास्य नाम करोति वेदोऽसीति तदस्यैतद्गुह्यमेव नाम भवति ॥२६॥

अर्थ--नंतर या पुत्राचें नांव 'वेदोऽसि ' तूं वेद आहेत असें पिता करतो. तें जें त्याचें वेद असें नांव तें गुह्यच नांव होतें २६.

अथास्य नामधेयं करोति वेदोऽसीति । तदस्य तद्गुह्यं नाम भवति वेद इति ॥ २६ ॥



**भाष्यार्थ**--नंतर याचें 'वेद आहेस' असें नांव करतो. 'वेद' असें हें त्याचें नांव गुह्यच असतें (लोकांत त्या नांवानें त्याचा व्यवहार होत नाहीं. वेद म्ह० अनुभव, सर्वांचें स्वाभाविक स्वरूप, असा भावार्थ.) २६.

अथैनं मात्रे प्रदाय स्तनं प्रयच्छति यस्ते स्तनः शशयो यो मयोभूर्यो रत्नधा वसुविद्यः सुदत्रः। येन विश्वा पुष्यसि वार्याणि सरस्वति तमिह धातवे करिति ॥२७॥

**अर्थ**--नंतर त्याला मातेपाशीं देऊन 'यस्ते स्तनः०' इत्यादि मंत्रानें त्याला स्तन देतो. (मंत्राचा अर्थ) हे सरस्वति, जो तुझा स्तन, 'शशयः-' फलासह असणारा 'यो मयोभूः' जो सर्व प्राण्यांच्या स्थितीला कारण होणाऱ्या अन्नभावानें झालेला 'रत्नधा-' अन्न किंवा दुग्ध याचा धाता--पालक-धारक-उत्पादक, 'वसुविद्-' जो कर्मफलास प्राप्त होणारा, 'सुदत्रः-' जो चांगल्या प्रकारें देतो, व 'येन विश्वा पुष्यसि वार्याणि-' ज्या स्तनानें तूं सर्व सेवनीय देवादि भूतें पोसतेस 'तं स्तनं-' त्या तुझ्या स्तनाला 'धातवे-' माझ्या पुत्राच्या दुग्धपानासाठीं 'इह करिति-' माझ्या भार्येच्या स्तनांत प्रविष्ट कर. २७.

अथैनं मात्रे प्रदाय स्वाङ्कस्थं स्तनं प्रयच्छति यस्ते स्तन इत्यादिमन्त्रेण ॥ २७ ॥

**भाष्यार्थ**--नंतर त्या आपल्या मांडीवरील पुत्राला मातेपाशीं देऊन 'यस्ते स्तनः' इत्यादि मंत्रानें त्याला स्तन देतो २७.

अथास्य मातरमभिमन्त्रयते। इलाऽसि मैत्रावरुणी वीरे वीरमजीजनत्। सा त्वं वीरवती भव याऽस्मान्वीरवतोऽकरदिति। तं वा एतमाहुरतिपिता बताभूरतिपितामहो बताभूः परमां बत काष्ठां प्रापच्छ्रिया यशसा ब्रह्मवर्चसेन य एवंविदो ब्राह्मणस्य पुत्रो जायत इति ॥ २८ ॥ इति बृहदारण्यकोपनिषदि षष्ठाध्यायस्य चतुर्थं ब्राह्मणम् ॥ ४ ॥

**अर्थ**--नंतर त्याच्या मातेला 'इलासि०' इत्यादि मंत्रानें अभिमंत्रित करतो. हे भार्ये तूं स्तुत्या-भोग्या आहेस (मित्रावरुणापासून जो झाला तो मैत्रावरुण-वसिष्ठ, त्याची भार्या मैत्रावरुणी म्ह० अरुंधती तिच्यासारखी

तूं आहेस, अशा अभिप्रायानें भार्येला तो संबोधितो.) हे 'मैत्रावरुणी,' वीर पुरुष जो मी त्याच्या निमित्तानें तूं वीर पुत्रास प्रसवली आहेस. ती तूं 'वीरवती-' जिचे बहुपुत्र जिवंत आहेत अशी हो, तूं ज्या आम्हांस पुत्रसंपन्न केलें आहेस, ती तूं वीरवती हो ( असा 'इलासि' इत्यादि मंत्राचा अर्थ आहे.) त्या या उत्पन्न झालेल्या पुत्राला म्हणतात—अहो हा मोठाच विस्मय आहे कीं तूं पित्याचें अतिक्रमण करून राहतोस, पितामहाचें अतिक्रमण करून राहतोस. श्री, यश व ब्रह्मवर्चस यांच्या योगानें पराकाष्ठेस प्राप्त झाला आहेस. अशा उपासक ब्राह्मणाचा जो पुत्र उत्पन्न होतो तो असा स्तुत्य होतो. २८ (४)

अथास्य मातरमभिमन्त्रयत इलाऽसीत्यनेन । तं वा एतमाहुरित्यनेन विधिना जातः पुत्रः पितरं पितामहं चातिशेत इति श्रिया यशसा ब्रह्मवर्चसेन परमां निष्ठां प्रापदित्येवं स्तुत्यो भवतीत्यर्थः । यस्य चैवंविदो ब्राह्मणस्य पुत्रो जायते स चैवं स्तुत्यो भवतीत्यध्याहार्यम् ॥२८॥

इति बृहदारण्यकोपनिषद्भाष्ये षष्ठाध्याय चतुर्थं ब्राह्मणम् ॥ ४ ॥

भाष्यार्थ—त्यानंतर त्याच्या मातेला 'इलासि०' इत्यादि मंत्रानें अभिमंत्रित करतो. 'तं वा एतं-' त्या या पुत्राला म्हणतात—या पूर्वोक्त विधीनें उत्पन्न झालेला पुत्र पिता व पितामह यांचें अतिक्रमण करून राहतो, असें म्हणतात. (तूं पिता, पितामह व सर्व कुल या सर्वांहून अधिक झाला आहेस, असा भावार्थ.) तूं श्रीनें, यशानें व ब्रह्मवर्चसानें परम निष्ठेस प्राप्त झाला आहेस अशा प्रकारें तो स्तुत्य होतो, असा भावार्थ. (ही केवळ पुत्राचीच स्तुति नव्हे तर अशा पुत्रानें संपन्न असलेला जो पिता त्याचीही ती आहे, असें सांगतात-) ज्या असें जाणणाऱ्या ब्राह्मणाचा पुत्र उत्पन्न होतो तोही असा स्तुत्य होतो, असा अध्याहार करावा २८

इति श्रीबृहदारण्यकभाष्यार्थांच्या साहाव्या अध्यायाचें चतुर्थ ब्राह्मण समाप्त.

---

अथ वंशः। पौतिमाषीपुत्रः कात्यायनीपुत्रात्कात्यायनीपुत्रो गौतमीपुत्राद्गौतमीपुत्रो भारद्वाजीपुत्राद्भारद्वाजीपुत्रः पाराशरीपुत्रात्पराशरी



पुत्र औपस्वस्तीपुत्रादौपस्वस्तीपुत्रः पाराशरीपुत्रात्पाराशरीपुत्रः कात्यायनीपुत्रात्कात्यायनीपुत्रः कौशिकीपुत्रात्कौशिकीपुत्र आलम्बीपुत्राच्च वैयाघ्रपदीपुत्राच्च वैयाघ्रपदीपुत्रः काण्वीपुत्राच्च कापीपुत्राच्च कापीपुत्रः ॥ १ ॥

अर्थ—आतां वंश—पौतिमाषीपुत्र कात्यायनीपुत्रापासून, कात्यायनीपुत्र गौतमीपुत्रापासून, गौतमीपुत्र भारद्वाजीपुत्रापासून, भारद्वाजीपुत्र पाराशरीपुत्रापासून, पाराशरीपुत्र औपस्वस्तीपुत्रापासून, औपस्वस्तीपुत्र पाराशरीपुत्रापासून, पाराशरीपुत्र कात्यायनीपुत्रापासून, कात्यायनीपुत्र कौशिकीपुत्रापासून, कौशिकीपुत्र आलम्बीपुत्रापासून व वैयाघ्रपदीपुत्रापासून, वैयाघ्रपदीपुत्र काण्वीपुत्रापासून व कापीपुत्रापासून, कापीपुत्र ( आत्रेयीपुत्रापासून असा पुढें संबंध.) १.

आत्रेयीपुत्रादात्रेयीपुत्रो गौतमीपुत्राद्गौतमीपुत्रो भारद्वाजीपुत्राद्भारद्वाजीपुत्रः पाराशरीपुत्रात्पाराशरीपुत्रो वात्सीपुत्राद्वात्सीपुत्रः पाराशरीपुत्रात्पाराशरीपुत्रो वार्कारुणीपुत्राद्वार्कारुणी पुत्रो वार्कारुणीपुत्राद्वार्कारुणीपुत्र आर्तभागीपुत्रादार्तभागीपुत्रः शौङ्गीपुत्राच्छौङ्गीपुत्रः सांकृतीपुत्रात्सांकृतीपुत्र आलम्बायनीपुत्रादालम्बायनीपुत्र आलम्बीपुत्रादालम्बीपुत्रो जायन्तीपुत्राज्जायन्तीपुत्रो माण्डूकायनीपुत्रान्माण्डूकायनीपुत्रो माण्डूकीपुत्रान्माण्डूकीपुत्रः शाण्डिलीपुत्राच्छाण्डिलीपुत्रो राथीतरीपुत्राद्राथीतरीपुत्रो भालुकीपुत्राद्भालुकीपुत्रः क्रौञ्चिकीपुत्राभ्यां क्रौञ्चिकीपुत्रौ वैदभृतीपुत्राद्वैदभृतीपुत्रः कार्शकेयीपुत्रात्कार्शकेयीपुत्रः प्राचीनयोगीपुत्रात्प्राचीनयोगीपुत्रः सांजीवीपुत्रात्सांजीवीपुत्रः प्राश्नीपुत्रादासुरिवासिनः प्राश्नीपुत्र आसुरायणादासुरायण आसुरेरासुरिः ॥ २ ॥

अर्थ—( कापीपुत्र ) आत्रेयीपुत्रापासून, आत्रेयीपुत्र गौतमीपुत्रापासून, गौतमीपुत्र भारद्वाजीपुत्रापासून, भारद्वाजी पुत्र पाराशरीपुत्रापासून, पाराशरीपुत्र वात्सीपुत्रापासून, वात्सीपुत्र पाराशरीपुत्रापासून, पाराशरीपुत्र वार्कारुणीपुत्रापासून, वार्कारुणीपुत्र वार्कारुणीपुत्रापासून, वार्कारुणीपुत्र आर्तभागीपुत्रापासून, आर्तभागीपुत्र शौंगीपुत्रापासून, शौंगीपुत्र सांकृतीपुत्रापासून, सांकृतीपुत्र आलंबायनीपुत्रापासून, आलंबायनीपुत्र आलंबीपुत्रापासून, आलंबीपुत्र जायन्तीपुत्रापासून, जायन्तीपुत्र माण्डूकायनी-

पुत्रापासून, माण्डूकायनीपुत्र माण्डूकीपुत्रापासून, माण्डूकीपुत्र शाण्डिलीपुत्रापासून, शाण्डिलीपुत्र राथीतरीपुत्रापासून, राथीतरीपुत्र भालुकीपुत्रापासून, भालुकी पुत्र दोघां क्रौंचिकीपुत्रांपासून, दोघे क्रौंचिकीपुत्र वैदभृतीपुत्रापासून, वैदभृतीपुत्र कार्शकेयीपुत्रापासून, कार्शकेयीपुत्र प्राचीनयोगीपुत्रापासून, प्राचीनयोगीपुत्र सांजीवीपुत्रापासून, सांजीवीपुत्र आसुरिवासी प्राश्नीपुत्रापासून, प्राश्नीपुत्र असुरायणापासून, आसुरायण आसुरीपासून, आसुरि (याज्ञवल्क्यापासून असा पुढें संबंध.) २

याज्ञवल्क्याद्याज्ञवल्क्य उद्दालकादुद्दालकोऽरुणादरुण उपवेशेरुपवेशिः कुश्रेः कुश्रिर्वाजश्रवसो वाजश्रवा जिह्वावतो बाध्योगाज्जिह्वावान्बाध्योगोऽसिताद्वार्षगणादसितो वार्षगणो हरितात्कश्यपाद्धरितः कश्यपः शिल्पात्कश्यपाच्छिल्पः कश्यपः कश्यपान्नैध्रुवेः कश्यपो नैध्रुविर्वाचो वागम्भिण्या अम्भिण्यादित्यादादित्यानीमानि शुक्लानि यजूंषि वाजसनेयेन याज्ञवल्क्येनाऽऽख्यायन्ते ॥ ३ ॥

अर्थ—( आसुरि ) याज्ञवल्क्यापासून, याज्ञवल्क्य उद्दालकापासून, उद्दालक अरुणापासून, अरुण उपवेशीपासून, उपवेशि कुश्रीपासून, कुश्रि वाजश्रवापासून, वाजश्रवा जिह्वावतापासून, जिह्वावान् बाध्योगापासून, बाध्योग वार्षगण असितापासून, वार्षगण असित हरितकश्यपापासून, हरितकश्यप शिल्पापासून, शिल्प कश्यपापासून, कश्यप कश्यपनैध्रुवीपासून, कश्यपनैध्रुवि वाक्-पासून, वाक् अंभिणीपासून, अंभिणि आदित्यापासून, आदित्यानें सांगितलेलीं हीं शुक्ल याजुषें याज्ञवल्क्याकडून प्रकट केलीं जातात ३.

समानमा सांजीवीपुत्रात्सांजीवीपुत्रो माण्डूकायनेर्माण्डूकायनिर्माण्डव्यान्माण्डव्यः कौत्सात्कौत्सो माहित्थेर्माहित्थिर्वामकक्षायणाद्वामकक्षायणः शाण्डिल्याच्छाण्डिल्यो वात्स्याद्वात्स्यः कुश्रेः कुश्रिर्यज्ञवचसो राजस्तम्बायनाद्यज्ञवचा राजस्तम्बायनस्तुरात्कावषेयात्तुरः कावषेयः प्रजापतेः प्रजा पतिर्ब्रह्मणो ब्रह्म स्वयंभु ब्रह्मणे नमः ॥४॥ इति बृहदारण्यकोपनिषदि षष्ठाध्यायस्य पञ्चमं ब्राह्मणम् ॥ ५ ॥

इति वाजसनेयके बृहदारण्यकोपनिषदि षष्ठोऽध्यायः ॥ ६ ॥

इति वाजसनेयकबृहदारण्यकक्रमेणाष्टमोऽध्यायः ॥८॥





अर्थ—सांजीवीपुत्रापर्यंत सर्व वाजसनेयिशाखांमध्यें एकच वंश आहे, सांजीवीपुत्र मांडूकायनीपासून, मांडूकायनि मांडव्यापासून, मांडव्य कौत्सापासून, कौत्स माहित्थीपासून, माहित्थि वामकक्षायणापासून, वामकक्षायण शांडिल्यापासून, शांडिल्य वात्स्यापासून; वात्स्य कुश्रीपासून, कुश्रि यज्ञवचापासून, यज्ञवचा राजस्तंबायनापासून, राजस्तंबायन तुर कावषेयापासून, तुर कावषेय प्रजापतीपासून, प्रजापति ब्रह्मापासून, ब्रह्म स्वयंभु नित्य आहे. त्या ब्रह्मास नमस्कार असो ४. (५)

अथेदानीं समस्तप्रवचनवंशः । स्त्रीप्राधान्यात् । गुणवान्पुत्रो भवतीति प्रस्तुतम् । अतः स्त्रीविशेषणेनैव पुत्रविशेषणादाचार्यपरंपरा कीर्त्यते । तानीमानि शुक्लानीत्यव्यामिश्राणि ब्राह्मणेन । अथवा यानीमानि यजूंषि तानि शुक्लानि शुद्धानीत्येतत् । प्रजापतिमारभ्य यावत्पौतिमाषीपुत्रस्तावदधोमुखो नियताचार्यपूर्वक्रमो वंशः समानमा सांजीवीपुत्रात् । ब्रह्मणः प्रवचनाख्यस्य । तच्चैतद्ब्रह्म प्रजापतिप्रबन्धपरंपरयाऽऽगत्यास्मास्वनेकधा विप्रसृतमनाद्यनन्तं स्वयंभु ब्रह्म नित्यं तस्मै ब्रह्मणे नमः । नमस्तदनुवर्तिभ्यो गुरुभ्यः ॥ १ ॥ २ ॥ ३ ॥ ४ ॥

इति बृहदारण्यकोपनिषद्भाष्ये षष्ठाध्यायस्य पञ्चमं ब्राह्मणम् ॥ ५ ॥

इति श्रीगोविन्दभगवत्पूज्यपादशिष्यस्य परमहंसपरिव्राजकाचार्यस्य श्रीशंकरभगवतः कृतौ बृहदारण्यकोपनिषद्भाष्ये षष्ठोऽध्यायः ॥ ६ ॥

भाष्यार्थ—( हा वंश खिलकांडाचाच आहे, असें कोणाला वाटेल म्हणून आचार्य म्हणतात—) आतां समस्तप्रवचनाचा वंश सांगितला जातो. ( पूर्वीचे दोन वंश पुरुषविशेषित होते, आणि हा स्त्रीविशेषित कां ? उत्तर—) स्त्रीप्राधान्यामुळें हा वंश स्त्रीविशेषित आहे. गुणवान् पुत्र होतो, असें प्रकरण चालू आहे. म्हणून स्त्रीविशेषणानेंच पुत्रविशेषण करून ( आईच्या नांवावरूनच पुत्रांना विशेषित करून ) या ब्राह्मणाकडून आचार्यपरंपरा सांगितली जाते. 'शुक्लानि' तीं हीं शुक्ल

म्हणजे दोषांनीं असंकीर्ण- ब्राह्मणानें व्यामिश्र न झालेलीं. (कारण पौरुषेयत्व हें दोषाचें द्वार यांत नाहीं, असा भावार्थ.) किंवा हीं जीं यजूषें तीं शुक्ल—शुद्ध, (अयातयाम—अदुष्ट अगतार्थ, असा भाव. पाठक्रमानें मनुष्यापासून प्रजापतीपर्यंत वंश सांगितला. आतां अर्थक्रमाचा आश्रय करून सांगतात—) प्रजापतीपासून आरंभ करून पौतिमाषीपुत्रापर्यंत अधोमुख म्ह. अर्थक्रमाच्या अनुसार—पाठक्रमाच्या उलट—नियत आचार्यांचा पूर्वक्रम हा वंश. तो प्रजापतीपासून सांजीवीपुत्रापर्यंत सर्व वाजसनेयिशाखांमध्यें समान आहे. प्रवचनाख्य—वंशरूप ब्रह्माच्या संबंधासून प्रजापति विद्येला प्राप्त करून घेता झाला. तें हें ब्रह्म प्रजापतीपासून परंपरेनें येऊन आम्हांमध्यें अनेक प्रकारें पसरलें आहे. तें ब्रह्म परमात्मरूप असल्यामुळें स्वयंभु—आदि-अंतरहित व नित्य आहे. त्या ब्रह्माला नमस्कार असो; तदनुवर्ती गुरूंना नमस्कार असो १—४.

इति श्रीबृहदारण्यकभाष्यार्थांच्या षष्ठाध्यायाचें पांचवें ब्राह्मण समाप्त.
इति श्रीशंकराचार्यभक्त विष्णुशर्मकृत बृहदारण्यकभाष्यार्थाचा सहावा अध्याय समाप्त झाला.

येथें हा ग्रंथही समाप्त झाला.

श्रीकृष्णार्पणमस्तु.

---



# महाराष्ट्रीयांस जाहीर विनंति.

वि. वि. ब्रह्मविद्याग्रंथरत्नमाला सुरू होऊन येत्या माघ शु. ५ मीस सहा वर्षें पुरीं होतात. पण त्यांतील एक वर्ष तिचें काम बंद होतें. त्यामुळें सुमारें साडेचार वर्षांत तिचें जवळ जवळ एक तृतीयांश काम पुरें झालें आहे, आम्ही मध्यें सुमारें एक वर्षभर करवीरपीठाच्या नादाला लागून त्याच्याकडून कांहीं तरी वेदशास्त्रोत्तेजनपर कार्य करविण्यासाठीं जो वृथा खटाटोप केला तो जर केला नसता तर आजवर राहिलेलीं दोन्हीं उपनिषदेंही संपली असतीं व आचार्यही बंद पडला नसता. पण भवितव्यतेमुळें उपनिषदांचें प्रकाशन लांबलें व आचार्यही बंद पडला, ही खरोखर मोठी खेदाची गोष्ट आहे.

आचार्य व ब्रह्मविद्याग्रंथरत्नमाला या दोघांनाही भरपुर ग्राहक नाहींत. त्यामुळें गेल्या चार पांच वर्षांत दोन्हीं मिळून सुमारें ४ हजार रुपये आमच्या अंगावर आले आहेत. अशा अवस्थेंत आचार्यादि पुढें सुरू करणें योग्य नाहीं. तथापि अनेक ग्राहकांची तीं दोन्ही आम्हीं चालवावीं अशी उत्कट इच्छा आहे. कित्येकांनीं तर ‘ वर्गणी जास्त करा पण आचार्य बंद करूं नका. हें धार्मिक कार्य बंद केल्यास तुम्हांला पाप लागेल ’ असेंही आम्हांला कळकळीनें कळविलें आहे.

हल्लीं कागद चौपट महाग झाला आहे. छापण्याचें इतर सामानही महाग झालें आहे. अशा अवस्थेंत आचार्य व ब्रह्मविद्या सुरू ठेवणें हें मोठें धाडस आहे. तथापि केवल, बऱ्याच ग्राहकांचा फारच आग्रह असल्याळें आम्ही भाद्रपद शुद्ध पौर्णिमेपासून डेमि अष्टपत्री म्ह० ब्रह्मविद्येच्या ६४ पृष्ठांचें आचार्य मासिक सुरू करणार आहों. तें प्रत्येक महिन्याच्या १५ मेस प्रसिद्ध होईल. त्यांतूनच ब्रह्मविद्या-मालेंतील राहिलेले ग्रंथही क्रमानें प्रसिद्ध होतील व कांहीं पृष्ठें इतस्ततः, अग्रलेख, इत्यादि प्रासंगिक स्वतंत्र मजकूरही बारिक टाइपांत देऊं. वा. वर्गणी ट. ख. सह रुपये तीन. कागद स्वस्त होतांच आम्ही आचार्य पुनः पाक्षिक करूं.

आचार्य मासिकांतून या पुढें क्रमानें मांडूक्योपनिषद्भाष्यार्थ ( श्रीगौ-
डपाचार्यांच्या कारिका, भाष्य, व अर्थ यांसह ) छान्दोग्योपनिषद्भाष्यार्थ
( मूळ, अर्थ व भाष्य यांसह ) न्यायदर्शन, सांख्यदर्शन; योगदर्शन,
वेदान्तदर्शन, ( सर्व मूळ सूत्रांसह ) अनुभूतिप्रकाश व आत्मपुराण (मूळ
उन्वय व अर्थ यांसह) हे ग्रंथ प्रसिद्ध होतील. आचार्यांत अपुरें राहि-
लेलें गीता अथवा सांख्ययोगशास्त्र व वैशेषिकदर्शन सवडीनें देऊं

राष्ट्रीय कार्याचें प्रकार अनेक आहेत. त्यांतील जगद्गुरुशंकराचार्यांचें
तत्त्वज्ञान त्यांच्याच ग्रंथांच्या भाषांतररूपानें महाराष्ट्रास उपलब्ध करून
देण्याचा भाग आम्हीं पतकरला आहे. पण तो शेवटास जाण्यास लो-
कांचें साह्य पाहिजे. तरी ज्यांनः या कार्याचें महत्त्व वाटत असेल त्यांनीं
आचार्यमासिकास पुढें ग्राहक होऊन व मागील, पुस्तकें घेऊन या
कामीं अम्हांस साह्य करावें व इतरांकडून करवावें.

आजपर्यंत प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांची किं. २० रु. होते. पण आचार्याचे
ग्राहक होणारांस तीं सर्व १५ रुपयांस देऊं. ट.ख. सुमारें १॥. वेगळा.



